# भारतीय अर्थशास्त्र

लेखक:

प्रो. वामन गोविंद काळे, एम्. ए.

व

प्रो. दत्तात्रेय गोपाळ कर्वे, एम्. ए.

**किंमत पांच रुपये.**

हें पुस्तक पुणें पेठ भांबुर्डा घ. नं. १२६।२ येथें
आर्यभूषण छापखान्यांत **अनंत विनायक पटवर्धन**
यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१९२९

# प्रस्तावना.

हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीची सांगोपांग माहिती देऊन तिचें शास्त्रीय पद्धतीनें विवेचन करणारा मराठी भाषेंतील हा पहिलाच ग्रंथ आहे हा त्याचा महत्त्वाचा विशेष आहे. अर्थशास्त्राच्या मूलतत्त्वांवरचें आमचें पुस्तक प्रसिद्ध झाल्यास आज दोन वर्षें होऊन गेलीं, आणि त्याच्या प्रस्तावनेंत अभिवचन दिल्याप्रमाणें त्याचा जोडीदार म्हणून प्रस्तुत ग्रंथ आज आमच्या हातावेगळा झाला याबद्दल आम्हांस समाधान वाटत आहे. भारतीय अर्थशास्त्राची माहिती करून घेणारास मूळ अर्थशास्त्राच्या प्रमुख सिद्धांतांचें ज्ञान आवश्यक असल्यानें ह्या ग्रंथाच्या प्रारंभींचीं सुमारें दोनशें पानें त्या विवेचनास वाहिली आहेत. उद्देश असा की ह्या एकाच ग्रंथांत अर्थशास्त्राचें आणि भारतीय अर्थशास्त्राचें उद्‍घाटन केलेलें वाचकांस सांपडून अर्थशास्त्राच्या मूल तत्त्वासाठी दुसऱ्या ग्रंथांकडे धांव घेण्याचें त्यांस कारण राहूं नये. प्रस्तुत ग्रंथाचा हा जो भाग आहे तो आम्ही आमच्या वर निर्दिष्ट केलेल्या प्रथम प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतून उचलून घेतलेला आहे. ह्या रीतीनें विद्यार्थी आणि जिज्ञासु वाचक ह्यांची दोन्ही बाजूंनीं सोय झाली आहे.

सध्यांच्या लोकशाहीच्या काळांत व हिंदुस्थानासारख्या उदयोन्मुख राष्ट्रांत जगाच्या व आपल्या देशाच्या आर्थिक स्थितीची वास्तविक कल्पना असणें प्रत्येक नागरिकास अत्यंत आवश्यक आहे. कायदेमंडळांत आणि सार्वजनिक व्यासपीठावर आर्थिक स्वरूपाचे अनेक महत्वाचे प्रश्न प्रत्यहीं येत आहेत. व्यापार, उद्योगधंदे, चलनपद्धति, हुंडणावळ, जमिनिमहसूल, शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा, पेढ्या वगैरे बाबींची चर्चा सारखी चालू असून त्यांवर मत बनविण्याची आणि त्याप्रमाणें कृति करण्याची जबाबदारी सर्वांवर येऊन पडली आहे. अशा स्थितीत अर्थशास्त्रविषयक प्रश्नांची योग्य चर्चा होण्याचें आणि त्याबाबत जरूर असलेल्या लोकशिक्षणाचें महत्त्व लक्ष्यांत घेऊन आम्हीं प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध केला आहे व त्याचें चीज करण्याचें काम आम्ही महाराष्ट्रीय जनतेवर सोंपवीत आहों.

'भारतीय अर्थशास्त्र' हा ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्रासारख्या हिंदी अर्थशास्त्रांचा इतिहास नव्हे किंवा तसल्या ग्रंथांचें तो अनुकरण किंवा रूपांतरहि नव्हे. 'मानवी समाजाचें जर एकच अर्थशास्त्र असणार, तर तुमचें भारतीय अर्थशास्त्र ही नवी चीज काय आहे?' अशी शंका कित्येकांस येईल आणि तसला आक्षेप घेण्यांतहि आलेला आहे. त्याचें निरसन थोडक्यांत असें आहेः–अर्थशास्त्राचे सिद्धांत बे, चे चार, अशा सिद्धांतांप्रमाणे त्रिकालाबाधित नाहीत ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे, आणि प्रत्येक राष्ट्राच्या भिन्न परिस्थितीप्रमाणें आर्थिक अनुमानें आणि उपाय–योजना ह्यांचें भिन्नत्व संभवतें व

सिद्ध होतें ही कल्पना रूढ झाली आहे. शिवाय, गणितशास्त्रविशारदांस आपल्या प्रमेयांच्या जोरावर जसा यशस्वी रीतीनें व्यवहार करतां येतोच असें नाहीं किंवा मायावादी वेदांत्यांच्या मागचा संसार चुकतोच असें नाहीं तसेंच, उतरत्या पैदाशीचा किंवा माल्थसचा प्रजावृद्धीचा सिद्धांत तत्त्वतः खरा असला तरी तो प्रत्येक ठिकाणीं लागतो असें अर्थशास्त्रज्ञांस म्हणतां यावयाचें नाहीं. अर्थशास्त्र हें भौतिक शास्त्र नसून सामाजिक शास्त्र आहे व त्याचा [illegible]क्यानें म्हटल्याप्रमाणें,' आन्वीक्षिकी, वेद, आणि दंड नीति ह्या शास्त्रांशीं अत्यंत निकट संबंध आहे. अर्थात् हिंदुस्थानाची विशिष्ट राजकीय, सामाजिक व धार्मिक स्थिति आणि परंपरा, तसेंच हिंदी लोकांच्या राष्ट्रीय भावना आणि राजकीय महत्त्वाकांक्षा ह्या सर्व [illegible]ध्यांत धरूनच येथें अर्थशास्त्राचे सिद्धांत आणि शिकवण ह्यांची मांडणी केली [illegible] ही विशिष्ट कामगिरी करणारें जें शास्त्र तें 'भारतीय अर्थशास्त्र' आणि [illegible] विवेचन आम्ही प्रस्तुत ग्रंथांत केलें आहे. ग्रंथकारद्वयापैकीं एकानें लिहिलेल्या Indian Economics ह्या इंग्रजी ग्रंथाच्या आधारावर ही रचना केली असून केवळ मराठी जाणणारास त्याचा चांगला उपयोग व्हावा अशी त्यांत योजना केलेली आहे. इंग्लिश जाणणाऱ्या वाचकांसहि अर्थशास्त्राचा अवघड विषय प्रस्तुत पुस्तकाच्या द्वारें सहज समजण्यासारखा आहे.

पुणें,
२०-९-२९

वा. गो. काळे.
द. गो. कर्वे.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला

### प्रास्ताविक

विषय पान

**उपोद्घात १—१६**



**प्रकरण पहिलें. संपत्तीचें उत्पादन १७—४७**

## प्रकरण दुसरें. संपत्तीचा विनिमय ४८—८९



## प्रकरण तिसरें. संपत्तीची विभागणी ९०—१२६

विषय पान



## प्रकरण चवथें. सरकारी उत्पन्न व खर्च १२७–१६६

विषय पान



**प्रकरण नववें. उद्योगधंदे व व्यापार ३९४-४२२**



**प्रकरण दहावें. हिंदी चलनपद्धति ४२३-४६५**



**प्रकरण अकरावें. परराष्ट्रीय हुंडणावळ ४६६-४९४**

## प्रकरण चौदावें. राष्ट्रीय उत्पन्नांतील वांटेकरी ५४८–५९४.



## प्रकरण पंधरावें. हिंदुस्थानांतील सरकारी उत्पन्न व खर्च ५९५–६३९

# उपोद्घात



१ **अर्थशास्त्र**--कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करावयाचा असल्यास आरंभी त्या शास्त्राची व्याख्या करण्याचा प्रघात आहे. आपण ज्या विषयासंबंधी ऊहापोह करणार त्यांत कोणकोणत्या गोष्टी यावयाच्या आहेत याची वाचकांस आगाऊ माहिती करून देणें अनेक दृष्टींनी इष्ट असतें. परंतु या प्रघाताबद्दल असें म्हणतां येण्यासारखें आहे की, एकाच शास्त्राचा विचार करीत असतां त्यांत येणारे निरनिराळे विषय व त्यांची चर्चा चालू असतां वापरावयाचे शब्दप्रयोग यांचा पूर्णार्थ व अन्योन्य संबंध प्रथमतः ध्यानांत येणें कठिण असतें; आणि पुष्कळ वेळा प्रास्ताविक भागांत दिलेल्या व्याख्यांचा खरा अर्थ ग्रंथाचा उपसंहार वाचून होईपर्यंत सामान्य मनुष्यास कळत नाहीं. यास्तव, अर्थशास्त्र या विषयाची पूर्ण व सर्वांशी समाधानकारक व्याख्या करीत न बसतां या शास्त्राच्या विचारकक्षेत मुख्यतः कोणकोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो, हें सांगणें अधिक सोयीचें होईल. अर्थशास्त्र या समासांतील अर्थ हा शब्द विशेष महत्त्वाचा असून, अर्थ म्हणजे संपत्ति व संपत्तीसंबंधीं सोपपत्तिक विचार करणारें जें शास्त्र, तें अर्थशास्त्र, याप्रमाणें अर्थशास्त्राचें योग्य क्षेत्र अगदीं वर वर पहाणारासही दिग्दर्शित करतां येईल. परंतु अर्थ ह्या क्वचित् वापरल्या जाणाऱ्या शब्दाऐवजीं संपत्ति हा नेहमींच्या प्रचारांतील शब्द प्रस्तुत शास्त्रांतील मुख्य विषयास लावला असतां संपत्ति म्हणजे काय ? हा प्रश्न पुन्हा उद्भवतो. व्यवहारांत संपत्ति या शब्दाचे अनेक अर्थ असून धनधान्य, घरदार, गुरेंढोरें इत्यादि प्रापंचिक सुखसाधनांचा त्यापासून सामान्यतः बोध होतो. शिवाय, लक्षणेनें शरीरसंपत्ति, पारमार्थिक संपत्ति असले शब्दप्रयोगही रूढ आहेत. परंतु अर्थ या शब्दांतील अभिप्रेत आशय म्हणजे, 'आधिभौतिक[1] सुखाचें साधन' हा संपत्ति या शब्दांत पूर्णांशानें येत नसून आधिभौतिक सुखाचें एक साधन किंवा कांहीं साधनें असा त्यावरून बोध होतो. शिवाय संपत्तीबरोबर समृद्धीची कल्पना संलग्न असल्यामुळें द्रव्याच्या अल्पांशास आपण साधारणपणें संपत्ति असें म्हणूं शक-

---

१ आधिभौतिक या शब्दाबद्दल येथें थोडी फोड करणें जरूर आहे. जें आधिदैविक किंवा अध्यात्मिक नव्हे तें आधिभौतिक असा या शब्दाचा एक अर्थ असून सर्व ऐहिक गोष्टींस तो लावतां येण्यासारखा आहे. परंतु अर्वाचीन अर्थशास्त्राचें, म्हणजे इंग्रजींत ज्यास 'पोलिटिकल इकॉनॉमी' म्हणतात त्या शास्त्राचें क्षेत्र दिग्दर्शित करतांना आधिभौतिक याचा वासनात्मक हा संकुचित परंतु शास्त्रीय अर्थच ग्राह्य धरलेला आहे.

णार नाहीं. यावरून अर्थशास्त्र या मूळ शब्दास संपत्तीचें शास्त्र हा योग्य पर्यायशब्द नव्हे, हें दिसून येईल. अर्थ या शब्दानें आधिभौतिक सुखाचें साधन एवढीच कल्पना सूचित होत असून तीं साधनें विपुल आहेत कीं मर्यादित आहेत याबद्दल त्यावरून बोध होत नाहीं. त्याचप्रमाणें आधिभौतिक सुखाच्या सर्व साधनांस अर्थ हा शब्द लावतां येतो असें नाहीं. उदाहरणार्थ, आपणांभोंवतीं जें हवेचें वेष्टण आहे त्यावर प्राणिमात्राचें अस्तित्व अवलंबून आहे; तरी आपण सहसा हवेस अर्थ असें म्हणणार नाहीं. ज्या ठिकाणीं स्वच्छ पाण्याचा साठा निसर्गनिर्मित व मुबलक आहे तेथें पाण्यास, व मनुष्यप्राणी रानावनांत रहात असतां फळफळांची समृद्धि असल्यास त्यांसही अर्थ या नांवानें संबोधतां येणार नाहीं. परंतु लोकसंख्या वाढल्यामुळें शुद्ध व मोकळी हवा जरूरीपेक्षा कमी मिळूं लागल्यास ती मिळविणें ऐहिक जीवनाच्या दृष्टीनें इतकें महत्त्वाचें होईल कीं, त्याकरितां मनुष्य विशेष खटपट करण्यास व त्रास सोसण्यास तयार होईल. अशा प्रसंगीं शुद्ध हवेस देखील 'अर्थ' म्हणावें लागेल. हवाशीर जागांस कोंदट जागापेक्षां अधिक भाडें द्यावें लागतें, ह्या सामान्य अनुभवावरून वरील गोष्टीची सत्यता वाचकास पटेल. शहरांत व अनेक खेडेगावांत शुद्ध पाण्याचा मुबलक पुरवठा मिळविण्यास तेथील लोकांस खटपट करावी लागून पुष्कळ झीज सोसावी लागते, हें सर्वांस ठाऊकच आहे. यावरून 'अर्थ[1]' या शब्दाची व्याख्या 'मनुष्याच्या आधिभौतिक सुखाचें जें साधन मिळविण्यास तो आपलें आलस्य व ऐदीपणा सोडून कांहीं तरी श्रम करण्यास व त्रास सोसण्यास तयार होतो तें साधन,' अशी करावी लागते; व या अनुरोधानें अर्थशास्त्र म्हणजे मनुष्याच्या आधिभौतिक सुखसाधनाचें शास्त्र, असें म्हणावयास हरकत नाहीं. 'संपत्ति' या शब्दाचा रूढ अर्थ सोडून देऊन 'अर्थ' या शब्दाची वरील व्याख्या स्वीकारल्यास ठोकळ मानानें अर्थशास्त्र म्हणजे संपत्तीचें शास्त्र असें म्हणतां येईल. लौकिक व्यवहाराच्या भाषेत सांगावयाचें म्हणजे समाजाच्या पोटापाण्याचा प्रश्न हा अर्थशास्त्राचा मुख्य विषय असून लोकांचा चरितार्थ कोणत्या रीतीनें चालतो या गोष्टीचा त्या शास्त्रांत प्रामुख्यानें विचार करावयाचा असतो.

---

१ संस्कृत व मराठी वाङ्मयांत अर्थ हा शब्दही भिन्न भिन्न उद्देशांनीं वापरलेला आढळतो. उदाहरणार्थ, 'अर्थोऽहि कन्या परकीय एव' ह्या कालिदासाच्या शाकुंतलांतील उक्तीमध्यें 'अर्थ' शब्दानें बहुमोल वस्तूची कल्पना व्यक्त केलेली असून काव्यप्रचार म्हणून कन्येचें 'परकीय अर्थ' असें वर्णन केलेलें आहे.

अर्बुद गाई देतों किंवा देतों स्वराज्य भोगाया ॥
दे गाय, काय विनिमय हा भवदर्थीं न मान्य हो गा या ॥

ह्या पंतांच्या आर्येंत मात्र 'अर्थ' ह्या शब्दाचा आम्हांस येथें अभिप्रेत असलेला आशय योग्य रीतीनें व्यक्त केलेला आहे.

**२ अर्थशास्त्राचें महत्त्व**—मनुष्याच्या आधिभौतिक सुखसाधनांचा पूर्णपणे विचार करणें हे अर्थशास्त्राचें मुख्य कार्य होय, या सामान्य विधानावरून त्या शास्त्राचें खरें महत्त्व ध्यानांत येणें कठीण आहे. अर्थशास्त्रांत आधिभौतिक सुखसाधनांचें जे विवेचन करावयाचें तें तीं 'मनुष्याच्या सुखाचीं साधनें आहेत, म्हणून होय. एरवीं, मनुष्यास ठाऊक अगर उपलब्ध नसलेलीं जीं अनेक सुखसाधनें आहेत त्यांचा अर्थशास्त्रांत उल्लेख करण्याचें मुळींच कारण नसतें. मनुष्यें जात्या समुदायप्रिय असल्यामुळें यत्किंचित् बौद्धिक प्रगति झाल्यानंतर तीं समाजाशिवाय, एकलकोंडी अशीं, रहात नाहींत; आणि समाजाच्या या नैसर्गिक वाढीबरोबर मनुष्यांचे एकमेकांशीं अनेक प्रकारचे संबंध उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, समाजनियंत्रणाचें कार्य करणाऱ्या शासनसंस्थेचे घटक म्हणून त्यांचे जे परस्पर संबंध होतात, ते एकाच धर्माचे उपासक या नात्यानें त्यांच्यांत प्रचलित असलेल्या संबंधापेक्षा सहाजिकपणें भिन्न असतात; किंवा नीतिशास्त्रविषयक ज्या कल्पना एकाद्या काळीं सर्वमान्य असतात त्यास अनुसरून एकमेकांशीं होत असलेले त्यांचे व्यवहार त्यांच्या कायद्यानें मंजूर केलेल्या व्यवहाराहून निराळे असूं शकतात. तसेंच, आपल्या आधिभौतिक गरजा भागविण्याकरितां समाजांतील सर्व मनुष्यें व्यक्तिशः किंवा संकलित स्वरूपानें यत्न करीत असतां त्यांचे परस्पर घडून येणारे संबंध व व्यवहार हे या सर्वांहून भिन्न असतात. आतां हें खरें कीं, यापैकीं कोणत्याही एका प्रकारच्या व्यवहारांचा दुसऱ्या प्रकारच्या व्यवहारांवर बरावाईट परिणाम झाल्याशिवाय सहसा रहात नाहीं. परंतु वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारांपैकीं प्रत्येकाचें स्वरूप व गुणदोष यामध्यें स्पष्टपणें दिसून येणारे भेद असतात. म्हणून त्यांपैकीं प्रत्येक प्रकारच्या व्यवहारांचा स्वतंत्रपणें विचार करण्यासाठीं शासनशास्त्र, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, न्यायशास्त्र व अर्थशास्त्र इत्यादि शास्त्रें असूनही त्या सर्वांचा एकत्रितपणें विचार करून समाजाचें सर्व बाजूंनीं धारण व पोषण कसें होईल याबद्दल विवेचन करण्याकरितां समाजशास्त्र नांवाच्या वेगळ्या शास्त्राची जरूरी असते. समाजशास्त्र व वर नमूद केलेलीं इतर सामाजिक शास्त्रें या सर्वांचा मुख्य उद्देश, मनुष्याच्या आयुष्यक्रमांतील विशेषांचा उत्क्रांति व सद्यःस्थिति ह्यांच्या दृष्टीनें सर्वांगपूर्ण अभ्यास करून व्यक्ति आणि समाज ह्यांचा योग्य विकास व सुधारणा घडवून आणण्याचे मार्ग सुचविणें हा असतो. अर्थशास्त्राचें कार्य अशाच स्वरूपाचें आहे. मनुष्यांच्या जीवितांतील प्राथमिक महत्वाची बाब म्हटली म्हणजे आपला व आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालविणें ही असून तसें करण्यास 'अर्थ' अगर संपत्ति यांची आवश्यकता आहे. म्हणून सामाजिक व वैयक्तिक हितासंबंधीं विचार करण्यास प्रारंभ करतांच, संपत्तीचें 'उत्पादन' होऊन 'विनिमय'द्वारा समाजांतील मनुष्यांमध्यें तिची 'विभागणी' कशी होते, हा प्रश्न साहजिकपणें उद्भवतो. त्याच-

प्रमाणे, प्रत्येक राष्ट्रांत उत्पन्न झालेल्या एकंदर संपत्तीचा तेथील लोक कोणत्या तऱ्हेने व किती 'उपभोग' घेतात ह्या व्यावहारिक महत्त्वाच्या गोष्टीचा विचार करणें प्राप्त होतें. कारण 'संपत्ति' हें जीवनसौख्याचें एक साधन असून ज्या मार्गानें तिचा समाजांतील साधारण मनुष्यांच्या आयुष्यक्रमावर हितावह परिणाम होईल त्या मार्गानें तिचें उत्पादन, विनिमय व विभागणी हीं होणें इष्ट आहे. संपत्तीच्या उपभोगासंबंधीं सध्यां एवढेंच सांगितलें असतां पुरे होईल कीं, जगांतील बहुतेक सर्व राष्ट्रांत गरीब लोकांची संख्या सुखवस्तु किंवा श्रीमंत लोकांहून अनेक पटींनी जास्त असते. हिंदुस्थान म्हणजे तर बोलून चालून दरिद्री लोकांचें राष्ट्र आहे। तेव्हां, येथें असल्या चर्चेची किती आवश्यकता आहे हें निराळें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. अर्थशास्त्रांत संपत्तीचा सर्व बाजूंनी विचार करतेवेळीं, शेवटीं समाजांतील साधारण मनुष्याचें जीवित सुधारून तें कमी कष्टमय कसें करतां येईल, हा प्रश्न नेहमीं डोळ्यापुढें ठेवावा लागतो.

**३ आर्थिक व्यवसाय**—कित्येक लोकांचा असा समज असतो कीं, 'निसर्ग देवता अत्यंत उदार असून मनुष्यास आपला चरितार्थ चालविण्यास लागणाऱ्या नैसर्गिक वस्तूंचा सृष्टीमध्यें सढळ हातानें पुरवठा केलेला आहे; परंतु मनुष्य कृत्रिम रीतीनें राहूं लागून आपल्या गरजा आपण होऊन वाढवितात व त्या भागविण्याच्या खटपटीमुळें स्वतःचें जीवन कष्टमय करून घेतात'. ही विचारसरणी वस्तुस्थितीस अगदीं सोडून आहे, हें व्यावहारिक अनुभवावरून सहज ध्यानांत येईल. मनुष्यानें नैसर्गिक रीतीनें रहावयाचें कितीही ठरविलें तरी भूक भागविण्यास खाण्याचे पदार्थ व थंडी, पाऊस, ऊन इत्यादि उपाधींपासून स्वतःचें संरक्षण करण्यास निवाऱ्याची जागा एवढ्या तरी उपयुक्त वस्तु त्यास उपलब्ध झाल्याशिवाय त्याचें जीवन नीटपणें चालणार नाहीं. खाण्याचे नैसर्गिक पदार्थ म्हटले म्हणजे कंद, फळें व मुळें हीं तात्काळ डोळ्यासमोर उभीं राहतात. परंतु लोकसंख्येच्या मानानें या नैसर्गिक खाद्य वस्तूंचा पुरवठाही मर्यादित असल्यानें मनुष्यास कांहींतरी कष्ट केल्याशिवाय त्या मिळावयाच्या नाहींत हें उघड आहे. निदान रहावयाच्या जागेपासून कंदमुळें आणावयास जाण्याचा त्रास तरी त्यास सोसला पाहिजे. पशुपक्ष्यांची शिकार, शेतकी, उद्योगधंदे इत्यादि उत्पादक श्रमाच्या चढत्या पायऱ्या पाहूं यावर नैसर्गिक वस्तूंचा मर्यादित पुरवठा व त्यापैकीं शक्य व जरूर तेवढा भाग स्वतःस मिळविण्याची मनुष्याची खटपट, ह्या गोष्टी अधिक स्पष्टपणें दिसून येतात. एकंदर नैसर्गिक वस्तूंतून आपल्या सुखवर्धनास जरूर असलेल्या वस्तू मिळवितांना, किंवा त्यांची उपयुक्तता वाढविण्याचे प्रयत्न करतांना, मनुष्यांचा उद्देश मात्र एकच असतो; तो हा कीं, शक्य तेवढ्या कमी श्रमानें जास्तींत जास्त उपयुक्त वस्तू मिळवाव्या. त्यांच्या अशा प्रयत्नांपासूनच सर्व अर्थोत्पादक श्रमाचा उगम होतो. आपण साधारणपणें 'आवळा देऊन कोहळा काढणें' हें व्यवहार-

चतुर परंतु आपमतलबी पुरुषाचें लक्षण समजतों, यातील इंगित देखील हेंच होय. दुसऱ्याच्या अज्ञानाचा अगर संकटमय परिस्थितीचा फायदा घेऊन, म्हणजे एका अर्थानें त्यास फसवून, स्वतःचा लाभ करून घेणें हें शुद्ध कपट असून त्यास केवळ आर्थिक व्यवहार असें म्हणता यावयाचें नाहीं. कपटी व आपलपोटेपणाची ही वागणूक अर्थशास्त्राच्या विचारकक्षेच्या पलीकडील असल्यानें तिचा आपणांस विचार कर्तव्य नाहीं.

सामान्य मनुष्याचा व्यवहारक्रम पाहिला तर आपणांस असें दिसून येईल की, सर्व लोकांचा उद्देश कमीत कमी परिश्रमानें अधिकात अधिक लाभ करून घेण्याचा असतो. श्रमाच्या मानानें लाभ जर कमी होईल तर कोणीही श्रम करणार नाहीं; किंवा एखादा मनुष्य असें करण्यास तयार झाला तर तो 'सर्व मुक्तो ध्वापशुः' या कोटींतील समजला पाहिजे. परंतु अर्थसंपादनाची ही कुशलता फार थोड्या लोकांच्या अंगीं पूर्णांशानें सापडत असून ती ज्या व्यक्तींमध्यें प्रामुख्यानें दिसून येते त्याची आपण वाखाणणी करतों. आता निरनिराळ्या देशांतील असंख्य मनुष्ये व्यक्तिशः आपला उदरनिर्वाह चालविण्यास कोणकोणते प्रयत्न करीत आहेत हें अवलोकन करणें अशक्य व बहुशः निष्फळ ठरल्याशिवाय राहणार नाहीं. किंबहुना, मनुष्य जोपर्यंत एकलकोंडेपणाच्या रानटी अवस्थेत असतो, तोपर्यंत विनिमय, श्रमविभाग इत्यादि समाजाच्या आर्थिक सुस्थितीची व प्रगतीची लक्षणें त्यामध्यें दृष्टिगोचर होत नाहींत. मनुष्यें आपले गट करून समाजात राहू लागल्यावर प्रत्येकजण आपला आर्थिक व्यवसाय करीत असता, त्यामध्यें विशिष्ट आर्थिक प्रचार व संस्था ही उद्भवतात. निरनिराळे आर्थिक व्यवहार, पद्धति व संस्था यांचा सरासरीनें व सामान्यतः लक्षपूर्वक विचार करून अर्थोत्पादन व आर्थिक प्रगति याविषयीं कांहीं सार्वत्रिक नियम ठरविता येतात. एकलकोंडा रानटी इसम, लहान जमातींत अगर खेड्यांत राहणारा अडाणी खेडवळ, स्वतंत्र व प्रगमनशील राष्ट्राचा नागरिक, व जगांतील सर्व राष्ट्रांच्या परस्पर बंधुत्वाची नसली तरी निदान हितसंबंधाची ज्यास जाणीव उत्पन्न झाली आहे असा सुसंस्कृत मनुष्य ह्या आर्थिक व सामाजिक हितक्षेत्राच्या वाढत्या मर्यादा होत. यापैकीं प्रत्येक अवस्थेंत वैयक्तिक व सामाजिक स्वरूपाच्या आर्थिक व्यवहारांची जी वाढ झालेली असेल तीस अनुसरून अर्थशास्त्राची विचारकक्षाही कमी अधिक विस्तृत असते. ज्याप्रमाणें रानटी मनुष्य हा 'माणुसकी' व 'रानवटपणा' ह्यांपैकीं कोणत्या गुणानें ओळखावयाचा हें सांगणें कठीण, त्याचप्रमाणें त्याच्या अंगीं आर्थिक व्यवसायांतील श्रमाच्या 'मितव्यया'चें तत्त्व बाणलें आहे किंवा नाहीं, याबद्दल खात्री नसते. जमात, खेडें, शहर, इत्यादि नांवांनीं संबोधिल्या जाणाऱ्या लोकवस्तीच्या ठिकाणीं मनुष्यें राहूं लागलीं म्हणजे साहजिकपणे त्यांपैकीं प्रत्येकास आपण आपले श्रम

व आपणांस उपलब्ध असलेल्या नैसर्गिक वस्तू यांचा 'मितव्यय' करून जास्तीत जास्त उपयुक्त वस्तू मिळवाव्या व आपला आणि आपल्या कुटुंबाचा योगक्षेम चालवावा, अशी बुद्धि होऊन तो त्याप्रमाणे वागू लागतो. समाजाच्या त्या अवस्थेंत मनुष्ये जे अर्थोत्पादक प्रयत्न करतात व त्यांचे जे परस्पर आर्थिक संबंध घडून येतात त्यांच्या सूक्ष्म अवलोकनानें सार्वत्रिक महत्त्वाचे कांहीं अर्थविषयक विचार ठरतात. अशा विचारमालिकेस 'वैयक्तिक' अगर 'कौटुम्बिक' स्वरूपाचे आर्थिक विचार असें म्हणतां येईल. पुढें मनुष्याच्या आर्थिक व सामाजिक हितसबंधाचें क्षेत्र वाढून निरनिराळी राष्ट्रें बनल्यावर त्यांच्या प्रजाजनांचे आपापसांतील आर्थिक व्यवहार व त्यांचें नियमन करणाऱ्या आर्थिक संस्था ह्यांचें स्वरूप अधिक विस्तृत व परस्परावलंबी होत जातें. राष्ट्राचें सामर्थ्य व लोकाची सांपत्तिक प्रगति ही व्यक्तिशः प्रजाजन व सरकार या दोहोंच्या आर्थिक व्यवहारावर अवलंबून असतात. नागरिकाचे व्यवहार व त्यांच्या संस्था, सरकारची कामगिरी व राष्ट्राचें धोरण याचा आर्थिक दृष्टीनें अभ्यास करून जे सर्वसाधारण विचार बनविले जातात त्यांस राष्ट्राच्या आर्थिक घटनेसंबंधी विचार असे म्हणावयास हरकत नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतील दळणवळण व व्यापारी हितसंबंध यांची वाढ झाल्यानें अंतरराष्ट्रीय विनिमयासारखे जे महत्त्वाचे आर्थिक प्रश्न उद्भवतात त्याचा व राष्ट्राच्या अंतर्गत परिस्थितीचा सांगोपांग विचार करून व्यक्ति, राष्ट्र व राष्ट्रसमूह या सर्वांच्या आर्थिक व्यवहारांस लागूं पडणारीं तत्त्वें एकत्र करून त्याचें जे सुसंगत 'शास्त्र' बनते त्यांस 'वैयक्तिक' अगर 'राष्ट्रीय' स्वरूपाच्या आर्थिक घटनेसंबंधीचे विचार असे न म्हणतां सर्व जगाचें अर्थशास्त्र या नावानें संबोधावें लागेल. आर्थिक व्यवसाय व अर्थशास्त्रीय विचार यांच्या वाढीचा अन्योन्याश्रय दर्शविण्याचा प्रस्तुत वर्गीकरण हा एक मार्ग आहे. वास्तविकपणें अर्थशास्त्र हे व्यक्ति, एक राष्ट्र आणि अनेक राष्ट्रें या सर्वांच्या आर्थिक व्यवहारांच्या समुच्चयरूपानें केलेल्या अभ्यासापासून तयार झालेलें असतें; आणि म्हणूनच अर्थशास्त्राचा अभ्यास करीत असता आर्थिक घटनेची उत्क्रान्ति कसकशी होत गेली ह्याबद्दल अवश्य माहिती करून घ्यावी लागते.

**४ अर्थशास्त्र हें 'शास्त्र' आहे काय ?**—एखाद्या विषयासंबंधीं आपणास असलेलें ज्ञान कोणत्या मर्यादेपर्यंत गेलें असतां त्यास शास्त्र म्हणावें याबद्दल सर्व ठिकाणीं सारखाच लागू पडणारा नियम नाहीं. विवक्षित विषयावरील आपणांस उपलब्ध असलेली सर्व माहिती एकत्र करून व तिची पद्धतशीर मांडणी करून तिच्यापासून कांहीं सुसंगत तत्त्वें ठरवितां आल्यास तेवढ्या ज्ञानास 'शास्त्र' म्हणण्यास हरकत नाहीं, असें कित्येकांस वाटतें. ज्या ज्ञानापासून त्रिकालाबाधित सत्यें शोधून काढून सिद्ध करतां येतात त्यालाच शास्त्र म्हणणें योग्य आहे, असें दुसऱ्या कांहींजणांचें म्हणणें आहे; आणि या पंथाच्या पुरस्कर्त्यांस नीतिशास्त्र,

शासनशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि सामाजिक शास्त्रें 'शास्त्र' या पदवीस लायक आहेत असें वाटत नाहीं. कारण त्यांच्या मताप्रमाणें सामाजिक सत्यें स्थळ-काळांच्या बाधेपासून अलिप्त नसतात, आणि त्यामुळें सामाजिक शास्त्रांच्या एखाद्या 'नियमा'नुसार भविष्यकाळीं कोणकोणत्या गोष्टी घडून येतील हें खात्रीपूर्वक आगाऊ सांगतां येत नाहीं. उदाहरणार्थ, दोन रासायनिक द्रव्यें एकत्र केल्यास काय परिणाम होईल याबद्दल रसायनशास्त्रज्ञ निश्चयात्मक विधान करूं शकेल, किंवा ग्रहगोलांची स्थिति केव्हां कशी असेल याचें भविष्य एखादा ज्योतिषशास्त्रविशारद शेंकडों वर्षांपूर्वींही तंतोतंत बरोबर वर्तवील. परंतु राजकारणांत किंवा आर्थिक परिस्थितींत कोणते फरक घडून येतील हें एक महिनाही अगोदर धडपणें सांगतां येणार नाहीं. सामाजिक शास्त्रांच्या टीकाकारांचा हा आक्षेप कांहींसा बरोबर आहे असें मान्य करणें प्राप्त आहे. आधिभौतिक शास्त्रांचे सिद्धांत एका अर्थानें त्रिकालाबाधित असतात व त्यामुळें त्यांच्यावर विसंबून भविष्यकाळीं घडून येणाऱ्या गोष्टींबद्दल आगाऊ खात्रीलायक विधानें करतां येतात हें खरें. दगड किंवा चेंडू केव्हांही हवेंत वर टाकल्यास तो गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणें ठराविक वेळांत व वेगानें खालीं पडणार हें निश्चित असतें. परंतु अशा वरवर भरींव दिसणाऱ्या सिद्धान्तासही अनेक अपवाद असून त्यांच्या मुळाशीं कांहीं गृहीतप्रमेयें असतात हें ध्यानात ठेविलें पाहिजे. गुरुत्वाकर्षणाचा नियम एवढेंच सांगूं शकेल कीं पृथ्वीच्या आकर्षक शक्तीस दुसऱ्या कांहीं कारणांनीं अडथळा न झाल्यास त्या शक्तीमुळें पदार्थ अमुक एका प्रमाणांत ओढले जातात. विरोधक कारणाचा अभाव हें आधिभौतिक शास्त्रांच्या सर्व सिद्धांताचें एक गृहीतप्रमेय असतें ही गोष्ट शास्त्रीय विवेचनाच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाची आहे. बहुतेक आधिभौतिक शास्त्रांत सामान्य नियमास अडथळा करणारीं विरोधक कारणें प्रत्यक्ष प्रयोगानें व इतर अनुभवांच्या साहाय्यानें शोधून काढून त्यांचेही नियम ठरविणें शक्य असतें. परंतु सामाजिक सिद्धांताचे बाबतींत प्रत्यक्ष प्रयोग करणें अशक्यप्राय असून इतर अनुभव इतके गुंतागुंतीचे असतात कीं त्यांतील विरोधक कारणें आगाऊ निश्चित करणें दुर्घट होतें. असें असलें तरी आधिभौतिक शास्त्राचा नियम आणि सामाजिक शास्त्राचा नियम यांत तत्त्वतः मुळींच भेद नाहीं हें विसरतां कामा नये. दोन्ही प्रकारचे नियम विरोधक कारणांचे अभावीं व विवक्षित परिस्थितींत काय घडून येईल एवढेंच सांगूं शकतात. मनुष्याच्या वाढत्या ज्ञानप्राप्तीमुळें अनेक सामाजिक व्यवहारांबद्दल अधिक अधिक माहिती उपलब्ध होत आहे, व सामाजिक शास्त्रांच्या सिद्धांतांचा ठामपणा लोकांच्या नित्य निदर्शनास येत आहे. उलट पक्षीं आधिभौतिक शास्त्रांच्या त्रिकालाबाधित समजल्या जाणाऱ्या सिद्धांतांस सापेक्षतेच्या नवीन कल्पनेची झळ लागून त्यांचें त्रिकालाबाधित्व डळमळूं पहात आहे. शास्त्रीय नियमांच्या व्यावहारिक उपयुक्ततेवरून

त्यांचें 'शास्त्रीय'त्व ठरवावयाचें असें म्हटलें तरी सामाजिक सिद्धांत सर्वस्वी निरुपयोगी ठरतील असें नाहीं. उदाहरणार्थ, आर्थिक नियमांच्या आधारानें एखाद्या धंद्याच्या परिस्थितीबद्दल किंवा सरकारनें लादलेल्या करांच्या परिणामाबद्दल जे अंदाज काळजीपूर्वक केले जातात ते बहुंशीं बरोबर ठरण्याची खात्री असते; व व्यवहारांतही गिऱ्हाईक, व्यापारी, धंदेवाले व सरकार यास त्यांचा पूर्णपणे उपयोग होतो. तात्त्विक अगर व्यावहारिक यांपैकीं कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी अर्थशास्त्रान्तर्गत संपत्तीच्या विवेचनास 'शास्त्र' म्हणण्यास कांहींही हरकत नाहीं असें दिसून येईल.

**५ अर्थशास्त्र आणि परमार्थ**– अर्थशास्त्र हें मुळीं शास्त्रच नव्हे असें आधिभौतिक शास्त्रज्ञ म्हणत असतां उलटपक्षीं आधिदैविक पथाचे पंडित अर्थशास्त्र व परमार्थ यांत विरोध आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करीत असतात. इंग्लंडमध्यें कार्लाईल व रस्किन या प्रसिद्ध तत्त्ववेत्त्यांनीं अर्थशास्त्र म्हणजे नास्तिक लोकांनीं स्वार्थपरायणतेच्या पायावर रचलेलें नैराश्यजन्य तर्कट होय असें मत प्रसृत करण्याचा बराच प्रयत्न केला; व अर्वाचीन अर्थशास्त्राचा उगम झाला त्यावेळीं इंग्लंडमधील सामान्य लोकांची स्थिति अत्यंत कष्टमय असल्यामुळें हे प्रयत्न कांहींस यशस्वी झाले. त्यांतही अर्थशास्त्रविशारद जुन्या पंडितांनीं आपलीं मतें प्रतिपादन करतांना ऐहिक संपत्ति मिळविणें हे प्रत्येक मनुष्याचें अंतिम साध्य असतें या कल्पनेच्या पायावर अर्थशास्त्राची इमारत रचली. परंतु त्यांपैकीं अनेकजणांच्या लिहिण्याबोलण्यांतून निस्सीम स्वार्थीपणा हा मनुष्याचा उपजत गुणविशेष आहे, असा ध्वनि निघून रस्किन व कार्लाईल यांच्यासारख्या टीकाकारास बरेंच खाद्य मिळालें. परंतु एकंदरीत मनुष्याची स्वार्थबुद्धि एवढाच त्याचा गुण नसून, परमार्थ, परोपकार इत्यादि दुसरे गुण मनुष्यमात्राच्या अंगीं असतात हें बहुतेक अर्थशास्त्रज्ञ जाणून होते. शिवाय, स्वार्थ हा शेंकडा नव्याण्णव लोकांच्या मनांत प्रबल असून त्यांच्या आयुष्यक्रमांत प्रामुख्यानें दिसून येणारा भाग म्हणजे आपला चरितार्थ चालविण्याकरितां ते करीत असलेली खटपट हा होय हें प्रत्येकास कबूल केलें पाहिजे. राष्ट्राचें वैभव, स्वातंत्र्य, व शक्ति हीं प्रायः तेथील लोकांच्या ऐहिक परिस्थितीवर अवलंबून असतात हें उघड आहे. उपासतापास करून वासनाक्षय करणें हा परमार्थसाधनाचा एक मार्ग आहे असें कित्येकजण समजतात. परंतु सतत उपाशी राहणारा किंवा कमकुवत मनुष्य परोपकार व परमार्थ या दोहोंसही लवकरच मुकेल. मनुष्यप्राणी केवळ घांसभर अन्नानें अगर तेवढें अन्न खाण्याकरितां जगतो हे खरें नसलें तरी त्यावांचून तो मुळीं जगणारच नाहीं, हें तितकेंच किंबहुना त्याहूनही अधिक खरें आहे. कट्ट्या परमहंसासदेखील ही गोष्ट कबूल करावी लागत असून शारीर व वैद्यक शास्त्रें सर्वत्र महत्त्वाचीं समजलीं जातात. संपत्तीस हीच विचारसरणी लागू असून कित्येक परोपकारशील व परमार्थपरायण

महात्म्यांनी स्वतः संपत्ति मिळविण्याचा मार्ग न सोडतां तिचा विनियोग मात्र सामाजिक सुखवर्धनाकडे केला असें आपण पहातों. जगांतील नित्य कर्में करतांना अशा परमार्थी पुरुषांस ज्याप्रमाणें नास्तिकपणाचा किंवा स्वार्थपरायणतेचा दोष लागू शकत नाहीं, त्याचप्रमाणें आपापल्या धंद्यास अनुसरून ते द्रव्यार्जन करीत असतांनाही त्यांजवर तसा आरोप करणें रास्त होणार नाहीं. मनुष्यांस परमार्थापासून परावृत्त करणे हा अर्थशास्त्राचा मुळींच उद्देश नव्हे. स्वार्थी व परमार्थी, आपलपोटे व परोपकारी या सर्वांना आपापला चरितार्थ चालविण्यास जे व्यवहार करावे लागतात त्यांचें स्वरूप, गुणविशेष व परस्पर परिणाम यांचा विचार करून अर्थशास्त्राचीं तत्त्वें ठरविलेलीं असतात. आपापल्या वृत्तीप्रमाणे मनुष्य द्रव्यार्जन करीत असतां त्याच्या मनांत अंतिम हेतु कोणते आहेत हे पाहण्याचें अर्थशास्त्रास विशेष कारण नसतें.

६ **सामाजिक घटकांचें अन्योन्यावलंबन**– अर्थशास्त्राचा परमार्थाशीं विरोध नाहीं एवढें गृहीत धरून कोणी असें म्हणण्यास प्रवृत्त होईल कीं साक्षात् विरोध नसला म्हणून काय झालें ? अर्थशास्त्राचें परमार्थाबद्दल जें औदासीन्य आहे, तेंही तितकेंच दूषणीय होय. हा आक्षेप पहिल्या इतकाच फोल आहे हे विचाराअंतीं दिसून येईल. अर्थशास्त्राच्या अनेक तत्त्वांपैकीं ज्या एका तत्त्वाला सर्व अर्थशास्त्रज्ञांकडून व समाजशास्त्रज्ञांकडून अनुमति मिळाली आहे, तें सामाजिक परस्परावलंबनाचें तत्त्व म्हणजे परोपकारधर्माचा पायाच होय. आजकालच्या परिस्थितींत अगदीं निखालस आपलपोट्या इसमासही त्याचें स्वतःचें सुख अनेक बाबतींत इतरांच्या सुखावर अवलंबून आहे हें कळून येण्यास वेळ लागत नाहीं. गांवांत एखादा संसर्गजन्य रोग सुरू झाला तर आपलें व आपल्या शेजाऱ्याचें त्यापासून कसें संरक्षण करता येईल याची प्रत्येकास काळजी वहावी लागते. त्याचप्रमाणें एखाद्या व्यापाऱ्यास आपला माल लवकर खपावा अशी उत्कंठा असल्यास आपल्या गिऱ्हाकांची सांपत्तिक स्थिति सुधारावी अशी त्याची इच्छा असणें सहाजिक आहे. एक पक्षीं श्रमविभागाच्या तत्त्वावर अगदीं बारीक सारीक धंदे देखील कांहीं विशिष्ट लोकांच्या हातीं जात असल्यामुळें व शहरांतील लोकसंख्येच्या वाढीमुळें, लहानथोर बाबतींत समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या जीवितसौख्याचा इतर व्यक्तींच्या व एकंदर समाजाच्या सुखदुःखाशीं फार निकट संबंध येत आहे. सामाजिक घटकांचें हे परस्परावलंबन केवळ शारीरिक किंवा आर्थिक गोष्टींत दिसून येतें असें नाहीं. समाजांत राहणाऱ्या मनुष्याचें मानसिक किंवा नैतिक जीवनही एकंदर समाजाची त्या त्या बाबतींत जी परिस्थिति असेल तिजवर अवलंबून असतें असें दिसेल. मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांस अगदीं अज्ञ लोकांच्या समाजांत मानसिक सौख्य लाभणार नाहीं; आणि एकंदर समाजाची नीतिमत्ता सुधारल्याशिवाय एखाद् दुसऱ्या मनुष्यास उच्च नीतितत्त्वाच्या पालनापासून जें सौख्य होतें तें मिळा-

वयाचें नाहीं. सर्व बाबतींत आपलें सौख्य इतरांवर अवलंबून आहे हें कळून आल्यास परहितार्थ झटणें हा आत्महिताचा एक भाग होऊन स्वतःची आर्थिक उन्नति करून घेत असतां मनुष्य आपोआप परोपकारी बनतो. किंबहुना परस्परावलंबनाच्या तत्त्वाचा दुसरा भाग म्हणजे एकमेकांच्या बऱ्या वाईट स्थितीबद्दल प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष जबाबदारी, हा जसजसा अधिक मान्यता पावेल तसतसें परोपकार व स्वहित आणि स्वधर्म व परहित ह्यांचें अंतिम स्वरूप एकच असतें ही गोष्ट व्यवहारांत निदर्शनास येऊं लागेल. उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग ह्या संपत्तीच्या अनेक अंगांचा अर्थशास्त्रांत जो विचार करावयाचा तो, समाजाच्या सर्व घटकांचें अंतिम हित एकरूप आहे, म्हणजे आज एक वर्ग, व्यक्ति किंवा संस्था यांचें हित समाजातील इतर घटकांच्या हितसंबंधांस विरोधी आहे असें वाटलें तरी कालांतरानें या हितअनहितांचा सर्व समाजास सारखाच परिणाम भोगावा लागणार, या तत्त्वाला अनुसरून करावयाचा असतो.

**७ प्राचीन अर्थशास्त्र**—मनुष्यांच्या आधिभौतिक गरजा व त्या भागविण्याकरितां ते करीत असलेले प्रयत्न हे अर्थशास्त्राचे मुख्य विषय मानवकोटीच्या प्रारंभापासून अस्तित्वात असल्याकारणानें त्याजबद्दल विचार करणारें अर्थशास्त्र हेंही जुनें पुराणें असावें असा सामान्य लोकांचा अंदाज असणें सहाजिक आहे. परंतु वास्तविकपणें अर्थशास्त्र हें अगदीं अलीकडील शास्त्र असून पद्धतशीरपणें आर्थिक प्रश्नाचा विचार होऊं लागल्यास पुरीं दीडशें वर्षेंही झालीं नाहींत. संख्येनें, परास्परावलंबनानें व निकट सहवासानें मनुष्यसमाजाची गेल्या दीड दोन शतकांत विशेष वाढ झालेली आहे. मोठमोठ्या प्रदेशांत एकाच मध्यवर्ति राजसत्तेचें प्रस्थापन, महान् भांडवलाच्या जोरावर व यांत्रिक सुधारणांच्या सहाय्यानें प्रचंड कारखाने चालविण्याचा उपक्रम आणि राष्ट्रांतील किंबहुना सर्व जगातील लोकांचें अगदीं लहानसहान गोष्टींत देखील परस्परावर अवलंबन हे अर्वाचीन कालाचे विशेषच अर्थशास्त्राच्या अश्रुतपूर्व वाढीस कारण झाले आहेत. त्यामुळें खुद्द पाश्चात्य राष्ट्रांत देखील प्राचीन कालीं नांव घेण्यासारखे अर्थशास्त्रज्ञ झाले नाहींत. निरनिराळ्या कालीं जी आर्थिक परिस्थिति असते तिच्या गुणदोषांचें थोड्याफार प्रमाणांत विवेचन होणें अपरिहार्य असतें. या अनुभवास अनुसरून ग्रीक लोकांत ॲरिस्टॉटल, रोममध्ये सिसेरो, व मध्ययुगीन जर्मन लोकांत सेकेनडॉर्फ यांनी आपापल्या देशकालवर्तमानास योग्य अशी अर्थशास्त्रविषयक चर्चा करून राष्ट्रांची आर्थिक परिस्थिति सुधारण्याकरितां नियमही घालून दिले. परंतु सतराव्या व अठराव्या शतकांत अमेरिकेंतील खाणींमधून युरोपांत येऊन पडणाऱ्या सोन्याचांदीच्या ओघामुळें व अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांतील यांत्रिक सुधारणांनीं सर्वच सृष्टि पालटून जुने अर्थशास्त्रीय

विचार वास्तविक परिस्थितीस गैरलागू ठरले. नवीन परिस्थितीत पहिल्यानें मर्कंटिलिस्ट नांवाचे अदूरदर्शी व्यापारी अर्थशास्त्रज्ञ व नंतर फ्रान्समध्यें समाजाचे सर्व व्यवहार निसर्गनियमानुसार झाले पाहिजेत, त्यांच्यांत मानवी अधिकाऱ्यांनी कांही ढवळाढवळ करूं नये, असें प्रतिपादन करणारा फिजिओक्रॅटिक लोकांचा पंथ, हे निर्माण झाले. अर्वाचीन अर्थशास्त्राचे कित्येक सिद्धान्त फिजिओक्रॅट लोकांस जरी माहीत नव्हते, तरी सर्व आर्थिक व सामाजिक व्यवहार केवळ यदृच्छेनें चालत नसून निसर्गतः ते नियमबद्ध आहेत हे त्यांचे मत आणि व्यक्तिस्वातंत्र्याचे सामाजिक किंवा राजकीय नियंत्रणाविरुद्ध त्यांनी केलेलें समर्थन यामुळें अर्थशास्त्राचें पितृपद नाहीं तरी निदान पितामहपद त्यांस अर्पण करणें योग्य आहे. सतराव्या व अठराव्या शतकांत पाश्चात्य राष्ट्रांचें आर्थिक व परराष्ट्रीय धोरण इतर देशांत शक्य तितकी तयार मालाची निर्गत करून त्यांजकडून सोनें व चांदी यांची स्वराष्ट्रांत आयात करावी असें होतें. राष्ट्राराष्ट्रांत युद्ध सुरू झालें तर मुख्यत्वेंकरून या मूल्यवान् धातूंच्या सहाय्यानेंच लढवय्ये शिपाई, हत्यारें वगैरे मिळविता येत. मर्कंटिलिस्ट पंथाचे मुख्य विचार राष्ट्रीय सामर्थ्य वाढविण्याच्या या धोरणास अनुरूप असेच होते. आज देखील अंतर्राष्ट्रीय व्यापाराचें धोरण ठरवितांना देशाची आर्थिक स्वायत्तता, तयार मालाच्या निर्गतीस व कच्चा माल आणि सोनें चांदी यांच्या आयातीस उत्तेजन, इत्यादि गोष्टींकडे विशेष लक्ष पुरविलें जातें.

**८ अर्वाचीन अर्थशास्त्र**— सोन्यारुप्याच्या किंवा कागदी पैशाच्या मदतीनें होणारा विनिमय, संपत्तीचें प्रचंड प्रमाणावर उत्पादन, श्रमविभागाचा विस्तार, समाजांतील निरनिराळ्या वर्गाच्या हितसंबंधांत दिसून येणारा विरोध इत्यादि गोष्टींचा सोपपत्तिक विचार करून अर्वाचीन परिस्थितीस साजेसा अर्थशास्त्रविषयक ग्रंथ लिहिणारा सर्वांत जुना ग्रंथकार अॅडम स्मिथ हा होय. याचा ' राष्ट्रांची संपत्ति ' या नांवाचा प्रसिद्ध ग्रंथ अठराव्या शतकाच्या चतुर्थ पादांत पहिल्या प्रथम प्रसिद्ध झाला. तेव्हांपासून सुमारें शंभर वर्षे इंग्लंडांतील व बहुतेक इतर युरोपीयन राष्ट्रांतील लोकांच्या मनावर त्याच्या मतांचा पगडा बसला होता व सरकारी धोरण ठरवितांना देखील त्याच्या शिकवणीकडे विशेष लक्ष पुरविलें जाई. अजूनही ' अर्वाचीन अर्थशास्त्राचा पिता ' या गौरवपूर्ण नांवानें स्मिथचा उल्लेख केला जातो. परंतु समाजांत पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य प्रस्थापित झालें असतां सहज जे आर्थिक परिणाम घडून येतात ते शेवटीं सर्व समाजास हितावह असतात हें त्याचें मत कारखान्यांतील व शेतावरील मजूर लोकांचे हाल आपल्या डोळ्यांनी पहाणाऱ्या सिसमॉन्डी या फ्रेंच गृहस्थासारख्या सहृदय माणसांस कधींही पटणें शक्य नव्हतें. त्याचप्रमाणें अंतर्राष्ट्रीय व्यापार अनियंत्रित असावा ही त्याची

शिक्षण जर्मनीसारख्या उद्योन्मुख राष्ट्रांस, आपले उद्योगधंदे इंग्लिश मालास मुक्तद्वार ठेवल्यानें बुडत असलेले प्रत्यक्ष दिसत असतां, मुळीच मान्य होण्यासारखी नव्हती. प्रत्येक राष्ट्रानें आपापल्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीस अनुसरून ती सुधारण्याकरितां आपले स्वतंत्र राष्ट्रीय विचार व धोरण बनविणें अवश्य आहे, हे जर्मन अर्थशास्त्रज्ञ लिस्ट याचें मत हल्ली सर्वमान्य झालें आहे. किंबहुना स्मिथचा 'राष्ट्राची संपत्ति' हा ग्रंथ व लिस्टचा 'अर्थशास्त्राची राष्ट्रीय पद्धति' हा ग्रंथ, हे परस्पर परिपूरक व सारख्याच महत्त्वाचे आहेत असें समजलें पाहिजे. अलीकडे आर्थिक प्रश्नांचा विचार करतांना केवळ तात्त्विक दृष्टि न बाळगितां ऐतिहासिक परिस्थितीचा विचार करून निरनिराळ्या तत्त्वांची कसोटी ठरविण्याचा जो प्रघात पडला आहे त्यास लिस्टच्या वेळेपासून सुरुवात झाली. समाजातील सर्व वर्गांच्या हितसंरक्षणार्थ एखादी व्यक्ति, संस्था किंवा वर्ग यांजवर नियंत्रण घालणे अवश्य आहे हे मत दिवसानुदिवस सर्वमान्य होत आहे. सोशॅलिस्ट किंवा समाजसत्तावादी पंथाचा याच तत्त्वावर विशेष भर असून पाश्चात्य राष्ट्रांत हल्ली तो पंथ सर्वांत बलाढ्य आहे. स्वदेशी धंद्यांस उत्तेजन देण्याकरितां किंवा इतर राष्ट्रांतील धंदेवाल्यांच्या स्पर्धेपासून त्यांचे संरक्षण करण्याकरितां परराष्ट्रीय व्यापारावर निदान तात्पुरतें नियंत्रण टाकणें योग्य आहे असें आतां खुद्द इंग्लिश सरकारास वाटत असून व्यक्तिस्वातंत्र्यास आळा घालणारे अनेक कायदे राष्ट्रहिताच्या सबबीवर पार्लमेंटांत पास केले जात आहेत. अप्रतिहत अनराष्ट्रीय व्यापार व पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य ही, अॅडम स्मिथ यास ज्या पक्षाचे धुरीण म्हणता येईल त्या उदार मतवादी पक्षाची दोन प्रमुख अंगें हल्ली विगलित झाली असली तरी अनेक बाबतींत स्मिथनें घालून दिलेले सिद्धांत अर्थशास्त्रज्ञ अजून मान्य करतात. अमेरिका, ऑस्ट्रेलिया, वगैरे नव्या देशांचा अनुभव आणि त्यांचे विचार जास्त प्रगमनशील व जोमदार असल्यामुळें कित्येक महत्त्वाच्या मुद्यांवर तेथील अर्थशास्त्रज्ञांचा युरोपीयन अर्थशास्त्रज्ञांशी मतभेद असतो व एके काळीं किंवा एखाद्या देशांत सर्वमान्य असलेले आर्थिक सिद्धांत कालांतरानें किंवा देशांतरानें कधीं कधीं गैर लागू ठरण्याचा संभव असतो, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

**९ हिंदुस्थानांतील प्राचीन अर्थशास्त्र**— 'अर्थशास्त्रविषयक कल्पनांचा प्रादुर्भाव होण्यास व्यक्तिस्वातंत्र्याची भावना थोडी तरी प्रज्वलित झालेली असावी लागते. हिंदू आणि हिब्रू लोकांत या गोष्टीचा अभाव होता.' अर्थशास्त्रीय विचारांचा अमेरिकन ग्रंथकार डॉ. हॅनी याचें हे मत मननीय आहे. जोंपर्यंत समाजांतील मनुष्यांचा सर्व आयुष्यक्रम धार्मिक नियमांनीं ठरवून द्यावा व राजसत्तेनें त्यांची योग्य बजावणी मात्र करावी असले विचार प्रचलित असतात, तोंपर्यंत धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, शासनशास्त्र व अर्थशास्त्र यांच्या कार्यक्षेत्रांत जितकी भिन्नता

येणे जरूर असतें तितकी ती येत नाही. तरी धार्मिक व सामाजिक बंधनांनी केवळ आर्थिक बाबतीतच व्यक्तिस्वातंत्र्य निगडून टाकले होतें असें नसून धार्मिक आचारविचारांचा प्रत्यक्षपणें तत्त्वज्ञानाशीं जेवढा संबंध येतो तेवढा आर्थिक किंवा राजकीय विचारांशीं तो येत नाही, हे कोणीही कबूल करील. असें असून निरनिराळ्या व परस्परविरोधी अशा तत्त्वज्ञानविषयक विचारांची हिंदुस्थानांत फार प्राचीनकाळीं जेवढी प्रगति झाली होती, तेवढी ती व्यक्तिस्वातंत्र्यास डोक्यावर घेऊन नाचणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांत आजही झालेली दिसून येत नाही, हे लक्षांत ठेवलें पाहिजे. यावरून प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत आर्थिक विचारांचा विशेष विकास न होण्यास व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेचा अभाव हेंच प्रमुख कारण असावें, हे अनुमान बरोबर दिसत नाही. 'आमचीं प्राचीन शास्त्रें बहुतेक ब्राह्मणवर्गानें लिहिलेलीं असत व ब्राह्मण हे स्वतः शेतकी, उदीम, व्यापार इत्यादि अर्थोत्पादक धंदे स्वतः क्वचित् अंगिकारीत; त्यामुळे धार्मिक विषयांवर आमचेकडे जशी ग्रंथोत्पत्ति झाली, तशी आर्थिक बाबतींत होणें शक्य नव्हतें,' असलेंही एक विधान आमच्या पाहण्यांत आलें आहे. थोड्याशा विचाराअंतीं अर्थशास्त्रीय ग्रंथांच्या दुर्भिक्षाची ही कारण-मीमांसा बरोबर नाही, असें सहज दिसून येईल. सर्वप्रकारच्या विद्यांचें अध्ययन व अध्यापन हे ब्राह्मणवर्गाचें मुख्य कर्तव्य असे. त्यास अनुसरून आपल्या धार्मिक व्यवहाराप्रमाणें समाजांतील इतर व्यवहारांचेंही पूर्ण अवलोकन करून समाज-शास्त्रविषयक अनेक ग्रंथ ज्या आमच्या पूर्वजांनी रचिले त्यांच्या विचारकक्षेतून आर्थिक व्यवहार तेवढे सुटले असतील, असें म्हणणें चूक आहे. व्यापार-उदीम हा वैश्य वर्गाच्या हातांत असल्यामुळे ब्राह्मणवर्गाचे अर्थशास्त्रविषयक विचार प्रगल्भ दशेस पोहोचले नाहीत असें म्हणणाऱ्या ग्रंथकारांनी युद्ध करणें हा क्षत्रियाचा मात्र धर्म असून कित्येक ब्रह्मर्षि धनुर्विद्येंत निष्णात असत, एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष क्षात्रिय राजे देखील त्यांजवळून ती विद्या शिकत ह्या गोष्टीचा जरूर विचार करावा. हिंदुस्थानांतील प्राचीन शिल्प-कला व स्थापत्यशास्त्र यांजबद्दल उपलब्ध असलेल्या माहितीवरूनही वरील मत किती निराधार आहे, तें दिसून येणार आहे. शिल्पसंहितेंत कृषिशास्त्र, खनिशास्त्र, नौकाशास्त्र, विमानशास्त्र, यंत्रशास्त्र इत्यादि दहा शास्त्रें असून कश्यपाशिवाय अठरा शिल्प ग्रंथकार प्रसिद्ध आहेत. चाणक्याच्या अर्थशास्त्र नांवाच्या ग्रंथांत शेतकी, व्यापार, कर, चलन, वगैरे गोष्टींबद्दल उल्लेख असून आपल्या पूर्वीच्या लोकांचीं निरनिराळ्या आर्थिक विषयांवर कोणकोणतीं मतें होतीं हे आधी सांगून मग आपलें निर्णायक मत स्वतः कौटिल्य देतो. यावरून अर्थशास्त्रविषयक गोष्टींचा ब्राह्मणांनीं योग्य विचार केला नाही ही विचारसरणी बरोबर नसून, पुरातन काळीं आर्थिक बाबतींत तीव्र मतभेद असलेले निरनिराळे पंथ व संप्रदायही होते ही गोष्ट

सिद्ध होइल. युरोपमध्ये जातिभेद व वर्णभेद हा कधींही नव्हता; तरी तेथेंही इसवी सनाच्या अठराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत अर्थशास्त्रविषयक ग्रंथांची विशेष उत्पत्ति न होतां धर्मविषयक साहित्यांतच भर पडत राहिली ही गोष्ट प्रसिद्ध आहे. आमच्या जातिभेदांत अनेक दोष असतील, परंतु त्यामुळे अर्थशास्त्राच्या वाढीस फारसा अडथळा आला असें म्हणतां येणार नाही. प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत अर्थशास्त्राची वाढ न होण्याचें खरें कारण म्हणजे येथें लहानसहान खेडेगांवापासून तों मोठमोठ्या शहरांपर्यंत, देशांतील प्रत्येक भागाची असलेली आर्थिक स्वायत्तता हें होय. आमच्या लोकांच्या आधिभौतिक गरजा एवढ्या साध्या व कमी असत कीं, त्यांच्याच शेजारीं पाजारीं राहणाऱ्या कारागिरांकडून ठराविक पद्धतीनें त्या भागविल्या जात. देशाच्या निरनिराळ्या भागांचा आपापसांत म्हणण्यासारखा व्यापार नसे. हिंदुस्थानाचा परराष्ट्रांशीं जो मोठा व्यापार होता तो आपल्याकडील मसाल्याचीं द्रव्यें, मलमल, रंग, हिरेमाणकें, इत्यादि दुर्मिळ व मूल्यवान् वस्तूंची पाश्चात्य राष्ट्रांतील लोकांस गरज असे त्यामुळे चालत असे. या मालाच्या मोबदला हिंदुस्थानांतील रहिवाशास जरूर असलेल्या इतर उपयुक्त वस्तू पाठविणें पाश्चात्यांस शक्य नसल्यानें सोनें व चांदी यांची फार मोठ्या प्रमाणांत आयात होई. आर्थिक परिस्थिति साधी, ठराविक स्वरूपाची व संकुचित असल्यामुळे अर्थशास्त्रविषयक विचार परिणतावस्थेस पोहोचणें अशक्य होतें.

**१० कौटिलीय अर्थशास्त्र**—हिंदुस्थानांत अर्थशास्त्रविषयक ज्या विशिष्ट कल्पना प्रचलित होत्या त्यांपैकीं कांहींचा पुढें निर्देश केलेला आहे. परंतु आमच्या प्राचीन अर्थशास्त्राविषयीं विवेचन करीत असतां चंद्रगुप्त मौर्याचा अमात्य विष्णुगुप्त किंवा कौटिल्य याच्या अर्थशास्त्रावरील प्रसिद्ध ग्रंथाबद्दल थोडा उल्लेख करणें जरूर आहे. ग्रंथाच्या आरंभीच आपल्या पूर्वीच्या सर्व अर्थशास्त्रज्ञांच्या मतांचें संकलन करून आपण आपला ग्रंथ लिहिला असें सांगतांना अर्थशास्त्राचा मुख्य विषय म्हणजे पृथ्वीचा लाभ व तिचें पालन हा होय असें कौटिल्यानें दिग्दर्शित केलें आहे. यावरून ऐहिक सुखसाधनें मिळवून तीं कशीं वृद्धिंगत करावीं ह्या प्रश्नाचा अर्थशास्त्रांत प्रामुख्यानें विचार करण्याची पद्धत तेव्हा अस्तित्वांत होती, असें दिसून येईल. ऐहिक सुखसाधनांचीही फोड होऊन त्यांतील वासनात्मक सुखसाधनांपुरती, म्हणजे अर्वाचीन अर्थशास्त्रविषयक, होत असलेली वाढ त्याकाळीं होणें शक्य नव्हतें. तरीही अध्यात्म, अर्थशास्त्र, शासनशास्त्र ही परस्पर भिन्न असून केवळ अर्थविषयक चर्चा 'वार्ता' या विद्येत येत असून न्याय आणि बल यांचा विचार दण्डनीतीमध्यें करणें युक्त आहे असें आपल्या ग्रंथाचे प्रारंभीं कौटिल्यानें म्हटलें आहे. सध्यां उपलब्ध असलेल्या 'अर्थशास्त्र' या त्याच्या ग्रंथांत मुख्यतः दण्डनीति म्हणजे राज्यकारभार, कायदे व आपले ऐहिक बल आणि ऐश्वर्य वाढविण्यास राजे लोकांनीं योजावयाचे उपाय

यांचेंच विवेचन केलेलें आहे. अर्वाचीन आर्थिक दृष्ट्या, किंवा मनुष्याच्या आधिभौतिक सुखाचीं साधनें उत्पादन होऊन विनिमयद्वारा त्यांची समाजांतील सर्व घटकांत कशी विभागणी होते या प्रश्नास सोपपत्तिक उत्तर म्हणून, कौटिलीय 'अर्थशास्त्रा' चें अवलोकन करणाराची पदोपदीं निराशा झाल्याशिवाय रहावयाची नाही. समकालीन आर्थिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीस अनुलक्षून व्यावहारिक महत्त्वाच्या गोष्टींचें वर्णन व त्यावरील आपले विचार कौटिल्यानें आपल्या ग्रंथांत दिलेले आहेत, असें म्हटलें पाहिजे. 'अर्थशास्त्र' हा ग्रंथ कांहींसा काळजी-पूर्वक वाचून पाहिल्यास असेंही दिसून येईल की समाजाची ऐहिक स्थिति सर्व प्रकारें सुधारणें, हें राजसत्तेचें बल व ऐश्वर्य वाढविण्याचें प्रमुख साधन समजलें जात असे. त्यामुळें राजानें आपल्या प्रजाजनांचा जीवनक्रम अधिक सुखावह करून आपली सत्ता कशी वृद्धिंगत करावी या प्रश्नास केवळ तात्त्विक विवेचनाहून सहजच अधिक महत्त्व दिलें जाई. कॅमेरॅलिस्ट या नावानें प्रसिद्ध असलेले जर्मन अर्थशास्त्रज्ञ आणि सरकारनें आपली सत्ता समाजाच्या सर्वांगीण सुधारणेप्रीत्यर्थ पूर्णपणे उपयोगांत आणावी असें म्हणणारा अलीकडील स्टेटसोशॅलिस्ट पक्ष या दोहोंचे विचार कौटिल्याच्या अर्थशास्त्राशीं विशेष जुळते आहेत. निदानपक्षीं, ग्रीक तत्त्ववेत्ते ॲरिस्टॉटल व प्लेटो यांच्या निरनिराळ्या नावानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथांचें अर्वाचिन शास्त्रीय दृष्ट्या जें महत्त्व समजलें जातें त्याहून बरेंचसें अधिक महत्त्व हिंदुस्थानांतील अर्वाचीन अर्थशास्त्राचा विचार करतांना कौटिल्याच्या अर्थ-शास्त्रास द्यावें लागेल, यांत शंका नाहीं. शुक्र आणि कामंदक ह्यांच्या "नीति" ग्रंथांमध्यें कौटिल्याच्या अर्थशास्त्राप्रमाणेंच अर्थशास्त्रविषयक विचार प्रदर्शित केलेले आहेत. तसेंच, महाभारत व स्मृतिग्रंथ ह्यांमध्येंही असल्या विषयांचें विवेचन आढळतें. ह्या वरून समाजाची स्थिति आणि संवर्धन ह्यांचा सोपपत्तिक रीतीनें विचार करण्याचा प्रघात हिंदुस्थानात प्राचीनकाळीं दृढमूल झालेला असून अर्थ-शास्त्र विषयक चर्चा हें एकंदर समाज शास्त्राचें एक अंग आहें असें समजण्यात येई ही गोष्ट स्पष्ट होईल.

**११ हिंदुस्थानांतील अर्वाचीन अर्थशास्त्र**—देशाच्या आर्थिक परिस्थितीत विशेष फरक न झाल्यामुळें आमच्या अर्थशास्त्रविषयक विचारास चालना मिळू शकली नाही ही गोष्ट ध्यानांत ठेवल्यास गेल्या शेंदीडशें वर्षांच्या अवधीत हिंदुस्थानांत जे अनेक फेरबदल झाले त्यामुळें भारतीय अर्थशास्त्रास नवें चैतन्य मिळालें याचें कोणास आश्चर्य वाटणार नाहीं. अखिल हिंदी राष्ट्रांत एकाच प्रबल राजसत्तेची प्रस्थापना, खेडें, शहर, जिल्हा व इलाखा हीं स्वावलंबी न राहतां श्रमविभागाच्या तत्त्वानुसार सर्व हिंदुस्थानाचें आर्थिक बाबतींत होत असलेलें एकीकरण, पाश्चात्य देशांतील अनेक यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें मोठमोठे कारखाने चालविण्याचा उपक्रम,

या सर्वांमुळे आपल्या आर्थिक परिस्थितीत फार मोठी क्रान्ति घडून येत आहे. त्यांतच ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक या नात्यानें सर्व सुधारलेल्या जगाशी आमचा नित्य येणारा संबंध व इंग्रजी शिक्षणाच्या द्वारें हिंदीलोकांत प्रसृत होणारे स्वतंत्रताविषयक विचार यांची भर पडून स्वदेशाच्या आर्थिक परिस्थितीकडे दिवसानुदिवस आमचें अधिक लक्ष जात आहे. विशेषेंकरून पाश्चात्य पंडितांनी आपापल्या देशांतील अनुभवाच्या जोरावर जे अर्थशास्त्रीय ग्रंथ लिहिलेले असतात त्यांच्या परिशीलनानें हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गानें आपला आर्थिक मतें बनविलेली असण्याचा विशेष संभव असतो. परंतु परदेशी ग्रंथकारांची विलायती वातावरणांत तयार झालेली हीं तत्त्वें स्वदेशांतील अनुभवास लावतांना पदोपदीं अडचणी व अनवस्थाप्रसंग उपस्थित होतात. यास्तव पाश्चात्य अर्थशास्त्रविषयक तत्त्वांचा विचार करून, तीं आमच्या विशिष्ट परिस्थितीशीं कितपत जुळतात हें अवलोकन करणें अवश्य आहे. वैयक्तिक व सामाजिक दृष्ट्या आमची सांपत्तिक स्थिति कशी सुधारेल व सध्यां चालू असलेल्या आर्थिक किंबहुना सामाजिक क्रान्तीस इष्ट वळण कसें लावता येईल हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न हिंदी जनता व सरकार यांजपुढें आज उभा आहे. तो प्रश्न सोडविण्यास थोडी तरी मदत व्हावी हा प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचा मुख्य उद्देश असून, याच धोरणानुसार पहिल्या पांच प्रकरणांत पाश्चात्य विद्वानांस संमत असलेल्या अर्थशास्त्रविषयक सिद्धान्ताचा निर्देश करून पुढील सर्व प्रकरणांत हिंदुस्थानांत संपत्तीचें उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग हीं कसकशीं घडून येतात याबद्दल विवेचन केलेलें आहे. शिवाय, साधारण वाचकास भारतीय अर्थशास्त्राचें वैशिष्ट्य कळून येण्यास अर्थशास्त्राच्या सामान्य तत्त्वाची अगाऊ ओळख होणें जरूर आहे. या दोन्ही गोष्टी योग्यपणें घडून येण्यास वरील योजनेमुळें मदत होईल असा भरवसा आहे.

# प्रकरण १ लें

## संपत्तीचें उत्पादन

**१ मनुष्याच्या गरजा**—प्राणिमात्रास त्याच्या जीवितरक्षणार्थ कांहीं गोष्टी निसर्गनियमानुसार अवश्य असतात; व अशा ' गरजा ' भागविण्याची इच्छा त्याचे मनांत उत्पन्न होऊन ती तृप्त करून घेण्याकरितां तो प्रयत्न करण्यास तयार होतो. इच्छा, गरज व प्रयत्न यांचा हा अन्योन्य संबंध ध्यानांत घेतल्यास सर्व अर्थशास्त्राचा उगम मनुष्याच्या गरजांपासून होतो हें दिसून येईल. मानवी गरजांचे विशेष गुण अनेक आहेत व अर्थशास्त्रांतील कित्येक नियमांस व सिद्धांतांस त्याचाच आधार घेतलेला असतो. उदाहरणार्थ, ह्या गरजा अपरिमित असून जों जों मनुष्यजातीची प्रगति होत जाते तों तों त्या वाढत जातात. किंबहुना मानवी गरजांची वाढ म्हणजेच सुधारणा व प्रगति असें म्हटलें असता चालेल. मनुष्य रानटी स्थितींत असतां मांस, कंद, फळें व मुळें वगैरे खाण्याचे पदार्थ, झाडाखालीं किंवा गुहेंत थोडी निवाऱ्याची जागा, फार तर शिपा, पिसें किंवा चकचकणाऱ्या दगडांचीं कांहीं भूषणें इत्यादि थोडक्या वस्तूंनीं त्याच्या सर्व गरजा भागत. याच्या उलट अलीकडील पाश्चात्य राष्ट्रांतील एखादा सामान्य मनुष्यही केवळ पोटभर अन्न व अंगभर वस्त्र एवढ्यावर संतुष्ट न राहतां खाण्यापिण्याचे निरनिराळे असंख्य पदार्थ, अनेक प्रकारचे पोशाख व चैनीच्या भिन्न भिन्न वस्तू यांची हांव धरतो. यामुळें मनुष्याच्या सुखसोयींत किंवा संपत्तींत भर पडली तरी त्याच्या सुखाची वृद्धि होतेच असें मात्र नाहीं. कारण सुख होण्यास कांहींशा शरीरस्वास्थ्याची जरी जरूर असली तरी सुख व दुःख या मुख्यतः मानसिक स्थिती होत; आणि मनुष्याच्या इहलोकच्या जीविताचें अंतिमध्येय जर सुख हें आहे तर उगीच त्याच्या गरजा वाढवून त्याच्यामागें यत्नाची जाचणी लावण्यांत काय अर्थ आहे? असाही प्रश्न पुरातन कालापासून कित्येक साधुसंत व तत्त्ववेत्ते विचारीत आले आहेत. सुखदुःखविचाराचा हा मुद्दा वास्तविक परमार्थविषयक असला तरी ऐहिक सुखलालसेचा आपल्यावर पगडा बसूं देऊं नये ह्या नीतिशास्त्राच्या शिकवणुकीस अर्थशास्त्राचा विरोध नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. अत्यंत साध्या रीतीनें राहून आपला काल बुद्धिगम्य अशा ऐहिक व पारलौकिक सुखचिंतनाकडे लावणारे सत्पुरुष सर्वकाळीं व सर्व देशांत सारखेच वंदनीय असतात.

परंतु असल्या उच्च मनोभावनांचा ज्यांस गंधही नाही असले जे कित्येक ऐदी व उत्साहहीन लोक आपली ऐहिक परिस्थिति सुधारण्याचा यत्किंचितही प्रयत्न न करतां प्राप्त परिस्थितींत कुजत राहतात त्यांचें जीवन नैतिक व आर्थिक दृष्ट्या सारखेंच गर्हणीय होय. बहुजनसमाजाला बुद्धिग्राह्य सुखापेक्षां इंद्रियविषयक सुखाची अधिक आवड असल्यामुळें हें वासनात्मक सुख मिळविण्यास तो जितकी खटपट करील तितकीच त्याची आर्थिक परिस्थिति सुधारणार आहे. आधिभौतिक गरजांच्या वाढीबरोबर सामाजिक घटकांच्या परस्परावलंबनांत जी वाढ होते तिचें नैतिक महत्त्वही कांहीं कमी नाहीं ह्याबद्दल उपोद्घातांत विचार केलेलाच आहे.

मनुष्याच्या गरजा संख्येनें अपरिमित असल्या तरी त्यांचें तृप्तिसामर्थ्य परिमित असतें. उदाहरणार्थ, भूक ही मनुष्याची शारीरिक बाधा असून तिचें निवारण करण्यास त्याला अनेक पदार्थांची जरूर असते. परंतु त्यांपैकीं कोणताही एक पदार्थ घेतला तरी त्याच्या अल्पशा सेवनानें भूक कमी होत जाऊन शेवटीं तिची पूर्ण तृप्ति होते. यानंतरही त्या पदार्थाचें सेवन चालू ठेवल्यास मनुष्यास सुख न होतां त्याचें दुःख मात्र वाढत जाईल. मनुष्याच्या नैसर्गिक किंवा शारीरिक गरजांची तृप्तिसीमा प्रायः स्पष्ट असते. परंतु त्याच्या कृत्रिम अगर सामाजिक गरजांची केव्हां तृप्ति होईल हें सांगणें फार कठीण आहे. कदान्न किंवा पक्वान्न ह्या दोहोंचें किती सेवन केलें असतां साधारण मनुष्याची तृप्ति होईल हें सांगणें सोपें आहे. परंतु एखाद्या लक्षाधीशानें किती इमारती बांधल्या किंवा किती मोटारी विकत घेतल्या म्हणजे त्याचें समाधान होईल अगर एखाद्या स्त्रीला किती दागिने मिळाले तर तिची भूषणलालसा तृप्ति पावेल हें ठरविणें दुरापास्त होय. तरी जसजशी त्यांनीं मिळविलेल्या इमारतींची, मोटारींची अगर दागिन्यांची संख्या वाढत जाईल तसतशी त्यांच्या मनाची हांव कमी होत जाऊन नव्या इमारती, मोटारी किंवा दागिने यांपासून होणारी तृप्तिही कमी होत जाईल; आणि शेवटीं या वस्तूंचा त्यांस कंटाळा येऊन त्या मिळविणें ते बंद करतील. पैसा ही एकच वस्तु आजकाल अशी आहे कीं तिला तृप्तिसीमाच नाहीं असें वाटण्याचा संभव आहे. ह्याचें कारण असें कीं, इतर वस्तू मिळविण्याची माणसाची इच्छा त्या वस्तू त्याची एखादी गरज भागविण्यास उपयोगी पडतात या गोष्टीवर अवलंबून असते. परंतु पैशानें सर्वच वस्तू मिळत असल्यामुळें मनुष्याच्या एकंदर गरजा ज्याप्रमाणें अपरिमित आहेत त्याप्रमाणें पैसा मिळविण्याची त्याची हांव, किंवा पैशाचें तृप्तिसामर्थ्य, अपरिमित आहे असें दिसतें. परंतु महिना पन्नास रुपये मिळविणाऱ्या कारकुनाच्या पगारांत पांच रुपयांची वाढ झाल्यास त्याचें जितकें समाधान होईल, तितकें पांचशें रुपये प्राप्ति असलेल्या वकिलास तितकीच रक्कम, म्हणजे पांच रुपये, अधिक मिळाल्यामुळें होणार नाहीं, हें उघड आहे. यावरून पैशाचेंही तृप्तिसामर्थ्य मर्यादित

आहे व पैशाच्या वाढत्या प्रमाणाबरोबर ते कमी कमी होत जातें असें दिसून येईल.
मनुष्याच्या एकंदर गरजा अपरिमित असून प्रत्येक गरजेचें तृप्तिसामर्थ्य मात्र परिमित असल्यामुळें त्या गरजांची एकप्रकारें आपापसांत स्पर्धा चालू असते. एका गरजेची अर्धवट तृप्ति झाल्याबरोबर दुसऱ्या गरजा मनुष्याच्या भोगेच्छेवर आपला पगडा बसविण्याची खटपट करतात व मनुष्यही एखादी गरज भागविण्यापासून होणारी तृप्ति व त्याकरितां करावे लागणारे श्रम यांचा विचार करून एकंदर गरजांत जी भागविल्यामुळें त्यास जास्तीत जास्त सुख होण्याची अपेक्षा असेल ती पसंत करतो. एखादी वस्तु मिळणें अधिक दुर्घट झाल्यास मनुष्य तिच्याऐवजी दुसरी वस्तु वापरतो यांतील मर्म त्या वस्तूबद्दलच्या गरजांची परस्परस्पर्धा हेंच असून अर्थशास्त्रांतील 'अदलाबदली'चा नियम गरजांच्या या गुणावर अवलंबून आहे. गरजात परस्परस्पर्धा असून देखील त्यांपैकीं कित्येक परस्परपरिपोषक असतात. उदाहरणार्थ, बसावयास घोडा घ्यावयाचा झाला तर त्याबरोबर लगाम व खोगीर हीही घेतली पाहिजेत. मानवी गरजांचा आणखी एक गुण ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. एखादी गरज, मग ती कृत्रिम असो अगर नैसर्गिक असो, अनेक वेळां भागविल्यामुळें तिची संवय लागते व अशा अनेक संवयी एकत्र केल्यास मनुष्याच्या राहणीचें मान ठरून जातें. आनुवंशिक संस्कारामुळें तर एखादी गरज पिढ्यानुपिढ्या तशीच कायम राहते. गरजांच्या या गुणांचा उपयुक्त वस्तूंस असलेल्या मागणीवर व एकंदर आर्थिक व्यवहारांवर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं.

**२ उपयुक्तता**— अर्थशास्त्रात आधिभौतिक सुखसाधनांचा विचार करावयाचा सो ती मनुष्याच्या सुखाचीं साधनें आहेत म्हणून होय हें मागें सांगितलें आहे. त्यावरून जगांत ज्या असंख्य वस्तू आहेत त्यांचा मनुष्याच्या सुखाचें साधन होण्याचा गुण तेवढाच आर्थिक महत्त्वाचा आहे हें उघड होईल. आतां वास्तविक पाहिलें तर ज्यापासून मनुष्यास आपलें हित करून घेतां येईल असा कांही तरी गुण जगांतील प्रत्येक वस्तूंत असतोच, परंतु एकंदर निर्मित वस्तूंपैकीं फारच थोड्या वस्तू मनुष्याच्या माहितीच्या असतात; व त्यांपैकीं सर्वांचे एकंदर गुणधर्म त्यास ठाऊक असतात असें नाहीं. शिवाय, एखाद्या वस्तूंत आपल्या सुखाचें साधन होण्याचा गुण आहे असें कळून सुद्धा जर ती वस्तु, अगर त्या वस्तूंतील तो गुण मनुष्यास आपलासा करून घेणें शक्य नसेल तर ती वस्तु व तो गुण दोन्हीही मनुष्याचीं सुखसाधनें होऊं शकत नाहीत. उदाहरणार्थ, सूर्याचे किरण किंवा समुद्राची भरतीओहटी यांमध्यें लाखों गिरण्या चालविण्याइतकी शक्ति एकवटली आहे हें पदार्थविज्ञानावरून सर्वांस समजण्यासारखें आहे. परंतु जोंपर्यंत त्या शक्तीचा प्रत्यक्ष उपयोग करून घेण्याचे मार्ग आपणांस माहीत

नाहीत तोंपर्यंत सूर्यप्रकाश व समुद्राच्या लाटा यांचें प्रेरक सामर्थ्य हें मनुष्यांचें सुखसाधन होऊं शकत नाही. या उदाहरणावरून अर्थशास्त्रविषयक दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा उलगडा होईल. सूर्यप्रकाशांतील प्रेरक शक्ति हा गुण अनादि कालापासून अस्तित्वांत आहे. परंतु मनुष्याला त्याचा उपयोग करून घेतां येत नाही म्हणून त्याचें सुखसाधन या नात्यानें त्या प्रेरक शक्तीस कांहीच महत्त्व नाही. मनुष्य व त्याची सुखसाधनें यांत अधिक महत्त्वाचा भाग मनुष्याकडे असून त्याच्या गरजेचें त्याला माहीत व उपलब्ध असलेल्या अशा पदार्थाच्या ज्या गुणानें समाधान होतें त्या गुणाचें महत्त्व सर्वस्वी मनुष्याच्या गरजेवर अवलंबून असतें. वस्तूच्या या गुणास उपयुक्तता असें म्हणतात व ही उपयुक्तता वस्तूंचा रंग, वजन इत्यादि गुणांप्रमाणें वस्तूंसच चिकटलेली नसून, मनुष्यमात्राच्या भोगेच्छेवर तिचें अस्तित्व अवलंबून असतें. कित्येक पदार्थांच्या बाबतींत तर त्यांच्या ज्या गुणामुळें मनुष्यांस त्यांची उपयुक्तता वाटते तो गुण केवळ काल्पनिक असतो. उदाहरणार्थ, मुंबईसारख्या ठिकाणीं अत्यंत परिश्रमानें व अतोनात खर्चानें स्वच्छ पाण्याचा पुरवठा होत असतां कांही लोक विहिरीचें मचूळ पाणी अधिक पैसे देऊन मुद्दाम विकत घेतात. असलें पाणी गुणकारी असतें असा कांहीं नियम नाहीं, आणि कित्येक वेळां तें अपायकारकही असूं शकतें. परंतु त्या पाण्यांत विशेष गुण आहे या कल्पनेमुळें त्याची उपयुक्तता वाढून त्यास मूल्य येतें. कांहीं क्षेत्रांतील तीर्थांपासून शारीरिक बाधा नष्ट होतात या समजुतीनें कित्येक लोक तीर्थयात्रा करण्यास अगर तीर्थोदक मिळविण्यास बराच पैसा खर्च करतात, या अनुभवावरूनही गरज व उपयुक्तता यांतील संबंध स्पष्ट दिसून येतो.

मनुष्याची गरज भागविण्याचा गुण या अर्थानें 'उपयुक्तता' हा शब्द वापरण्यास व्यावहारिक भाषेची एक मोठी अडचण आहे, तिचा येथें उल्लेख करणें जरूर आहे. नेहमीच्या बोलण्यांत उपयुक्तता म्हणजे सदुपयोग असें समजलें जात असून नैतिकदृष्ट्या निर्दोष अशी गरज भागविणाऱ्या पदार्थांसच उपयुक्त वस्तु असें म्हणण्याचा प्रघात आहे. अर्थशास्त्रांत जेव्हां उपयुक्तता हा शब्द वापरावयाचा तेव्हां वरील नीतिविषयक विचार अभिप्रेत नसून, मनुष्याची कोणतीही गरज भागविण्याचा गुण असाच अर्थ घ्यावयाचा असतो. उदाहरणार्थ, अंमली पदार्थांत उपयुक्तता आहे असें आपण साधारणपणे म्हणणार नाही. परंतु जोंपर्यंत कांहीं लोकांस त्या पदार्थांच्या सेवनाची गरज वाटते व ते मिळविण्याकरितां मनुष्यें कांहीं कष्ट सोसण्यास तयार होतात तोंपर्यंत त्यांत उपयुक्तता आहे असेंच अर्थशास्त्रांत म्हणावें लागतें. यावरून अंमली पदार्थांचें सेवन करणें या गोष्टीस अर्थशास्त्रज्ञाची संमति आहे असें म्हणतां येणार नाहीं. एखादी वस्तु नैतिक अगर वैद्यकीयदृष्ट्या चांगली किंवा वाईट आहे याचा अर्थशास्त्रांत प्रत्यक्ष-

पणें विचार करण्याचें कारण नसतें. एका दृष्टीनें आपणांस असे म्हणतां येईल कीं, उपयुक्तता ह्या गुणाचा वस्तूंच्या ठिकाणीं मनुष्यानें केवळ ' आरोप ' केलेला असतो. मनुष्यांच्या बऱ्यावाईट ज्या गरजा आहेत त्या भागविण्याकरितां वस्तूंच्या ज्या गुणाची त्यांस मदत होते ती त्यांची उपयुक्तता व ज्या वस्तूंत उपयुक्ततेचा हा बहुमोल गुण असतो त्या उपयुक्त वस्तू अशी परिभाषा ठरविलेली असते. उपयुक्त वस्तूंत केवळ पदार्थ व मनुष्योपयोगी प्राणी यांचाच समावेश होत नसून मनुष्यांच्या मानसिक व शारीरिक शक्तीचाही त्यांत अंतर्भाव होतो. बागेंतील काम करण्यास लागणाऱ्या खुरप्याइतकाच, किंबहुना त्याहूनही अधिक, त्या खुरप्यानें काम करणारा माळी त्या बागेच्या मालकास उपयुक्त वाटतो. अनेक व्यावहारिक संबंधास हा न्याय लागूं असून अचेतन पदार्थ व सचेतन प्राणि यांच्या ज्या गुणाचा आपल्या आधिभौतिक सुखासाठीं मनुष्य अभिलाष धरतो तो गुण म्हणजे त्यांची उपयुक्तता समजून त्या सर्वांस उपयुक्त वस्तू असें म्हणावें लागतें.

**३ मूल्य**—एकंदर निर्मित वस्तूंपैकीं ज्या थोड्या वस्तूंचा मनुष्ये स्वसुखवर्धनार्थ उपयोग करूं इच्छितात त्याची संख्या दिवसानुदिवस वृद्धिंगत होत आहे. परंतु या बाबतीत आर्थिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची गोष्ट अशी आहे कीं मनुष्याची अभिलाषबुद्धि सर्व पदार्थांच्या उपयुक्ततेबद्दल सारखीच तीव्र नसते. कांहीं विवक्षित पदार्थांचा अभिलाष मनुष्य दुसऱ्या कांहीं पदार्थापेक्षा जास्त धरतो. उदाहरणार्थ, धान्य व घोडा या दोन्ही वस्तू आपापल्यापरी उपयुक्त असल्या तरी मनुष्य घोड्यापेक्षा धान्याचा अधिक अभिलाष धरील. मनुष्याच्या अभिलाषबुद्धीच्या तराजूंत अनेक वस्तूंच्या उपयुक्ततेचें जें वजन ठरतें त्यास अर्थशास्त्रांत मूल्य असें म्हणतात. उपयुक्तता हा भोगेच्छु मनुष्यानें वस्तूंच्या ठिकाणीं शोधून काढलेला निराळा व स्वतंत्र गुण आहे हें वर सांगितलेंच आहे. एखाद्या पुस्तकाची उपयुक्तता फार आहे असें म्हटल्यानें तें पुस्तक व त्याची गरज असणारा मनुष्य याशिवाय दुसऱ्या कशाचाही बोध होत नाहीं. तेंच पुस्तकाचें मूल्य फार आहे, किंवा अमुक रुपये, अमुक शेर धान्य इतकें आहे असें म्हटल्यानें धान्य, रुपये, व पुस्तक यांच्या उपयुक्ततेबद्दल परस्पर संबंध जोडला जातो. आर्थिकदृष्ट्या किंचितही प्रगति झाल्यावर थोड्याफार प्रमाणात वस्तूंचा विनिमय हा होतोच, व व्यावहारिक उपयोगाच्या अनेक वस्तूंचें मूल्य ठरून जातें. असें असलें तरी वस्तूंचें मूल्य त्यांच्या विनिमयामुळें उत्पन्न होतें असें नाहीं. अगदीं रानटी स्थितींत एकलकोंडा किंवा कळप करून हिंडणारा मनुष्यसुद्धां आपणास उपलब्ध असलेल्या वस्तूंच्या उपयुक्ततेंत तरतम भेद करील. ज्या अणकुचीदार दगडाच्या हत्यारानें पशुपक्ष्यांची पारध करून तो आपला उदरनिर्वाह करतो तें हत्यार ज्या शिंपल्यानें तो स्वतःचें शरीर शृंगारतो त्यापेक्षां त्यास अधिक मूल्यवान् वाटेल. मूल्याची कल्पना

मळांतच वजन, लांबी इत्यादिकांप्रमाणें परस्परसंबंधदर्शक असून ऐनजिनसी किंवा पैशाच्या मदतीनें होणाऱ्या वाढत्या विनिमयानें ती विशेष प्रगट होते एवढें मात्र खरें. मूल्यविषयक कल्पनेंत दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीचा अंतर्भाव होतो. एखादी वस्तु कितीही उपयुक्त असली तरी जोंपर्यंत ती वस्तु दुर्मिळ नाहीं, म्हणजे त्या वस्तूबद्दल असलेली मनुष्याची गरज सहज भागविण्याइतका तिचा पुरवठा आहे तोंपर्यंत त्या वस्तूस मूल्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. खेडेगांवांत हवा, नदीकांठीं पाणी व रानावनात फळें यांना मूल्य नाहीं. तेंच शहरांत या सर्व वस्तूंची अत्यंत गरज असून त्यांचा पुरवठा मात्र मर्यादित असल्यामुळें त्यांस मूल्य येतें. हवाशीर जागा, स्वच्छ पाणी, ताजीं फळें हीं सर्व शहरांत बहुमोल समजलीं जातात. एकंदर समाजाच्या दृष्टीनें पाहिलें तरी ज्या मानानें एखादी उपयुक्त वस्तु अधिक दुर्मिळ त्या मानानें तिचें मूल्य अधिक असतें असें दिसून येईल. सुगीच्या दिवसांत शेतीचें जें उत्पन्न होतें त्यापेक्षां दुष्काळांत होणारें उत्पन्न कधीं कधीं जास्त मूल्यवान ठरतें. गेल्या आठ दहा वर्षांत रबराचा पुरवठा फाजील झाल्यामुळें मळेवाल्यांचा धंदा डबघाईस आला होता. त्यांनीं आपापल्या मळ्यांतून होणारा पुरवठा एकमतानें मर्यादित करून रबराचें मूल्य वाढविलें व हळूहळू आपला धंदा सांवरला यंदा अमेरिकेंत कापसाचें पीक सतरा आणे आल्याकारणानें कापसाचा भाव उतरून शेतकऱ्यांचें नुकसान होण्याचा प्रसंग आला आहे. वास्तव यंदाच्या पिकांतील बराचसा भाग साठवून ठेवून कृत्रिम रीतीनें पुरवठा मर्यादित केल्यास कापसाचा भाव वाढेल व शेतकऱ्यांचें होणारें नुकसान टळेल. मग पुढील वर्षीं पुष्कळशीं कपाशीचीं शेतें ओसाड टाकून यंदाची शिल्लक व पुढल्या वर्षीचें मुद्दाम कमी केलेलें उत्पादन हीं मिळून किफायतशीर भावानें विकण्याचा अमेरिकन लोक व सरकार याचा विचार चालू आहे. संपत्ति म्हणजे सुखसाधनांची समृद्धि ही सामान्य कल्पना वस्तूंचें मूल्य मर्यादित पुरवठ्यामुळें उत्पन्न होतें व पुरवठा जों जों अधिक मर्यादित करावा तों तों तें वाढत जातें या आर्थिक सिद्धांताशीं विसंगत नाहीं, हें मात्र ध्यानांत ठेवलें पाहिजे

**४ मूल्यनिदान**—आपणांस एका वस्तूपेक्षां दुसरी वस्तु अधिक महत्त्वाची किंवा हवीशी वाटते म्हणून मूल्याची कल्पना उद्भवते. परंतु मूल्य म्हणजे काय? हें ज्यांस पहावयाचें आहे त्यास येथेंच थांबून चालावयाचें नाहीं. मनुष्याची अभिलाषबुद्धि एका पदार्थाचे बाबतींत अधिक तीव्र व दुसऱ्या पदार्थाचे बाबतींत कमी तीव्र कां, हाच मूळ मूल्याचा प्रश्न असून त्याच्या उत्तरावर अर्थशास्त्रविषयक इतर अनेक तत्त्वें अवलंबून आहेत. हा प्रश्न सोडविण्याचा अर्थशास्त्रज्ञांनी आजवर बराच प्रयत्न केला असून देखील सर्वसंमत असें उत्तर अजून सांपडलेलें नाहीं. किंबहुना मनुष्याची आवडनिवड ही स्वभावतःच लहरी व स्वतंत्र असल्यामुळें तिच्या-

बद्दल कोणताच ठाम नियम ठरवितां येणार नाहीं असे निराशापूर्ण विचार कित्ये-कांनीं प्रगट केलेले आहेत. परंतु वस्तूंबद्दलच्या मनुष्याच्या अभिलाषबुद्धींत फरक कां होतो, हा प्रश्न न सोडविणें म्हणजे मूल्यविचाराची व त्याबरोबर बहुतेक सर्व अर्थशास्त्राची रजा घेतली पाहिजे. मनुष्याची चौकस बुद्धि जोंपर्यंत असें करण्यास तयार नाहीं तोंपर्यंत मूल्योद्भव कसा होतो या प्रश्नाचें आपापल्या दृष्टीनें समाधान-कारक उत्तर देण्याचा अर्थशास्त्रज्ञ प्रयत्न करीत असतात. कित्येक ग्रंथकार असें म्हणतात कीं, वस्तूंच्या उपयुक्ततेंतच फरक असल्यामुळें त्यांजबद्दलची मनुष्याची अभिलाषबुद्धि, किंवा त्यांचें मूल्य, हीं कमी अधिक होतात. परंतु जीवनास सर्वथैव आवश्यक अशा हवेपेक्षा, किंवा शरीरवर्धनास अत्यंत उपयोगी अशा धान्या-पेक्षा सोनें, रुपें व जडजवाहीर ह्यास अधिक मूल्य कां, हे कोडें निव्वळ उपयुक्तता-वादावरून सुटावयाचें नाहीं. केवळ उपयुक्ततेवर मूल्योद्भव अवलंबून नाहीं हें जाणून कित्येक अर्थशास्त्रज्ञ दुर्मिळता हे मूल्याचें मुख्य कारण होय असें प्रतिपादन करतात. त्यांच्या मतें, मनुष्य ज्या ज्या वस्तूंचा अभिलाष धरतो त्या सर्व वस्तूंत उपयुक्तता ही असतेच. मात्र कांहीं वस्तूंचा पुरवठा मुबलक व कांहींचा मर्यादित असल्यामुळें त्यांच्यात मूल्यभेद होतो. ही विचारसरणी कांहीं अंशीं बरोबर असून तिच्यांतील तथ्यांशाचा सीमागत उपयुक्ततेच्या सिद्धांतांत अंतर्भाव केलेला आहे. परंतु दुर्मिळतेमुळें मूल्य उगम पावतें असें म्हटल्यानें मनुष्याच्या अभिलाषबुद्धीचें मुख्य कारण जें वस्तूंची उपयुक्तता त्यास योग्य महत्त्व दिलें जात नाहीं. अभि-लाषबुद्धीच्या मार्गांत दुर्मिळता हा एक अडथळा आहे. दुर्मिळ वस्तू मिळविणें हाच ज्याचा धंदा आहे त्याची गोष्ट निराळी; परंतु सामान्य माणसास एखाद्या वस्तूच्या केवळ दुर्मिळतेमुळें तिचा अभिलाष वाटतो असें सहसा होत नाहीं, आणि म्हणून दुर्मिळता हे मूल्योद्भवाचें एकच किंवा मूल्यनिदान ठरविण्याबद्दल सर्वांशीं समाधानकारक कारण आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. अर्थशास्त्रज्ञांत सध्या जो मतभेद आहे तो केवळ उपयुक्तता अगर दुर्मिळता यांपैकीं कोणत्या एकामुळें मूल्योद्भव होतो याबद्दल नसून या दोहोंच्या एकत्रित सहकार्यानें मूल्य ठरतें किंवा एखादी वस्तु उत्पन्न करण्यास जे श्रम लागतात त्या श्रमामुळें ती वस्तु मूल्यवान् होते याबद्दल आहे. पहिल्या विचारसरणीस सीमागत उपयुक्ततेचा सिद्धांत व दुसरीस श्रमसिद्धांत असें म्हणतात.

**५ श्रमसिद्धांत**— या सिद्धांताच्या पुरस्कर्त्यांची विचारसरणी पुढें दिल्याप्र-माणें आहे. "वस्तूंस मूल्य येण्यास उपयुक्तता ही सर्वांशीं आवश्यक आहे हें खरें, परंतु एवढ्यावरून उपयुक्तता मूल्याचें कारण आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. मूल्याचा उद्भव वास्तविक श्रमापासून होत असून ज्या मानानें एखादी वस्तु उत्पन्न करण्यास कमी जास्त श्रम पडतात त्यामानानें त्या वस्तूचें मूल्य कमी जास्त होतें."

साधारण मनुष्यास मूल्याचें हें निदान बरोबर आहे असें वाटण्याचा बराच संभव आहे. एक तर उपयुक्तता या अनिश्चित व दुर्बोध कारणाऐवजीं श्रम हे निश्चित स्वरूपाचें कारण मनुष्याच्या ग्राहकबुद्धीस सहज पटतें. सोन्याची उपयुक्तता चांदीपेक्षां अधिक असल्यामुळें सोन्याचें मूल्य चांदीपेक्षां अधिक असतें असें म्हटल्यानें जिज्ञासूचें फारसें समाधान होण्याचा संभव नाही. तेच एक तोळा सोनें उत्पन्न करण्यास तितक्याच वजनाची चांदी उत्पन्न करण्यास लागणाऱ्या श्रमापेक्षां दसपट श्रम लागतात, म्हणून चांदीपेक्षां सोन्याचें मूल्य दसपट अधिक असतें असें सांगितलें तर सामान्य मनुष्याचें समाधान होईल. शिवाय श्रमाचा मोबदला मिळणें योग्य आहे ही गोष्ट सर्वमान्य असल्यानें सर्व पदार्थांचें मूल्य ते उत्पन्न करण्यास लागणाऱ्या श्रमावर अवलंबून असतें असें ठरल्यास वस्तूंच्या कमी अधिक किंमती-बद्दल जो नेहमी असंतोष असतो त्यास जागा राहणार नाही. आतां सर्व प्रकारच्या श्रमांस सारखाच मोबदला मिळणें आवश्यक आहे किंवा काय, हा विचार क्षणभर बाजूस ठेविला तरी मूल्योद्भवाचें वरील निदान अर्थशास्त्रज्ञांस संमत न होण्यास दुसरीही अनेक कारणें आहेत. वस्तू उत्पन्न करण्यास जे श्रम लागतात त्यांवरून त्यांचे मूल्य ठरतें हें जर खरें, तर वस्तूंच्या मूल्यांत कधीही फरक होतां कामा नये. कारण एकदां वस्तु उत्पन्न झाली म्हणजे ती उत्पन्न करण्यास किती श्रम लागले हें व त्याबरोबर तिचें मूल्य, ही दोन्ही कायमची ठरली. परंतु व्यवहारांत वस्तूंचें मूल्य नेहमी कमी अधिक होत असतें असें आपण पाहतो. तसेंच मूल्योद्भवाबद्दलचा हा श्रमसिद्धांत खरा धरून चालल्यास ज्या दोन वस्तू उत्पन्न करण्यास सारखे श्रम लागतात त्या वस्तूंचें मूल्य देखील सारखें असावयास पाहिजे. वस्तुस्थिति मात्र याहून भिन्न असते हे सांगावयास नको. सारख्याच क्षेत्रफळाच्या व मगदुराच्या दोन जमीनींपैकीं एकींत बाजरी व दुसरींत तांदूळ अशी पिकें काढण्यास श्रम व भांडवल यांचा सारखाच व्यय केला तरी बाजरी व तांदूळ या पिकांचें मूल्य कमी अधिक ठरेल. श्रमसिद्धांतावरून दुसरा असा एक निष्कर्ष निघेल कीं कमी श्रमानें उत्पन्न केलेल्या वस्तू अधिक श्रमानें उत्पन्न केलेल्या वस्तूंपेक्षां स्वस्त दरानें विकल्या जाव्या. म्हणजे पुण्याच्या बाजारांत भांबुर्ड्याहून आणलेला माल चिंचवडाहून आणलेल्या मालापेक्षां स्वस्त मिळावा. परंतु आपला अनुभव असा आहे कीं बाजारांत दोघांचें मूल्य सारखेंच ठरतें. तसेंच सहज लीलेनें चार गाणी गाऊन लोकांचें मनोरंजन करणाऱ्या गवयाचे श्रम दिवसभर उन्हातान्हांत काबाडकष्ट करणाऱ्या मोलकऱ्याच्या कामगिरीपेक्षां अनेक पटींनी जास्त मूल्यवान समजले जातात, ही सामान्य गोष्ट श्रमसिद्धांत खरा मानला तर मात्र अशक्य व असमर्थनीय ठरेल. हीं सर्व अनुमानें व्यावहारिक अनुभवास सोडून असल्यामुळें श्रमसिद्धांत कोणाही अर्थशास्त्रज्ञास पटणार नाहीं. या सिद्धांताचे कित्येक पुरस्कर्ते तर मूल्य हें श्रमाची

उत्पत्ति आहे असें प्रतिपादन करतात. आता मूल्य म्हणजे मनुष्याच्या अभिलाषबुद्धीची कमी अधिक तीव्रता, असें असल्यानें ते श्रमाची किंवा दुसऱ्याही कशाची उत्पत्ति आहे असें म्हणतां यावयाचें नाही. वस्तू उत्पन्न करण्यास कमी अधिक श्रम लागल्यानें त्यांचा पुरवठा कमी जास्त होतो, व पुरवठ्यात बदल झाल्यानें मनुष्याच्या अभिलाषबुद्धीची तीव्रताही बदलते ही गोष्ट मात्र नाकबूल करतां यावयाची नाही. मूल्योद्भवाबद्दलचा सीमागत उपयुक्ततेचा सिद्धांत याच अनुभवावरून ठरविलेला आहे.

**६ सीमागत उपयुक्ततेचा सिद्धांत**--श्रमसिद्धांतांतील मुख्य दोष म्हटला म्हणजे वस्तूंच्या उपयुक्ततेमुळे मनुष्यांच्या गरजा भागून त्यांचे जें समाधान होतें त्याचा मूल्योद्भवाशीं असलेला संबंध त्यामध्यें दृष्टीआड केला जातो हा होय. सीमागत उपयुक्ततेच्या सिद्धांतास प्रस्तुत मुद्याचाच आधार घेतलेला आहे. मूल्य हें वस्तूंतील अंगभूत गुण नसून तें सर्वस्वी मनुष्याच्या अभिलाषबुद्धीवर अवलंबून आहे व उपयुक्त वस्तूंचा पुरवठा जसजसा वाढत जातो तसतशी अभिलाषबुद्धीची तीव्रता कमी होत जाते हे ध्यानात ठेवल्यास हा सिद्धांत सहज कळून येईल. वस्तूची एकंदर उपयुक्तता निराळी असून रोजच्या व्यवहारात तिचा फारसा प्रत्यक्ष संबंध येत नाही. उदाहरणार्थ, सामान्य मनुष्यास जगांतील एकंदर धान्याची उपयुक्तता किती आहे याबद्दल विचार करण्याचें कारण नसतें. आवश्यक असलेल्या धान्याच्या विवक्षित परिमाणाची आपणास उपयुक्तता किती हाच त्याच्यासमोर मुख्य प्रश्न असून धान्य या वस्तूबद्दलचा त्याचा अभिलाष या अंशगत उपयुक्ततेवर अवलंबून असतो. शिवाय प्रत्येक अंशाची उपयुक्तता भिन्न असून जों जों धान्याचा एकंदर पुरवठा वाढत जाईल तों तो त्याच्या प्रत्येक अंशाची उपयुक्तता कमी होत जाते. साधारण मनुष्य एक शेर धान्याचें जें मूल्य ठरवील ते धान्याच्या एकंदर साठ्याच्या उपयुक्ततेवर अवलंबून नसून त्या सांठ्याचा अगदीं शेवटला अंश त्यास जितका उपयुक्त वाटेल, म्हणजे सीमेवरील अंशाबद्दल त्याची अभिलाषबुद्धि जितकी तीव्र असेल, त्यावर अवलंबून असतें. केवळ एकंदर उपयुक्ततेमुळें मनुष्यांस वस्तू मूल्यवान् वाटतात असें नाही. उदाहरणार्थ, हवा ही वस्तु जरी अत्यंत उपयुक्त असली तरी तिचा सांठा इतका मुबलक आहे की तिच्या शेवटल्या अंशाची मनुष्यास कांहीच उपयुक्तता नाही असें म्हटलें असतां चालेल. उलटपक्षीं निव्वळ दुर्मिळतेनेंही वस्तूंस मोल चढत नाही. आधिभौतिक शास्त्रांची व यांत्रिक सुधारणांची हल्ली इतकी प्रगति झाली आहे की मनुष्यास लागणारी कोणतीही वस्तु सर्वस्वी दुर्मिळ आहे असें म्हणतां यावयाचें नाही. जरूर तेवढे श्रम केले असतां प्रत्येक वस्तूचा वाटेल तेवढा पुरवठा उत्पन्न करतां येतो. वास्तविकपणें अशा वाढत्या पुरवठ्यामुळें वस्तूंची सीमागत उपयुक्तता कमी होत जाऊन त्यांचें मूल्य कमी व्हावयास पाहिजे. परंतु जों जों पुरवठा वाढवावा तों तों वस्तू उत्पन्न करण्यास लागणारे

श्रमही कमी जास्त होतात. कांहीं यांत्रिक सुधारणांमुळे वस्तूंचें उत्पादन जों जों जास्त प्रमाणांत करावें तों तों त्यांपैकीं एकएक वस्तु उत्पन्न करण्यास लागणारे श्रम कमी होतात. अशा वस्तूंचें मूल्य वाढत्या पुरवठ्याबरोबर सीमागत उपयुक्तता व उत्पत्तिश्रम ही दोन्ही कमी होऊन उतरत जातें. तेंच कांहीं वस्तू उत्पन्न करण्यास वाढत्या पुरवठ्यास वाढते श्रम करावे लागतात, म्हणजे प्रत्येक अंशाचे उत्पत्तिश्रम जों जों एकंदर पुरवठा वाढवीत जावा तों तों वाढत जातात. अशा वस्तूंचें मूल्य, सीमागत उपयुक्तता कमी झाल्यामुळें उतरूं पहात असतां उलट बाजूनें सीमागत श्रम वाढत असल्यामुळें अभिलाषबुद्धि तीव्र होऊन तें वाढत मात्र जातें. याप्रमाणे सीमागत उपयुक्तता व सीमागत श्रम या दोहोंच्या परस्पर प्रतिक्रियेनें मनुष्याच्या अभिलाषबुद्धीची तीव्रता व वस्तूंचें मूल्य ही ठरत असतात. उत्पत्तिश्रमाचा मूल्यावर होणारा हा परिणाम सीमागत उपयुक्ततेचे एकदेशी पुरस्कर्ते विसरतात हा त्यांच्या सिद्धांतांतील मोठाच दोष होय. एरवी मूल्य हें सर्वस्वी मनुष्याच्या अभिलाषबुद्धीवर अवलंबून असते एवढेंच नव्हे, तर कित्येक प्रसंगी तें केवळ काल्पनिक असूं शकतें, व वस्तूंच्या एकंदर पुरवठ्याच्या उपयुक्ततेंत व त्यांतील प्रत्येक अंशाच्या उपयुक्ततेंत तात्त्विक फरक आहे या महत्त्वाच्या मुद्यांस हा सिद्धांत सर्वस्वी मुकून आहे. प्रसिद्ध इंग्रज अर्थशास्त्रज्ञ मार्शल यांनी असें म्हटलें आहे की ज्याप्रमाणें कमानीतील मध्यवर्ति दगड दोन्ही बाजूंच्या रचाईच्या आधारानें स्थिर राहतो त्याप्रमाणें मूल्य हें सीमागत श्रम व सीमागत उपयुक्तता या दोहोंवर सारखेंच अवलंबून असतें.

**७ मूल्यमापन**—मूल्य हा लांबी, वजन इत्यादिकांप्रमाणें परस्परसंबंधवाचक शब्द आहे असें मागें सांगितलें आहे. आता ज्याप्रमाणें पदार्थांची लांबी दिग्दर्शित करण्यास फूट किंवा अंगुलें व वजन मोजण्यास शेर किंवा पौंड वगैरे मापें आहेत त्याप्रमाणें मूल्यमापनास कांहीं साधन आहे किंवा नाहीं हा महत्त्वाचा प्रश्न शिल्लक उरतो. दोन पदार्थांचें वजन ठरविण्यास ते पदार्थ गुरुत्वाकर्षणाच्या शक्तीनें पृथ्वीकडे किती जोरानें ओढले जातात हें पहावें लागतें. या अनुभवावरून ठराविक आकाराच्या व विशिष्ट धातूच्या एखाद्या गोळ्यास पृथ्वी जितक्या जोरानें आपल्याकडे ओढते तितक्या परिमाणास इतर सर्व पदार्थांचें वजन ठरविणारें सर्वसाधारण माप असें समजतात. मनुष्याची अभिलाषबुद्धि गुरुत्वाकर्षणाप्रमाणें असून दोन पदार्थांचें मूल्य ठरवावयाचें झाल्यास त्या दोहोंबद्दल मनुष्याची अभिलाषबुद्धि किती तीव्र आहे हें सांगावयास पाहिजे. शेतकीस अवश्य लागणारा बैल हा प्राणी एखादा शेतकरी जर चार मण धान्य देऊन घेण्यास तयार असला तर त्यावरून एका बैलाबद्दलचा त्याचा अभिलाष चार मण धान्याबद्दलच्या त्याच्या अभिलाषाइतका तीव्र आहे असें सहज सिद्ध होते व एका

बैलाचें मूल्य चार मण धान्य असा संबंध जोडला जातो. व्यवहारांत असंख्य वस्तूंचा विनिमय होत असून त्याचें मूल्य ठरविण्याला कांहीं तरी सर्वसाधारण माप असणे अवश्य असतें. समाजाच्या निरनिराळ्या आर्थिक परिस्थितीस अनुसरून निरनिराळ्या वस्तूंचा मूल्यमापनास उपयोग झालेला आहे. कातडी, जनावरें व धान्य ही अजून देखील कित्येक देशांत मूल्याचें माप म्हणून वापरली जातात. परंतु सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत अगदीं प्राचीन काळापासून सोनें, रुपें इत्यादि बहुमोल धातू मूल्यमापनास विशेष योग्य मानलीं आहेत. याचें मुख्य कारण म्हणजे सर्व मनुष्यास ह्या वस्तू हव्याशा वाटतात व त्यांची उपयुक्तता सहसा कालांतराने अगर देशांतरानें फारशी बदलत नाही हें होय. शिवाय अत्यंत थोड्या आकारात व वजनांत जास्तीत जास्त उपयुक्तता साठविण्याचा गुण त्यांच्या अंगी असल्यामुळे त्यांची वहातुक करणें सोपें असते. परंतु लोखंडाचा ठराविक आकाराचा गोळा हा वजनाचें माप करण्यास जसा सर्वस्वी लायक असतो तसा सोनें, रुपें, धान्य किंवा दुसरा कोणताही उपयुक्त पदार्थ मूल्यमापनाचें सर्वांशीं समाधानकारक साधन होण्यास योग्य असूं शकत नाही. कारण ठराविक आकाराच्या लोखंडाच्या गोळ्यास पृथ्वी आपल्याकडे किती जोरानें ओढते हे कायमचें ठरल्यासारखे असतें. परंतु सोने रुपे इत्यादि मूल्यमापनाचें काम करणाऱ्या वस्तूंची स्वतःची उपयुक्तता अनिश्चित असून त्याजबद्दल मनुष्याची अभिलाषबुद्धि निरनिराळ्या काळीं कमीजास्त तीव्र असून शकते. म्हणून कित्येक वेळी पदार्थांच्या स्वतःच्या उपयुक्ततेंत अगर उत्पत्तिश्रमात फरक न होतां केवळ सोन्यारुप्याचें मूल्य कमी झाल्यामुळे इतर पदार्थांचें मूल्य वाढल्यासारखें दिसतें. ज्याप्रमाणें एका पौंडाचें वजन किंवा एका फुटाची लांबी ही कांही कारणांनी निम्मी झाल्यास वस्तूंचें वजन व लांबी मुळात कायम असून, मापच अर्धे झाल्यामुळें तीं दुप्पट भरतील, त्याप्रमाणें ज्या नाण्याने अगर सोन्या चांदीच्या तुकड्यानें मूल्य मोजावयाचें त्या नाण्याचें मूल्य कमी झाल्यास वस्तूंचें मूल्य वाढलें असें दिसेल. उलटपक्षीं, फूट मुळापेक्षां लांबला तर जशी वस्तूंची लांबी मुळांत आहे त्यापेक्षां कमी भरेल त्याप्रमाणें नाण्यांतील सोन्याचांदीचें मूल्य वाढल्यास वस्तूंचे मूल्य कमी झालें असें भासेल. वस्तूंच्या मूल्यमापनातील हा चढउतार अजमावण्यासाठी अर्थशास्त्रज्ञ ‘सूचक’ अंकाचा उपयोग करतात. म्हणजे अनेक पदार्थांच्या एखाद्या विवक्षित वेळी असलेल्या मूल्याची सरासरी ही शंभर आहे असें धरून इतर वेळी असलेल्या त्या पदार्थांच्या मूल्याची मूळ सरासरीशीं शेंकडेवारी काढतात. त्यावरून एकंदर सर्व पदार्थांची किंमत वाढली आहे असें दिसल्यास त्याभानानें नाण्याचें किंवा पैशाचे मूल्य कमी झाले आहे असें ठरतें. मात्र मूल्य ठरविण्याचें माप बदललें आहे असें या सूचक अंकांवरून कळून देखील तें सुधारण्यास त्यांचा विशेष

उपयोग होत नाही; कारण नाणें किंवा पैसा यांचा साठा सहज रीतीनें कमी जास्त करतां येत नाही, हे संपत्तीचा विनिमय या प्रकरणांत आपणांस दिसून येईल.

**८ उत्पादनाचे घटक**--उपयुक्त वस्तूंचें उत्पादन होण्यास तीन घटकांच्या सहकार्याची आवश्यकता आहे अशी एक कल्पना अर्थशास्त्रज्ञांत पहिल्यापासून रूढ आहे. भूमि किंवा निसर्ग, श्रम व भाडवल हेच ते तीन घटक होत. विषयाचे उपपादन सुलभ होण्यास उत्पादनाच्या घटकांचें हे वर्गीकरण उपयुक्त आहे यांत शंका नाही. परंतु त्यावरून तें सर्वस्वी समाधानकारक आहे किंवा त्यांत नमूद केलेले तिन्ही घटक संपत्तीच्या उत्पादनास सारखेच आवश्यक आहेत असें नाही. भूमि किंवा निसर्ग, म्हणजे शेतजमीन, खाणी, अरण्यें आणि मनुष्यांस स्वतःच्या श्रमावांचून मिळणारी निसर्गाची इतर सर्व देणगी, हा घटक उत्पादनास अर्थातच विशेष आवश्यक आहे. मनुष्य श्रम करण्यास तयार झाला तरी विशिष्ट नैसर्गिक वस्तूंचें साहाय्य घेतल्याशिवाय त्याचे श्रम उत्पादक होऊं शकत नाहीत. केवळ शेख महंमदाप्रमाणें हवेंत मनोराज्य रचल्यास अर्थोत्पादनास त्याची कांहीच मदत होणार नाही. तसेंच भूमीही मनुष्याच्या श्रमाशिवाय असहाय्य आहे. श्रम हा कार्यकर्ता परीस असून त्याच्याच स्पर्शानें जमिनीतील सुपीकता, जलाशयांतील पाणी, खाणींतील द्रव्यें इत्यादि वस्तू उपयुक्त बनून किंवा त्यांच्यांतील उपयुक्तता वाढून मनुष्याच्या सुखवर्धनास ' भूमि ' योग्य होते. तिसरा घटक म्हणजे भाडवल, हा भूमि किंवा श्रम यांप्रमाणे स्वतंत्र नसून त्या दोहोंच्या सहकार्यानें उत्पन्न झालेला आहे. तरी भाडवलाच्या साहाय्यानें श्रमाची उत्पादक शक्ति वाढत असल्यामुळें कारागिरांच्या हत्यारास जे महत्त्व असतें, तसलेंच महत्त्व एकंदर समाजांतील अर्थोत्पादनाच्या दृष्टीनें भाडवलास दिलें पाहिजे. मनुष्यसमाजाची आर्थिक उत्क्रान्ति होत असतां पहिल्या प्रथम मनुष्य स्वतःच्या गरजा भागविण्यास बहुंशी भूमीवरच विसंबून असे म्हणजे शक्य तेवढ्या कमी श्रमानें मिळविलेली कंदमुळें खाऊन किंवा सहज सांपडणाऱ्या पशुपक्ष्यांची शिकार करून तो आपलें पोट भरी व झाडाच्या ढोली, गुहा इत्यादि निसर्गजन्य ठिकाणीं त्यास निवारा मिळे. हळुहळु श्रमानें जास्त उपयुक्त वस्तू मिळविणें शक्य आहे असें त्यास कळून येऊन तो विशेष श्रम करूं लागला; व आपल्या मदतीस पारधीचीं, लढाईचीं, घरबांधणीचीं वगैरे हत्यारें त्यानें जमविलीं. जसजसें संपत्तीचें उत्पादन मोठ्या प्रमाणांत होऊं लागलें तसतसें या हत्यारांचें, म्हणजे भांडवलाचें, महत्त्व वाढत जाऊन शेवटीं सुधारलेल्या राष्ट्रांतील आजकालच्या आर्थिक परिस्थितीस भांडवलशाही असें सार्थ नांव पडलें. कित्येक अर्थशास्त्रज्ञांच्या मतें निसर्गादि तीन घटक एकत्र करून त्यांच्या संघटित सहकार्यानें उत्पादन होत असल्यानें संघटन हाही अर्थोत्पादनाचा एक घटक समजला पाहिजे. परंतु संघटन हा स्वतंत्र घटक नसून तो श्रमाचाच

एक महत्त्वाचा भाग आहे, असें थोड्याशा विचाराअंतीं सहज दिसून येण्यासारखें आहे. वास्तविकपणें, भूमि, श्रम व भांडवल यांमध्येंही इतका स्पष्ट भेद करणें नेहमीं शक्य असतें असें नाहीं. मनुष्यानें मशागत करून जमिनीची सुपीकता वाढविल्यास त्या जमिनीस केवळ निसर्गाची देणगी न म्हणतां श्रमाचा सांठा किंवा भांडवल असेंही म्हटलें पाहिजे. तसेंच मनुष्य श्रम करीत असतां हात, पाय इत्यादि इंद्रियांची म्हणजे निसर्गदत्त वस्तूंचीच, त्यास मदत घ्यावी लागते. अत्यंत परिश्रमानें कार्यक्षम झालेले वैद्य, वकील किंवा कारागीर हे स्वतः मूर्तिमंत भांडवलच होत. तरी संपत्तीचें उत्पादन हा विषय कळण्यास प्रस्तुत वर्गीकरण उपयोगी असल्यामुळें भूमि किंवा निसर्ग, श्रम व भांडवल याच क्रमानें त्याचा विचार करणें बरें.

**१ भूमि अथवा निसर्ग**—मनुष्य अर्थोत्पादनार्थ श्रम करू लागण्यापूर्वी नैसर्गिक परिस्थितीची अनुकूलता, कच्च्या मालाचा पुरवठा, प्रेरक शक्तीची उपलब्धता या सर्व बाबतींत त्यास सृष्टीवर अवलंबून रहावें लागतें. नैसर्गिक परिस्थितींत हवापाणी व प्रदेश यांचा अंतर्भाव होतो. हवेच्या शीतोष्ण गुणावर, पाण्याच्या सोईवर व जमिनीच्या सुपीकतेवर देशामध्यें कोणकोणते पदार्थ उत्पन्न होऊं शकतील हे अवलंबून असतें एवढेंच नव्हे, तर हवापाणी व प्रदेश यांच्या भूगोलिक परिस्थितीचा लोकसंख्येवर व लोकांच्या स्वभावावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. आतां हें खरें कीं, मनुष्याच्या वाढत्या ज्ञानाबरोबर हवापाणी व प्रदेशरचना यांत थोडाफार बदल घडवून आणणें माणसास शक्य होत आहे. निदान नैसर्गिक परिस्थितीस अनुसरून ऐहिक सुखवर्धनाचे आपले मार्ग त्यास बदलतां येऊं लागले आहेत हें खोटें नाहीं. सुएझ किंवा पनामा येथील कालव्यांवरून, मुंबईस समुद्रांत भर टाकून नवीन जमीन अस्तित्वांत आणण्याचें जें काम चाललें आहे त्यावरून आणि सिंध प्रांतांत प्रचंड धरण बांधून जेथें अनेक शतकें एक कणीसही उत्पन्न झालें नाहीं अशा जमिनींतून कापूस, ऊस इत्यादि मूल्यवान् पिकें काढण्याचे जे प्रयत्न सुरू आहेत त्यावरूनही मनुष्यास नैसर्गिक परिस्थिति थोडी फार बदलतां येते हें सहज सिद्ध होईल. परंतु हवेचें उष्णतामान, जमिनीची सुपीकता, जंगलें व खाणी यांतील उपयुक्त वस्तूंची उपलब्धता इत्यादि महत्त्वाच्या बाबतींत मनुष्यांस म्हणण्यासारखा इष्ट फेरबदल घडवून आणतां येत नाहीं. निव्वळ प्रदेशाचा विस्तार घेतला तरी तोही जगांतील एकंदर लोकसंख्येच्या मानानें दिवसानुदिवस अपुरा वाटत आहे. कित्येक बलाढ्य राष्ट्रांस कांहीं काळ इतर रानटी व अर्धवट सुधारलेल्या लोकांचे प्रदेश काबीज करून आपली गरज भागवितां येते हें खरें. तरी सर्व मानवी समाजाच्या दृष्टीनें सुखसोयींचे असे प्रदेश थोडेच आहेत ही गोष्ट नाकबूल करतां यावयाची नाहीं. प्रांताप्रांतांतले किंवा देशांदेशांतले दळणवळणाचे मार्ग बहुंशीं नैसर्गिक सोयीनुसार ठरविलेले अस-

तात. आगगाड्या, आगबोटी, विमानें यांच्या साहाय्यानें दळणवळणाच्या मार्गांतील अडथळे दूर करण्याचे प्रयत्न यशस्वी होण्यास प्रदेशाचा उंचसखलपणा, नदीनाल्यांचे मार्ग, समुद्रांतील वारे, वातावरणांतील हालचाली इत्यादि निसर्गनिर्मित गोष्टींची अनुकूलता असावी लागते. विवक्षित ठिकाणी एखादी वस्तु उत्पन्न होऊं शकत नसेल तर मनुष्य त्या वस्तूसारखी दुसरी वस्तु उत्पन्न करून आपली गरज भागवितो. परंतु या मार्गानेही शेवटी निसर्गाचा आधार घेतल्याशिवाय गत्यतर नसतें. यावरून मनुष्य सर्वस्वी नवीन व स्वतंत्र अशी कोणतीच उपयुक्त वस्तु निर्माण करीत नाही व संपत्तीचें उत्पादन म्हणजे निसर्गदत्त अनेक वस्तूंचें मनुष्यानें आपल्या सुखसोयींसाठी केलेले स्थानांतर व रूपांतर होय असें दिसून येईल.

उत्पादनकार्यार्थ मनुष्यास जी शक्ति उपयोगांत आणावी लागते ती कित्येक वेळा मनुष्याच्या शरीरबळाहून अनेक पटींनी अधीक असते. यास्तव पाहिल्या प्रथम बैल, घोडा, हत्ती इत्यादि माणसाळलेली जनावरें, नंतर वाऱ्याचा किंवा जलप्रवाहाचा वेग आणि अलीकडे पाण्याची किंवा तेलाची वाफ व विजेचा प्रवाह या सर्वांतील प्रेरक शक्तीचा मनुष्य उपयोग करून घेत आला आहे. संपत्तीचें उत्पादन वाढत्या प्रमाणात होऊ लागल्यापासून जनावराची शक्ति अपुरी वाटूं लागली व पवनचक्की, पानचक्की, इत्यादि अर्धनैसर्गिक साधनांचें अवलंबन सुरू झालें. परंतु यांतील प्रेरक सामर्थ्य देखील हळुहळु जरूरीहून कमी भासू लागलें. शिवाय पाणी व वारा याचा प्रवाह अनुकूल नसेल त्याकाळी व त्या ठिकाणी हीं साधनें निरुपयोगी ठरत. वाफ व वीज याची गोष्ट याहून निराळी आहे. त्यांच्यांतील शक्ति जवळजवळ अमर्यादित असून वाटेल त्या वेळेस व हव्या त्या ठिकाणी त्यांचा उपयोग करून घेतां येतो. परंतु वाफ किंवा विजेचा प्रवाह ही तयार करण्यास कोळसा, लोखंड, किंवा मोठे मोठे जलाशय इत्यादि नैसर्गिक गोष्टींची जरूर असते हें विसरतां कामा नये. प्रत्येक देशांत किंवा प्रत्येक प्रांतांत अशा सोई सांपडतात असें नाही.

**१० उतरत्या पैदाशीचा नियम**—जमीन, खाणी, कच्चा माल, प्रेरक शक्ति वगैरे ज्या नैसर्गिक गोष्टींवर संपत्तीचें उत्पादन अवलंबून आहे त्याचा पुरवठा मर्यादित असल्यामुळें संपत्तीच्या उत्पादनासही कांही मर्यादा आहे हें ओघानें प्राप्त होतें. खाणीसारख्या धंद्यांत ही गोष्ट विशेष लवकर अनुभवास येते. उदाहरणार्थ, कोळशाची एखादी खाण कांहीं दिवस उपयोगांत आणल्यावर तिच्यांतील कोळशाचा सांठा हळुहळु कमी होत जातो; व खाण अगदी रिकामी होण्यापूर्वीच कोळसा खोदून वर काढण्यास एवढे श्रम करावे लागतात कीं त्या मानानें त्या कोळशाची उपयुक्तता कमी वाटूं लागते. पशुपक्ष्यांची पारध किंवा मासेमारीचा धंदा यांचा अनुभव अशाच प्रकारचा आहे. एखादें अरण्य किंवा तलाव यांच्यांतील प्राणी मारून मनुष्य ते

आपल्या उपयोगास आणूं लागल्यावर हळूहळू त्यांची संख्या कमी होत जाते एका बाजूनें वाढत्या लोकसंख्येमुळें मनुष्यांची गरज वाढत असतां त्या प्राण्यांची संख्या मात्र उलट बाजूनें कमी होऊं लागल्यानें मनुष्यांस पूर्वी उपयोगांत आणलेले तलाव, खाड्या किंवा अरण्यें ही सोडून दुसऱ्याचा आश्रय करावा लागतो. काही थोड्या प्रमाणांत पशुपक्ष्यांची व माशांची संख्या नैसर्गिक रीतीनें वाढत असते व या निसर्गनियमाचा फायदा घेऊन मनुष्यही त्याची वाढ कृत्रिम रीतीनें जास्त जोरानें करू शकतो. परंतु पुनरुत्पादनाचें हे प्रमाण मनुष्यकृत संहाराच्या मानानें फार कमी असल्यामुळें शिकार व मासेमारी हे धंदे त्यांस लागणाऱ्या श्रमाच्या दृष्टीनें तोट्याचे ठरतात. शेतकीच्या धंद्यांत मात्र निसर्गनियमानुसार होणारें पुनरुत्पादन विशेष उपयोगी पडतें. एकाच जमिनींत वर्षानुवर्ष पिकें काढून मनुष्य आपली उपजीविका करू शकतो व म्हणून शेतीचें उत्पन्न अमर्यादित आहे असें कित्येकांस वाटतें. परंतु शेतीची स्थितीही खाणीचा धंदा व मासेमारी याहून विशेष भिन्न नाही हे थोड्याशा विचाराअंती सहज दिसून येईल. जमिनींत सवर्धक द्रव्याचा जो सांठा आहे तो अपरिमित नसून प्रत्येक पिकाबरोबर त्याच्यांतील थोडथोडा भाग कमी होत असतो. हवा, सूर्यप्रकाश, पाणी इत्यादिकांपासून त्या द्रव्यांचा नवीन पुरवठा जमिनीस मिळतो हे खरें. त्याचप्रमाणें नैसर्गिक किंवा कृत्रिम खतांच्या योगानें मनुष्य आपण होऊन जमिनींतील उत्पादक द्रव्यांचा पुरवठा वाढवूं शकतो. परंतु हीं खतें मिळविणें प्रयासाचें काम असून त्याचाही पुरवठा मर्यादित असल्यानें जमिनीचें उत्पन्न वाढविणें, किंवा कायम ठेवणें, हे काही एका मर्यादेपर्यंतच शक्य असतें.

उदाहरणार्थ, आपण नुकतीच लागवडीस आणलेली एखादी जमीन घेऊं. पहिल्या प्रथम त्या जमिनीचें उत्पन्न दहा मण असल्यास तिच्यावर खोल नांगरट करण्यास पाच रुपये जास्त खर्च केले तर कदाचित् बारा मण उत्पन्न त्या जमिनींत निघेल. पुढे जमिनीवरून पाणी नीट वाहून जाण्याकरितां आणखी पांच रुपये खर्च केले तर उत्पन्न पंधरा मण होईल, व खताकरितां आणखी पाच रुपये घातल्यास वीस मण उत्पन्न होण्यास अडचण पडणार नाही. पण पुढे पाच रुपये किमतीचें अधिक खत घातलें तरी उत्पन्न वीसाहून पंचवीसापेक्षां अधिक मणापर्यंत न वाढतां बहुतेक तेवीस चोवीस मणच होईल. पुढे त्या जमिनीवर असा खर्च करीत राहिल्यास जरी एकंदर उत्पन्नांत वाढ होत राहील तरी ज्या मानानें श्रम व भांडवल यांचा जास्त खर्च होईल त्या प्रमाणांत मात्र उत्पन्न वाढणार नाही. प्रत्येक शेतकऱ्यास ही गोष्ट पूर्णपणें माहीत असते व म्हणून तो एका विवक्षित मर्यादेपेक्षां जास्त श्रम किंवा पैसा एकाच जमिनीवर खर्च करूं इच्छित नाही. कारण तसें करणें त्यास परवडत नाही, म्हणजे ते श्रम व तो पैसा दुसऱ्या एखाद्या जमिनीवर किंवा धंद्यांत खर्च केला तर आपणांस अधिक उत्पन्न येईल असें त्यास वाटतें.

शेतकरी यांच्या या नेहमीच्या अनुभवास अर्थशास्त्रांत उतरत्या पैदाशीचा नियम असें म्हणतात व तो शेतकीशिवाय इतर धंद्यांसही लागू आहे. प्रत्येक धंद्याच्या वाढीत पहिल्या प्रथम जों जों श्रम व भांडवल यांचा जास्त जास्त खर्च करावा तों तों त्या धंद्याचें उत्पन्न खर्चवाढीच्या प्रमाणापेक्षां जास्त प्रमाणानें वाढत जातें. परंतु अशीच खर्चवाढ चालू ठेवल्यास उत्पन्नाच्या वाढीचें प्रमाण मात्र उतरत जातें. शेतकीच्या धंद्यांत ह्या उतरत्या पैदाशीच्या नियमाशिवाय दुसरेही अनेक अडथळे असल्यामुळें हा नियम केवळ शेतकीस मात्र लागू आहे असें कित्येक लोक समजतात. ज्याप्रमाणें कारखान्यांत सर्व जगांतून कच्चा माल, यंत्रें व मजूर गोळा करून त्यांस वाटेल तेव्हा उत्पादनकार्यास लावता येतें तसें जमिनीचें नसून शेतकीचा धंदा हा स्थल व काल या दोहोंनी आधीच मर्यादित असतो. तरी कारखान्यांतील उत्पादकशक्तीपासूनही वाढत्या खर्चानें वाढत्या प्रमाणांत उत्पन्न मिळविणें विवक्षित मर्यादेपर्यंतच शक्य असतें. ही मर्यादा दिसूं लागण्यापूर्वी एका कारखान्यांतील किंवा धंद्यांतील आपलें भांडवल काढून दुसऱ्या धंद्यांत घालण्याचा फायदेशीर मार्ग धंदेवाले स्वीकारतात.

**११ श्रम**—मनुष्यानें आपले इहलोकचें जीवितसाफल्य कसें करून घ्यावें हा प्रश्न क्षणभर बाजूस ठेवला व कोणीकडून तरी त्यानें जीव धरून असावें असें म्हटलें तरी एवढीही गोष्ट करणें श्रम केल्याशिवाय त्यास शक्य नाहीं. रानांतील कंदमुळें खाऊन पोट भरणारास देखील तीं शोधून काढून गोळा करण्याचे श्रम करावे लागतात. मग जी शेतजमीन पिढ्यानुपिढ्या काबाडकष्ट करून मनुष्यांनीं कमाविली व जिच्यांत स्वसुखवर्धनास उपयुक्त असलेलीं अनेक पिकें पेरून ते आपला उदरनिर्वाह करतात, तिच्यातील उत्पादक गुण बहुशः मनुष्यांच्या श्रमावर अवलंबून आहेत हें सांगावयास नको. बिनकमावलेली जमीन, खाणींतील द्रव्यें, किंवा निसर्गनिर्मित मोठमोठीं अरण्यें यांपासून मनुष्यांच्या सुखवर्धनास मदत होण्यास त्यांचें अस्तित्व व त्यांमध्यें असलेला मनुष्याची एखादी गरज भागविण्याचा धर्म ह्यांचा मनुष्याच्या बुद्धीस प्रथम शोध लावावा लागतो. उपयुक्त वस्तूंचें अस्तित्व व त्यांचे गुणविशेष यांची माहिती करून घेतल्यानंतर देखील त्याच्यांतील उपयुक्तता शेवटीं मनुष्याच्या पदरीं पडण्यास अधिक श्रम करावे लागतात. म्हणजे आपणास उपलब्ध असलेल्या सर्व उपयुक्त वस्तू त्यांच्या नैसर्गिक स्वरूपांत जरी अगोदर अस्तित्वांत असल्या तरी त्याचा मनुष्यास उपयोग होण्यास शोधकांचे व अनेक कारागिरांचे श्रम कारणीभूत असतात; आणि याच–म्हणजे निसर्गनिर्मित पदार्थांतील उपयुक्त गुण मनुष्यांस उपलब्ध करून देणें अशा–अर्थानें मनुष्यांचे श्रम संपत्तीचे उत्पादक होत असें आपण म्हणतों. शेतकी, पारध, मासेमारी, खाणीचा धंदा, कच्च्या मालापासून जिन्नस तयार करण्याचे कारखाने, वहातुकीचे धंदे, व्यापार वगैरे बाबतींत मनुष्य

जे श्रम करतो त्यामुळें वस्तूंतील उपयुक्तता वाढत असल्यामुळे त्या सर्वांस उत्पादक धंदे अगर उत्पादक श्रम असें म्हणावें लागतें. शिवाय, उपयुक्त वस्तू म्हणजे केवळ जड पदार्थ नसून वैद्य किंवा वकील यांचा सल्ला, शिपाइ किंवा न्यायाधीश यांची कामगिरी, शिक्षक, कवि व लेखक यांची शिकवणूक, ललितकलाभिज्ञांचे आल्हाद-जनक कार्य, यांस व समाजांतील इतर धंद्यांच्या कामगिऱ्यांसही उपयुक्त वस्तू या नावानें संबोधिलें पाहिजे. श्रमविभागाच्या तत्त्वानुसार समाजांतील शरीरकष्टाचे व बौद्धिक श्रमाचे निरनिराळे धंदे लोक करीत असतां त्या सर्वांस उत्पादक धंदे असें म्हणणें योग्य आहे. ज्याप्रमाणे शरीराचे निरनिराळे अवयव आपापलें काम करीत असतां त्यांत उच्चनीच भाव नसतो त्याचप्रमाणे समाजांतील सर्व प्रकारचे उत्पादक श्रम समाजधारणेस सारखेच महत्त्वाचे समजले पाहिजेत.

मनुष्य उत्पादक श्रम करण्यास तयार होतो तो केवळ आपली निसर्गदत्त शक्ति सहज चालवून पहावी या कुतूहलबुद्धीने नसून आपला चरितार्थ योग्य रीतीनें चालण्यास कांहीं तरी खटपट करणें जरूर आहे ह्या जाणीवेमुळेच होय. जे श्रम करमणुकीकरितां केले असतां त्रासदायक न होतां उलट आल्हादजनक वाटतात, तेच श्रम संपत्त्युत्पादनाचें अगर चरितार्थाचें साधन म्हणून अंगिकारल्यास मनुष्यास कंटाळवाणे आणि त्याज्य वाटूं लागतात असें आपण नेहमीं पाहतो. श्रम केल्या-शिवाय पोट भरणें शक्य नाहीं ही साधी गोष्ट मजुरांच्या ज्या हितचिंतकास पटते ते त्यांचें काम शक्य तितकें आल्हादजनक करण्याचा प्रयत्न करीत असतात; व अशा लोकांच्या मदतीनें मजुरांची स्थिति अनेक बाबतींत सुधारतही आहे. तरी श्रम हे उपयुक्त वस्तु मिळविण्याचें एक साधन असल्यामुळे खेळांसारख्या स्वतःच उपयुक्त वस्तु म्हणून मानल्या जाणाऱ्या व्यवसायाप्रमाणे ते सर्वस्वी आल्हादजनक होऊं शकतील अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय.

मनुष्याच्या उत्पादक शक्तीस त्रास सोसण्याचें त्याचें परिमित सामर्थ्य ही एकच मर्यादा नसून त्याच्या इहलोकच्या आयुष्याची भंगुरता हाही मोठा अडथळा आहे. दिवसांतून कांहीं तास, वर्षांतून कांहीं दिवस व आयुष्याचीं कांहीं वर्षे इतका काळच मनुष्यास उत्पादक कार्यांत खर्च करतां येतो. म्हणून ज्या राष्ट्रास आपल्या संपत्तीची समाधानकारक वाढ व्हावी असें वाटत असेल त्यांना आपले घटक अर्थोत्पादनास सर्वथैव कार्यक्षम कसे होतील याची काळजी वहावी लागते. सध्यांचें यांत्रिक युग सुरू होण्यापूर्वी स्वतःच्या हिंमतीवर धंदा करणारे कारागीर जवळ अनेक शिष्य बाळगून हलहलू आपलें अनुभवजन्य ज्ञान त्यास शिकवीत असत. लहान वयांतच उत्पादक कलांचें असें शिक्षण मिळाल्यानें हे शिष्य पुढें कर्तृत्त्ववान् बनून राष्ट्राच्या संपत्तींत भर टाकीत. अलीकडे शिष्यत्वाची ही पद्धति कांहींशी अव्यवहार्य झाली आहे, तरी ज्या मार्गांनी संपत्ति उत्पन्न करून पुढें

आपला चरितार्थ चालवावयाचा त्यांचें तरुण पिढीस बालवयांत शिक्षण देणें आजही अवश्य आहे. म्हणून धंदेशिक्षण व यांत्रिक शिक्षण याजबद्दल सर्व सुधारलेली राष्ट्र अत्यंत आस्था बाळगतात व भांडवलवाले आणि सरकार यांच्या सहकार्यानें राष्ट्राचें एकंदर मनुष्यबल जास्तीत जास्त उत्पादक करण्याची व्यवस्था होते.

**११ भांडवल**— अर्थोत्पादनार्थ मनुष्य श्रम करूं लागला म्हणजे त्यास निसर्गदत्त किंवा त्याच्याच श्रमानें पूर्वी तयार करून ठेवलेल्या अशा दुसऱ्या कांही वस्तूंचे साहाय्य घ्यावें लागतें. अगदी रानटी अवस्थेंत केव्हां तरी अशा साहाय्यभूत वस्तूशिवाय माणसास आपली उपजीविका करतां येत असली पाहिजे हे खरें; परंतु लवकरच त्यास तसें करणें अवघड किंबहुना अशक्य वाटू लागून दगड, गारगोटी, हाडें इत्यादिकांची शस्त्रास्त्रें करून त्याच्या साहाय्यानें तो पारध करूं लागला. पुढें कालांतरानें त्यानें शेतकीचा धंदा आरंभिल्यावर या साहाय्यभूत पूर्वकालीन संपत्तीचें त्यास विशेष महत्त्व भासूं लागलें. नांगर, बैल, वगैरे शेतकीची साधनें, रहावयाची झोंपडी इत्यादिकांशिवाय त्याचें चालेनासें झालें. हळूहळू शेतकीशिवाय इतर धंद्यांचा समाजांत उद्भव होऊन त्यांस आपापलें उत्पादनाचें कार्य करण्यास कांही काही वस्तूंचें साहाय्य घेणें जरूर वाटूं लागलें. विणकरास माग, गवंड्यास करणी, सुतारास करवत याप्रमाणें प्रत्येक धंद्यांत एक किंवा अनेक हत्यारें लागू लागली. पुढें स्वतंत्र कारागिरांकडून संपत्तीचें उत्पादन होण्याची पद्धति मोडून अनेक कारागीर एका मालकाच्या हुकुमतीखाली काम करू लागल्यावर त्यांस हत्यारें व कच्चा माल पुरविण्याची जबाबदारी त्या मालकावर पडून, कारागिराच्या उत्पादक कार्याची व्याप्ति केवळ श्रमाइतकीच मर्यादित झाली. अशा रीतीनें श्रम व भांडवल यांची फारकत झाली.

यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें संपत्तीची उत्पत्ति प्रचंड प्रमाणावर व संकलित रीतीनें सुरू झाल्यापासून श्रम व भांडवल यांमधील अंतर दररोज द्विगुणित होऊं लागलें. उद्योगधंद्यांत अत्यंत प्रगति झालेल्या राष्ट्रांत भांडवलवाल्यांनी स्वतःची यंत्रें, कच्चा माल व इतर आवश्यक वस्तू यांच्या साहाय्यानें आणि कारागिरांच्या शारीरिक व बौद्धिक श्रमाच्या मदतीनें संपत्तीचें म्हणजे उपयुक्त वस्तूंचें उत्पादन करावें अशी आजकाल स्थिति आहे. केवळ श्रमकरी मजूरवर्ग हा यंत्रें, कच्चा माल वगैरे उत्पादनास लागणारा आवश्यक संच ज्यांच्या मालकीचा आहे अशा भांडवलवाल्याचा केवळ दास बनला आहे. हल्लींच्या सामाजिक घटनेस भांडवलशाही म्हणतात त्याचें मुख्य कारण हेंच होय. परंतु भांडवलवाल्यांची सामाजिक सत्ता ही मुख्यतः भांडवलाच्या आर्थिक उपयुक्ततेवर अवलंबून आहे हे विसरतां कामा नये. एखाद्या सुतारास अगर गवंड्यास हत्यारांशिवाय काम करावयास सांगितलें तर तो जितक्या लवकर व सुबक रीतीनें काम करील त्यापेक्षा त्यास

एक दोन चांगली उपकरणें दिल्यास तो अधिक सुंदर काम, व तेंही झपाट्यानें, करूं शकेल. त्याच न्यायानें समाजाची उत्पादनाची हत्यारें म्हणजे भांडवल, हे मनुष्याचे श्रम अधिक उत्पादक करण्यास मदत करतें. ज्या राष्ट्रास आपली सांपत्तिक स्थिति सुधारावी अशी महत्त्वाकांक्षा असेल त्याचें भांडवलाच्या मुबलक पुरवठ्याशिवाय मुळीच चालणार नाहीं. आता भांडवल, हत्यारें किंवा यंत्र हीं आकाशांतून पडत नसून मनुष्यानेंच आपले श्रम निसर्गाच्या साहाय्यानें उत्पादन-कार्यास लावून झालेल्या उत्पत्तींत थोडथोडी बचत करून जमविलेलें असतें. मनुष्यांच्या श्रमानें उत्पन्न झालेलें हें भांडवल त्याचेच श्रम अधिक उत्पादक होण्यास त्यास मदत करतें हें आर्थिक दृष्ट्या भांडवलाचें मुख्य महत्त्व आहे. भांडवलाची मालकी खाजगी व्यक्तीकडे अगर एकंदर समाजाकडे असावी हा नीतिशास्त्राचा किंवा संकलित समाजशास्त्राचा प्रश्न असून अर्थशास्त्रांत प्रत्यक्षपणें त्याचा फारसा विचार करावा लागत नाहीं.

**१३ भांडवलाचे प्रकार**--अर्थोत्पादनास साहाय्यभूत होणाऱ्या मनुष्य-निर्मित वस्तू हीच भांडवलाची व्याख्या अर्थशास्त्रास अभिमत आहे. तरी नेहमीच्या व्यवहारांत व कित्येक वेळा आर्थिक विषयाचा ऊहापोह होत असतांनाही भांडवल हा शब्द दुसऱ्या कांहीं अर्थांनीं वापरण्यात येतो, त्यांबद्दल येथें थोडीशी फोड करणें जरूर आहे. अगदीं सहजगत्या बोलणारा मनुष्य भांडवल म्हणजे ज्या संपत्तीपासून तिचा मालक स्वस्थ बसून आपणांस कांहीं तरी उत्पन्न पैशाच्या रूपानें मिळत राहील अशी अपेक्षा करतो ती संपत्ति असें समजतो. सहकारी व समाईक भांड-वलाच्या साहाय्यानें अर्थोत्पादन करण्याची पद्धति अलीकडे फार मोठ्या प्रमाणावर चालू असल्यामुळें भांडवलाच्या मालकास स्वस्थ बसून उत्पन्न मिळविण्याची चांगली सोय झालेली आहे. व्याजी लाविलेल्या अगर धंद्यात घातलेल्या अशा भांडवलास कांहीं ग्रंथकार किफायतदार भांडवल असें म्हणतात. परंतु भांडवलाची ही द्रव्यप्रधान कल्पना सोडून देऊन ऐनाजिनसी भांडवल म्हणजे एकंदर समाजाची उत्पादनाचीं साधनें घेतलीं तरी त्यांमध्यें दोन प्रकार दिसून येतात. कांहीं भांडवल एक वेळ उपयोगांत आणल्यानें त्याचा नाश होऊन उत्पादनकार्यास तें पुन्हां उपयोगी पडूं शकत नाहीं. शेतांत घातलेलें खत व पेरलेलें बीं, किंवा वाफेच्या यंत्रांत जाळलेला कोळसा ह्यांचा एकएकदां उपयोग केला कीं उत्पाद-नाचे घटक या नात्यानें त्यांचा शेवट झाला. अशा भांडवलास खेळतें भांडवल म्हणण्याचा प्रघात आहे. दुसरे कांहीं जिन्नस व हत्यारें उत्पादनकार्यास अनेक वेळां उपयोगी पडून हळुहळु नाश पावतात. गवंड्याची करणी, चांभाराची आरी इत्यादि लहान हत्यारांपासून तों प्रचंड कारखान्यांतील अजस्र व नाजुक यंत्रांपर्यंत सर्व उत्पादनाचीं उपकरणें या वर्गांत मोडतात. अशा अनेक वेळां उपयोगी पड-

णाऱ्या भांडवलास स्थावर भांडवल असे म्हणतात. साधारणपणे अशा भांडवलाचा उपयोग जितक्या जास्त वेळां होण्याची शक्यता असेल त्या मानानें ते तयार करण्यास खर्चही अधिक लागतो. आगगाडीचा रस्ता एकदां तयार झाला म्हणजे तो वर्षानुवर्ष थोड्याफार दुरुस्तीनें तसाच चालूं शकतो असें आपण पाहतो. परंतु तो तयार करण्यास सुरुवातीस बराच खर्च येतो हे विसरता कामा नये. हल्लींच्या काळी यांत्रिक सुधारणांचा झपाट्यानें प्रसार होत असल्यामुळे स्थावर भांडवल त्यांतील उत्पादनपद्धतींत सुधारणा होऊन निरुपयोगी ठरण्याची भीति असते. एखाद्या धंद्यात गुंतविलेल्या भांडवलाचा जो भाग पैशाच्या रूपानें नेहमी वहात राहतो व जो त्या धंद्याच्या मालकास इष्ट काळीं इष्ट कार्यास लावता येतो त्यास वहातें किंवा हुकुमी भांडवल म्हणतात. परंतु हे सर्व भाषाप्रचार भांडवलाच्या आर्थिक कामगिरीच्या दृष्टीनें विशेषसे महत्त्वाचे नाहीत. मनुष्यानें आपल्या श्रमाच्या उत्पत्तीतून बचत करून साठविलेल्या ज्या ज्या उपयुक्त वस्तूंची त्यास उत्पादनकार्यास मदत होते त्या सर्वांस भांडवल या एकाच नावानें अर्थशास्त्रज्ञ संबोधतात.

**१४ उत्पादनाचें नियमन**—भूमि, श्रम व भांडवल या तिन्हींच्या संकलित कार्यानें उत्पादन होत असून त्यांपैकीं एकट्याच्यानेंच अर्थोत्पत्ति होणें शक्य नाहीं हे उत्पादनाच्या घटकांचें वर जें विवेचन केलें त्यावरून दिसून येईल. जोंपर्यंत या तिन्ही घटकांची मालकी एकाच व्यक्तीकडे असते तोंपर्यंत त्यांचें सहकार्य कसें घडवून आणावें याबद्दल विशेष अडचण पडत नाहीं. स्वतःच्या जमिनीवर, स्वतःच्या जनावरांच्या व आऊतांच्या साहाय्यानें आपल्या कुटुंबासह शेतकी करणारा मिरासदार हा अगदीं स्वतंत्र उत्पादक असतो, व उत्पादनाचे घटक एकत्र आणण्याचें कामही तो सहज करूं शकतो. परंतु केव्हांही झालें तरी एवढी स्वतंत्रता फारच थोड्यांस लाभत असून आजकाल तर भूमि, श्रम व भांडवल ही एकमेकांपासून जवळ जवळ पूर्णपणें अलग झालेलीं आहेत. निदानपक्षीं ज्या मोठ्या प्रमाणांत संपत्तीचें अलीकडे उत्पादन होतें त्या प्रमाणांत तरी या तिन्ही घटकांचा एकत्र सहवास क्वचितच आढळून येतो; व ते सर्व एका ठिकाणीं जमवून त्यांकडून उत्पादनाचें कार्य घडवून आणणें ही अत्यंत महत्त्वाची कामगिरी होऊन बसते. स्वतःजवळ धडपणें एकही घटक नसतां उत्पादनाची सर्व सामुग्री भाड्यानें मिळवून प्रचंड संपत्तीचें उत्पादन करण्यास धजणें हे धाडसाचें व कौशल्याचें काम असून ते योग्यप्रकारें करणारे कर्तृत्ववान् योजक फार थोडे सांपडतात. एखादी वस्तु किती किमतीस किती प्रमाणांत विकली जाईल याचा अंदाज करून व त्या मानानें ती वस्तु उत्पन्न करण्यास लागणारा खर्च वाजवी होईल किंवा नाहीं याची अटकळ बांधून योजक उत्पादक कार्यास सुरुवात करतो. उत्पन्न केलेल्या वस्तूंच्या विक्रीपासून होणारें सर्व उत्पन्न प्रथमतः त्याच्याच हातात पडतें; व मग तो तें

घेऊन जमिनीचें भाडें, भांडवलाचें व्याज, आणि मजुराचें वेतन या स्वरूपात तें इतर घटकांत वांटून देतो. कित्येकजण उत्पादनास लागणाऱ्या खर्चावर म्हणजे वरील तिन्ही घटकांच्या श्रमाबद्दल त्यांस मिळालेल्या एकंदर मोबदल्यावर वस्तूंची किंमत अवलंबून असते असें समजतात, याचें कारण इतर घटकांस विक्रीच्या पैशांतील त्यांचा भाग वांटून देण्याच्या योजकाच्या कामगिरीवरून वर वर पहाणारास तसा भास होतो, हे होय. वास्तविकपणें मूल्य हें केवळ उत्पत्ति-श्रमावर अवलंबून नाहीं याबद्दल मागें विचार केलेला आहे. तरी व्यवहारात वस्तूंची किंमत बहुतेक वेळा उत्पादनाच्या खर्चाहून, अगर मूळ किंमतीहून, विशेष अधिक नसते असें आपण पाहतो. याचें कारण मात्र उत्पत्तीच्या श्रमावरून विक्रीची किंमत ठरते हें नसून स्पर्धेमुळें या दोहोंतील अंतर शक्य तितकें कमी होत असतें हें होय. कधीं कधीं तर या दोहोंत मुळीच तफावत न राहून स्वतः योजकास कांहीं फायदा होत नाहीं.

स्वतंत्र उत्पादकांच्या ऐवजीं धाडसी योजकाच्या हातीं संपत्तीचें उत्पादन गेल्यामुळें समाजहिताच्या दृष्टीनें एक विशेष हानी झाली आहे. व्यक्ति आणि कुटुंबें केवळ स्वतःच्या गरजा भागविण्यापुरतें अर्थोत्पादन करीत असतां उपभोग व उत्पादन याचा आपोआप मेळ बसे. पुढें प्रत्येक गांवात निरनिराळे कारागीर स्वतंत्र धंदे करूं लागल्यावर देखील गिऱ्हाइक व उत्पादक यांतील निकट संबंध कायम राहिला. परंतु जेव्हां अर्थोत्पादन केवळ गावातील उपभोक्त्याकरिता न होता स्वदेशांतील व परदेशांतील असंख्य गिऱ्हाइकांकरितां होऊं लागलें, तेव्हां मात्र गिऱ्हाइकांच्या गरजा काय व किती आहेत याची माहिती उत्पादकास केवळ अप्रत्यक्ष-पणें व ठोकळ मानानें मिळूं लागली. तरी देखील प्रत्येक गावांतील किंवा प्रांतांतील कारागिरांनीं आपले गट किंवा श्रेणी करून उत्पादन व उपभोग यामधील अंतर शक्य तितकें कमी करण्याचा प्रयत्न केला. सध्यांचें यांत्रिक युग सुरू होऊन प्रचंड प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन होऊं लागल्यापासून मात्र एकंदर स्थिति पालटली. एका बाजूनें संपत्तीचें उत्पादन व विनिमय हीं सर्व जगभर पसरत असतां उपभोग व उत्पादन याची तोंडमिळवणी घडवून आणणारे जुने निर्बंध मात्र सुटत चालले. असें होण्यास मुख्य कारण म्हणजे पाश्चात्य देशांत उत्पादनाची हल्लींची पद्धत सुरू झाली त्यावेळीं असलेलें उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या मताचें प्राबल्य हें होय. व्यक्तिमात्रास उत्पादन व उपभोग या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य ठेविल्यास एकंदर समाजांतील उत्पादन व उपभोग यांचा आपोआप मेळ बसतो, असें हे अर्थशास्त्रज्ञ म्हणत. त्यांच्या मतें, 'एखाद्या वस्तूचा पुरवठा जरूरीपेक्षां अधिक झाल्यास तिची किंमत कमी होऊन ती उत्पन्न करणाऱ्या योजकास, व त्या धंद्यांत काम करणाऱ्या तिन्ही घटकांस, कमी वेतन मिळूं लागेल, असें झाल्यानें त्या वस्तूच्या

ऐवजीं दुसरी एखादी वस्तु उत्पन्न करण्याकडे ते आपापले श्रम व भांडवल खर्च करतील. उलटपक्षीं एखाद्या वस्तूचें उत्पादन जरूरीपेक्षां कमी होऊं लागल्यास त्या वस्तूची किंमत वाढून त्यांतील उत्पादकांस जास्त कमाई होऊं लागेल; व त्यांच्यासारखी कमाई आपणांस व्हावी ह्या हेतूनें दुसरे योजक ती वस्तु उत्पन्न करण्याच्या धंद्यात शिरतील व त्यामुळें चढाओढ उत्पन्न होऊन तिची किंमत कमी होत जाईल.' मागणी व पुरवठा यांच्या परस्परांवर होणाऱ्या प्रतिक्रियेमुळें उत्पादन व उपभोग यांचा मेळ बसण्यास मदत होते ही गोष्ट खरी आहे. परंतु ही प्रतिक्रिया अप्रतिहत रीतीनें घडून येण्यास मागणींत होणाऱ्या फेरबदलाबरोबर पुरवठ्यांतही सहज व तावडतोब बदल व्हावयास पाहिजे. परंतु भांडवल व मजूर हे सहजरीतीनें एक धंदा सोडून दुसऱ्या धंद्यांत जाऊ शकत नाहींत हे प्रत्येकास ठाऊक आहे. शिवाय ज्या मागणीमुळें पुरवठा कमी जास्त व्हावयाचा ती मागणी पुष्कळ वेळां खरी नसून, घाऊक व्यापारी किंवा निव्वळ सट्टेबाज लोक यांनीं केलेली असते. तत्वतः उत्पादकांत पूर्ण चढाओढ असल्यास मागणी व पुरवठा यांचा आपोआप मेळ बसतो हे खरं असलें तरी व्यवहारांत ही गोष्ट घडून येणें फार दुरापास्त असते. शिवाय ज्या स्पर्धेवर मागणी व पुरवठा यांची अनिरुद्ध प्रतिक्रिया अवलंबून आहे तीही समाजास सर्वथैव हितावह आहे किंवा नाहीं, याबद्दल बराच मतभेद असून आजकाल अनेक बाबतींत स्वैर स्पर्धेवर नियंत्रण घालणें समाजहितास पोषक समजलें जात आहे. औद्योगिक दृष्ट्या अत्यंत प्रगमनशील अशा कित्येक राष्ट्रांत अनेक महत्त्वाच्या धंद्यांत स्पर्धा तीव्र झाल्यामुळें परस्पर चढाओढ करणारे धंदेवाले आपापसांत कट करून स्वतःच्या धंद्यास मक्तेदारीचें स्वरूप देतात. कोणत्याही धंद्यांत एकदां मक्तेदारी स्थापन झाली म्हणजे मागणी किंवा उपभोग यांच्या अनुरोधानें उत्पादनाचें परिमाण न ठरतां मक्तेदारांस जितका पुरवठा केल्यामुळें निव्वळ उत्पन्न अधिक पडेल तितकाच पुरवठा केला जातो. ज्या राष्ट्रांत व्यक्तिस्वातंत्र्य व विनिमयस्वातंत्र्य यांचा पूर्ण अंमल बसला आहे असें आपण समजतो, तेथें उत्पादन व उपभोग यांचा मेळ बसणें अशक्यप्राय झालें आहे एवढेंच नव्हे, तर दर पांच दहा वर्षांनीं या दोहोंमधील प्रमाण पार बिघडून जाऊन देशाच्या आर्थिक वातावरणांत तुफान होणें ही गोष्ट अपरिहार्य आहे, असा सार्वत्रिक समज आहे.

**१५ आर्थिक अरिष्टें**—ज्यांना आपल्या आवश्यक गरजाही नीटपणें भागवितां येत नाहींत अशा लोकांची संख्या व मनुष्याच्या गरजांचा अपरिमितपणाचा गुण ध्यानांत घेतल्यास समाजांतील उत्पादनाचा कधींच अतिरेक होऊं शकणार नाहीं असें सकृद्दर्शनीं वाटणें साहजिक आहे. सर्व उत्पादकांची नेहमीची खटपट पाहिली तर तीही बहुतेक जास्तींत जास्त माल उत्पन्न करून तो गिऱ्हाइकांमध्यें खपवावा अशी असते. तरी वारंवार आज या देशांत तर उद्यां त्या देशांत वस्तूंच्या

उत्पादनाचा अतिरेक होऊन त्याचा उठाव होत नाहीसा झाल्याची ओरड आपण ऐकतों. उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या मतें ही ओरड खरी नसून कांहीं थोड्या वस्तूंचें उत्पादन तात्कालिक गरजाच्या मानानें अधिक होऊन त्या धंद्यांतील उत्पादक सर्वच वस्तूंचें उत्पादन प्रमाणाबाहेर झालें असा भ्रम करतात. शिवाय कांहीं वस्तूंचा पुरवठा फाजील झाला असल्यास त्यास अत्यंत सोपा उपाय म्हणजे इतर सर्व वस्तूंचा पुरवठा त्याच प्रमाणांत वाढवावा हा होय, असें ते सुचवीत. कारण एकंदर उत्पन्न केलेल्या वस्तूंची संख्या व त्यांचे प्रकार हीं जितकीं जास्त तितका त्या वस्तू सहज विकल्या जाण्याचा संभव अधिक असा 'बाजाराचा नियम' आहे, असें ते प्रतिपादन करीत.

विनिमय ऐनजिनसी होत आहे अशी क्षणभर कल्पना केल्यास हा नियम कळण्यास अगदीं सोपा आहे. विनिमयोत्सुक व्यक्तीजवळ परस्परास देण्यासाठीं जितक्या जास्त प्रकारच्या व जास्त वस्तू असतील तितकी त्यामधील देवघेव सोपी होईल. शहरांतून अनेक प्रकारच्या कापडाचा मुबलक पुरवठा घेऊन दोन व्यापारी निरनिराळ्या खेडेगावांत गेले असें आपण समजूं. एका गावांत अवर्षणामुळें लोकांजवळ धान्याचा पुरवठा कमी असल्यास त्या गावांत गेलेल्या व्यापाऱ्याचा माल खपणार नाहीं. आपण बाजवीपेक्षां अधिक माल आणला, आपल्या धंद्यांत 'उत्पादनाचा अतिरेक' झाला, अशी तो सहजच तक्रार करील. उलट, दुसऱ्या गावांतील लोक पाऊसपाणी चांगलें झाल्यामुळें अनेक प्रकारच्या शेतीच्या उत्पन्नानें समृद्ध असल्यास तेथें गेलेल्या व्यापाऱ्याचा माल हां हां म्हणतां उठेल. या उदाहरणावरून असें दिसून येईल कीं, प्रत्येक धंद्याच्या गिऱ्हाइकांचे वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य वाढण्याकरितां ते स्वतः उत्पन्न करीत असलेल्या वस्तूंचा त्याजवळ भरपूर सांठा असणें जरूर आहे. प्रत्येक वस्तूचें भरपूर उत्पादन होऊन त्यांत अनेक तऱ्हांच्या वस्तू निर्माण झाल्यास विनिमयाची सुलभता व विस्तार हीं सहजच वाढतात. आतां विनिमय नेहमीप्रमाणें पैशाच्या साहाय्यानें होतो असें धरून चाललें तरी तत्त्वतः वरील स्थितींत फारसा भेद होत नाहीं. इतर वस्तूंच्या उत्पादनांत होणाऱ्या वाढीच्या मानानें पैशाचा पुरवठा वाढत गेल्यास सर्व वस्तू व पैसा यांचें परस्परमूल्य कायमच राहतें.

समाजांतील सध्यांच्या आर्थिक घटनेनुसार सर्व वस्तूंच्या उत्पादनांत सारखी वाढ घडवून आणणें प्रायः अशक्य असतें. अंतर्राष्ट्रीय व्यापारावर अनेक नियंत्रणें असल्यामुळें एका देशांत एखाद्या वस्तूची उत्पत्ति कमीजास्त झाल्यास दुसऱ्या देशांतील बाजारांत तिची तावडतोब खरेदी विक्री करतां येत नाहीं. म्हणून उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांचा वर उल्लेखिलेला बाजारांतील नियम समाजांत घडून येणाऱ्या व्यापारी घडामोडींस विशेष उपयोगी पडत नाहीं. एखादा धंदा

विशेष किफायतशीर आहे असें दिसू लागताच जास्त फायदा मिळण्याच्या आशेनें लोक आपापले पैसे भराभर त्या धंद्यांत गुंतवितात व त्यामुळें पदार्थांच्या किमती व मजुरीचें वेतन ही वाढतात. परंतु लवकरच आपण वाजवीपेक्षां फाजील पैसे धंद्यात गुंतविले व मजुरांचे श्रम आणि इतर उत्पादनास आवश्यक असलेले पदार्थ यांस अवास्तव किंमत दिली असें त्यास दिसून येतें; कारण ज्या उपभोक्त्यांच्या वाढत्या मागणीवर विसंबून या धंदेवाल्यांनी आपला चढता डोलारा उभारलेला असतो त्याच्या गरजा लवकरच भागून धंदेवाल्यांच्या अदूरदर्शीपणामुळे पुष्कळ पुरवठा बाजारात पडून राहतो. मग मागणीच्या मानानें पुरवठ्यात फार वाढ झाल्यानें साहजिकच उपयुक्तता कमी व्हावयास लागून वस्तूंच्या किमती उत्पादनाच्या मूल्याहूनही कमी कराव्या लागतात. सर्वच व्यवहार विपरीत होऊन आतबट्ट्याचा व्यापार करावा लागतो. एकामागून एक अनेक धंदेवाले आपलें दिवाळें काढून समाजाच्या आर्थिक वातावरणात खळबळ उडवून देतात. हे तुफान निघून गेल्यावर देखील कित्येक दिवस लोक आपलें भांडवल धंद्यात गुंतविण्यास धजत नाहीत. परंतु हळूहळू या अरिष्टाची आठवण मागे पडून नित्याचे व्यापारी व्यवहार सुरू होतात, आणि वाढत्या फायद्याच्या आशेने पुन्हा उत्पादनाचा अतिरेक होण्याची वेळ येईपर्यंत सर्व सुरळीत चालतें.

तेजी, तुफान, व मंदी असें राष्ट्रांच्या आर्थिक वातावरणात सारखें परिवर्तन होत असतें. गेल्या शेदीडशे वर्षात जवळ जवळ दहा दहा वर्षांच्या अंतरानें असलें एखादें तुफान घडून येत असल्याचा साधारण अनुभव आहे. या नियमितपणाचें कारण सूर्यावरील डाग हें असावें असें कित्येक ग्रंथकार प्रतिपादन करितात. परंतु सूर्यावरील डागांचा पावसावर व पावसाचा व्यापारी आरोग्यावर निश्चितपणें किती परिणाम होतो ह्याबद्दल शास्त्रीय दृष्ट्या समाधानकारक निर्णय लागलेला नाही. त्याचप्रमाणें यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें दिवसानुदिवस संपत्तीच्या उत्पादनात होत असलेल्या वाढीच्या मानानें मजूर वर्गाची कमाई, किंवा उपयुक्त वस्तू विकत घेण्याचें त्याचें सामर्थ्य, वाढत नसल्यामुळें उत्पादन व उपभोग याचा मेळ बसत नाही, असेंही काही अर्थशास्त्रज्ञांचें, विशेषतः समाजसत्तावाद्यांचें, म्हणणें असतें. थोडा दूरवर विचार केल्यास व्यापारी अरिष्टाची ही मीमांसा बरोबर नाही असें दिसून येईल. एकतर मजुरीचे दर कमी असणें आणि आर्थिक वातावरणांतील तुफानें यांत प्रत्यक्ष संबंध मुळीच दिसून येत नाही; उलट वर सांगितल्याप्रमाणें तुफानांपूर्वी मजुरीचे दर वाढते असतात. प्रस्तुत मीमांसेवरून असें एक अनुमान निघतें कीं उत्पादनाची वाढ व त्यामानानें उपभोग-सामर्थ्याचा संकोच यांमुळें उत्पादन व उपभोग यांतील विषमता सारखी वाढत राहून आर्थिक अरिष्टें वारंवार येऊं लागतील. हा निष्कर्ष वस्तुस्थितीस सोडून आहे हे सांगावयास नको.

क्वचित् प्रसंगी पडणारे मोठमोठे दुष्काळ सोडून दिले तर एकदरींत आर्थिक वातावरणांतील हीं तुफानें विवक्षित वेळीं निरनिराळ्या वस्तूंस असलेल्या मागणीच्या मानानें पुरवठा किंवा उत्पादन फाजील झाल्यामुळें घडून येतात असें म्हटलें पाहिजे. आतां सर्व वस्तूंचें उत्पादन व उपभोग हीं समतोल असून विनिमयाचें साधन म्हणजे पैसा याच्या पुरवठ्यांत फेरबदल झाल्यामुळेही सर्व आर्थिक व्यवहाराचा घोटाळा उडून कांहीं धंद्यांत अनर्थ होतो. परंतु सद्यःस्थितीच्या उत्पादनाचा विचार करीत असतां कधींकधीं अनियंत्रित चढाओढीच्या तत्त्वानुसार उत्पन्न केलेल्या वस्तूंचा अतिरेक होऊन पुन्हा मागणी व पुरवठा, उपभोग व उत्पादन, यांचा मेळ बसण्यापूर्वी समाजाच्या आर्थिक घटनेस अनेक धक्के सोसावे लागतात व कित्येक लहानमहान धंदेवाले रसातळास पोहोचतात, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. शिवाय, उद्योगधंद्यांची वाढ होण्यास स्वैर स्पर्धा हें एकच कारण आहे असें नाहीं. श्रमविभाग, संकलन व सहकार्य ह्या तत्त्वांचा अर्वाचीन उत्पादनपद्धतींत समावेश झाला असून त्याबद्दल माहिती करून घेणें आपणांस जरूर आहे.

१६ **श्रमविभाग**—सुपुत्पादनार्थ मनुष्य श्रम करीत असतां त्यास जे क्रियक 'व्यापार' करावे लागतात त्यांपैकीं प्रत्येक व्यापार पृथक् होऊन तो निरनिराळ्या माणसाकडून केला जाणें, यास श्रमविभाग म्हणतात. अगदीं प्राचीन काळापासून मनुष्यसमाजात या तत्त्वाचें पालन केलें जात आहे. एवढेंच नव्हे, तर कांहीं कांहीं पशुपक्ष्यांचें आचरणही या तत्त्वास अनुसरून होतें, हें आपण पाहतो. समाजांतील निरनिराळे धंदे व जाती यांचा उगम मुख्यतः श्रमविभागाच्या प्रसारामुळें झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें एकाच धंद्यांत अगर जातींत निरनिराळे भेद होऊन त्यांचे गण, श्रेणी किंवा पोटजाती बनूं लागल्या, ही गोष्ट श्रमविभागाच्या विस्तारांचेंच द्योतक होय. परंतु यंत्रांच्या साहाय्यानें मोठ्या प्रमाणावर वस्तू उत्पन्न व्हावयास लागल्यापासून एकच वस्तु तयार करण्यास ज्या अनेक हालचाली कराव्या लागतात, त्यांपैकीं एकएक निराळ्या माणसास वांटून देतां येऊं लागली. उदाहरणार्थ, चाकूच्या कारखान्यात पात्यास टोक करण्याचें काम वर्षानुवर्ष एकाच मनुष्यास करीत राहणें शक्य झालें. पूर्वीच्या सामाजिक श्रमविभागाशीं तुलना केली असतां हा यांत्रिक श्रमविभाग झाला असें म्हटलें असतां चालेल. किंबहुना पूर्वीच्या जाती अगर धंदे यांतील भेदांस, किंवा आजकाल निरनिराळे देश आपापल्या सामुग्रीप्रमाणें विशिष्ट वस्तू उत्पादन करितात त्यामुळें झालेल्या भेदांसही श्रमविभाग न म्हणतां श्रमाचा वैशिष्ट्यभेद अगर स्थलभेद असेंच म्हटलें पाहिजे. यांत्रिक श्रमविभाग पूर्णपणें फायदेशीर होण्यास अगदीं बारीकसारीक हालचालीस देखील स्वतंत्र मनुष्य नेमावयास पाहिजे व असें करावयाचें म्हणजे कारखान्यांत शेंकडों मजूर कामावर लावणें प्राप्त आहे. उत्पन्न

झालेल्या वस्तूंस असलेली मागणी जोंपर्यंत मर्यादित स्वरूपाची असते तोपर्यंत इतके कामकरी उत्पादनकार्यांत गुंतविणें फायदेशीर होत नाहीं. जो जो वस्तूंचा खप वाढत जातो तो तो श्रमविभागाच्या तत्वानुसार त्या वस्तूचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणे शक्य होतें. खेडेगांवातील मारवाडी किराणामाल, धान्य, कापड, खेळणीं ही सर्व विकण्याचा धंदा एकच दुकान थाटून करीत असतो. तेच शहरांत या वस्तूंचा खप मोठ्या प्रमाणावर असल्यानें त्यापैकीं प्रत्येक विकण्याचा धंदा निरनिराळे व्यापारी अनेक दुकानांतून करीत असतात.

परंतु वस्तूचा केवळ खप जास्त असला तरी जर ती उत्पन्न करण्याचे श्रम सतत करावयाचे नसतील तर श्रमविभाग फारसा होऊं शकत नाहीं. कारण तसें केल्यास बराच वेळ कामकरी कामावाचून राहून त्याची उत्पादक शक्ति वाया जाते. या फावल्या वेळात दुसरें कांहीं काम केल्यास तो काळ फुकट गेला असें जरी म्हणता आलें नाहीं तरी श्रमविभागाच्या तत्त्वास त्यामुळे बाध येतोच. शेतकीच्या धंद्यात श्रमविभागाचा प्रसार म्हणण्यासारखा होऊं शकत नाहीं, याचें मुख्य कारण शेत पिकविण्याचे श्रम कारखान्यातील श्रमासारखे सतत करावयाचे नसतात हे होय. श्रमविभागाचा सर्वोत्तम फायदा म्हणजे एक .गोष्ट पुन्हा पुन्हा केल्यानें करणाराचा हात घटून जातो व शक्य तितक्या थोड्या वेळात व थोड्या परिश्रमानें तो उत्कृष्ट वस्तु तयार करू शकतो, हा होय. परंतु तेच तेच बारीक सारीक काम जन्मभर करीत राहिल्यानें त्यास कंटाळा येऊन मनुष्याची बुद्धि मंद होत जाते. एखाद्या वस्तूच्या उत्पादनपद्धतीतील एखाद्या लहानशा भागाचीच माहिती झाल्यामुळें धंद्याच्या तेवढ्या भागाशिवाय तो निरुपयोगी ठरतो, व तो बेकार झाल्यास इतर धंद्यात त्यास काम मिळणें कठीण होतें. श्रमविभागात हे महत्वाचे दोष आहेत यात शंका नाहीं. परंतु त्यापासून होणाऱ्या मोठमोठ्या फायद्याच्या मानानें ते कांहींच नव्हत असें म्हटलें पाहिजे. शिवाय, कामकऱ्यांस यांत्रिक शिक्षण देऊन व त्याचे कामाचे तास कमी करून हे दोष दूर होण्यासारखे आहेत.

**१७ विशिष्ट व संकलित उत्पादन**—श्रमविभागाचें तत्त्व केवळ एक वस्तु उत्पन्न होत असतां कामकऱ्यास ज्या हालचाली कराव्या लागतात त्यासच लागू आहे असें नाहीं. एकाच वस्तूच्या ज्या भिन्न जाती असतात, किंवा एखादी वस्तु तयार होत असता ज्या निरनिराळ्या अवस्थांतून तिचें उत्क्रमण होतें त्यांपैकीं प्रत्येकीचा स्वतंत्र धंदा बनतो. साधें पोषाखाचें कापड घेतल्यास त्यांतील अनेक बारीक-सारीक प्रकार काही ठराविक गिरण्यांत तयार होतात, किंवा कांहीं गिरण्या फक्त सूत कातनात, कांहीं तें सूत रंगवितात व कांहीं त्या सुतापासून कापड विणतात. असल्या विशिष्ट उत्पादनाच्या पद्धतीनें उपयुक्त वस्तू अधिक सुबक व स्वस्त तयार

होण्यास मदत होते. अलीकडे समाजातील उत्पादक पद्धतीची उत्क्रांति या विशिष्ट उत्पादनाशी कांहीं अंशीं विसंगत दिसणाऱ्या संकलित उत्पादनाच्या दिशेनें होत आहे. उत्पादक शक्तीचें कमाल परिमाण एकवटून ती एक अगर अनेक वस्तूंच्या किफायतशीर उत्पादनांत एकदम खर्च करावयाची, या पद्धतीस संकलित किंवा प्रचंड प्रमाणावर उत्पादन असें म्हणतात. एखादी विशिष्ट वस्तु उत्पन्न करीत असता दुसऱ्या कांहीं वस्तु धंद्याची उपांगें म्हणून सहज उत्पन्न करतां येतात. प्रमुख व दुय्यम सव वस्तूंच्या विक्रीतून एकंदर धंद्याचा खर्च भागविता आल्यानें मुख्य वस्तु अनेकवार स्वस्त विकण्यास सापडते. तसेंच मोठ्या प्रमाणावर खरेदी-विक्री करणें, जागा, माणसें, हत्यारें यांचा काटकसरीनें उपयोग करणें इत्यादि फायदे वाढत्या प्रमाणावरील उत्पादकांस अधिक उपलब्ध होऊं शकतात. अलीकडे संकलित उत्पादनाची पद्धत वाढत आहे त्याचें मुख्य कारण त्या पद्धतीची वाढती उत्पादकता किंवा किफायतशीरपणा हेंच होय.

संकलित उत्पादनाचा दुसरा एक मार्ग म्हटला म्हणजे एखादी वस्तु कच्च्या मालापासून पूर्णपणें तयार होईपर्यंत उत्पादनाचें सर्व कार्य एकाच हुकुमतीखालीं चालणें हा होय. पोलादापासून यंत्रें तयार करण्याचा एखादा प्रचंड कारखाना निघाल्यास त्यास संकलित उत्पादनाचा एक मार्ग असें म्हणता येईल. तसेंच, खाणींतून लोखंड व कोळसा काढणें, त्यांच्या साहाय्यानें पोलाद तयार करणें, त्या पोलादाचीं यंत्रें व इतर कित्येक उपयुक्त वस्तु बनविणें, त्या बाजारगावीं नेण्यास मोटारी किंवा आगगाड्या चालविणें इत्यादि सर्व धंदे एकच कारखानदार करूं लागला तर तो संकलित उत्पादनाचा दुसरा मार्ग होईल. वर सांगितलेल्या विशिष्ट उत्पादनाच्या पद्धतीचा व दुसऱ्या प्रकारच्या संकलनाचा वरवर पहाणारास विरोध दिसण्याचा संभव आहे. परंतु संकलित उत्पादनाच्या निरनिराळ्या शाखांत विशिष्ट उत्पादनापासून होणारे सर्व फायदे सहज मिळविता येतात. किंबहुना, जों जों उत्पादनाचें प्रमाण अधिक, किंवा एकाच उत्पादकाच्या हुकुमतीखालीं असलेला उत्पादक सामर्थ्याचा साठा अधिक, तों तों श्रमविभागाच्या व विशिष्टोत्पादनाच्या तत्वांचा पूर्ण फायदा घेऊन उपयुक्त वस्तु शक्य तितक्या कमी खर्चानें तयार करणें सोपें असतें. उत्पादक पद्धतीची आजवर जी उत्क्रान्ति होत आली आहे तिच्यातील अत्यंत वरची पायरी म्हणजे वर सांगितलेला संकलित उत्पादनाचा दुसरा मार्ग ही होय. संपत्तीच्या विभागणीच्या व उपभोगाच्या दृष्टीनें या पद्धतींत अनेक दोष असून त्यांचा पुढें योग्य ठिकाणीं विचार करावा लागेल. येथें हें सांगून ठेवणें जरूर आहे कीं, शेतकी सारख्या ज्या धंद्यांत उत्पादकशक्तीचें संकलन स्वभावतःच अशक्य असतें त्यांमध्यें स्वतंत्रपणें व अल्पप्रमाणावर उत्पादन करण्याची पद्धतीच मुख्यतः चालू आहे. विजेसारखी प्रेरक शक्ति कारागिरांच्या घरोघर देतां येत

असल्यामुळें घरच्याच्या लहान महान यंत्रांवर स्वतंत्रपणें उत्पादक धंदे चालविता येतात. मोठ्या प्रमाणावर धंदा करण्याचे जे अनेक फायदे वर सांगितले त्यापैकी कित्येक असे आहेत की लहान उत्पादकांस परस्पर सहकार्यानें ते सहज मिळविता येतील. परंतु उत्पादक सहकार्याचे फायदे लहान व मोठ्या दोन्ही उत्पादकांस उपलब्ध होत असल्यानें त्यांचा एकत्र विचार करणें बरें.

**१८ उत्पादनार्थ सहकार्यः**— जीवितसंरक्षणास जरूर असलेली साधनें मिळविण्यास सहकार्य करणें हा मनुष्यांचाच नव्हे तर कित्येक पशुपक्ष्यांचाही स्वभाव आहे. मनुष्यजातींत उपजत असलेल्या सहकारबुद्धीस सामाजिक व्यवहारांत 'बळी तो कान पिळी' या तत्त्वाचा अंमल असतां, गुलामगिरीच्या पद्धतीचें विकृत स्वरूप प्राप्त झालें होतें व अगदी परवापर्यंत गुलामगिरीची किंवा वेठीची म्हणजे मजुरास बळजबरीनें काम करावयास लावण्याची पद्धत समूळ नष्ट झाली नव्हती. आजकाल भांडवलवाले व मजूर हे एकमेकांशीं वाटेल ते करार मदार करून उत्पादनार्थ सहकार्य करण्यास स्वतंत्र आहेत. आतां हे स्वातंत्र्य मजूरवर्गास किती हितावह झालें आहे हा प्रश्न निराळा असून त्याचा पुढें विचार करावा लागेलच, परंतु परस्पर करारानीं होणारें हें सहकार्य उत्पादनाच्या दृष्टीनेंही पूर्ण असत नाहीं हे मजुरास धंद्याच्या व्यवस्थेत किंवा नफ्यांत मुळींच भाग मिळत नाहीं यावरून दिसून येईल. भांडवलवाल्यांचे संघ निराळे व मजुरांचे संघ निराळे अशीच आज स्थिति आहे. उत्पादनाच्या या दोन घटकांचें खरोखर सहकार्य फार थोड्या प्रमाणांत पहावयास सांपडतें. भांडवल स्वभावतः चलनशील असल्यामुळें, आणि अलीकडील प्रचंड उद्योगधंद्यास तें फार मोठ्या प्रमाणांत लागत असल्यामुळें भांडवलाचें म्हणजे भांडवलवाल्यांचें सहकार्य सुलभ, किंबहुना अपरिहार्य, झालें आहे. समाईक भांडवलाच्या मंडळ्या ह्या भांडवलवाल्यांच्या संघाचें मुख्य उदाहरण होत. प्रत्येक भागीदाराची मालकी व त्याबरोबर मंडळीच्या कर्जाबद्दल त्याची जबाबदारी ही त्याच्या भागाच्या दर्शनी किंमतीवर अवलंबून असते. त्याच्या भागाबद्दल त्यास वेळोवेळीं नफ्याचा जो अंश मिळतो त्यास 'डिव्हिडंड' असें म्हणतात. एखाद्या मंडळीस कांहीं तात्पुरत्या कामाकरितां भांडवल पाहिजे असल्यास तें भांडवलाचे भाग म्हणून उभे न करितां 'डिबेंचर' म्हणून घेण्यांत येतें. 'डिबेंचर' विकत घेणाऱ्या इसमास ठराविक दरानें व्याज मिळतें व तें भागीदारांस 'डिव्हिडंड' वाटून देण्यापूर्वी द्यावें लागतें. शिवाय धंद्यामध्यें येणाऱ्या धोक्यास जास्त जबाबदार व म्हणूनच पुढें मागें अधिक नफा झाल्यास त्यांतही जास्त हक्क असलेले संस्थापकांचे भाग म्हणून कधीं कधीं स्वतंत्र असतात. मंडळीची कमाई अमुक एका रकमेइतकी होईपर्यंत हे भाग धारण करणारांस कांहीं मिळत नाहीं. परंतु त्या रकमेहून अधिक नफा झाल्यास त्यास इतर भागीदारांपेक्षां अधिक नफा

मिळतो. अशाच प्रकारचे भांडवलाचे दुसरे काही भाग असून त्यांच्या मालकास इतर सर्व साधारण भागावर ठराविक दरापर्यंत डिव्हिडंड वाटून दिल्यानंतर नफ्याचा वांटा मिळतो. अशा भागास इंग्रजीत 'डिफर्ड शेअर' असे म्हणतात.

मोठमोठ्या धंद्यास लागणारे भांडवल या समाइक पद्धतीने मिळविणे शक्य असते व भागीदार या नात्याने संपत्तीची मालकी बहुजन समाजात पसरविण्यास तिजमुळे मदत होते, हे उघड आहे. तरी लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन समाईक मंडळ्यांच्या द्वारे अनेक अप्रामाणिक लोक इतरास बुडविण्यास कमी करीत नाहीत. लोकांत अशा मंडळ्यांच्या खऱ्या स्वरूपाबद्दल जो जो अधिक माहिती पसरेल तो तो असले अनिष्ट प्रकार कमी होतील. शिवाय सरकारने कायदा करून अशा मंडळ्यांचे काम ठराविक पद्धतीनें व शक्य तितकें उघडपणे चालावे असे ठरविल्यास भागीदारांचें अधिक हितसंरक्षण होईल यात शंका नाही. एखाद्या वस्तूचा सर्व पुरवठा एकाच मालकाचे ताब्यात असल्यास तो कमी अधिक करून त्यास जास्तीत जास्त किंमत मिळविता येते; या गोष्टीचा फायदा घेण्याकरिता अनेक भांडवलवाले, आपापले कारखाने उत्पादनार्थ स्वतंत्र ठेवून, उत्पत्तीची विक्री करण्याकरिता मात्र ते संकलित करतात. अशा संघटनास जर्मनात 'कार्टेल' असे म्हणतात. काही ठिकाणी एखाद्या धंद्यातील सर्वच भांडवलवाले एकजीव होऊन त्या मुख्य धंद्यातील सर्व बारीक सारीक धंद्यांसह एक मोठा धंदा उभारतात. उदाहरणार्थ, सर्व अमेरिकेतील रॉकेल तेलाचा किंवा पोलादाचा धंदा हा खाणीतील द्रव्ये काढण्यापासून तो त्याचे तयार जिन्नस गिऱ्हाइकांस विकण्यापर्यंत एकाच प्रचंड मंडळीच्या ताब्यात आहे. अशा मंडळ्यास 'ट्रस्ट' अशी संज्ञा आहे. स्पर्धा किंवा चढाओढ यामुळे होणारे फायदे अशा मंडळ्या समाजापासून हिरावून घेतात. म्हणून त्या बंद करण्याचे अनेक प्रयत्न अमेरिकेत व इतर देशात आजवर झाले आहेत, परंतु ते पूर्णपणे यशस्वी होऊं शकत नाहीत याचें प्रमुख कारण असे आहे की एवढ्या प्रचंड प्रमाणावर संकलित उत्पादन झाल्याने वस्तू सुबक व स्वस्त तयार होऊं शकतात. सामान्य नागरिक दूरवर दृष्टी न ठेवता तेवढ्यावरच संतुष्ट राहून ह्या मंडळ्यांच्या इतर अप्रत्यक्ष दोषांकडे डोळेझांक करतात शिवाय, प्रबल भांडवलवाले राजसत्तेस देखील द्रव्याच्या जोरावर वश करून घेऊन लोकास लुबाडण्याचे आपलें काम चालू ठेवतात.

उत्पादनाचा तिसरा घटक जमीन हा असून तिचें एकत्र सहचर्य होणें स्वभावतः अशक्य आहे. म्हणून जमीनीचें सहकार्य म्हणजे जमीनदारांचे सहकार्य असेंच म्हटलें पाहिजे. लागवडीस लागणारे बी, खतें, औजारें, जनावरें वगैरे आवश्यक वस्तू विकत घेण्याकरितां, किंवा शेतीचें उत्पन्न विकण्याकरितां, किंवा दुष्काळ, गुरांचे रोग इत्यादि शेतकीस येणाऱ्या धोक्यांचा विमा उतरण्याकरिता शेतकऱ्यांमध्ये सहकारी संघ अनेक स्थापन झाले आहेत. परंतु उत्पादनाचें

मुख्य कार्य म्हणजे भांडवल व श्रम यांच्या साहाय्यानें जमिनीची मशागत करून पीक काढणें, तें सहकार्यानें घडवून आणणाऱ्या फारच थोड्या शेतकरी मंडळ्या असतात. जमिनीचा विस्तार, श्रमविभागाचा अल्पप्रमाणावर उपयोग व यांत्रिक सुधारणाची मर्यादित प्रगति इत्यादि अनेक कारणांनी शेतकऱ्यांमध्यें उत्पादनाकरितां सहकार्य करण्याच्या पद्धतीस आळा बसला आहे. शेतकऱ्यांस अत्यंत प्रिय व फायदेशीर झालेला सहकार्याचा प्रकार म्हटला म्हणजे पतपेढ्यांचा होय. लहान सहान परंतु स्वतंत्र कारागीर व उत्पादक यामध्येंही सहकार्यानें उत्पादन करण्याची पद्धति अल्प प्रमाणांत चालू आहे. शेतकरीसंघाप्रमाणेंच कच्च्या मालाची, हत्यारांची व जरूर पडल्यास यंत्रांची खरेदी करण्यास आणि आपला तयार माल किफायतशीर भावानें विकण्यास कारागिराच्या सहकारी मंडळ्या असतात. प्रचंड प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन करण्यांत समाजाचें सर्वस्वी हित होत आहे ही समजूत दिवसानुदिवस कमी होत असून शेतकी व इतर उद्योगधंदे स्वतंत्र व लहान उत्पादकांच्या हातीं असणें जरूर आहे हे मत प्रस्थापित होत आहे. अल्प प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या स्वतंत्र कारागिरांच्या धंद्यांस उत्तेजन द्यावयाचें असेल तर यांत्रिक शिक्षणाचा फैलाव, प्रेरक शक्ति घरोघर पोहोंचविण्याची सोय इत्यादि गोष्टींप्रमाणेंच सहकार्यानें उत्पादन करण्याच्या पद्धतीस योग्य महत्त्व दिलें पाहिजे. स्पर्धा किंवा चढाओढ हा समाजाच्या आर्थिक उत्क्रान्तीच्या मार्गांतील एक मुक्काम असून ज्या प्रमाणे गुलामगिरी, वेठ, इत्यादि पूर्वीचे टप्पे ओलांडून मनुष्यसमाज पुढें गेला आहे, त्याचप्रमाणें स्पर्धेच्या मुक्कामावरून सहकार्याच्या शेवटल्या ध्येयाप्रत मनुष्यसमाज गेल्याशिवाय राहणार नाही असा कित्येक लोकांस दृढ विश्वास वाटतो.

**१९ सरकार आणि उत्पादन**— समाजाच्या राजकीय प्रगतीबरोबर राजसत्तेचें कार्यक्षेत्र दिवसानुदिवस वृद्धिंगत होत आहे. शिवाय, राष्ट्राची सर्व उत्पादक शक्ति एकत्र करून उत्पन्न होणाऱ्या सुखसोयींचा सर्व नागरिकांनी सारखा किंवा प्रमाणशीर फायदा घ्यावा असें म्हणणाऱ्या समाजसत्तावाद्याचें प्राबल्य हळूहळू वाढत असल्यामुळें सरकारचे आर्थिक व्यवहार असंख्य झाले आहेत. ज्या कायद्यांनी समाजांतील आर्थिक परिस्थितीचें नियमन केलें जातें ते कायदे म्हणजे सरकारची एक आर्थिक कामगिरीच होय. परंतु प्रस्तुत ठिकाणीं आपणांस सरकार प्रत्यक्ष उत्पादनांत किती व कसा भाग घेतें एवढाच विचार कर्तव्य आहे. प्रत्यक्ष करांचें ओझें न वाढवितां आपला वसूल वाढविण्याची सरकारची प्रवृत्ति व लोकशाहींत अधिकारी पक्षाची आपल्या हुकमतीखालीं शक्य तितके अधिक मतदार ठेवण्याची उत्सुकता ही सरकारी उत्पादनाचें क्षेत्र वाढविणारी प्रमुख कारणें आहेत. सरकारी धंद्यांबद्दल असा एक सार्वत्रिक अनुभव आहे की, ज्या धंद्यांत स्वभावतः स्पर्धा फार दिवस चालूं शकत नाही व ज्यांच्यांत आपोआप मक्तेदारी स्थापन होण्याची प्रवृत्ति

असते ते धंदे सरकार, म्हणजे मध्यवर्ती, प्रांतिक किंवा स्थानिक सार्वजनिक संस्था, आपणांकडे घेऊं लागल्यास समाजाचा त्यांत फायदा आहे, असें लोक समजतात. आगगाड्यांनीं मालाची व उतारूंची ने-आण करणें आणि तारायंत्रानें बातम्या व निरोप पोहोंचविणें हे अशा प्रकारचे धंदे असून बहुतेक सुधारलेल्या देशांत ते सरकार चालवितें. कांहीं धंदे लोकोपयोगी असले तरी त्यांपासून होणारा फायदा खात्रीनें किंवा लवकर मिळेल असें नसतें. समाजाच्या अंतिम हिताकरितां संपत्तीचा मोठ्या प्रमाणावर आगाऊ व्यय करण्यास तयार होणें, हे खाजगी भांडवलवाल्यांस शक्य नसल्यामुळे असले धंदे सरकारासच करावे लागतात. कालवे व पाटबंधारे बांधण्याचें काम या वर्गांत मोडतें. कांहीं धंदे मात्र सरकार केवळ आपला वसूल अप्रत्यक्षपणें वाढवावा या हेतूनें अंगिकारतें. फ्रान्समध्यें तंबाकूचा धंदा व इटलींत आयुष्याचा विमा उतरण्याचा धंदा, हे सरकारी खजिना भरण्यास कारणीभूत होतात. दुसरे कांहीं धंदे विशिष्ट वस्तूंचा उपभोग अनिष्ट असून तो शक्य तितका कमी केला पाहिजे अशा बुद्धीनें सरकार चालवितें. अफू, दारू वगैरे जिन्नस प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या सरकारच उत्पन्न करतें व विकतें.

सरकार ही मुख्यतः राजकीय संस्था असतां तिनें अर्थोत्पादनाचें काम करावें हे कित्येकांस गैरवाजवी वाटतें, व व्यावहारिक अनुभवाचे अभावीं असलें उत्पादन शेवटीं फायद्याचें होणार नाहीं असें ते म्हणतात. परंतु दिवसानुदिवस सरकारी धंद्यांची संख्या व त्यांचें कार्यक्षेत्र हीं वाढत आहेत ही एकच गोष्ट प्रस्तुत आक्षेप तत्वतः खरे भासले तरी ते फारसे प्रबळ नाहींत हे सिद्ध करण्यास समर्थ आहे. सरकारी धंदे कधीं कधीं प्रत्यक्षपणें खाजगी मालकासारखें सरकारच चालवितें. सरकारच्या मालकीची व सरकारनें चालविलेली आगगाडी, हे या प्रकारचें उदाहरण आहे. कधीं कधीं सरकार स्वतः उत्पादन न करतां इतरांवर जरूर तीं नियंत्रणें घालून व त्यास कांहीं सवलती देऊन त्या धंद्यापासून आपला फायदा करून घेतें. सरकारी मालकीच्या परंतु खाजगी मंडळ्यांनीं चालविलेल्या आगगाड्या या प्रकारच्या होत. याशिवाय केवळ मक्तेदारीनें उत्पादन व विक्री करण्यास सांगून त्या हक्काचा लिलाव करून सरकार पैसे मिळवितें. हिंदुस्थानांत दारूचें उत्पादन व विक्री याबद्दल सालोसाल जे लिलांव होतात ते या पद्धतीस अनुसरून होतात. सदरहु ठळक मार्गांशिवाय दुसऱ्याही इतर मार्गांनीं सरकार उपयुक्त वस्तूंचें उत्पादन करीत असतें. परंतु ते विशेष महत्वाचे नसल्यानें त्यांचा येथें उल्लेख करण्याचें कारण नाहीं. सार्वजनिक अगर सरकारी उत्पादनाच्या वरील पद्धतींत म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, इत्यादि स्थानिक संस्थांनीं चालविलेल्या धंद्यांचाही समावेश होतो. अनेक ठिकाणीं आगगाड्या, टेलिफोन, गॅस, वीज, इत्यादि सोयींचा पुरवठा स्थानिक स्वरूपाच्या सरकारी संस्थांकडूनच केला जातो.

# प्रकरण दुसरें

## संपत्तीचा विनिमय

**१ विनिमय**—आर्थिक दृष्ट्या समाजातील अत्यंत महत्त्वाची बाब म्हणजे संपत्तीचे उत्पादन ही होय. नैसर्गिक साधनाचा उपयोग करून मनुष्य ज्या मानानें अधिक उपयुक्त वस्तू उत्पन्न करतील त्या मानानें त्यांची आर्थिक स्थिति सुधारण्याचा अधिक संभव असतो. सध्याची व्यक्तिप्रधान समाजघटना अस्तित्वात येण्यापूर्वी जेव्हां प्रत्येक कुटुंब केवळ स्वतःच्या परिश्रमानेच उपयुक्त वस्तू उत्पन्न करून आपल्या सर्व गरजा भागवीत असे, तेव्हां उत्पादन व उपभोग अशी संपत्तीची दोनच रूपांतरें होत. कुटुंबांतील माणसें ज्याप्रमाणें अर्थोत्पादनास शक्त्यनुसार मदत करून कुटुंबाच्या एकंदर संपत्तीतून स्वतःस लागतील तेवढ्या उपयुक्त वस्तूंचा उपभोग घेतात, त्याप्रमाणें अनेक मनुष्य गट करून या तत्त्वावर आपला जीवनक्रम चालवितील तर प्रत्यक्ष विनिमयावांचून त्यांचे सर्व व्यवहार आजही चालू शकतील. परंतु समाजघटना कौटुम्बिक अवस्थेंत असतानाही प्रत्येक कुटुंब स्वतःच्या सर्व गरजा पूर्णपणें भागविण्यास असमर्थ असे. दुर्मिळतेमुळें किंवा विशेष आकर्षक गुणामुळें मनुष्यास फार मूल्यवान वाटणाऱ्या कित्येक वस्तू काही विवक्षित प्रदेशांतच उपलब्ध होत, व आपल्याजवळील एखादी उपयुक्त वस्तु दुसऱ्यास देऊनच अशा मूल्यवान वस्तू प्रत्येक कुटुंबास मिळविता येत. मनुष्य, कुटुंब, गांव किंवा देश यांपैकी आपण आर्थिक व्यवहाराचा कोणताही घटक घेतला तरी त्यांपैकी प्रत्येकास स्वतःजवळील एखादी उपयुक्त वस्तु दुसऱ्यास देऊन तिच्याबद्दल स्वतःस अधिक उपयुक्त अशी दुसरी वस्तु घ्यावी लागते. उपयुक्त वस्तूंच्या या अदलाबदलीस संपत्तीचा विनियम म्हणतात. विनिमयामुळें व्यक्तींच्या किंवा राष्ट्रांच्या संपत्तीत भर पडत नाही, असा कित्येक लोकांचा अभिप्राय आहे. याचें कारण ते असें समजतात की, उपयुक्त वस्तू उत्पन्न करणें ही उत्पादनाची कामगिरी असून विनिमयद्वारा त्या वस्तूंची मालकी मात्र बदलते. शिवाय, ज्या दोन वस्तूंचा विनिमय होतो त्यांची उपयुक्तता सारखीच असल्यामुळें केवळ त्यांची मालकी बदलली तरी उपयुक्तता आहे तितकीच कायम राहते. संपत्तीच्या उत्पादनाचें मर्म ज्यांस कळलें आहे त्यास ही विचारसरणी क्षणभरही पटणार नाही. निसर्गदत्त अनेक वस्तूंतील उपयुक्तता शोधून काढून ती मनुष्यांच्या सुखवर्धनार्थ उपलब्ध करून देणें हाच संपत्तीच्या उत्पादनाचा खरा अर्थ होय. या दृष्टीनें पाहिल्यास, ज्या वस्तुची अळा फारशी उपयुक्तता वाटत नाही परंतु बळा वाटते ती बळा देऊन बजवळून

त्यास कमी परंतु अला अधिक उपयुक्त वाटणारी वस्तु अ घेतो; या व्यवहारांत अ आणि ब या व्यक्तीच्या आणि ते ज्या समाजांत राहतात त्या समाजाच्या दृष्टीनें त्या वस्तूची उपयुक्तता वाढली असेंच म्हटलें पाहिजे. विणकरानें लोंकरीचीं कितीही वस्त्रें तयार केलीं किंवा शेतकऱ्यानें आपल्या शेतांत कितीही धान्य पिकविलें तरी थंडीवाऱ्यापासून व भुकेपासून स्वतःचें संरक्षण करण्यास त्यांस अनुक्रमें लागणाऱ्या वस्त्रांहून किंवा धान्याहून अधिक वस्त्राची व धान्याची त्यास उपयुक्तता वाटणार नाही; आणि विणकराचा जीव अन्नावांचून कासावीस होत असतां शेतकरी थंडीत कुडकुडत पडेल. तेंच स्वतःस निरुपयोगी असें आपणाजवळील अधिक धान्य विणकरास देऊन त्याजपासून शेतकऱ्यानें एखादें लोंकरीचें वस्त्र घेतल्यास दोघासही कमी उपयुक्त वस्तु देऊन आपण अधिक उपयुक्त वस्तु घेतली, असें दिसून येईल. विनिमयामुळें वस्तूची उपयुक्तता कशी वाढते व विनिमय करणाऱ्या व्यक्तीचा त्यापासून कसा फायदा होतो, हे वरील उदाहरणावरून स्पष्ट होईल.

**२ विनिमयाचा प्रसार व त्यापासून होणारे फायदे** — लोकसंख्येच्या वाढीमुळें व इतर कारणानीं कुटुंबप्रधान समाजघटना मोडून तिच्याऐवजीं अनेक कुटुंबांचीं मिळून गांवें बनलीं, व श्रमविभागणीच्या तत्त्वावर निरनिराळ्या वस्तू उत्पन्न करणाऱ्या व्यक्तींचे स्वतंत्र गट बनूं लागले. कुटुंब या संस्थेची आर्थिक स्वायत्तता कमी होत जाऊन निरनिराळे कारागीर निरनिराळ्या वस्तू उत्पन्न करूं लागले. एकाच गांवांतील लोकांच्या सर्व प्रकारच्या गरजा त्या गांवांतील शेतकरी व कारागीर भागवीत असल्यामुळें त्यांनीं उत्पन्न केलेल्या वस्तूंचा आपापसांत विनिमय होऊं लागला. दुर्मिळ व मूल्यवान वस्तू पूर्वीप्रमाणेच दूरदूरच्या ठिकाणांहून आणल्या जात. पुढें समाजाची राजकीय व आर्थिक प्रगति होऊन अनेक गांवांचीं मिळून राष्ट्रें बनलीं. एकाच बलाढ्य राजसत्तेखालीं मोठमोठाले प्रदेश आल्यामुळें निरनिराळ्या शहरांचें व खेड्यांचें आपापसांतील दळणवळण वाढून त्यांमधील व्यापार वृद्धिंगत होऊं लागला. धाडसी भांडवलवाले व उत्साही कारागीर देशांतील सर्व लोकांच्या गरजा भागविण्यास तयार व समर्थ झाले. अनेक कारागीर एका ठिकाणीं जमवून व त्यांस कच्चा माल आणि हत्यारें देऊन त्यांच्या श्रमाच्या सहाय्यानें उपयुक्त वस्तूंचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याची पद्धत कारखानदारांनीं पाडली. इतक्या मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केलेल्या वस्तूंचा विनिमयही मोठ्या प्रमाणावर होऊं लागला. हळूहळू मोठमोठ्या राष्ट्रांचें परस्पराविषयीं ज्ञान व आपापसांतील राजकीय व इतर हितसंबंध हीं वाढत जाऊन सहाजिकपणें त्यांच्यांतील व्यापार किंवा विनिमय हाही वृद्धिंगत झाला. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत तर वाफेच्या यंत्रासारख्या अनेक सुधारणा घडून येऊन

त्यांच्या साहाय्यानें संपत्तीचें उत्पादन अधिक मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें. पुढें पुढें असलेल्या शोधांमुळे सर्व प्रकारच्या वस्तूंची वहातुक आगगाड्या व आगबोटी यांच्या मार्गांनी जलद व कमी श्रमांत करतां येऊं लागली. खेडेगांवांतील मूठभर शेतकऱ्यांनी व चार लहान सहान कारागिरांनी एकमेकांच्या गरजा वंशपरंपरेनें भागवीत असावें, अशी जी स्थिति सर्व देशांत समाजाच्या बालपणीं असते व जी अजूनही हिंदुस्थानाच्या कांहीं कांहीं भागांत दृष्टीस पडते, तिचा ऱ्हास होऊन आज सर्व जग हें आर्थिक दृष्ट्या एक देश व बाजार बनले आहे.

पूर्वीचा खेडवळ कारागीर अगर शेतकरी उपयुक्त वस्तू उत्पन्न करतांना आपलाच एखादा गांवकरी त्या वस्तू कांहीं तरी विवक्षित मोबदला देऊन घेईल अशी अट-कळ बाधी. तेंच आज मँचेस्टरमधील एखादा कारखानदार कापड तयार करताना आपल्या मालाचा सर्व जगभर प्रसार होणार हें जाणून त्याचा एकंदर पुरवठा व मागणी यांचा मेळ घालीत असतो. शेतकीच्या धंद्यासंबंधींही आपणांस असें दिसून येईल की, अमेरिका, जपान, इजिप्त, हिंदुस्थान इत्यादि दूरदूरच्या राष्ट्रांतून कापूस-पेरणीची व कापसाच्या भावाची जी माहिती तारेने जगभर पसरते तिचा त्या त्या देशांतील उत्पादकांच्या परिश्रमावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. देशादेशांमधील राजकीय स्पर्धा व अंतर्राष्ट्रीय विनिमयावर जकातीच्या व इतर रूपांनी पडलेलीं अनेक नियंत्रणें यामुळें एकंदर जगाचें आर्थिक एकीकरण अजून पूर्णांशानें झालेलें नाहीं. तरी एकंदर मनुष्यसमाजाचे बौद्धिक, धार्मिक व राजकीय एकीकरण करण्याचे आज अनेक शतकें जे निकराचे प्रयत्न चालू आहेत त्या मानानें केवळ नैसर्गिक कारणांनीं जगाचें झालेलें आर्थिक एकीकरण आश्चर्यकारक व बोधप्रदही आहे, असें म्हटलें पाहिजे. आर्थिक व्यवसायांच्या क्षेत्राच्या ह्या वाढीमुळें संपत्तीचें उत्पादन व तिचा विनिमय हे दोन्ही प्रश्न सारख्याच महत्त्वाचे होऊन बसले आहेत. किंबहुना, मोठ्या प्रमाणावर उत्पादन होण्यास विनिमयसाधनांची वाढ होणें जरूर असतें, हे ध्यानांत घेतल्यास उत्पादनापेक्षां हल्लीं विनिमयासच थोडें तरी अधिक महत्त्व देणें भाग पडेल. प्रत्येक मनुष्य आपला चरितार्थ चालविण्याकरिता जो धंदा करतो तो सकृद्दर्शनीं बहुतेक दुसऱ्याच्याच उपयोगाचा असतो. आपण उत्पन्न केलल्या उपयुक्त वस्तू दुसऱ्यांस देऊन त्यांनी उत्पन्न केलेल्या वस्तू आपण घ्याव्या हाच सर्व आर्थिक व्यवहारांचा आजकाल नियम आहे. अशा विनिमयामुळे व्यक्ति, देश व एकंदर मनुष्यसमाज या सर्वांचे अनेक फायदे होतात. वस्तूंची उपयुक्तता उपभोक्त्यांच्या भोगेच्छेवर अवलंबून आहे व विनिमयामुळे प्रत्येक वस्तू तिची ज्या माणसास जास्तीत जास्त उपयुक्तता वाटते त्याच्या हातांत जाते, हा मोठाच लाभ होय. शिवाय, विनिमयाचा विस्तार जेवढा अधिक तेवढा श्रमविभागाचाही प्रसार अधिक होतो. प्रत्येक माणसास

एखादें विशिष्ट काम जन्मभर करण्यास सांपडून तो तें उत्तम रीतीनें करण्यास शिकतो. यांतही समाजाचा फायदाच आहे.

**३ विनिमय व मूल्य**—धान्य पिकविणारा शेतकरी व लोंकरीपासून घोंगडी तयार करणारा विणकर यांमध्यें एकानें दुसऱ्यास कांहीं धान्य देऊन त्यापासून एक दोन घोंगडया घेतल्या तर तो विनिमय अगदीं साध्या रीतीनें झाला, असें म्हटलें पाहिजे. आपणास नको व दुसऱ्यास हवी अशी वस्तू त्यास देऊन, त्याला नको परंतु आपणास हवी अशी वस्तू त्याजवळून घेणें, या देवघेवीच्या पद्धतीला ऐनजिनसी किंवा वस्तुमय विनिमय असें म्हणतात. समाजाच्या अगदीं अप्रगल्भ स्थितीतही असला ऐनजिनसी विनिमय विशेष होऊं शकत नाही. एक तर विनिमयोत्सुक व्यक्तीजवळ असलेले जिन्नस एकास हवे व दुसऱ्यास नकोत असेच नेमके असावयास पाहिजेत. शिवाय, एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूशीं असलेला मूल्यसंबंध दोघांसही सारखाच मान्य असावयास पाहिजे. उदाहरणार्थ, एका इसमाजवळ पारधीचें एखादें हत्यार असून दुसऱ्याजवळ चकाकणारे कांहीं मणी आहेत असें आपण समजू. या दोघांमध्यें विनिमय घडून येण्यास पहिल्यास मण्याची व दुसऱ्यास हत्याराची जरूर असावयास पाहिजे. पहिल्याला एखाद्या जनावराच्या कातड्याची व दुसऱ्याला स्वतःचें अंग चित्रविचित्र करण्यास लागणाऱ्या रंगाची जरूर असली तर त्यांमध्यें देवघेव होणार नाहीं. परंतु एकास मणी व दुसऱ्यास हत्यार पाहिजे, असें धरून चाललें तरी पहिला इसम आपल्या हत्याराच्या मानानें दुसऱ्याच्या मण्याचें जें मूल्य ठरवील, तेंच दुसऱ्यानें आपल्या मण्यांच्या मानानें पहिल्याच्या हत्याराचें ठरविलें पाहिजे. दुसरें असें की, परस्पर मूल्यसंबंध एकमेकांस पटला तरी ज्या वस्तूंची देवघेव व्हावयाची त्या वस्तूंचें परिमाण परस्पर गरजांपेक्षां कमीजास्त असेल तर विनिमय होऊं शकणार नाहीं. रानटी लोकांत बायकांची खरेदी विक्री होत असे हें प्रसिद्ध आहे. दोन रानटी इसम बायको व तिरकमठा यांची अदलाबदल करण्यास तयार झाले, व दोन तिरकमठ्यांबरोबर एक बायको हा मूल्यसंबंध त्यांस मान्य झाला तरी एकाजवळ दोन तिरकमठे नाहींत व दुसऱ्यास बायको अर्धी करतां येत नाहीं म्हणून त्यांच्यांत विनिमय होणें अशक्य होईल.

ऐनजिनसी विनिमयाच्या ह्या अनेक अडचणी दूर करून विनिमय अधिक सुलभ करण्याकरितां मनुष्य कांहीं तरी सर्वसाधारण वस्तूचा पहिल्यापासून उपयोग करीत आला आहे. विवक्षित काळीं व विवक्षित समाजांत जी सामान्यपणें सर्वांस हवीशी वाटते व जिचा पुरवठा विशेष मर्यादित अगर फाजील नसतो, अशी एखादी वस्तु शोधून काढून विनिमयाचें कार्य सुलभ करतां आलें. उदाहरणार्थ, कवड्या अगर शिपा या वस्तूंस सार्वत्रिक मागणी असून त्या फार दुर्मिळ अगर सुलभ नसतील तर

वरील उदाहरणांतील तिरकमठा व बायको यांच्या विनिमयार्थ अडून बसलेले इसम एकमेकांस दुसऱ्याच्या वस्तूंचें जें मूल्य ठरेल तें शिंपांच्या रूपानें देऊन मोकळे होतील. म्हणजे एक तिरकमठा व वर एका तिरकमठ्याचें शिंपांच्या स्वरूपांत होणारें मूल्य एवढें देऊन दुसऱ्याजवळील बायको पहिल्यास मिळवितां येईल. वास्तविक पाहतां एवढीही अडचण सोसण्याचें आतां कारण राहणार नाहीं. समाजांतील निरनिराळ्या लोकांच्या ज्या असंख्य गरजा असतात त्या आपणाजवळील उपयुक्त वस्तु दुसऱ्यास देऊन त्यामोबदला स्वतःस हवी असलेली वस्तु घेऊनच प्रत्येकास भागवाव्या लागतात. विनिमय ऐनजिनसी असतांना देवघेवीच्या या मार्गांत अनेक अडचणी होत्या. आतां प्रत्येकानें आपणास विशेष उपयुक्त वाटत नसलेली वस्तु ती ज्यास पाहिजे त्यास द्यावी व तिचा मोबदला म्हणून त्याजवळून शिंपा अगर कवड्या घ्याव्या; व मग स्वतःस पाहिजे असलेली वस्तु ज्याच्याजवळ असेल त्याला त्या कवड्यांची जरूर तेवढी संख्या देऊन ती मिळवावी, असें होईल. विनिमय सुलभ होण्याकरितां, प्रस्तुत उदाहरणांतील कवड्यांप्रमाणें, जें सर्वसाधारण परिमाण अथवा माप आणि माध्यम उपयोगांत आणलें जातें त्यासच पैसा असें म्हणतात. साधारणपणें 'पैसा' म्हणजे तांब, रुपें, सोनें इत्यादी धातूंची नाणीं होत, असें आपणांस वाटतें. परंतु असलीं नाणीं हा पैशाचा केवळ एक प्रकार असून पैसा म्हणजे सर्व वस्तूंचे मूल्य मोजून त्यांचा विनिमय सुलभ करण्याकरितां ज्या एका सर्वसाधारण वस्तूचा उपयोग करतात ती वस्तु होय. शिंपा, कवड्या, कातडीं, जनावरें, मणी, इत्यादि अनेक पदार्थांचा निरनिराळ्या काळीं पैसा म्हणून उपयोग झाला आहे. वस्तूचा विनमय होतांना प्रथम ती वस्तू व पैसा यांचा परस्पर मूल्यसंबंध ठरून तिची खरेदी व विक्री होते. शेतकऱ्यास धान्य देऊन घोंगडी घ्यावयाची असेल तर धान्य व घोंगडी यांचा मूल्यसंबंध काय हे ठरवीत न बसतां धान्य व पैसा, आणि घोंगडी व पैसा, यांचा मूल्यसंबंध ठरवून त्यास धान्याची विक्री व घोंगडीची खरेदी करतां येते. प्रत्येक वस्तूचा पैशाशी जो मूल्यसंबंध ठरतो त्यास त्या वस्तूची किंमत, असें म्हणतात. वस्तूंची खरेदीविक्री, त्यांची किंमत, व पैशाच्या पुरवठ्याच्या योगानें त्यांच्या खरेदीविक्रीवर व किंमतीवर होणारे परिणाम इत्यादि गोष्टी संपत्तीच्या विनिमयाच्या दृष्टीनें फार महत्त्वाच्या आहेत.

**४ किंमत आणि बाजारभाव**—वस्तूंची देवघेव होत असतां त्यांच्यातील उपयुक्ततेबद्दल उपभोक्त्यांस जितका जास्त अगर कमी अभिलाष वाटेल त्यामानानें त्यांचें मूल्यही जास्त कमी होईल. बाजारांत विकावयास आलेल्या वस्तूंची किंमत मुख्यत्वेंकरून उपभोक्ते अगर गिऱ्हाईक यांच्या मागणीच्या तीव्रतेवर व लवचिकपणावर अवलंबून असते. परंतु मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें

वस्तू उत्पन्न करण्यास लागणाऱ्या श्रमांमुळें वस्तूंचा पुरवठा कमी जास्त होतो व त्यास अनुसरून गिऱ्हाइकांच्या मागणीची तीव्रताही बदलते. मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेमुळें बाजारात वस्तूंची देवघेव होत असतां त्यांची किंमत किंवा भाव हीं ठरतात. ह्यासंबंधी काही ठोकळ नियम असून लहान व मोठ्या, अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय अशा सर्व देवघेवीस ते लागू पडतात. संपत्तीच्या विनिमयासबंधी योग्य माहिती होण्यास ह्या नियमांचें थोडक्यांत विवेचन करणे अवश्य आहे. ह्या बाबतीत बाजार ह्या शब्दाचा अर्थशास्त्रांत जो विशिष्ट अर्थ आहे, तो ध्यानात घेतला पाहिजे. नेहमीच्या बोलण्यांत एखाद्या वस्तूचा 'बाजार' म्हणजे ज्या इमारतीत किंवा जागेंत गिऱ्हाईक व दुकानदार यांमध्यें त्या वस्तूची खरेदी विक्री होते ती इमारत किंवा जागा असा असतो. परंतु शास्त्रीय परिभाषेत एखाद्या वस्तूचा बाजार याचा अर्थ, ज्या प्रदेशांत त्या वस्तूची वहातूक व ती वस्तू विकणारे व विकत घेणारे यांचें परस्पर दळणवळण ही सहज व पूर्णपणें होऊन त्या वस्तूची सर्वांस सारखी अशी एकच किंमत ठरूं शकते तो प्रदेश, असा असतो.

अशा बाजारांत एकाच प्रकारच्या वस्तूचा भावही विवक्षित काळीं एकच असला पाहिजे असा एक साधारण नियम आहे. उदाहरणार्थ, आंब्याचे जे सर्वमान्य व ठळक प्रकार आहेत त्यापैकी एका प्रकारचे व गोडी वगैरे इतर गुणांतही एकमेकांसारखे असे आंबे बाजारांत विकावयास आणले तर त्या सर्वांस एकच भाव येईल. एखादा दुकानदार आपणांस कमी भाव मिळाला तरी चालेल असें समजून कमी किंमतीस आपले आंबे विकण्यास मनांतून तयार असला तरी बाजारांत गिऱ्हाईक जास्त किंमत देऊन तशाच प्रकारचे आंबे घेत आहे हे प्रत्यक्ष दिसत असतां त्या किंमतीपेक्षां कमी दरानें तो आपला माल विकणार नाही. त्याचप्रमाणें, एखाद्या गिऱ्हाइकास आंब्यांची फार जरूर असून वाटेल ती किंमत पडली तरी आज आंबे घेऊं, अशा इराद्याने तो बाजारात गेला असला तरी इतर गिऱ्हाईक कमी दरानें आंबे घेत आहेत व त्या भावानें दुकानदार त्यांस आपला माल विकीत आहेत, हे पाहून तोही त्याच भावानें आंबे खरेदी करील. सामान्य मनुष्य बाजारांत गेल्यावर पहिल्याप्रथम चार ठिकाणी भावाची चौकशी करून मग माल खरेदी करतो, ह्यांतील इंगित बाजारभावाच्या प्रस्तुत नियमांतच सांपडेल. एकूण, वस्तु विकणारा व विकत घेणारा व्यक्तिशः कोणत्या किंमतीस देवघेव करण्यास तयार आहे यावर बाजारभाव अवलंबून नसतो. प्रत्येक दुकानदारास आपला माल अमुक एका किमान किंमतीपर्यंत विकला पाहिजे असें वाटत असतें व ही किमान किंमत बहुतेक त्यास स्वतःला तो माल उत्पादकांपासून खरेदी करून बाजारांत आणण्यास जो खर्च लागला असेल त्यावर अवलंबून असते. त्या किमान मर्यादेपेक्षां मिळेल तेवढी अधिक किंमत उकळण्यास प्रत्येक दुकानदार तयारच असतो; व कधांकधी

मालाच्या दुर्मिळतेमुळें किंवा वाढत्या मागणीमुळें आज नाही उद्यां आपणांस अधिक भाव येईल, ह्या आशेनें कमी फायद्याचा हातचा सवदाही तो नाकारतो. उलटपक्षी, वस्तूची उपभोक्ती गिऱ्हाइकें आपापल्या मनांत, त्या वस्तूच्या उपयुक्ततेच्या मानानें आपण जास्तीत जास्त किती किंमत देऊन ती विकत घेऊं, हें जवळजवळ नक्की ठरवून बाजारात येतात. मग वस्तूंच्या फाजील पुरवठ्यामुळें किंवा दुकानदारांमधील स्पर्धेमुळें जर त्या वस्तूचा भाव कमी असला तर कमी किंमतीस ते ती खरेदी करतात. ओढून धरणाऱ्या दुकानदाराप्रमाणे कांही गिऱ्हाइकेंही आपली उत्सुकता प्रगट न करता भाव उतरविण्याचा प्रयत्न करतात. या गोष्टीसच आपण भाव ठरविणें अगर घासाघीस करणें असें म्हणतों, आणि बाजारात एका प्रकारच्या मालाचा भावही एकच असतो हें आपण नित्य पाहातों. गिऱ्हाईक व दुकानदार यांच्यांतील परस्पर ओढाताणीमुळें ही किंमत ठरत असल्याने त्या किंमतीस जेवढा माल विकण्यास दुकानदार तयार असतात तेवढाच माल गिऱ्हाइकही तेवढी किंमत देऊन घेण्यास तयार असतात, हें उघड होईल. त्याचप्रमाणें गिऱ्हाईक व दुकानदार यांच्यांतील परस्पर ओढाताण व त्याची आपापसांतील चढाओढ यांच्या एकत्रित सहकार्यानें बाजारभाव ठरत असल्यामुळें तोच भाव जास्तीत जास्त गिऱ्हाइकांस व दुकानदारास पसंत पडतो.

बाजारभावाच्या ह्या अनुभवावरून अर्थशास्त्रांतील मागणी व पुरवठा याचा असा नियम ठरविण्यांत आला आहे की, वस्तूचा पुरवठा जेवढा अधिक तेवढी तिची किंमत कमी आणि मागणी जेवढी अधिक तेवढी तिची किंमत अधिक. या नियमावरून असा एक गैरसमज होण्याचा संभव आहे की, पुरवठा व मागणी यांच्यांतील फेरबदल व किंमतीतील चढउतार यांमध्ये गणितदृष्ट्या ठराविक प्रमाण राहील. उदाहरणार्थ, वस्तूचा पुरवठा दहा टक्के वाढला तर किंमत दहा टक्के कमी होईल अशी कोणी अपेक्षा करील तर ती चूक ठरण्याचा संभव आहे. ठोकळ मानानें वरील नियमावरून एवढेच सिद्ध होतें की, पुरवठा वाढून मागणी जर कायम असेल तर त्या वस्तूची किंमत कांहीशी कमी होईल; व पुरवठा कायम राहून मागणी वाढल्यास किंमतींत कांही तरी वाढ होईल. शिवाय मागणी व पुरवठा यांच्यांतील फेरबदलास अनुसरून किंमतींत बदल होतो, असे म्हटल्यानें किंमत किंवा मूल्य ही मागणीपुरवठ्यावर सर्वस्वी अवलंबून आहेत, असाही एक ध्वनि निघतो, तो वास्तविक खरा नाही. किंबहुना, मागणी व पुरवठा यांच्यांतील फेरबदलास अनुसरून किंमत बदलते असें म्हणण्याऐवजी किंमतींतील फेरबदलास अनुसरून मागणी व पुरवठा हीं विशिष्ट परिस्थितींत बदलतात असें विधान केल्यास तें तात्विक व व्यावहारिक कसोटीस अगदीच सोडून होईल असें नाहीं. बाजारभाव व पदार्थांच्या किंमती यांच्यांतील फेरबदलासंबंधी वरील नियम, विकणारे व

विकत घेणारे यांमध्यें पूर्ण स्पर्धा अस्तित्वांत आहे, ही गोष्ट गृहीत धरून ठरविलेले आहेत. सर्व पुरवठा एकाच मक्तेदाराच्या ताब्यात असेल किंवा माल विकत घेण्यास एकच गिऱ्हाईक उभे राहील तर ज्यापासून त्या मक्तेदारास अगर गिऱ्हाईकास जास्तीत जास्त फायदा पडेल, असा भाव ठरविला जाईल. पूर्ण विनिमयस्वातंत्र्य असतां परस्पर चढाओढीनें जी किंमत ठरली असती तिच्यापेक्षा मक्तेदारीनें ठरलेली ही किंमत बहुतेक नेहमीच भिन्न असते.

**५ पैशाचा पुरवठा व वस्तूंच्या किंमती**— पुरवठा वाढल्यास अगर मागणी कमी झाल्यास किंमत कमी होते, व पुरवठा कमी झाल्यास किंवा मागणी वाढल्यास किंमत चढते, हा नियम इतर सर्व वस्तूंप्रमाणें पैशासही लागू आहे. समाजातील अनेक देवघेवींचें साधन म्हणून पैशास असलेली मागणी कायम राहून पैशाचा पुरवठा जर कमी अगर जास्त झाला तर त्याचा इतर उपयुक्त वस्तूंशीं असलेला मूल्यसंबंध जास्त किंवा कमी होईल. पैशाचें मूल्य असें वाढलें किंवा कमी झालें म्हणजे वस्तूंच्या किंमती कमीजास्त होतील, ही गोष्ट इंच व शेर या मापांतील फेरबदलाचें उदाहरण घेऊन मागील प्रकरणांत स्पष्ट केलेलीच आहे. मागणी व पुरवठा याचा नियम, ठोकळ मानानें वस्तूंचा पुरवठा कमी अधिक झाल्यास त्याची किंमत अनुक्रमे जास्त कमी होते एवढेच सांगत असून तो पैशाच्या पुरवठ्यास लावला असतां त्यास 'पैशाचा परिमाणविषयक सिद्धांत' अगर 'विनिमयसाधन-परिमाणमूलक सिद्धांत,' असें म्हणतात. वरवर पहाणारास इंच व शेर यांच्या उदाहरणावरून हा सिद्धांत जरी पटण्यासारखा असला, तरी ज्यांस अर्थशास्त्राचा सोपपत्तिक विचार करावयाचा आहे, त्यास हा सिद्धांत व्यावहारिक परिस्थितीस लागू पडण्यास काय काय अडचणी आहेत, हे अवश्य पाहिलें पाहिजे.

पहिल्याप्रथम हे लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं, पैशास असलेली मागणी कायम राहून पुरवठ्यांत फेरबदल झाला तरच किंमतींतील चढउतार पैशाच्या वाढीमुळें किंवा दुर्मिळतेमुळें घडून आले, असें म्हणतां येईल. आता, पैशाचा प्रत्येक मनुष्यास एवढा हव्यास असतो कीं, पैशास असलेली मागणी अपरिमित आहे, असें कित्येकांस वाटेल. परंतु पैसा ह्या वस्तूबद्दल मनुष्यास जी अमर्याद व अपरिमेय हाव दिसून येते व जीमुळें कित्येक कवडीचुंबक लोक कांही उपभोग न घेता अगणित द्रव्य पुरून ठेवतात, ती क्षणभर बाजूस ठेवली तर साधारण व्यवहारी मनुष्य पैसा ही वस्तु मानवी सुखाचें साध्य नसून केवळ एक साधन आहे ही गोष्ट जाणून असतो, असें आपणांस दिसून येईल. निरनिराळ्या प्रकारचे सुखसंवर्धक पदार्थ पैशाच्या साहाय्यानें मिळवितां येतात म्हणून व्यक्तिमात्रास पैशाची जरूर भासते. एरवी गळ्याभोंवती सोन्यारुप्यांच्या नाण्यांची माळ घालून किंवा जमीनीत द्रव्य केवळ पुरून ठेवून पैशाचा उपभोग घ्यावा, अशी साधारण मनुष्यास

इच्छा नसते. ह्यावरून ज्या उपयुक्त वस्तूंचा पैशाच्या साहाय्यानें विनिमय व्हावयाचा त्या वस्तूंच्या पुरवठ्यांतील फेरबदल हे पैशास असलेल्या मागणींतील फेरबदल होत, हें उघड होईल. ज्या वस्तू स्वतः उत्पादक वापरतात अगर ज्यांची देवघेव पैशाच्या साहाय्याशिवाय म्हणजे ऐनजिनसी होते त्या वस्तू कितीही वाढल्या किंवा कमी झाल्या तरी त्यामुळें पैशास असलेली मागणी यत्किंचितही बदलणार नाही.

पैशाच्या विनिमयसाधनत्वावर त्यास असणारी मागणी अवलंबून आहे हें ध्यानांत ठेवल्यास पैशाच्या परिमाणविषयक सिद्धांतांतील दुसरीही एक महत्त्वाची गोष्ट आपणांस कळून येईल. वस्तूंचा किंवा पैशाचा पुरवठा हा केव्हांही एकदम बाजारांत येऊन त्यांचे परस्पर मूल्य ठरतें, असें कधीही होत नाही. तर एका बाजूनें हळहळू उपयुक्त वस्तू बाजारांत येत असतात व अनेक मार्गांनी थोडथोडे पैसेही उपभोक्ते, उत्पादक व व्यापारी यांत पसरत असतात. पैशाच्या एकंदर परिमाणापैकी जो भाग विवक्षितकाळी विनिमयाचें साधन होण्यास उपलब्ध होतो त्याच्यांतील फेरबदलावर पैशाचें मूल्य मुख्यत्वेंकरून अवलंबून असतें, असें वास्तविकरीत्या म्हटलें पाहिजे. परंतु साधारणपणें पैशाच्या एकंदर पुरवठ्यातील फेरबदल हे त्याच्या व्यावहारिक उपयोगास पडणाऱ्या भागांतही जवळजवळ तितक्याच प्रमाणांत दिसून येत असल्यामुळें त्या दोहोंतील सूक्ष्म भेद विशेष ध्यानांत घेतला जात नाही. लोकसंख्येच्या वाढीमुळें किंवा दुसऱ्या एखाद्या कारणानें विनिमय जसजसा वाढत जातो तसतशी पैसा वापरण्याची संवयही वाढत जाते; आणि पैशाचा पुरवठा न वाढतां त्याचें अभिसरण मात्र जास्त वेगानें होऊं लागतें. परंतु पैशास असलेली मागणी, म्हणजे देवघेवीच्या पदार्थांचें परिमाण, जर मध्यंतरी कायम राहील तर ह्या वाढत्या अभिसरणानें पैशाचा पुरवठाच वाढला असें होऊन किंमती वाढूं लागतील. उलट पक्षीं, उपयुक्त वस्तूंचा पुरवठा न वाढतां जर वहातुकीची साधनें सुधारल्यामुळें किंवा कांहीं अन्य कारणांनी त्याचा विनिमय मात्र अधिक जलद होऊं लागला तर पैशास असलेली मागणी, वस्तूंचा पुरवठा न वाढतांनाही, अधिक तीव्र झाली असें म्हणावें लागेल; आणि पैशाचें मूल्य वाढून इतर वस्तूंच्या किंमती कमी होतील.

पैशाचें अभिसरण व पदार्थांची देवघेव ही किती हळू अगर जलद होत आहेत ह्या गोष्टी, वरील परिमाणमूलक सिद्धांतावरून व्यावहारिक अनुमानें काढतांना ध्यानांत घ्याव्या लागतात, हें वरील विवेचनावरून उघड होईल. शिवाय, पैसा म्हणजे केवळ धातूंची नाणी नसून सरकारी व खाजगी नोटा आणि इतर कागदी चलनें ह्यांच्या कमी अधिक पुरवठ्यानेंही पदार्थांच्या किंमती बदलतात. कागदी चलनांपैकीं कित्येकांचा पुरवठा धात्वात्मक पैशावर व कांहींचा विनिमयविषयक परिस्थितीवर अवलंबून असतो. कागदी चलनाचा प्रसार, विनिमयाची परि-

स्थिति, पैशाच्या अभिसरणाचा वेग इत्यादि सर्व गोष्टी स्थिर आहेत अशी कल्पना केल्यास जर एकंदर पैशाचा सांठा वाढला तर तेवढ्या प्रमाणांत वस्तूंच्या किंमतीही वाढतील असें तात्त्विक दृष्ट्या म्हणण्यास हरकत नाही. परंतु ह्या सर्व बाबतींतील फरबदल कित्येक वेळा एवढे खोल व सूक्ष्म असतात की, पैशाच्या वाढीमुळें किंमती थोड्याबहुत वाढण्याचा व पैशाचा पुरवठा कमी झाल्यास त्या उतरण्याचा संभव असतो, एवढीच गोष्ट आपणांस नक्की धरून चालतां येईल. एखाद्या विवक्षित वेळीं व ठिकाणीं झालेले पैशांतील व किंमतींतील फरबदल ह्यांत अन्योन्यसबंध किती आहे, याचा निर्णय तेथील चलनपद्धति, पेढ्यांचे व्यवहार व अंतर्राष्ट्रीय व्यापार इत्यादि गोष्टींचा विचार करूनच द्यावा लागतो.

६ **चलन**— उपयुक्त वस्तूंची देवघेव होण्यास ज्या एका वस्तूचा सर्वसाधारण प्रमाण किंवा माप व विनिमयाचें माध्यम म्हणून उपयोग करण्यात येतो त्यास पैसा असें म्हणतात, हे वर सांगितलेंच आहे. कित्येकजणाचा असा समज असतो की, पैसा केवळ वस्तुमय किंवा धात्वात्मक असला पाहिजे. सरकारी किंवा खाजगी नोटांस स्वतःचें असें कांहीच मूल्य नसल्यानें, त्यास हे लोक पैसा असें म्हणत नाहीत. दुसरे काही लोक पैशांतील सरकारी मान्यतेच्या गुणास प्राधान्य देऊन धात्वात्मक नाणीं व सरकारी नोटा यासच पैसा ह्या नांवानें संबोधतात. उलटपक्षीं, कित्येक वेळां सोन्याचांदीची नाणीं, सरकारी व खाजगी नोटा, हुंड्या, चेक इत्यादि कागदी चलनें या सर्वांचा 'पैशांत' अंतर्भाव केला जातो. पैसा ह्या शब्दाच्या वरील रूढ अर्थांपैकी एकही अर्थ अर्थशास्त्रास सर्वस्वी सम्मत असा नाही. साधारणपणें व्यवहारांत जें नाणें किंवा नोटांसारखी दुसरी वस्तु सर्व लोक देणेदाराच्या संपत्तीचा किंवा विश्वासूपणाचा विचार न करिता, स्वतःच्या कर्जफेडीदाखल बिनदिक्कत स्वीकारतात तीसच वास्तविकपणें पैसा असें म्हणणें योग्य आहे. परंतु एकंदर समाजांतील संपत्तीच्या विनिमयाचा विचार कर्तव्य असतां नाणीं आणि सरकारी व खाजगी नोटा यांबरोबर चेक, हुंड्या, वगैरे देवघेवीच्या इतर साधनांचाही विचार करावा लागतो. वैयक्तिक व राष्ट्रीय विनिमयास उपयोगी पडणाऱ्या धात्वात्मक व कागदी अशा सर्व साधनांस आर्थिक परिभाषेंत चलन असें म्हणतात. धात्वात्मक व कागदी पैसा व अनेक प्रकारच्या हुंड्या आणि चेक या सर्वांचा चलनांत समावेश होतो. कांही थोड्या राष्ट्रांत धातूची नाणीं मुळींच वापरली जात नसून सर्व व्यवहार कागदी पैशाच्या साहाय्यानेंच केला जातो. अशा देशांचें उदाहरण सोडून दिल्यास आपणांस असें दिसून येईल की वस्तूंच्या विनिमयास चलनाच्या सर्व घटकांचें साहाय्य होत असलें तरी मूल्यमापनाचें परिमाण म्हणून त्यांतील एखाद दुसऱ्या नाण्याचाच उपयोग करतात. अशा नाण्याचा इतर उपयुक्त वस्तूंशी असलेला मूल्यसंबंध त्या नाण्यांतील धातूच्या

मूल्याइतका असतो व त्यास राजमान्य, मापक किंवा प्रमाणभूत पैसा असे म्हणतात. नाण्यांतील धातूचें व प्रत्यक्ष नाण्याचें मूल्य समान असल्यानें असलीं नाणीं पाडून घेण्यास बहुतेक राष्ट्रांतील सरकारी टांकसाळी तेथील प्रजाजनांस खुल्या असतात.

देवघेवीच्या लहानसहान व्यवहारांत उपयोगी पडण्याकरितां प्रमाणभूत नाण्यापेक्षां कमी परिमाणाचीं अनेक प्रतीकरूप किंवा दुय्यम नाणीं कमी मूल्यवान् धातूंचीं पाडलेलीं असतात. ह्या प्रतीकरूप नाण्यांचा पुरवठा सर्वस्वी सरकारी हुकुमतीखालीं असून त्यांचें मूल्यही त्यांच्यातील धातूच्या मूल्याहून कायद्यानें अधिक ठरविलेलें असतें. प्रमुख किंवा राजमान्य आणि प्रतीकरूप किंवा दुय्यम नाण्यांशिवाय चलनामध्यें सरकारी व निमसरकारी नोटा, चेक, हुंड्या इत्यादिकांचा समावेश होतो व त्यास कागदी, पतीचा किंवा विश्वासात्मक पैसा असें म्हणतात. कारण चलन म्हणून त्याचा उपयोग होण्यास ज्या व्यक्तींचा किंवा संस्थांचा त्यांत संबंध येतो त्यांच्या आर्थिक पतीवर तसले पैसे घेणाराचा विश्वास असावा लागतो. चलनाच्या धात्वात्मक व कागदी घटकांपैकीं ज्याचा ऋणविमोचनाकरितां स्वीकार करण्याची धनकोवर कायद्यानें सक्ती केलेली असते त्यास कायदेशीर किंवा कर्जफेडीचा पैसा असें म्हणतात चलनाच्या एकंदर प्रकारांपैकीं कांहीं थोड्यासच कर्जफेडीस योग्य ठरविण्यांत देण्याघेण्याचे व्यवहार लबाडीनें होऊं नयेत हाच सरकारचा मुख्य उद्देश असतो. अशा कायदेशीर चलनाच्या पुरवठ्यावर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें सरकारचें नियंत्रण असतें, तेंही याच कारणामुळें होय. सर्वमान्य पैसा व सरकारी नोटा यांचा वाटेल तेवढ्या रकमेच्या कर्जफेडीस उपयोग करण्यास कायद्यानें मुभा ठेविलेली असते. परंतु दुय्यम नाण्यांचा पुरवठा व त्यांची अंगभूत धात्वात्मक उपयुक्तता ही मर्यादित असल्यामुळें त्यांचा कायदेशीर कर्जफेडीस कांहीं विवक्षित मर्यादेपर्यंतच उपयोग करतां येतो

पौंड अगर रुपया यांसारखें एकच नाणें कायद्यानें मान्य केलें असलें तरी जर एकाच वेळीं कांहीं चांगलीं व कांहीं झिजलेलीं नाणीं प्रचलित असलीं तर लोक झिजलेल्या नाण्यांचा विनिमयार्थ उपयोग करून चांगलीं नाणीं शक्य तोंवर आपल्या गांठीं बाळगतील. कांहीं एका ठराविक मर्यादेपलीकडे नाण्यांची झिज झाल्यास तीं वितळवून पुन्हां नवीं नाणीं पाडण्याचा सरकारी प्रघात असतो तो राजमान्य नाण्यांत होतां होईल तों चांगलें वाईट असा फरक पडूं नये म्हणूनच होय वस्तूंची देवघेव करीत असतां साधारणपणें प्रत्येक मनुष्य झिजलेलें किंवा कमी मूल्यवान् नाणें दुसऱ्यास देऊन जास्त मूल्यवान नाणीं आपल्याजवळ ठेवतो याचें कारण तीं वितळवून त्यांतील धातू आपल्या अगर परदेशाच्या बाजारांत नेऊन विकल्यास त्याचा फायदा होण्याची खात्री असते हें होय. जोंपर्यंत कायदेशीर पैसा एकाच धातूचा बनविलेला असतो तोंपर्यंत कमी मूल्यवान् नाणीं

व्यवहारांत खेळत राहून जास्त मूल्यवान् नाणी नाहीशी होण्याचें भय कमी असतें कारण नाण्याच्या धात्वात्मक मूल्याहून त्याचें कायदेशीर मूल्य कमी जास्त झाल्यास टांकसाळींत नवी नाणीं पाडवून किंवा जुन्या नाण्यांची धातू म्हणून विक्री करून सर्व नाणी सारख्याच किमतीची करतां येतात. धात्वात्मक पैशाबरोबरच कागदी पैसा चलन म्हणून खेळत असेल आणि हा कागदी पैसा लोक कमी विश्वसनीय अतएव कमी मूल्यवान् समजत असतील तर धात्वात्मक पैसा हळुहळु व्यवहारांतून नाहीसा होईल. कागदी पैशावरील लोकांचा विश्वास उडूं लागतांच धात्वात्मक पैशाचा व्यवहारांतील पुरवठा मर्यादित होतो, ह्या तत्त्वाचा हिंदुस्थानां-तील लोकांस युद्धकाळीं चांगलाच अनुभव आला. खेड्यापाड्यातच नव्हे तर मोठमोठ्या शहरांतही, दहा रुपयांच्या नोटीचे नऊ रुपये रोख मिळणें देखील दुरापास्त झालें होतें. परंतु ज्या देशांत कायदेशीर नाणीं सोनें व चांदी ह्या दोन्ही धातूंची करतात व त्यांचा परस्पर मूल्यसंबंध कायद्यानें ठरवून देतात तेथें मात्र त्यापैकीं एखाद्या धातूच्या बाजारभावांत फरक झाल्यास एका धातूची नाणी जास्त मूल्यवान् व दुसरीची कमी मूल्यवान् असें नेहमी होण्याचा संभव असतो; म्हणजे एका धातूच्या नाण्याचा दुसऱ्या धातूच्या नाण्याशी जो कायदे-शीर मूल्यसंबंध ठरविलेला असतो तो त्या नाण्यांतील धातूचा बाजारांत जो पर-स्पर मूल्यसंबंध ठरतो त्याहून निराळा होतो. एखाद्या धातूच्या नाण्याचें कायदेशीर मूल्य बाजारभावाहून अधिक तर दुसऱ्याचें कमी असा फेरफार होत राहतो. अशा वेळीं दोन्ही धातूंची नाणीं कायद्यानें कर्जफेडीस योग्य ठरविलेली असूनही व्यवहारांत मात्र एकाच धातूचें नाणें चालत असलेलें दिसून येतें. वस्तूंच्या विनिमयास नेमका पुरेसा होईल इतकाच पैशाचा पुरवठा करणें नेहमीच कठिण असतें. परंतु त्यांतही नाणी दोन धातूंची केलेली असल्यास विशेष अडचणी उपस्थित होतात. नाण्यांचें कायदेशीर मूल्य व धात्वात्मक मूल्य यात फरक पडून बाजारांत जास्त मूल्यवान् ठरणारी नाणी नाहीशी होऊन कमी मूल्यवान् नाणीच विनिमयास उपलब्ध होतात. कमी मूल्यवान् नाणें व्यवहारांत खेळतें राहून अधिक मूल्यवान् नाणें लोकांनीं आपल्याजवळ ठेवावें किंवा स्वदेशीं अगर परदेशी विकून टाकावें या चमत्कारास 'ग्रेशामचा नियम' असें म्हणतात; व पैशाच्या सर्व प्रकारास तो सारखाच लागू आहे.

**७ सोन्याचांदीची अथवा द्विमूल्यमापन चलनपद्धति**—सर्वमान्य नाणें एकाच धातूचें असावें, असें ठरविलें तरी तें सोन्याचें असावें की चांदीचें असावें हा प्रश्न शिल्लक उरतो. कित्येक अर्थशास्त्रज्ञांच्या मतें सर्व धात्वात्मक नाणी ही समाजाच्या अप्रगल्भ अवस्थेची द्योतक असून हल्लीं मनुष्यसमाजांची जी आर्थिक प्रगति होत आहे तिच्यामुळें पैशाचें सर्व काम कागदी चलनानें भागवितां येण्यासारखें

आहे. चलनपद्धतींत सोन्याचांदीची, निव्वळ सोन्याची किंवा निव्वळ चांदीची आणि कागदी असे हे भेद असून त्यांचा क्रमशः विचार करणें जरूर आहे. एखाद्या देशात कायदेशीर पैसा सोनें व चांदी ह्या दोन्ही धातूंचा केलेला असून दोन्ही धातूंची प्रमुख नाणी कायदेशीर कर्जफेडीस सर्वस्वी योग्य समजली जात असतील तर तेथें द्विमूल्यमापन चलनपद्धति अस्तित्वांत आहे, असें म्हटलें पाहिजे. अशा पद्धतीचा एक विशेष हा आहे की, दोन्ही धातूंची नाणीं टांकसाळींतून पाडून घेण्यास लोकांस पूर्ण मुभा असते व दोन्ही धातूंच्या नाण्यांचें परस्पर मूल्यप्रमाण कायद्यानें कायमचे ठरविलेलें असतें. सोनें अगर चांदी ह्या धातू ऐनजिनसी टांकसाळीत आणून दिल्यास त्यांबद्दल त्यांची ठराविक वजनाची नाणी पाडून मिळतात व त्यांचा व्यवहारांत कायदेशीर प्रमाणानें उपयोग होतो. द्विमूल्यमापन चलनपद्धति पूर्णपणें प्रस्थापित होण्यास दोन्ही धातूंची नाणीं कर्जफेडीस सर्वस्वी समर्थ असून ती टांकसाळींतून बिनहरकत पाडून मिळण्याची व्यवस्था करावी लागते; आणि त्यांचे परस्पर मूल्यप्रमाणही कायद्यानें ठरवावें लागतें. अशी निर्भेळ द्विमूल्यमापन पद्धति सुधारलेल्या राष्ट्रांत हल्ली क्वचितच पहावयास मिळते. फ्रान्स व अमेरिका ह्यांसारख्या कांहीं देशांत सोनें व चांदी ह्या दोन्ही धातूंची नाणीं कर्जफेडीस सारखींच योग्य असूनही टांकसाळीत मात्र त्यांपैकीं एकाच धातूची म्हणजे सोन्याची नाणी पाडून घेण्यास लोकांस मुभा असते. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत अनेक पाश्चात्य राष्ट्रांत निर्भेळ द्विमूल्यमापन पद्धति प्रस्थापित करण्याचे अनेक प्रयत्न झाले व हिंदुस्थानांतील चलनविषयक परिस्थितीवरही ह्या प्रयत्नांचा बराच परिणाम झालेला आहे. परंतु इतके निकराचे प्रयत्न करून देखील ही दुहेरी पद्धत धड टिकूं शकली नाही, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ह्या पद्धतीच्या प्रमुख गुणदोषांचा काहींसा विचार केल्यास वरील प्रयत्न निष्फळ होण्याचे खरें कारण दिसून येईल.

ज्या पैशाच्या उपयुक्ततेने दुसऱ्या वस्तूंची उपयुक्तता मोजावयाची तिचा इतर वस्तूंच्या उपयुक्ततेशी असलेला मूल्यसंबंध कायम असणें अवश्य आहे. राजमान्य व प्रमाणभूत पैसा एकाच धातूचा केलेला असेल तर त्या धातूच्या मूल्याबरोबर पैशाचें मूल्य कमी अधिक होऊन वस्तूंच्या किंमतींत निष्कारण फेरबदल होत राहतात. समाजाच्या आर्थिक प्रगतीस अशा फेरबदलांपासून अडथळा उपस्थित होतो हें निर्विवाद आहे. द्विमूल्यमापन चलनपद्धति अंगिकारिल्यास पैशाच्या मूल्यांतील चढउतार बहुंशी टाळतां येतात असें कित्येक अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. एक तर दोन्ही धातू टांकसांळीत सारख्याच घेतल्या जात असल्यामुळें एकंदर पैशाचा पुरवठा मुबलक राहतो; व एका धातूच्या किंमतीत फरक झाला तरी एकंदर पैशाच्या मूल्यावर विशेष परिणाम होत नाही. शिवाय एका धातूची किंमत वाढल्यास दुसऱ्या धातूची किंमत कमी होण्याचा संभव असतो व त्यामुळें पदा-

र्थाच्या किंमती स्थिर राहण्यास मदत होते. ह्या पद्धतींतील आणखी एक विशेष म्हणजे तिच्यामुळें अंतर्राष्ट्रीय व्यापारास मिळणारें उत्तेजन हें होय. ज्या राष्ट्रांत द्विमूल्यमापन पद्धति चालू असते तेथील व्यापाऱ्यांस सोनें किंवा चांदी यांपैकीं कोणत्याही धातूची चलनपद्धति असलेल्या राष्ट्रांशी व्यापारी देवघेव करणें सुलभ असतें. ह्या दोन्ही गुणांवर विरजण घालून द्विमूल्यमापन पद्धतीस अव्यवहार्यतेच्या कोटींत ढकलणारे कित्येक दोषही त्या पद्धतींत आढळतात. सोनें व चांदी यांमध्ये कायद्यानें ठरविलेला मूल्यसंबंध त्यांच्या बाजारांतील मूल्यप्रमाणाहून जवळजवळ नेहमींच निराळा असतो. त्यामुळें कोणत्या तरी एका धातूची नाणीं नेहमीं जास्त मूल्यवान् ठरून, दुसरीं कमी मूल्यवान नाणीं मात्र व्यवहारांत शिल्लक राहा तात ह्याबद्दल मागें निर्देश केलेला आहे. अनेक लोक ह्या फेरबदलामुळें नाणीं वितळवून व तीं बाजारांत विकून आपला फायदा करून घेतात. शेवटीं आज सोन्याचें तर उद्यां चांदीचें असें कोणतें तरी एक नाणें समाजांत खेळतें राहून संपत्तीच्या विनिमयांत व त्याबरोबर एकंदर आर्थिक व्यवहारांत गोंधळ उडून जातो आणि उत्पादकांस आपला धंदा करणें धोक्याचें वाटू लागतें. सोन्याच्या व चांदीच्या नाण्यांमधील कायद्यानें ठरविलेला मूल्यसंबंध हा त्या नाण्याचा केवळ दोन धातूंचे तुकडे म्हणून बाजारांत जो मूल्यसंबंध ठरेल त्याहून निराळा होण्याचा संभव, हा द्विमूल्यमापनपद्धतींतील प्रमुख दोष होय, असें वर सांगितलें आहे. अधिक मूल्यवान् धातूचीं नाणीं वितळवून तीं आपल्याच किंवा दुसऱ्या राष्ट्राच्या बाजारांत विकून त्याबद्दल कमी मूल्यवान् नाणीं कायदेशीर प्रमाणापेक्षा जास्त कशीं मिळवितां येतात हें पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल. एखाद्या देशांत सोनें व चांदी यांच्या प्रमुख नाण्यांचें १:१५ हें प्रमाण कायद्यानें ठरविलें आहे व हीं दोन्ही नाणीं पाडून देण्यास टांकसाळी पूर्ण खुल्या आहेत असें आपण समजूं. मग बाजारांत एक तोळा सोन्याबरोबर पधरा तोळे चांदी हें प्रमाण बदललें व एका सोन्याच्या तोळ्यास सोळा तोळे चांदी मिळूं लागली तर सोनें व चांदी यांच्या नाण्यांचें वास्तविक प्रमाण १:१६ हें होईल. म्हणजे बाजारांतील किंमतीच्या दृष्टीनें सोन्याचें नाणें कायदेशीर प्रमाणाहून अधिक मूल्यवान् व चांदीचें नाणें कमी मूल्यवान् ठरेल. सोन्याचीं नाणीं वितळवून तीं बाजारांत विकल्यास त्यांच्या सोळापट चांदी खरेदी करतां येईल व ही चांदी पुन्हां टांकसाळींत आणल्यास त्याबद्दल ठराविक वजनाचीं नाणीं अधिक पाडून घेतां येतील. हीं नाणीं देवघेवीस सोन्याच्या नाण्याइतकींच राजमान्य असल्यानें सोन्याचें नाणें वितळवून पर्यायानें चांदीच्या पधरा नाण्यांऐवजी सोळा नाणीं मिळूं शकतात. शुद्ध सोन्याच्या नाण्यांच्या कायदेशीर मूल्यांत त्या योगानें $\frac{1}{15}$ ची भर टाकतां आली असें म्हटलें पाहिजे. उलटपक्षीं बाजारी प्रमाण १:१७ असें झाल्यास चांदीचीं नाणीं कायदेशीर प्रमाणाहून अधिक मूल्यवान्

हातील व ती वितळवून त्यांपैकीं पंधरा नाण्यांतील धातू विकल्यानें १ १/१४ सोन्याच्या नाण्यांतील सोनें मिळेल. मग हें सोनें टांकसाळींत देऊन त्या ऐवजी एकाहून अधिक सोन्याची नाणी मिळतील व व्यवहारांत ती चांदीच्या नाण्यांच्या बरोबरीनें देव-घेवीस समर्थ होतील. चांदीची पधरा नाणी वितळवून सोन्याच्या एका नाण्यापेक्षां अधिक कायदेशीर पैसा हातीं येत असल्यानें प्रत्येकजण नाणीं वितळविण्याचा अगर परदेशीं पाठवून विकण्याचा प्रयत्न करील. चलनाच्या पुरवठ्यांत असा गोंधळ उडाल्यास सरकारचें आर्थिक सामर्थ्य बरेंच कमी होऊन देशांतील उद्योगधंद्यास सट्टेबाजीचें स्वरूप येतें.

**८ द्विमूल्यमापनपद्धति व अंतर्राष्ट्रीय करार**— दोन धातूंच्या प्रमुख नाण्यांचा कायदेशीर व बाजारी प्रमाणांत अंतर पडण्याचें कारण हें आहे कीं, निरनिराळ्या राष्ट्रांस सोनें व चांदी ह्यांची इतर वस्तूंप्रमाणेंच जरूर असते व ज्याप्रमाणें मागणी व पुरवठा ह्यांच्या भिन्न परिस्थितीमुळें इतर पदार्थांच्या किंमती प्रत्येक राष्ट्रांत थोड्याफार निरनिराळ्या असतात त्याचप्रमाणें सोनें व चांदी ह्यांच्या किंमतीही निरनिराळ्या राष्ट्रांत थोड्या फार भिन्न असूं शकतात. त्यांतही प्रत्येक राष्ट्रांतील मागणी– पुरवठ्याच्या बदललेल्या परिस्थितीस अनुसरून सोन्याचांदीच्या किंमतींत चढउतार होत राहतो, आणि त्यामुळें जास्त मूल्यवान् नाणें परराष्ट्रांस पाठवून वर सांगितलेल्या रीतीनें आपला फायदा करून घेणें धूर्त व्यापाऱ्यास शक्य होतें. परंतु सर्व राष्ट्रांत, निदान ज्या सुधारलेल्या राष्ट्रांचा आपापसांतील व्यापार विस्तृत प्रमाणावर चालूं आहे त्यांत तरी, सोनें व चांदी यांचा परस्पर मूल्यसंबंध, किंवा त्यांची किंमत, ही एकच व कायमची ठेवतां आली तर त्या सर्व राष्ट्रांतील कायदेशीर व बाजारी प्रमाण हें सारखें राहण्याचा अधिक संभव असतो. कारण परराष्ट्रांतील कायदेशीर प्रमाण तेंच असल्यामुळें नाणीं जास्त मूल्यवान् होऊन धातू म्हणून विकलीं जातांच मागणीच्या मानानें एका धातूचा पुरवठा अधिक व दुसरीचा कमी होऊन बाजारभाव लवकरच कायदेशीर प्रमाणावर येण्यास मदत होते. दोन्ही धातूंच्या मागणीची व पुरवठ्याची ही परस्पर-विरोधी परंतु संस्थापक क्रिया द्विचलनपद्धति अनेक राष्ट्रांत चालू असल्यास विशेष परिणामकारक होऊं शकते. ह्या कारणास्तव, सर्व सुधारलेलीं राष्ट्रें सोन्याचांदीचें एकच प्रमाण कायम करतील तर त्यांस द्विचलनपद्धति अंगिकारितां येऊन तिच्यांतील मागें सांगितलेले अनेक महत्वाचे फायदे मिळवितां येतील. असें असून आजवर असा अंतर्राष्ट्रीय करार घडवून आणण्याचे जे प्रयत्न झाले ते सर्व अयशस्वी ठरले, हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. कित्येक लोकांच्या मतें सोनें व चांदी यांचें मूल्य हें त्या त्या धातूच्या मागणी पुरवठ्यावरच सर्वस्वी अव-लंबून असून एक किंवा अनेक राष्ट्रांतील सरकारी कायद्यानें त्यांचें मूल्य कायमचें

ठरवूं पाहणें अव्यवहार्य आहे. सोन्याचांदीस असलेली मागणी ही केवळ सरकारी नाणीं पाडण्याकरितां नसून, डागदागिने व इतर शोभेचे जिन्नस करण्यासही त्यांची जरूरी असते. किंबहुना सोन्याचांदीच्या ह्या दुसऱ्या उपयोगावरच त्यांची चलनविषयक उपयुक्तता अवलंबून आहे असें म्हटलें असतां चालेल. सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतील कायद्यांनी सोन्याचांदीस असलेली सामान्य लोकाची मागणी नियंत्रित करण्याचें जोंपर्यंत ठरविलें नाहीं तोंपर्यंत त्यांच्या मूल्यांत चढउतार हा नेहमीं होत रहावयाचाच. अंतर्राष्ट्रीय करारास विरोध करूं इच्छिणाऱ्या ग्रंथकारांचा हा मुद्दा कांहींसा खरा असला तरी जगांतील सोन्याचांदीच्या एकंदर पुरवठ्यापैकीं बराच मोठा भाग नाणीं पाडण्यास उपयोगी पडतो, हें विसरतां कामा नये. सर्व प्रमुख राष्ट्रांतील शासनसंस्था एकच आहेत असें धरून चाललें तर सोन्याचांदीच्या बाजारांत गिऱ्हाईक ह्या नात्यानें त्यांची बरीच मक्तेदारी आहे, असें म्हटलें पाहिजे. एवढी एकमुखी मागणी जर एका भावानेंच होईल तर इतर गिऱ्हाइकांसही त्याच भावानें माल देणें पुरवठा करणारांस भाग पडेल. आतां हें खरें कीं, मक्तेदारीच्या ह्या अधिकारासही कांहीं मर्यादा आहेत. उदाहरणार्थ, सोन्याच्या किंवा चांदीच्या अनेक खाणी एकदम सांपडल्यास त्या धातूंचा मूल्यसंबंध बदलणें अपरिहार्य आहे. परंतु मागणी व पुरवठा यामध्यें एकदम तीव्र फेरबदल न होतील तर अंतर्राष्ट्रीय करारांनीं सोन्याचांदीचें मूल्य ठरविणें अशक्य नाहीं. परंतु असले करार न होण्यास पुढारलेल्या राष्ट्रांत स्वतःच्या इभ्रतीबद्दल व वैभवाबद्दल रूढ असलेल्या कल्पना ह्याही कारणीभूत झाल्या आहेत. इंग्लंड सारख्या अंतर्राष्ट्रीय व्यापारावर संपन्न झालेल्या राष्ट्रास सोन्याचा पुरवठा मुबलक होत असून त्यांच्या चलनविषयक गरजा निव्वळ सोन्याची एकचलनपद्धति चालू ठेवल्यानें भागण्यासारख्या होत्या. त्यामुळें चांदीसारख्या कमी मूल्यवान धातूचा अंगिकार करणें त्यांस हलक्या प्रतीचें वाटावें यांत आश्चर्य नाहीं. प्रगति व वैभव यांचा सोन्याशीं आणि दुर्गति व दारिद्र्य यांचा चांदीशीं सहजच संबंध जोडण्यांत आला. त्यांतही सर्व राष्ट्रांस मान्य होईल असें एकच मूल्यप्रमाण ठरविण्याची अशक्यता, सध्यां प्रचलित असलेल्या किंमती व देण्याघेण्याचे व्यवहार ह्यांत फेरबदल घडवून आणण्यानें उत्पन्न होणारा असंतोष इत्यादि इतर व्यावहारिक अडचणींची भर पडून अंतर्राष्ट्रीय करार होणें दुरापास्त झालें. शिवाय, सोन्याचा पुरवठा वाढत्या प्रमाणांत होऊन सर्व राष्ट्रांच्या चलनविषयक गरजा भागविण्यास पुरेसें होईल एवढें सोनें मिळण्याची शक्यता दिसूं लागली. त्याचप्रमाणें धात्वात्मक पैसाच शक्य तितका कमी करून अनेक प्रकारच्या कागदी चलनाच्या साहाय्यानें विनिमय घडवून आणावा असें मत व असा प्रचार प्रसृत होत आहेत. धात्वात्मक चलनासच गौणस्थान मिळाल्यानें द्विचलनपद्धतीच्या अंतर्राष्ट्रीय कराराचा हा प्रश्न हल्लीं मागें पडला आहे.

**९ सुवर्णचलन व सुवर्णपरिवर्तनपद्धति**— द्विमूल्यमापन चलनपद्धती-मुळे पैशाच्या स्वतःच्या मूल्यांत होणारे फेरबदल शक्य तितके कमी करतां येतात व एकदर पैशाचा पुरवठाही मुबलक राहतो हे त्या पद्धतीचे जे दोन मुख्य गुण मागे सांगितले ते कोणत्याही एकधातुमय पद्धतीत अल्प प्रमाणांतच सांपडणार. ह्या दृष्टीनें द्विमूल्यमापन पद्धतीशीं तुलना केल्यास केवळ सुवर्णमूल्यमापन पद्धति व रौप्यमूल्यमापनपद्धति ह्या सदोष आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. परन्तु द्विमूल्यमापनपद्धति अव्यवहार्य ठरण्याची वर जी कारणें दिली आहेत त्यांवरून सहजच एकधातुमय पद्धतीचें व्यवहार्यत परतें तरी श्रेष्ठत्व सिद्ध होतें. सोनें किंवा चांदी ह्यापैकीं कोणत्याही एका धातूची नाणीं प्रमाणभूत व कायदेशीर ठरविलेलीं असलीं तर चलनपद्धतींत नाण्यांच्या कायदेशीर व बाजारी मूल्यप्रमाणांतील फेरबदलापासून होणारे घोटाळे नाहींसे होतात; व उपयुक्त वस्तूंचा विनिमय करण्यास साधें व सर्वांस सहज समजेल असें साधन उपलब्ध होतें. आर्थिक दृष्ट्या प्रगति होत असलेलीं राष्ट्रें साधारणपणें समृद्ध असून त्यांचे व्यवहारही बऱ्याच मोठ्या प्रमाणांत होत असतात, ह्यामुळें सर्वत्र चांदीपेक्षां सोनें हीच धातू चलनास विशेष उपयुक्त समजली जाते. चीन हें एकच महत्त्वाचें राष्ट्र आजमितीस चांदीची नाणीं प्रमाणभूत व कायदेशीर म्हणून वापरतें. बाकी सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत सुवर्णचलन पद्धति प्रस्थापित झालेली आहे. कांहीं देशांत मात्र सुवर्ण-चलन, रौप्यचलन अगर द्विचलन ह्यांपैकीं कोणतीच पद्धत पूर्णांशानें अंगिकारिलेली नसून त्या सर्वांचा अंशरूपानें त्यांच्या चलनपद्धतींत अंतर्भाव केलेला असतो. अंतर्राष्ट्रीय देवघेव सुलभ व्हावी म्हणून मूल्यमापक परिमाण व परदेशी कर्जफेडीचें साधन हीं दोन्हीं सुवर्णात्मकच असतात. परंतु विनिमयाचें प्रमाण अल्प असल्यानें किंवा लोकांस पेढ्यांच्या द्वारें पैसा उद्योगधंदे व व्यापार ह्यात न गुंतवितां जवळ बाळगून ठेवण्याची संवय असल्यानें, अंतर्गत देवघेवीचें साधन मात्र चांदीचेंच असतें. हीं चांदीचीं नाणीं कायदेशीर कर्जफेडीस सर्वस्वी योग्य ठरविलेलीं असतात; परंतु द्रव्यम पैशाप्रमाणें त्यांचा पुरवठा पूर्णपणें सरकारच्या ताब्यांत असून टांकसाळींत लोकांस तीं पाडून मिळत नाहींत. त्यांचा नियमित पुरवठा करून सोन्याशीं असलेला त्याचा कायदेशीर मूल्यसंबंध त्यांच्या धात्वात्मक मूल्य संबंधाहून अधिक ठेवण्यांत येतो. ह्या कायदेशीर मूल्य प्रमाणांत, परदेशी करावयाच्या कर्जफेडीस सरकारकडून चांदीच्या नाण्याबद्दल सोन्याचीं नाणीं अगर परदेशांत ज्या हुंड्या विकल्या असतां सोनें मिळूं शकेल अशा हुंड्या दिल्या जातात. उलटपक्षीं, स्वदेशांतील व्यापाऱ्यांचे जे परदेशी ऋणको असतात त्यास त्यांच्या ऋण-विमोचनार्थ लागणारें रौप्यचलन त्यांजवळून सोनें घेऊन सरकार त्यांस देण्यास तयार असतें. असल्या चलनपद्धतींत सुवर्ण किंवा सोन्यांत ज्याचें परिवर्तन होऊं शकेल

अशा हुंड्या ह्या केवळ अंतर्राष्ट्रीय विनिमयाचें साधन होत असल्यामुळें तिला 'सुवर्ण परिवर्तन पद्धति' ह्या नांवानें संबोधिलें असतां चालेल. हिंदुस्थानाशिवाय फिलीपाईन बेटें, जाव्हा व मेक्सिको ह्या देशांत ही पद्धत चालू आहे. महायुद्धाचे वेळेस सोन्याच्या पुरवठ्यावर प्रत्येक राष्ट्रानें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष नियंत्रणें घातल्यानें मागणीच्या मानानें त्या धातूचा पुरवठा मर्यादित झाला होता व अंतर्गत विनिमयास सोनें मुळीच उपलब्ध होत नसून परराष्ट्रीय देवघेवीस देखील तें मिळण्याची मारामार पडत असे. युद्धोत्तर कालांत हीं नियंत्रणें प्रायशः नाहीशीं झालीं आहेत हें खरें; तरी मागणीच्या मानानें पुरवठा अजूनही मर्यादित असल्यानें मध्यवर्ति पेढ्या सोन्याचा सर्व सांठा आपल्या हुकुमतीखालीं ठेवून परराष्ट्रीय देवघेवी सुरळीतपणें चालविण्याचा प्रयत्न करीत असतात. इंग्लंडसारख्या राष्ट्रांतही अंतर्गत व्यवहाराची गरज कागदी व दुय्यम चलनावर भागून सोनें फक्त अंतर्राष्ट्रीय विनिमयास उपयोगी पडतें. तरी प्रमाणभूत पैसा व कागदी चलनास तारण हा सर्वस्वी सोन्याचाच असतात.

**१० 'सुवर्ण खंड' मूल्यमापन पद्धति**– महायुद्धाचे काळांत सोन्याची विशेष टंचाई पडून कागदी चलनाचा अंतर्गत व्यवहारात पुष्कळसा उपयोग करणें अवश्य झालें. उपलब्ध असलेल्या सोन्याचा सर्व सांठा मध्यवर्ति पेढ्या व सरकार ह्यांच्या ताब्यांत राहून तो परराष्ट्रीय देवघेवीस साधन व कागदी चलनास तारण म्हणून वापरला जाई. पुढे युद्ध संपल्यानंतरही एकंदर गरजाच्या मानानें सोन्याचा पुरवठा मर्यादित असून तो अंतर्गत विनिमयांत गुंतविल्यास परदेशी देवघेवीस पुरेसें सोनें उरणार नाहीं अशी भीती वाटूं लागली. अशा वेळीं कांहीं अर्थशास्त्रज्ञांच्या कागदी चलनासंबंधाच्या कल्पना व्यवहारात लागू करण्यास आपोआप संधी मिळण्यासारखी होती. मूल्यमापनाची कोणतीही पद्धत घेतली तरी प्रमाणभूत पैशांत अनिष्ट फेरबदल होऊं नयेत म्हणून सोनें अगर चांदी यांच्या विशिष्ट वजनाच्या तुकड्यास इतर वस्तूंचे मूल्यपरिमाण ठरविणे भाग असत. मूल्यमापनास धात्वात्मक पैसा प्रमाणभूत धरून विनिमयाचें साधन म्हणून सोनें अगर चांदीच्या नाण्यांत ज्यांचे परिवर्तन करता येईल अशा नोटा अगर दुय्यम चलनें ही वापरली तरी चालतात. परंतु निरनिराळ्या देशांत आजपर्यंत प्रचलित असलेल्या सर्व चलनपद्धतींत जी धातू मूल्यमापनास प्रमाणभूत धरली असेल तिची राजमान्य नाणी पाडून ती कमी अधिक प्रमाणांत समाजांत वावरणें अवश्य आहे हें गृहित धरलेले असे. हा समज अर्थशास्त्राच्या तात्विक कसोटीस उतरलेला होता असें नाहीं. मूल्यमापनास विशिष्ठ धातूच्या ठराविक वजनाचें मूल्य प्रमाणभूत मानलें म्हणजे विनिमयास साधन म्हणून ज्या चलनाचें प्रमाणभूत धातूच्या ठराविक मूल्यांत परिवर्तन होईल असें कागदी अगर दुय्यम चलन वापरलें तर त्यांत कोणत्याही

प्रकारचा दोष नसून सोन्याची बचत मात्र होते. सोन्याच्या पुरवठ्याच्या टंचाईमुळें ही गोष्ट हल्लीं विशेष पटण्यासारखी असून 'सुवर्ण खंड' मूल्यमापन पद्धति म्हणजेही सुवर्णचलनाशिवाय सुवर्णमूल्यमापन चालू करण्याची युक्ति होय.

वास्तविकपणें ह्या पद्धतीत देखील सोनें हें मुख्यतः परराष्ट्रीय देवघेवीस उपयोगी पडावें व सोन्यांत ज्याचें परिवर्तन होईल अशी दुसरी चलनें अंतर्गत विनिमयाचें साधन असावीं असाच हेतू असतो व त्या बाबतींत वर वर्णन केलेल्या सुवर्णपरिवर्तन पद्धतीशीं प्रस्तुत सुवर्णखंडपरिमाणाचें बरेंच साम्य आहे. परंतु 'सुवर्णखंड' पद्धतीचा विशेष हा आहे कीं ती जेथें प्रचलित असेल तेथील लोकांनीं कागदी किंवा धात्वात्मक स्वरूपाचें राजमान्य चलन दिल्यास त्या मोबदला सरकार अगर मध्यवर्ति बँक ह्यांस ठराविक मूल्यप्रमाणांत सोनें द्यावें लागतें. हें प्रमाण साधारणपणें बाजारभावापेक्षा थोडेसें अधिक ठेवलें असतां नेहमींच्या सामाजिक गरजा भागविण्यांकरितां लोक सरकारजवळून सोनें विकत घेण्याची भीति नसते. सोन्याचा स्वदेशांतील पुरवठा कमी होऊन हुंडणावळ वाढूं लागली तरच परदेशीं सोनें पाठवून आपली देणीं भागविण्यास व्यापारी तयार होतात व थोडासा अधिक भाव देऊनही सरकारकडून सोनें विकत घेतात. उलट, जवळ सोनें असलेल्या ज्या लोकांस चांदीच्या नाण्याच्या स्वरूपांत आपलें देणें द्यावयाचें आहे, त्यांस साधारणतः बाजारांत सोनें विकून जेवढें अंतर्गत राजमान्य चलन मिळवितां येईल तें सरकारी भावाहून अधिक असेल. परंतु देशांत सोन्याचा पुरवठा वाढून सोन्याचा भाव व हुंडणावळ हीं कमी होतात असें वाटल्यास व्यापाऱ्यास आपलें सोनें सरकारास विकण्याचा अधिकार असतो. मात्र खरेदी–विक्रीचे हे व्यवहार शक्य तेवढे कमी व्हावे व सरकारच्या अगर मध्यवर्ति बँकेच्या ठेवणींतील सोनें व्यापारी देवघेवीस जरूर असेल तेव्हांच कमीजास्त व्हावें म्हणून ठराविक वजनाच्याच सोन्याचा गिऱ्हाइकाशीं व विकणाराशीं मध्यवर्ति संस्थेनें खरेदी–विक्रीचा व्यवहार करावा असें ठरविण्यांत येतें. सोन्याचें नाणें व्यवहारांत चालू नसल्यानें अशा पद्धतीस सुवर्ण चलन पद्धति असें म्हणतां आलें नाहीं तरी सोन्याचें ठराविक परिमाण हेंच प्रमाणभूत असल्याकारणानें अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय किंमतींचा दुवा आपोआप जोडला जातो. चांदीचीं नाणीं अगर नोटा ह्या अंतर्गत विनिमयार्थ राजमान्य समजल्या जाऊन राजमान्य चलन व सोनें ह्यांचें ठराविक भावानें वाटेल तेव्हां परस्पर परिवर्तन करतां येतें. सुवर्णचलनपद्धतींतील सर्व गुण व कागदी पैशाचे सर्व फायदे अशा पद्धतीमुळें मिळवितां येतील असा कांहीं अर्थशास्त्रज्ञांचा समज आहे.

निव्वळ तात्विक दृष्टीनें पाहिलें असतां ही पद्धति निर्दोष असून अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय देवघेवी धात्वात्मक पैशाच्या साहाय्याशिवाय घडून याव्या असें म्हणणाऱ्यांचें ध्येय त्या पद्धतीनें अर्धवट गांठलें जातें हें खरें आहे. परंतु अत्यंत

सुधारलेल्या राष्ट्रांतही समाजांतील फार मोठ्या वर्गाचा सोन्याचें नाणें मिळण्याची शक्यता असल्याशिवाय चलनपद्धतीवर पूर्ण विश्वास बसत नाहीं. अशी शक्यता असल्यास वास्तविकपणें ते तिचा विशेष उपयोग करतात असें नाहीं. परंतु सोनें हें मूल्यमापन व विनिमय साहाय्यक चलन असावें असा सार्वत्रिक आग्रह असून तो नाहींसा झाल्याशिवाय ही पद्धति यशस्वी व्हावयाची नाहीं. सोन्याच्या पुरवठ्याच्या बाबतींत अडचणींत पडलेल्या इंग्लंडसारख्या देशांत ती आज बहुतांशी चालू आहे तरी लोकमत व कायदा ह्यांच्या मान्यतेचा छाप कायमचा व पूर्णत्वानें तिच्यावर पडेल किंवा नाहीं, याची शंका आहे. हिंदी चलनविषयक प्रश्नांचा विचार करण्याकरितां नेमलेल्या हिल्टन यंग कमिशननें हिंदुस्थानांत सुवर्णखंडपरिमाण सुरू करावें अशी सूचना केली आहे. ही पद्धत अमलांत आल्यास सॉव्हरिन व अर्धसॉव्हरिन ही सोन्याची नाणीं रद्द होऊन रुपये व नोटा ह्या सध्यासारख्याच कायदेशीर चलन म्हणून चालत राहतील. एक रुपया म्हणजे सोन्याचें अमुक वजन असें ठरविण्यांत येऊन त्या भावानें ४०० औंसाच्यावर सोन्याची खरेदीविक्री करण्यास सरकार बांधलें जाईल. सोन्याच्या ठराविक वजनाचें मूल्य हें विनिमयाचें माप ठरून अंतर्गत देवघेवी नोटा व रुपये ह्यांच्या साहाय्यानें पुरण केल्या जातील. परदेशी देवघेवी आयात व निर्गत हुंड्यांच्या खरेदीविक्रीनें आतां केल्या जातात त्याचप्रमाणें पुढेंही होतील. परंतु ठराविक भावानें लोकांकडून सोनें विकत घेण्यास व त्यांस तें विकण्यास सरकार बांधलेलें असल्यानें हुंडणावळीचे दर वाढल्यास लोक सरकारास सोन्याची विक्री व उतरल्यास खरेदी करण्यास भाग पाडतील.

**११ कागदी पैसा**—सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत आजकाल कागदी पैशाचा आणि अनेक प्रकारच्या नोटांचा वाढत्या प्रमाणावर प्रसार होत आहे. कांहीं अनभिज्ञ व जुन्या मताचे लोक कागदी पैसा म्हणजे निव्वळ फसवेगिरी आहे, असें समजतात. उलट कित्येक अर्वाचीन अर्थशास्त्रज्ञ कागदी पैसा हा समाजाच्या आर्थिक प्रगतीचा निदर्शक असून कालांतरानें धात्वात्मक पैशाच्या ऐवजीं कागदी पैसा सर्वत्र वापरला जाईल, असें प्रतिपादन करितात. सोनें, चांदी इत्यादि मूल्यवान् धातूंची नाणीं जाऊन त्या ऐवजीं कागदाचे तुकडे आपल्या मालाच्या किंवा श्रमाच्या मोबदला घेण्याची वेळ आल्यामुळें सकृद्दर्शनीं ह्या व्यवहारांत कांहीं तरी लबाडी, निदान निकृष्टता, तरी असावी असा साधारण माणसास संशय येणें साहजिक आहे. परंतु पैशाची उपयुक्तता ही नाण्यांतील धातूच्या पदार्थविषयक गुणांवरच अवलंबून नसून विनिमयाचें साधन होण्याची त्याची पात्रता हाच त्यांतला प्रमुख गुण आहे, हें ध्यानांत ठेवल्यास कागदी पैशाची कल्पना किती सरळ आहे हें दिसून येईल. रुपया, पौंड किंवा डॉलर

ही नाणी म्हणजे समाजातील एकदर संपत्तीच्या विवक्षित भागाची मालकी मिळण्याचे हुकुमच होत. जोंपर्यंत हुकुमांत लिहिलेल्या रकमेइतकें मूल्य ते धारण करणारांस मिळण्याची खात्री असते तोंपर्यंत ते सोन्याच्या अगर चांदीच्या तुकड्यावर लिहिण्याऐवजीं कागदाच्या कपट्यावर लिहिले तरी कोणाचेंच कांहीं नुकसान होत नाही. कागदी पैशाचे जे प्रमुख प्रकार आहेत त्यांबद्दल जरा जास्त माहिती करून घेतल्यास ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल.

( १ ) प्रातिनिधिक स्वरूपाचा कागदी पैसाः–ज्यावेळेस एखादी व्यक्ति, खाजगी संस्था अगर सरकार आपणाजवळ सोन्याचांदीचा सांठा ठेवून तेवढ्याच किंमतीच्या कागदी नोटा काढते, त्यावेळेस चांदीसोन्याचें पूर्ण तारण असल्याकारणानें ती कागदाची नोट म्हणजे ठेवीतील मूल्यवान् धातूचा प्रतिनिधीच होय. अशा स्वरूपाच्या कागदी पैशापासून घेणेकऱ्यास मुळीच धोका येण्याचा संभव नसून, उलट पैशाची अदलाबदल व वहातुक ही मात्र सुलभ होतात. पूर्वी अमेरिकेंतील सरकार आपल्याजवळ सोनें व चांदी ठेऊन घेऊन त्यांबद्दल अशा प्रकारची सर्टिफिकीटें देत असे व त्यांचा चलन म्हणून देशांत प्रसारही होत असे. चलनी नोटा, चेक इत्यादि कागदी चलनाच्या इतर प्रकाराचा अमेरिकेंत प्रसार होऊं लागल्यापासून ह्या सर्टिफिकीटाचें महत्व कमी झाले आहे. ( २ ) विश्वासात्मक किंवा पुरेसें तारण असलेला कागदी पैसाः– ज्या नोटा दर्शनी हुंड्याप्रमाणे देणेदारास, म्हणजे नोट काढणारास, दाखविल्याबरोबर नोटांवर लिहिलेली रक्कम धात्वात्मक पैशाच्या स्वरूपांत घेणेकऱ्यास मिळण्याची खात्री असते, त्यांना विश्वासात्मक स्वरूपाचा कागदी पैसा, असें म्हटलें असतां चालेल. अशा नोटा काढणाऱ्या व्यक्तीस किंवा संस्थेस काढलेल्या सर्व नोटांच्या दर्शनी किमतीइतकें तारण सोन्याचांदीच्या रूपानें जवळ ठेवावें लागत नाही. कारण नोटा धारण करणारे सर्व लोक आपल्या नोटा मोडण्यास एकदम उत्सुक होतात असें नाही. त्यांपैकीं थोडथोडे लोक आपापल्या गरजांप्रमाणें नोटा मोडून रोकड मिळविण्यास बँका किंवा सरकारी तिजोऱ्या यांजकडे जातात. त्यामुळें काढलेल्या नोटांच्या किंमतींतील तारणापैकीं कांही थोडा भाग व्याजीं लावला किंवा इतर उत्पादक कार्यांत गुंतविला तरी चालण्यासारखें असतें. ( ३ ) बिनतारणाचा किंवा सुलतानी स्वरूपाचा कागदी पैसाः– ज्यावेळेस काढलेल्या नोटांचें धात्वात्मक पैशांत परिवर्तन करून देण्याची जबाबदारी त्या नोटा काढणारावर असत नाही, व केवळ सत्तेच्या जोरावर पैसा म्हणून लोकांना त्या नोटा घेण्यास भाग पाडतां येतें त्या वेळेस तशा नोटांस बिनतारणाचा किंवा सुलतानी स्वरूपाचा कागदी पैसा, असे म्हणावें लागतें. विनिमयाचे अवश्यक साधन ह्या नात्यानें पैशास नेहमी मागणी असते व सरकारास लोकांनी व लोकांना सरकारनें नेहमीच देणी द्यावी लागतात, म्हणून ही व्यवस्था कांही मर्यादेपर्यंत सुरळीत चालते.

कधीं कधीं नोटा काढतांना त्या विश्वासात्मक स्वरूपाच्या असूनही पुढें त्या काढणाऱ्या संस्थेची सांपत्तिक स्थिति खालावल्यामुळें पुरेसें तारण न राहून त्यांस सुलतानी स्वरूप प्राप्त होतें. युद्धकालात व त्यानंतर कांहीं वर्षें ऑस्ट्रिया, जर्मनी वगैरे देशांतील कागदी पैसा जवळ जवळ याच प्रकारचा झाला होता. असल्या नोटांस तारण ठेवावें लागत नसल्यामुळें व त्या नोटा काढून अप्रत्यक्षपणें बिनव्याजी कर्ज मिळत असल्यानें, बहुतेक कर्जबाजारी राष्ट्रांतील सरकारांस त्या काढण्याचा मोह उत्पन्न होतो व त्यामुळें देशाचें आर्थिक दृष्ट्या बरेंच नुकसान होतें.

परंतु कागदी पैसा वापरण्याच्या प्रघातामुळें समाजाचे अनेक फायदेही होतात हे विसरतां कामा नये. एक तर, पुरेसें तारण ठेवून कागदी पैसा काढल्यानें राहिलेलें सोनेचांदीच्या स्वरूपाचें भांडवल समाजाची उत्पादक शक्ति वाढविण्यास साहाय्यभूत होतें. शिवाय, धात्वात्मक पैशाच्या ऐवजी कागदी चलन वापरल्यानें नाण्याची झीज होऊन होणारें नुकसानही कमी होतें. कागदी पैसा वापरण्यास सोयीचा असल्यानें व अल्पायासानें दूरवर पाठविता येत असल्यानें त्याच्या साहाय्यानें दूर दूरच्या प्रदेशांत विस्तृत प्रमाणावर विनिमय होऊं शकतो. परंतु कोणत्याही प्रकारचा कागदी पैसा यशस्वी रीतीनें प्रचलित होण्यास तो काढणाऱ्या व्यक्तीवर अगर संस्थेवर लोकांचा दृढ विश्वास असावा लागतो. हा विश्वास अनिश्चित करणारीं राजकीय किंवा आर्थिक अरिष्टांसारखीं कारणें उत्पन्न झाल्यास कागदी चलनावरील लोकांची श्रद्धा डळमळीत होते व सर्व नोटा कमी मूल्यवान् ठरून धात्वात्मक पैसा व्यवहारांतून नाहींसा होतो. लोकांचा विश्वास दृढ आहे असें धरून चाललें तरी एका राष्ट्रांतील लोक दुसऱ्या राष्ट्रांतील प्रमाणभूत धात्वात्मक पैशावर जसा विश्वास ठेवतात तसा तेथील नोटांवर सहसा ठेवीत नाहींत. अंतर्राष्ट्रीय कर्जफेडी अजून देखील चांदीच्या किंवा सोन्याच्या स्वरूपानें कराव्या लागतात, ह्याचें कारण हेंच होय.

**११ बिनताराणाच्या कागदी पैशाचे अनिष्ट परिणाम**— काढलेल्या नोटांबद्दल सोनें किंवा चांदी देण्याची सरकारावर जबाबदारी नत नसल्यानें सहाजिकपणेंच बिनताराणाच्या नोटा देवघेवीस जरूर असतात त्यापेक्षां अधिक निघण्याचा संभव असतो. शिवाय कर्जबाजारी सरकारांस असल्या नोटांच्या द्वारें बिनव्याजी कर्ज काढून आपला खर्च भागविणें सोपें असतें, हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. एखाद्या राष्ट्राचा खर्च उत्पन्नापेक्षां अधिक असेल तर तेथील सरकारास आपल्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याचे तीन मार्ग मोकळे असतात. पहिला मार्ग म्हणजे कर वाढवून खर्चाची कायमची व्यवस्था करणें हा होय. कोणत्याही देशांत व विशेषतः प्रजासत्ताक राष्ट्रांत, हा मार्ग स्वीकारण्यास राजकर्ते नेहमीं नाखुष असतात. दुसरा मार्ग म्हणजे उघडपणें सरकारच्या पतीवर बाजारांत कर्ज उभारणें,

हा होय. या मार्गानें गेल्यास व्याजाचा खर्च जास्त पडून, शिवाय सरकारची पत व सरकारवरील लोकांचा विश्वास कमी होण्याचा संभव असतो. त्यातूनही एखाद्या देशाचे दुसऱ्या देशाशी युद्ध चालू असेल तर शक्य तितके कर वाढवून व उघडपणें कर्ज काढूनही एकंदर खर्च भागत नाही. अशा वेळेस तेथील सरकारास नोटा छापून घेण्याचे कारखाने हे एक प्रकारचे वाटेल तेवढी संपत्ति देणारे कल्पवृक्षच भासतात. परंतु अशा मार्गानें समाजात कागदी पैशाचा सुळसुळाट होऊन धात्वात्मक पैसा पार दिसेनासा होतो. कागदी पैशाच्या ह्या फाजील पुरवठ्यामुळे पदार्थांच्या किंमती वाढत जाऊन व्यापारी व उत्पादक ह्यांच्या धंद्यास सट्टेबाजीचे स्वरूप येते. किंमतींत वाढ झाल्यामुळे आयात व्यापारास उत्तेजन मिळून निर्गत व्यापार कमी कमी होत जातो व शेवटी सर्व राष्ट्र कर्जबाजारी बनते. मजूर वर्ग व मर्यादित उत्पन्न असलेले सामान्य लोक ह्यांचे वाढत्या किंमतीमुळे किती हाल होतात, हे सांगावयास नको. ज्यास इतराकडून कर्ज परत मिळावयाचे असते त्यास, उपयुक्त वस्तूंच्या भाषेत बोलावयाचे तर, दिलेल्या कर्जापेक्षा कमी वस्तू कर्जाऊ म्हणून घेणे भाग पडते.

बिनतारणाच्या कागदी पैशापासून होणारे हे सर्व अनिष्ट परिणाम टाळण्याचा एकच मार्ग असून तो म्हणजे शक्य तोवर कागदी पैसा पूर्ण तारणाशिवाय न काढणे हाच होय. कागदी चलन जरूरीपेक्षा जास्त प्रमाणात निघत आहे हे अनेक चिन्हांवरून दिसून येते. त्यातील मुख्य चिन्ह असे की कागदी पैशाच्या फाजील पुरवठ्यामुळें सोन्याचें नाणें मिळत नाहीसें झाल्यानें, तें मिळविण्यास त्या नाण्याच्या रकमेहून अधिक दर्शनी किंमतीच्या नोटा देण्यास, म्हणजे नोटांवर बट्टा देण्यास, लोक तयार होतात. तसेच परराष्ट्रांत पाठविलेल्या मालाची किंमत सोन्याच्या रूपानें मिळावयाची असल्यामुळे व परदेशांतून आलेल्या मालाची किंमत सोन्याच्या स्वरूपांत द्यावी लागत असल्यानें परदेशी हुंडयाचा दरही वाढत जातो. अपुऱ्या तारणाचा कागदी पैसा वापरण्याचा एकदा प्रघात पडला म्हणजे कागदी चलनाचा फाजील पुरवठा व त्यापासून होणारे सर्व अनिष्ट परिणाम हे ओघानेंच प्राप्त होतात. यास्तव पुरेसें तारण ठेवल्याशिवाय कागदी पैसा कधीही काढूं नये, असें अर्थशास्त्रज्ञांचे मत आहे. निदान नोटांवर बट्टा द्यावा लागण्याची वेळ आल्यावर व हुंडणावळीचा दर वाढत चाललेला दिसताच नवीन नोटा काढण्याचें बंद केलें पाहिजे. एवढयानें न भागेल तर काढलेल्या नोटा जसजशा तिजोरींत परत येतील तसतसा त्यांच्यापैकी कांहीं भाग नष्ट करून टाकला पाहिजे. महायुद्ध चालू असता व त्यानंतर कित्येक वर्षे युरोप खंडातील बहुतेक सर्व राष्ट्रांत बिनतारणाच्या कागदी पैशाचा पुरवठा फाजील झाला होता, व वरील सर्व चिन्हे स्पष्ट दिसत असूनही त्या राष्ट्रांची एवढी हलाखीची स्थिति होती की तेथील सरकारास आपली देणी भागविण्यास

जास्त जास्त नोटा काढाव्या लागत. शेवटीं त्या राष्ट्रांना आपली दिवाळखोरी जाहीरपणें कबूल करून त्या नोटांचा बराचसा भाग लोकांस त्याबद्दल कांहीही परत न देतां रद्द करावा लागला.

**१३ पत**—एखाद्या इसमाजवळून आपणास लागणाऱ्या उपयुक्त वस्तू त्यास त्याच्या मोबदला तावडतोब मुळींच कांहीं न देता, कालांतरानें तशी भरपाई करण्याचें नुसतें वचन देऊन जर दुसरा एखादा इसम घेऊं शकत असेल, तर त्या दुसऱ्या इसमाची पहिल्याजवळ अमुक इतकी पत आहे, असें आपण समजतों. ह्या उपयुक्त वस्तू म्हणजे पैशाखेरीज इतर पदार्थ असतील तर अशा देवघेवीस आपण उधारीचा व्यापार असें म्हणतों; व एकानें दुसऱ्याजवळून त्यास तात्काल मोबदला न देतां पैसे घेतले तर त्यास आपण कर्ज म्हणतों. कर्ज व उधारी ह्या दोन्ही प्रकारच्या व्यवहारांनीं उपयुक्त वस्तूंची देवघेव पूर्ण होण्यास कांहीं वेळ जावा लागतो. म्हणजे **अ**नें **ब**जवळून आज तांदुळाच्या वीस गोण्या विकत घेतल्या व तावडतोब किंमतीची भरपाई न करता एक वर्षानें पैसे देण्याचें वचन दिलें तर त्यांमधील विनिमय वर्षभर लांबला असें म्हणावें लागेल. कांहीं ग्रंथकार पतीच्या व्यवहारास लांबवलेला विनिमय असें म्हणतात, तें ह्याच कारणामुळें होय. वस्तु व पैसा ह्यांच्या देवघेवीप्रमाणेंच निव्वळ पैशाच्या देवघेवीही तावडतोब पूर्ण न होतां कांहीं कालपर्यंत लांबत गेल्यास त्यास पतीचे व्यवहार ह्या नावानें संबोधावें लागेल. स्वतःच्या पतीवर कर्ज काढण्याच्या पद्धतीमुळें देशांतील भांडवल वाढतें असा कित्येकजणास भास होतो. उदाहरणार्थ, **अ**नें **ब**ला ५०० रुपये कर्जाऊ दिले तर **अ** जवळ त्या रकमेबद्दल कर्जरोखा राहून **ब**-जवळ रुपये राहतील. दोघेजण आपापल्या परी आपण ५०० रुपयांचे धनी आहोत असें समजतील, व केवळ एका कर्जरोख्यानें भांडवलाची दुप्पट वाढ सहज करता येईल. परंतु थोड्या विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, लोकांनीं परस्पर पतीचे व्यवहार कितीही केले तरी एकंदर समाजाच्या दृष्टीनें भांडवल ५०० रुपये इतकेंच कायम राहते. एवढें मात्र खरें कीं ऋणकोच्या पतीवर त्यास भांडवल कर्जाऊ देण्याच्या पद्धतीमुळें ज्या लोकास स्वतःच्या भांडवलाच्या मदतीनें उत्पादनकार्य करण्याची इच्छा, संधी अगर कर्तबगारी नाहीं, ते लोक आपलें भांडवल उत्पादन करण्यास तयार असलेल्या लोकांस देऊं शकतात.

देशांतील अर्थोत्पादनास ह्या पद्धतानें अधिक भांडवल उपलब्ध होऊन एकंदर उपयुक्त वस्तूंचा पुरवठा वाढतो. आपल्याजवळील भांडवल दुसऱ्यास कर्जाऊ देऊन स्वतः मुदतशीर व्याज घेण्याची संधी मिळाल्यानें लोक आपल्या उत्पन्नांत बचत करून राष्ट्राच्या भांडवलाचा पुरवठा वृद्धिंगत करण्यास कारणीभूत होतात. तसेंच कित्येक वेळां, आणि विशेषतः दूरदूरच्या प्रदेशांतील देवघेवीच्या बाबतीत

उधारीच्या व्यवहारामुळें पैशाची जरूरी नाहींशी होते व तो पैसा भांडवल म्हणून इतर कार्यांत गुंतवितां येतो. योग्य विचार करून केवळ उत्पादक कार्यास भांडवल कर्जाऊ घेतलें तर त्यांत कर्ज घेणाराचा व समाजाचा फायदा आहे यांत शंका नाहीं. परंतु केवळ स्वतःच्या नित्याच्या किंवा नैमित्तिक आणि चैनीच्या गरजा भागविण्याकरितां किंवा सट्टेबाजीसारख्या एखाद्या धंद्यांत घालण्याकरितां मनुष्य कर्ज काढूं लागल्यास तो मनुष्य व एकंदर समाज ह्यांचें नुकसान होण्याचाच अधिक संभव असतो. मनुष्यमात्रांत दूरदर्शीपणा हा स्वाभाविक गुण असून सामाजिक शांतता व ज्ञान ह्यांच्या वाढीमुळें तो दिवसानुदिवस वृद्धिंगत होत जातो; ह्यामुळें उधारीचा व्यापार करण्यांत व कर्जाऊ रकमा घेण्यांत स्वतःच्या पतीचा योग्य मर्यादेपर्यंत कसा उपयोग करावा, हें मनुष्य अल्पायासानें शिकूं शकतो.

पैसे कर्जाऊ देऊं इच्छिणारांचें भांडवल व उधार व्यवहार करणाऱ्यांची पत ह्यांची तोंडमिळवणी करण्याचें संघटनात्मक कार्य पेढ्यांचें असतें. ते करतांना ज्या कित्येक साधनांचा उपयोग करावा लागतो त्यांचा येथें थोडक्यांत उल्लेख करणें जरूर आहे. एखाद्या इसमाची पेढीवर कांहीं ठेव असल्यास त्या ठेवींतून अमुक एक रकम दुसऱ्या एखाद्या इसमास किंवा तो दुसरा इसम सांगेल त्यास द्यावी असा जो लेखी हुकूम ठेवीदार पेढीवाल्यास लिहितो त्यास 'चेक' असें म्हणतात. चेक देणारा ठेवीदार व पेढीचा मालक ह्या दोघांच्या पतीवर विसंबून चेक स्वीकारावा लागतो हें उघड आहे. पेढीवाले आपापसांत जे चेक देतात त्यास ड्राफ्ट किंवा हुंडी असें म्हणतात. वस्तूंची देवघेव होत असतां धनको हा ऋणकोस असा हुकुम लिहितो कीं, अमुक एका व्यवहाराबद्दल तुझ्याकडून माझें अमुक रकम येणें आहे; तें तूं मला किंवा मी निर्दिष्ट केलेल्या इसमाला तात्काल अगर अमुक मुदतीच्या आंत पावतें कर. अशा प्रकारच्या हुकुमाला व्यापारी हुंडी असें म्हणतात. ऋणको व धनको हे निरनिराळ्या देशांत असून अंतर्राष्ट्रीय व्यापारानिमित्त हुंडी लिहिली असल्यास तिला परदेशी हुंडी असें म्हणतात. अनेक वेळां स्वतःच्या पतीवर पेढ्या नोटा काढतात. त्यांचा महत्त्वाचा प्रकार म्हणजे पेढीच्या किंवा बँकनोटा हा होय. बँक नोटा सरकारी नोटांप्रमाणें चलन म्हणून उपयोगी पडतात, व अलीकडे प्रमुख सरकारी व निमसरकारी बँकांच्या व्यवहारांत नोटा काढणें हें महत्वाचें अंग होऊन बसलें आहे.

**१४ पेढ्यांचे व्यवहार**—आपल्या भांडवलाच्या पतीवर पेढ्या ठेवींच्या रूपानें लोकांकडून कर्ज घेतात व ज्या ऋणकोंची पत चांगली आहे अशांस जास्त व्याजाच्या दरानें आपलें भांडवल व मुख्यतः ठेवी यांच्यांतील बराचसा भाग त्या कर्जाऊ देतात. इतर व्यापारी ज्याप्रमाणें आपला माल शक्य तितक्या

कमी दरानें विकत घेऊन तो शक्य तितक्या जास्त दरानें विकतात, त्याचप्रमाणें पेढीवाले लोकांकडून शक्य तितक्या कमी व्याजाच्या दरानें ठेवी घेऊन गिऱ्हाइकांस अधिकात अधिक व्याजाच्या दरानें रकमा कर्जाऊ देतात. म्हणून मालाच्या व्यापाऱ्याप्रमाणें पेढीवाल्यास पतीचे व्यापारी असें म्हटलें असतां चालेल. पेढ्यांचा पैसे कर्जाऊ देण्याचा मुख्य मार्ग म्हटला म्हणजे प्रॉमिसरी नोटांवर व सरकारी अथवा इतर कर्जरोख्यांच्या तारणावर कर्ज देणें व अंतर्गत आणि परदेशी व्यापारी हुंड्यांवर कटमिती कापून घेऊन त्याची खरेदी करणें हा होय. त्याशिवाय जमीनजुमला, सोनें, मोतीं व समाईक भांडवलाच्या मंडळ्यांचे भाग वगैरेंच्या तारणावर व ऋणकोंच्या स्वतःच्या पतीवर पेढ्या कर्ज देतात. ठेवी ठेवणें, कर्ज देणें व नोटा काढणें याशिवाय दुसरेही कांही व्यवहार पेढ्यांना करावे लागतात. सोनें, मोतीं, हिरे माणिकें इत्यादि मूल्यवान पदार्थ, महत्त्वाचे कागदपत्र, शेअर, बॉंड, कर्जरोखे वगैरे स्वरूपाची कागदी संपत्ति आपल्या ताब्यांत घेऊन तिचें संरक्षण करण्याची कामगिरी कित्येक पेढ्या करतात. मूल्यवान वस्तू व महत्त्वाचे कागदपत्र यांचे मालक पेढीच्या प्रामाणिकपणावर विश्वास ठेवून आपले जिन्नस तिच्या ताब्यात देतात व आपल्या जिनसाच्या संरक्षणाबद्दल तीस वेतनही देतात. आंतरराष्ट्रीय देवघेवीमुळें परदेशांतील व्यापाऱ्यांशीं स्वराष्ट्रांतील धंदेवाल्यांचे जे देण्याघेण्याचे व्यवहार होतात तेही परदेशी हुंड्यांची खरेदीविक्री होऊन पेढ्यांच्यामार्फत पूर्ण केले जातात. कांही सरकारी व निमसरकारी पेढ्या सरकारतर्फे ठेवी ठेवणें, कर्ज काढणें, लोकांचे पैसे देणें वगैरे कामें करतात. परंतु लोकांच्या ठेवी ठेवणें व हुंड्यावर कटमिती कापून घेऊन त्यांचे पैसे देणें हेच साधारणपणें पेढ्यांचे मुख्य व्यवहार होत.

ठेवींतही अनेक प्रकार असून गिऱ्हाइकानें आपली ठेव रोख रकमेच्या रूपानें पेढीच्या हवालीं केल्यास ती रोख ठेव होय असें म्हणतां येईल. परंतु कित्येक वेळां शेअर किंवा कर्जरोखे गहाण ठेवून कुळें पेढीजवळून कर्ज काढतात; त्यावेळी हें कर्ज त्यांस एकदम दिलें न जाता त्यांच्या नांवानें पेढीवर ठेव उत्पन्न करून दिलें जातें. पेढीच्या हिशेबांत असला व्यवहार दिलेलें कर्ज म्हणून जिंदगीकडे व ठेव म्हणून कर्ज बाजी दाखविला जातो. दोन्ही प्रकारच्या ठेवीदारांपैकीं आपली ठेव काढून घेण्यास फारच थोडे लोक एकदम पेढीवर येतात. रोख ठेवीदार बहुतक आपले पैसे व्याजी लावण्याच्या उद्देशानें ठेवी ठेवत असल्यामुळें सहसा ते आपल्या ठेवी काढून घेण्यास वारंवार येत नाहीत. ठराविक मुदतीच्या ठेवी देखील मुदत संपतांच परत कराव्या न लागतां बहुतेक वेळां ठेवीदार नव्या मुदतीच्या करारानें आपली ठेव तशीच चालू ठेवतो. दुसऱ्या प्रकारच्या ठेवी ह्या साधारणपणें ठेवीदारास आपल्या धंद्यांत भांडवल म्हणून उपयोगांत आणाव्या लागत असल्यामुळें

त्या काढून घेणाराचें प्रमाण सहाजिकपणेंच जास्त असतें. दोन्ही प्रकारच्या ठेवी-पैकीं किती रकमेला तात्काल मागणी येण्याचा संभव आहे त्याचा पूर्ण अंदाज करून तेवढी रक्कम शिल्लक म्हणून जवळ ठेवावयाची व बाकीची शिल्लक गिऱ्हाइकास ठराविक मुदतीनें कर्जाऊ द्यावयाची हा पेढ्यांचा मुख्य व्यवहार होय. कमी जास्त मुदतीच्या अंतर्गत व परदेशी हुंड्या विकत घेणें हा मुदतीनें कर्ज देण्याचाच एक मार्ग असून साधारणपणें पेढ्यास तोच पसंत पडतो.

ठेवीदाराची मागणी भागविण्याकरितां पेढीवर रोख शिल्लक रक्कम किती असावी आणि अल्पकालांत परत येण्यासारखी कर्जाऊ दिलेली रक्कम किती असावी हे पेढीच्या पैसे गुंतविण्याच्या पद्धतीवर आणि ठेवीदाराच्या व्यापारविषयक संवयीवर अवलंबून असतें. इंग्लंड व अमेरिका ह्यासारख्या कांही देशांत ठेवीच्या बेरजेच्या शेंकडा पांच एवढी रोख शिल्लक जवळ बाळगल्यास ठेवीदाराची मागणी भागविता येते, तर दुसऱ्या कित्येक ठिकाणीं शेंकडा तीसचाळीस एवढी शिल्लक ठेवूनही पेढीच्या मालकास आपली पत बिनधोक राहील असा भरंवसा नसतो. ठेवीदारांच्या वागणुकीतील ह्या अनिश्चितपणामुळें पेढीवाल्यांस आपली एक दृष्टि व्याजाच्या व कटमितीच्या दरावर आणि दुसरी ठेवीदाराच्या मागणीवर ठेवावी लागते. ठेवीदारांच्या मागणीच्या मानानें हातांतील शिल्लक कमी पडते असें वाटल्यास कसर कापून घेण्याचा दर वाढवून पेढ्या आपला कर्ज देण्याचा व्यवहार मर्यादित करतात. उत्पादक व व्यापारी ह्यांचे व्यवहार मोठ्या प्रमाणावर चालू असतां नाण्याची टंचाई व कसरीच्या दरांत वाढ ही दिसून येतात, ह्याचें कारण पेढीवाल्यांस जवळची रोख शिल्लक वाढविणें जरूर वाटतें हेंच होय. आपापसांतील व्यवहारांत नाण्यांचा शक्य तितका कमी उपयोग करण्याची पेढीवाल्याची खटपट असते, त्यांतही इतर व्यवहारांस नाण्याची टंचाई न पडावी हाच हेतु असतो. मोठमोठ्या व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या शहरांत परस्पर देणीघेणी भागविण्याकरितां पेढीवाल्यांच्या मोठमोठ्या संस्था असतात व त्यामध्यें एकही नाणें न देतां लाखों रुपयांच्या रकमा दुबेरजी करून उडविता येतात. इंग्रजी भाषेत अशा संस्थास 'क्लिअरिंग हाऊस' असें म्हणतात.

**१५ नोटा काढणें**— स्वतःच्या पतीवर पैसे उभारून कर्जदाराच्या पतीवर त्यास ते व्याजानें देणें हा पेढीचा मुख्य व्यवहार होय असें वर सांगितलें आहे. आपल्या पतीवर इतराकडून पैसे घेण्याचा ठेवी ठेवून घेणें हा एकच मार्ग नसून, नोटा काढणें हाही दुसरा एक मार्ग आहे. ज्याप्रमाणें प्रॉमिसरी नोट लिहून देणाऱ्या इसमाच्या पतीवर पूर्ण विश्वास असेल तरच ती नोट धनको स्वीकारतो त्याप्रमाणें ज्या लोकांचा पेढीच्या पतीवर पूर्ण विश्वास आहे तेच लोक पेढीच्या नोटा देणेदारांकडून घेण्यास तयार होतात. परंतु प्रॉमिसरी नोट ही धनकोनें स्वतः ऋण-

कोची पत पारखून त्याजवरून ठराविक व्याजाच्या दराने, व काचित् प्रसंगी ठराविक मुदतीनेही, घेतलेली असते. परंतु पेढीच्या नोटीवर ऋणको पेढीचें नांव जरी कायम असतें तरी धनको हा दर वेळेस बदलत असतो. पेढीच्या पतीवर विश्वास असल्याशिवाय ह्या नोटा कोणी घेणार नाहीं, हें सामान्यतः खरें असून पेढीचे नेहमीचे ठेवीदार व कुळें यामध्येंच त्याचा साधारणपणें प्रसार होतो. परंतु कित्येक वेळां गरीब लोक, मजूर व लहानसहान धंदेवाले ह्यांस आपल्या देणेदाराकडून अशा नोटा घेणें भाग पडतें. जोंपर्यंत पेढीचे नेहमीचे ठेवीदार व कुळें याजमध्येंच नोटांचा प्रसार होत असतो तोंपर्यंत सरकारला त्याचें नियमन करण्याचें कारण नसतें. परंतु गरीब वर्ग व सामान्य लोक यास अप्रत्यक्षपणें त्या नोटा स्वीकारणें भाग पडत असल्यामुळें आणि बिनव्याजानें कर्ज काढण्याचा आणि आपल्या धंद्यांत फुकट फायदा मिळविण्याचा मोह पेढीवाल्यास अनावर होण्याचा संभव असल्यामुळें सरकारासही एकंदर समाजाच्या हितसंरक्षणार्थ पेढ्यांनीं नोटा काढाव्या किंवा नाहीं व काढावयाच्या झाल्यास कोणत्या पेढ्यांनीं आणि किती प्रमाणांत काढाव्या ह्याबद्दल योग्य नियम करणें भाग पडतें.

ह्या नियमाबद्दल निरनिराळ्या सरकारांचें दिसून येणारें धोरण दोन प्रकारचेंअसतें. त्यापैकीं एका धोरणाच्या पुरस्कर्त्याचें मत पुढें दिल्याप्रमाणें आहेः—' पेढ्या आपला नेहमीचा पैसे कर्जाऊ देण्याचा व्यवहार करीत असतां त्याच्या नोटा समाजांत पसरतात. ह्यावरून लोकांना पैशाची गरज असेल तरच अधिक नोटा निघूं शकतील हें उघड आहे. त्याचप्रमाणें एकदां निघालेल्या नोटा त्यांची लोकांस जरूर नाहींशी होताच ठेव व कर्जफेड यांच्या रूपानें पेढीकडे परत येतात. नोटांचा पुरवठा त्यांस असलेल्या मागणीबरहुकुम होत असल्यानें त्याचें सरकारनें निराळें नियमन करण्याचें कारण नाहीं. केवळ पेढ्यांनीं पैसे कर्जाऊ देतानाच नोटा काढाव्या व स्वतःचे जे धनको असतील त्यास नाण्याचा रूपानें देणें देत जावें असें ठरविलें म्हणजे झालें.' या तत्त्वाप्रमाणेंच नोटा निघत गेल्यास लोकांच्या व्यापारी व्यवहारांत फेरबदल होऊन चलनाबद्दल मागणी जसजशी कमी अधिक होईल तसतसा नोटांचा पुरवठाही बदलेल हें खरें. परंतु नोटा काढणें हें आतांच सांगितल्याप्रमाणें बिनव्याजी कर्ज काढण्यासारखें असल्यानें पेढ्यांच्या चालकांना नेहमीं वाजवीपेक्षां अधिक नोटा काढण्याचा मोह सुटतो, व एकाच वेळीं पुष्कळ किंमतीच्या नोटा वटविण्याकरितां आणल्या जाऊन पेढीचें दिवाळें निघून ठेवीदार, भागीदार व नोटा धारण करणारे हे सर्वच बुडण्याची भीति असते. यास्तव काढलेल्या नोटांना सोनें किंवा चांदी यांचें पूर्ण तारण ठेवण्याची पेढीवाल्यांवर कायद्यानें सक्ति करावी, असें दुसऱ्या कांहीं अर्थशास्त्रज्ञांचे मत आहे. परंतु समाजांतील देवघेवीस विवक्षित कालीं किती चलनाची जरूर आहे हें त्या देशांतील सोन्याचांदीचा साठा अजमावून

ठरवावयाचे नसून एकदर विनिमयाच्या विस्तारावरून व परिमाणावरून ठरवावयाचे असतें. किंबहुना, ज्यावेळेस धात्वात्मक नाण्यांची टंचाई होते तेव्हांच कागदी चलनाची विशेष आवश्यकता असते, असें म्हटलें असतां चालेल. जितक्या किमतीच्या नोटा काढावयाच्या तितक्या किंवा जवळ जवळ तितक्या किंमतीचें सोनें किंवा चांदी ह्याचें तारण जवळ ठेवल्याशिवाय पेढ्यांनी नोटा काढू नये असें ठरल्यास ज्या वेळेस लोकांस चलनाची विशेष जरूर त्याच वेळेस त्यांचा दुष्काळ पडेल. म्हणून नोटा घेणारांस पुरेसें तारण राहील व पेढ्यानाही लोकांच्या गरजेप्रमाणें नोटांचा कमी अधिक पुरवठा करता येईल अशी कांही तरी तडजोड करून सरकारनें आपलें या बाबतीतील धोरण ठरविणें अवश्य आहे.

**१६ पाश्चात्य देशांतील पेढ्यांच्या पद्धति**—इंग्लंडमध्यें सुमारें एक कोटि ९० लक्ष पौंड किंमतीच्या सरकारी प्रॉमिसरी नोटा जवळ ठेवून बँक ऑफ इंग्लंड ह्या मध्यवर्ति पेढीस नोटा काढता येतात. ह्या रकमेपेक्षा अधिक दर्शनी किंमतीच्या नोटा काढावयाच्या झाल्या तर मात्र नोटांच्या किंमतीइतकें सोनें जवळ तारण म्हणून ठेवावें लागतें. ह्या बँकेशिवाय इंग्लंडमधील इतर बँकांस नोटा काढण्याची कायद्यानें मनाई केलेली आहे. महायुद्धाच्या शेवटी जर्मनीत मोठी राजक्रान्ति होऊन राजकीय व आर्थिक संस्थांच्या घटनेंत अनेक फेरबदल घडून आले आहेत. परंतु हे फेरबदल घडून येण्यापूर्वी जर्मनीमध्येंही इम्पीरियल बँक ऑफ जर्मनी ह्या पेढीशिवाय इतर कोणत्याही पेढीस नोटा काढण्याची परवानगी नसे. इम्पीरियल बँकस मात्र ५५ कोटी माकापर्यंत सरकारी व बिनसरकारी शेअर, नोटा व हुंड्या ठेवून स्वतःच्या नोटा काढतां येत. ह्या रकमेपेक्षा अधिक नोटा काढावयाच्या झाल्यास जेवढ्या किंमतीच्या जास्त नोटा तेवढ्याच किमतीचें सोनें किंवा नाणें जवळ बाळगावें लागे. परंतु ही धात्वात्मक ठेव बँक ऑफ इंग्लंडप्रमाणे स्वतंत्रपणे गंगाजळी स्वरूपात ठेवावयाची नसून पेढीच्या एकंदर शिलकेंत जमा धरतां येई. या शिवाय इम्पीरियल बँकेस जवळ सोन्यारुप्याचें तारण न ठेवितां ५५ कोटीवर नोटा काढावयाच्या झाल्यास अशा बीनतारणाच्या नोटांच्या किंमतीवर जर्मन सरकारास दरसाल दर शेंकडा पांच मार्क इतका कर दिला म्हणजे भागत असे. फ्रान्स मध्यें बँक ऑफ् फ्रान्स ह्या एकाच पेढीस नोटा काढण्याचा अधिकार दिलेला असून त्याबद्दल तारण किती व कोणत्या स्वरूपांत ठेवावें ह्याबद्दल कायद्याचा कांहीही निर्बंध नाही. मात्र पेढीनें किती किंमतीच्या नोटा काढाव्या ह्याबद्दल कमाल मर्यादा वेळोवेळीं सरकार ठरवितें. परंतु साधारणपणें ह्या पेढीचे चालक आपल्याजवळ सोन्याचांदीचें पूर्ण तारण ठेविल्याशिवाय नोटा काढीत नाहीत. पूर्वी अमेरिकेमध्यें निरनिराळ्या संस्थानांत स्वतंत्र पेढ्या असून त्यांस नॅशनल किंवा राष्ट्रीय पेढ्या असें म्हणत पहिल्यापासूनच ह्या नॅशनल बँकांस आपापल्या

नोटा काढण्याचा अधिकार असे. परंतु अनेक प्रकारच्या नोटा निघून गोंधळ उडूं नये म्हणून त्या नोटा अमेरिकन सरकार पुरवीत असे. इ. स. १९१३ सालीं नॅशनल बँकांचे नोटा काढण्याचे स्वातंत्र्य नष्ट करून कांहीं महत्त्वाच्या शहरीं असलेल्या रिझर्व बँकांसच नोटा काढण्याचा अधिकार देणारा एक कायदा अमेरिकन सरकारनें पास केला. परंतु ह्या कायद्याची पूर्ण अंगलबजावणी एकदम केली न जातां ती क्रमाक्रमानें व्हावयाची असून एकंदर तीस वर्षांत नॅशनल बँकांचा अधिकार नाहीसा व्हावयाचा आहे. परंतु ज्या राष्ट्रीय पेढ्या अजून नोटा काढतात त्यांना नोटांच्या किंमतीइतक्या दर्शनी किंमतीचे सरकारी बॉंड घेऊन सरकारच्याच खजिन्यांत ठेवावे लागतात. शिवाय, ज्या नोटा लोकांस दिल्या असतील त्यांच्या किंमतीच्या शेंकडा पांच इतकी रोकड रक्कम तिजोरींत ठेव म्हणून भरावी लागते. इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी ह्या देशांत नोटा काढण्याचा हक्क एकाच मध्यवर्ति पेढीस दिलेला असून त्या पेढ्या खाजगी मालकीच्या असल्या तरी त्यांच्या व्यवस्थेंत व फ्रान्समध्यें त्यांच्या नफ्यातही, सरकारास भाग मिळतो. तिन्ही राष्ट्रांतील सामान्य पेढ्या मध्यवर्ति पेढीचा ठेवी ठेवण्यास व कर्ज काढण्यास सढळपणें उपयोग करतात. त्या त्या देशांतील सरकारही मध्यवर्ति पेढीस आपली तिजोरी समजून कर्ज काढणें, लोकांकडून पैसे घेणें व त्यांस त्यांचे देणें देऊन टाकणें वगैरे कामें तिजवर सोंपवितें. आपला कारभार चालवितांना मध्यवर्ति पेढ्यास आपलें धोरण लोक व सरकार यांच्या हितसंबंधास पोषक होईल त्या रीतीनेंच ठरवावें लागतें. व्यापाऱ्यांस चलन व धंदेवाल्यास भांडवल ह्यांचा स्वस्त दरानें मुबलक पुरवठा करणें ही सामान्य स्वरूपाच्या समाईक भांडवलाच्या पेढ्यांची एक महत्त्वाची कामगिरी असते, ती योग्यपणें पार पाडण्यास त्यांस मदत करणें हें मध्यवर्ति पेढीचें मुख्य काम होय. ज्याप्रमाणें सामान्य बँकेचे प्रमुख ठेवीदार व कुळें ही सामान्य जनसमूहांत पसरलेलीं असतात त्याप्रमाणें साधारण पेढ्या ह्या मध्यवर्ति बँकेचे प्रमुख ठेवीदार व कुळें असतात. बहुतेक पेढ्या आपली शिल्लक मध्यवर्ति पेढीजवळ अनामत ठेवून जरूर लागेल तेव्हां अनेक मार्गांनीं तिजजवळून कर्जही काढतात. ह्या दृष्टीनें मध्यवर्ति पेढीस 'पेढ्यांची पेढी' असें म्हणतात तें यथार्थ होय. अमेरिकेंत मात्र अनेक पेढ्या नोटा काढीत असून सरकारी कायद्यांनीं त्यांच्या ह्या व दुसऱ्या सामान्य व्यवहाराचें नियमन केलें जातें. एका दृष्टीनें पेढ्यांची ही पद्धत विस्कळीत दिसली तरी अमेरिकेसारख्या अफाट देशांत अगदीं दूरदूरच्या भागांतही पेढ्या स्थापन होऊन तेथील लोकांस ठेवी ठेवण्याची व कर्जाऊ रकमा घेण्याची सोय उपलब्ध झाली, त्याचें श्रेय याच पद्धतीस दिलें पाहिजे, हें उघड आहे. १९१३ सालापासून अमेरिकेंतही एकाच नाहीं तरी निदान कांहीं थोड्या पेढ्यांसच नोटा काढण्याचा अधिकार रहावा व या मध्यवर्ति पेढ्यांचा इतर पेढ्यांनीं ठेवी ठेवण्यास व कर्ज काढण्यास उपयोग करावा या दिशेनें उपक्रम करण्यांत आला आहे.

**१७ अंतर्राष्ट्रीय विनिमय**--एकाच देशातील निरनिराळ्या प्रदेशांची आपापसांत देवघेव सुरू होण्यापूर्वी दूरदूरच्या देशांचा कांही दुर्मिळ व बहुमोल वस्तूंपुरता व्यापार चालत असे, हे मागें सांगितलेंच आहे. जगातील बहुतेक सर्व राष्ट्रांत हल्ली सुधारलेली व शांतताप्रधान समाजघटना स्थापन झाली असल्या-मुळें आणि आगगाड्या, आगबोटी व तारायंत्रें इत्यादिकांच्या साहाय्यानें त्यांच्यां-तील दळणवळण वाढत असल्यामुळें अंतराष्ट्रीय व्यापार दिवसानुदिवस वृद्धिंगत होत आहे. ज्याप्रमाणें दोन व्यक्तींमधील विनिमयापासून प्रत्येकास अधिकांत अधिक वस्तू मिळविता येतात त्याचप्रमाणें दोन देशांत विनिमय घडून उपयुक्त आल्यास त्यांपैकीं प्रत्येकास स्वतःस कमी उपयुक्त वाटणाऱ्या वस्तू दुसऱ्यास देऊन जास्त उपयुक्त वस्तू मोबदला म्हणून घेणें शक्य हे. शिवाय, ज्या वस्तूंचें स्वदेशांत उत्पादन होऊ शकत नाहीं किंवा ज्यांच्या उत्पादनास उत्पादक शक्तीचा प्रमाणाबाहेर व्यय करावा लागतो त्या वस्तू परराष्ट्रांतील उत्पादकांशीं देवघेव करून मिळविता येतात. हिंदुस्थानांत घड्याळें तयार करण्याचा एकही कारखाना नसता आज लाखों रुपये किंमतीचीं घड्याळें परदेशांतून येथें येत आहेत व इंग्लंडमध्यें चहाचा एकही मळा नसता इकडून हजारों पेट्या चहा तेथें पाठविला जात आहे, या अनुभवावरून अंतराष्ट्रीय व्यापाराच्या साहाय्यानें विवक्षित देशांतील वस्तूंचें परिमाण व त्यांची विविधता ही कशी वाढतात हे दिसून येईल. कांहीं आकस्मिक कारणानें एखाद्या राष्ट्रांत एखादी उपयुक्त वस्तु दुर्मिळ झाली तर तिचा इतर देशांतून पुरवठा करता येतो. अंतर्राष्ट्रीय व्यापाराचा प्रघात मुक्तपणें चालू झाला म्हणजे प्रत्येक राष्ट्रां-तील लोकास आपणांस विशेषेंकरून अनुकूल असलेल्या उत्पादक साधनांचा पर-देशास वस्तू पाठवून पूर्ण फायदा करून घेतां येतो. इंग्लंडमधील कोळसा, अमेरि-केंतील कापूस, स्वित्सरलंडमधील घड्याळें व जपानांतील खेळणीं ही परदेशांत विकलीं जात असल्यामुळें तीं उत्पादन करणाऱ्या लोकांचा पूर्ण फायदा झालेला आहे. शिवाय, ज्याप्रमाणें एकाच राष्ट्रांतील निरनिराळ्या वस्तूंच्या विनिमयाचें क्षेत्र किंवा बाजार वाढल्यानें त्या वस्तूंचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर करतां येऊन त्यांत श्रम-विभाग, सकलित उत्पादन वगैरे सोयींचा उपयोग करता येतो, त्याचप्रमाणें प्रत्येक वस्तूच्या उत्पादकास सर्व जगातील उपभोक्ते हे गिऱ्हाईक मिळाल्यास माल जास्तीत जास्त स्वस्त व सुबक निघूं शकतो. उत्पादन व विनिमय ह्या दोन्ही बाबतींत सर्व राष्ट्रांचें एकीकरण झाल्यास त्यांच्या नागरिकांचा उत्पादक व उपभोक्ते ह्या दोन्हीं नात्यांनी फायदाच होईल. व्यापाराच्या निमित्तानें अनेक राष्ट्रांतील लोकांचें परस्पर दळण वळण वाढलें तर त्यांचे आचार-विचार व संस्कृति यांमध्यें इष्ट फेर-बदल घडून येण्याचा व शेवटीं सर्व संस्कृतींचा मिलाफ होण्याचा विशेष संभव असतो. तसेंच आर्थिक बाबतींत अनेक राष्ट्रांतील जनसमूहांचे हितसंबंध संलग्न झाल्यास

त्यामध्यें युद्धासारखें अर्थविध्वंसक विघ्न उत्पन्न होण्याची भीति कमी होइल, अशीही कित्येकांस आशा होती; परंतु महायुद्धानुळें ती खरीच कमी झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाही.

अंतर्राष्ट्रीय व्यापारापासून सर्वकाळीं व सर्व ठिकाणीं फायदाच होतो असें म्हणतां यावयाचें नाही. परदेशांतून एखादा जिन्नस फार मोठ्या प्रमाणांत स्वदेशांत येऊन त्याच प्रकारच्या स्वदेशी वस्तूंपेक्षा तो स्वस्त विकूं लागला तर त्या वस्तूंच्या उत्पादकांस आपले श्रम व भांडवल दुसऱ्या धंद्यांत गुंतविणें भाग पडतें. असें करणें अगोदरच कठीण असतें व तें करतांना भांडवलवाल्याचा तोटा तर होतोच, परंतु मजूर वर्गाचे अशा घडामोडीपासून विशेष हाल होतात. हिंदुस्थानांतील एका विणकऱ्यांच्या धंद्याचाच इतिहास लक्षांत घेतल्यास अंतर्राष्ट्रीय व्यापारापासून राजकीयच नव्हे तर आर्थिक तोटेही अनेक होऊं शकतात हें स्पष्ट दिसून येईल. दुसरें असें की, परराष्ट्रीय बाजारांतील गिऱ्हाइकांच्या मागणीप्रमाणें उत्पादक आपापला पुरवठा नियमित करूं पहात असतां अनेक घोटाळे उत्पन्न होतात. एकीकडे परराष्ट्रीय मागणी नीटपणें अजमावतां न आल्यामुळें व उत्पादनाचें परिमाण वाढवून आणि कमी भावानें माल विकून परदेशी गिऱ्हाइकी वाढविण्याच्या उत्पादकांच्या महत्त्वाकांक्षेनेंही परराष्ट्रीय व्यापारावर अवलंबून असणाऱ्या उद्योगधंद्यांत नेहमीं उत्पादनातिरेक होण्याचा संभव असतो. अशा उत्पादनातिशयामुळें आर्थिक अरिष्ट व इतर आपत्ति कसकशा ओढवतात त्याबद्दल मागील प्रकरणांत विवेचन केलेंलेंच आहे. हल्लीं बहुतेक सर्व राष्ट्रांत बेकारी वाढली असून विशेषतः ती निर्गतवस्तूंच्या उद्योगधंद्यांत तीव्र आहे ही गोष्ट अंतर्राष्ट्रीय व्यापाराच्या गुणदोषांचा विचार करीत असतां विसरतां कामा नये.

**१८ उत्पादनमूल्य व अंतर्राष्ट्रीय व्यापारः**– एकाच देशांत उत्पन्न होऊन

---

१. कोणत्याही वस्तूचें उत्पादन करण्यास निरनिराळ्या घटकांस जी मेहनत पडते त्या मेहनतीच्या समुच्चयालाच उत्पादनाचें खरें वेंच असें म्हटलें पाहिजे. या मेहनतीबद्दल, म्हणजे कच्च्या मालाचे उत्पादक, भांडवलवाले, मजूर वगैरे घटकांचे ज्या प्रमाणांत उत्पादन कार्यास साहाय्य होत असेल त्या प्रमाणांत त्यांस मिळणारें, एकंदर वेतन हें उत्पादनाचें मूल्य, किंवा नेहमींच्या व्यवहारांत ज्याला मूळ खर्च किंवा किंमत म्हणतात तें होय. पुढें ह्या उत्पादनाच्या मूल्यावर घाऊक व किरकोळ व्यापाऱ्यांचा नफा, वहातुकीचा खर्च वगैरे लादले गेल्यानें गिऱ्हाइकास जी किंमत द्यावी लागते तिला विक्रीची किंमत किंवा क्रयमूल्य असें म्हटलें असतां चालेल. उत्पादनाचें खरें वेंच व उत्पादनमूल्य यांतील फरक तात्विक स्वरूपाचा असून कित्येकवेळां वेंच या अपरिचित शब्दाऐवजीं मूल्य हा जास्त वहिवाटलेला शब्द वापरण्याची चाल आहे. परंतु मेहनतीचें मूल्य पैशाच्या स्वरूपांत दिग्दर्शित करण्याच्या प्रघातामुळें विचारसरणींत कांहींसा घोटाळा उडण्याचा संभव असतो. असें असूनही प्रस्तुत स्थळीं विवेचन अधिक सोपें व्हावें म्हणून मूल्य हा शब्द वापरण्यांत आला आहे.

ज्यांचा विनिमयही तेथेच होतो अशा वस्तूंचे मूल्य त्या वस्तूचे उत्पादन करण्यास लागणाऱ्या खर्चावर अवलंबून असते हे मागें सांगितले आहे. वस्तूंची किंमत व त्यांचे उत्पादनमूल्य ह्यांमध्ये साधारणपणें विशेष फरक नसतो असें म्हणण्याचें मुख्य कारण मात्र देशांतील भांडवलवाले व मजूर ह्यांची चलनशीलता हे होय. एखाद्या धंद्यांत उत्पादनमूल्यापेक्षां अधिक किमतीनें माल विकला जातो व उत्पादकांस चांगला नफा होतो असें दिसूं लागतांच इतर भांडवलवाले व मजूर त्या धंद्यांत शिरतात व उत्पादकांची संख्या वाढून त्याच्यातील चढाओढीनें वस्तूंची किंमत कमी होते. उलटपक्षी उत्पादनमूल्यापेक्षा किंमत कमी असेल तर त्या धंद्यातील भांडवलवाले आणि मजूर यांस योग्य मोबदला न मिळाल्यानें ते हळूहळू दुसऱ्या धंद्यांत जाऊं लागतील व वस्तूंचें उत्पादन व पुरवठा ही संकुचित होऊन किंमतीत वाढ होईल. किंमतीचें मान उत्पादनमूल्याच्या साधारण बरोबर राहण्यास भांडवल व मजूर यांची एका धंद्यांतून दुसऱ्या धंद्यांत व एका जागेहून दुसऱ्या जागी सहजपणें हालचाल होणें अवश्य असतें. एकाच राष्ट्रांतील लोकांत विनिमय होत असेल तेव्हां अशा हालचाली सहज होऊं शकतात. परंतु भिन्न राष्ट्रांतील लोकांत देवघेवी होत असल्या तर मात्र मजूर व भांडवलवाले यास आपला देश व धंदा सोडून परकी देशांत सहजासहजी जातां येत नाही. त्यांच्या मार्गांत राजकीय व आर्थिक अडचणी अनेक असतात एवढेच नव्हे तर आपला गांव, गोत व देश सोडून जाण्याची प्रवृत्ति कोणत्याही देशांतील लोकांत झालें तरी अल्प प्रमाणांत आढळून येते.

हिंदुस्थानसारखा देश घेतला तर साधारणपणें सर्व वस्तूंची किंमत निरनिराळ्या भागांत जवळ जवळ सारखीच असून उत्पादनाच्या मूल्याहून ती फारशी भिन्न नसते असें दिसून येईल. उदाहरणार्थ, गहूं निरनिराळ्या प्रांतांत उत्पन्न होत असला तरी त्याचें सीमागत उत्पादनमूल्य व विक्रीची किंमत ही सर्व प्रांतांत जवळ जवळ सारखीच असतात. परंतु हिंदुस्थानांतील गव्हाचा भाव हा इंग्लंड किंवा जर्मनी ह्या राष्ट्रांतील भावापेक्षां बराच निराळा असलेला दिसेल. उलटपक्षी आपण चाकू ही वस्तु घेऊं. हिंदुस्थानांत चाकूंचे कारखाने असून त्यांतील कांही मध्यें चांगला माल तयार होतो. परंतु त्याच प्रतीच्या चाकूंची किंमत इंग्लंड किंवा जर्मनी ह्या देशांत कितीतरी कमी असते. म्हणून हिंदुस्थानांतून इंग्लंड व जर्मनी या राष्ट्रांस गहूं पाठविले जातात व त्या देशांतून हिंदुस्थानांत चाकू आणले जातात. परदेशी चाकूंचें हिंदुस्थानांत व हिंदी गव्हाचें परदेशांत जें मूल्य ठरतें तें मात्र त्या वस्तू पहिल्याप्रथम उत्पन्न झाल्या त्यावेळच्या मूल्यावर अवलंबून न राहतां जेथें त्यांची विक्री व्हावयाची तेथें ते जिन्नस पुरविण्यास जो खर्च लागतो त्यावर प्रायशः अवलंबून असतें. या उदाहरणावरून असें दिसून येईल की, प्रत्येक देशांत ज्या वस्तू उत्पन्न करण्यास इतर देशांच्या मानानें कमी खर्च लागतो त्या वस्तू परदेशी

पाठविल्या जाऊन ज्या वस्तू उत्पन्न करण्यास इतर देशाच्या मानानें अधिक खर्च लागतो त्यांची आयात केली जाते. शिवाय वरील गव्हाची व चाकूंची गोष्ट घेतल्यास हिंदुस्थानांतील भांडवलवाले व मजूर ह्यांस गव्हाच्या लागवडीत जेवढा फायदा होईल तेवढा चाकूच्या कारखान्यांत होणार नाही असें दिसेल. म्हणजे जितके भांडवलवाले व मजूर गव्हाच्या लागवडीत आपलें उत्पादनसामर्थ्य खर्च करीत असतील तितकेंच भांडवल व मजूर चाकूंच्या उत्पादनार्थ आपली शक्ति खर्च करूं लागले तर एकंदर उत्पत्ति गव्हाच्या धंद्यांत जास्त होऊन चाकूंचे कारखाने त्यामानानें कमी किफायतशीर ठरतील. देशांतील परिस्थितीच्या मानाने जे धंदे विशेष उत्पादक ठरतात त्यांत इतर धंद्यांपेक्षां अधिक भांडवल व श्रम ही गुंतणें सहाजिक आहे. अधिक उत्पादक धंद्यांच्या उत्पत्तीमधून कांही माल परदेशी पाठवून कमी उत्पादक धंद्यांतील माल परदेशांतून आणणे हें शेवटी सोयीचें व किफायतशीर ठरतें. परदेशी बाजारांत निर्गत वस्तूंचें मूल्य ठरतें तें त्या देशांत निरनिराळ्या वस्तूंचें जें उत्पादनमूल्य असतें त्यावरून होय. ज्याप्रमाणें एकाच देशांत मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेमुळें वस्तूंचें मूल्य कधी उत्पादनमूल्याहून अधिक तर क्वचित् कमीही होतें, त्याप्रमाणें परदेशच्या बाजारांत येणाऱ्या किंमती ह्या तेथे माल उपलब्ध करून देण्यास लागणाऱ्या मूळ खर्चाहून कमीअधिक असूं शकतात. वरील उदाहरणांत दोन राष्ट्रें व दोनच वस्तू घेऊन त्यांमध्यें देवघेव कशी होते व परदेशी विकणाऱ्या मालाचें मूल्य कसें ठरतें हें दर्शविलें आहे. परंतु वास्तविक पहातां अनेक देशांमध्ये अनेक वस्तूंचा व्यापार चाललेला असून त्याच्या बुडाशीं उत्पादनाच्या तुलनात्मक मूल्याचें तत्त्वच आढळून येतें.

**१९ परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा**—अंतर्राष्ट्रीय व्यापार म्हणजे राष्ट्राराष्ट्रांमधील व्यापार असें आपण साधारणपणें समजतों. परंतु वास्तविक पहातां अशा देवघेवी दोन्ही राष्ट्रांतील नागरिकांमध्यें व्यक्तिशः होत असतात. निरनिराळ्या वस्तूंचे व्यापारी परदेशांतील दुकानदारांशीं व्यवहार करतांना त्याचा एकंदर राष्ट्राच्या हितअनहितावर काय परिणाम होईल याचा फारसा विचार करीत नाहीत. एका राष्ट्रांतील सर्व व्यक्तींच्या परदेशी देवदेवीसच समुच्चयरूपानें त्या देशाचा परराष्ट्रीय व्यापार असें म्हणतात. ज्याप्रमाणें प्रत्येक व्यापारी विशिष्ट प्रकारचा माल दुसऱ्याकडून घेऊन तो इतरांस विकत देतो त्याचप्रमाणें प्रत्येक देशांतून कांहीं उपयुक्त जिन्नस परदेशांत पाठविले जाऊन दुसरे उपयुक्त जिन्नस परदेशांहून आणले जातात, आणि ज्याप्रमाणें व्यापारी स्वतः दुसऱ्याचें देणें लागतो त्यापेक्षां त्याचें दुसरीकडे येणें अधिक असल्यास एकंदर हिशेबाचा आढावा आपणांस अनुकूल आहे असें तो समजतो, त्याचप्रमाणें प्रत्येक देश, म्हणजे परराष्ट्रांतील लोकांशीं देवघेव करणाऱ्या स्वदेशांतील लोकांचा समुच्चय, आपलें दुसऱ्या राष्ट्रांकडील येणें—म्हणजे निर्गत मालाची

किंमत—हे आपल्या परराष्ट्रीय कर्जापेक्षां—म्हणजे आयात मालाच्या किंमतीपेक्षां—जास्त असल्यास आपल्या परदेशी व्यापाराचा आढावा अनुकूल आहे असा निष्कर्ष काढतो. उलटपक्षी घेण्यापेक्षां देणें, म्हणजे निर्गत मालाच्या किंमतीपेक्षा आयात मालाची किंमत, अधिक असेल तर एकंदर आढावा राष्ट्रास प्रतिकूल आहे असें समजण्यात येतें. 'निर्गत माल म्हणजे राष्ट्रांतील भांडवल व श्रम यानीं सृष्टीच्या मदतीनें केलेल्या उत्पादनांतील बचत किंवा वाढावा होय; तो परदेशांत विक्रीला पाठवून तेथील लोकांकडून आयात मालाच्या रूपानें त्याचा मोबदला घेतला जातो, व मालाच्या स्वरूपांत परराष्ट्रास पूर्ण मोबदला देतां न आल्यानें त्यास सोनेचांदी वगैरे मूल्यवान् धातू पाठवून कर्जफेड करावी लागते, या समजावर अनुकूल व प्रतिकूल आढाव्याची ही कल्पना अवलंबून आहे. मागें[1] उत्पादनाच्या तुलनात्मक मूल्याचें जें तत्त्व सांगितलें आहे त्यावरून आयात माल म्हणजे निर्गत मालाचा मोबदला आणि निर्गत माल हा आयात मालाचा मोबदला असेंच स्वरूप शेवटीं अंतर्राष्ट्रीय व्यापारास प्राप्त होतें. एका देशाचें दुसऱ्या देशाकडे येणें लागू होण्यास त्या देशाला माल पाठविणें हा एकच मार्ग नसून दुसऱ्याही अनेक मार्गांनी राष्ट्राराष्ट्रांत देण्याघेण्याचे, धनकोऋणकोचे व्यवहार उत्पन्न होतात. हे सर्व मार्ग एकत्र करून एखाद्या राष्ट्राचें दुसऱ्या राष्ट्रांकडे एकंदर येणें किती निघतें व त्या राष्ट्राला इतर राष्ट्रांचे किती देणें द्यावें लागतें याचा हिशेब काढल्यास तो निव्वळ मालाच्या खरेदीविक्रीचा हिशेब न राहून एकंदर देवघेवीचा आढावा होईल. परकी राष्ट्राकडे येणें देणें लागूं होण्यास माल पाठविण्याशिवाय पुढील मार्ग असतात.

(१) मालाच्या वहातुकीचा व विमा उतरण्याचा धंदा. ज्या देशाच्या मालकीचीं अनेक व्यापारी जहाजें असतात किंवा ज्या देशातील विमा कंपन्यांस पुष्कळ गिऱ्हाईक असतें त्या देशाचे इतराकडे सहजच पुष्कळ येणें निघतें. उलटपक्षीं, ज्या देशास मालाची वहातुक करण्यास स्वतःची जहाजें नाहींत किंवा त्या मालाची वहातुक होत असतां येणाऱ्या धोक्याचा विमा उतरण्यास स्वदेशी मंडळ्या नाहींत, त्यांस ह्या कामगिरीबद्दल इतरांस पैशाच्या अगर मालाच्या रूपानें वेतन देणें भाग पडतें. (२) परराष्ट्रांत गुंतविलेलें भांडवल व त्यावरील व्याज. एका राष्ट्रांतील भांडवलवाले दुसऱ्या राष्ट्रांत, त्यांस जरूर असलेल्या वस्तूंच्या स्वरूपांत, आपलें भांडवल पाठवूं लागले तर कांहीं काळ व्यापाराचा आढावा धनको देशास अनुकूल व ऋणको देशास प्रतिकूल आहे असें भासेल. पुढें ह्या भांडवलावर दरसाल जें व्याज अगर नफा यावयाचा त्यामुळें ऋणको राष्ट्रांतून माल किंवा मूल्यवान धातू निर्गत होत राहून धनको राष्ट्रांत आयात म्हणून खर्चीं पडतील. केवळ व्यापारी आढावा काढला तर ऋणको राष्ट्राची सांपत्तिक परिस्थिति भरभराटीची ठरून धनको राष्ट्र

[1] मागें पान ७९ पहा.

खालावत आहे असें वाटेल. ( ३ ) एका राष्ट्रांतले लोक दुसऱ्या राष्ट्रांत रहावयास गेले तर त्यांस लागणारा खर्च स्वदेशातून परदेशीं पाठविणें भाग आहे. तेच एका देशातले लोक दुसऱ्या देशीं नोकरी करण्याकरिता गेले तर ज्या देशांत ते नोकरी करतात त्या राष्ट्रांस त्यांच्या पगारांतील बचत व पुढे त्याचें पेन्शन इत्यादिकां-करितां परदेशीं कांही रक्कम पाठविणें अवश्य होईल. ( ४ ) अंतर्राष्ट्रीय विनिमय घडून येत असता व्यापाऱ्यांस अनेक पेढ्यांची मदत घ्यावी लागते. त्या मद-तीचा मोबदला म्हणून ज्या राष्ट्राच्या मालकीची पेढी असेल त्या राष्ट्रास इतर राष्ट्राकडून माल अगर सोनें, चांदी ह्यांच्या रूपानें वेतन मिळत राहतें. ( ५ ) ह्या-शिवाय कित्येक वेळां एक राष्ट्र राजकीय बाबतींत दुसऱ्या राष्ट्राच्या हुकुमतीखालीं असल्यास कनिष्ठ राष्ट्राकडून वरिष्ठास अर्थवट खंडणीच्या स्वरूपाच्या कांही रकमा मिळावयाच्या असतात. वरील पाचही बाबतींत हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या परि-स्थितीची तुलना केल्यास असें स्पष्ट दिसून येईल की, केवळ एका राष्ट्रांतून निर्गत होणाऱ्या मालाची किंमत आयात मालाच्या किंमतीहून जास्त असल्यास त्यास एकंदर देवघेवीचा आढावा अनुकूल असेलच असें नाही, व उलटपक्षी एखाद्या राष्ट्राच्या आयात मालाची किंमत निर्गत मालाहून जास्त असली तर त्या राष्ट्राचा आढावा खात्रीनें प्रतिकूल असला पाहिजे असेंही नाही. एका देशानें दुसऱ्या देशाला पाठविलेला माल, पैसे, कामगिऱ्या व त्या राष्ट्रानें इतरांस द्यावयाचें व्याज किंवा इतर कोणत्याही प्रकारची देणी ह्यांची बेरीज इतर राष्ट्रांकडून घ्यावयाचा माल, पैसे, कामगिऱ्या व इतर देणीं ह्यांच्या बेरजे-बरोबर असते. अशा अर्थानें प्रत्येक देशाची आयात व निर्गत ही शेवटी एकमेकां-बरोबर असली पाहिजेत हे उघड आहे.

**२० परदेशी हुंड्यांचा व्यवहार**—परराष्ट्राशीं व्यापार करीत असतां देण्या-घेण्याचे व्यवहार ज्या पद्धतीनें केले जातात त्या पद्धतीस परदेशी हुंड्यांचा व्यवहार असें म्हणतात; कारण अंतर्राष्ट्रीय व्यापारांतील बहुतेक सर्व देणीं हुंड्यांच्या खरेदी विक्रीनें भागविली जातात. उदाहरणार्थ, मुंबईमधील एका व्यापाऱ्यानें जपान मधील एका कारखानदारास एक लक्ष रुपयांचा कापूस विकला, व जपानांतील काड्याच्या पेट्यांच्या एका कारखानदारानें त्याच किंमतीचा माल कलकत्त्याच्या एका व्यापाऱ्यास विकला असें आपण समजूं. आतां जपानपासून मुंबईपर्यंत एक लक्ष रुपये, किंवा तितक्या किंमतीची सोनें चांदी आणि कलकत्त्याहून जपानला एक लक्ष रुपये किंमतीचें सोनें पाठविण्याऐवजी कलकत्त्यांतील व्यापाऱ्यानें मुंबईच्या व्यापा-ऱ्याला लक्ष रुपये दिले व जपानधील कापसाच्या गिरणीवाल्यानें काड्याच्या पेट्यांच्या कारखानदारास एक लक्ष रुपये किंमतीचे येन दिले तर त्यांत चारी व्यक्तींची सोय होऊन त्यांचा थोडा बहुत फायदाही होईल. अंतर्राष्ट्रीय व्यापा-

रांत अशी असंख्य गांवें व कारखानदार आणि व्यापारी हे असतात. परंतु त्या सर्वांची परस्पर देणीघेणी वरील उदाहरणांत वर्णिलेल्या साध्या मार्गानेंच भागविली जातात व प्रत्यक्षपणें नाणीं किंवा सोनेचांदी यांची वहातुक करण्याचें विशेष कारण पडत नाहीं. एकाच राष्ट्रांत परदेशच्या लोकांचे जे धनको व ऋणको असतात त्यांच्या आपापसांतील देण्याघेण्याची भरपाई करण्याचें काम परदेशी हुंड्यांचे पेढीवाले करतात. वरील उदाहरणांतील कापसाचा व्यापारी जपानमधील आपल्या गिऱ्हाइकावर मुदतीची हुंडी लिहितो. लगेच मुंबईंतीलच एखादा पेढीवाला त्याजवळून मनोती कापून घेऊन ती हुंडी खरेदी करतो, व जपानमधील कारखानदाराकडून तिचे पैसे वसूल करण्याकरितां ती जपानी पेढीवाल्याकडे पाठवितो. इकडे जपानमधील काड्याच्या पेट्याचा कारखानदार कलकत्त्यांतील आपल्या ऋणकोवर हुंडी लिहून आपल्याच देशातील एखाद्या पेढीवाल्यास कसर कापून देऊन तिचे पैसे वसूल करतो. जपानी पेढीवाला ती हुंडी हिंदुस्थानांतील एखाद्या पेढीकडे पाठवून कलकत्त्याच्या कारखानदाराकडून पूर्ण रक्कम वसूल करतो. म्हणजे मुंबई व जपान येथील धनकोंनी आपल्या हुंड्या स्वदेशांतील पेढ्यास विकल्यामुळें जपान व हिंदुस्थान ह्यांमध्ये एका पैचीही वहातुक न होतां एक लक्ष रुपयांचा सवदा पुरा होतो. याच पद्धतीनें सर्व राष्ट्रांतील अनेक भागांत राहणाऱ्या असंख्य व्यापाऱ्यांचे कोटी रुपयांचे सवदे परदेशी हुंड्यांच्या खरेदी विक्रीनें पुरे केले जातात. अंतराष्ट्रीय विनिमयाचे परदेशी हुंड्या ह्या चलनच होत असेंही एका अर्थानें म्हणतां येईल. एका देशांतील धनकोनें दुसऱ्या देशातील धनकोवर काढलेली हुंडी ज्या भावानें पेढीवाले विकत घेतात त्यास हुंडणावळीचा भाव असें म्हणतात. उदाहरणार्थ; लंडनमधील व्यापाऱ्यानें न्यू यॉर्कच्या व्यापाऱ्यावर काढलेली शंभर पौंडांची हुंडी अमेरिकन पेढीवाले ५०० डॉलर देऊन घेण्यास तयार असले तर १०० पौंडास ५०० डॉलर किंवा १ पौंडाला ५ डॉलर हा इंग्लंड व अमेरिका ह्या दोन राष्ट्रांतील हुंडणावळीचा दर ठरेल.

कोणत्याही दोन राष्ट्रांत जें सर्वमान्य नाणें असतें, त्यांतील धातूंच्या परिमाणाचें जें परस्पर मूल्यप्रमाण ठरतें त्यास त्या दोन देशांतील चलनांचे टांकसाळी प्रमाण असें म्हणतां येईल. एका देशांतून दुसऱ्या देशाला नाणीं घेऊन जाण्यास जर मुळींच खर्च लागला नसता व प्रत्येक देशांत नाण्यांचा पुरवठाही मुबलक असता तर हुंडणावळीचा दर ह्या टांकसाळी प्रमाणाइतकाच राहिला असता. परंतु नाणीं व सोनेचांदी ह्यांची वहातुक करण्यास खर्च लागत असल्यानें टांकसाळी प्रमाणाच्या वर व खालीं कांहीं मर्यादेपलीकडे हुंडणावळीचा भाव जाईपर्यंत सोनें किंवा सोन्याची नाणी यांची वहातुक करणें फायदेशीर होत नाहीं. हुंडणावळीचा भाव ज्या मर्यादेपर्यंत गेला असतां आयात मालाच्या व्यापाऱ्यांस परदेशातील

आपल्या धनकोस सोनें पाठविणें अधिक फायदेशीर वाटतें किंवा उलटपक्षी हुंडणावळीचा भाव ज्या मर्यादेपर्यंत गेला असतां निर्गत मालाचीं परदेशी गिऱ्हाइकें आपापल्या देशांतून माल निर्यात करणाऱ्या राष्ट्रांत सोनें पाठविण्यास तयार होतात, अशा दोन्ही मर्यादांस 'सुवर्णमर्यादा' असें म्हणतात. कारण ह्या मर्यादांपलीकडे हुंडणावळीचा भाव जाण्याचा रंग दिसूं लागताच सोन्याची आयात व निर्यात होऊं लागते. ह्या मर्यादांमध्यें मात्र हुंडणावळीचा भाव नेहमीं कमी अधिक होत असतो. कारण प्रत्येक राष्ट्रांतील जे निर्गत वस्तूंचे व्यापारी असतात त्यांनी आपल्या परदेशी ऋणकोंवर काढलेल्या हुंड्या व आयात मालाच्या स्वदेशांतील व्यापाऱ्यांवर परदेशी व्यापाऱ्यांनीं काढलेल्या हुंड्या ह्यांच्या एकंदर किंमतींत फरक असेल तर हुंडणावळीचा भाव बदलत राहून आयात व निर्गत हुंड्यांस कमी अधिक किंमत द्यावी लागेल. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतून एखादे वर्षी धान्य, कापूस वगैरेंची बरीच निर्यात झाली तर परदेशी व्यापाऱ्यांवर हिंदी व्यापाऱ्यांनी काढलेल्या हुंड्यांची रक्कम चांगलीच वाढेल. परंतु त्या मानानें आयात व्यापारांत वाढ न झाल्यास परदेशी धनकोंनी हिंदी ऋणकोंवर काढलेल्या हुंड्यांची रक्कम कमी ठरेल. निर्गत मालाच्या हुंड्यांचा भाव त्यांच्या अधिक पुरवठ्यामुळें कमी होऊन आयात मालाच्या हुंड्यांचा भाव त्यांच्या मर्यादित पुरवठ्यामुळें वाढत जाईल. म्हणजे लंडनसारख्या परदेशाच्या ठिकाणीं ज्या हुंडीचे शंभर पोंड वसूल व्हावयाचे तिला हिंदुस्थानात अधिक कसर कापून द्यावी लागून परदेशांत ज्या हुंड्या हिंदुस्थानातील व्यापाऱ्यांवर काढलेल्या असतात त्यांस त्या मानानें कमी कसर कापून द्यावी लागेल. हिंदुस्थानांत नेहमीपेक्षा कमी रुपये देऊन लंडनमध्यें शंभर पोंड मिळवितां येतील. रुपये वाढाव्यानें विकले जाऊन पोंडास मात्र जास्त बट्टा द्यावा लागेल. हुंडणावळीचा दर अशा रीतीनें वाढल्यास तो हिंदुस्थानास अनुकूल व इतर देशास प्रतिकूल असें समजण्याचा साधारण प्रघात आहे. परंतु कोणत्याही देशात हुंडणावळ नेहमीच 'अनुकूल' अगर 'प्रतिकूल' राहूं शकत नाही. कारण निर्गत मालाच्या हुंड्या आयात मालाच्या हुंड्यांहून अधिक किंमतीच्या असल्यास त्याच्यातील फरक सोनें, चांदी किंवा नाणीं यांची आयात करून भरून काढावा लागतो. देशांतील मूल्यवान धातू व नाणीं यांचा पुरवठा असा वाढला म्हणजे चलनाची सीमागत उपयुक्तता कमी होऊन वस्तूंच्या किंमती वाढतात. ज्या देशांत वस्तूंच्या किंमती चढीच्या असतात तेथून साधारणपणें परदेशांतील व्यापारी माल खरेदी करीत नाहीत; उलट आपल्या देशांतून तेथें विकण्यास मात्र माल पाठवितात. हुंडणावळीचा दर वाढल्यानें सोन्याचांदीची आयात, चलनाच्या पुरवठ्यांत व पदार्थांच्या किंमतींत वाढ, निर्गत व्यापारास ओहोटी व आयात मालांत वाढ हीं क्रमाक्रमानें घडून येतात. मग निर्गत

मालाच्या हुंड्यांचा पुरवठा कमी होऊन त्यामानानें आयात मालाच्या हुंड्यांचा पुरवठा वाढतो व हुंडणावळीचा दर परत टांकसाळी प्रमाणावर येऊन प्रतिक्रियारूप परिणाम म्हणून क्वचित् त्याहीपेक्षां कमी होतो. उलटपक्षीं आयात मालाच्या हुंड्यांची किंमत निर्गत मालाच्या किंमतीहून अधिक असेल तर देशांतून सोनें चांदी बाहेर पाठवावी लागल्यानें चलनाचें परिमाण कमी होऊन वस्तूंच्या किंमती उतरतात. असें झालें म्हणजे आयात व्यापारास ओहोटी लागून निर्गत व्यापारास उत्तेजन मिळतें व निर्गत मालाच्या हुंड्यांचा पुरवठाही वाढतो. हुंडणावळ हळूहळू कमी प्रतिकूल होत जाऊन परदेशी हुंड्यांचा भाव टांकसाळी प्रमाणावर जवळ जवळ स्थिर होतो. सोन्याचांदीची आयात व निर्यात आणि परदेशी हुंड्यांचे भाव यांचा अन्योन्य संबंध यावरून स्पष्ट दिसेल. एखाद्या देशांत सोन्याचांदीच्या आयातीस अगर निर्गतीस बंदी असेल तर हुंडणावळीवरील हें नैसर्गिक नियमन नाहींसें होऊन परदेशी हुंड्यांचे भाव सुवर्णमर्यादा उल्लघून वाटेल तेवढे कमी अधिक होतील. महायुद्धाच्या वेळेपासून कांहीं युरोपियन राष्ट्रांच्या हुंडणावळीचे भाव कल्पनेच्याही बाहेर वाढले अगर कमी झाले आहेत याचें एक प्रमुख कारण म्हणजे त्या त्या देशांतून परदेशी धनकोस सोनें पाठविण्याची अशक्यता हें होय.

**२१ खुला व्यापार व संरक्षक जकाती**—दोन व्यक्ती किंवा दोन राष्ट्रें यांत होणारा विनिमय तत्त्वतः सारखाच असून त्यापासून होणारे फायदे व तोटे हेही वास्तविकपणे एकच असतात. तसेच विनिमयाच्या ह्या दोन्ही क्षेत्रांत तोट्यांपेक्षां एकंदरींत फायदे अधिक असून ज्यामानानें आपणास वाटेल तो धंदा करून त्याबद्दल मिळालेल्या वेतनातून हवा तो जिन्नस घेण्याची शक्यता वाढत्या प्रमाणांत असते त्या मानानें विनिमयाचे फायदेही वृद्धिंगत होत जातात. विनिमयाच्या विस्तारावर उत्पादन अवलंबून असल्यामुळें विनिमयस्वातंत्र्य पूर्ण असल्याशिवाय उत्पादन–स्वातंत्र्यही पूर्ण होऊं शकत नाही. तसेंच, उत्पादनाच्या मार्गांतील अडथळे वाढल्यानें उपभोक्त्यांसही आपापल्या गरजा स्वतंत्रतेनें अगर पूर्णपणानें भागवितां येत नाहीत. यावरून अंतर्गत व्यापाराप्रमाणेंच परराष्ट्रीय व्यापार जेवढा खुला असेल तेवढा एकंदर मानवजात, निरनिराळीं राष्ट्रें व त्यांतील व्यक्ती ह्यांचा उत्पादक व उपभोक्ते ह्या नात्यानें अधिक फायदा होईल, हे उघड आहे. असें असून पहिल्यापासून परराष्ट्रीय व्यापारावर नियंत्रणे घालण्याची चाल सर्व देशांत कमीअधिक प्रमाणांत प्रचलित असलेली दिसून येते. परकीं राष्ट्रें व तेथील लोक ह्यांबद्दल लोकांची नेहमीच साशंक व अर्धवट शत्रुत्वाची वृत्ति असल्यामुळें एकाच राष्ट्रांतील व्यक्तींमध्यें जितक्या सुलभ व स्वतंत्र रीतीनें विनिमय घडून येतो तितक्याच स्वतंत्रतेनें तो परराष्ट्रीयांशीं व्हावा ही कल्पना सामान्य मनुष्याच्या मनाला पटत नाही. त्यांतूनही खुल्या व्यापारापासून स्वदेशांतील

कांहीं प्रमुख धंद्यांचें व सरकारचें प्रत्यक्ष नुकसान होत असेल किंवा काही सर्वमान्य आर्थिक व राजकीय प्रमेयें खुल्या व्यापाराच्या तत्वास प्रतिकूल असतील तर स्वदेशी धंद्यांच्या व राष्ट्रीय उन्नतीच्या संरक्षणार्थ परदेशी व्यापारावर जकाती वगैरे बसवून जरूर तेवढीं नियंत्रणें घालण्याचें धोरण उघडपणें स्वीकारण्यांत येतें.

ह्या संरक्षक धोरणाच्या समर्थनार्थ जे कित्येक युक्तिवाद नेहमी पुढे आणले जातात त्यांचा एथें उल्लेख करणें जरूर आहे. 'देशातील उद्योगधंदे परदेशी गिऱ्हाइकावर अवलंबून असल्यास अंतर्राष्ट्रीय युद्धामुळे किंवा परदेशांतील परिस्थितीत काही अनिष्ट फेरबदल घडून आल्यामुळें त्यांचे नुकसान होऊन ते बुडण्याची भीति असते. त्यापेक्षां स्वदेशांतील बाजारात स्वदेशी वस्तूंचा खप वाढविण्यास संरक्षक उपाय योजले तर त्या धंद्यांची भरभराट कायम टिकेल. परदेशांतून स्वदेशात येणाऱ्या मालावर जकाती बसविल्या म्हणजे निर्गत मालाच्या धंद्यात गंतलेलें भाडवल व मजूर ह्यांस उत्तेजन मिळून ते नवे धदे उभारण्यास साहाय्यक होतात. उत्पादक व उपभोक्ते हे एकाच राष्ट्रांतील असल्यानें तें राष्ट्र आर्थिक दृष्ट्या स्वायत्त राहून परदेशातील घडामोडींचा स्वदेशांतील औद्योगिक परिस्थितीवर अनिष्ट परिणाम होत नाही.' ह्या युक्तिवादाचें केवळ आर्थिक दृष्टया परीक्षण केल्यास तो भ्रममूलक व अदूरदृष्टीचा आहे असें दिसून येईल. एक तर निर्गत मालाच्या उत्पादकाचें परदेशी गिऱ्हाईक कमी झाल्यामुळे त्यांच्या धंद्याचा विस्तार संकुचित होतो व त्यांच्या मालाच्या किमतीही उतरतात. शिवाय निरनिराळ्या देशांतील लोकांस निरनिराळ्या वस्तू उत्पन्न करण्यास लागणाऱ्या उत्पादनमूल्यावर अंतर्राष्ट्रिय व्यापार अवलंबून असल्यामुळे निर्गत मालाच्या धंद्यांतील भाडवल व मजूर यांस जकातीच्या कृत्रिम सवलतीचा फायदा असलेल्या धंद्यांत गुंतविणें म्हणजे देशांतील लोकांस गिऱ्हाइक या नात्यानें जास्त किमत द्यावयास लावून शिवाय भांडवलवाले व मजूर ह्यांच्या उत्पादक शक्तीचा अपव्यय करणें होय. अशाच स्वरूपाचा दुसरा एक युक्तिवाद असा आहे की, परदेशी व्यापाऱ्यांवर जकाती बसविल्यानें स्वदेशी धंद्यांस उत्तेजन मिळून मजूरवर्गाच्या श्रमास अधिक मागणी उत्पन्न होते व त्याचे मजुरीचे दर वाढतात. परंतु वर सांगितल्याप्रमाणें निर्गत मालाच्या धंद्यांतील भाडवल व मजूर हेच मुख्यतः नवीन धंद्यांत येत असल्यामुळें संरक्षक जकातींनी मजुरास अधिक मागणी उत्पन्न झाली असें म्हणण्यापेक्षां एका धंद्याऐवजी त्यांस दुसऱ्या धंद्यांत जावें लागतें असें म्हटलें पाहिजे. शिवाय संरक्षणानें कमी उत्पादक धंद्यांस कृत्रिम उत्तेजन मिळून राष्ट्राच्या उत्पादन शक्तीचा अपव्यय होत असेल तर शेवटी मजुरीचें खरे दर, म्हणजे मजुरांस मिळणाऱ्या उपयुक्त वस्तूंचें परिमाण, वाढण्याऐवजी कमी मात्र होतील. वस्तूंच्या उत्पादनमूल्यांतील फेरफारांवर अंतर्राष्ट्रीय व्यापार अवलंबून असतो हें ध्यानांत ठेवून कित्येकजण असें सुचवितात की, एखाद्या वस्तूचा परराष्ट्रांतून परवठा करण्यास

जेवढा कमी खर्च येतो तेवढीच आयात जकात बसवावी म्हणजे उत्पादनमूल्य सारखें होइल. जकाती बसविणें इष्ट आहे असें ठरल्यास त्या किती व कशा बसवाव्या एवढेंच ह्या युक्तिवादांतून निष्पन्न होतें. परंतु परदेशांतील माल कमी किंमतीस मिळणें हा अंतर्राष्ट्रीय व्यापाराचा मुख्य फायदा जकातींमुळें नाहीसा होतो हा मुद्दा तसाच राहातो.

**२२ संरक्षक पद्धतीचा प्रसार**– आयात मालावर जकाती बसविल्यानें किंवा स्वदेशी धंद्यांस उत्तेजनार्थ सरकारी मदत दिल्यामुळें संरक्षित धंद्यांतील उत्पादकांत परस्पर चढाओढ न राहून ते एकमेकांच्या पूर्ण संमतीनें एखाद्या मक्तेदाराप्रमाणें आपला धंदा चालवितात. भांडवल व मजूर ह्यांच्या उत्पादकसामर्थ्यांत वाढ व्हावी हा संरक्षणाचा मूळ हेतू दूर राहून उलट माल उत्पन्न करण्याचे कमी प्रतीचे मार्गही उत्पादकांची मक्तेदारी झाल्यामुळें कायम टिकूं शकतात. सदोष उत्पादनपद्धति व भांडवलवाल्यांची मक्तेदारी ह्यांमुळें वस्तूंच्या किंमती वाढून एकंदर समाजाचा तोटा होऊन केवळ संरक्षित धंद्यांतील उत्पादकांचा मात्र फायदा होतो. परंतु किंमत-वाढीची ही हानी कित्येक प्रकारच्या परिस्थितींत इतर जास्त मोठ्या आर्थिक किंवा राजकीय अरिष्टांपेक्षां कमी महत्वाची ठरते. उदाहरणार्थ ज्या राष्ट्राच्या सरहद्दी समुद्रवलयांकित असतात त्या राष्ट्राला जहाजें बांधण्याचा व त्यांतून वहातुक करण्याचा धंदा जरूर तेवढी झीज सोसून चालविणें भाग पडते. मग इतर राष्ट्रांच्या जहाजांतून मालाची ने आण करणें स्वस्त पडत असलें तरी स्वदेशी जहाजाशिवाय देशाचा परराष्ट्रीय व्यापार चालतां कामा नये असे हुकुम काढावे लागतात. इंग्लंडमधील अशाच प्रकारच्या कायद्यांचें समर्थन करतांना ॲडॅम स्मिथ ह्या कट्या उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञानें 'राष्ट्राला समृद्धीपेक्षां संरक्षणाचें महत्व अधिक आहे,' असें म्हटलें आहे ते अनेक अर्थांनी खरें आहे. देशाच्या लष्करी सामर्थ्यास अवश्य असलेले, किंवा युद्धकाली इतर देशांशी व्यापारी संबंध तुटला असतां स्वदेशांतील नागरिकांच्या आवश्यक गरजा भागविण्यास अडचण पडूं नये म्हणून उत्तेजनार्ह असलेले असे धंदे त्यांपासून आर्थिक दृष्ट्या देशाचें तात्कालिक नफानुकसान काय होईल याचा विचार करीत न बसतां जकाती बसवून किंवा त्या धंद्यांस सरकारी मदत देऊन वाढवावे लागतात.

गेल्या पन्नास वर्षांत व त्यांतूनही महायुद्धापासून खुल्या व्यापाराचें नांव देखील ऐकूं येईनासें झालें आहे व इंग्लंडसारख्या उदारमतवाल्यांच्या माहेरघरांत संरक्षक पद्धतीचाच पगडा बसत आहे. आर्थिक स्वायत्तता असल्यावांचून राजकीय स्वातंत्र्य मिळविणें अगर राखणें दुरापास्त आहे असा अनुभव आल्यामुळेंच सर्व प्रमुख राष्ट्रांनीं आज संरक्षक पद्धति अंगिकारिली आहे. या राजकीय अनुभवाप्रमाणें एक अत्यंत महत्त्वाचा आर्थिक मुद्दा संरक्षक पद्धतीचा कांहीं विवक्षित परिस्थितींत अंगिकार

करूं पहाणारांच्या कृतीचें समर्थन करण्यास पुढें आणतां येतो. प्रत्येक राष्ट्रांतील लोकांनी ज्या धंद्यांत त्यांना नैसर्गिक व इतर परिस्थिती जास्तीत जास्त अनुकूल असेल तोच धंदा करावा व अशा तऱ्हेनें तयार झालेल्या मालाची सर्व देशांनीं स्वतंत्रपणें देवघेव करावी, हा मार्ग आर्थिक दृष्ट्या श्रेयस्कर होय यांत शंका नाहीं. परंतु अनेकवेळां परिस्थितीची वास्तविक अनुकूलता असूनही लोकांच्या अज्ञानामुळें किंवा त्यांस जरूर तो अनुभव नसल्यामुळें अगर केवळ दुसरें एखादें राष्ट्र तो धंदा फार दिवस करीत असल्यामुळें दोन देशांपैकी एकास विवक्षित धंदा करण्यास विशेष सवलत आहे व दुसऱ्यास नाहीं असें वाटतें. परंतु आयात मालावर जकात बसवून किंवा उत्पादकांस सरकारी मदत देऊन कांहीं वेळ त्या धंद्याचें संगोपन केलें तर शेवटीं खऱ्या सवलतीचा पूर्ण फायदा मिळून वाढलेल्या किंमती पुन्हा पूर्वपदावर येतील व उत्पादकांतील स्पर्धेमुळें त्याहीपेक्षां कमी होतील. ही विचारसरणी तात्विक दृष्ट्या बरोबर आहे आणि जर्मनी व अमेरिका ह्या राष्ट्रांनीं ह्याच मुद्यावर भर देऊन पहिल्या प्रथम संरक्षक पद्धति स्वीकारली. परंतु ह्या दोन्ही देशांचा पुढील अनुभव कांहींसा निराशाजनक आहे असें म्हटलें पाहिजे. एक तर कोणते धंदे त्यांचें कांहीं काळ संरक्षण केलें तर शेवटीं आपल्या पायावर उभे राहूं शकतील हें आगाऊ सांगणें फार कठिण असतें. मग संगोपनास योग्य व अयोग्य अशा अनेक धंद्यांस प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मदत द्यावी लागून वाढत्या किंमती अगर कर यामुळें एकंदर प्रमाणाबाहेर तोटा होतो. दुसरें असें कीं ज्या धंद्यास खरोखर अनुकूल परिस्थिति आहे त्या धंद्यांतील भांडवलवाले व मजूर दोघेही किंमती कमी न होतां अनुक्रमें आपला नफा व मजूरी हीं वाढत्या प्रमाणावर असण्याची खटपट करतात. एकदां संरक्षक जकाती बसविल्या किंवा सरकारी मदत द्यावयाची ठरविली म्हणजे ती धंदेवाल्यांची एक मिरासच होऊन बसते व गिऱ्हाइकें आणि कर देणारे प्रजाजन ह्यांना या डोईजड धंद्यांचा बोजा सहन करावा लागतो. सदरहूप्रमाणें संरक्षक पद्धतीचे तात्विक व व्यावहारिक दोष अनेक असूनही राष्ट्रीय स्वातंत्र्य व आर्थिक स्वायत्तता ह्यांच्या अन्योन्याश्रयामुळें हीच पद्धत दिवसानुदिवस प्रसार पावत आहे

# प्रकरण तिसरें



## संपत्तीची विभागणी

**१ विभागणी**—प्रत्येक मनुष्य आपल्या भांडवलाच्या व श्रमाच्या साहाय्यानें जेवढ्या उपयुक्त वस्तू निर्माण करतो, तेवढें त्याचें उत्पन्न असें आपण समजतों. त्याचप्रमाणें एकंदर समाजाच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्या समाजांतील लोक आपल्या भांडवलाच्या साहाय्यानें नैसर्गिक साधनांपासून स्वसुखसंवर्धनार्थ जेवढे उपयुक्त जिन्नस तयार करतात, तेवढें त्या समाजाचें उत्पन्न होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. एखादा शेतकरी शेतांत उत्पन्न झालेल्या एकंदर धान्यांतून त्याला बियाकरितां व लागवडीच्या इतर खर्चाकरितां जेवढें धान्य लागलें असेल तेवढें वजा करूनच राहिलेलें धान्य हें आपलें उत्पन्न असें समजतो. त्याचप्रमाणें एखादा कारागीर आपल्या धंद्यांत लागणाऱ्या हत्यारांची जी झीज होते ती वजा करून आपलें उत्पन्न अजमावतो. शेतकरी, कारागीर, कारखानदार किंवा दुसरा कोणताही धंदेवाला घेतला तरी त्यानें धंद्यांत जें भांडवल घातलेलें असतें तें कायम राहून त्यापेक्षां जेवढें जास्त उत्पन्न होईल तेवढेंच त्याचें निव्वळ उत्पन्न असें मानण्यांत येतें. राष्ट्राच्या दृष्टीनेंही एखाद्या विवक्षित काळांत कच्चा माल व उत्पादनाचीं उपकरणें या नात्यांनी जेवढ्या उपयुक्त वस्तूंचा व्यय झाला असेल तेवढ्यापेक्षां जास्त वस्तूंचा जो सांठा उत्पन्न होतो, ती राष्ट्राची निव्वळ कमाई असें म्हटलें पाहिजे. म्हणजे राष्ट्रांतील एकंदर भांडवल व लोकांचे श्रम यांच्या परस्पर सहकार्यानें निसर्गदत्त वस्तूंपासून जें एकंदर उत्पन्न होतें त्यांतून त्याचा जेवढा भाग भांडवलाच्या स्वरूपाचा असतो, तेवढा वजा करून निव्वळ उत्पन्न काढावें लागतें. या निव्वळ उत्पन्नांतूनच समाजांतील सर्व लोकांस आपापलें उत्पन्न मिळावयाचें असतें. मात्र समाजाच्या निव्वळ उत्पन्नाचा, एखाद्या कुटुंबाच्या कमाईप्रमाणें, आधी एकत्र सांठा होऊन मग सर्व भागीदार आपापला भाग उचलतात असें होत नाहीं. कुटुंबाच्या उत्पन्नांत देखील फारच थोड्या लोकांचें उत्पन्न ठराविक कालमर्यादेनें मिळत राहतें. बहुतेक लोकांस रोजावर, आठवड्यानें, महिन्यानें, वर्षानें किंवा कमी अधिक कालमानानें कमाई होत असते. तरी आपण बोलण्याच्या सोईकरितां प्रत्येक माणसाचें वर्षाचें किंवा महिन्याचें अमुक इतकें उत्पन्न आहे असें म्हणत असतों. त्याचप्रमाणें समाजाचें वार्षिक उत्पन्न हें एकसारखें तयार होत असूनही अमुक वर्षाचें अमुक उत्पन्न असें म्हणतां येतें. या उत्पन्नांतून समाजांतील प्रत्येक व्यक्तीला जो कांहीं भाग मिळावयाचा त्यालाच

आपण त्या व्यक्तीचें उत्पन्न किंवा कमाई असें म्हणतों. राष्ट्राचें उत्पन्न म्हणजे राष्ट्रांतील एकंदर व्यक्तींच्या उत्पन्नांचा समुच्चय व प्रत्येक व्यक्तीस उत्पन्न मिळतें तें राष्ट्रीय उत्पन्नाची विभागणी होऊन मिळतें, हें यावरून दिसून येईल. राष्ट्रीय उत्पन्नाची ही वांटणी चार प्रकारच्या हक्कदारांत होते असें मानण्याचा अर्थशास्त्रज्ञांचा प्रघात आहे. खंड घेणारे जमीनदार, व्याज घेणारे सावकार, मजूरी घेणारे मजूर व नफा घेणारे योजक किंवा धंदेवाले हेच ते भागीदार होत. हें वर्गीकरण शास्त्रशुद्ध आणि व्यवहारी दृष्टीनें समाधानकारक आहे किंवा नाही ह्याचा येथे विचार करीत न बसतां व्याज, खंड, मजूरी, नफा इत्यादि ज्या गोष्टींवर तें अवलंबून आहे त्यांचा आपण क्रमशः विचार करूं.

**२ व्याज**–प्रत्येक समाजांत स्वतःचे पैसे दुसऱ्यांस कर्जाऊ देऊन त्याजवळून व्याज घेण्याचा धंदा करणारे अनेक लोक असलेले आपण पाहतों; व कर्जाऊ घेतलेल्या पैशाबद्दल व्याज देणें हे रास्त आहे याबद्दलही हल्लीं एकमतच आहे. परंतु सध्यांची भांडवलप्रधान व मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याची आर्थिक पद्धति सुरू झाली त्यापूर्वी समाजाच्या ज्या प्राथमिक अवस्था होत्या त्यांमध्यें व्याजानें पैसे कर्जाऊ देणें, किंवा सावकारी करणें हा शिष्टसमत किंवा धर्मसंमत धंदा समजत नसत. याचें कारण असें कीं, त्यावेळी राजकीय शांततेचा अभाव असल्यामुळें व उत्पादनास फारशा भांडवलाची जरूर लागत नसल्यामुळें जे कांही पैसे कर्जाऊ दिले जात त्यांचा ऋणकोवर आलेली एखादी आपत्ति दूर करण्यास, त्याच्या उदरनिर्वाहास, किंवा क्वचित् प्रसंगीं त्याच्या चैनीस उपयोग होत असे. अशा उपयोगाकरितां कर्ज देण्यांत नेहमीच फार धोका असतो. कारण, ऋणको आपल्या उपभोगासाठी, उदरनिर्वाहासाठी किंवा चैनीसाठी कर्ज काढूं लागला म्हणजे त्याची पत बरीच कमी झाल्याशिवाय रहात नाही. अशा सावकारीस धोका अतिशय असल्यामुळें व्याजाचे दरही चढीचे असतात. हल्ली देखील सर्व साधारण व्याजाचा दर एक असून ज्या मानानें ऋणकोची पत, किंवा त्याला कर्ज देण्यांत धोका, कमी जास्त असेल त्यामानानें व्याजाचे दर निरनिराळे असतात. घेतलेल्या कर्जापासून ऋणकोस स्वतंत्र कमाई कांही होत नसल्यानें केवळ भूतदयेनें प्रेरित होऊन दिलेल्या रकमेबद्दल धनकोनें व्याज घेणें हे दुसऱ्याच्या विपन्न स्थितीचा किंवा अजाणतेपणाचा त्यानें फायदा घेण्याच्याच स्वरूपाचें अतएव त्याज्य वाटत असे.

उत्पादन कार्यांत भांडवलाचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होऊं लागल्यापासून सावकारीच्या धंद्याचीही भरभराट झाली. परंतु भांडवलाचा सर्व लोकांस दिसून येणारा प्रकार म्हणजे पैसा हाच असल्यामुळें अनेकजणांस पैशाच्या वाढत्या प्रसारांतच व्याजाचा उगम झाला असें वाटतें. परंतु पैशाची उपयुक्तता इतर वस्तू विकत घेण्याच्या त्याच्या सामर्थ्यावर अवलंबून असते हें

ध्यानांत घेतल्यास केवळ पैशामुळें व्याजाचा प्रादुर्भाव होतो असें म्हणणें, बरोबर नाही, हे दिसून येईल. शिवाय, ज्याठिकाणी पैशाच्या ऐवजी इतर एखाद्या स्वरूपांत भांडवल कर्जाऊ दिलें जातें तेथेंही घेतलेल्या वस्तूंपेक्षां कांहीं जास्त वस्तू व्याज म्हणून द्याव्या लागतातच. उदाहरणार्थ, कांहीं शेतकरी पेरणीच्या वेळीं आपणांस लागणारें बी दुसऱ्याकडून उसनवार आणतात; व कापणी वगैरे झाल्यावर त्याबद्दल सव्वापट किंवा दीडपट धान्य परत देतात. कर्जाऊ भांडवलाचा म्हणजे ती रक्कम देऊन विकत येणाऱ्या उपयुक्त वस्तूंचा, उत्पादनार्थ उपयोग केल्यानें मनुष्यांच्या श्रमाचें उत्पादक सामर्थ्य वाढतें व या वाढलेल्या उत्पन्नांतून भांडवल देणारास कर्जदार व्याज देतो असाही एक समज व्याजाच्या उत्पत्तीबद्दल प्रचलित आहे. परनु केवळ उपभोगाकरितां घेतलेल्या कर्जास किंवा युद्धासारख्या अर्थसंहारक मार्गानें खर्च करण्याकरिता सरकार जें कर्ज उभारतें त्या कर्जातही व्याज द्यावें लागतें, यावरून कर्जाऊ भांडवलाच्या उत्पादक सामर्थ्यामुळें व्याज दिलें जातें हा सिद्धांत सर्वत्र लागू पडणारा नाही, हें दिसून येईल. तरी भांडवलाची उपयुक्तता अर्थोत्पादन व अनेक प्रकारचा उपभोग या दोहोंवर अवलंबून असल्यामुळें भांडवलास असलेली मागणीही उत्पादक व उपभोक्ते या दोघांची असते. त्यांत उत्पादकांची मागणी हीच कायम टिकणारी, कमी धोक्याची, व जास्त रकमेची असल्यामुळे, भांडवलाच्या उपयुक्ततेबद्दलच्या त्यांच्या कल्पनेवरच ते किती व्याज द्यावयास तयार होतात हें अवलंबून असतें; व भांडवलास असलेल्या एकंदर मागणीच्या मानानें त्यांचीच मागणी अधिक असल्यामुळें उपभोक्त्यांस मिळणारें कर्जही मुख्यतः याच व्याजाच्या दरानें मिळतें. मग उपभोगाकरितां, चैनीकरितां किंवा युद्धखर्चाकरितां द्यावयाच्या कर्जांत येणाऱ्या कमी अधिक धोक्यामुळें काय जास्त दर पडेल तो निराळा,

भांडवलाच्या उत्पादक सामर्थ्यामुळेंच व्याज दिलें जातें हें खरें नसलें तरी उत्पादकांच्या मागणीवर व्याजाचा दर पुष्कळ अंशीं अवलंबून असतो, हे नाकबूल करतां यावयाचें नाही. इतर वस्तूंचें मूल्य ज्याप्रमाणें मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें ठरते, त्याप्रमाणें भांडवलाचें मूल्य म्हणजे व्याज हेंही कर्ज देणारे व कर्ज घेणारे यांच्या भांडवलविषयक परिस्थितीवर अवलंबून असतें. भांडवलाचें उत्पादनसामर्थ्य कमी अधिक असेल त्यामानानें कर्ज घेणारे उत्पादक कमी अधिक व्याज देण्यास समर्थ असतात. त्याप्रमाणेंच कर्ज देणारे भांडवलवाले हेही संपत्तीच्या तात्काल उपभोगापासून त्यांस होणाऱ्या समाधानाची उपलब्ध असलेल्या व्याजाच्या दराशीं तुलना करूनच कर्ज देण्यास तयार होतात. मग दुकानदार व गिऱ्हाईक यांच्या ओढाताणीनें ज्याप्रमाणें वस्तूंची किंमत ठरते त्याप्रमाणें सावकार व उत्पादक यांच्या चढाओढीनें व्याजाचा दर ठरतो. वस्तूंच्या उत्पादनमूल्या जवळ जवळ नेहमीं त्यांच्या किंमती

असतात. व्याजाच्या बाबतींत मात्र उत्पादनमूल्याचें हें नियमन फारसें दिसून येत नाही.

कर्जाऊ रकमा देऊन व्याज मिळविणें हें भांडवलाचा पुरवठा वाढण्यास जरूर आहे किंवा नाही, याबद्दल दुमत आहे. कांहीं लोकांच्या मतें मनुष्य पहिल्याप्रथम अर्थोत्पादन करूं लागला तेव्हां त्याला मुद्दाम प्रयत्न व निग्रह करून आपल्या उपयुक्त वस्तूंच्या अल्प सांठ्यांतील कांहीं भाग भांडवल म्हणून निराळा काढून ठेवावा लागला. पण पुढें मात्र भांडवलाच्या साहाय्यानें उत्पादन सुरू झाल्यापासून आपोआपच मनुष्यश्रमापेक्षां अनेक पटींनीं जास्त अर्थोत्पादन होऊं लागलें; व लोकांच्या सर्व गरजा पूर्णपणें भागूनही भांडवल वाढत चाललें. भांडवलाचा पुरवठा असा सहजासहजीं होत असल्यामुळें भांडवल मागणारे ज्या व्याजाच्या दरानें कर्ज मागतील त्या दरानेंच कर्ज द्यावें लागतें. म्हणजे जरी इतर वस्तूंचें मूल्य ठरल्यापूर्वी मागणी व पुरवठा या दोहोंची परस्पर प्रतिक्रिया व्हावी लागते तरी भांडवल मात्र आपोआप उत्पन्न होत असल्यामुळें एखाद्या विवक्षित काळीं त्याचा जेवढा पुरवठा असेल त्या मानानें कर्जदार आपापसांतील स्पर्धेनें व्याजाचा दर ठरवितात. एकंदर भांडवलाच्या सीमागत उत्पादक सामर्थ्याहून हा दर जास्त असूं शकत नाहीं. कारण भांडवल निरनिराळ्या धंद्यांत लागत असून ज्या धंद्यांत तें कमीत कमी उत्पादक असेल त्यांमध्यें मालकांस जेवढें व्याज देणें परवडेल तेवढेंच इतर धंदेवाले देतील; आणि स्वतःचें उत्पादनमूल्य कांहींच नसल्यामुळें भांडवलवाल्यांस हा दर मान्य करावा लागेल.

थोडा नीट विचार केला तर आपल्याला असें दिसून येईल कीं, भांडवल आपोआप उत्पन्न होतें हें विधान खरें नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यानें पहिल्याप्रथम निग्रह करून आपण उत्पन्न केलेल्या कांहीं वस्तूंचा तात्काळ उपभोग न घेता भांडवल म्हणून त्यांचा उपयोग करण्याकरितां त्या बाजूस काढून ठेवल्या त्याप्रमाणें अजूनही प्रत्येक मनुष्य आपल्या उत्पन्नाचा कांहीं भाग त्याचा उपभोग न घेतां बाजूस काढून ठेवतो. हातांत असलेल्या वस्तूचा उपभोग घ्यावा कां जास्त फायद्याच्या आशेनें ती पुन्हां उत्पादन कार्यास लावावी हा प्रश्न प्रत्येक मनुष्यापुढें नेहमीच उभा असतो; व ज्या मानानें उत्पादन कार्यांत अधिक निष्पत्ति होण्याचा संभव असतो त्या मानानें तात्काल उपभोगाची इच्छा कमी होऊन भांडवलाचा सांठा वाढतो. या नियमाला एक दोन अपवाद आहेत ही गोष्ट खरी. कांहीं लोक आपल्या मुलां माणसांस, किंवा आपल्या उतारवयांत स्वतःसच, कांहीं तरी उत्पन्नाची बेगमी करावी या दूरदर्शी भावनेनें पैसे शिलकीं टाकतात. भांडवलाचें उत्पादन सामर्थ्य किंवा व्याजाचा दर ही किती आहेत याचा ते मुळीच विचार करीत नाहींत; उलट व्याजाचा दर कमी झाला तर आपली बचती मात्र वाढवितात. कारण व्याजाचा दर कमी झाल्यानें तितक्याच उत्पन्नाची बेगम-

करण्यास जास्त पैसे व्याजी लावणें भाग पडतें. दुसरें कांहीं धंदेवाले व व्यापारी यांचे उत्पन्न एवढें मोठें असतें व त्यांची व्यवसायबुद्धी व महत्त्वाकांक्षा हीही एवढीं तीव्र असतात कीं, भांडवलाची उत्पादनशक्ति किती आहे याचा विचार न करतां केवळ स्वभाव म्हणून ते आपलें भांडवल वाढवीत असतात. दूरदर्शीपणानें बेगमी-वजा बचत करणारे व महत्त्वाकांक्षेनें किंवा द्रव्यलालसेनें अर्थोत्पादन करणारे हे दोन्ही वर्ग असाधारण लोकांचे व कांहींसे परस्परविरोधी म्हणून बाजूस ठेवले तर एकंदर मनुष्य ज्या मानानें उपयुक्त वस्तूंचा विनियोग जास्त उत्पादक मार्गानें होण्याचा संभव असेल त्यामानानें जास्त वस्तू भांडवल म्हणून स्वतः उपयोगांत आणण्यास किंवा दुसऱ्यांना कर्जाऊ देण्यास तयार होतात, असेंच आपणांस आढळेल. यावरून व्याज म्हणजे वस्तूंचा तात्काळ उपभोग न घेण्यास जो मनोनिग्रह लागतो त्याचीच बक्षिसी होय असा एक समज प्रचलित झाला आहे. परंतु निग्रह ही एक मनोभावना असून जोंपर्यंत त्या भावनेचा संपत्तीच्या उत्पादनास प्रत्यक्ष उपयोग होत नाहीं तोंपर्यंत तिला आर्थिक महत्त्व काहीच नसतें. भांडवलाचा पुरवठा होण्यास निग्रह बहुंशी जरूर आहे हें खरें. परंतु भांडवलाचें उत्पादक सामर्थ्य ज्या मानानें कमीजास्त होतें त्यामानानें निग्रहही कमी जास्त होतो, असा साधारण अनुभव असल्यामुळें व्याजाचा निग्रहापेक्षां उत्पादक सामर्थ्याशीच जास्त संबंध आहे, हें दिसून येईल.

भांडवल, म्हणजे वस्तुमय भांडवल, ही मनुष्याच्या श्रमानेंच उत्पन्न झालेली, परंतु त्याचें स्वतःचें उत्पादनसामर्थ्य वाढविणारी वस्तू आहे. तिचा उपयोग ज्यास करून घ्यावयाचा असेल त्याला स्वतःच्या उत्पन्नांतून बचत करून किंवा दुसऱ्याजवळून उसनवार करून ती मिळवावी लागते. अशी उसनवार करतांना अर्थातच कर्जदारास सावकाराला कांहीं तरी मोबदला द्यावा लागतो. हा मोबदला म्हणजेच व्याज होय; व ज्या मानानें घेतलेल्या भांडवलाचा उपयोग कमी जास्त उत्पादक मार्गानें व्हावयाचा असतो त्यामानानें व्याजाचा दर कमीजास्त असण्याचा संभव असतो. परंतु सावकाराजवळील भांडवलाचा पुरवठाही आपोआप होत नसून ज्यामानानें भांडवलाचें उत्पादक सामर्थ्य वाढतें त्यामानानें कांहीं काल व्याजाचा दर वाढून शेवटीं भांडवलाचा पुरवठाही वाढतो. भांडवलावर व्याज मिळाल्यानें भांडवलाचा संचय करण्यास उत्तेजन मिळून व पहिल्या भांडवलांत व्याजाची भर पडून एकंदर भांडवल वाढतें. नवीन होणाऱ्या यांत्रिक व शास्त्रीय शोधांच्या साहाय्यानें हें भांडवल जास्त उत्पादक धंद्यांत गुंतवून व्याज, नफा इत्यादि मार्गांनी भांडवलवाल्यांस आपला फायदा करून घेतां येतो. अर्थोत्पादनाच्या प्रचलित पद्धतींत असलेलें भांडवलाचें हें सर्वगामी वर्चस्व समाजसत्तावाद्यांच्या डोळ्यांत सलत असतें. मजूर लोकांस आपलें पोट भरण्याचीच मारामार पडत असल्यामुळें, आपल्या उत्पन्नां-

तून बचत करून भांडवल तयार करावें व मग जास्तींत जास्त उत्पादक धंद्यांत तें व्याजीं लावावें हा फायदेशीर मार्ग त्यांस जवळ जवळ बंदच असतो. भांडवल म्हणजे मजुरांच्या श्रमाचा सांठा होय. तो भांडवलवाले आपल्या ताब्यांत ठेवून आणि मजुरांच्या श्रमाच्याच साहाय्यानें त्यावर व्याज मिळवून मूळचा अन्याय द्विगुणित करतात असा समाजसत्तावाद्यांचा समज आहे.

३ खंड — अर्थशास्त्रांतील अत्यंत महत्त्वाच्या व अवघड विषयांत खंडाचा अंतर्भाव होतो. साधारणपणें शेतजमीनीपासून तिच्या मालकास येणाऱ्या निव्वळ उत्पन्नास खंड असें म्हणण्याची वहिवाट आहे. परंतु वास्तविक पहातां सर्व निसर्गदत्त वस्तूंच्या धंद्यांत व थोड्या प्रमाणांत इतर धंद्यांतही, जमीनीच्या खंडासारखींच अनेक उत्पन्नें असतात. जमीनीच्या उत्पन्नांतून मालकास खंड कां मिळतो याचा विचार केल्यास खंडाचें खरें स्वरूप दिसून येईल. रिकार्डो या प्रसिद्ध उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञाचें मत असें होतें कीं, शेतजमिनींत मनुष्याच्या जीवितरक्षणास आवश्यक असलेले जिन्नस उत्पन्न करण्यास लागणारे जे मूलभूत व अविनाशी गुण आहेत, त्याचा मोबदला म्हणून जमीनीच्या मालकास खंड दिला जातो. म्हणजे मनुष्यानें आपलें भांडवल व श्रम यांच्या साहाय्यानें जमीनीची उत्पादकता वाढविण्यास जेवढी मदत केली असेल तेवढ्याचा व्याज व मजूरी यांच्या रूपानें त्यास मोबदला मिळूनही, सुपीक जमीनीचा पुरवठा कमी असल्यानें त्यांच्या मालकांना त्यांच्यांतील सुपीकतेबद्दल फुकट मोबदला मिळतो. सर्व उपयुक्त वस्तूंचें मूल्य त्याची सीमागत उपयुक्तता व सीमागत उत्पत्तिश्रम यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें ठरतें, हें आपणांस ठाऊक आहे. धान्य या वस्तूचें मूल्यही याच नियमाप्रमाणें ठरत असतें. परंतु लोकसंख्येच्या नैसर्गिक वाढीमुळे धान्यास मागणी वाढत्या प्रमाणावर असते; व धान्य हा पदार्थ सर्व लोकांस जीवितरक्षणास आवश्यक असतो म्हणून त्याची उपयुक्तताही इतर वस्तूंच्या मानानें अधिक असते. एका बाजूनें धान्यास असलेली मागणी मुळांतच तीव्र असून वाढत्या लोकसंख्येमुळे नेहमीच तीव्रतर होत असतां, धान्याचा पुरवठा मात्र मर्यादित होत असतो. एक तर कोणतीही जमीन घेतली तरी तिच्यातील उत्पादक द्रव्यांचा हळूहळू नाश होऊन तिची सुपिकता किंवा उत्पत्तिसामर्थ्य कमी होत असतें. शिवाय शेतजमीनीचा एकंदर विस्तारही कमी असून वाढत्या मागणीबरोबर कमी प्रतीच्या किंवा दूरदूर अंतरावरच्या जमीनी लागवडीस घ्याव्या लागतात. धान्याची सीमागत उपयुक्तता व सीमागत उत्पत्तिश्रम हीं दोन्हीं वाढून धान्याचे भाव चढतात.

ज्या जमीनीचा कस सर्वांत कमी असतो त्या अत्यंत निकृष्ट प्रतीच्या जमीनीवरून सीमागत उत्पादन मूल्य ठरतें. मग ज्यांच्या जमीनी या सीमागत जमीनीपेक्षां जास्त कसदार असतात त्यांचा सहाजीकच फायदा होतो. जमीनीची

मालकी म्हणजे आधीच अर्धवट मक्तेदारी. त्यांतूनही तिच्या उत्पन्नाला मागणी तीव्र व वाढती असल्यामुळें अगदीं कमी उत्पादकसामर्थ्य असलेल्या जमीनीत धान्य पिकविण्यास जेवढा खर्च येतो, तेवढा किंमतीच्या रूपानें परत मिळण्याची खात्री असते कमी कमी उत्पादक सामर्थ्याच्या जमीनी सारख्या लागवडीस येत असल्यानें हा उत्पादन–खर्च व त्याबरोबर धान्याच्या किंमतीही वाढतात. सीमागत उत्पादन मूल्याहून ज्यांचें मूल्य कमी असतें, त्यांसही सीमागत उत्पानमूल्याइतकीच किंमत मिळाल्यानें त्याचे उत्पन्न वाढतें. या जास्त किंवा वाढाव्याच्या उत्पन्नासच जमीनीचा खंड असें म्हणतात; व ज्या ज्या प्रकारची उत्पन्नें केवळ भांडवलाचा किंवा श्रमाचा मोबदला नसून धंदेवाल्याच्या किंवा कामकऱ्याच्या विशेष कर्तबगारीनें किंवा अनुकूल परिस्थितीनें त्यास मिळत राहून वाढतही जातात, ती सर्व खंडाच्या स्वरूपाचीच असतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय, किंमत ही सीमागत उत्पादनमूल्यावर अवलंबून असते हें ध्यानांत घेतलें तर कमी उत्पादनमूल्य लागणाऱ्या उत्पादकांस मिळणारा खंड, याचा किंमतींत अंतर्भाव होऊं शकत नाहीं; किंवा खंड वाढल्यानें किंमती वाढत नाहींत, उलट, किंमती वाढल्यानें, म्हणजे मूळांत सीमागत उत्पादनमूल्य वाढल्यानें, खंड मात्र वाढतो हें दिसून येईल.

नेहमी ज्यास आपण खंड असें म्हणतों त्यांत अनेक प्रकारच्या उत्पन्नांचा अंतर्भाव झालेला असतो. जमीनीचा मालक आपल्या जमीनीची स्वतःच्या अगर मोलानें लावलेल्या मजूरांच्या श्रमानें व आपल्या किंवा कर्जाऊ आणलेल्या भांडवलाच्या साहाय्यानें लागवड करीत असेल तर त्याच्या उत्पन्नांत श्रमाची मजूरी व भांडवलाचें व्याज यांचाही खंडांत समावेश होतो. जमीनीच्या मालकानें आपली जमीन दुसऱ्यास लागवडीस दिली तरी देखील जर थोडें फार भांडवल किंवा श्रम मालक पुरवीत असेल तर त्यास मिळणाऱ्या उत्पन्नांत व्याजाचा व मजूरीचा अंशरूपानें समावेश होईल. शिवाय, अर्थशास्त्राच्या दुसऱ्या अनेक नियमांप्रमाणें खंडाच्या उत्पत्तीचा नियमही जमीनीचे मालक व खंडकरी यांच्यांत पूर्ण स्पर्धा चालू आहे व एका जमीनींत गुंतविलेलें भांडवल व श्रम सहज दुसऱ्या जमीनींत घालतां येण्यासारखे आहेत, अशा कल्पनेवरच उभारलेला आहे. ज्यामानानें जमीनीचे मालक किंवा लागवड करणारे यांमध्यें ही स्पर्धा व चलनशीलता यांचा अभाव असेल त्यामानानें खंडाची अर्थशास्त्रांतील कल्पना पूर्णपणें व्यवहारांत अनुभवास येणें कठीण होतें. शेत जमीनीच्या मालकांनी स्वतः कांहीं एक खटपट न करतां केवळ लोकसंख्या वाढली म्हणून किंवा उतरत्या पैदाशीचा निसर्गनियम त्यांच्या धद्यास लागू आहे म्हणून त्यांचा फायदा व वाढत्या किंमतीमुळें जमीनीचे मालक नसलेल्या उपभोक्त्यांचे नुकसान होत रहावें, ही गोष्ट समाजसत्तावाद्यांस अन्यायमूलक वाटते. म्हणून जें उत्पन्न मिळविण्यास जमीनीच्या

मालकानें आपले श्रम किंवा भांडवल यांचा खर्च केलेला नसतो तेवढें तरी निदान सरकारनें आपल्या ताब्यांत घ्यावें, असें ते सुचवितात.

**४ शहरांतील भुईभाडें**— जमीनीचा धान्याच्या लागवडीशिवाय ज्या कांहीं इतर मार्गांनी उपयोग केला जातो त्यांत घर करून राहण्याकरितां माणसांस जागा लागते त्याला प्रमुख स्थान दिलें पाहिजे. खेडेगांवांत किंवा लहान सहान शहरांत घर बांधण्यास योग्य अशी जागा मुबलक असते; त्यामुळे निरनिराळ्या जागांच्या उत्पन्नांत फारसा फरक होत नाहीं. तरी शेतजमीनीच्या शेजारीं असलेल्या नापीक जमीनीचा घरें बांधण्यास उपयोग केला जातो, यावरून शेत-जमीनीपेक्षां घर बांधणीची जमीन कमी उत्पादक असते, असें दिसून येईल. धान्य पिकविण्यास सोईच्या शेतजमीनीला असलेल्या मागणीपेक्षां तिचा पुरवठा कमी असतो. म्हणून चांगल्या जमीनीच्या उत्पन्नातून खंड देतां येतो. घर बांधावयास लागणाऱ्या जागांचा मात्र सामान्यतः मागणीच्या मानानें जास्त पुरवठा असल्यानें त्यांस फारसें मूल्य येत नाहीं व म्हणून त्यांपासून खंडही क्वचितच मिळतो. जागेला लोकवस्तीच्या सान्निध्याने आपोआप कसें मूल्य येतें याचें एक उदाहरण सर्वांस माहीतच आहे. डोंगर पठारावरून, घाटांतून किंवा दऱ्याखोऱ्यांतून आगगाडींत बसून चाललें असतां रम्य व हवाशीर अशा असंख्य जागा आपणांस दिसतात. त्यांचें मूल्य सध्यां कांहींच नसून त्याच जागा यदृच्छेनें लोकवस्तीस नजिक झाल्या तर लाखों रुपये किंमतीस विकल्या जातील. निर्जन प्रदेश व खेडेगांवें यांत जागेचा पुरवठा अमर्याद असल्यानें त्यास फारसें मूल्य नसतें. मोठमोठ्या शहरांत मात्र जमीनीचा पुरवठा मर्यादित असल्यानें सर्व जमीनीची किंमत वाढते व जास्त सोईस्कर जमीनीच्या मालकांना खंड मिळूं शकतो.

विशेषतः ज्या जागांचा दुकानें किंवा कारखाने बांधण्याकरिता किंवा दुसरा एखादा धंदा करण्याकरितां उपयोग करण्यांत येतो त्या जागांच्या बाबतीत शेत जमीनीच्या खंडा-चाच सिद्धान्त बहुंशी लागू पडतो. विवक्षित श्रम व भांडवल हे एका जमीनीच्या लाग-वडीस लावल्यानें जेवढें उत्पन्न होतें त्यापेक्षां तेवढेच श्रम व भांडवल ही दुसऱ्या जमीनीच्या लागवडीस लावलीं तर उत्पन्न अधिक होतें, यावरून त्या दोहोंच्या उत्पादक सामर्थ्यांत फरक आहे असें आपण समजतों. त्याचप्रमाणें एखाद्या विवक्षित जागेत एखाद्या वस्तूचें दुकान काढलें तर जास्त व दुसरीकडे काढलें तर कमी विक्री होऊन श्रम व भांडवल हीं तेवढींच असूनही दुकानदारांस एकंदर उत्पन्न कमी अधिक होतें. सुपीक जमीनीचा पुरवठा ज्याप्रमाणें मर्यादित असतो त्याप्रमाणें अधिक उत्पन्न करून देणाऱ्या अशा जागाही थोड्याच असतात. मग ज्याप्रमाणें उत्पादक सामर्थ्य कमी अस-लेल्या सीमागत शेतकऱ्याच्या उत्पत्तिश्रमानें किंमत ठरून जास्त उत्पादक सामर्थ्य असलेल्यांस खंड मिळतो, त्याचप्रमाणें ज्यांच्या मालकीच्या जागा दुकान काढण्यास

विशेष सोईच्या आहेत त्यास इतरांपेक्षां जास्त उत्पन्न मिळतें. दुकानांप्रमाणेंच कारखान्यांचीही गोष्ट आहे. कच्च्या मालाचा पुरवठा, गिऱ्हाइकांचें सान्निध्य, वहातुकीच्या साधनांची सोय इत्यादि सर्व फायदे ज्या जागेपासून विशेष मिळण्याचा संभव असतो त्या जागेला इतर जागांहून जास्त किंमत येते. शिवाय कारखाने व निरनिराळ्या वस्तूंचीं दुकानें यांवर आपला उदरनिर्वाह करणारे लोकही आपल्या धंद्याच्या ठिकाणास शक्य तितक्या नजीक जागा मिळविण्याची खटपट करितात. मग व्यापार पेठेतील जागेस तिच्या उत्पादक सामर्थ्यानुसार जास्त भाडें व जसजसें दूरदूर जावें तसतसें कमी भाडें, असें होऊन जातें.

हल्लींच्या आर्थिक पद्धतींत एकाच धंद्यांतील अनेक उत्पादक व सर्व प्रकारचे धंदेवाले यांचे परस्पर सहकार्य व संकलन ही मोठ्या प्रमाणावर होत असल्यामुळें मोठमोठ्या शहरांत व्यापारधंद्याच्या व लोकसंख्येच्या वाढीमुळे जमीनीच्या किंमती अतोनात वाढल्या आहेत. शेतजमीनीच्या मालकांनीं स्वतःचे श्रम व भांडवल यांच्या साहाय्यानें ती कमाविलेली असते. म्हणून शेतजमीनीच्या उत्पादक सामर्थ्यांतील फरक कांहीं थोड्या अंशानें तरी त्यांच्या मालकांनीं केलेल्या खर्चावर अवलंबून असतात. परंतु शहरांतील जागा नुसत्या पडीक टाकल्या तरी समाजाच्या आर्थिक हालचालींमुळें आपोआपच त्यांची किंमत वाढून मालकाचा फायदा होतो. हल्लींच्या आर्थिक घटनेंत समाजसत्तावाद्यास जे कित्येक भयंकर दोष दिसतात त्यांपैकीं शहरांतील जागांच्या मालकाचें वाढतें उत्पन्न हा एक प्रमुख दोष होय. बहुतेक सुधारलेल्या देशांत शहरांतील जागांच्या मालकावर जादा कर बसविलेले असतात, त्याचें मुख्य कारण वर वर्णन केलेलें त्यांच्या उत्पन्नाचें विशिष्ट स्वरूपच होय.

**५ खाणी व मासेमारी**—शेतजमीन व शहरांतील जागा यांप्रमाणेंच खाणींचा पुरवठा मर्यादित असून त्यांच्या उत्पादक सामर्थ्यांत बराच फरक असतो. म्हणून जास्त उत्पादक खाणीच्या मालकांस इतरांपेक्षां खंडासारखें जास्त उत्पन्न मिळतें. शेतजमीन व खाणी यामध्यें दुसरेंही एक महत्वाचें साम्य आहे. तें हें कीं, ज्याप्रमाणें उतरत्या पैदाशीचा सिद्धांत शेतीस त्याचप्रमाणें तो खाणीच्या धंद्यासही लागू आहे. जों जों खाणींत खोल खणीत जावें तों तों मालाचें उत्पादन मूल्य वाढत जातें. पुरवठ्याचें मर्यादित क्षेत्र, वस्तूच्या उपयुक्ततेचें अत्यंत महत्त्व व वाढत्या पुरवठ्याबरोबर उत्पादन मूल्याचीही वाढ इत्यादि बाबतींत शेतजमीन, शहरांतील जागा व खाणी यांचें कमी जास्त प्रमाणांत साम्य आहे, व त्यांच्यापासून येणाऱ्या उत्पन्नांतही खंडासारख्या उत्पन्नाचा बराच भाग असतो. कांहीं खाणींत कमी प्रतीचा तर कांहीं खाणींत उच्च प्रतीचा माल सांपडतो; कांहीं खाणी वहातुकीच्या साधनांस किंवा मजूर व गिऱ्हाईकांस जवळ तर कांहीं दूर असतात; कांहीं खाणींतून माल काढण्यास कमी व कांहींतून माल काढण्यास जास्त श्रम करावे लागतात. निरनि-

गळ्या खाणींत असलेल्या या फरकांमुळें त्यांचें उत्पादक सामर्थ्य कमी अधिक असतें व जास्त उत्पादक खाणींच्या मालकांस खंड मिळूं शकतो. कांहीं अर्थशास्त्रज्ञांच्या दृष्टीनें खाणींच्या उत्पन्नांत खंडाचा फारसा भाग असत नाहीं. कारण बहुतेक खाणी त्यांच्या मालकांनीं इतर धंदेवाल्यास चालविण्याकरितां दिलेल्या असतात व ते स्वतः स्वामित्व म्हणून ठरावीक दरानें कांहीं तरी उत्पन्न घेत असतात. प्रत्येक खाणींच्या मालकास असें उत्पन्न मिळत असल्यामुळें जमीनीच्या खंडाचे बाबतींत सीमागत उत्पादनमूल्याची व बिनखंडाची जशी एखादी जमीन असते तशी स्वामित्व विरहित खाण मात्र असलेली दिसत नाहीं. परंतु अनेक ठिकाणीं अमूक एक वस्तूच्या खाणी आहेत हें माहीत असूनही त्या चालविणें धंदेवाल्यांस परवडत नाहीं व वस्तूची मागणी वाढून भाव वाढल्यास नवीन खाणी चालविणें शक्य होतें यावरून खाणींच्या धंद्यांतही सीमागत उत्पादक असूं शकतो हें दिसून येईल. शिवाय, सीमागत उत्पादक हा निराळा व स्वतंत्रच असला पाहिजे असें नाहीं. इतर उत्पादन कार्यांतच ज्यावेळेस धंदेवाले कमीतकमी उत्पादक मार्गानें आपल्या भांडवलाचा व श्रमाचा व्यय करतात त्या वेळेस तेच सीमागत उत्पादक होतात, हें ध्यानांत ठेवल्यास स्वामित्व न देणाऱ्या खाणी नसल्या तरी कमी उत्पादक खाणींच्या मानानें जास्त उत्पादक खाणींच्या मालकांना अधिक उत्पन्न मिळतें हें नाकबूल करता येणार नाहीं.

खाणींच्या धंद्याप्रमाणें मासेमारीच्या धंद्यांचीही गोष्ट आहे. लोकवस्तीस व वहातुकीच्या साधनास जवळ आणि अनेक प्रकारच्या माशांनीं समृद्ध असलेले जलाशय फार थोडे असतात. त्यांत कांहीं जास्त व कांहीं कमी उत्पादक असून त्यांच्या मालकास कमीजास्त उत्पन्नाच्या रूपानें खंड मिळूं शकतो. शहरांतील जागांच्या मालकांप्रमाणें खाणींच्या मालकाबद्दलही समाजसत्तावाद्यांत बराच असंतोष असतो. खाणीचा मालक स्वतःच्या साहसी व शोधकबुद्धीनें खाण शोधून काढतो, असें क्वचितच होतें. बहुतेकवेळा कोणातरी साहसी व बुद्धीवान माणसास त्याच्या श्रमानें किंवा सुदैवानें खाण सांपडलेली असते. कोळसा, लोखंड, राकेल इत्यादि समाजाला आजकाल अत्यंत जरूर असलेल्या वस्तूंच्या खाणी केवळ यदृच्छेनें एखाद्या व्यक्तीच्या मालकीच्या झाल्या तर सर्व समाजाचें नुकसान व एकाचाच फायदा होत रहातो. मग खाणींच्या मालकांचें स्वामित्व, खाणी चालविणाऱ्या भांडवलवाल्यांचें व्याज व नफा ह्या सर्व खर्चाचा बोजा उपभोक्त्यांवर बसून मजुरांची मजूरीही त्यांच्या उत्पादक श्रमाच्या मानानें कमी होते. म्हणून समाजसत्तावाद्यांच्या मतें पहिल्याप्रथम खाणी राष्ट्राच्या मालकीच्या करणें जरूर आहे. इतर धंद्यांत जोपर्यंत खाजगी मालकीच्या तत्त्वाचाच अंमल चालू आहे तोपर्यंत खाणींच्याच एका धंद्यांत राष्ट्राची मालकी प्रस्थापित करणें योग्य नाहीं, असेंही दुसऱ्या कित्येक अर्थशास्त्रज्ञाचें म्हणणें आहे. शिवाय, सरकारला खाणी चालविण्यासारखा व्यापारी धंदा चांगला करतां येईल किंवा नाहीं, खाणींच्या

मालकांस त्यांचा हक्क विकत घेण्याबद्दल द्यावी लागणारी रक्कम राष्ट्रास झेपेल की नाहीं, इत्यादि लहान सहान शंकाही नेहमी काढल्या जातात. परंतु जर्मनीमध्यें सर्व खाणी पहिल्यापासूनच सरकारच्या मालकीच्या असून इंग्लंडांतही कोळशाच्या खाणी सरकारच्या हुकुमतीखाली आणण्याचा प्रयत्न चालू आहे, यावरून खाणींबद्दल खाजगी व्यक्तीस मिळणारा खंड बंद करणें अगदींच अशक्य नाही, हें दिसून येईल.

शेत जमीन, शहरांतील जागा व खाणी इत्यादिकांची सर्व मालकी समाजसंस्थेनें आपल्या ताब्यांत घ्यावी असें म्हणणाऱ्यांच्या मार्गांत नेहमी एक मोठी अडचण येत असते, तिचा उल्लेख करणें जरूर आहे. पहिल्याप्रथम जो जमिनीचा मालक झाला त्याचा हक्क तेव्हां न्याय्य होता किंवा नाहीं हा प्रश्न निराळा. परंतु ज्यांनीं आपल्या पदरचे पैसे खर्च करून किंवा दुसऱ्या एखाद्या कायदेशीर मार्गानें जमीन किंवा खाणी असली मालमत्ता मिळविली त्यांस त्यांचे पैसे किंवा श्रम यांचा मोबदला न देतां हुसकावून लावणें हा मोठाच अन्याय होईल. म्हणून केवळ तात्विकदृष्ट्या एखाद्या वस्तूची मालकी खाजगी व्यक्तीकडे नसावी असें ठरलें तरी सध्याच्या मालकांची पुरी भरपाई केल्याशिवाय राष्ट्रास कायदेशीर किंवा समर्थनीय मार्गांनीं आपली मालकी प्रस्थापित करता येणार नाहीं, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

**६ मजूरी**—संपत्तीच्या उत्पादनांत भांडवलाचा अत्यंत उपयोग होत असल्या-मुळें सध्यांच्या आर्थिक घटनेस ज्याप्रमाणें भांडवलशाही म्हणतात, त्याचप्रमाणें संप-त्तीच्या विभागणीच्या दृष्टीनें समाजांतील फार मोठ्या वर्गास मजूरीच्या रूपानें उत्पन्न मिळत असल्यानें त्या घटनेस मजूरीची पद्धत असेंही म्हटलें असतां चालेल. भांड-वल व श्रम यांच्या सहकार्यानें संपत्तीचें उत्पादन होऊन श्रम करणाऱ्या मजूरास मजूरी मिळते, ती कोणत्या आर्थिक नियमानुसार मिळते याबद्दल निरनिराळे सिद्धान्त आहेत. त्यांचें विवेचन करण्यापूर्वी मजूरी म्हणजे काय व तिचे निरनिराळे प्रकार कोणते याबद्दल थोडा विचार करणें जरूर आहे. श्रमाचा मोबदला म्हणजे मजूरी असा मजूरी या शब्दाचा ढोंकळ अर्थ करतां येतो. या अर्थानें शेतावर किंवा कारखान्या-ध्यें कष्ट करणाऱ्या मजूराच्या मिळकतीस व एखाद्या प्रचंड कारखान्याच्या चाल-कास किंवा राष्ट्राच्या मुख्य प्रधानास असलेल्या मोठ्या पगारासही मजूरी या एकाच नांवानें संबोधावें लागेल. असें करण्यानें शेतकी व इतर उद्योग धंदे यांत स्वतःचें भांडवल नसलेले जे अनेक लोक मोलमजूरी करून परावलंबनानें व कष्टानें आपला उदरनिर्वाह करीत असतात त्यांच्या परिस्थितीच्या विशेष अडचणी दृष्टीआड होण्याचा संभव असतो. म्हणून जो इसम दुसऱ्या एखाद्या धंदेवाल्यास आपले श्रम मोलानें विकतो तो मजूर, व धंदेवाला मालक आपल्या मजूराला वेतन देतो ती मजूरी, अशीच व्यवहार-शुद्ध व्याख्या करावी लागते.

साधारणपणें मजूरी पैशाच्या रूपानें दिली जात असल्यामुळें मजूरीतील कमी जास्त फेरबदलाविषयीं बराच गैरसमज होण्याचा संभव असतो. म्हणून पैशाच्या स्वरूपानें मिळणारी मजूरी व वास्तविक मजूरी याची थोडी फोड करावयास पाहिजे. उपयुक्त वस्तू विकत घेणें हाच पैशाचा उपयोग, हें मागें अनेकवार सांगितलेंच आहे. त्यावरून एखाद्या मजूराला किती पैसे मिळतात ह्या गोष्टीपेक्षां त्याला एकंदर उपयुक्त वस्तूंचा किती सांठा मिळतो, याच गोष्टीला जास्त महत्त्व दिलें पाहिजे हें उघड होईल. एखाद्या धंद्यांतील मजूरीचे दर वाढले व मजूरांस लागणाऱ्या पदार्थांच्या किंमतीही त्याच प्रमाणांत वाढल्या, तर वास्तविकपणें मजूरीत कांहींच वाढ झाली नाहीं, असें म्हटलें पाहिजे. पदार्थांच्या किंमती, म्हणजे पैशाचें वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य, यांबरोबरच एखाद्या धंद्यापासून जे कांहीं विशेष फायदे किंवा अडचणी उत्पन्न होतात त्यांचाही वास्तविक मजूरीचा दर ठरवितांना विचार करावा लागतो. मजूरीशिवाय कांहीं भत्ता, 'महागाई,' रहावयास जागा, कमी भावानें जिन्नस खरेदी, किंवा दुसऱ्या कांहीं सवलती मिळत असतील तर वास्तविक मजूरी निव्वळ पैशाच्या रूपानें मिळणाऱ्या मजूरीपेक्षां जास्त होईल. तेंच एखाद्या धंद्यांत मजूराला पदरचे पैसे खर्च करावे लागत असतील किंवा धंदा घाणेरडा किंवा धोक्याचा असेल तर यां सर्वांबद्दल मजूरी म्हणून मिळणाऱ्या पैशांतून कांहीं भाग कमी करूनच वास्तविक मजूरी ठरवावी लागेल. एकाच देशांतील निरनिराळ्या धंद्यांतील मजूरांच्या मजूरीत किंवा अनेक देशांतील एका धंद्यांतल्या मजूरांच्या वेतनांत जो फरक दिसून येतो, तो बहुंशीं पैशाच्या स्वरूपानें मिळणाऱ्या मजूरीपुरताच असतो व वास्तविक मजूरीचे दर बरेचसे एकमेकांसारखे असतात.

मजूराच्या मिळकतीचा तुलनात्मक विचार करीत असतांना पैशाच्या स्वरूपाची व वास्तविक मजूरी हा भेद जसा ध्यानांत घ्यावा लागतो तसेंच मजूरांना कोणत्या पद्धतीनें मजूरी मिळत आहे, हेंही पहावें लागतें. अमुक वेळ काम केलें म्हणजे अमुक मजूरी अशा पद्धतीनें मजूरास आपलें वेतन मिळत असेल तर तिला कालमित मजूरीची पद्धत, असें म्हणतां येईल. अशा पद्धतिमुळें मजूरांस बरेंच स्वास्थ्य उपभोगण्यास सांपडतें. परंतु कित्येक वेळां अशा 'रोजदारीच्या' पद्धतीमुळें मजूरांना कामांत चुकारपणा करण्याला सवड मिळते. मजूरी आकारण्याची दुसरी पद्धत म्हणजे, अमुक इतकें काम करण्याबद्दल अमुक इतकें वेतन, असा दर ठरविण्याची असते. अशा 'कार्यमित' मजूरीच्या पद्धतींत मालकाला योग्य काम करून मिळण्याची खात्री असते. पण मजूरांस कामचुकारपणा करतां न येऊन कित्येक प्रसंगी ते कमी वेळांत जास्त कमाई करण्याच्या आशेनें हलक्या प्रतीचें काम करतात. आपण मजूरी किती देतों व तिच्या मोबदला मजूरांकडून संपत्तीचें उत्पादन किती होतें ह्याचा मेळ काढून, विवक्षित प्रतीची कार्यक्षमता असलेल्या

मजुरास विवक्षित मजूरी असें मालकाला ठरवावें लागतें. त्यामुळे कित्येक वेळा जास्त मजूरी घेणारे परंतु जास्त कार्यक्षम मजूर कामास लावणें हें कमी मजूरीच्या व कमी कार्यक्षमतेच्या मजूरांस कामावर घेण्यापेक्षा जास्त फायदेशीर ठरतें. यंत्र-सामुग्रीच्या साहाय्यानें मोठ्या प्रमाणांत व सकलित स्वरूपानें उत्पादन करण्याची पद्धति सुरू झाल्यापासून अशा कार्यक्षम मजूराची उत्पादकांस फारच जरूर भासू लागली आहे. उद्योगधंद्यांची भरभराट असलेल्या बहुतेक सर्व राष्ट्रांत मजूर कार्यक्षम असून त्यांची मजूरीही इतर देशांच्या मानानें अधिक असते.

**७ मजूरीचे सिद्धान्त**—मजूरी ही मुळांत काय आहे व अर्थोत्पादनाच्या इतर घटकांच्या मिळकतीशी तिचा कोणता संबंध आहे, याबद्दल अनेक मतें प्रचलित आहेत. कित्येक लोक मजूराचे श्रम ही इतर उपयुक्त वस्तूसारखी एक वस्तु समजून मजूरी ही त्या वस्तूची किंमत आहे असें समजतात. ज्याप्रमाणें प्रत्येक वस्तूची किंमत शेवटी तिच्या उत्पादन-मूल्यावरच बहुशः अवलंबून असते त्याप्रमाणे मजूरीही मजू-राच्या उत्पादनमूल्यावरूनच ठरते. म्हणजे एक मजूर व त्याचें कुटुंब याचा चरितार्थ चालण्यास जेवढा खर्च येतो तेवढ्यापेक्षा मजूरीचे दर सामान्यतः जास्त कमी असूं शकणार नाहीत. मजूरीचे दर या किमानमर्यादेपेक्षा कमी झाले तर मजूरांचा उदरनिर्वाह नीटपणे न होऊन कांहीं मजूर मरण पावतील व मजूराचा पुरवठा कमी होऊन मजूरीचे दर वाढतील व उलटपक्षीं मजूरीचे दर या किमान मर्यादेपेक्षा जास्त झाले तर मजूरांची संतती वाढून त्यांचा पुरवठाही वृद्धिंगत होईल; व मजूरी किमान मर्यादेवर येईल. प्रत्येक समाजांत जें अगदीं निकृष्ट प्रतीचें राहणीचें मान असतें त्यापेक्षा मजूरांचें वेतन कधींच अधिक असूं शकणार नाहीं, असा या सिद्धान्तावरून एक निःकर्ष काढण्यांत येतो. उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञ मजूरीच्या याच सिद्धांताचा पुरस्कार करीत; व कांहीं काळ समाजसत्तावादी लोकही या सिद्धां-तास आपली मान्यता देऊन सध्याच्या आर्थिक घटनेत मजूराची राहणी सुधारण्याची मुळीच आशा नाहीं, असें सिद्ध करूं पहात. उलट, मजूरांकडून काम करून घेणारे मालक मजूरांची स्थिति सुधारण्याची आपल्यावर असलेली सामाजिक जबाबदारी या सिद्धान्ताच्या साहाय्यानें सहज उडवून देत आणि मजूरांना जास्त वेतन दिलें तरी शेवटीं त्यांची संख्या वाढून पुन्हा मजूरीचे दर पूर्वपदावर येणार हा जणू नैसर्गिक नियमच ठरून गेल्यानें ते दर वाढविण्याची खटपट करणें हें मूर्खपणाचें आहे असें मानण्यांत येई.

हा सिद्धान्त अगदीं पोकळ असून हल्लीं तो फारसा पुढें आणला जात नाहीं. एकाच देशांतील निरनिराळे धंदे व निरनिराळ्या देशांतील धंदे यांच्यातील मजूरीच्या दरांत जे फरक दृष्टीस पडतात त्यांचा या सिद्धान्तावरून कांहींच उलगडा होत नाहीं. शिवाय एकाच मजूराच्या मिळकतींत जो नेहमीं चढउतार होतो त्याचेंही एखादें समा-

धानकारक कारण या सिद्धान्तानुसार देतां यावयाच नाही. प्रत्येक मजुराचा, त्याच्या निकृष्ट राहणीच्या मानानें चरितार्थ चालविण्याचा खर्च जन्मभर एकच असतो; व तो एका देशांतील सर्व मजुरांत जवळ जवळ सारखाच असतो, असें म्हटलें असतां चालेल. दोन निरनिराळ्या राष्ट्रांतील मजुरांचें राहणीचें मान काहींसे निराळें असूं शकतें, हें खरें. परंतु केवळ जीवितरक्षणार्थ आवश्यक अशाच वस्तूंचा ज्यात अंतर्भाव होतो ती निकृष्ट प्रतीची राहणी सर्व देशात प्रायशः सारख्याच खर्चाची असते, असें म्हणण्यास विशेष हरकत नाही. असें असूनही निरनिराळ्या वेळीं, निरनिराळ्या धंद्यात व निरनिराळ्या देशांत प्रचलित असलेल्या मजुरीच्या दरात बराच फरक असतो, यावरून वरील सिद्धान्त खरा नाही, असें दिसून येईल. शिवाय, उदरनिर्वाहास कमीत कमी आवश्यक वस्तु, किंवा निकृष्ट राहणी, ही नेहमी एकच असतात असे नाही मजुरांमध्येही निरनिराळ्या प्रकारची राहणी दिसून येते. कांहीजणांस आवश्यक वस्तूही पुऱ्या मिळत नाहीत, तर दुसऱ्या कित्येकजणास साधारण सुखवस्तु स्थितीत राहता येण्याइतक्या उपयुक्त वस्तू मिळूं शकतात. मजुरांचे जे अत्यंत निकृष्ट प्रतीच्या राहणीचें मान असतें त्यापेक्षां मजुरी कमी होऊं शकत नाही, हें जर खरें असतें तर आपली आर्थिक स्थिति सुधारण्यास मजूर वर्गाला मुळीच सायास पडले नसते. सर्व मजुरांनीं मिळून एखाद्या विवक्षित दिवसापासून आपली जुनी हलक्या प्रतीची राहणी सोडून उच्च प्रतीची राहणी स्वीकारली म्हणजे झालें. 'हीच आमची किमान राहणी' असें त्यांनीं ठरविल्यास मालकाना मजुरी त्या मानानें वाढविलीच पाहिजे, असें होईल. परंतु व्यवहारात असें घडून येत नाही व राहणीच्या मानावर उत्पन्न अवलंबून असण्यापेक्षां उत्पन्नावरच राहणीचें मान अवलंबून असतें, असें आपण पाहतो. मजुरांची राहणी व मिळकत ही बऱ्याच प्रमाणात त्यांच्या उत्पादक सामर्थ्यावरच अवलंबून असली पाहिजेत, हेंही या अनुभवावरून दिसून येईल.

**८ उत्पादक सामर्थ्य व मजूरीचा सांठा**– मजुराच्या उत्पादक सामर्थ्याइतकी त्याची मजूरी असते, असें म्हणणाराची विचारसरणी पुढें दिल्याप्रमाणें असते. "मजूर हा केवळ एक उपयुक्त वस्तु नसून जमीन व भांडवल याच्या बरोबरीचा, किंवा त्याहूनही श्रेष्ठ प्रतीचा, उत्पादनाचा एक घटक आहे. ज्या मानानें हे घटक अर्थोत्पादनास कमी अधिक मदत करतात त्या मानानें त्यांची मिळकत ठरते; किंवा या घटकांच्या उत्पादक सामर्थ्याप्रमाणें त्यांच्या मिळकतीत फेरबदल होतात. जमीनीबद्दल खंड, भांडवलाबद्दल व्याज, योजकाच्या श्रमाबद्दल नफा, ही ठराविक प्रमाणानेंच मिळावयाचीं असतात. म्हणून एखाद्या धंद्यांत जेवढी एकंदर अर्थनिष्पत्ति होईल त्यांतून खंड, व्याज व नफा ही वजा केलीं म्हणजे जी शिल्लक राहील ती सर्व मजुरांस मिळेल. मजुराचें उत्पादक सामर्थ्य जसजसें वृद्धिंगत होईल तस-

तशी एकंदर धंद्याची कमाई जास्त होत जाऊन, इतर घटकांचा ठराविक वांटा तेवढा देऊन टाकला म्हणजे मजूरीचे दरही वाढतील. एकाच धंद्यांत काम करणाऱ्या निरनिराळ्या मजूरांत, निरानराळ्या धंद्यांत व निरनिराळ्या देशांत मजूरीचे दर भिन्न असतात याचें कारण त्या त्या मजूरांचें उत्पादक सामर्थ्य कमीजास्त असतें, हें होय." ज्या मानानें मनुष्य जास्त काम करतो त्या मानानें त्याची कमाई वाढते ही रूढ कल्पना असल्यामुळे वरील विचारसरणी बऱ्याच लोकांस पटण्यासारखी आहे. मजूरांच्या मालकांना तर हा सिद्धान्त म्हणजे आवडतें वेदवाक्य वाटतें. 'मजूरी कमी मिळाल्यानें मजूरांचे हाल झाले तर तो त्यांचा स्वतःचा दोष होय. ते कार्यक्षम नसतात, कामात चुकारपणा करतात म्हणून त्यांची मिळकत कमी असते. त्यांनी मन लावून चांगलें काम करावें म्हणजे त्यांची मजूरी आपोआप वाढेल.' असा त्यांस कांगावा करण्यास सांपडतो. या शिकवणीप्रमाणें मजूर वागण्यास तयार झाले तर मालकांचा त्यांत फायदाच होतो. कारण मजूरांचें उत्पादक सामर्थ्य वाढल्यानें वस्तूंचें उत्पादनमूल्य कमी होतें. मग किंमती कायम राहिल्या तर नफा वाढून किंवा किंमती कमी झाल्यास मालाचा खप जास्त होऊन, मालकाचें हितच होतें. खंड, व्याज, व नफा ह्यांचें धंद्याच्या एकंदर उत्पत्तीशीं असणारें प्रमाण ठराविक असतें, हें वरील विचारसरणींत गृहीत धरलेलें असतें. परंतु वास्तविक अशी मुळीच स्थिति नसून मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें या सर्व प्रकारच्या मिळकतींचें धंद्याच्या एकंदर उत्पन्नाशीं असलेलें प्रमाण बदलत असतें. मजूरीचे दरही केवळ मजूरांच्या उत्पादक सामर्थ्यावर अवलंबून नसून त्यांच्या श्रमास असलेली मागणी आणि त्यांची संख्या व त्यांचें सांघिक बल यांच्या परस्पर संबंधामुळें मजूरीचे दर कधीं उत्पादक सामर्थ्याहून जास्त तर कधीं कमीही असूं शकतात.

कांहीं लोक मजूरांची संख्या व धंद्यांत गुंतविलेलें भांडवल यांवरच भर देऊन मजूरीचें तात्विक स्वरूप ठरविण्याचा पुढीलप्रमाणें प्रयत्न करतात. "धंदेवाले लोक जेव्हां आपलें भांडवल धंद्यांत गुंतवितात तेव्हां मजूरांस वेतन देण्याकरितां कांहीं खेळतें भांडवल आपल्या हातांत ठेवतात. देशांतील सर्व धंदेवाल्यांचें याप्रकारचें भांडवल गोळा केलें तर सर्व मजूरांच्या मिळकतीचा तो निधि होईल. हाच सांठा सर्व मजूरांत वांटला जात असल्यामुळें ज्या मानानें मजूरांची संख्या वाढेल त्यामानानें त्यांच्या मजूरीचा हिस्सा कमी होईल. मजूरांचा पुरवठा कमी झाला तरच त्यांच्या मजूरीचा हिस्सा वाढून त्यांची स्थिती सुधारण्याचा संभव आहे." भांडवलाचा सांठा व मजूरांची संख्या यांच्या अन्योन्य संबंधावरून मजूरी ठरविण्याच्या या मताला उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांनी बरींच वर्षेपर्यंत आपला पूर्ण पाठिंबा दिला होता. परंतु या सिद्धांताचा पोकळपणा पुढें त्यांच्या नजरेस आल्यानें त्यांना आपली चूक कबूल करावी लागली. या सिद्धांतांतील मुख्य दोष म्हणजे मजूरी

भांडवलांतून दिली जात असून एकंदर द्यावयाच्या मजूरीचा सांठा अगाऊच करून ठेवलेला असतो, हा चुकीचा समज होय. एखाद्या धंदेवाल्याच्या अनुभवावरून तो आपल्या हातातील भांडवलांतून मजूरांस वेतन देतो, हें खरें वाटतें. परंतु किंचित् खोल विचार केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, सकृद्दर्शनीं मजूरी भांडवलांतून दिल्यासारखी वाटत असली तरी वास्तविक पाहतां मजूरांनीं उत्पन्न केलेल्या उपयुक्त वस्तू विकून जी एकंदर किंमत यावयाची त्यांतूनच मजूरी व उत्पादनमूल्याचे इतर भागीदार यांची मिळकत ही द्यावी लागतात. शिवाय किंमतही मागणीवरून ठरत असल्याकारणानें जास्त मजूरी देऊन पुरवठा करणें हे कारखानदारांस पुष्कळ वेळां परवडतें. ज्यामानानें एखाद्या विवक्षित वस्तूच्या बाबतीत उत्पादक व उपभोक्ते, पुरवठा व मागणी, यांचा परस्पर संबंध असेल त्यामानानें किंमती व मजूरी यांचें परस्पर प्रमाण कमी जास्त होतें. प्रस्तुत प्रकरणाच्या सुरुवातीसच राष्ट्रीय उत्पन्नाचा सांठा हा तळ्यांतील पाण्यासारखा साचवून ठेवलेला नसून वहात्या प्रवाहासारखा असतो, हें सांगितलें आहे. त्यावरून मजूर एका हातानें आपल्या उत्पादक सामर्थ्यानें उपयुक्त वस्तूंचा संचय वाढवीत असतात आणि त्यांची उत्पादन शक्ति व संख्या यांचा उत्पादनाच्या इतर घटकाच्या उत्पादक शक्तींशी व संख्येशी, आणि एकंदर उत्पादकांचा उपभोक्त्याच्या गरजा व त्याचे वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य यांच्याशीं जो परस्पर संबंध असेल, त्यामानानें राष्ट्रीय उत्पन्नाचा कमी जास्त भाग त्यांना मिळत असतो, हे दिसून येईल.

**९ नफा**— मजूरीबद्दल ज्या निरनिराळ्या लौकिक कल्पना आहेत, त्या कितपत खऱ्या आहेत हें कळण्यास ज्याप्रमाणें मजूरीच्या प्रमुख सिद्धांतांचे ज्ञान आवश्यक आहे, त्याचप्रमाणें धंदेवाले लोक फार नफा घेत असल्यामुळें पदार्थांच्या किंमती वाढत्या असतात, किंवा मजूरीचे दर कमी करून मालक आपला नफा वाढवितात असले प्रचलित समज वास्तविक कितपत खरे आहेत हें ठरविण्यास नफा म्हणजे काय हें कळणें जरूर आहे. साधारणपणें आपण एखाद्या धंदेवाल्यास उपयुक्त वस्तू विकून त्यांच्या किंमतीबद्दल जे पैसे जमा होतात, त्यांतून त्याला मजूर, कच्च्या मालाचे उत्पादक वगैरे सहकाऱ्यांस द्याव्या लागणाऱ्या रकमा खर्च म्हणून वजा करून त्याचा नफा ठरवितो. अशा पद्धतीनें नफा ठरविण्यास शास्त्रीय दृष्ट्या अनेक अडचणी आहेत. पहिली अडचण भांडवलाची होय. धंद्यांत जें भांडवल गुंतविलेलें असतें त्याचें व्याज हें अर्थातच नफा नव्हे. भांडवल सर्वस्वी किंवा अंशतः धंदेवाल्याच्या मालकीचें असेल तरी देखील त्याचा नफा ठरविण्यापूर्वी त्याच्या भांडवलाचें व्याज निराळें काढलें पाहिजे. भांडवलाप्रमाणेंच धंद्याकरितां लागणारी कांहीं जमीन धंदेवाल्याच्या मालकीची असली तर

त्या जागेबद्दलचें भाडें किंवा खंड त्याच्या एकंदर कमाईतून वजा करावयास पाहिजे. शिवाय प्रत्येक धंदेवाला किंवा योजक हा त्याच्याच धंद्यातील इतर कामकऱ्यांप्रमाणें स्वतः देखरेखीचें किंवा व्यवस्थेचें कांहीं काम पहात असतो. धंदा नीटपणें चालण्यास ही कामगिरी आवश्यक असून तिजबद्दल धंदेवाल्यास योग्य वेतन मिळालें पाहिजे. व्याज, खंड, कामगिरीचें वेतन या स्वरूपाची धंदेवाल्याची मिळकत त्याच्या एकंदर कमाईतून वजा केल्यास जी शिल्लक राहते तिला नफा असें म्हणतां येईल.

परंतु या शिलकेंतही दोन प्रकारचे घटक असतात. संपत्तीच्या उत्पादनाचे जे मुख्य घटक आहेत त्यांची व्यवस्थित उभारणी करून किफायतशीर रीतीनें धंदा चालविणें हे धाडसाचें, हुशारीचें व दूरदर्शीपणाचें काम आहे. अशा कार्यांत किमतीचा, मागणीचा किंवा इतर एखाद्या महत्त्वाच्या बाबीचा धंदेवाल्यानें केलेला अंदाज चुकण्याचा संभव असतो. परंतु शेकडा नव्याण्णव हिश्शानें आपला घाव चुकणार नाहीं अशी खात्री असल्यानें व नफा मिळविण्याच्या आशेनें धंदेवाले या धोक्यास भीत नाहींत. मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्यांत समाजाचा फायदा असला तरी उत्पादन करणाऱ्या व्यक्तीस त्यापासून धोका येण्याचा नेहमीच संभव असतो. असें असूनही धंदेवाले आपली कामगिरी करतात म्हणून धोक्याचा विमा या नात्यानें त्यास कांहीं जास्त मिळकत होणें जरूर आहे. अशी रक्कम देऊनही कित्येकवेळा कांहीं आकस्मिक कारणानें मागणी एकदम वाढली किंवा पुरवठा एकदम मर्यादित झाला तर उत्पादकांस कांहींसें मक्तेदारीच्या फायद्यासारखें, कांहींसें खंडासारखें, असें उत्पन्न मिळूं शकतें. कारण मागणीच्या मानानें पुरवठा कमी झाल्यानें अगदीं कमी कार्यक्षम धंदेवाल्यासही त्याचें सर्व उत्पादन मूल्य व मक्तेदारीची विशेष मिळकत ही दोन्हीं भरून निघण्याइतकी किंमत येते. दुसरे जे उत्पादक आपल्या संघटनात्मक कामगिरीत, किंवा यंत्रसामुग्री, कच्चा माल, मजुरांचे श्रम हीं शक्य तितक्या किफायतशीर भावानें मिळविण्यात, विशेष कार्यक्षम असतील त्याना त्यांच्या उत्पादन-मूल्याहून जास्त किंमत आल्यानें मक्तेदारीचा फायदा मिळून शिवाय दर खंडही मिळतो. कित्येक अर्थशास्त्रज्ञांच्या मतें नफा हा नेहमीच खंडासारखा असतो. म्हणजे एखाद्या धंद्यात मागणी व पुरवठा-उपभोक्ते व उत्पादक, यांची जी घडी बसलेली असते त्याप्रमाणे सीमागत उत्पादन, मूल्यावरून वस्तूची किमत ठरते. मग इतर उत्पादकांत जी कांहीं विशेष कार्यक्षमता किंवा परिस्थितीची अनुकूलता असते त्यामुळें त्यांच्या उत्पादन-मूल्यांत व सीमागत उत्पादनमूल्यांत फरक पडून त्यांना नफा, किंवा त्याच्या कर्तबगारीबद्दल खंड मिळतो.

या विचारसरणीचें अवलंबन करून नफा व खंड हीं एकाच स्वरूपाची उत्पन्नें समजण्याला अनेक तात्त्विक व व्यावहारिक अडचणी आहेत. जमीनीपासून खंड मिळ-

ण्याचे मुख्य कारण म्हणजे सुपीक किंवा उत्पादनास सोईच्या जमिनींचा मर्यादित पुरवठा हेच होय. धंदेवाल्यामध्येंही अत्यंत कर्तबगार असे धंदेवाले फारच थोडे असतात, हें कांहीसें खरें धरलें, तरी स्पर्धेमुळें, मिळकतीच्या आशेनें व सर्व प्रकारच्या ज्ञानाच्या प्रसारामुळें चांगल्या कार्यक्षम चालकांचा पुरवठा वाढत असून त्यांच्या हातांतच बहुतेक धंद्यांचे नेतृत्व आज काल जात असते. शिवाय मागणी व पुरवठा याची सध्यांची व भविष्यकाळची परिस्थिती अजमावून, उत्पादनाचे सर्व घटक मोठ्या प्रमाणावर एकत्र आणणें हें महत्त्वाचें कार्य इतर उत्पादक श्रमाच्या मानानें विशेष जबाबदारीचें आहे; व नेहमीच्या साधारण वेतनाहून कांहीं जास्त मिळकत आपल्या कर्तबगारीनें मिळेल या अपेक्षेनेंच धंदेवाले उत्पादन कार्यास हात घालतात. या अर्थानें नफ्याचा एक किमान व सर्वसाधारण दर वस्तूंच्या उत्पादनमूल्यातच समाविष्ट करावयास पाहिजे. याही बाबतींत खंड व नफा यांत महत्त्वाचा फरक असलेला दिसून येईल. किमान व सर्व साधारण नफ्यापेक्षा जास्त मिळकत कांहीं धंदेवाल्यास होते, ती एखाद्या आकस्मित कारणानें पुरवठा मर्यादित होतो म्हणून किंवा यंत्रसामुग्री, कच्चा माल किंवा मजुरांचे श्रम या बाबतींत एखाद्या धंदेवाल्यास विशेष सवलत मिळते म्हणूनच होय. अशा विशिष्ट सवलती या जमीनीच्या उत्पादक सामर्थ्याप्रमाणें किंवा मर्यादित क्षेत्राप्रमाणें कायम टिकणाऱ्या नसतात. म्हणून निव्वळ नफा हा नेहमी आकस्मिक व हंगामी स्वरूपाचाच असतो. निव्वळ नफा व सर्व साधारण किमान नफा यांच्यातील फरक ध्यानात ठेवल्यास निव्वळ नफा मुळींच झाला नाहीं तरी धंदे कसे चालू शकतात, हें कोडें सहज उकलेल.

**१० संपत्तीच्या विभागणीची विषमता**—राष्ट्राच्या निव्वळ उत्पन्नातील भागीदारास मिळणारी उत्पन्नें, खंड, व्याज, मजुरी व नफा, यांपैकीं प्रत्येक प्रकारचें उत्पन्न कसें व का मिळतें याचा येथवर विचार केला. त्यावरून प्रत्येक मनुष्य आपल्याजवळील एखादी उपयुक्त वस्तु—पदार्थ किंवा कामगिरी—दुसऱ्यास विकतो व त्याबदला दुसऱ्याकडून इतर कांहीं उपयुक्त वस्तू घेतो, हा वस्तूंच्या विनिमयाचाच नियम संपत्तीच्या विभागणीस बहुंशीं लागू आहे, असें आपणास दिसून येईल. मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें ज्याप्रमाणें वस्तूचें मूल्य ठरतें त्याचप्रमाणें तत्वतः मनुष्याच्या कामगिऱ्यांचें वेतन ठरत असतें. परंतु मागें जमीनीच्या खंडाचा विचार करीत असतां, पुरवठा मर्यादित असल्यानें मूल्य हें सारखें वाढत राहून कांहीं उत्पादकांचा अनायासेंच कसा फायदा होतो, हें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें व्याजाचें व्याज वाढून भांडवलाची सारखी वृद्धि होत जाते आणि भांडवलवाले व बिनभांडवलवाले यांच्या आर्थिक स्थितींतील अंतर

सारखे वाढतच राहतें, हे वाचकांस सहज दिसून येईल. या बिनभांडवलवाल्या वर्गात मजूरवर्ग हाच संख्येनें प्रमुख असून त्याच्याकडून इतरांस मिळणारी उपयुक्त वस्तु श्रम ही होय. मजूरांचा पुरवठा सधारणपणें वाढत्या प्रमाणावर असतो व त्यांचे गिऱ्हाइक, म्हणजे मजूरांस कामाला लावणारे मालक, यांच्याशी घासाघीस करून त्याच्या वस्तूची जास्त किंमत मिळविण्याच्या मार्गांत अनेक अडचणी असतात. त्यामुळें आपल्या श्रमाच्या सामाजिक उपयुक्ततेहून, किंवा उत्पादक सामर्थ्याहून, कमी वेतन घेऊनच मजूरांना बहुतेक वेळां स्वस्थ बसावें लागतें.

मागणा व पुरवठा यांच्या निरुद्ध प्रतिक्रियेमुळें राष्ट्रीय उत्पन्नाच्या विभागणीत मुळातच विषमतेचें बीज पेरलें जातें. त्यांतही खाजगी मालमत्ता मिळविण्याची, व आपल्या माग ती मुलाबाळांस वारशानें वांटून देण्याची पद्धत धर्मानें, रूढीनें व कायद्यानें प्रस्थापित झालेली असल्यामुळें संपत्तीच्या विभागणीतील विषमता जास्त जास्त तीव्र होत असते. कोणत्याही देशाचें उदाहरण घेतलें तरी त्यांत श्रीमंतांची संख्या फारच थोडी व गरिबांची संख्या पुष्कळ असलेली दिसून येते. मग कांहीं अंशीं मनुष्य स्वभावांत असलेल्या असूयेमुळें किंवा राष्ट्राच्या वाढत्या संपत्तींत आपणांस योग्य वाटा मिळत नाहीं या वरवर दिसणाऱ्या अन्यायामुळें, गरीब लोकांत श्रीमंत लोकांबद्दल असंतोष पसरलेला असतो. असा असंतोष असणें राजकीय व सामाजिक दृष्ट्या किती हानिकारक आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. परंतु निव्वळ आर्थिक दृष्ट्याही, ज्या मजूर वर्गाच्या साहाय्यानें सर्व उपयुक्त वस्तूंचें उत्पादन व्हावयाचें त्यांच्या मनांत भांडवलवाल्या मालकांबद्दल अढी, किंबहुना निखालस वैर, वसत असल्यामुळें जितक्या उत्साहानें व कार्यक्षमतेनें त्यांच्या हातून अर्थोत्पादन व्हावयास हवें तेवढें होत नाहीं. उत्पादक शक्तीचा पूर्ण उपयोग न झाल्यानें राष्ट्रीय उत्पन्नच कमी होऊन मालक व मजूर दोघांचेंही आर्थिकदृष्ट्या नुकसान होतें. संपत्तीची विषमता मनुष्याच्या समता-बुद्धीस न पटणारी व आर्थिक दृष्ट्याही सकृद्दर्शनीं हानीकारक असून आजवर सर्व देशांत टिकून राहिलेली आहे, एवढेंच नव्हे तर मोठ्या प्रमाणावर अर्थोत्पादन करण्याची सध्याची पद्धत सुरू झाल्यापासून ती वाढतही आहे, याबद्दल कित्येकांस फार उद्वेग वाटतो, व वाटेल ते उपाय योजून ती विषमता नाहींशी करण्याची ते खटपट करतात.

उलटपक्षीं कित्येक अर्थशास्त्रज्ञ, स्पर्धेचें पूर्ण साम्राज्य व त्यामुळें वृद्धिंगत होणारी संपत्तीची विषमता यांचें पुढील रीतीनें एकांगी समर्थन करतात. " निरनिराळ्या माणसांच्या शारीरिक व बौद्धिक गुणांत निसर्गतःच फरक असल्यामुळें संपत्तीचे उत्पादक या नात्यानें सर्वच सारखे कार्यक्षम असतात असें नाहीं. हे गुण केवळ शिक्षणावर किंवा बाह्य परिस्थितीवर अवलंबून नसून जात्याच

निरनिराळ्या गुणावगुणाचें मनुष्यांत बीज असतें. ज्याप्रमाणें कोणाही इसमास तो जेवढें काम करील तितकें वेतन मिळण्याची खात्री असल्याशिवाय तो पूर्ण उत्साहानें व कुशलतेनें काम करणार नाही, त्याचप्रमाणें त्यानें मिळविलेल्या संपत्तीचा वाटेल तसा उपयोग करण्यास, किंवा वाटेल त्यास देऊन टाकण्यास, त्याला मुभा ठेवल्याशिवाय त्याच्यांतील अर्थोत्पादक शक्तींचा विकास होऊन समाजाला पूर्ण फायदा मिळावयाचा नाही. या कारणास्तव खाजगी मालमत्ता आणि तिची वारशानें विल्हेवाट करण्याची पद्धत ही समाजास हितावह असून ज्यानें जें उत्पन्न केलें त्याचा मालक तोच असल्यानें, ही पद्धत न्याय्यही आहे. संपत्तीची विषमता ही तिच्यामुळें वाढतें असें दिसत असलें तरी वास्तविकपणें मनुष्यांत कमीजास्त गुणावगुण असून आनुवंशिक संस्कारानें ते पिढ्यानुपिढ्या टिकून असतात. संपत्तीची विषमता ही गुणाच्या विषमतेचाच परिणाम होय व तिच्यापासून प्रत्यक्षपणें उत्पादनास मिळणारें उत्तेजनही राष्ट्राच्या आर्थिक व सामाजिक प्रगतीस पोषकच होतें" या विचारसरणींत दोन महत्त्वाचे मुद्दे आहेत (१) जन्मतःच मनुष्यांच्या गुणावगुणांत फार मोठा फरक असतो किंवा काय व गुणावगुणांचे हे विशेष आनुवंशिक होतात किंवा काय ? आणि (२) मनुष्याच्या अंगात वसत असलेलें उत्पादन सामर्थ्य शक्य तितकें पूर्णावस्थेस जाऊन त्यापासून समाजाच्या सांपत्तिक बलांत जास्तीत जास्त भर पडण्यास खाजगी मालमत्तेची व वारशाची जरूरी आहे किंवा काय ? या दोन्ही मुद्यांवर समाजसत्तावाद्याचा बहुतेक अर्थशास्त्रज्ञांशीं तीव्र मतभेद आहे. प्रस्तुत स्थळीं, संपत्तीची विषम विभागणी आपल्या तात्कालिक गरजांपुरती कशी तरी दूर करावी याची बहुतेक राष्ट्रांतील मजूर वर्गास लागलेली चिंता ते ज्या मार्गानें निवारण करूं पहातात व समाजाचे पुढारी या विषमतेमुळें होणारी आर्थिक व सामाजिक हानी टाळण्यास जे उपाय योजतात, त्यांचें कांहीं विवरण करणें जरूर आहे.

**११ मजूरांचे संघ**—भांडवलवाले मालक व मजूर यामध्यें मजूरांच्या उत्पादक श्रमाची जी देवघेव होत असते तींत मजूर वर्गास आपल्या कामगिरीचा योग्य मोबदला न मिळण्यास अनेक कारणें आहेत. उपयुक्त वस्तु विकणारा व ती विकत घेणारा यांचा सौदा ठरून दोघांसही जास्तीत जास्त समाधानकारक अशी किंमत ठरण्यास त्या दोघांमध्यें पूर्ण स्पर्धा चालू असून दोघांतही आपण दुसऱ्याकडून कमीतकमी किती मोबदला घेण्यास तयार आहोत हें एकदम प्रकट करावें न लागण्याइतकी चिकाटी किंवा त्राण असावी लागतात. शिवाय एका ठिकाणीं आपल्या मनासारखा सवदा न झाला तर दुसऱ्या ठिकाणी देवघेवीस जाण्याची चलनशीलताही दुकानदार व गिऱ्हाईक यांत असणें जरूर असतें. मजूर ज्या वेळेला कामधंदा मिळविण्यास मालकांकडे जातात तेव्हां वास्तविक ते आपला माल विकूं इच्छिणाऱ्या

दुकानदारासारखेच असतात. परंतु बहुतेक दुकानदारांस योग्य किंमत येईपर्यंत आपला माल जवळ तसाच ठेवण्याची शक्यता व सामर्थ्य असतें; आणि गिऱ्हाइकांच्या मागणीची तीव्रता सामान्यतः कायम राहिल्यामुळें ते दुकानदारास अपेक्षित किंमत द्यावयास तयार होतात. मजुरांस मात्र योग्य मजुरी न मिळाल्यास बेकारी पत्करावी लागते किंवा अल्प मजुरीवर संतुष्ट रहाणें भाग पाडतें, कारण मुळींच काम न करण्यापेक्षां कितीही कमी वेतनाचें काम करणें हेंच त्यांस जास्त हितावह असतें. आपले श्रम साठवून ठेवण्याची मजुरास शक्यता असली तरी देखील तिच्यापासून आपला पूर्ण फायदा करून घेण्याचें आर्थिक सामर्थ्य त्यांच्यांत असत नाहीं. कारण आपल्या कामाची योग्य मजुरी मिळेपर्यंत आपला चरितार्थ चालविणे त्यांस शक्य नसतें. विक्रीचा माल नाशवत, किंबहुना मालाचें अस्तित्वच गिऱ्हाइकावर अवलंबून असलेलें, थोडा काळ ओढून धरता येण्याइतक्याहि आर्थिक सामर्थ्याचा अभाव, जास्तीत जास्त किंमतीनें आपला माल कोठें विकला जाईल याबद्दलचें अज्ञान व तें ज्ञान झालें तरीही आपला माल तेथें घेऊन न जाण्याइतकी कमी चलनशीलता, अशा सर्वच अडचणींनी नाडलेल्या दुकानदाराप्रमाणें मजुराची स्थिती असते. उलटपक्षीं, भांडवलवाले मालक सवदा करण्यांत तरबेज व कांहींसे बेपर्वा असून आपापसांतील मूर्त व अमूर्त संकेताप्रमाणें मजुरांच्या असहाय्य स्थितीचा फायदा घेऊन त्यांना शक्य तितकें कमी वेतन देऊन त्यांच्याकडून शक्य तितकें जास्त काम करून घेण्यास समर्थ व तयार असतात.

आपली होत असलेली नाडणूक सरकारनें कांहीं तरी कायदे करून दूर करावी अशी अज्ञ व गरीब मजुरांची सहजच अपेक्षा असते. परंतु ज्या राष्ट्रांत मोठ्या प्रमाणावर अर्थोत्पादन करण्याच्या पद्धतीचा बराच प्रसार झालेला आहे तेथील सरकारावर भांडवलवाल्यांचेच अप्रत्यक्ष नियंत्रण असल्यानें व आजकालच्या स्पर्धेच्या आणि प्रचंड आर्थिक घडामोडींच्या युगात प्रत्येक व्यक्तीस आपणास योग्य वाटेल तसा सवदा ठरविण्याची मुभा असणें जरूर व कांहीं अशी अपरिहार्य आहे, हें उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांचें मतच मुख्यतः प्रस्थापित झालेलें असल्यामुळें कायद्यानें मजूर व मालक यांच्यांतील व्यवहाराचें नियमन फारसें होऊं शकत नाहीं. सरकारची मदत आपणांस मिळेल ही मजुरांची अपेक्षा फोल ठरल्यापासून ते स्वावलंबन व सहकार्य या साधनांनीच मालकांशी नोकरीच्या अटी ठरवितांना येणाऱ्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न करूं लागले. या प्रयत्नांचें मूर्त फळ म्हणजेच अलीकडील मजुरांची चळवळ व ती चळवळ परिणामकारक करण्याकरितां त्यांनीं स्थापलेले मजूर-संघ हे होत. परस्पर सहकार्यानें आपली आर्थिक परिस्थिती सुधारण्याकरितां कामकरी लोक जे ‘ मजूरसंघ ’ स्थापन करतात त्यांच्यांतील कांहीं ठळक प्रकारांचा येथें थोडक्यांत उल्लेख करणें जरूर आहे. कोणताही

प्रसिद्ध धंदा घेतला तरी त्यांत अनेक पोटधंदे असतातच. उदाहरणार्थ, आगगाडी चालविण्याचा एकच धंदा घेतला तर त्यांत इंजिन चालविणारे, इंजिन व डबे बांधणारे आणि दुरुस्त करणारे, गार्ड किंवा स्टेशनावरील कारकुनी पेशाची कामें करणारे अशा निरनिराळ्या प्रकारच्या कामकऱ्यांचा अंतर्भाव झालेला असतो. यापैकी प्रत्येक प्रकारच्या मजूरांच्या अडचणी व हितसंबंध हे कांहीं अंशीं स्वतंत्र व कांहींसे एकच असतात. म्हणून प्रत्येक पोटधंद्याच्या विशेष अडचणी दूर करून त्यांतील मजूरांचें हितसंवर्धन करण्याची खटपट करण्यासाठीं निरनिराळे मजूरसंघ असतात. या पोट संघांतील सर्व मजूरसंघाचा मिळून त्या मुख्य धंद्यांतील सर्व कामकऱ्यांचें हितसंरक्षण करण्यास एक मोठा मजूरसंघ असतो. कित्येक वेळां एकमेकांशीं संलग्न असलेल्या अनेक धंद्यांतील मजूरसंघांचा मिळून एक प्रचंड मजूरसंघ तयार होतो.

या सर्व संघाचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे भांडवलवाल्याकडून आपल्या सभासदांना शक्य तितके हक्क व सवलती मिळवून द्यावयाच्या हाच असतो. मजूरांच्या मागणीमध्यें मजूरीच्या वाढीस प्रमुख स्थान दिलें पाहिजे. शिवाय कामाचे तास कमी करणें, भर पगारी सुट्या जास्त देणें, राहण्याच्या, हवा-पाण्याच्या वगैरे आरोग्यवर्धक सोयींचा पुरवठा करणें इत्यादि इतर महत्त्वाच्या सवलतीही मजूरास मालकांकडून प्रयत्न करूनच मिळवाव्या लागतात. कांहीं मजूरसंघ आपल्या सभासदांच्या बेकारींत त्यास मदत करणें, त्यांना नवीन काम लावून देण्याची खटपट करणें, किंवा त्यांच्या मुलाबाळांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ कांहीं व्यवस्था करणें वगैरे इतर मार्गांनीही आपली उपयुक्तता वाढवीत असतात. प्रत्येक सभासदाकडून ठराविक वर्गणी घेऊन या संघांना आपला खर्च भागवितां येतो. आर्थिक उन्नतीचे आपले प्रयत्न यशस्वी व्हावे या हेतूनें मजूरसंघ राजकारणांतही आपलें वजन प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करीत असतात. परंतु वर सांगितल्याप्रमाणें मजूरींत वाढ करविणें हाच मजूरसंघांचा सर्वांत महत्त्वाचा उद्देश असतो व तो सफल करण्याचें त्यांचें मुख्य साधन म्हणजे संप करणें, हें होय. मजूरांची चळवळ व त्यांचे संघ यांबद्दल आर्थिक दृष्ट्या विवेचन करावयाचें असतां मजूरांच्या संपामुळें त्यांची मजूरी खरोखर कितपत वाढूं शकते या प्रश्नाचाच मुख्यतः विचार करावा लागतो.

**१२ संप व संघ**--एखाद्या धंद्यांतील कामकरी आपल्यावर झालेल्या किंवा होत असलेल्या अन्यायाचा पूर्ण निषेध प्रदर्शित करण्याकरितां व तो अन्याय मालकास दूर करण्यास भाग पाडण्याकरितां आपलें नेहमींचें काम करण्याचें एकमतानें नाकारून कारखाना बंद पाडण्याचा प्रयत्न करतात, त्यासच संप असें म्हणतात. साधारणपणें प्रत्येक माणसास वाटेल तेव्हां व वाटेल त्या मालकाकरितां काम कर-

ण्याची मुभा असणें योग्य आहे, असें आपणांस वाटतें. निदानपक्षीं ज्या उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या मतें पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य हेंच समाजहिताचें अचुक साधन आहे, त्यांच्याकडून तरी मजूरांच्या श्रमस्वातंत्र्यास अनुमति मिळण्याची कोणीही अपेक्षा करील. परंतु नामधारी स्वतंत्र पक्षाच्या या शास्त्रज्ञांत मजूर वर्गाच्या दुःस्थितीबद्दल उदासीन वृत्ति व भांडवलवाल्या कारखानदारांबद्दल विशेष कळकळ हीच प्रामुख्यानें वसत असल्यामुळे अर्वाचीन अर्थोत्पादनाच्या पद्धतीनें मजूरांचे अनन्वित हाल होऊं लागून अनेक वर्षें संप करणें हा कायद्यानें गुन्हा मानला जाई. संप यशस्वी होण्यास धंद्यामधील जवळजवळ सर्व मजूरांनीं एकमतानें काम करण्याचें नाकारणें जरूर असतें. नाहीतर जे थोडे लोक मजूरांची गाऱ्हाणीं सर्व जगापुढें आणण्यासाठीं आपलें काम करण्याचें नाकारतात त्यांना मात्र कामास मुकावें लागून अन्याय कायमच राहतो. पण परस्पर संमतीनें एकदम काम बंद पाडणें याला कांहींसें भयंकर व मध्ययुगीन जमीनदारांच्या चष्म्यांतून पाहिल्यास थोडेंसें बंडखोरीचें स्वरूप असल्यानें, सर्वच संप बेकायदेशीर ठरविलेले असत.

सुमारें शंभर वर्षांपूर्वी पहिल्याप्रथम इंग्लंडमध्यें संप बेकायदेशीर नाहींत व केवळ आपल्या मजूरीची वाढ करून घेण्याकरितां मजूरांनीं संघ केले तर तेही बेकायदेशीर कट नव्हेत असें ठरविण्यात आलें. मजूरांस मिळालेलें हें स्वातंत्र्य फारच अपुरें होतें. तरी तें वाढत वाढत थोड्याच वर्षांत संघटनात्मक चळवळ करून, संप करून किंवा देशांतील सर्व नागरिकांस लागू असलेल्या कायद्यानें ज्यास प्रतिबंध केलेला नाहीं अशा दुसऱ्या कोणत्याही साधनाचें अवलंबन करून आपल्या आर्थिक उन्नतीकरितां खटपट करण्यास इंग्लंडमधील मजूरांना पूर्ण मुभा मिळाली. युरोपमधील इतर देशांतील सरकारांनीं मात्र मजूरांचे संघ व त्यांची एकंदर चळवळ यांजवर करडी नजर ठेवून त्यांस कायद्याच्या साहाय्यानें चिरडून टाकण्याचा प्रयत्न केला. मजूरांच्या चळवळीस इंग्लंड व यूरोप खंडातील इतर राष्ट्रें यांतील सरकारांनीं ज्या निरनिराळ्या व परस्परविरोधी धोरणानें वागविलें त्यावरून त्या त्या देशांतील मजूर वर्ग व सरकार यांच्या आजकालच्या परस्परसंबंधांचा बराच उलगडा होतो. इंग्लंडसारख्या अर्वाचीन पद्धतीनें औद्योगिक प्रगतीचें शिखर गांठलेल्या राष्ट्रांत मजूर पक्ष अधिकारारूढ होऊन भांडवलशाहीचाच राज्यशकट चालवितांना दिसतो, तर फ्रान्ससारख्या मिरासदार शेतकऱ्याच्या राष्ट्रांत मजूरसंघ बंड करून समाजयंत्र बंद पाडण्याच्या तयारीनें डोळ्यांत तेल घालून बसलेला आढळतो. कांहीं धंद्यांत व कांहीं विवक्षित परिस्थितींमध्यें संप करणें हें सर्व देशांत गैरकायदा समजलें जातें. त्यांतल्या त्यांत बहुतेक सरकारी नोकरांस व ज्या धंद्यांवर सर्व जनतेचें जीवित सर्वस्वी अवलंबून आहे अशा धंद्यांतील मजूरांस ठराविक मुदतीची अगाऊ सूचना दिल्याशिवाय संप करतां येत नाहीं. लष्करी शिपायांसारख्या कांहीं नोकरांस तर हाही हक्क देणें

शक्य नसतें. त्यांनीं आपलें ठराविक काम करण्याची किंचितही नाखुषी दर्शविली तर बंडखोर म्हणून त्यांचें पारिपत्य केलें जातें. आगगाड्या व आगबोटी यांतून माणसांची व मालाची वहातूक करणें, तारायंत्र, टेलिफोन व टपाल यांमधून दूरदूर संदेश पोंचविणें, वीज, गॅस, किंवा कोळसा यांच्या साहाय्यानें लोकांस उजेड, अग्नि किंवा उष्णता उपलब्ध करून देणें अशा प्रकारचे धंदे सुरळीत चालणें सार्वजनिक आयुष्यक्रमास एवढें आवश्यक आहे कीं, त्यांतील मजुरांचा संप करण्याचा अधिकार कांहींसा मर्यादित केल्याशिवाय समाजाचे नित्याचे व्यवहारही नीटपणे चालणें मुष्कील होईल.

या व दुसऱ्या धंद्यांतील सर्व संपांपासून कांहीं गैरसोयी व तोटेही होतात. उदाहरणार्थ, संप झाल्याबरोबर मजूर, यंत्रसामुग्री व इतर भांडवल यांचा दर-रोजचा व्यवसाय नाहींसा होतो. शेवटीं मजूरांची मजूरी वाढली किंवा भांडवल-वाल्याचें व्याज अगर नफा कमी जास्त झाला तरी संपाचा तात्कालिक परिणाम म्हणजे मजूरांची मजूरी, भांडवलाची कमाई व धंदेवाल्याचा नफा हीं तिन्हीं बंद होतात, हा होय. बहुजनसमाजांत जे उपभोक्ते असतात त्यांसही आपल्या गरजा भागविण्यास उपयुक्त वस्तू मिळण्याची अडचण पडते. भांडवलवाले व मजूर यांचें भांडण आणि उपभोक्त्यांची गैरसोय यांचा फायदा घेऊन परदेशांतील धंदेवाले आपला माल जेथें संप चालू आहे त्या देशांत पाठवून स्वतःचा लाभ करून घेतात. इंग्लंड म्हणजे कोळशाच्या खाणींचें आगर, पण खाणींतल्या मजू-रांनीं संप केला तेव्हां जर्मनी व फ्रान्स या देशांतून इंग्लंडमध्यें कोळशाची आयात झाली, या गोष्टीवरून संपाचा हा अनिष्ट परिणाम केवळ काल्पनिक नाहीं, हें दिसून येइल. संपांपासून समाजाचें, मजूरवर्गाचें व भांडवलवाल्याचें कमी जास्त प्रमा-णांत नुकसान होत असूनही मजूरांचे संघ संप करणें हें आपलें मुख्य काम समज-तात तें आपली मजूरी वाढवून घेण्याचा संप करणें हाच राजमार्ग आहे, अशी त्यांची खात्री असल्यामुळेंच होय.

**१३ संप व मजूरी**—मागें मजूरी म्हणजे काय, या प्रश्नाचा विचार करतांना मजूरी ही बहुंशीं मजूराच्या उत्पादन सामर्थ्यावर अवलंबून असते, असें सांगितलेंच आहे. सर्व आर्थिक हालचालींच्या बुडाशीं असलेलें मूल्योद्भवाचें तत्त्व ध्यानांत आणल्यास असेंही दिसून येईल कीं, प्रत्येक मजूराचें वेतन केवळ तो स्वतः किती अर्थोत्पादन करतो यावरच अवलंबून नसून, तो ज्याप्रकारच्या मजूरवर्गापैकीं एक घटक असतो त्याच्यांतील कमींत कमी कार्यक्षम मजूराच्या उत्पादक सामर्थ्याइतकी त्याची मजूरी असते. शिवाय मागणीच्या मानानें मजूरांचा पुरवठा कमी जास्त असल्यास या सीमागत उत्पादक सामर्थ्याहून मजूरी जास्त कमी होते. मजूरांचें सीमागत उत्पादनसामर्थ्य व त्यांचा पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें मजूरी ठरते, हें नीट ध्यानांत ठेवल्यास संप केल्यानें मजूरी वाढूं शकते किंवा नाहीं, या प्रश्नाचें उत्तर

देणें सुलभ होईल. पहिल्याप्रथम आपण एकाच धंद्याची गोष्ट घेऊं. वरील नियमाप्रमाणे त्या धंद्यात काम करण्यास लायक व तयार मजुरांचा ज्यामानानें कमी किंवा जास्त पुरवठा असेल त्यामानानें मजुरांच्या सीमागत उत्पादक सामर्थ्याहून मजुरी जास्त किंवा कमी असावयास पाहिजे. एकदर वस्तूला लागणारा उत्पादन खर्च व त्या वस्तूला येणारी किंमत यावरून मजुरांचें उत्पादनसामर्थ्य ठरण्यास वेळ लागतो. उत्पादनमूल्य कमी झाल्यावरून किंवा धंद्याच्या वाढत्या कमाईवरून मजुरांचें उत्पादन सामर्थ्य वाढत असलेलें दिसत असलें तरी मजुरांस जास्त मजुरीच्या रूपानें त्यांच्या अधिक उत्पादकतेचा मोबदला देण्यास भांडवलवाले मालक कुचराई व दिरंगाई करतात. अशा वेळीं मजुरांनीं संप केला तर त्यांच्या वाढलेल्या उत्पादक सामर्थ्याइतकी त्यांच्या मजुरीत वाढ होऊं शकते. एखाद्या हंगामी किंवा आकस्मिक कारणानें पदार्थांच्या किंमती कमी झाल्या व त्याचा फायदा घेऊन मालक मजुरी कायमची कमी करूं लागले तर संप करून त्यास तसें करण्यापासून परावृत्त करतां येते. यावरून विशिष्ट परिस्थितीत संप केल्यानें मजुरांस त्यांच्या उत्पादक सामर्थ्याच्या व संख्येच्या मानानें जी योग्य मजुरी मिळावयाची ती खात्रीनें व किंचित् लवकर मिळविता येते, असें दिसून येईल.

परंतु या योग्य मर्यादेहून जास्त मजुरी मिळविण्यासाठीं मजूर लोक संप करूं लागले तर त्यांचे प्रयत्न बहुतेक अयशस्वीच होतात. कांहीं विशेष परिस्थितीत या योग्य मर्यादेपेक्षाही जास्त मजुरी संपवाल्यास मिळविता येते. ज्या वस्तूबद्दलची मागणी लवचिक नसून कायम असते त्या वस्तूच्या धंद्यातील मजुरांनीं जास्त मजुरी मिळविण्याकरितां संप केला तर मालकास किंमतींत थोडी वाढ करून मजुरीही वाढविता येईल. त्यातल्यात्यांत त्या वस्तूच्या उत्पादनमूल्यापैकीं, ज्याप्रकारच्या मजुरांनीं संप केलेला असतो त्यांची मजुरी हा फारच लहान भाग असला, तर वाजवीपेक्षा जास्त मजुरी मिळण्याचा संभव अधिक असतो. असें असलें तरी एकंदरीनें गिऱ्हाइकांवर जास्त किंमतीचा बोजा लादून किंवा इतर मजूर व भांडवलवाले यांच्या योग्य मिळकतींतून कांहीं भाग कमी करून आपली मजुरी वाढविण्याचा मजुरांचा हा मार्ग शेवटीं यशस्वी ठरत नाहीं. कारण इतर धंद्यांतील मजूर या फाजील किफायतशीर धंद्यांत शिरून पुन्हां मजुरी पूर्व स्थळावर येते. ते उत्पन्न करीत असलेल्या वस्तूस असलेली मागणी कमी न होतां, ज्यामानानें इतर धंद्यांतील मजुरांस आपल्या धंद्यांत येऊं न देण्याची संपवाले खबरदारी घेतील त्यामानानें त्यांनीं मिळविलेली वाढ जास्त काळ टिकूं शकेल. आतां आपण सर्व धंद्यांतील सर्व मजुरांचें उदाहरण घेतलें तरी आपणांस असेंच दिसून येईल कीं, मजुरांचें सीमागत उत्पादक सामर्थ्य व त्यांच्या श्रमाला असलेल्या मागणीच्या मानानें त्यांचा पुरवठा, या दोन्ही गोष्टींवर त्यांची मजुरी

अवलंबून असते. मालकाच्या स्वार्थबुद्धीमुळे, आर्थिक घडामोडींच्या मंदगतीमुळे किंवा दुसऱ्या कांहीं कारणांनीं या योग्य मर्यादेहून मजुरी कमी होत असली तर मजुरास संप करून किंवा तो करण्याचा धाक दाखवून, ती योग्य मर्यादेवर ठेवतां येते. परंतु यापेक्षां जास्त वाढ संपानें घडवून आणतां येत नाहीं व असली वाढ टिकाऊ स्वरूपाची नसते. वाढलेल्या किंमतींमुळें मागणी कमी होऊन किंवा कमी व्याज व नफा सुटून त्यांमुळे उत्पादनास अवश्य असलेलें घटनाचातुर्य व भांडवल हीं मर्यादित होतात आणि संपत्तीचें एकदर उत्पादनही कमी होतें, व शेवटी मजुरांच्या श्रमाचें क्षेत्र संकुचित होऊन त्याची मजुरी उतरते.

मजुरांचे सीमागत उत्पादनसामर्थ्य व त्याचा पुरवठा या दोन बाबींत मजुरांचे संघ मजुरवर्गास हितकर असे कांहीं फरक घडवून आणतील तर मात्र त्यांच्या प्रयत्नानें मजुरीत कायमची वाढ होणें शक्य आहे. मजुरांचे सीमागत उत्पादन–सामर्थ्य वाढविण्यास मजुरांचे संघ कशी मदत करू शकतात, याचें येथें थोडेंसें दिग्दर्शन करणें जरूर आहे. मोठ्या कारखानदारांशीं करार करून एखादा मजूर काम करीत असला तर तो करार बहुतेक एकांगीच असतो म्हणजे गरीब व असहाय्य मजुरास मात्र तो पूर्णपणे पाळावा लागून श्रीमंत व सबल मालकांनी तो धडकावून लावला तरी त्यास शासन होणें कठीण असतें परंतु अनेक मजुरांनीं मिळून संघ केल्यास उत्पादनास भांडवलापेक्षांही श्रम अधिक आवश्यक आहेत ही गोष्ट मालकास नीट पटवून देतां येते, व त्यामुळें मजुरांची वृत्ति जास्त धीराची व स्वतंत्र होऊन त्यांची कार्यक्षमताही वाढते. शिवाय, मजुरांत ज्ञान, मितव्यय, उच्च सामाजिक भावना इत्यादिकांचा मजुरसंघांनीं प्रसार केल्यास हळूहळू त्यांच्या राहणीचें मान सुधारत जाऊन संपत्तीच्या उत्पादनास ते जास्त समर्थ होतात. विशेषतः नवाशिक्या व तरुण कामकऱ्यास त्यांच्या धंद्याचें विशेष शिक्षण मिळण्याची संघांकडून कांहीं व्यवस्था झाली तर सव मजुरांचें सीमागत उत्पादक सामर्थ्य आपोआप वाढतें. जों जों मजुरांचे संघ आपापसांत दुही न माजवितां, आपल्या सभासदास शिक्षण देऊन, आजारीपण, अपघात, बेकारी, वार्धक्य इत्यादि आपत्तींत त्यास मदत करून व त्यांच्या राहणीमध्यें सुधारणा घडवून आणून त्यांना उत्पादनाचे जास्त कार्यक्षम घटक बनवितील तों तों खऱ्या मजुरींत वाढ होत जाऊन, ती वाढ कायम टिकेल. योग्य मजुरीच्या या वाढत्या मानाबरोबर भांडवलवाल्यांनीं आपण होऊन मजुरीचे दर न ठेवल्यामुळें मजूर संप करतील तर त्यास सर्व जनतेचा पूर्ण पाठिंबा मिळून ते संप यशस्वी होतील. परंतु मजूर लोक नेहमींच भांडवलवाल्याबद्दल मनांत वैर बाळगून कामचुकारपणा करतील तर त्यांत त्यांचें, भांडवलवाल्याचें व एकंदर समाजाचें नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**१४ कारखान्यांसंबंधीं कायदे**—मजूर व भांडवलवाले यांचे आपापसांत जे करारमदार ठरतात ते, मजुराचा पक्ष सर्वस्वी निर्बल असल्यानें, त्यांना अहित-कारक असेच ठरण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, आपण मजुरांनीं दिवसांतून किती काम करावें, ह्यासंबंधीं प्रश्न घेऊं. बहुतेक मालकांचा कामाचे तास वाढ-विण्याचा प्रयत्न असतो; व मजुरांचे संघ बलवान होऊन स्वतःचें संरक्षण करण्यास जोंपर्यंत तयार झाले नाहींत तोंपर्यंत मालकांचा हा प्रयत्न यशस्वी होतो. आपल्या धंद्याचा खर्च शक्य तितका कमी करण्याच्या खटपटींत मालक लहान मुलांना व बायकांना कामास लावणें, त्यांची व इतर मजुरांची हवापाण्याची सोयही नीट न करणें, थोड्या खर्चानें होणारीं परंतु आपल्या मजुरांचें अपघातांपासून संरक्षण करणारीं साधनें न वापरणें इत्यादि मोहास बळी पडतात. मजुरांचें आरोग्य व त्यांची सुरक्षितता यांजकडे दुर्लक्ष करणें हें शेवटीं त्या मजुरांची कार्यक्षमता कमी करणारें व समाजास सर्व बाजूंनीं हानिकारक आहे. समाजाचें निव्वळ आर्थिक हितच पहावयाचें तरीही मुलेंबाळें व बायका यांनीं कारखान्यांत श्रम करण्याची पद्धत किंवा कोंदट व दूषित हवेंत मजुरास काम करावयास लावण्याची प्रथा ही बंद करावयास पाहिजेत. भांडवलवाले मालक अदूरदृष्टि आप्पलपोटेपणानें राष्ट्राचें व स्वतःचें अंतिम हित विसरून जाऊन असले अनिष्ट प्रकार चालू ठेवतील तर कायद्यानें ते बंद करण्याची त्यांच्यावर सक्ति होणें जरूर आहे. कित्येक जुने अर्थशास्त्रज्ञ व भांडवलशाहीचे निःस्सीम उपासक व्यक्तिस्वातंत्र्य, स्वैर स्पर्धा इत्यादि नांवें पुढें करून अशा प्रकारच्या कायद्यांना विरोध करूं पाहतात. परंतु अर्वाचीन उत्पादन पद्धतींत व्यक्तिस्वातंत्र्य पैसेवाल्या मालकासच उपभोगण्यास मिळून गरीब मजूर वर्गाला कमी मजुरी, जास्त तास, कारखान्यांतील कोंदट हवा, गचाळ पाणी व प्रतिक्षणीं मजुरांच्या अवयवांचा घांस घेऊं पाहणारीं यंत्रें यावरूनच त्या स्वातं-त्र्याचा अनुभव येत असतो. म्हणून जी गोष्ट एकदां सर्व राष्ट्राच्या हितास बाधक ठरली ती कायद्यानें बंद करणें सर्वस्वी न्याय्य व आवश्यक असतें. शिवाय, केवळ आर्थिक दृष्टि सोडून आपण समाजाच्या आरोग्याची व्यावहारिक किंवा भूत-दयेची नैतिक दृष्टि स्वीकारली तरी आपणांस असें दिसून येईल कीं, कांहीं कांहीं बाबतींत मालकांच्या स्वैर वागणुकीस कायद्यानें आळा घातलाच पाहिजे.

कारखानदार आपल्या मजुरांस वाईट हवेंत पुष्कळ वेळ काम करावयास लावीत असले तर त्यांच्यांत अनेक रोगांचा प्रादुर्भाव होऊन संसर्गानें ते रोग समाजांतील इतर लोकांतही पसरतात. आरोग्यदृष्ट्या अनिष्ट वातावरणांत ज्या कारखान्यांचें काम चालतें ते कारखाने सर्व रोगांचे जंतू उत्पन्न करून त्यांची वृद्धि व प्रसार करण्याचें काम फुकट करणारे समाजशत्रूच होत. आपल्या डोळ्यांदेखत लहान मुलें व बायका यांना त्यांच्या शक्तीबाहेर काम करावें लागत असलेलें पाहून आणि रोगकारक हवेमुळें

किंवा यंत्राभोवती कुंपण नसल्यामुळें मजूर अकाली मृत्युमुखी पडत असलेले पाहून मनुष्याच्या मनांत सतत वसत असलेली भूतदयाही जागृत झाल्याशिवाय राहणार नाही. त्यांतही वर सांगितल्याप्रमाणें आर्थिक दृष्ट्या असले प्रकार अनिष्ट असल्यामुळे हल्ली बहुतेक सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत कारखान्यांत मजूर घेण्याबद्दल व घेतल्यानंतर त्यांमधील कामाचे नियमन करण्याबद्दल कायदे केलेले असतात. अगदी लहान मुलें कारखान्यांत घेऊं नयेत, मध्यम वयाची मुलें व बायका यांचे कामाचे तास मर्यादित असावे, सर्व मजुरांस योग्य प्रमाणांत विश्रांति द्यावी, यंत्रांपासून मजुरांस अपघात होणार नाही अशी व्यवस्था करावी, शुद्ध हवा व स्वच्छ पाणी यांचा मुबलक पुरवठा करावा, असा ह्या कायद्याचा मुख्य आशय असतो. कांही कांही धोक्याच्या धंद्यांत तर बायका मुलांस कामावर घेण्यासच कायद्यानें प्रतिबंध केलेला असतो. दिवसानुदिवस राजकीय, आर्थिक व सामाजिक दृष्टींनी मजूर वर्गाचें महत्त्व वाढत असल्यामुळे निरनिराळ्या राष्ट्रांत कारखानदारांवर अनेक नियंत्रणें घातलेली असतात. या कारखानदारांपैकीं कांही जण जास्त सुसंस्कृत असून आपण होऊनच मजुरांचें शक्य तितकें हितवर्धन करीत असतात. सरकारही कारखान्यांत मजुरांस कसें वागविलें जावें, एवढ्याबद्दलच कायदे करून न थांबतां मजुरांवर येणाऱ्या अपघात, आजार, बेकारी, वार्धक्य इत्यादि अरिष्टांबद्दल विमा उतरण्यासंबंधी व मजूर आणि मालक यांच्यांत भांडण लागल्यास त्यांची समजूत घालून तडजोड करण्यासंबंधीही निर्बंध घालून देतें.

**१५ धंद्यांतील तंटे नाहींसे करण्याचे उपाय**– हल्ली समाजांत संपत्तीच्या विभागणीची जी तीव्र विषमता दिसून येते ती अनेक पाश्चात्य राष्ट्रांतील मजूरवर्गाच्या मनांत शल्यासारखी टोचत असते. मजुरांच्या या असंतोषास कित्येक समाजसत्तावाद्यांच्या शिकवणुकीनें दीर्घ वैराचें स्वरूप येऊन भांडवलवाले व मजूर हे दोन्ही वर्ग अर्थोत्पादनांत परस्परांचे सहकारी असूनही मजुरांच्या दृष्टीनें भांडवलवाले म्हणजे युद्धांतील प्रतिस्पर्धीच ठरतात. भांडवलवाल्या मालकाकरितां मजुरांनें मन लावून काम करणें म्हणजे गुलामानें आपला धनी आपल्याला ज्या शृंखलेनें जास्त जास्त बद्ध करून टाकणार ती शृंखलाच अधिक जड करणें होय, असें या मजूरवर्गापैकीं कित्येकांचें मत असतें. एवढी आत्यंतिक वैरबुद्धि थोड्या लोकांतच दिसून येत असली तरी एकंदरीनें मजुरांच्या मनांत असंतोष व मालकाच्या सद्बुद्धिबद्दल शंका ही बहुतेक नेहमीच वसत असतात. त्यामुळें कामांत शक्य तितका चुकारपणा करण्याची मजुरांना संवय लागून सुष्ट व दुष्ट मार्गांनी मालकांकडून आपल्याला जास्तींत जास्त फायदा कसा करून घेतां येईल, इकडेच त्यांचें लक्ष असतें. समाजांतील दोन मुख्य वर्गांत असा असंतोष, संशय व वैर ही असणें आर्थिक, राजकीय व सामाजिक दृष्ट्या अत्यंत अनिष्ट आहे ह्याची सर्वांस जाणीव असल्यानें

या तंट्याचें मूळ काढून टाकण्यास अनेक उपाय सुचविले जातात. निर्दय किंवा निखालस स्वार्थसाधु मालकाच्या हाताखाली काम करणाऱ्या मजुरास भांडवलवाल्या-बद्दल जितकें शत्रुत्व वाटतें तितकें एखाद्या समंजस व उदार मालकाच्या नोकरांना वाटत नाहीं, व ते आपल्या मालकाचें काम जास्त मन लावून करतात. याप्रमाणें सर्वच मालक जर आपल्या मजुरांना सद्वर्तन व न्याय्यबुद्धीनें वागवून त्यांच्या राह-ण्याची, शिक्षणाची, करमणुकीची, औषधपाण्याची वगैरे व्यवस्था करतील तर मजुरांना मालकांबद्दल सहानुभूति वाटून ते संतुष्ट राहतील. मजुरांच्या सुखवर्धना-साठीं मालकास असा जो खर्च करावा लागेल, तो दानाच्या किंवा धर्मादाय स्वरू-पाचा नसून आर्थिक दृष्ट्याही असला खर्च बहुतेकवेळां फायदेशीरच ठरतो. कारण मजुरांची कार्यक्षमता वाढल्यामुळें आणि त्यांनी जास्त मन लावून काम केल्यामुळें एकंदर धंद्याचें उत्पन्न व त्याबरोबरच मालक व मजूर यांचा त्यांतील भाग वाढतो. बऱ्याचशा मालकांना मजुरांचें सुखवर्धन करण्यानें धंदा जास्त किफायतशीर होतो ही गोष्ट पटत नसल्यानें व मजुरांसही मालकाच्या या औदार्यानें आपली मानहानि होते, असें वाटत असल्यानें अशा प्रकारची व्यवस्था सुसंघटित स्वरूपानें किंवा विस्तृत प्रमाणावर होतांना फारशी दिसत नाहीं.

मजूर व मालक यांच्यातील तंट्याचे दुसरें एक प्रमुख कारण म्हणजे मालकास मिळणारा नफा हें होय. मजूर काबाडकष्ट करून संपत्तीचें उत्पादन करतात व मालक स्वस्थ बसून नफ्याच्या स्वरूपानें त्या संपत्तीच्या पुष्कळ मोठ्या भागाचा उपभोग घेतात, अशीच सामान्यपणें मजुरवर्गांत नफ्याबद्दल प्रचलित कल्पना असते. म्हणून या नफ्याची कांहीं वांटणी मजुरांस दिली तर त्यांचा असंतोष कमी होऊन व त्यांची धंद्याबद्दलची आपलेपणाची बुद्धि जागृत होऊन त्यांची उत्पादकता व धंद्याचें उत्पन्न हीं वाढतील, असें कित्येक लोकांचें म्हणणें आहे. मागें नफा म्हणजे काय, हें सांगितलेंच आहे, त्यावरून मजुरांस नफ्याची वांटणी देण्याचा हा उपाय कितपत शास्त्रशुद्ध व व्यवहार्य आहे हें दिसून येईल. प्रत्येक धंदेवाल्याच्या मिळकतींत त्याचें साहस व संघटना—चातुर्य यांचा मोबदला म्हणून एक सर्वसाधारण किमान नफा असतोच. स्वतःच्या श्रमाचें पारितोषिक म्हणून हा नफा चालक वर्ग घेत असल्यानें मजुरास त्याच्यांत वांटणी मिळू शकणार नाहीं व मिळालीच तर कमी दर्जाच्या चालकाच्या हातांत धंदा जाऊन धंद्याचें उत्पन्न व मजुरांची मजूरी, हीं दोन्हीं कमी होतील. निव्वळ नफा मात्र चालकांच्या हुशारीचें किंवा श्रमाचें फळ नसल्यानें त्यांत मजुरांस वांटणी दिली तरी धंद्याचें फारसें नुकसान होण्यासारखें नसतें. परंतु निव्वळ नफा हा हंगामी व आकस्मिक स्वरू-पाचा असतो म्हणून मजुरांस त्याची वांटणी मिळाली तरी ती अल्प व अनिश्चित असल्यानें ते फारसे हुरळून जातील असें नाहीं. उलट समाजसत्तावाद्यांच्या

तालमीत तयार झालेले मजूर वर्गाचे कित्येक पुढारी नफ्यात वांटणी स्वीकारणें म्हणजे चोराशी तडजोड करण्यासारखें आहे असें समजतात. सांगितलेलें काम मन लावून न करणाऱ्या हट्टी व हेकेखोर मुलास खाऊच्या आशेनें चांगलें काम करण्यास लावण्याची ही युक्ति मालक व मजूर या दोघांसही नापसंत आहे. तरी काही विवक्षित धंद्यांत ही पद्धत स्वीकारली जात असून तिच्यापासून काही मर्यादेपर्यंत फायदा होणें शक्य आहे, असें दिसून येत आहे.

मजूर व भाडवलवाले याच्यांतील तंट्याची मुळे अनेक असल्याने वर सांगितलेली एक दोन कारणे थोडी फार दूर केली तरी त्या दोघांत नेहमी तंटे होत राहणारच. अशा तंट्याचें कारण शोधून काढून दोन्ही बाजूंत तडजोड करण्याकरितां सरकारी किंवा खासगी स्वरूपाची एखादी लवाद संस्था असणें जरूर आहे, असें कित्येक लोक सुचवितात. प्रतिपक्षाचें म्हणणें योग्य रीतीनें पुढे माडल जाण्यास ते दोघेही सुसंघटित असणे इष्ट असतें. मजूरांचे संघ ज्या मानानें वाढतील त्या मानानें मजूराची बाजू अशा संस्थांपुढे जास्त परिणामकारक रीतीनें मांडतां येईल, हे उघड आहे. शिवाय मालक व मजूर यांच्या तंट्यात लवादानें करावयाची पंचाईत सक्तीची असावी किंवा खुषीची असावी हाही एक महत्त्वाचा प्रश्न असतो. ज्या थोड्या देशांत सक्तीच्या तडजोडीची पद्धत प्रचलित आहे तेथील अनुभव असा आहे की, जोंपर्यंत तडजोडीचा निकाल मजूरांच्या मजूरीत वाढ करण्यात होतो तोंपर्यंत ही तडजोड मान्य केली जाते. तडजोडीचा निकाल मजूरांच्या विरुद्ध झाला तर प्रत्यक्ष सरकारालाही मजूराना तो निकाल मान्य करावयास लावणें अशक्य होतें. शिवाय, सर्व धंद्यातील सर्व मजूरानी आपापल्या संघाचे सभासद झालेंच पाहिजे, मालकांनीही याच संघाच्या सभासदांतून नवीन मजूर कामावर घेतले पाहिजेत, प्रत्येक धंद्यांत मजूरीचे किमान दर ठरविले जाऊन त्यापेक्षां कमी दराने मजूराने काम करूं नये व मालकानी मजूर कामावर लावूं नये, अशा प्रकारच्या ज्या मागण्या मजूर वर्गाच्या पुढाऱ्याकडून नेहमी केल्या जातात, त्यांचा केवळ तडजोडीनें निकाल लागणे शक्य नसतें. सक्तीच्या तडजोडीनें मजूरांची मजूरी ठरवावयाची असे म्हटलें म्हणजे अप्रत्यक्षपणें उत्पादनाच्या इतर घटकांची मिळकतही तडजोडीनेच ठरविली पाहिजे. असें करणे म्हणजे परस्पर स्पर्धा हें सध्यांच्या आर्थिक व्यवहाराचें नियामक तत्त्व बाजूस सारण्यासारखें आहे. या गोष्टीला कोणत्याच राष्ट्रांतील लोक सर्वस्वी तयार नसल्यानें कांही फार महत्त्वाच्या धंद्यांत मात्र सक्तीची तडजोड चालू ठेवून इतर धंद्यात मालक किंवा मजूर यांनीं आपखुषीनें आपला तंटा पंचाइतीनें तोडण्याची इच्छा दाखविली तरच त्यांत लवाद संस्था मन घालतात. एखाद्या तंट्यापासून समाजाचें फार नुकसान होण्याचा संभव आहे, असें वाटल्यास सरकार आपण होऊनच तंट्याची चवकशी व तडजोड करण्यास प्रवृत्त होतें.

**१६ मजुरांच्या विम्यासंबंधीं कायदे**--मजूर व मालक यांची आपापसांत समजूत पडून किंवा एखाद्या त्रयस्थाच्या मध्यस्थीनें त्या दोघांत तडजोड होऊन त्यांचे जे करार ठरतील ते दोन्ही पक्षां बरेच समाधानकारक होतील यांत शंका नाहीं. परंतु व्यक्तिशः मजूर लोक व एकंदर समाज यांच्या अंतिम हिताकडे लक्ष देऊन सकृद्दर्शनीं मजुरास फारशा जाचक न वाटणाऱ्या कांहीं अडचणी दूर करण्याचाही सरकारास प्रयत्न करावा लागतो. इतर सर्व वर्गांप्रमाणें आजारीपण, वार्धक्य व अपमृत्यु हीं अरिष्टें मजूरवर्गाच्याही मागें लागलेलीं असतात. परंतु समाजाच्या इतर वर्गांत ज्याप्रमाणें अशा अरिष्टांचे दुष्परिणाम दूर करण्यास पुरेसें आर्थिक बल असतें, तसें मजूर वर्गांत असत नाहीं. त्यामुळें त्याच्यावर वरीलपैकीं एखादीही आपत्ति ओढवली तरी त्याचा व त्याच्या कुटुंबाचा पूर्ण नाश होतो. असें होणें समाजास हितावह नसल्यानें मजुरांच्या आपत्तींत त्यास मदत करण्याची कांहीं योजना करणें जरूर असतें. आजारीपण, अपघात व अपमृत्यु यांची जबाबदारी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें मालकावर साहजीकच पडते; आणि ती दूर करणें हें पर्यायानें त्याच्या हिताचें असल्यानें त्यासंबंधाच्या खर्चाचा बोजा अंशतः कारखानदारावर टाकणें न्याय्य आहे. मालकाकडून कांहीं वर्गणी घेऊन व मजुरासही त्याच्या मजुरींतला कांहीं भाग द्यावयास लावून प्रत्येक मजुरास अशा आपत्तींत मदत करतां येणें शक्य झालें आहे. कांहीं कांहीं अपघात हे मालकाच्या बेपर्वाईनें व हलगर्जीपणानें घडून येतात. कारण मजूर लोक हे साधारणपणें अज्ञ व अदूरदृष्टि असतात हें गृहीत धरूनच आपली यंत्रसामुग्री व कामाचीं इतर उपकरणें यांपासून मजुरास धोका होणार नाहीं, अशी मालकांनीं व्यवस्था करावयास हवी. असल्या अपघातांत मजुरांस मदत करण्याची सर्व जबाबदारी अर्थात मालकावरच टाकतां येते. मजुरांवर येणाऱ्या वरील संकटांचें निवारण करण्याचा बोजा मालकास असह्य होऊन त्याच्याखालीं ते चिरडून जातील, असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. परंतु एकंदर मजूर वर्गाच्या संख्येच्या मानानें पाहिल्यास त्याच्यांत आजारीपण, अपघात, व अपमृत्यु हे सरासरीनें फारच थोड्या प्रमाणांत होतात, असें दिसून येईल. म्हणून मजुरांच्या या आपत्तींबद्दल विमा उतरविला तर त्यांच्यावर व मालकांवर फार बोजा न पडतां सर्व मजुरास मदत मिळण्याची व्यवस्था होते. आर्थिक व आरोग्यविषयक दोन्ही दृष्टींनीं समाजास विम्याच्या अशा पद्धतीपासून बराच फायदा होतो.

वार्धक्याची गोष्ट इतर आपत्तींपेक्षां कांहींशी निराळी आहे. सुखवस्तु वर्गांत तर वार्धक्य हें आपत्तीसारखें न वाटतां सुदैवाचीच गोष्ट वाटते. परंतु ज्या मजुरांस ते धडधाकट असतांनाही नीटपणें पोट भरण्याची मारामार पडते, ते म्हातारपणामुळें काम करण्यास नालायक झाले तर त्यांचे पोटापाण्याचे हाल होतात. जोंपर्यंत त्यांच्या

अंगांत शक्ति असते तोंपर्यंत ते आपल्या श्रमानें समाजाच्या संपत्तींत भर घालीतच असतात. वस्तुतः ज्या वृद्ध कामकऱ्यांस त्यांची काळजी घेण्यास समर्थ असे स्वतःचे नातलग नाहींत त्यांची एकंदर समाजानेंच काळजी वहावयास पाहिजे. म्हणून सरकार सर्वस्वी आपल्याच उत्पन्नांतून किंवा मजूर व मालक यांच्या भागीदारीनें वृद्ध मजुरांस कांहीं किमान तनखा देत असतें. वर सांगितलेल्या सर्व आपत्तींपेक्षां मजुरास जास्त भयप्रद वाटणारी आपत्ति म्हणजे बेकारी ही होय. मागें 'संपत्तीचें उत्पादन' या प्रकरणांत आर्थिक अरिष्टामुळें बेकारी कशी उत्पन्न होते, हें सांगितलें आहे. उपभोक्त्यांची मागणी बदलल्यामुळें, परदेशी कारखानदारांच्या स्पर्धेत धंदा बुडाल्यामुळें किंवा दुसऱ्या एखाद्या अनाहूत कारणानें समाजांत थोडी फार बेकारी नहमी अस्तित्वांत असते. काम करण्यास समर्थ व तयार अशा मजुरांस काम न मिळेल तर त्यांचा चरितार्थ कसा चालवावा हा प्रश्न सर्व सुधारलेल्या देशांत पहिल्यापासूनच फार बिकट समजला गेला आहे. त्यांस भिक्षा घालण्याच्या मिषानें मदत करावी तर ते काम करण्यास नालायक होतात, व कामाची मजुरी म्हणून मदत द्यावी तर त्यास योग्य काम नसतें. तरी बेकारीमुळें मजुरांस अगदीं प्राणत्याग करण्याची वेळ येऊं नये इतकी भूतदयाप्रेरित व सामाजिक जबाबदारी सुधारलेल्या राष्ट्रांतील सरकारें आपल्यावर घेऊन बेकारी मजुरांस भत्ता देण्याची पद्धत चालू ठेवतात. शिवाय धंद्यास उत्तेजन देऊन किंवा कांहीं मजुरांस नवीन वसाहतींत पाठवून बेकारी कमी करण्याचा प्रयत्न करण्यांत येतो तो निराळा. मजुरांच्या अनेक प्रकारच्या आपत्तींत त्यांस मदत करण्याच्या वर ज्या पद्धती सांगितल्या त्यांच्या तपशिलांत निरनिराळ्या देशांत बराच फरक दिसून येतो. परंतु जुन्या अर्थशास्त्रज्ञांनी संमत दिलेली व भांडवलवाल्यांस सर्वस्वी प्रिय अशी तटस्थवृत्ति सोडून देऊन व सर्व समाजाचें हितसंवर्धन करण्याची आपली जबाबदारी ओळखून सरकार संपत्तीच्या विभागणींत फार महत्त्वाची कामगिरी करीत आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

**१७ समाजसत्तावाद**—भांडवलवाले व मजूर यांच्या उत्पन्नांत दिसून येणारी विषमता दूर करण्याचे सुधारलेल्या राष्ट्रांतील सरकारांकडून जे प्रयत्न केले जातात ते निखालस व्यक्तिस्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांस समाजसत्तावादानें प्रेरित झाले आहेत असें वाटून ते अशा धोरणास 'सरकारी समाजसत्तावाद' असें कांहींसें निंदाव्यंजक नांव देतात. संपत्तीचें उत्पादन, विनिमय व विभागणी या सर्व आर्थिक क्षेत्रांत सरकार दिवसानुदिवस जास्त हात घालीत आहे, ही गोष्ट खरी असली तरी तेवढ्यावरून समाजसत्तावादित्वाचा आरोप त्यांच्या कृतीवर होऊं शकत नाहीं. कारण मोठ्या प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन करावयास आवश्यक असलेलें भांडवल खाजगी लोकांच्या मालकीचें असूं नये, हा जो समाजसत्तावा-

याचा मुख्य कटाक्ष त्याचा या सरकारी कार्यक्रमात अंतर्भाव होत नाही. शिवाय सर्व आर्थिक व्यवहारांतून स्पर्धेचें उच्चाटण करणें, निरनिराळ्या वर्गांच्या मिळकतीतील विषमता दूर करणें, व विशेषतः गरीब मजूरवर्ग आणि संपत्तिमान् भांडवलवाले यांच्यात तीव्र हितविरोध आहे असें कल्पून तो जास्त जास्त वाढविणे आणि शेवटी मोठी क्रांति घडवून आणून भांडवलशाहीच्या जागी समाजसत्ता स्थापन करणें, ह्या अव्वल समाजसत्तावादाशी सर्वथैव संलग्न असलेल्या गोष्टींचा हल्लींची सरकारें मजूरवर्गाच्या हितसंवर्धनार्थ किंवा समाजाच्या आर्थिक उन्नतीप्रीत्यर्थ जे कायदे करतात त्यात मागमूसही नसतो. उलट मजूरवर्गास जास्त कार्यक्षम, संपन्न व समर्थ करून त्यांच्यातील असंतोष नाहीसा करावा, असाच त्या कायद्यांचा उद्देश असतो. परतु समाजसत्तावादाच्या निस्सीम उपासकास त्याज्य वाटणारी मुख्य गोष्ट म्हणजे भांडवलशाहीत काही थोड्या लोकांच्या हातात संपत्तीचा फार मोठा भाग राहतो, ही होय; व या विषमतेमुळें उत्पादनास हल्ली आवश्यक असलेलें भांडवल हेंही काही थोड्या लोकांच्या हाती जाऊन त्यांस मजुरावर सत्ता गाजवितां येत असल्यानें ते आपणास भांडवलशाहीचे कट्टे शत्रू असें समजतात. सरकारच्या मदतीनें मजुरांची स्थिति सुधारली तरी संपत्तीच्या विषमतेचें शल्य कायमच राहतें. तें काढून टाकून समाजांतील सर्व लोकांस जवळ जवळ सारखाच संपत्तीचा वांटा मिळावा या हेतूनें समाजसत्तावादी निरनिराळे उपाय व पद्धति सुचवितात. मुख्यत्वेकरून अशा सूचना सध्याच्या घटनेंतील खरे खोटे दोष दाखविण्याच्या उद्देशानें केलेल्या असून त्या तात्त्विक किंवा व्यावहारिक कसोटीस उतरत नाहीत. शिवाय, समाजसत्तावाद्यांचे अगणित पंथ असून त्यांच्या मतात फार अनिश्चितपणा असतो. तरी सध्यांच्या आर्थिक घटनेचा मुख्य दोष म्हणजे संपत्तीची विषम विभागणी हा होय, असें बऱ्याच लोकांचें म्हणणें असल्यामुळे भांडवलशाहीचे प्रतिस्पर्धी जे समाजसत्तावादी ते विभागणीची कोणती पद्धत अमलांत आणूं इच्छितात, हे कळणें जरूर आहे. लहान महान फरक सोडून दिले तर पुढील पद्धतींचा समाजसत्तावाद्यांकडून विशेष पुरस्कार केला जातो असें आपणास दिसून येईल.

( १ ) पूर्वी समाज प्राथमिक अवस्थेंत असताना जेव्हा मनुष्यें लहान सहान गट करून राहत असत व जमीन हीच अर्थोत्पादनाचें मुख्य साधन होती, त्या वेळेस समाजांतील सर्व लोकांस त्या जमीनींत सारखा वांटा देण्याची पद्धत अस्तित्वांत असे. परतु कुटुंबसंस्थेच्या वाढीनें व बलात्कारानें प्रदेश हस्तगत करण्याच्या पद्धतीनें ही समान विभागणी नाहीशी झाली. पुढें समाज आर्थिक घटनेची प्राथमिक अवस्था सोडून जसजसा जास्त प्रगल्भ अवस्थेंत जाऊं लागला तसतसे जमीनीशिवाय इतर वस्तूंसही आर्थिक महत्त्व येऊन विभागणीची

विषमता वाढतच चालली. परंतु सर्वकाळीं कित्येक लोकांस ती पूर्वीची समान विभागणीची पद्धत नवीन परिस्थितीतही पुन्हां चालू करावी असें वाटत असते. समाजांत एकंदर संपत्ति विपुल, निदान सर्व लोकांच्या गरजा भागविण्यापुरती तरी असते व तिची सारखी वांटणी केली तर प्रत्येक इसमास जरूर तेवढा भाग मिळेल, अशी या लोकांची कल्पना असते. परंतु ही कल्पना चुकीची आहे. एक तर सर्व श्रीमंत व गरीब लोकांची संपत्ति एकत्र करून लोकसंख्येच्या प्रमाणात ती वांटून दिली तर त्यांतील प्रत्येक हिस्सा साधारण लोकांस वाटतो त्यापेक्षा फार कमी होईल. हा लहान भागही मनुष्याच्या वाढत्या गरजांमुळें दिवसानुदिवस जास्त अपुरा पडून असंतोष कायम राहील. शिवाय संपत्तीची कृत्रिम समानता विवक्षित काळीं घडवून आणली तरी जोपर्यंत मनुष्याच्या उत्पादक सामर्थ्यांत फरक आहेत, व आजही कायद्यानें खाजगी मालकी बंद केलेली नाहीं, तोपर्यंत मिळकतीची व संपत्तीची विषमता पुन्हां प्रस्थापित होणारच. खाजगी मालकी असावी किंवा नाहीं या प्रश्नास केवळ समान विभागणी असावी असें म्हणणारे लोक स्पष्ट उत्तर देत नाहीत. त्यामुळें त्यांच्या सूचनेस शास्त्रीय व व्यावहारिक महत्त्व फारसें देता येत नाहीं.

( २ ) प्रत्येक कुटुंबातील माणसें आपापल्या शक्त्यनुसार कुटुंबाच्या संपत्तींत भर घालतात व आपणास गरज लागेल तेवढ्या वस्तूंपुरता त्या संपत्तींतील भाग स्वतःसाठीं उचलतात. शक्तीच्या प्रमाणांत उत्पादन व गरजांच्या प्रमाणांत विभागणी असाच कुटुंबांतला आर्थिक नियम असतो. हा नियम सर्व समाजाला लावून ज्यानें त्यानें आपापल्या मगदुराप्रमाणें संपत्तीच्या उत्पादनास मदत करावी व सर्वांच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या संपत्तींतून आपापल्या गरजाप्रमाणें हिस्सा घ्यावा, अशी पद्धत चालू करावी असें कित्येक समाजसत्तावादी लोकांचें म्हणणें असतें. साधारण मनुष्यास कौटुंबिक भावना प्रिय असते. सर्व समाजाचें मिळून एक मोठें कुटुंब झालें तर तेंही कित्येकांस हवेंसेंच वाटेल. व्यक्तिशः मनुष्य व एकंदर मनुष्य जात यांची सर्वांगीण प्रगति होण्यास व्यक्तिप्रधान किंवा कुटुंबप्रधान समाजघटना जास्त प्रभावी आहे हा तात्त्विक प्रश्न आपण क्षणभर बाजूस ठेवून कौटुंबिक तत्त्वाचा सर्व समाजांत अम्मल सुरू करावा, या सूचनेचा केवळ आर्थिक दृष्ट्याच विचार करूं. समाजसत्तावाद्यांचा वर जो पहिला प्रकार सांगितला त्यांप्रमाणें या विश्व-कुटुंबी लोकांसही समाजांत एकंदर संपत्ति जरूरीपेक्षां जास्त आहे, असा भ्रम असतो, प्रत्यक्ष वांटणी झाल्यास प्रत्येक व्यक्तीचा हिस्सा किती होईल व तो वाढत्या गरजा-मुळें किती अपुरा पडेल याची नीट कल्पना आल्यास कौटुंबिक तत्त्वाच्या प्रसारा-बद्दलची उत्सुकता बरीच कमी होईल. शिवाय संपत्तीच्या विभागणीच्या एखाद्या पद्धतीनें जर संपत्तीच्या उत्पादनास आळा बसूं लागला तर उपयुक्त वस्तूंचा एकंदर

पुरवठाच कमी होऊन जाईल; व त्यामुळें प्रत्येक व्यक्तीचा हिस्सा संकोच पावेल, एवढेंच नव्हे तर उत्पादनपद्धतींत नवीन सुधारणा होण्याचें बंद पडून भांडवलाच्या अभावीं जुन्या सुधारणाही मागें पडतील. जोंपर्यंत साधारण मनुष्य स्वतःच्या किंवा आपल्या कुटुंबाच्या फायद्याकरितां जितक्या उत्साहानें अंग मोडून काम करतो तितक्याच नेटानें एकंदर समाजाकरितां किंवा मनुष्यजातीकरितां श्रम करण्यास तो शिकला नाहीं तोंपर्यंत केवळ सांपत्तिक दृष्ट्याही कौटुंबिक तत्त्वाचा सर्व समाजांत अम्मल होणें इष्ट किंवा शक्यही नाहीं. राजकीय व सामाजिक बाबतींत या कौटुंबिक तत्त्वामुळें व्यक्तिस्वातंत्र्य कसें चिरडलें जातें हे रशियांतील अनुभवावरून दिसून आलेंच आहे.

( ३ ) वरील दोन प्रकारांत आर्थिक दृष्ट्या जे दोष आहेत ते काढून टाकून आपल्या पद्धतीस शास्त्रशुद्ध व व्यवहार्य समजणारे कांहीं लोक पुढील सूचना करतात. 'संपत्तीचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर होण्यास खाजगी मालकीचा हक्क असणें आवश्यक आहे, हे खरें. पण ही मालकी आपणांस वाटेल त्या वस्तूचा उपभोग घेतां यावा एवढ्याच करितां असल्यानें उपभोग्य वस्तूंवर खाजगी मालकी कायम ठेवली म्हणजे मनुष्यास नेटानें काम करण्यास जो श्रमहेतु लागतो तो उपलब्ध होईल. समाजाच्या दृष्टीनेंही कोणता मनुष्य कोणत्या वस्तूचा उपभोग घेतो ही फारशी महत्त्वाची बाब नसून तो अर्वाचीन उत्पादनपद्धतीस सर्वथैव आवश्यक असलेल्या भांडवलाच्या केवढ्या भागाचा धनी आहे ह्याच गोष्टीस आर्थिक महत्त्व असतें. कारण भांडवलाचा मालक या नात्यानें तो मजुराचाही मालक होऊन त्याच्या श्रमाचा स्वतःस फायदा करून घेतो. सर्व प्रकारचें भांडवल, म्हणजे जमीन, खाणी, कारखाने, पेढ्या, आगगाड्या, कच्चा माल वगैरे उत्पादनाचीं साधनें, हीं समाजाच्या मालकीचीं केलीं तर भांडवलाच्या उत्पादक सामर्थ्याचा समाजाला फायदा मिळून मजुरांस संपत्तीची योग्य वाटणी मिळेल. श्रम केल्याशिवाय कोणास उत्पन्न मिळूं नये व ज्याप्रमाणें श्रम जास्त कमी होतील त्या मानानें वेतनही जास्त कमी व्हावें. नवीन भांडवल तयार व्हावयाचें तें समाजाच्या एकंदर कमाईतून ठराविक बचत करून उभारतां येईल. भांडवलाच्या सध्यांच्या मालकांसही थोडा फार मोबदला देऊन त्यांच्या मालकीचीं उत्पादनाचीं साधनें समाजानें विकत घेतलीं म्हणजे त्यांवर कायदेशीर दृष्ट्याही अन्याय झाला असें म्हणण्यास जागा राहणार नाहीं. आजवर समाजाची आर्थिक उत्क्रान्ति ज्या अनुरोधानें होत आहे त्यावरूनही आतां सामुदायिक तत्त्वाप्रमाणेंच संपत्तीची विभागणी होणें योग्य व अपरिहार्य आहे, असें दिसून येईल. पूर्वी संपत्तीचें उत्पादन व विभागणी हीं दोन्हीं वैयक्तिक स्वरूपाचीं असत. हल्लीं संपत्तीचें उत्पादन सामुदायिक स्वरूपाचें झालें असून उत्पन्नाची विभागणी मात्र जुन्या वैयक्तिक तत्त्वानुसारच होत आहे. त्यामुळें समाजांत असंतोष व घोंटाळा माजला असून

उत्पन्नाच्या विभागणीसही सामुदायिक स्वरूप दिल्याशिवाय तो नाहीसा होणार नाही. उत्क्रान्तिवादाच्या दृष्टीनेही सामुदायिक पद्धत शास्त्रशुद्ध असून ती न्याय्य व व्यवहार्य आहे."

समाजाची संपत्ति वाढत्या प्रमाणावर ठेवावयाची असेल तर साधारण मनुष्यास त्याच्या वैयक्तिक हिताचें आमिष दाखविल्यावांचून गत्यंतर नाहीं या गोष्टीस सामुदायिक[1] समाजसत्तावाद्यांची सम्मती आहे, हा त्यांच्यांतील विशेष गुण होय. परंतु आपल्या योजनेप्रमाणे ते व्यक्तिमात्रास त्याच्या श्रमाबद्दल जो मोबदला म्हणून द्यावयास तयार होतात त्याबद्दल मात्र शास्त्रज्ञास न शोभण्यासारखी संदिग्ध वृत्ति ते स्वीकारतात. उपभोग्य वस्तु खाजगी मालकीच्या व भांडवल सामुदायिक मालकीचे, असें असावें ही त्यांची कल्पना दिसण्यास साधी असली तरी तिच्यावरून खरा अर्थबोध होत नाहीं. कारण मालकी म्हटली म्हणजे तिच्याबरोबर मालकीचे जिन्नस सांठवून ठेवून वाटेल त्याला देण्याची मुभा ही आलीच. सामुदायिक अर्थशास्त्रज्ञ हा हक्क मान्य करीत असतील तर थोडक्याच कालांत खाजगी भांडवलाचा सांठा वाढून सामुदायिक पद्धतीस भांडवलशाहीचा प्रतिस्पर्धी पुन्हा निपजेल. जर हा पूर्ण हक्क ते मान्य न करतील तर मनुष्याचा श्रमहेतु ह्या नात्यानें खाजगी मालकीचें महत्त्व कमी होऊन, संपत्तीच्या उत्पादनास ओहोटी लागेल. काम केल्याशिवाय उत्पन्न मिळूं नये व श्रमाच्या प्रमाणांत उत्पन्न मिळावें, असेंही या प्रकारचे समाजसत्तावादी सुचवितात. परंतु कोणत्याही वस्तूची उपयुक्तता [illegible] ती उत्पन्न करण्यास लागणाऱ्या श्रमावर अवलंबून नसून ती उपभोक्त्याच्या गरजांवरून ठरते, हे शास्त्रीय व व्यावहारिक तत्त्व ते विसरतात. उदाहरणार्थ, आपल्या मंजुळ गायनानें ऐकणारास मोहित करून टाकणारा गवई व आपल्या स्नायुबलानें ओझीं वाहणारा हमाल यांच्या श्रमाचें मूल्य सामुदायिक पद्धतींत सारखेंच गणलें जाईल. ही गोष्ट न्याय्य अगर व्यवहार्य आहे, असें कोणीही समंजस मनुष्य म्हणणार नाहीं. शिवाय, उत्पादनाची व विभागणीची सामुदायिक पद्धत चालविण्यास जी संघटना करणें जरूर आहे तीही अनेक बाबतींत सदोषच राहील. सर्वच धंदे सरकारी मालकीचे झाल्यानें पर्यालोचक व चालक हे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष निवडणुकीनें नेमले जातील. परस्परस्पर्धेनें आणि अंगभूत कर्तबगारीनें जास्तीत जास्त कार्यक्षम लोकांच्या हुकुमतीखालीं हल्लीं धंदे राहतात ही व्यवस्था बदलून अदूरदृष्टि मजुरांस आवडणारे व कमीजास्त कार्यक्षमतेचे चालकच नेमले जातील.

---

१. इंग्रजींत ज्यांना कलेक्टिव्हिस्ट म्हणतात त्यांचा सामुदायिक समाजसत्तावादी या नांवानें प्रस्तुत स्थलीं उल्लेख केलेला आहे. मागें विश्वकुटुंबी म्हणून ज्यांच्या पद्धतीस संबोधिलें आहे ते इंग्रजी ग्रंथांतील कम्यूनिस्ट लोक होत.

संपत्तीचें उत्पादन सामुदायिक पद्धतीत कमी कमी होत जाईल अशी भीति वाटण्यास दुसरेंही एक कारण आहे. ते असें की, मालकी हक्क पूर्ण नसल्यानें उत्पादनाच्या पद्धतीत सुधारणा घडवून आणणारे नवीन शोध कमी लागतील व या सुधारणापासून समाजाचा फायदा करून घेण्यास व उत्पादनाची जुनी सामुग्री जसजशी नाहीशी होईल तसतशी ती नवीन तयार करण्यास तर भांडवलाची वाढ होणें जरूर असतें. हल्लीच्या पद्धतीत खाजगी व्यक्तींच्या कमाईंतील बचत एकत्र होऊन जरूर तें भांडवल उभारलें जातें. मोठमोठ्या कारखान्यांची व धंद्याची मालकी त्यांच्या भांडवलाच्या भागांच्या मालकीमुळें समाजाच्या बहुतेक सर्व वर्गांत पसरते. या प्रकारानें सामुदायिक समाजसत्तावाद्यांचा सध्याची आर्थिक घटना विभागणीच्या दृष्टीनें वैयक्तिक स्वरूपाची आहे, हा मुद्दा लंगडा पडतो व सामुदायिक उत्पादनास लागणारें भांडवल सर्व वर्गांच्या व निरनिराळ्या उत्पन्नांच्या लोकांकडून उभारलें जातें, हें सिद्ध होतें. सामुदायिक समाजघटनेंत भांडवल मिळविण्याचा हा मार्ग अर्थातच बंद पडणार, आणि म्हणून त्याऐवजी समाजानेंच आपल्या उत्पन्नांतून कांहीं भाग भांडवल म्हणून पुन्हा उत्पादनांत गुंतवावा, असें सुचविण्यांत येतें. परंतु मजूरांची वाढत्या वेतनाबद्दल व उपभोक्त्याची कमी किंमतीबद्दल ओरड चालू झाल्यानें असें भांडवल फारसें राखून ठेवतां येईल, हें शक्य दिसत नाहीं. शिवाय, सामुदायिक उत्पादन, विनियोग व विभागणी याचा प्रचंड कार्यक्रम पार पाडण्यास संघटनाही फारच व्यापक लागून ती यशस्वी करावयाची असल्यास तिच्यांत शिस्तही कडक ठेवली पाहिजे. सध्याच्या पद्धतींतील अनेक दोषांमुळें, एक वेळ व्यक्तिस्वातंत्र्य बुडालें तरी चालेल पण सर्वांची उपजीविका तरी नीट होऊं द्यावी, असें कांहींजणांस वाटतें. परंतु पूर्ण विचार केल्यास मनुष्यजातीच्या प्रगतीला नियमित व्यक्तिस्वातंत्र्याची आवश्यकता आहे, हें दिसून येईल. समाजसत्तावाद्यांच्या सर्व प्रकारांत या मूल्यवान् वस्तूचा अभाव असल्यामुळें ते अव्यवहार्य व अनिष्ट ठरले आहेत.

# प्रकरण चवथें

## सरकारी उत्पन्न व खर्च

**१ निर्धन लोक व सरकार**—मागील प्रकरणांत राष्ट्रीय उत्पन्नांत आपल्या श्रमानें किंवा कामगिरीनें भर टाकून त्यांतून आपापला योग्य हिस्सा घेणाऱ्या सामाजिक वर्गाचा विचार केला आहे. परंतु स्वतः अर्थोत्पादनास कांहीही मदत न करतां इतरांनी निर्माण केलेल्या उपयुक्त वस्तूंचा उपभोग घेऊन आपला चरितार्थ चालविणारे कांही वर्ग प्रत्येक देशांत आढळून येतात. या अनुत्पादक व निर्धन वर्गांत अनेक प्रकारच्या लोकांचा समावेश होतो. उदाहरणार्थ, लहान मुलें व वृद्ध किंवा रोगग्रस्त माणसें ही अर्थोत्पादनाचें काम करण्यास नालायक असतात. त्यांच्यापैकीं ज्या मुलांचे आईबाप किंवा पालक आपापल्या मुलांचें संगोपन करण्यास समर्थ असतात, किंवा ज्या वृद्ध व रोगग्रस्त माणसांस स्वतःच्या पूर्वार्जित किंवा आप्तेष्टांकडून मिळालेल्या द्रव्यावर आपला चरितार्थ चालावतां येतो त्यासंबद्दल समाजावर फारशी जबाबदारी असत नाहीं. परंतु पोरकीं व निराधार मुलें आणि जरारोगग्रस्त असाहाय्य लोक यांच्या उदरनिर्वाहाची सोय लावणें हें समाजाचें कर्तव्य होय. जीं मुलें निराधार झाल्यानें दारिद्र्यांत व दुःस्थितींत पडून अनेक प्रकारच्या कुमार्गाला लागण्याचा संभव असतो त्यांचें पोषण करून त्यांस चांगलें शिक्षण दिलें तर तीं समाजाचे प्रतिष्ठित व उत्पादक घटक बनतात. वार्धक्यानें व रोगानें जर्जर झालेल्यांचें पोषण करण्यांत समाजाचा तात्कालिक फायदा फारसा नसतो. तरी कांहीशा कृतज्ञताबुद्धीनें, कांहीशा अप्रत्यक्ष जबाबदारीच्या जाणीवेमुळें व बहुंशीं सहृदयतेच्या प्रेरणेनें अशा लोकांचा चरितार्थही बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांत सरकारकडून चालविला जातो. निराधार व विशेषेंकरून दुर्बल आणि संकटग्रस्त माणसास मदत करावी, ही परोपकारबुद्धि सर्वकाळीं व सर्व समाजांत आढळून येते. जगांतील सर्व धर्मांनीही परोपकार हेंच व्यावहारिक धर्माचें मूळ आहे असें ठरविलें असून दान करणें हें प्रत्येक गृहस्थाश्रम्याचें कर्तव्य आहे असें आपल्या देशांतील लोक फार प्राचीन काळापासून समजत आले आहेत. मागील प्रकरणांत मजुरांतील बेकारीचा विचार करतांना त्यांस दानाच्या रूपानें डोळे मिटून मदत केल्यास त्यांच्यांतील स्वाभिमान व स्वावलंबन हीं नाहींशीं होऊन ते उत्पादक कार्यास नालायक होतात, हें सांगितलेंच आहे. मोठ्या प्रमाणावर अर्थोत्पादनाची पद्धत सुरू झाल्यापासून बेकारी ही नेहमीचीच गोष्ट होऊन बसली आहे. बेकार मजुरांस भीक मागून आपलें पोट भरतें असें दिसून आल्यास बेकाऱ्यांची संख्या वाढून इतरांनीं श्रम करून मिळवावें व धडधाकट भिकाऱ्यांनीं तें फुकट बसून खावें, असें होईल.

दयेचा व दानाचा असा अनाठायी उपयोग होण्याची नेहमा भीती असते म्हणूनच सत्पात्री दान करण्यासंबंधानें सर्व धर्मांत निर्बंध घालून दिलेला आहे.

अर्वाचीन आर्थिक पद्धतीमुळें मात्र बेकारी वाढून उडाणटप्पू व धडधाकट भिकाऱ्यांची संख्या सर्व देशांत वाढती असते. मोठमोठ्या धंद्यांत दिसून येणाऱ्या बेकारीस, मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सरकार, मालक व मजूरसंघ याच्या परस्पर सहकार्यानें बराच आळा घालता येतो. या धंद्यांशिवाय इतरत्र दिसून येणाऱ्या बेकारीचेंही सरकारकडून काही तरी नियंत्रण व्हावयास पाहिजे. कारण श्रम करण्यास तयार असलेल्या मजूरांच्या उत्पादक सामर्थ्याचा समाजाला उपयोग करून घेता येत नसेल तर अप्रत्यक्षपणें तो त्या समाजाच्या आर्थिक घटनेचाच दोष होय, असें म्हटलें पाहिजे. शिवाय, हे दांडगट भिक्षेकरी घरोघर हिंडण्यास मोकळे सोडले तर त्यांच्यांतूनच चोरी दरोडेखोरी इत्यादि गुन्हे करणारे लोक निघण्याची फार भीती असते. अशा लोकांस लागणारी मदत सरकारनें केली पाहिजे असे कायद्यानें ठरविल्यास एक अत्यंत अनिष्ट परिणाम घडून येत असतो. मुलाबाळांची संख्या वाढली तर त्यांचा चरितार्थ चालविण्याची आपणांवरील जबाबदारी आपणांस झेपणार नाही, ही जाणीव अगोदरच एकदर समाजांत व विशेषतः [illegible] वर्गांत कमी असल्यानें त्याच्यातील लोकसंख्येच्या वाढीवर फारसें नियंत्रण नसतें; आणि अशांत सर्व निराश्रितांचा परामर्श घेण्यास सरकार कायद्यानें बांधले गेले तर दूरदृष्टीचें हें थोडें नियंत्रणही नाहीसें होऊन ज्या वर्गांतून साधारणपणें बेकारी व भिकारी हे निघतात त्याची संख्या झपाट्यानें वाढेल, एवढेंच नव्हे तर त्यांच्यांतील ज्या लोकांस काम करण्याचें सामर्थ्य [illegible] आहेत, तेही आळसात गढून सरकारी मदत घेण्यास अधिक तयार होतील. असें झाल्यानें स्वतंत्र व स्वावलंबी लोकांस आपण श्रम करून मिळविलेलें उपयुक्त धान्य [illegible] किंवा वस्तू आपल्या उपयोगी न पडतां बेकार मजूरांस व भिकाऱ्यांस सररहा वाटले जातात, असें दिसून येऊन तेही मन लावून किंवा नेटानें काम करण्याचें नाकारतील. श्रम व भांडवल याच्या उत्पादक सामर्थ्याचा पूर्ण व योग्य व्यय न झाल्यानें सर्व समाजाचें एकंदर उत्पन्न कमी कमी होत जातें. ही आपत्ति टाळण्याचा उपाय म्हटला म्हणजे श्रम करण्यास लायक असलेल्या इसमांस काम लावून देण्याची आणि खरोखर ज्यांस काम मिळत नसेल त्यांस व अनाथांस मदत करण्याची विस्तृत प्रमाणावर व पद्धतशीर व्यवस्था झाली पाहिजे. खाजगी व्यक्ति व संस्था यांच्याकडून वर्गणीच्या किंवा देणगीच्या रूपानें पैसे जमवून व जरूर तेथें करांच्या रूपानें मिळविलेल्या पैशातून त्यांत भर घालून म्युनिसिपॅलिट्या किंवा लोकल बोर्डें यांसारख्या स्थानिक संस्थांस हें काम करतां येतें स्वतःच्या श्रमानें उदारनिर्वाह करण्याचा मार्ग पाहून

देण्याची व तो मार्ग ज्यांस अशक्य असेल त्यांस सार्वजनिक रीत्या मदत करण्याची अशी पद्धत एकदां पाडली म्हणजे घरोघर भीक मागण्यास कायद्यानें प्रतिबंध करतां येतो.

निर्धन व निराश्रित लोकांस मदत करण्याची व मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मजूरांच्या निरनिराळ्या प्रकारच्या विम्यांस कमी जास्त प्रमाणांत हातभार लावण्याची जबाबदारी सरकारवर पडत असल्यानें सरकारचें उत्पन्न कसें मिळतें व तें कसें वाढवितां येतें हा आजकाल अत्यंत महत्त्वाचा आर्थिक प्रश्न होऊन बसला आहे. मागें 'संपत्तीचें उत्पादन' या प्रकरणांत सरकार निरनिराळ्या मार्गांनी स्वतः अर्थोत्पादन करतें याबद्दल निर्देश केलेला आहे; व समाजसत्तावाद्यांचें सरकारवरील प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष नियंत्रण वाढत असल्यानें सार्वजनिक उत्पादनाचें क्षेत्र हळूहळू विस्तृत होत जाणार, हें खरें आहे. परंतु अलीकडील सरकारांचा युद्धकाळीं व शांततेत जो अवाढव्य खर्च चालू असतो तो भागविण्यास मुख्यत्वेंकरून प्रजाजनांवर कर लादूनच पैसे उभारावे लागतात. ज्याप्रमाणें निर्धन व अनाथ लोक स्वतःच्या श्रमानें उत्पन्न केलेल्या उपयुक्त वस्तूंवर आपला उदरनिर्वाह न चालवितां इतरांच्या उत्पन्नांतून कांहीं भाग मागून घेतात त्याचप्रमाणें कांहीं अंशीं सरकारची स्थिति असते, असें निदान वरवर पाहणारांस वाटेल. खरोखरच सरकार स्वतः अर्थोत्पादनास कांहींही मदत न करतां इतरांच्या मिळकतीवरच आपली उपजीविका चालवीत असतें, किंवा देशांत सुरक्षितता राखणें, प्रजाजनांनी राजीखुषीनें केलेले आपापसांतील करार पाळले जाण्याची खात्रीपूर्वक व्यवस्था करणें, अनेक प्रकारच्या शैक्षणिक, औद्योगिक व आरोग्यविषयक सुखसोईचा पुरवठा करणें, इत्यादि मार्गांनीं तें अर्थोत्पादनास अप्रत्यक्ष परंतु आवश्यक व परिणामकारक मदत करीत असतें, या प्रश्नाचा प्रस्तुत प्रकरणांत क्रमाक्रमानें उलगडा होईल.

**२ सरकारी उत्पन्न व खर्च**--पुरातन काळीं सरकारचीं किंवा राजांचीं जीं कर्तव्यकर्में समजलीं जात त्यांत परचक्रापासून व अंतर्गत बंडखोरीपासून प्रजाजनांचें संरक्षण करणें आणि त्यांस न्यायदान करणें, हींच मुख्य असत. शेतकी व उद्योगधंदे यांस उत्तेजन देणें, गोरगरिबांस मदत करणें, विद्या व कला यांचें संवर्धन करणें इत्यादि कामेंही राजांकडून होत असत. परंतु अशा हितसंवर्धक कार्यांचें क्षेत्र बरेंच संकुचित असून राजांचें सामर्थ्य किंवा कीर्ति वाढविण्याचें एक साधन म्हणूनच तीं मुख्यतः अंगिकारिलीं जात. या सर्व प्रकारच्या कामाकरितां होणारा खर्च राजे लोक स्वतःच्या खाजगी उत्पन्नांतून व प्रजाजनांवर निरनिराळे कर बसवून भागवीत असत. राजांचीं कर्तव्यकर्में बरींच निश्चित असल्यानें आणि लोकांची व राजांची आर्थिक स्थितीही ठराविक स्वरूपाची असल्यामुळें राजांचें उत्पन्न व खर्च हा बहुंशीं एखाद्या जमीदाराच्या हिशेबाप्रमाणें असे. अर्वाचिन काळीं, व विशेषतः

गेल्या शेंदीडशें वर्षांत, राजा ही अर्धवट खाजगी स्वरूपाची संस्था नसून, सरकार हें एक सर्व समाजाचें सामुदायिक व संघटित स्वरूप आहे ही कल्पना विशेष रूढ झाली आहे. त्यांतही पहिल्याप्रथम उपयुक्ततावाद व नंतर समाजसत्तावाद यांच्या उत्कर्षामुळे सरकारची कर्तव्यकर्में कोणकोणती असावी याबद्दलची मर्यादा अनिश्चित होत चालली आहे. केवळ तात्विक दृष्ट्या बोलावयाचें तर प्रत्येक नागरिकाला व्यक्तिशः व समाजद्वारा शारीरिक व नैतिक दृष्ट्या पूर्णावस्थेस नेऊन पोंचविणें हें हल्लीच्या सरकारचें विस्तृत कर्तव्य आहे व तें पार पाडण्यास जे जे उपाय इष्ट व जरूर वाटतील त्यांचें अवलंबन करणें हें त्याच्या कामगिरीचें अमर्याद स्वरूप होय, असें म्हणतां येईल. खाजगी व्यक्ति किंवा संस्था यांचा जमाखर्च व सरकारी जमाखर्च यांमध्यें कित्येक वेळां एक महत्वाचा फरक म्हणून दाखविण्यांत येतो, तो असा कीं खाजगी व्यक्तीस आपल्या जमेवरून आपण एकंदर किती खर्च करावा हें ठरवावें लागतें. परंतु सरकार निरनिराळ्या कामाकरितां अमुक रक्कम खर्च करावयाची असें ठरवून मग उत्पन्नाच्या कोणकोणत्या मार्गांनीं ती भरून काढतां येईल याचा विचार करतें. हा फरक दाखविण्यात खाजगी खर्चाची तोंडमिळवणी साधारण दूरदृष्टीनें आपोआप होत असतें, परंतु सरकारी जमाखर्चांत खर्च वाढत राहिल्यानें नेहमी जमेच्या बाजूकडील रकमा, विशेषतः कराच्या स्वरूपानें मिळणाऱ्या बाबी, वाढवाव्या लागतात हें अप्रत्यक्षपणें सांगण्याचा हेतु असतो.

हल्ली तात्विक दृष्ट्या सरकारचीं कर्तव्यें अमर्याद झालीं असून, लोकशाहींत समाजांतील प्रत्येक वर्ग आपापल्या हितसंवर्धनास जरूर अशीं निरनिराळ्या प्रकारचीं कामें करण्यास सरकारला भाग पाडीत असतो. त्यामुळें सरकारी खर्च फुगत जाऊन जमेकडील रकमांतही कांहीं तरी मार्गानें भर टाकावी लागते, हें खोटें नाहीं. परंतु हा कांहींसा वरवरचा विचार झाला. आपण थोडें सूक्ष्म अवलोकन केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, खाजगी व्यक्तीप्रमाणें सरकारच्या खर्चावरही वस्तुतः जमेचेंच नियंत्रण असतें. ज्याप्रमाणें प्रत्येक मनुष्यास हव्याशा वाटणाऱ्या वस्तु पुष्कळ किंबहुना अमर्याद असूनही तो आपल्या मिळकतीच्या मानानेंच खर्च करतो, त्याप्रमाणें सरकारला कराव्याशा वाटणाऱ्या हजारों गोष्टी असूनही कराच्या व इतर मार्गांनीं जेवढा वसूल येण्यासारखा असेल तेवढ्यांतच वास्तविक खर्च बसवावा लागतो. जमेहून खर्च जास्त झाल्यास खाजगी व्यक्ति व सरकार या दोघांसही स्वतःच्या पतीवर कर्ज काढावें लागतें. सरकारनें ही गोष्ट करावी, ती गोष्ट करावी, असें म्हणणाऱ्यांनीं जमेच्या आंकड्यावर, म्हणजे मुख्यत्वेंकरून करांची संख्या व त्यांचें उत्पन्न यावर, खर्च अवलंबून असतो, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. आतां हें खरें कीं, बहुतेक लोकसत्ताक राष्ट्रांत राजकीय सत्ता मध्यम व गरीब वर्गाच्या हातांत असून आपापल्या वर्गाचें हित साधण्याकरितां ते सरकाराकडून निरनिराळ्या बाबींवर खर्च करवि-

जात. हा खर्च भागविण्यास कर बसवावयाचे झाले तर ते मात्र ज्यास कर देण्याची विशेष ऐपत आहे अशा श्रीमंत वर्गावरच बसविले जातात. साधारणपणें राजसत्ता ज्या वर्गाच्या हातात असते ते आपल्या हिताकरितां सरकारद्वारा वाटेल तसा खर्च करतात व इतर वर्गांवर कर लादून तो भागविण्याचा प्रयत्न करतात. त्यामुळें खर्चाचें मान साधारणपणें वाढतें राहून तो भरून काढण्यास करही वाढवावे लागतात. शिवाय, कित्येक प्रकारच्या खर्चांनी सरकारचें उत्पन्न वाढण्यास मदत होते. उदाहरणार्थ, शिक्षणाचा किंवा आरोग्याचा लोकांत प्रसार झाल्यास ते अधिक कार्यक्षम होऊन राष्ट्राचें व सरकारचें उत्पन्न वाढतें. परंतु हा विचार खाजगी व्यक्तीसही लागू असतो, यावरून सरकारी खर्चाची तात्विक मर्यादा अनिश्चित असून एकंदरीनें व्यवहारात मात्र तो शेवटी उत्पन्नावरूनच ठरतो, व खाजगी व्यक्तीप्रमाणें सरकारच्याही हिशेबात जमा व खर्च हे सापेक्ष व परस्परावलंबी असतात, हें दिसून येईल.

**३ करांचें स्वरूप**—सरकारला आपलें उत्पन्न मिळविण्याचे जे अनेक मार्ग आहेत त्यांत प्रजेवर कर लादून वसूल घेणें हाच मार्ग मुख्य होय. मागे राजा म्हणजे आपल्या प्रजाजनांचा व त्यांच्या मालमत्तेचा धनी आणि कर म्हणजे धन्यानें आपल्या सत्तेच्या जोरावर चाकराकडून घेतलेला नजराणा असे समजलें जाई. वैयक्तिक राजसत्तेबरोबरच राजाच्या अमर्याद सत्तेच्या या कल्पनेचा ऱ्हास झाला आहे. हल्ली सरकार ही काही सामाजिक कर्तव्ये पार पाडण्याकरितां अस्तित्वात आलेली संस्था असून तिच्या खर्चाकरितां लोकांकडून त्यांच्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संमतीनें त्यांच्या संपत्तीचा जो भाग घेतला जातो तेच कर होत, असें समजलें जातें. ज्या देशात लोकशाही पूर्णपणें अंमलात आहे तेथील करांस हे वर्णन बरेंचसें लागू पडण्यासारखें आहे. परंतु तेथे देखील लोकांची इच्छा म्हणजे फार तर बहुमतवाल्यांची इच्छा, व तीही अनेक प्रतिनिधी व अनेक संस्था यांच्यामार्फत प्रकट होत असल्यानें तिच्यांत व वास्तविक लोकेच्छेत बरीच तफावत असण्याचा संभव असतो. मग ज्या देशांत लोकशाहीचा मुळीच किंवा पूर्णांशानें विकास झाला नाही तेथील गोष्ट बोलावयासच नको. सामाजिक कर्तव्यें पार पाडण्यास समाजसंस्थेस समाजातील घटकांनी राजीखुषीनें दिलेली देणगी ही कराची मीमांसा सर्वथैव यथार्थ नसून सर्वकाळी व सर्व देशांत थोड्याफार प्रमाणांत राजसत्तेच्या प्रजेकडून वसूल घेण्याच्या सर्वमान्य हक्कामुळेच सरकारी उत्पन्न मिळत आलें आहे, ही गोष्ट नाकबूल करता येणार नाही.

सर्व प्रकारच्या करात दिसून येणारा विशेष गुण म्हणजे ते सक्तीनें वसूल केले जातात, हाच होय. कित्येक लोकांच्या मतें वस्तूंवरील कर हे त्या वस्तू न वापरणारांवर पडत नसल्यानें त्यांच्या बाबतीत सरकारकडून सक्ती होते, असें म्हणतां येणार नाही. परंतु हीच विचारसरणी सर्व प्रकारच्या करांस लावतां येईल. जमीनीची लाग-

वड केली तरच सारा द्यावा लागतो व उद्योग धंद्यांत कमाई झाली तरच प्राप्तीवरील कर भरणें भाग पडतें. यावरून राष्ट्रांतील मनुष्यें आपापल्या मगदुराप्रमाणें कमाई व गरजांप्रमाणें खर्च करीत असतां सरकार सक्तीनें त्यांच्याकडून त्यांच्या संपत्तीचा कांहीं भाग घेतें हें उघड होईल. पूर्वी कित्येक वेळां सरकारच्या विशिष्ट कामगिरीबद्दल विशिष्ट कर बसविण्यांत येत. हल्लीं मात्र सरकारच्या एकंदर जमेंतून एकंदर खर्च भागविला जातो व त्यामुळें सरकारच्या एखाद्या विवक्षित कामगिरीचा ज्यांस लाभ होतो त्यांनींच तिच्याबद्दल कर द्यावा ही पद्धत मागें पडली आहे. नेहमीं आपण ज्यांना कर असें म्हणतो त्यांपैकीं बहुतेकांत अशा विवक्षित कामगिरीचा अभाव असतो. परंतु सरकारी उत्पन्नाच्या कांहीं प्रकारांत अजूनही कामगिरीचें किंवा मालाचें मूल्य हीच कल्पना प्रधान असते. उदाहरणार्थ, सरकारी आगगाड्या, टपाल अगर तारायंत्रें ही घेतलीं तर सरकारच्या विवक्षित कामगिरीबद्दल त्यांस द्यावें लागणारें वेतन म्हणजेच आगगाडीचें किंवा टपालाचें भाडें होय, असें दिसून येईल. सरकारच्या अशा उत्पन्नाला शास्त्रीय परिभाषेंत कर असें न समजतां मालाची किंमत किंवा कामगिरीचें वेतन, हेंच नांव देण्यांत येतें. कित्येक बाबतींत सरकार विवक्षित प्रजाजनांकरितां विवक्षित कामगिरी करीत असतानांच एकंदर समाजहिताचें कार्य म्हणूनही त्या कामगिरीचा विचार करावा लागतो. अशा कामगिरीबद्दल सरकारला मिळणाऱ्या रकमेस शास्त्रीय दृष्ट्या कर असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण विवक्षित कामगिरीबद्दल ती दिलेली असते. शिवाय ती कामगिरी सरकार केवळ विवक्षित प्रजाजनांकरितांच करीत नसल्यानें तिच्याबद्दलचें उत्पन्न हें सर्वस्वी मालाच्या अगर वेतनाच्या स्वरूपाचेंही असत नाहीं. उदाहरणार्थ, खरेदीविक्री, करारनामे इत्यादि दस्तऐवजांची नोंद, न्यायदान, शिक्षण इत्यादिकांबद्दल सरकार फीच्या रूपानें जे पैसे घेतें ते पूर्णपणें वेतन अगर कर आहेत, असें म्हणतां यावयाचें नाहीं. मात्र सरकार मक्तेदारीनें एखादा धंदा करीत असेल तर त्या वस्तूंच्या किमतींत मक्तेदारीच्या अधिकारानें जेवढी भर पडते तेवढा भाग सरकारी करच होय, असें म्हटलें पाहिजे. हिंदुस्थानांत मिठाचें उत्पादन व विक्री सरकार स्वतः करीत असतें किंवा खाजगी उत्पादनावर व विक्रीवर आपलें पूर्ण नियंत्रण ठेवतें. त्यामुळें मिठावरील कर किंमतींत वाढ होऊनच प्रजाजनांस द्यावा लागतो. निव्वळ कर, मालाची किंमत किंवा कामगिरीचें वेतन, अधवट किमतीच्या व अर्धवट कराच्या स्वरूपाच्या फीसारख्या बाबी या सर्व मार्गांनीं सरकारी उत्पन्न वसूल होत असतें. म्हणून करांची व्यापक व्याख्या करावयाची असल्यास सरकारी खर्चाची भरपाई करण्याकरतां खाजगी व्यक्तीच्या संपत्तींतून सक्तीनें जो भाग वसूल केला जातो तो ‘ कर ’ असेंच म्हणावें लागतें.

**४ करग्रहणासंबंधीं निर्बंध**–विवक्षित कार्याकरितां विवक्षित कर किंवा विवक्षित इसमांच्या लाभाकरितां सरकारनें केलेल्या अमुक कामगिरीचें वेतन, हें कराचें निश्चित स्वरूप बदलून सर्व कराच्या उत्पन्नातून एकंदर खर्च भागविण्याची पद्धत पडल्यापासून कर कोणत्या तत्त्वाप्रमाणें लादले असतां ते न्याय्य व उत्पादक ठरतील व कोणत्या पद्धतीनें ते जमा केल्यास सोयीचें पडेल, या प्रश्नास विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. यांपैकीं कांहीं तत्त्वें व्यावहारिक व कांहीं आर्थिक महत्त्वाचीं आहेत. कोणताही कर घेतला तरी त्याचा समाजातील सर्व वर्गांवर व व्यक्तींवर सारखा भार पडावा, हे नीतिशास्त्राच्या व अर्थशास्त्राच्या नियमांस धरूनच आहे. विवक्षित कामगिरीकरितां विवक्षित कर असें म्हटल्यानें कर देणारांत आपोआपच एक प्रकारची समता प्रस्थापित होत असे. कारण प्रत्येक जण सरकाराकडून जेवढी कामगिरी घेई तेवढा त्यास कर द्यावा लागे, पण सार्वजनिक महत्वाच्या एखाद्या कामाकरितां सरकारनें प्रजेवर कर लादल्यास तो सर्व व्यक्तींवर व वर्गांवर शक्य तितका सारखा वाटून दिला जाई. कराच्या भाराची ही समान विभागणी संपत्तीच्या, उत्पन्नाच्या. अगर दुसऱ्या एखाद्या प्रमाणांत करावी याबद्दल मात्र बराच मतभेद असे. प्रसिद्ध उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञ ॲडॅम स्मिथ यानें कराच्या समतेबद्दलचें आपलें मत पुढीलप्रमाणें दिलें आहे:– ‘ राज्यांतील प्रत्येक प्रजाजनानें सरकारच्या योगक्षेमाकरितां शक्य तितकी आपापल्या सामर्थ्याच्या प्रमाणात म्हणजे त्या राज्यातील सुरक्षिततेमुळें त्यास जें उत्पन्न होतें त्या प्रमाणांत, मदत केली पाहिजे. ’

ॲडॅम स्मिथनें करग्रहणासंबंधीं हा नियम घालून दिल्यापासून सुधारलेल्या देशातील आर्थिक परिस्थितीत व अर्थशास्त्रविषयक मतात बराच फरक झाला आहे. तरी समतेच्या तत्त्वाचा साधारण लोकाकडून पुरस्कार केला जात असता या नियमाकडे अनेक वेळां बोट दाखविण्यात येते. समतेचें तत्त्व अमलांत आणताना कोणती पद्धत स्वीकारावी याबद्दल मात्र निरनिराळीं मतें प्रचलित आहेत. ॲडॅम स्मिथच्या नांवावर मोडणारे परंतु व्यवहारात प्रत्येक राजकारणी व अर्थशास्त्रज्ञ मनुष्यास सहज पटणारे दुसरेही कांहीं नियम ध्यानात ठेवण्यासारखे आहेत. कराच्या निश्चितपणाबद्दल पुढील नियम आहे:– “ प्रत्येक इसमानें जो कर द्यावयाचा तो निश्चित असून नेहमी बदलणारा नसावा. कराची रक्कम, ती द्यावयाची वेळ व पद्धत ही कर देणारास व इतर सर्व इसमांस स्पष्ट कळणारी असावी. ” कराची रक्कम व तो देण्याची वेळ आणि पद्धत ही सर्व लोकांस कळली तर त्यात कर देणारांचा बराचसा त्रास चुकून कराची पद्धतही साधी व सुटसुटित होईल, हें खरें. परंतु यापेक्षांही कराच्या निश्चितपणामुळे एक महत्त्वाचा फायदा होतो. तो हा कीं, धंदेवाले व उत्पादक यांस आपणांस नक्की किती कर द्यावा लागेल याची अगाऊ माहिती नसेल तर त्यांच्या धंद्यांत थोडासा अनिश्चितपणा

उत्पन्न होतो; असा धोका असणें हें आर्थिक दृष्ट्या तोट्याचें असून करांचें स्वरूप निश्चित झाल्यास तसा तोटा होणार नाही. उदाहरणार्थ, आयात व निर्गत मालावर जकाती बसवितात त्या त्यांच्या किंमतीच्या प्रमाणावर ठरविल्यास किंमती अनिश्चित असल्यामुळें कराची रक्कमही अनिश्चित होते, व त्या मालाचा धंदा करण्यांत धोका येण्याचा संभव असतो. कर देणारांपासून त्यांना होतां होईल तितक्या सोईस्कर रीतीनें कर वसूल करावे अशा आशयाचा पुढील नियम आहेः—' कर देणारांस ज्या वेळी व ज्या पद्धतीनें कर देणें विशेष सोईचें वाटेल त्यांचेंच सरकारकडून अवलंबन केलें जावें.' हा नियम पाळल्यानें सहज प्रजानुरंजन होऊन कर देणारांस तो चुकविण्याचा मोह कमी झाल्यामुळें सरकारचें निव्वळ उत्पन्न वाढतें. लोकांवर कर लादल्यानें त्यांचें प्रमाणाबाहेर नुकसान होऊ नये व त्यांच्याकडून करांच्या रूपानें जेवढी रक्कम घेतली असेल तेवढी सर्व सरकारच्या आवश्यक खर्चास उपयोगी पडावी ही मितव्ययाची व साधारण व्यवहारज्ञतेची कल्पना पुढील नियमांत आढळून येतेः—' सरकारी खजिन्यास कर देणाराकडून जेवढ्या रकमेची मिळकत होते तेवढ्यापेक्षां जास्त रक्कम त्यांच्याकडून घेतली न जाण्याची, किंवा त्या रकमेपेक्षां अधिक रकमेची कर देणारांची मिळकत न बुडण्याची शक्य तितकी खटपट करावी.' जे कर वसूल करण्यास त्यांच्या उत्पन्नाच्या मानानें विशेष खर्च लागतो त्यांची संख्या शक्य तितकी कमी करावी व ज्या करांमुळें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें संपत्तीच्या उत्पादनास आळा घमण्यासारखा असतो ते कर लादूं नयेत, असा या नियमाचा निष्कर्ष आहे.

अलीकडे सरकारचा खर्च वाढता असल्यानें आपल्या उत्पन्नांतही नवीन कर न बसवितां आपोआप वाढ व्हावी, असें सर्व देशांतील फडनविसांस वाटत असतें. शिवाय, एखाद्या अडचणीच्या वेळीं एकदम खर्च वाढला तर उत्पन्नांतही अल्प अयासानें भर टाकतां येण्याची शक्यता असावी लागते. अशी शक्यता असण्यास कर कांहींसे लवचिक असावे लागतात. म्हणजे एक तर कर देणारांच्या संपत्तींत फेरबदल होतील त्यामानानें ते सरकारास जी रक्कम देतात तीही आपोआप कमी जास्त व्हावी; आणि सरकारला आपलें उत्पन्न वाढवावें अगर कमी करावें असें वाटल्यास कर गोळा करण्यास लागणारा खर्च न वाढवितां व समाजांतील निरनिराळ्या वर्गांवर करांचा जो बोजा असतो त्याचें परस्पर परिमाण विशेषसें न बदलतां, करांचे केवळ दर बदलून ही गोष्ट करतां यावी. प्रत्येक राष्ट्रांतील सरकार आपल्या प्रजाजनांकडून अनेक प्रकारचे कर घेत असतें. त्या सर्वांस स्वतंत्रपणें व समुच्चयरूपानें वरील निरनिराळे निर्बंध लावल्यानें समाजाचें आर्थिक दृष्ट्या नुकसान होण्याचा कमी संभव असतो, ही गोष्ट वास्तविकपणें प्रत्येक धोरणी व कुशल राजकर्त्याच्या ध्यानांत असते. तरी प्रत्येक देशांतील करांची पद्धत ही इतर राष्ट्रीय संस्था-

प्रमाणेंच त्या देशांतील सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीच्या जुळणीत बसविलेली असते, ही गोष्ट विसरतां कामा नये. बहुतेक वेळां शास्त्रीयदृष्ट्या असमर्थनीय परंतु जुना पुराणा कर कायम ठेवणें हे दुसरा एखादा शास्त्रशुद्ध परंतु नवा कर लादण्यापेक्षां अधिक श्रेयस्कर ठरतें. परंतु करांच्या समतेबद्दल वर जो नियम सांगितला त्याचें तात्त्विक स्वरूपच निश्चित नसल्यानें व्यवहारांत तो लागू करण्याची पद्धतही देशकालपरत्वें निराळी असूं शकते. म्हणून करग्रहणासंबंधींच्या या सर्वांत महत्त्वाच्या नियमाचें तात्त्विक व व्यावहारिक दृष्ट्या अधिक विस्तृत विवेचन करणें जरूर आहे.

**५ कर देणाऱ्यांचें सामर्थ्य व करांची समता**—ॲडॅम स्मिथचा करांच्या समतेबद्दलचा संपूर्ण नियम पुढील प्रमाणें आहेः—" राज्यातील प्रजाजनांनी सरकारच्या योगक्षेमाकरितां शक्य तितकी आपापल्या सामर्थ्याच्या प्रमाणांत, म्हणजे त्या राज्यांतील सुरक्षिततेमुळें त्यास जें उत्पन्न मिळतें त्या प्रमाणांत, मदत केली पाहिजे. ज्याप्रमाणें एखाद्या मोठ्या शेतवाडीची सर्कतीनें लागवड करणाऱ्या खंडकऱ्यांस येणारा व्यवस्थेचा खर्च ते आपापसांत त्यांस त्या जमिनीपासून येणाऱ्या उत्पन्नाच्या प्रमाणांत वाटून घेतात, त्यासारखाच एखाद्या मोठा राष्ट्रांतील व्यक्तींचा सरकारी खर्चाशी संबंध असतो. हें तत्त्व पाळल्यास करग्रहणांत समता आहे व न पाळल्यास करग्रहण पद्धति विषम आहे, असें समजावें ". या नियमांतील ' प्रत्येक प्रजाजनानें आपापल्या सामर्थ्याच्या प्रमाणांत मदत करावी' या शब्दांचा अक्षरशः अर्थ करून कित्येक ग्रंथकार करांचें कर देणारांच्या आर्थिक सामर्थ्याशी जें प्रमाण असतें तें सर्व नागरिकांत सारखें असावें, असें सुचवितात. ज्या लोकांचें आर्थिक सामर्थ्य जास्त असते त्यांची कर देण्याची शक्तीही अधिक असते म्हणून त्यांनी कमी संपत्तिमान् व कमी समर्थ लोकांपेक्षां जास्त कर द्यावे, हें सर्वथैव न्याय्य आहे. दोन हजार रुपये उत्पन्न असलेल्या इसमानें एक हजार रुपये उत्पन्न असलेल्या इसमापेक्षां अधिक कर द्यावयाचा तो त्याजवळ अधिक संपत्ति आहे म्हणजे कर देण्यास तो अधिक समर्थ आहे, म्हणून होय. परंतु समतेचें हे स्पष्टीकरण वरवर दिसतें तेवढें सोपें किंवा समाधानकारक नाहीं. कारण कर देण्याची शक्ति संपत्तीच्या वाढीच्या प्रमाणांत वाढते किंवा त्याहून कमीजास्त प्रमाणांत वृद्धिंगत होते हा करांच्या समतेच्या वादासंबंधीं मुख्य प्रश्न तसाच शिल्लक उरतो. संपत्तीच्या परिमाणांतील फेरफारांच्या प्रमाणांतच कर देण्याचें सामर्थ्य कमी जास्त होतें, हें कांहीं जुन्या अर्थशास्त्रज्ञांचें मत आजकाल मान्य केलें जात नाहीं; व कांहीं मर्यादेपर्यंत संपत्तीवर कर न लादणें, वाढत्या संपत्तीवर वाढत्या प्रमाणांत कर घेणें वगैरे करांबद्दलच्या नवीन सुधारणांचाही या म्हणजे करांच्या समतेच्या सिद्धान्तावरून पुरस्कार केला जातो.

मजूरांची मजूरी त्यांच्या निकृष्ट राहणीस लागणाऱ्या खर्चाइतकी असते, हें उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांचें पूर्वीचें मत मागें नमूद केलें आहे. या मताप्रमाणें

वस्तुस्थिति असल्यास मजूरांना कर देण्याचें मुळीच सामर्थ्य नसून त्यांवर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष मार्गानें कर लादले तर त्याची वास्तविक मजूरी कमी होऊन, मजूराची संख्या मर्यादित होईल; व मजूरीत पुन्हा वाढ होऊन तो कर श्रीमंत व कर देण्यास समर्थ अशा मालकांसच द्यावा लागेल. ह्याच जुन्या मताचें नवीन सर्वसंमत आर्थिक परिभाषेत रूपांतर करून असें म्हणतां येईल की, किमान राहणी-तूनही कांही आवश्यक जिन्नस कराच्या स्वरूपानें घेतल्यास मजूर वर्ग कमी कार्यक्षम होत जाऊन एकंदर समाजाच्या उत्पादक शक्तीस ओहोटी लागते. कर देण्याचें एकंदर समाजाचे सामर्थ्य वृद्धिंगत करावयाचें असेल तर ज्याची राहणी निकृष्ट प्रतीची आहे त्यांना कर देण्याचें मुळीच सामर्थ्य नसल्यानें, त्यांस करापासून मुक्त करावयास पाहिजे. हीच विचारसरणी संपत्तीच्या उत्पादनाच्या सर्व घटकांस लागू असून, जो कर बसविल्यानें कर देणाराचें उत्पादक सामर्थ्य कमी होऊन एकंदर समाजाच्या संपत्तीत तुटवडा पडेल तो कर बसविणें राष्ट्रांस व सरकारांस आत्म-घातकीपणाचें आहे, असें सिद्ध करतां येईल. संपत्तीच्या किंवा मिळकतीच्या वाढीच्या प्रमाणापेक्षां जास्त प्रमाणांत करांचे दर वाढवावे या मतासही, कर देणा-रांच्या सामर्थ्यानुसार कर बसवावे असें म्हणणाऱ्या कित्येक अर्थशास्त्रज्ञांचा दुजोरा आहे. कारण भांडवलाचा पुरवठा ज्या प्रमाणांत वाढतो त्यापेक्षां अधिक प्रमाणांत त्याच्या साहाय्यानें अर्थोत्पादन करण्याची शक्यता, किंवा त्या भांडवलाचें उत्पादक सामर्थ्य, ही वृद्धिंगत होतात, असें त्यांचें म्हणणें असतें. लोकांनीं आपापाल्या शक्त्यनुसार कर द्यावे असें म्हणणारे दुसरे कांही लोक वाढत्या प्रमाणांत कर लादण्याची पद्धत हानिकारक आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या मतें एक तर कर देण्याचें सामर्थ्य संपत्तीच्या वाढीच्या प्रमाणापेक्षा जास्त प्रमाणांत वाढतें असें म्हटलें तरी हें जास्त प्रमाण किती असतें तें नक्की न ठरवितां येऊन, प्रमाणा-बाहेर कर लादले गेल्यानें कर देणाराचें उत्पादक सामर्थ्य कमी होण्याचा संभव असतो. वाढत्या प्रमाणाच्या करपद्धतींतील हा दोष बहुंशी खरा असून कराचें उत्पन्नाशीं असलेलें प्रमाण विशेष चढीचें ठवल्यानें आर्थिक दृष्ट्या नुकसान होण्याचा संभव आहे, हें निर्विवाद आहे. दुसरा एक मुद्दा असा आहे की, असे वाढते कर उत्पन्नावर लाद-ल्यानें भांडवलाचा पुरवठा करण्यास पुरेसें उत्तेजन न राहून भांडवलाच्या तुटवड्यामुळें राष्ट्राचें व सरकारचें उत्पन्न कमी होत जाईल. परंतु हे दोन्ही दोष उत्पन्नावरील सर्व प्रकारच्या करांत दिसून येत असून वाढत्या दरांचें नियमित प्रमाणांत अवलंबन केल्यानें ते बरेचसे टाळतां येतील.

सामर्थ्याप्रमाणें कर द्यावा या तत्वाचा ज्या पद्धतींत अंतर्भाव केलेला असतो त्या पद्धतींत समाजाच्या उत्पादक सामर्थ्यास धक्का लागू न देण्यावर विशेष कटाक्ष असतो. मागें शेतजमीनीचा खंड, शहरांतील भुईभाडें, निव्वळ नफा इत्यादि प्रकारची

उत्पन्नें कांहीही श्रम न करतां मिळत असतात असें सांगितलें आहे. त्याच्यावर कितीही कर लादला तरी आर्थिक दृष्ट्या समाजाचें मुळीच नुकसान होणार नाही. परतु ही 'अनार्जित' किंवा श्रम न करता मिळविलेली कमाई इतर 'अर्जित' म्हणजे श्रम करून मिळविलेल्या उत्पन्नाबरोबरच मिळत असल्यानें त्याच्यांतील निरनिराळे भाग ठरवून त्याच्यावर निरनिराळ्या दराने कर लादणे दुरापास्त होतें. ज्या मानानें प्रजाजनांस राजसत्तेपासून लाभ होत असेल त्या मानानें त्यांनी कर द्यावे या तत्त्वातच करांसंबंधी सर्व आर्थिक व नैतिक ज्ञान साठविलेलें आहे, असें कांही भोळसर लोक समजतात. परंतु लाभ या शब्दाचा लौकिक अर्थ घेतला तर गरीब लोकांसच सरकारच्या संरक्षणाची व साहाय्याची विशेष जरूर असल्याने त्याच्याकडून श्रीमंत व सबल नागरिकांपेक्षा अधिक कर घेण्याचा अनवस्थाप्रसंग प्राप्त होईल. उलट, देशांतील आर्थिक व सामाजिक घटनेचा सर्वस्वी पुरस्कार करणें हीच सरकारची कामगिरी होय, असें म्हटल्यास बहुतेक सर्व प्रकारच्या धंदेवाल्याच्या उत्पन्नांत सरकार हक्काची वांटणी मागूं शकेल. शिवाय हल्ली सरकारचे उत्पन्न व खर्च वाढत असल्याने आणि सरकारी कार्याचा व्याप्तीह दिवसानुदिवस विस्तृत होत असल्यानें कोणतें सरकारी काम कोणत्या व्यक्तीस लाभप्रद आहे, हे सागणे अशक्य असतें. जेथें विवक्षित व्यक्तीकरितां सरकार कांही कार्य करतें तेथें किंमतीच्या अगर फीच्या रूपानें सरकार पैसे वसूल करते, हे मागें सांगितलेंच आहे. ॲडम स्मिथनें घालून दिलेल्या समतेच्या नियमांतील 'राज्यांतील सुरक्षिततेमुळे प्रजाजनास मिळणाऱ्या उत्पन्नाच्या प्रमाणांत त्यांनी कर द्यावे' या भागाचा आधार घेऊन दुसरे कांही ग्रथकर्ते असें सुचवितात की, कर बसवितांना निरनिराळ्या वर्गांतील संपत्तीची विषम विभागणी दूर करण्याकडे लक्ष देणे हे सरकारचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. व्यवहारचतुर मुत्सद्यांस मऊ जमीनीतच शक्य तितके खोल खणत जाण्याची कला पूर्णपणें अवगत असल्यामुळें संपत्तीच्या विषम विभागणीचा हा विचार त्याच्या मनास शिवतच नाही, असें म्हणतां येत नाही; निदान ज्या राष्ट्रांतील गरीब वर्गास पूर्ण राजकीय हक्क दिलेले असतात व ज्यांस सार्वजनिक चळवळ करण्याची संवय लागलेली असते, तेथील श्रीमंत लोकांच्या संपत्तीचा बराचसा भाग अप्रत्यक्षपणें गरीबांच्या गरजा भागविण्यास उपलब्ध करून देण्याचें काम सरकारी कर व खर्च याच्याद्वारें केलें जातें. परंतु 'भांडवलशाही विरुद्ध समाजसत्ता' हा झगडा उघडपणे लढविण्याचा सरळ मार्ग सोडून वरील सर्व नियमांनी त्याज्य ठरणारे कर श्रीमंतांवर लादण्याच्या आड मार्गानें जाण्याचा प्रयत्न केल्यास समाजात गोंधळ उडून जाऊन शेवटी आर्थिक दृष्ट्या राष्ट्राचें नुकसानच होईल ह्यांत शंका नाही.

६ **त्यागाची समता**–समता म्हणजे करांच्या रकमेचा सारखेपणा नसून करांचें कर देणारांच्या आर्थिक सामर्थ्याशी जें प्रमाण असतें त्या प्रमाणाचा सारखेपणा होय,

व आर्थिक सामर्थ्य प्रत्येक इसमाच्या उत्पन्नावरूनच अजमावलें पाहिजे हा अॅडॅम स्मिथच्या मूळ नियमाचा सरळ व स्पष्ट अर्थ आहे. परंतु अर्थशास्त्रविषयक सिद्धांतांची स्मिथच्या वेळेपासून बरीच प्रगती झाली असून समाजसत्तावाद्यांनी संपत्तीच्या विषम विभागणीवर आपल्या टीकेचा भर दिल्यामुळें करांच्या समतेबद्दलच्या कल्पनाही बऱ्याच बदललेल्या आहेत. तरी बहुतेक इंग्रज ग्रंथकार व मुत्सद्दी करांबद्दलचें सर्व ज्ञान स्मिथच्या नियमांतच सांठविलेलें आहे असें समजून नवीन मतें व सुधारणा यांचें जुन्या नियमांवरूनच समर्थन करूं पाहतात. कराच्या रकमेचें सामर्थ्याशीं म्हणजे उत्पन्नांशीं असणारें प्रमाण सारखें असावें, हा साधा अर्थ स्वीकारल्यास करांचें उत्पान्नांशीं वर्धमान प्रमाण, किमान उत्पन्नाची करापासून पूर्ण मुक्तता, निरनिराळ्या प्रकारच्या उत्पन्नाचें करांशीं निरनिराळें प्रमाण इत्यादि सुधारणा न्याय्य ठरत नाहींत. म्हणून सामर्थ्य या शब्दाचा उत्पन्न हा वस्तुविषयक अर्थ बदलून करदानांतील अंगीभूत त्याग किंवा कर देऊन टाकतांना करदांची होणारी गैरसोय व त्यांच्या मनांस होणारें दुःख असा अर्थ केला जातो. मागील उदाहरणांतील एक हजार रुपये उत्पन्न असलेल्या इसमापेक्षां दोन हजार रुपये उत्पन्न असणारानें दुप्पट कर दिला तरी त्या दोघांनीं आपणांस सारख्याच महत्त्वाच्या वाटणाऱ्या वस्तूंचा त्याग केला, असें व्हावयाचें नाहीं. कारण उपलब्ध वस्तूंचा सांठा जसजसा वाढतो तसतशी त्यापैकीं प्रत्येक वस्तूची उपयुक्तता कमी होत जाते. हजारांपैकी एका वस्तूची मालकाला जेवढी उपयुक्तता वाटते तितकी दोन हजारांपैकीं एका वस्तूची वाटत नाहीं. म्हणून पहिल्याकडून पन्नास वस्तू घेतल्या व दुसऱ्याकडून शंभर घेतल्या तरी एकंदर वस्तूंच्या मानानें पहिल्यानें जास्त उपयुक्त वस्तू व दुसऱ्यानें कमी उपयुक्त वस्तू कर म्हणून दिल्या, असें होईल. एवढ्याकरितां कर दिल्यानें कर देणारास जो त्याग करावा लागतो, किंवा त्याच्या भोगेच्छु मनावर जो दुःखकारक परिणाम होतो, तो शक्य तितका सारखा करावा असें सुचविलें जातें. ही सूचना पूर्णपणें अंमलांत आणावयाची असें म्हटल्यास आजच अव्वल विश्वकुटुंबी स्वरूपाचा समाजसत्तावाद स्थापन होईल. कारण त्यागाचे किंवा मानसिक दुःखाचे परिणाम ठरवितांना कराच्या रकमेबरोबरच ती रक्कम देऊन राहिलेल्या शिलकेचाही विचार करावा लागेल. दोन हजार रुपये उत्पन्न असलेल्या इसमानें एक हजार रुपये उत्पन्न असलेल्या इसमापेक्षां कितीही जास्त कर दिला तरी जोंपर्यंत त्या दोघांच्या संपत्तीत विषमता आहे तोंपर्यंत त्यांच्यावर कर दिल्यानें होणाऱ्या परिणामांची कधींही समता होऊं शकणार नाहीं. अशी समता घडवून आणावयाची म्हणजे कर घेतल्यानंतर सर्व करदांची संपत्ति सारखी राहील अशी व्यवस्था केली पाहिजे. त्यागाची समता या पद्धतीनें अंमलांत आणावी असें म्हणण्यास अर्थातच कोणीही, कट्टर समाजसत्तावादी नसलेला,

इसम तयार नसतो. म्हणून कांहीं विवक्षित प्रकारच्या सुधारणाचा मात्र या तत्त्वानुसार पुरस्कार केला जातो. केवळ एखाद्या इसमाजवळ अमुक इतकी संपत्ति आहे म्हणून त्यानें अमुक इतका कर द्यावा ह्या पद्धतीपेक्षां प्रत्येक मनुष्याला त्याच्या मरुद्दर्शनीं दिसणाऱ्या संपत्तिपासून वास्तविक उपभोग किती घेतां येतो व त्याच्यावर लादलेले कर देऊन टाकतांना संपत्तीच्या वियोगाचें त्यास कितपत दुःख होतें हें पाहून कर व त्यांचे दर ठरविण्याची ही पद्धत अधिक न्याय्य व शास्त्रशुद्ध आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या ध्यानात आले असेलच.

**७ करग्रहणपद्धतींतील विशिष्ट सुधारणा**—मागें उपयुक्त वस्तूंत कांहीं आवश्यक, कांहीं चैनीच्या व कांहीं सामाजिक आवश्यकतेच्या असतात म्हणून सांगितलें आहे. आवश्यक वस्तू, म्हणजे मनुष्यांच्या जीवितरक्षणास व त्यांना उत्पादनास कार्यक्षम करण्यास ज्या वस्तू अगदीं जरूर असतात त्या होत. त्यांच्यांतील लहानसा भाग कमी झाल्यानेंही मनुष्याचें जीवितरक्षण अशक्य होऊन जाईल. ज्याची मिळकत आवश्यक गरजा भागविण्यापुरती किंवा त्याहून कमी आहे त्यानें कितीही लहान कर दिला तरी त्याचा त्याग अपरिमित होय. ज्यांस आपल्या मिळकतींतून सामाजिक आवश्यकतेच्या किंवा चैनीच्या वस्तू विकत घेतां येतात त्याची गोष्ट निराळी. त्यांनीं कितीही कर दिला तरी जोंपर्यंत त्यांची कमाई आवश्यक वस्तूंच्या किमान मर्यादेपेक्षां अधिक आहे तोंपर्यंत त्यांच्या त्यागाची व आवश्यक वस्तूंतून कर देणारांच्या त्यागाची तुलनाही होऊं शकणार नाहीं. एवढ्याकरितां कोणत्याही देशांत राहणीचें जें निकृष्ठ मान समजलें जातें त्यास लागणाऱ्या खर्चाइतकें किंवा त्याहून कमी असें ज्याचें उत्पन्न आहे त्यांवर कर बसवितां कामा नये असें वारंवार सुचविण्यांत येतें. करांची समता म्हणजे करदांच्या त्यागाची समता या तत्वावरून हा निष्कर्ष सहजच निघतो व त्यांत आर्थिक दृष्ट्या तथ्यही बरेंच आहे. परंतू आवश्यक वस्तू व चैनीच्या वस्तू यांच्यांतील फरक स्पष्ट किंवा कायम टिकणारे नसून राहणीचें निकृष्ठ मान नेहमीं बदलत असतें. शिवाय कित्येक गरीब लोक आवश्यक वस्तूंचा अव्हेर करून अनेक वेळां चैनीच्या वस्तू वापरतात, असाही आपला अनुभव आहे. त्यामुळें निकृष्ट राहणीस लागणाऱ्या उत्पन्नांपेक्षां ज्यांचें उत्पन्न अधिक नाहीं त्यांवर कर बसवूं नयेत हे कबूल केलें तरी व्यवहारांत ही किमान मर्यादा ठरविणें अशक्य असतें. शिवाय, सरकारला आपला खर्च भागविण्यापुरते पैसे करांच्या द्वारा मिळवावयाचे असल्यानें कर देणारांच्या त्यागाची पूर्णपणें समता ठेवण्याचें सूक्ष्म कार्य त्याजकडून होत नाहीं.

उपयुक्त वस्तूंचा एकंदर सांठा वाढून त्यांची उपयुक्तता कमी झाल्यानें करदांच्या त्यागांत जी विषमता उत्पन्न होते म्हणून वर सांगितलें त्यांतही व्यावहारिक महत्त्वाच्या दृष्टीनें हाच कमीपणा आहे. मिळकत जसजशी अधिक होत जाते तसतसें करांचें

उत्पन्नाशी असलेलें प्रमाण निश्चळ गणित दृष्ट्या कायम ठेवलें तरी आर्थिक दृष्ट्या तें कमी कमीच होत असतें. कमी जास्त कमाई असलेल्या इसमांस सारख्याच उपयुक्त वाटणाऱ्या वस्तूचा कर म्हणून त्याग करण्यास भाग पाडावयाचें असेल तर करांचें मिळकतीशी असलेलें प्रमाणही वाढतें ठेवलें पाहिजे. म्हणजे एक हजार रुपये उत्पन्नाच्या इसमानें शेंकडा पांच रुपये कर दिला तर दोन हजार रुपयेवाल्यास शेंकडा पांचाहून जास्त कर द्यावा लागणें जरूर आहे. परंतु हा तात्त्विक विचार व्यवहार्यतेच्या मर्यादेंत येण्यास अनेक अडचणी आहेत. एक तर त्याग व उपयुक्तता ह्या दोन्ही मानसिक भावना असून त्याची तीव्रता निरनिराळ्या व्यक्तींत भिन्न असते व करांच्या रकमेशिवाय इतरही अनेक गोष्टींवर ती अवलंबून असते. संपत्तीच्या वाढीबरोबर उपयुक्तता व त्याग ही किती कमी होतात याचें वस्तूंच्या अगर पैशाच्या रूपात माप ठरवितां येत नसल्यानें प्रमाणवाढीचेंही सर्वकाळीं सर्व व्यक्तींस अचूक लागू पडणारें कोष्टक बनवितां येत नाही. असें असलें तरी त्यागाची समता राखण्याची ठोकळ मानानें खटपट करतांना वाढत्या प्रमाणाचे कर लादणें हें कामचलाऊ साधन उपयोगी पडण्याजोगें आहे यांत शंका नाही. या साधनांचा प्रमाणाबाहेर उपयोग केल्यास राष्ट्राच्या उत्पादक शक्तीस ओहोटी लागण्याचा संभव असतो हें मागें सांगितलेंच आहे.

कांही विवक्षित प्रकारांच्या मिळकतींतून कर देण्यात, इतर प्रकारांतून कर देण्यापेक्षां कमी त्याग किंवा अडचण करदांस सोसावी लागते म्हणून त्यांवर जास्त प्रमाणांत कर लादावा असेंही सुचविण्यांत येते. उदाहरणार्थ, जमीनीपासून कायम खंडाच्या रूपानें येणाऱ्या ठराविक उत्पन्नाला किंवा कायमच्या सरकारी कर्जरोख्यापासून ठराविक व्याजाच्या रूपानें मिळणाऱ्या कमाईला एखाद्या धंद्यापासून येणाऱ्या उत्पन्नाहून जास्त शाश्वती असल्यानें ते उत्पन्न मिळणाऱ्यांस पुढील बेगमी करण्याची काळजी नसते. त्यामुळें जमीनदाराच्या किंवा कायम सरकारी कर्जरोख्याच्या मालकाच्या उत्पन्नांतन रोजगारदारांच्या उत्पन्नापेक्षा जास्त प्रमाणांत कर घेतला असतां दोन्ही प्रकारच्या उत्पन्नदारांस सारख्याच प्रमाणात त्याग करावा लागला असें होईल. ही पद्धत सरसहा चालू झाली असतां उत्पादनाच्या व खर्चाच्या अनेक बाबतींत कराच्या दरांतील फरकांमुळें फेरबदल होत राहतील. ही गोष्ट सरकार व लोक या दोघांसही इष्ट वाटत नसल्यानें उत्पन्नाच्या प्रकारावरून त्याच्याशीं कराचें प्रमाण ठरविण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला जात नाही. कांही विवक्षित बाबतींत मात्र या तत्वाचें मर्यादित स्वरूपात अवलंबन केलें जातें. उदाहरणार्थ, अनेक देशांत उत्पन्नापैकीं जो भाग विमा कंपन्यांस वर्गणी म्हणून दिला जातो त्यावर कर घेत नाहीत. पुढें येणाऱ्या अडचणांकरितां किंवा गरजांकरितां बेगमी करण्याचा विमा उतरणें हा एकच मार्ग नसून पैसे व्याजीं लावणें, मालमत्ता

विकत घेणें, स्वतःचें व मुलाबाळाचें उत्पादक सामर्थ्य वाढविणें वगैरे इतर मार्गही आहेत. बहुतेक सर्व राष्ट्रांतील मध्यम व गरीब वर्गास पुढील बेगमी करण्याचा विमा उतरणें हाच स्वस्त व सोयीचा मार्ग असल्यानें त्यांच्यांत विमा उतरण्याच्या संबंधीचा जेवढा फैलाव होईल तेवढा एकंदर समाजहिताच्या दृष्टीनें इष्ट आहे. म्हणून विम्यावरील कर माफ करण्याची ही पद्धत कदाचित् समर्थनीय ठरेल. परंतु तात्त्विक दृष्ट्या विम्याच्या पैशावरील कर तेवढे माफ करणें म्हणजे लोकांस बेगमी करण्याच्या इतर मार्गापासून परावृत्त करून त्यांस विमा उतरण्यास उत्तेजन देणेंच होय. निरनिराळ्या प्रकारच्या उत्पन्नांवर निरनिराळे कर बसवून लोकांच्या आर्थिक व्यवहारात सरकारनें अशी ढवळाढवळ करणें इष्ट नसल्यानें सर्व प्रकारच्या मिळकतीवर व खर्चावर सारखेच कर ठेवावे, असें दुसऱ्या कांहीं जणांचें म्हणणें आहे. कित्येक देशांत ज्या इसमाचें कुटुंब जास्त मोठें आहे, त्यास लहान कुटुंब असलेल्या किंवा अविवाहित इसमापेक्षां कमी कर द्यावा लागतो तोही बहुंशी करग्रहणपद्धतींत त्यागाच्या समतेच्या तत्त्वाचें अवलंबन केल्याचाच परिणाम होय.

**८ करांचे प्रकार**—सर्व करांचें निरनिराळ्या तत्वानुसार वर्गीकरण केल्यानें त्याच्यांतील मुख्य प्रकार व त्यांचें गुणविशेष योग्यपणें कळण्यास मदत होते. खुद्द ॲडम स्मिथ यानें सर्व कर शेवटी उत्पन्नांतून दिले जातात, असें गृहीत धरून करांचें ते ज्या प्रकारच्या उत्पन्नांतून दिले जातात त्यांवरून वर्गीकरण केलें आहे. खंड, नफा व मजूरी हे उत्पन्न मिळण्याचे तीनच मार्ग आहेत, असें तो समजत असे. हल्लीं आपण ज्यांस व्याज व नफा असें म्हणतों तीं दोन्ही प्रकारचीं उत्पन्नें स्मिथ-च्यावेळी नफा या एकाच नांवानें संबोधिलीं जात, व त्यामुळें खंडावरील, नफ्यावरील व मजूरीवरील कर, असेंच तें वर्गीकरण असे. कराचा बोजा कोणत्या प्रकारच्या उत्पन्नावर पडतो, हें ठरवितां आल्यास करांचा संपत्तीच्या उत्पादनावर व विभाग-णीवर होणारा परिणाम नीट आजमावतां येईल, या दृष्टीनें स्मिथनें केलेलें हें वर्गी-करण महत्वाचें आहे यांत शंका नाहीं. परंतु मागील प्रकरणात निर्दिष्ट केल्याप्रमाणें उत्पन्नाच्या निरनिराळ्या प्रकारांतील फरक स्पष्टपणें ठरविणें अनेक बाबतींत अशक्य असतें. कित्येक कर तर सकृद्दर्शनी ते ज्या मनुष्यांवर लादलेले असतात त्यांज-वर न पडतां दुसऱ्या कोणा तरी इसमास आपल्या उत्पन्नांतून द्यावे लागतात, व वास्तविक ते कर कोणी व किती प्रमाणांत दिले हे ठरविणें कठीण होतें. शिवाय, वारशानें मिळावयाच्या संपत्तीवरील कर किंवा भांडवलाचाच कांहीं भाग एकदम घेण्याच्या इराद्यानें लादलेले कर हे कोणत्याही प्रकारच्या उत्पन्नांतून प्रत्यक्ष दिले न जातां मूळ भांडवलांतून किंवा संपत्तीतूनच दिले जातात. अनेक वर्गांचे लोक ज्या उपयुक्त वस्तूंचा उपभोग घेतात त्यांवर लादलेले करही कोणत्या प्रकारच्या उत्पन्नांतून दिले जातात, हें सांगतां यावयाचें नाहीं.

कर देणाराच्या उत्पन्नाचें हे तत्त्व सोडून देऊन प्रत्यक्ष कर व अप्रत्यक्ष कर असें दुसरें एक वर्गीकरण अर्थशास्त्रज्ञ करीत असतात. जे कर ज्या इसमांकडून ते उघडपणें घेण्यांत येतात त्यासच सहन करावे लागतात त्यांस प्रत्यक्ष कर असें म्हणतात. या प्रकारच्या करांत प्राप्तीवरील कर व वारशाच्या संपत्तीवरील कर हे प्रमुख होत. जे कर ते पहिल्यानें ज्या इसमाकडून घेतले जातात त्यांस स्वतःस द्यावे न लागतां दुसऱ्या कोणास तरी सहन करावे लागतात त्या करांस अप्रत्यक्ष कर असें म्हणतात. परराष्ट्रीय व अंतर्गत व्यापारावर ज्या निरनिराळ्या जकाती बसविलेल्या असतात त्या अप्रत्यक्ष करांचें उदाहरण होत. हें वर्गीकरण उत्पन्नावरून केलेल्या वर्गीकरणापेक्षां अधिक स्पष्ट व समाधानकारक आहे, हें खरें. परंतु कित्येक वेळां एखादा कर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष आहे, हे सागणें कठीण असते. उदाहरणार्थ, समाईक भांडवलाच्या मंडळ्यांकडून, पेढ्यांकडून, जागेच्या भाडेकऱ्यांकडून किंवा मजूरांच्या मालकांकडून जे कर घेतले जातात ते त्यांना स्वतः द्यावे लागतात किंवा अनुक्रमें भागीदार, कुळें, जागेचे मालक व मजूर यास सहन करावे लागतात, हें नक्की ठरवितां येत नाही. शिवाय, सरकारची तशी इच्छा किंवा अपेक्षा नसतांनाही वास्तविक व्यवहारांत ‘ प्रत्यक्ष ’ कर दुसऱ्यावर ढकलला जाण्याचा व ‘ अप्रत्यक्ष ’ कर ज्याजवळून पहिल्याप्रथम तो घेतला त्यावरच पडण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ, एखाद्या धंद्यातील कामकऱ्यांच्या मिळकतीवर कर बसविला आणि त्या कामकऱ्यांचा पुरवठा मर्यादित असला तर ते मालकांना आपल्या मजूरीत वाढ करण्यास भाग पाडून करांचा भार सर्वस्वी अगर अंशतः मालकाच्या कमाईवर टाकतील. एखाद्या वस्तूच्या व्यापाऱ्यांवर कर बसवितांना ते त्यांना आपल्या गिऱ्हाइकांकडून जास्त किंमतीच्या रूपानें वसूल करून घेतां येतील अशी सरकारची अपेक्षा असली तरी देखील जर त्या वस्तूस असलेली मागणी पुरवठ्याच्या मानानें मर्यादित असेल तर तो कर व्यापाऱ्यांस अगर उत्पादकांसच सहन करावा लागेल. कराचा भार शेवटी कोणावर व किती प्रमाणांत पडतो, हे ठरवितां आल्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांचें हे वर्गीकरण बरेच उपयुक्त ठरल यांत शंका नाही.

करांचा निरनिराळ्या दृष्टीनें विचार करीत असतां त्यांचे कमी महत्त्वाचे कांही इतर प्रकारही दाखविण्यांत येतात. उदाहरणार्थ, कांही करांची प्रत्येक करदानें द्यावयाची रक्कम ठरविलेली असते तर कांही करांचा उत्पन्नांच्या अगर संपत्तीच्या मानानें दर ठरविलेला असतो, व त्यांची रक्कम प्रत्येक करदाच्या आर्थिक स्थितींतील फरकाबरोबर बदलत जाते. पहिल्या प्रकारास विभक्त व दुसऱ्यास अविभक्त किंवा प्रमाणबद्ध कर, असें म्हणतात. ठराविक घरपट्टी किंवा आपल्या देशांतील निरनिराळ्या प्रांतांत खेडेगांवांतील पोलीसबंदोबस्त राखण्याकरितां जमीनीच्या मालकांकडून व गांवांतील इतर लोकांकडून बलुत्याच्या स्वरूपानें जे कर वसूल केले जात ते विभक्त कर व

प्राप्तीवरील किंवा पदार्थांच्या किमतीवरून त्यांवर बसविलेले कर हे प्रमाणबद्ध कर होते. करांचें दुसरें एक वर्गीकरण वास्तविक व वैयक्तिक कर असें आहे. जे कर विवक्षित व्यक्तीवर लादलेले असून ते देणाऱ्यांच्या सामर्थ्याचा ते बसवितांना विचार केलेला नसतो ते वास्तविक कर होत. मालाच्या वजनाच्या अगर आकाराच्या प्रमाणांत त्यावर कर बसविले किंवा गाडी–घोडा इत्यादि चैनीच्या वस्तू वापरण्याबद्दल कर घेतले तर ते वास्तविक कर असें म्हटलें पाहिजे. परंतु जे कर कर देणारांचें उत्पन्न, संपत्ती किंवा त्यांच्या आर्थिक सामर्थ्याचें दुसरें एखादें गमक ध्यानांत घेऊन त्यांजवर व्यक्तिशः बसविलेले असतात, ते वैयक्तिक कर होत. प्राप्तीवरील कर हे ह्या प्रकारच्या करांचेंच प्रमुख उदाहरण आहेत. हें वर्गीकरण विशेषसें समाधानकारक आहे, असें नाही. कारण सर्व कर मनुष्यांस द्यावे लागत असून वेठ बिगारीची पद्धत बंद झाल्यापासून, ते वस्तूंच्या सांठ्यांतूनच शेवटीं दिले जातात. वैयक्तिक व वास्तविक हे प्रकार कांहींसे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष या प्रकारांसारखे दिसत असले तरी त्यांच्या तात्त्विक व व्यावहारिक स्वरूपांत बराच फरक असतो. वस्तूंच्या उपभोक्त्याकडून घेतलेले कर प्रत्यक्ष असले तरी ते वैयक्तिक नसून वास्तविक असतात. करांचें आर्थिक स्वरूप नीट ध्यानांत येऊन त्यांचे समाजांतील संपत्तीचें उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग यावर काय काय परिणाम होतात तें ठर-विण्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष करांचें वर्गीकरणच अधिक महत्त्वाचें आहे. विशेषतः, कोणताही कर घेतला तरी त्याचा बोजा शेवटीं कोणत्या व्यक्तीवर पडतो व त्यामुळें त्याच्या आर्थिक परिस्थितींत काय फेरबदल घडून येतो, हे ठरविणें जरूर असतें.

**९ करांचा भार** —सरकार आपल्या प्रजाजनांकडून कर घेत असतां व या करापासून उत्पन्न झालेल्या वसुलांतून निरनिराळ्या प्रकारचीं लोकोपयोगी कामें करीत असतां संपत्तीच्या विभागणींत आपोआपच फरक घडून येतो. ज्या व्यक्तीवर किंवा वर्गावर करांचा बोजा विशेष असेल त्याचें निव्वळ उत्पन्न ठरवि-तांना त्यास कर म्हणून द्यावी लागणारी रक्कम वजा करावी लागते. उलट, सरकार आपल्या खर्चानें कांहीं उपयुक्त वस्तू किंवा कामगिऱ्या विवक्षित व्यक्तीस किंवा वर्गास उपलब्ध करून देत असेल तर त्यांच्या स्वतःच्या कमाईत या सुख-सोयींची भर घालूनच त्यांची वास्तविक मिळकत ठरविली पाहिजे. मिळकतीचा व उत्पादक सामर्थ्याचा, विभागणीचा व उत्पादनाचा, अन्योन्यसंबंध अत्यंत निकट असल्यानें करांचा बोजा कोणकोणत्या व्यक्तींच्या व वर्गांच्या उत्पन्नांवर कसकशा प्रमाणांत पडतो हें ठरविणें एकंदर समाजाची आर्थिक स्थिति अजमा-वण्यास अवश्य असतें. शिवाय, कित्येक वेळां सरकारनें विवक्षित व्यक्तींवर किंवा वस्तूंवर कर बसविले तर कांहीं कांहीं लोकांचा सहजच फायदा होतो. ज्याप्रमाणें कराचा बोजा वास्तविक कोणाच्या संपत्तीवर पडतो हें ठरविणें इष्ट असतें त्याचप्रमाणें

कर बसविल्यानें होणारे हितकर परिणामही कोणांस उपभोगण्यास सांपडतात याचा विचार करावा लागतो. उदाहरणार्थ, केवळ आपला वसूल वाढविण्याकरितां सरकारने आयात मालावर जकात बसविली तर त्या मालाच्या किंमती वाढून गिऱ्हाइकांचें नुकसान व स्वदेशी उत्पादकाचा नफा होण्याचा संभव असतो.

प्रत्यक्ष कर हे ज्या व्यक्तींवर ते वास्तविक पडावे अशी सरकारची इच्छा असते त्यावरच लादलेले असतात, हें तात्त्विक दृष्ट्या खरें आहे. परंतु आर्थिक घडामोडींचा व देवघेवींचा सरकारला बिनचूक अंदाज करतां येणें शक्य नसतें, आणि वरवर पहाणारांस 'प्रत्यक्ष' वाटणारे करही पहिल्याप्रथम कर देणारा अप्रत्यक्षपणें इतरांवर ढकलूं शकतो. उदाहरणार्थ, घराच्या मालकावर लादलेला कर याच अदृष्ट प्रकारानें भाडेकऱ्यावर, किंवा भाडेकऱ्यावर लादलेला कर घराच्या मालकावर, जास्त किंवा कमी भाड्याच्या स्वरूपानें पडण्याचा संभव असतो. 'अप्रत्यक्ष' करांची तर गोष्टच बोलावयास नको. कारण ते पहिल्याप्रथम कर देणाराला दुसऱ्या कोणाकडून तरी वसूल करतां येतील अशीच सरकारची अपेक्षा असते. परंतु या प्रकारच्या करांतही कित्येक वेळां आधीं नजरेस न आलेल्या अनेक कारणांनीं मूळ कर देणारांसच अप्रत्यक्ष कर सहन करावे लागतात; व कधी कधी ज्या इसमावर मूळ करदानें आपला बोजा ढकलावा अशी सरकारची अपेक्षा असते त्याजवर वास्तविकपणें भार टाकला न जातां दुसऱ्या एखाद्या मनुष्यावरच तो पडतो. आयात मालावर बसविलेल्या जकातीचेंच पुन्हां उदाहरण घेतल्यास, सरकारी अपेक्षा कर स्वदेशांतील उपभोक्त्यावर पडावे अशी असतां ते विशिष्ट परिस्थितीत परदेशी व्यापाऱ्यासच सहन करावे लागण्याचा किंवा स्वदेशांतील व्यापाऱ्यास द्यावे लागण्याचा संभव असतो, असें आपणांस दिसून येइल. प्रत्येक वस्तु व कामगिरी यांस असलेली मागणी व त्यांचा पुरवठा याची जी परिस्थिती असेल, व पूर्ण स्पर्धेनें व चलनशीलतेनें अनेक प्रकारचा विनिमय होण्याची जेवढी शक्यता असेल, त्या मानानें करांचा भार संपत्तीचें उत्पादन व विनिमय करण्याऱ्या निरनिराळ्या व्यक्तींवर त्याच्या विनिमयविषयक सामर्थ्यानुसार वांटून जाण्याचा अधिक संभव असतो. ज्या प्रकारच्या धंद्यांत स्पर्धा प्रस्थापित झालेली नसते व उत्पादनाच्या सर्व घटकांत संपत्तीची विभागणी वहिवाटीप्रमाणें होत असते, त्या धंद्यांत कर कोणी व कोणत्या प्रमाणांत द्यावे, हें सरकारला अगाऊच ठरवितां येतें. आपल्याकडील मालगुजारी किंवा महालवारी जमीनधाऱ्याची पद्धत पाहिली तर पहिल्याप्रथम सरकारास कर देणाऱ्या मालगुजारानें, पाटलानें किंवा लंबरदारानें, ते आपल्या कुळांवर किंवा भागीदारांवर कसकसे वांटून द्यावें, हें निश्चितपणें ठरविलेलें असतें. परंतु आजकालच्या स्पर्धेच्या व स्वतंत्रतेच्या युगांत करांच्या भाराची अशी सरकारी विभागणी ठरविणें अव्यवहार्य आहे.

वस्तु किंवा कामगिरी विकत देणारा दुकानदार व ती घेणारा गिऱ्हाईक असा व्यापक अर्थ करून आपणांस असें म्हणतां येईल की, करांच्या स्वरूपानें सरकार दुकानदाराजवळून त्यास मिळणाऱ्या किंमतीचा कांहीं भाग घेतें किंवा गिऱ्हाइकांस मूळ किंमतीशिवाय केवळ वस्तु विकत घेण्याच्या परवानगीदाखल म्हणूनच कांहीं अधिक रक्कम द्यावयास लावतें. कर बसविण्यापूर्वी मागणी व पुरवठा याचा जो परस्पर संबंध ठरून गेलेला असतो तो कर बसविल्यानंतर दुकानदाराच्या कमाईंत खोट येऊन किंवा गिऱ्हाइकांचें वस्तु विकत घेण्याचें सामर्थ्य कमी होऊन, विस्कळीत होतो व मागणी-पुरवठ्याची पुन्हां नवी घडी बसण्यापूर्वी उत्पादक व उपभोक्ते यांच्यांतील अनेक बाबींचे परस्पर संबंध नीट ठरावे लागतात. पूर्ण स्पर्धा व स्वातंत्र्य असतां मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें जसें मूल्य ठरतें, तसेंच अर्थोत्पादनास मदत करणाऱ्या निरनिराळ्या घटकांचा उत्पादक व उपभोक्ते या नात्यानें जो परस्पर संबंध असतो त्यावरूनच कोणता कर, कोणी किती प्रमाणांत व कसा द्यावा, हें ठरत असतें. कोणत्याही वस्तवर अगर कामगिरी-वर कर लादला गेल्यानें तिची किंमत वाढली तर त्या वस्तुस असलेली मागणी कमी होते. ज्या मानानें मागणी लवचिक असेल व ज्या वस्तूंवर कर लादलेले नाहींत असे दुसरे जिन्नस बदली म्हणून वापरण्याची शक्यता असेल त्यामानानें करामुळें मागणी अधिक संकुचित होईल. उलट किंमतींत वाढ अशक्य ठरून कर दुकान-दारावर पडल्यास वस्तूचा पुरवठा मर्यादित होईल. साधारण व्यवहारांत कोणताही कर सर्वस्वी गिऱ्हाइकावर किंवा दुकानदारावर न पडतां कमी फायद्याच्या रूपानें तो कांहींसा दुकानदारावर व अधिक किंमतीच्या रूपानें गिऱ्हाइकांवर पडत असतो.

दुकानदार व गिऱ्हाइक यांच्यांत कराच्या भाराची ही विभागणी कोणत्या प्रमाणांत होते हें मागणीच्या व पुरवठ्याच्या लवचिकपणावर व ओढातार्णीवर अवल-बून असतें. ज्या मानानें मागणीचा कमी होण्याचा किंवा बदलण्याचा, पुरवठा कमी होण्यापेक्षां अधिक संभव असतो त्यामानानें गिऱ्हाइकास कराचा कमी भाग द्यावा लागून दुकानदारास जास्त भार सोसावा लागतो. मागणी व पुरवठा ही दोन्हीही सारखीच लवचिक असण्याचा क्वचित् प्रसंग आल्यास करांचा बोजा दोघांवर सारखाच पडेल. वस्तूंवर कर बसविल्यानें त्यांची किंमत वाढते हें ध्यानांत घेतल्यास ज्या वस्तूंची नव्या किंमतीस देवघेव होते त्यांचें परिमाण जुन्या किंमतीला देवघेव होत असलेल्या वस्तूंच्या परिमाणापेक्षां एकंदरीनें कमी असतें, हें सहज ध्यानांत येईल. कोणताही विवक्षित कर घेतला तर त्याचा भार कोणावर किती पडतो हें वरील सर्व-साधारण तत्त्वांवरून ठरविण्यापूर्वी ज्या वस्तवर अगर कामगिऱ्यांवर तो बसविलेला असतो त्यांच्या उत्पादनांत व विनिमयांत स्पर्धा चालू आहे किंवा एखाद्या मक्तेदारा-कडून तीं होत आहेत, त्या वस्तूच्या उत्पादनास उतरत्या किंवा वाढत्या पैदा-

शीचा नियम लागू आहे तसेंच, कर किंमतीवरून किंवा आकार, वजन इत्यादि- कांवरून ठरविलेला आहे, तो अप्रत्यक्ष आहे की प्रत्यक्ष आहे, तो सारख्या प्रमाणांत घेतला जातो की वाढत्या प्रमाणांत घेतला जातो, इत्यादि विशिष्ट गोष्टींचा पूर्णपणे विचार करावा लागतो. परंतु करांच्या कांहीं प्रमुख प्रकारांचा भार कस- कसा विभागला जातो याबद्दल तात्त्विक व व्यावहारिक दृष्ट्या ठोकळ मानानें अगाऊ अंदाज करणे शक्य व जरूरही असते. त्यांपैकीं विशेष महत्त्वाच्या करांचा येथें विचार करण्याचें योजिलें आहे.

१० **शेतजमिनीवरील कर**—शेतजमिनीपासून येणाऱ्या निव्वळ उत्प- न्नास खंड असें मागील प्रकरणांत संबोधिलें आहे. अशा उत्पन्नावर कर बसवि- ल्यास त्याचा शेवटीं कोणावर भार पडेल, हे ठरविण्यापूर्वी जमीनीच्या खंडांतील कांहीं विशेष गुण ध्यानात घेतले पाहिजेत. पहिली गोष्ट ही कीं मागणीच्या मानानें पुरवठा मर्यादित असून सीमागत उत्पादकाच्या उत्पादनमूल्याइतकी धान्याची किंमत असते. शिवाय, सर्व शेतजमीन अनेकजणांच्या मालकीची असून प्रत्येक पिकाला शेतकरी दरेक जमीनीवर आपणांस किती श्रम व भांडवल यांचा खर्च करावा लागेल व तिच्यातून एकंदर उत्पत्ति किती होईल याचा बरोबर अंदाज करून आपापसांतील स्पर्धेनें जमीनीच्या मालकांस निव्वळ खंडाइतकीच रक्कम देत असतात. सरकारनें जमीनीच्या उत्पन्नापैकीं अशा निव्वळ खंडाच्या स्वरूपाच्या भागावर कितीही कर बसविला तरी तो जमीनीच्या मालकासच द्यावा लागेल हें उघड आहे. खंड देऊन लागवड करणारे शेतकरी आपापसांतील स्पर्धेमुळें आधीच आपल्या श्रमाच्या व भांडवलाच्या सरासरीनें मिळणाऱ्या मोबदल्यावर संतुष्ट असल्यानें त्यांची कमाई कमी करून त्यांजवर बोजा ढकलणें मालकांस शक्य नसतें. किंमत ही, खंड व खंडावरील कर हीं दोन्ही द्यावी लागत नसलेल्या सीमागत उत्पादकाच्या उत्पादनमूल्याइतकी असल्यामुळे तिच्यांत वाढ करून उपभोक्त्यांस कराचा कांहीं भाग सहन करण्यास लावतां येत नाहीं. स्वतःच्या जमीनीची मशागत करणारा मिरासदार किंवा आपली जमीन ‘ खंडानें ’ लागवडीस देणारा जमीनदार या दोघांच्याही उत्पन्नांतील निव्वळ खंडाचा भाग कोणता, हें ठरविणे कठीण असतें. त्यामुळे कर बसवितांना तो खंडावर म्हणून बसविला तरी तो शेतकऱ्याच्या श्रमाच्या मजूरीवर किंवा जमीनींत घातलेल्या भांडवलाच्या व्याजावर पडण्याचा संभव असतो. असें झाल्यास उत्पादनाचें मूल्य वाढून धान्याची किंमत चढल्यानें गिऱ्हाइकांवर कराचा बोजा टाकला जाईल व जमी- नीच्या मालकास मात्र धान्याच्या वाढत्या किंमतीमुळें अधिक खंड मिळेल.

आता जाणून बुजून सीमागत उत्पादकांवर, म्हणजे खंड न देणाऱ्या उत्पादकां- वर, बसविलेले कर आपण घेऊं. अशा उत्पादकांच्या उत्पादनमूल्याबरोबर

किंमती असल्यामुळे त्यांच्यावर लादलेला कर वाढलेल्या किंमतीच्या रूपाने त्यांस परत मिळाला पाहिजे. असें न झाल्यास लागवड करण्यांत त्यांचा तोटा व्हावयास लागून ते जमीन सोडून जातील. सीमागत उत्पादकास द्यावा लागणारा कर उपभोक्ते सहन करतील किंवा नाही, हें त्याच्या मागणीच्या लवचिकपणावर अवलंबून असते. मागणीमध्यें मुळीच लवचिकपणा नसून धान्याची किंमत वाढूनही ती कायम टिकणारी असेल तर कराचा सर्व बोजा उपभोक्त्यावर टाकतां येईल. सीमागत उत्पादनमूल्याहून ज्याचें उत्पादनमूल्य कमी आहे त्यांस धान्याच्या स्वरूपात मिळणारा खंड कायमच राहील. परंतु धान्याची किंमत वाढल्याने, खंड म्हणून त्यांस जी रक्कम मिळावयाची ती मात्र वाढेल. शिवाय, सीमागत उत्पादकाला धान्याचें विवक्षित परिमाण उत्पन्न करण्यास जेवढा खर्च येतो त्यापेक्षां इतरांस कमी खर्च येत असल्यानें, कर जमीनींत गुंतविलेल्या भांडवलावर बसविलेला असेल तर, किंमत सीमागत उत्पादकास द्याव्या लागणाऱ्या कराइतकी वाढून, इतर मालकास कमी भांडवलावर कमी कर द्यावा लागल्यानें त्याचा फायदाच होईल. कधीं कधीं तर अशा फायद्यामुळे, कर म्हणून द्याव्या लागणाऱ्या रकमेपेक्षां अधिक रक्कम खंडाच्या वाढीच्या रूपानें जास्त उत्पादक जमिनीच्या मालकास मिळू शकते. धान्यास असलेली मागणी लवचिक असेल तर सीमागत उत्पादकावर कर बसविल्यानें किंमत वाढल्याबरोबर मागणी कमी होऊन पुरवठाही कमी करावा लागेल. पूर्वी सीमागत उत्पादकास जेवढा खर्च येत असे त्यापेक्षा कमी खर्चानें उत्पादन होण्याची दुसरी एखादी सीमा ठरेल; व इतर उत्पादकांस खंड म्हणून मिळणाऱ्या धान्याचें परिमाण कमी होईल. मर्यादित मागणी व उत्पादनाचें कमी मूल्य या दोन्ही कारणांमुळें धान्याचे भाव जनी किंमत व कराची रक्कम याच्या बेरजेइतके चढणार नाहीत.

हिंदुस्थानातील जमीनमहसुलाच्या निरनिराळ्या पद्धतींत सरकारधान्याचा भार वास्तविकपणे कोणास सहन करावा लागतो हे शोधून काढण्यास या तात्विक विवेचनाची बरीचशी मदत झाल्याशिवाय राहणार नाही. विशेषतः कराच्या भाराच्या विभागणीबद्दल तात्त्विक सिद्धांत ठरविताना प्रथमतः निष्वळ खंड व हिंदी शेतकरी मालकांस जो 'खंड' देतात तो, त्यांचा काय संबंध आहे व पुढें स्पर्धा, चलनशीलता व लवचिकपणा इत्यादि मागणी-पुरवठ्याचे विशेष अस्तित्वांत आहेत किंवा नाही या दोन प्रश्नांस मिळणाऱ्या उत्तरावरच प्रमुखपणें भर देणें जरूर आहे. आपल्या देशांत शेतकीच्या धंद्यात स्पर्धा व चलनशलिता यांचा जवळ जवळ पूर्ण अभाव आहे, असें म्हणण्यास हरकत नाही, आणि म्हणूनच करांचा भार वास्तविकपणें कोणत्या प्रकारच्या उत्पन्नावर पडत आहे हें सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्याशिवाय शेतकऱ्याच्या आर्थिक स्थितीची योग्य कल्पना येणार नाही. ज्या प्रांतांत कायमधान्याची जमीनदारी पद्धत चालू आहे तेथें आजमितीस तरी

कराचा सर्व भार जमीनदारास सहन करावा लागतो व त्यांच्या मतानें फुगत चाललेल्या खंडाच्या मानानें तो त्यांस सहज झेपण्यासारखा आहे, यांतही शंका नाही. इतर प्रांतांत जेव्हां कमी अधिक कालमर्यादेनें सरकार जमीनधारा बदलतें तेव्हां साधारणपणें जमीनीपासून तिच्या मालकाला मिळणाऱ्या खंडाचा निम्मा किंवा निम्म्याहूनही कमी भाग घेतला जातो असें सरकारपक्षीय लोक सांगत असतात. परंतु हा खंड वास्तविक असतो त्यापेक्षा अधिक ठरविला गेल्यानें सर्व हंगामी पद्धतींत, व विशेषतः रयतवारी पद्धत चालू आहे त्या प्रांतांत, जमीनीवरील कर शेतकऱ्यांस थोड्या फार प्रमाणांत मजूरी, व्याज, किमान नफा इत्यादि इतर मार्गांनीं मिळविलेल्या आपल्या उत्पन्नांतून द्यावा लागतो असें दिसून येतें.

**११ भुईभाड्यावरील कर**—शेतकी जमीनीच्या उत्पन्नाप्रमाणें घरबांधणीच्या जमिनीचें उत्पन्नही जर केवळ उत्पादक सोयींतील फरकामुळें कमी जास्त होऊन अधिक सोयींच्या जागांच्या मालकांस खंड दिला जात असेल, तर या खंडावर बसविलेले कर मालकांसच द्यावे लागतील. भाडेकरी व मालक यांच्यातील स्पर्धेमुळें मालकांनी भुईभाडें आधींच जास्तींत जास्त मर्यादेपर्यंत मिळविलेलें असतें; व घरबांधणीस लागणारें भांडवल व श्रम यांचें वेतन त्यांच्या सर्व प्रकारच्या उपयोगावर अवलंबून असल्यानें घरबांधणींत त्यास कमाई कमी होऊं लागली तर ते तो धंदा सोडून देतील. भुईभाड्यापैकीं निव्वळ खंडाच्या स्वरूपाचा तेवढा भाग शोधून काढून त्यावर कर बसविला तर तो भाडेकरी किंवा घरें बांधण्याचा धंदा करणारे यांजवर न पडतां जमीनीच्या मालकांवरच पडेल, ही गोष्ट खरी आहे. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत भुईभाड्यांतील खंडाचा भाग निराळा काढतां येत नाहीं, इतकेंच नव्हे तर एखाद्या घरास किंवा इमारतीस द्याव्या लागणाऱ्या भाड्यापैकीं भुईभाड्याचा भाग किती व घरबांधणीचें वेतन किंवा मोबदला किती हेंही सांगणें बरेंच कठीण असतें. घरबांधणीस जेवढें भांडवल लागलें असेल तेवढ्यावर सरासरीनें व्याज व किमान नफा आकारून भुईभाडें व इमारतीचें भाडें असें ठोकळ मानानें निराळें करतां येतें. या पद्धतीनें भुईभाड्यावरील किंवा घरबांधणींत गुंतविलेल्या भांडवलावरील कर घराच्या भाडेकऱ्याकडून घेण्याचा प्रघात पडल्यास तो जागेच्या किंवा घराच्या मालकांवर न पडतां भाडेकऱ्यांस सहन करावा लागण्याचा संभव असतो. कारण जागांचा व घरांचा पुरवठा मागणीच्या मानानें मर्यादित असल्यानें, ज्यामानानें घरांस असलेली मागणी कमी लवचिक असेल त्यामानानें करांचा बोजा भाडेकऱ्यावर पडतो; व जों जों भाडेकऱ्यांस अधिक कर द्यावे लागतात तों तों ते राहण्यास किंवा धंदा करण्यास कमी जागा वापरण्याचा प्रयत्न करतात. ही गोष्ट आरोग्यदृष्ट्या व आर्थिक दृष्ट्याही हानिकारक असल्यानें जे कर जमीनीच्या मालकांवर पडावे अशी सरकारची इच्छा असते, ते प्रत्यक्ष मालकांडूनच घेणें अधिक इष्ट असतें.

त्यांतही निव्वळ खंड न अजमावता आल्यानें भांडवलाच्या किंवा श्रमाच्या मिळकतीवर कराचा बोजा पडूं लागला तर शेवटीं घरभाडें वाढल्यावांचून राहणार नाहीं. उत्पन्नांतील निव्वळ खंडाच्या स्वरूपाचा भाग ठरविण्याची एखादी विश्वासनीय पद्धत सांपडेपर्यंत, समाजसत्तावाद्यांचे शेतजमीन व घरबांधणीची जागा यांच्यावर जबर कर बसविण्याचे बहुतेक प्रयत्न भाडेकरी, मालक, भांडवलवाले व एकंदर समाज यास अपायकारक झाल्याशिवाय राहणार नाहींत. शिवाय, निव्वळ खंड किती हे निश्चित झालें तरी त्याचा वास्तविक उपभोग घेणारा कोण आहे व कोणत्या पद्धतीनें त्याच्या मिळकतीवर कर लादता येतील इत्यादि तात्त्विक विवेचनास आड न येणारे परंतु व्यावहारिक व अंतिम आर्थिक हिताच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे प्रश्न उद्भवून ते समाधानकारक रीतीनें सोडविणें जवळ जवळ अशक्य होतें. मागील प्रकरणांत जमीनीच्या उत्पन्नाशिवाय इतर प्रकारच्या मिळकतींतही मर्यादित पुरवठा व उत्पादक सामर्थ्यातील नैसर्गिक फरक यामुळें श्रम न करता मिळणारा खंडाच्या स्वरूपाचा काही भाग असतो, हे दाखविलें आहे. तो शोधून काढून व्याज, नफा, मजूरी इत्यादिकांचा खंडाच्या स्वरूपाचा अंश ठरविणें, हे तर प्रायः अशक्यच आहे; आणि जोपर्यंत सर्व प्रकारच्या खंडावर जबर कर बसवून ते सरकारी खजिन्यांत खेचून आणले जात नाहींत तोपर्यंत केवळ जमीनीच्या खंडावरच धाड घालणें हा आर्थिक व नैतिक दृष्ट्या अन्यायच ठरेल. शिवाय, आपणास खंडाचा बराचसा भाग उपभोगण्यास सांपडेल या अपेक्षेनें ज्यांनी जमीनी विकत घेतल्या किंवा इतर कायदेशीर मार्गांनी मिळविल्या त्यास बाजारभावानें त्यांच्या हक्काची किंमत देणें आपणास न्यायी व सुधारलेले म्हणविणाऱ्या प्रत्येक सरकारास योग्य आहे. अशा खर्चाचा बोजा वजा केला तर सर्व खंड कराच्या रूपानें सरकारनें घेतला तरीही त्यांत आर्थिक दृष्ट्या विशेष फायदा पडेल असें नाहीं.

**१२ व्याज, नफा व भांडवल यांजवरील कर**-- ऋणकोची पत किंवा त्यास कर्ज देण्यांत धोका, हीं सारखींच आहेत असें धरून चालल्यास प्रत्येक देशांत भांडवलवाले व धंद्याकरिता कर्ज घेणारे योजक यामध्ये स्पर्धा व चलनशीलता असेल त्या प्रमाणांत सर्वसाधारण व्याजाचा दर जवळ जवळ एकच असतो, व तो मुख्यत्वेंकरून भांडवलाच्या उत्पादक सामर्थ्यावर आणि विवक्षित वेळीं भांडवलास असलेली मागणी व त्याचा पुरवठा यांच्या अन्योन्य संबंधावर अवलंबून असतो. अशा प्रकारच्या व्याजावर सरकारनें कर बसविला तर तो पहिल्याप्रथम भांडवलवाल्यांसच द्यावा लागेल. परंतु व्याजावर कर बसून निव्वळ व्याजाचा दर कमी झाल्यानें नागरिकांस बचत करण्यास पहिल्या इतकें आकर्षक कारण न राहून भांडवलाचा पुरवठा कमी होईल. शिवाय, ज्या राष्ट्रांत भांडवलाच्या कमाईवर अधिक कर बसविलेला असतो तेथील भांडवलवाले ज्या इतर

देशांत करांचे दर कमी असल्यामुळे निव्वळ व्याज जास्त मिळते त्या देशांत आपलें भांडवल पाठवितात. सर्व देशांत व्याजावरील कर सारखेच असतील, परदेशी भांडवल पाठविण्यास मनाई असेल किंवा परदेशांत भांडवल पाठवून मिळालेल्या व्याजावरही स्वदेशांतील सरकार कर घेत असेल तर देशाच्या बाहेर भांडवल फारसे जाऊ शकणार नाही, हे खरे आहे. तरी व्याजावर कर बसविल्यानें भांडवलाचा पुरवठा कमी होतो यात शंका नाही; व कमी पुरवठ्यानें व्याजाचे दर वाढले म्हणजे भांडवलवाल्यास कराचा भार पूर्णपणे किंवा अंशतः उत्पादक ऋणकोवर टाकता येतो. काही विवक्षित धंद्यांतील उत्पादकांस किंवा एखाद्या विशिष्ट प्रकारच्या ऋणकोंस कर्जाऊ दिलेल्या भांडवलाच्या व्याजावर कर बसविला तर तो ऋणकोंसच द्यावा लागेल, कारण कराचा बोजा धनकोंवर पडूं लागला तर ते इतर धंद्यांतील ऋणकोंस कर्ज देऊन तो चुकवितील.

मागें नफ्यामध्यें सर्वसाधारण किमान नफा व निव्वळ नफा असे दोन घटक असतात हे सांगितलें आहे. त्यांतील निव्वळ नफा हा आकस्मिक स्वरूपाचा अतएव धंदेवाल्यास श्रम न करता मिळालेला असतो. त्यावर लादलेला कर गिऱ्हाइक, भांडवलवाले किंवा मजूर यावर न पडता धंदेवाल्यासच द्यावा लागेल हे उघड आहे. परंतु असा निव्वळ नफा आकस्मिक व हंगामी असल्यामुळे व त्याचें परिमाण ठरविणें कठीण असल्यानें त्यावर कर बसविण्यानें सरकारच्या उत्पन्नात सारखी व नियमित भर पडत नाही. सर्वसाधारण नफा हा काही अंशी योजकाच्या श्रमाचे, धाडसाचे व कुशलतेचे वेतन असल्यानें त्यावर कर बसविला तर उत्पादनमूल्य वाढून उत्पादनास आळा बसेल. गेल्या महायुद्धाचे वेळी व त्यानंतर काही वर्षे अनेक राष्ट्रांत सर्व प्रकारच्या भांडवलवाल्यास 'फाजील नफ्यावरील कर' या नावाचा एक जबर कर द्यावा लागे. सर्वसाधारण किमान नफा व निव्वळ नफा यांतील तात्त्विक फरक ध्यानात घेऊन महायुद्धासारख्या आकस्मिक कारणाने काही खाजगी व्यक्तींचा जो असाधारण फायदा झाला तो या कराच्या स्वरूपानें बहुशी आपल्या ताब्यात घेण्याचा सरकारचा हेतु होता. परंतु हळुहळु फाजील नफ्याबरोबर सर्वसाधारण नफ्यावरही वाढत्या कराचा बोजा पडूं लागला, सर्व उत्पादक धंद्यांस मंदी येत चालली व सरकारची आणि राष्ट्राची आर्थिक स्थिति खालावली. यावरून नफ्यावर वाढत्या प्रमाणात चढीचे कर लादण्यापूर्वी सरकारला पूर्ण विचार करणे जरूर असते, हें दिसून येईल. काही विवक्षित धंद्यांतील योजकांच्या नफ्यावरच कराचा बोजा टाकला असेल तर त्यांस तो भांडवलवाल्यावर, मजूरावर व गिऱ्हाइकांवर त्यास असलेल्या मागणीच्या लवचीकपणाच्या कमीजास्त प्रमाणांत वाटून देतां येईल. कित्येक वेळां स्वदेशात आपल्या संघटनाचातुर्याचा योग्य फायदा मिळत नाही असें दिसून आल्यास अधिक फायद्याच्या आशेनें अनेक योजक परदेशांतही जाण्याचा संभव असतो.

भांडवलावरील कराचे तीन मुख्य प्रकार असून त्याचे आर्थिक परिणाम काहीसे निरनिराळे आहेत. पहिला प्रकार मयत इसमाकडून त्याच्या वारसास जी संपत्ति मिळावयाची असते तिच्यावर बसविलेल्या करांचा होय. अशा करांचा बोजा अर्थातच वारसावर पडतो. परंतु वारशावरील कराच्या पद्धतीतील मुख्य अडचण म्हटली म्हणजे ते सर्व प्रकारच्या मालमत्तेवर सारख्याच प्रमाणात लादले जावे किंवा नाही व मालमत्तेच्या किंमतीतील वाढीबरोबर कराचे दरही चढवावे किंवा नाही, या प्रश्नासंबंधी होय. विशेषतः उद्योगधंद्यांत गुंतविलेल्या भांडवलावर चढीच्या दराने वारशाचे कर लादले तर भांडवलाच्या मालकांस आपली संपत्ति उधळून टाकण्यास उत्तेजन मिळेल व त्यास बचत करून भांडवलाचा सांठा वाढविण्यास पहिल्याइतके आकर्षक कारण राहणार नाही. असें झालें म्हणजे उत्पादन कार्यास भांडवलाचा तुटवडा पडून राष्ट्राची निव्वळ कमाई संकुचित होईल. एका प्रकारच्या भांडवलावर जास्त व दुसऱ्यावर कमी दरानें वारशाचे कर बसविल्यास ज्या प्रकारांत कमी दर आहेत त्यातच भांडवल गुंतविण्यास लोक उद्युक्त होतील. समाजात अनेक स्वरूपात मालमत्तेची जी कायदेशीर देवघेव सतत होत असते तिच्यावर लादण्यात येणारा स्टँप व नोंदणीचा कर हा भांडवलावरील कराचा दुसरा प्रकार होय. असे कर बसविल्यानें मालमत्तेचा काही अंश खरेदीदाराऐवजी सरकारला मिळतो. हा कर प्रत्यक्षपणें विक्री करणाराकडून किंवा विकत घेणाराकडून वसूल केला असला तरी त्याचा वास्तविक भार त्या दोघात, मागें स्पर्धा व मक्तेदारी, पुरवठा व मागणी यांचा लवचिकपणा इत्यादि जी कारणें सांगितली त्यांच्या अनुरोधानें विभागला जाईल. हल्ली यूरोपमधील बहुतेक सर्व प्रमुख राष्ट्रांचे सरकारी कर्ज प्रमाणाबाहेर वाढलेलें असून ते फेडून टाकण्याकरितां प्रत्येक नागरिकाच्या मालमत्तेचा कांही भाग कराच्या रूपानें एकदम घ्यावा असें सुचविण्यांत येतें. हा कर खाजगी मालमत्तेच्या हक्कावर घाला घालणारा, देशाचें उत्पादक सामर्थ्य कमी करणारा व भांडवलाच्या पुरवठ्याच्या मुळाशी असलेल्या स्वार्थबुद्धीच्या आड येणारा असल्यानें साधारणपणें असले कर सहसा लादले जात नाहीत. महायुद्धासारखें एखादें राष्ट्रीय संकट उद्भवल्यास सर्व आर्थिक विचार बाजूस ठेवून निर्वाणीचे उपाय म्हणून असल्याही करांचा अवलंब करावा लागतो. परंतु शांततेच्या वेळीं असले कर लादून युद्धकाळीं काढलेल्या कर्जाची फेड करण्यांत आर्थिक व नैतिक दृष्ट्याही एक मोठी अडचण असते ती ही कीं, युद्धकाळीं पैशाचें उपयुक्त वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य फारच खालावलेलें असतें व शांततेच्या काळीं ते साधारणपणें अधिक असतें. युद्धकाळी ज्या धनकोनें शंभर रुपये सरकारास कर्जाऊ दिले त्याचे कर्ज फेडण्याकरितां शांततेच्या वेळीं प्रजेच्या मालमत्तेतील शंभर रुपये घेणें हे पर्यायानें धनकोचा जितक्या उपयुक्त वस्तूंवर आर्थिक दृष्ट्या हक्क आहे त्यापेक्षां

अधिक उपयुक्त वस्तू त्यास बहाल करणें होय. या गोष्टीतील अन्याय शांततेच्या काळीं सर्व लोकांच्या विशेष नजरेस येत असल्यानें कर्जफेडीसाठीं भांडवलावर कर बसविण्याचा साधारणपणें प्रयत्न केला जात नाहीं.

**१३ वस्तूंवरील कर**– सरकारी करग्रहणपद्धतीत प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कर याचें असलेलें प्रमाण आणि राष्ट्राची आर्थिक व सामाजिक प्रगति यामध्ये अन्योन्य संबंध काय आहे, याबद्दल बराच वाद आहे. कित्येक ग्रंथकाराचें असें म्हणणें आहे कीं, 'राजसत्ता ही प्रजाजनांच्या वैयक्तिक राजनिष्ठेवर अवलंबून असे तोंपर्यंत सरकारच्या खर्चासाठीं लागणारें उत्पन्न वैयक्तिक स्वरूपाच्या करांनीं वसूल केलें जाई. समाजाच्या अशा प्राथमिक अवस्थांत लोकाची आर्थिक प्रगतीही विशेष झालेली नसल्यानें त्याजकडून डोईपट्टीसारखे प्रत्यक्ष स्वरूपाचे कर घेऊन राजास आपणांस लागणारीं सांपत्तिक साधनें उभारावीं लागत. परंतु समाजाच्या आर्थिक स्थितींत जसजशी प्रगति होऊं लागली तसतसे उपयुक्त वस्तूंचें उत्पादन व उपभोग ही वाढत्या प्रमाणावर होऊं लागलीं; व या वस्तूंचाच कांहीं भाग घेऊन सार्वजनिक स्वरूपाच्या गरजा भागविणें सरकारला शक्य झालें. यावरून वैयक्तिक करापेक्षा वास्तविक किंवा वस्तूंवरील कर हेच समाजाच्या उच्चतर आर्थिक अवस्थेचे द्योतक आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.' उलट, इतर कांहीं लोक वास्तविक करांहून वैयक्तिक कर हेच अधिक सुधारलेल्या राष्ट्रास योग्य आहेत असें समजतात. कारण मनुष्य अर्धवट रानटी किंवा गट व जमाती याच्याच अवस्थेत असतांना त्याच्या आडमुठ्या स्वातंत्र्यवृत्तीस त्याच्या स्वतःवर कर बसविलेले खपत नसत. पुढें पुढें सामाजिक बंधनें दृढ होऊन प्रत्येक नागरिकास आपण सर्व राष्ट्राचे एक घटक आहोंत व राष्ट्रीय खर्चाकरितां आपणही कांहीं मदत केली पाहिजे ही कल्पना जसजशी पटूं लागली तसतसा तो स्वतः आपल्या संपत्तीतून कर द्यावयास तयार झाला. अर्वाचीन काळीं तर लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या प्रसारामुळें सरकार हा एक परकी व जुलमी अधिकारी आहे ही भावना समूळ नष्ट होऊन समाजातील सर्व घटकांनीं मिळून आपलें वैयक्तिक व सामाजिक हितसंवर्धन करण्याकरितां बनविलेली संस्था म्हणजेच सरकार अशी मीमांसा होऊं लागली. राज्यसंस्था चालविण्याचा अधिकार लोकास मिळाल्यामुळें तिला लागणारा खर्च उभारण्याची जबाबदारीही त्याच्यावर येऊन पडली. खर्च करणें व कर देणें हीं दोन्ही कामें लोकाकडेच आल्यानें प्रत्यक्षपणें कर द्यावयास ते तयार झाले. एकंदरीनें, वास्तविक कर व वैयक्तिक कर यांपैकीं एका प्रकारावरच प्रगल्भतेचा शिक्का मारावयाचा असेल तर तो वैयक्तिक करांवरच मारणें योग्य होईल यांत शंका नाहीं.

या विवेचनानुरूप वैयक्तिक कराची श्रेष्ठता ठरवितांना एक दोन महत्त्वाचे मुद्दे दृष्टीआड केले जातात त्यांचा येथें उल्लेख करणें जरूर आहे. एकतर प्रस्तुत

प्रकरणाच्या सुरवातीस सांगितल्याप्रमाणें, आपणांस लोकसत्ताक म्हणविणाऱ्या राष्ट्रांत आजही कांही विशिष्ट वर्गाचीच सत्ता राजकारणांत प्रस्थापित झालेली असते; व इतर वर्गांकडून स्वतःच्या सुखसोयींसाठीं खर्च करण्याकरिता पैसे उभारण्याची अधिकारारूढ वर्गाची प्रायशः खटपट असल्यानें तात्विक व व्यावहारिक दृष्ट्या अजूनही अप्रत्यक्ष किंवा वास्तविक कर निकामी झाले आहेत असें नाही. शिवाय अलीकडे सर्व राष्ट्रांतील सरकारांचा खर्च एवढा वाढला आहे की, तो फक्त वैयक्तिक स्वरूपाचे कर लादून भागवूं, असें त्यांनी म्हटल्यास तसें होणें शक्य नाही. आजकाल वैयक्तिक व वास्तविक, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष, दोन्ही प्रकारचे कर लादून सरकार प्रजाजनास सार्वजनिक कार्यांस मदत करण्यास भाग पाडतें. लोकसत्तेचा विस्तार होण्यास वैयक्तिक करापासून विशेष मदत होते, ही गोष्ट खरी असली तरी लहान सहान उत्पन्नाच्या लोकांवर प्रत्यक्षपणें कर बसविले तर त्याची मिळकत बरोबर अजमावून त्याकडून कर वसूल करावयाचा हें अव्यवहार्य व बेसुमार खर्चाचें काम आहे. शिवाय, गरीब लोकांस आपल्या अल्पशा संपत्तींतून कर द्यावे लागल्यानें त्यांच्या सौख्यांत व कार्यक्षमतेत कमीपणा येऊन समाजाचें नुकसान होण्याचा संभव असतो. म्हणून अशा लोकांवर माफक प्रमाणांत अप्रत्यक्ष कर बसवून व अधिक संपत्तिमान लोकांस अप्रत्यक्ष कराशिवाय इतर वैयक्तिक व प्रत्यक्ष करही द्यावयास लावून सरकारला आपला खर्च भागवावा लागतो.

वस्तूंवर कर लादण्याचे तीन मुख्य प्रकार आहेत. पहिला प्रकार एखाद्या वस्तूचा लोक उपभोग घेत असतां त्यावस्तूबद्दल त्याजवळून कर घेणें हा होय. या प्रकारास वस्तूंच्या उपभोगावरील कर असें म्हटलें असतां चालेल. कांही वस्तू वापरण्याचा परवाना देण्याचा हक्क आपल्या हातांत ठेवून सरकार त्या परवानगीची किंमत म्हणून कर घेतें तो या प्रकारचाच होय. वस्तूंवर कर लादण्याचा दुसरा मार्ग म्हटला म्हणजे देशाच्या अनेक भागांतील उत्पादक व व्यापारी यांच्या हातांतून माल जात असतां त्यावर कर लादणें हा होय. अशा करास अंतर्गत व्यापारावरील कर किंवा अंतर्गत जकाती असें म्हणतात. स्वदेशांत परदेशाहून माल येत असतां किंवा स्वदेशांतून परदेशीं माल पाठविला जात असतां राष्ट्राच्या सरहद्दीवर जे कर वसूल केले जातात, त्या वस्तूंवरील कराच्या तिसऱ्या प्रकारास परराष्ट्रीय जकाती किंवा नुसतें जकाती असें म्हणतात. उपभोगावरील करांपासून आणि परराष्ट्रीय व्यापारावर बसविलेल्या जकातींपासून निरनिराळ्या व्यक्तींवर व समाजावर आर्थिक दृष्ट्या काय काय परिणाम होतात हे कांहीसे स्वतंत्र प्रश्न असून त्याचा तुटकपणें विचार करणें जरूर आहे.

**१४ वस्तूंच्या उपभोगावर व अंतर्गत व्यापारावर बसविलेले कर**— पहिल्या प्रथम आपण उपभोग्य वस्तूंवर बसविलेले कर घेऊं. उपयुक्त वस्तूंचा

उपभोक्ते उपभोग घेत असता त्याजकडून त्या वस्तूंबद्दल कर वसूल केल्यास लोक कमी प्रमाणात उपभोग घेण्यास तयार होऊन वस्तूंस असलेली मागणी कमी होते; लोक व मागणी कमी झाल्यामुळे शेवटी पुरवठाही मर्यादित करावा लागतो. एखाद्या विवक्षित वस्तूच्या उपभोक्त्यावर कर बसविल्यास मागणी व पुरवठा ही नक्की किती कमी होतील, हें त्याच्या लवचिकपणावर अवलंबून राहील. उपभोक्त्यांकडून काही कर घेतला तर मागणी व पुरवठा ही दोन्ही कमी होऊन वस्तूची किंमत कितपत बदलेल हे मागणी-पुरवठ्याच्या परस्पर प्रतिक्रियेवर व त्या वस्तूंच्या वाढत्या उत्पादनास प्रमाणापेक्षा कमी किंवा अधिक खर्च लागतो यावरून ठरेल. ज्या वस्तूच्या उत्पादनास उतरत्या पैदाशीचा नियम लागू आहे तिच्या उपभोक्त्याकडून कर घेतल्यास मागणी मर्यादित होईल हे खरे. परंतु पुरवठाही कमी करावा लागल्याने सीमागत उत्पादन-मूल्य कमी होऊन किंमत उतरेल. वस्तु वाढत्या पैदाशीच्या नियमान्वये उत्पन्न केली जात असेल तर करामुळे पुरवठा कमी करावा लागून सीमागत उत्पादन मूल्य व किंमत ही वाढतील. उपभोक्त्याकडून घेतल्या जाणाऱ्या करामध्यें वस्तूवरील सर्व करास लागू असलेले इतर दोष असूनही त्यांचे विशेष अवगुण म्हणजे ते कर देणारांस अत्यंत त्रासदायक व सरकारास कडकपणें वसूल करण्यास फार खर्चाचे असतात हे होत. म्हणूनच असले कर हल्लीं फारसे दिसून येत नाहीत. निव्वळ तात्विक दृष्ट्या विचार केल्यास वस्तूवरील कर उपभोक्त्याकडून वसूल केले काय, किंवा व्यापारी अगर उत्पादक याजवळून वसूल केले काय दोन्ही सारखीच. परंतु मागे कराच्या भाराच्या विभागणीबद्दल जे सर्वसाधारण नियम सांगितले त्यास अनसरून विवक्षित वस्तूस असलेली मागणी व तिचा पुरवठा यांच्या विशेषाची परस्पर प्रतिक्रिया होऊन पुन्हां नीट घडी बसतांना कर कोणास किती सहन करावा लागेल, हे आगाऊ सांगता येणे शक्य नसते. कित्येक ग्रंथकारांचें म्हणणे असें आहे की, वस्तूवरील सर्वप्रकारचे कर शेवटी उपभोक्त्यावरच पडतात. कारण उत्पादनाच्या सीमागत खर्चाबरोबर किंमती असल्यानें उत्पादक अगर व्यापारी यांजकडून कर घेतल्यास सीमागत उत्पादकासही तो द्यावा लागतो; व सीमागत उत्पादनमूल्य वाढून अधिक किंमतीच्या रूपानें कराचें ओझें उपभोक्त्याच्या शिरावर ढकललें जातें. ही विचारसरणी केवळ तात्त्विक दृष्टीनें विचार करणारास पटण्यासारखी असली तरी व्यावहारिक परिस्थितीशी तिची जुळणी होण्यास एक दोन महत्त्वाच्या गोष्टी अस्तित्वांत असाव्या लागतात. एक तर ज्या वस्तूच्या उत्पादकावर अगर व्यापाऱ्यांवर कर बसविलेला असेल त्यास आपलें भांडवल व श्रम ही इतर कर द्यावे न लागणाऱ्या धंद्यांत घालतां येण्याची शक्यता असावयास पाहिजे; आणि दुसरें असें की, कर बसविण्यापूर्वी त्या वस्तूचें उत्पादन व विनिमय यात स्पर्धेचा पूर्णपणे अमल असून सीमागत उत्पादनमूल्याइतकीच त्या वस्तूची किंमत असा-

वयास पाहिजे. वास्तविकपणें उत्पादक व उपभोक्ते यांमध्ये असलेली चलनशीलता व स्पर्धा ह्या अपूर्ण असतात; व वस्तूंवरील करांचा थोडा फार बोजा उत्पादकास सहन करता येण्याइतका त्यांच्या मिळकतींत वाव असतो. तरी एकंदरीनें स्पर्धा व चलनशीलता यांचा अर्वाचीन आर्थिक घटनेत झपाट्यानें प्रसार होत असल्यामुळे वस्तूंवरील कर बहुशः उपभोक्त्यास द्यावे लागण्याचा संभव असतो, यात शंका नाही. वस्तूंच्या उत्पादनास लागू असलेली वाढत्या व उतरत्या पैदाशीच्या नियमाची क्रिया क्षणभर दृष्टीआड केली तर आपणास असेही म्हणता येईल की, वस्तूवर कर लादल्याने त्याचे एकदर उत्पादन कमी झालें म्हणजे धंद्यास अडथळा उत्पन्न होऊन व देखरेखीबद्दलची मजूरी, भाडें इत्यादि सर्व साधारण खर्च वस्तूच्या कमी परिमाणावर विभागून द्यावा लागून, किंमत करापेक्षांही एखादे वेळेस अधिक वाढू शकते.

वस्तूवरील कर देण्यांत उत्पादन व विनिमय यास अडथळा व उपभोक्त्यास त्रास व वाढत्या किंमतीचे ओझें, हे अवगुण असल्याने ज्या वस्तूवर ते लादले जातात त्यांचा खप बराचसा कमी होतो. या कारणाने ज्या वस्तूंचा उपभोग घेणे वैयक्तिक व सामाजिक हितास अनिष्ट असतो त्यावरच ते बसवावे, असें सुचविण्यात येते. दारू, अफू, गांजा इत्यादि मादक पदार्थावर सरकार कर बसविते ते याच तत्त्वामुळे होय. परंतु हे तत्त्व पूर्णपणे लागू करावयाचे असें म्हटले तर गरीब लोकास लागणारें मीठ, राकेल, जाडेभरडे कापड इत्यादिकावर कर लादणे योग्य नाही असा सहजच निष्कर्ष निघतो. एक तर अशा वस्तूंचा पुरवठा गरीब लोकास कमी मिळू लागला तर त्यांच्या राहणीचे मान, त्यांची कार्यक्षमता व उत्पादकसामर्थ्य ही कमी होतील. शिवाय, जीवितरक्षणास ज्या वस्तू अगदी आवश्यक असतात त्यांचा श्रीमंत व गरीब वर्गाकडून साधारणपणे सारख्याच प्रमाणात उपभोग घेतला जातो, व दोघावर पडणारी अशा प्रकारच्या करांची रक्कमही जवळ जवळ सारखी असते. परंतु या रकमेचें गरीबाच्या व श्रीमंताच्या संपत्तीशी असलेलें प्रमाण काढलें तर ते गरीबात भारी व श्रीमंतात हलकें असलेलें दिसून येईल. मागे कराच्या समतेचें जें तत्व सांगितले त्याची सामर्थ्यानुसार अगर त्यागानुसार कशीही अमलबजावणी केली तरी आवश्यक गरजा भागविण्यास लागणाऱ्या वस्तूंवरील कर अयोग्यच ठरतात. असे असूनही प्रत्येक देशात आज असले कर मोठ्या प्रमाणावर लादले जात आहेत. याचे एक कारण असे आहे की, समतेचा नियम नुसत्या वस्तूवरील करास लावून ते विषम ठरले तर तेवढ्यावरून कमी संपत्तिमान् लोकांवर अन्याय होत आहे, असा तात्काळ निष्कर्ष काढणे योग्य नाही. कारण सरकारचें एकंदर उत्पन्न व प्रत्यक्ष लोकहिताकरिता सरकार करीत असलेली कामें ही सर्व ध्यानांत घेऊन गरीब लोकांस त्यांच्या एकंदर वास्तविक मिळकतीच्या मानानें प्रमाणाबाहेर कर द्यावे लागत आहेत

किंवा काय, हें ठरवावयाचें असतें. केवळ एक किंवा कांही विवक्षित कर विषम आहेत असें वाटलें तरी एकंदर करग्रहणपद्धति समतेच्या तत्त्वानुसारच आंखलेली असू शकते. परंतु असले कर सर्व लोकांस आवश्यक असलेल्या वस्तूंवर लादले जाण्याचें मुख्य कारण असें आहे की, वस्तूंवरील करांपासून सरकारला खरोखरच उत्पन्न मिळवावयाचें असेल तर ज्या वस्तूंचा लोकांकडून फार मोठ्या प्रमाणांत उपभोग घेतला जातो व ज्यांस असलेली मागणी विशेष लवचिक नसते त्यांवरच ते लादावे लागतात. चैनीच्या वस्तूंवर कर बसवून सरकारनें उत्पन्न काढावें, असें कित्येक लोक सांगतात. परंतु चैनीच्या वस्तूंस असलेली मागणी आधीच मर्यादित व लवचिक असते आणि त्यांच्यावर कर बसविला तर ती अधिकच संकुचित होऊन सरकारच्या खजिन्यांत त्या करामुळें म्हणण्यासारखी भर पडणार नाही. आवश्यक वस्तूंवर कर बसवू नयेत हें तत्व मान्य करून बहुतेक मुत्सद्दी व्यवहारांत अशा करांची संख्या व त्याचें प्रमाण शक्य तितकें कमी ठेवण्याची खटपट करतात.

**१५ आयात व निर्गत व्यापारावरील कर**—सर्व कराच्या भाराची व विशेषतः वस्तूवरील कराची, विभागणी ज्या सर्वसाधारण नियमानुसार होते म्हणून सांगितलें तेच नियम बहुशः परराष्ट्रांस पाठविल्या जाणाऱ्या व परराष्ट्रांतून आणल्या जाणाऱ्या वस्तूंवर बसविलेल्या करास लागू आहेत. स्वदेशांतील निरनिराळे भाग हे राजकीय व आर्थिक दृष्ट्या परस्परांशी एकजीव झालेले असल्यामुळें त्यांच्यातील उत्पादक व उपभोक्ते यांत स्पर्धा व चलनशीलता यांचें विशेष अस्तित्व असतें. परंतु राष्ट्राराष्ट्रांत आर्थिक, सामाजिक, राजकीय, वर्णविषयक इत्यादि अनेक भेद असल्याकारणानें त्यांच आपापसांतील आर्थिक व्यवहार एकाच देशांतील निरनिराळ्या प्रांतांत होणाऱ्या देवघेवीइतके सुलभ होऊं शकत नाहीत. उलट, एका अर्थानें अंतर्गत आर्थिक व्यवहाराचें क्षेत्र मर्यादित असल्यानें स्पर्धेचा मागणी व पुरवठा यांच्या परस्पर प्रतिक्रियेवर होणारा परिणामही मर्यादितच असतो. आंतराष्ट्रीय व्यापाराचा सर्व जग हें बाजार होत असल्यानें त्यांत आर्थिक घटकांची चलनशीलता कमी होत असली तरी वस्तूंच्या उत्पादनास व विनिमयास ज्या अनेक पद्धतींमुळें उत्तेजन मिळतें त्याचा पूर्णांशानें उपयोग करून घेणें शक्य असतें. अशा परस्पर-विरोधी कारणामुळें अंतर्राष्ट्रीय व्यापारावर बसविलेल्या करांचे वस्तूंची मागणी, पुरवठा व किंमत यावर काय काय परिणाम होतात याबद्दल माहिती करून घेणें बरेंचसें बोधप्रद होईल.

पहिल्यानें आपण आयात मालावरील जकातीची गोष्ट घेऊं. एखाद्या विवक्षित वस्तूवर आयात जकात बसविली तर परदेशी व्यापारी या कराचा बोजा मालाची आयात करणाऱ्या व्यापाऱ्यावर ढकलण्याचा स्वाभाविकपणें प्रयत्न करतील. ज्या मानानें त्या वस्तूच्या आयातीवर कमी कर बसविणाऱ्या इतर राष्ट्रांत अधिक

माल पाठविण्याची शक्यता असेल व परदेशी व्यापाऱ्याच्या एकंदर उत्पन्नाचा कर लादणाऱ्या राष्ट्रांत खपणारा माल हा अल्प अंश असेल त्या मानानें आयात वस्तूंचा व्यापार करणाऱ्या स्वदेशी व्यापाऱ्यांस करांचा बोजा सहन करण्यास लावण्याचा परदेशी व्यापाऱ्याचा प्रयत्न यशस्वी होईल. उलट, इतर देशांत कमी कर देऊन जास्त माल पाठविणें शक्य नसलें व वस्तूचा बहुतेक खप कर लादणाऱ्या राष्ट्रांतच होत असला तर आयात जकातीचा सर्व किंवा कांहीं बोजा परराष्ट्रीय व्यापाऱ्यास सहन करावा लागेल. कर लादण्यापूर्वी आयात वस्तूंच्या किंमती स्पर्धेच्या पूर्ण क्रियेमुळें उत्पादनाच्या सीमागत मूल्याबरोबर असल्या तर परदेशी धंदेवाल्यावर करांचा बोजा ढकलणें कठीण असतें. परंतु अंतर्राष्ट्रीय व्यापारांत, मागील एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे, वस्तूंचें मूल्य थोडें फार अनिश्चित असल्यानें परराष्ट्रीय व्यापाऱ्यांस अंशतः कर सहन करावयास लावण्याची शक्यता असते. कराचा भार परदेशी व स्वदेशी व्यापाऱ्यांपैकी कोणावर पडला तरी त्याजमुळें किंमतींत वाढ होऊन मागणी मर्यादित होते. मागणीच्या या संकोचाचा त्या वस्तूच्या पुरवठ्या-वरही परिणाम झाल्यावाचून राहत नाहीं. परंतु इतर देशास अधिक माल पाठविण्याची शक्यता असल्यास परदेशी व्यापाऱ्यांस आपला पुरवठा कमी करावा लागत नाहीं.

आयात मालावर बसविलेल्या जकातीमुळें शेवटीं किंमत किती वाढेल हें परदेशी व स्वदेशी व्यापाऱ्यावर कराचा भार टाकण्याची शक्यता, वस्तूस असलेल्या मागणीचा लवचिकपणा व त्या वस्तूच्या उत्पादनांत होणारी वाढती अगर उतरती पैदास यावर अवलंबून असतें. हल्लीं अंतर्राष्ट्रीय व अंतर्गत व्यापा-रांत स्पर्धेचा अंमल वाढत्या प्रमाणांत चमत असल्यामुळें आयात जकातीचा बहु-तेक सर्व बोजा उपभोक्त्यास म्हणजे मालाच्या गिऱ्हाइकांसच सहन करावा लागतो. आयातीवर जकात बसविल्यानें व्यापारास जो अडथळा उत्पन्न होतो त्यामुळें व उत्पादनास वाढत्या पैदाशीचा नियम लागू असेल तर कमी पुरवठ्यामुळें कधीं कधीं गिऱ्हाइकांस द्यावी लागणारी नवी किंमत, जुनी किंमत व आयात जकात यांच्या बेरजेहूनही अधिक असूं शकते. आयात मालावर जकाती बसविल्या म्हणजे एकंदर वस्तूंची आयात व त्याचबरोबरच इतर वस्तूंची निर्गत ही मर्यादित होते, हें मागें परराष्ट्रीय व्यापाराबद्दल विवेचन करीत असतां दिग्दर्शित केलेलेंच आहे. येथें आयात मालावरील जकातीबद्दल आणखी एकच गोष्ट सांगून ठेवावयास पाहिजे. ती ही कीं, अशा जकाती सरकारनें केवळ आपल्या उत्पन्नांत भर पडावी म्हणून बसविल्या असतील तर स्वदेशांत उत्पन्न होणाऱ्या तशाच प्रकारच्या मालावर तितकेच कर बसवावे लागतात. असें न केलें तर आयात मालावरील जकाती-मुळें गिऱ्हाइकांस अधिक किंमत द्यावी लागून स्वदेशी उत्पादकाचा मात्र फायदा

होतो. स्वदेशी धंद्याचें सरक्षण करून त्यांस उत्तेजन देण्याकरितां बुद्धिपुरस्सर ज्या जकाती बसविलेल्या असतात त्यांचा परिणाम वास्तविक असाच होत असून त्याबद्दल मागें विचार केलेलाच आहे.

निर्गत मालावर बसविलेल्या जकातींची गोष्ट कांहीशी निराळी आहे. आयात मालावर केवळ वसूल वाढण्याकरितां कर लादले तर त्यांचें संरक्षक स्वरूप अंतर्गत व्यापारावर कर बसवून नाहींसें करतां येतें; व स्वदेशाच्या ठराविक मर्यादेंत करांचे व किमतींचें नियन्त्रण करणें सरकारला शक्य असतें. निर्गत व्यापारांत मात्र प्रत्येक वस्तूचे उत्पादक व उपभोक्ते सर्व जगभर पसरलेले असून त्यांजवर कर लादणें शक्य नसतें. निर्गत वस्तूंवर निव्वळ वसूलाकरितां बसविलेल्या कराचे उदाहरण घेतल्यास अपणांस असें दिसून येईल का, ज्यामानानें परराष्ट्रीय गिऱ्हाइकाची मागणी कमी लवचिक असेल व अधिक स्वस्त वस्तू बदली म्हणून वापरणें अशक्य असेल त्यामानानें निर्गत वस्तूवरील कर परराष्ट्रांतील लोकांकडून मिळण्याचा अधिक संभव असतो. उपभोगास किंवा उत्पादनास परराष्ट्रीयांस आवश्यक असलेल्या एखाद्या वस्तूचा सर्व किंवा बराच मोठा पुरवठा एखाद्या राष्ट्राच्या मालकीचा असला तर त्या वस्तूवर निर्गत जकाती घेऊन त्या परराष्ट्रीय उत्पादकास अगर उपभोक्त्यांस सहन करावयास लावता येतील. वस्तूची परराष्ट्रीयास पूर्ण अवश्यकता व पुरवठ्याच्या मोठ्या भागाची मक्तेदारी या गोष्टी ज्या वस्तूंच्या निर्गतींत दिसून येत नाहीत त्यांवर कर लादल्यास ते स्वदेशांतील उत्पादक अगर व्यापारी यांजवरच पडतील. कारण परराष्ट्रांतील बाजारांत इतर कर न बसविणाऱ्या राष्ट्रांशीं स्पर्धा करावी लागत असल्यामुळे एका राष्ट्रानें कर बसविला तरी तेवढ्यानें सर्व राष्ट्रांत त्या पदार्थाच्या किमती वाढू शकत नाहीत. कित्येक वेळा अंतरराष्ट्रीय बाजारात आपल्या देशांतला माल फायदेशीर भावानें विकला जाऊं नये व स्वदेशांतच त्या मालाचा मुबलक पुरवठा राहावा येवढ्याकरितां मुद्दाम निर्गत व्यापारावर कर बसविले जातात. त्यांचा परिणाम असा होतो कीं, परदेशांत माल कमी पाठविला जाऊन स्वदेशांतील गिऱ्हाइकांस अधिक पुरवठा उपलब्ध झाल्यानें किंमती कमी होतात. हिंदुस्थानांतील गहूं, तांदुळ इत्यादि धान्ये परदेशांत पाठविल्याने येथील पुरवठा कमी होऊन बहुजनसमाजाच्या चरितार्थाला आवश्यक असलेल्या या वस्तूंच्या किंमती वाढतात; म्हणून त्याच्या निर्गतीवर जकाती बसवाव्या व त्यांचा पुरवठा हिंदुस्थानांतील लोकांस पुरेसा व स्वस्त भावानें मिळण्याची व्यवस्था करावी अशी एक सूचना कधीं कधीं केली जाते. तिचा विचार करतांना त्या त्या वस्तूंचा पुरवठा येथील लोकांच्या सर्व गरजा भागवून उरण्यासारखा आहे किंवा नाही व हिंदी उत्पादकांस परराष्ट्रीय बाजारांत माल घेऊन जाण्याची अप्रत्यक्षपणें मनाई केल्यास त्यांचें व एकंदर राष्ट्राचें किती नुकसान होईल, या प्रश्नांकडे लक्ष्य द्यावें लागेल.

**१६ सरकारी खर्च**—व्यक्ती व संस्था यांचें उत्पन्न व त्याचा खर्च यामध्ये अधिक महत्वाची बाब खर्च ही होय, हें साधारणपणे पुष्कळ लोक मान्य करतील. कारण गरजा भागविण्याचा मार्ग म्हणजे खर्च करणें हा असून मिळकतीमुळें तो करण्यास साधन मात्र उपलब्ध होतें. खर्च व उत्पन्न यामधील हा साध्यसाधन संबंध सरकारच्या बाबतीत विशेष दिसून येतो. ज्याप्रमाणें सरकारच्या खर्चास तात्विक मर्यादा म्हणून नाही त्याचप्रमाणें प्रजाजनाच्या मिळकतीतून सरकारला किती कर घेतां येतील यासही मुळीच सीमा नाही. उदाहरणार्थ, खाजगी व्यक्तींस उपभोगार्थ ज्या ज्या वस्तू लागतील त्यांचा मुबलक पुरवठा करण्याचें काम सरकारनें आपल्या अंगावर घेतलें आहे, असें आपण समजूं. अशा स्थितीत प्रजाजनांचें सर्व उत्पन्न सरकारनें कराच्या रूपानें घेतले तरी त्यात निव्वळ आर्थिकदृष्ट्या व्यक्तीचा तोटा झाला, असे म्हणता यावयाचे नाही. समाजसत्तावाद्याच्या विश्वकुटुंबी पद्धतीत प्रत्येक नागरिकाच्या सर्व प्रकारच्या गरजा भागविण्याची समाजसंस्थेनेच व्यवस्था केलेली असते; व सर्व नागरिकांच्या श्रमानें उत्पन्न केली जात असलेली संपत्ति परस्पर राष्ट्रीय उत्पन्नाच्या साठ्यात पडत असल्यानें निराळे कर बसविणें जरूर किंवा शक्यही नसतें. परंतु अशा पद्धतीत वैयक्तिक व सामाजिक गरजांची जी खिचडी केलेली असते ती साधारण समंजस माणसास न पटणारी असून सरकारनें समाजहिताकरितां प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणे आवश्यक असलेली तेवढीच कामें करून व्यक्तिमात्रास आपल्या इतर गरजा भागविण्यास स्वतंत्र सोडावें हीच विचारसरणी सर्वसंमत झाली आहे. तरी आजकाल समाजहिताच्या दृष्टीनें आवश्यक असलेल्या सरकारच्या कामगिऱ्यांची मर्यादाही अनिश्चित झालेली असून तात्कालिक वसूलाच्या रकमेतच सरकारी खर्च बहुंशीं बसवावा लागतो.

सरकार एकंदर लोकांकरितां व त्यांतील विशिष्ट वर्गाकरितां काय काय कामगिरी करीत आहे यावरच सरकाच्या उत्पन्नाची अंतिम सीमा अवलंबून असते. उलटपक्षीं, तात्कालिक खर्च मात्र तात्कालिक उत्पन्नाहून विशेष अधिक करतां येत नाही. सरकारी उत्पन्न व खर्च याची व्यवस्था करण्याचें जोखमीचें व नाजुक काम ज्यास करावयाचें असतें त्यांस मर्यादित उत्पन्न व अमर्यादित खर्च यांचा पडलेला पेंच सोडवितांना खर्चाच्या बाबीकडेच मुख्यत्वेंकरून लक्ष्य द्यावे लागतें. ज्यामानानें सरकारी खर्च वास्तविक लोकहितार्थ केला जात असेल त्यामानानें लोकांची कार्यक्षमता वाढून राष्ट्राच्या व सरकारच्या उत्पन्नात भर पडते. समाजातील सर्व वर्गाच्या, एका विवक्षित वर्गाच्या किंवा विशिष्ट व्यक्तीच्या हितवर्धनार्थ सरकार जो जो खर्च करतें तो तो शेवटी समाजाच्या एकंदर हितास अनकूल असेल तरच सरकारी उत्पन्नाचा सत्कारणी व्यय झाला असें म्हणतां येईल. साधारण प्रत्येक मनुष्य आपल्या लहानशा उत्पन्नांतून निरनिराळ्या प्रकारच्या गरजा भागवित असतां प्रत्येक उपभोग्य वस्तूपासून आपणांस

जास्तीत जास्त समाधान मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो; व ज्या मानानें त्याचे असे प्रयत्न यशस्वी होतात त्या मानानें तो मितव्ययी आहे, असें आपण म्हणतों. तात्विक व व्यावहारिक दृष्ट्याही हाच विचार सरकारी खर्चास लागू असून निरनिराळ्या प्रकारच्या खर्चापासून समाजाला जास्तीत जास्त फायदा होईल अशा धोरणानें एकंदर खर्च विभागून द्यावा लागतो. अधिक संपत्तीमान लोकांच्या गरजांकरितां कमी खर्च व गरीब लोकांकरितां अधिक खर्च असें परस्पर प्रमाण बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांत दिसून येतें, तेंही या सामाजिक मितव्ययाच्या तत्वाला अनुसरूनच आहे. गरीब लोकांस स्वतःचें उत्पन्न विशेषसें नसल्यानें त्यांची अधिक उपयुक्त वस्तूंस असलेली मागणी, आधींच परेशा उपयुक्त वस्तूंचा उपभोग घेणाऱ्या सुखवस्तु लोकांपेक्षा, तीव्र असते. म्हणून सार्वजनिक खर्चातून ती भागविल्यानें एकंदर समाजाच्या दृष्टीनें योग्य ठिकाणी खर्च झाला असेच म्हणावें लागते.

उलट, समाजसत्तावाद्याच्या एकांगी मतांचा कित्येक राष्ट्रांतील सरकारांवर पगडा बसत असल्यानें मितव्ययाचें हें तत्व झुगारून देऊन गरीब वर्गावर प्रमाणाबाहेर खर्च करण्याची प्रवृत्ति त्यांत दिसून येत. आजमितीसही समाजाच्या उत्पादक सामर्थ्यावर व सामाजिक शांततेवर त्या अपव्ययाचे दुष्परिणाम झालेले दृष्टीस पडतात. विशेषतः अधिकारारूढ वर्ग किंवा पक्ष आपल्या सहाय्यकांच्या गरजा भागविण्यास अधिक खर्च करण्यास तयार होऊन, ज्या ज्या ठिकाणी तशा प्रकारच्या गरजा अस्तित्वांत असतात तेथें तेथें त्यास अनुसरून खर्च करावा लागून मितव्ययाचे तत्व बाजूस राहतें. वाढत्या पगारांचे डोईजड अधिकारी नेमणें हे बहुतेक सर्व राष्ट्रांतील सरकारांच्या अपव्ययाचें ठळक उदाहरण आहे. वास्तविक पाहतां उच्च दर्जाच्या सरकारी नोकरींत जी शाश्वति व प्रतिष्ठा आहे त्यांच्या आकर्षणानें कमी पगारात अधिक कर्तबगारीचें लोक मिळू शकतील. परंतु अनेक प्रकारच्या राजकीय कारणांनीं व्यावहारिक मितव्ययाच्या आर्थिक विचाराकडे कोणीच लक्ष्य देत नाहीं. सरकार आपल्या निरनिराळ्या खात्याकरितां जें सामान विकत घेतें, तें सरकारला माल पुरविण्यानें एक प्रकारचा गौरवपूर्ण जाहिरात होत असल्यानें व सरकारी मागणी मोठी, कायम टिकणारी व बिनधोकयाची असल्यामुळें, व्यापाऱ्यांकडून स्वस्त भावानें विकत घेणें शक्य असतें. परंतु याही बाबतींत अनेक राजकीय विचार आड येऊन जो माल बाजारांत कमी किंमतीला मिळत असलेला आपण पाहतों तोच माल सरकार अधिक किंमत देऊन विकत घेत असल्याचा चमत्कारिक देखावा कित्येक वेळां दृष्टीस पडतो. सरकारी खर्च अंतिम समाजाहिताच्या आर्थिक दृष्टीनें ठरवावयाचा असेल तर असले अनिष्ट प्रकार बंद होणें जरूर आहे.

गरीब व श्रीमंत सर्व प्रजाजनांचें परचक्रापासून व अंतर्गत धामधुमीपासून संरक्षण करणें हें सरकारचें प्रमुख कर्तव्य असल्यामुळें सैन्य व आरमार यांवर होणारा खर्च

तात्विक दृष्ट्या मितव्ययाच्या मर्यादेतच आहे, असें म्हटलें पाहिजे. परंतु, आजकाल निव्वळ संरक्षणाची मर्यादा सोडून देऊन राष्ट्रीय इभ्रतीच्या फोल कल्पना, साम्राज्यमद, इतर राष्ट्रांच्या मुलखाचा अपहार करण्याची दुष्ट बुद्धि, इत्यादि अर्थशास्त्र व नीतिशास्त्र या दोहोंनीही त्याज्य ठरविलेल्या हेतूंनी प्रेरित होऊन अनेक राष्ट्रें आपलीं लष्करी खर्च वाढवीत आहेत. राष्ट्रांतील प्रजाजनांच्या उत्पन्नातून घेतलेल्या करांचा हा प्रत्यक्षपणें अपव्यय होत आहे, हे तर खरेंच; परंतु अशी जय्यत लष्करं बाळगल्यानें व युद्धासारख्या राष्ट्रीय व मानवी आपत्तीपासून ज्याचा स्वार्थ साधण्याची खात्री असते अशा कारखानदारांच्या प्रेरणेनें, अंतर्राष्ट्रीय युद्धें निष्कारण वाढून त्यांप्रीत्यर्थ होणाऱ्या अवाढव्य खर्चाचा व नुकसानीचा बोजाही रयतेवरच पडतो. सर्व राष्ट्रांनीं आपापसांत करार करून आपलीं लष्करें मर्यादित करावीं अशी जी चळवळ हल्लीं चालू आहे ती राष्ट्रांच्या व मनुष्यजातीच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक हितास धरूनच आहे.

**१७ सरकारी कर्ज**--सरकारी उत्पन्नाच्या मानानें खर्च मितव्ययानें करण्यास बहुतेक सुधारलीं व लोकसत्ताक राष्ट्रें तयार किंवा समर्थ नसल्यानें त्यांस आपला फाजील खर्च भागविण्याचें कर्ज काढणें हे एकच कायदेशीर साधन उरतें. अलीकडे तर युद्धाप्रीत्यर्थ होणाऱ्या खर्चाची बेसुमार वाढ झाल्यानें व जवळ जवळ प्रत्येक देशास नेहमीं युद्धप्रसंग करावे लागत असल्यानें, सरकारी जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्यास मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीय कर्ज उभारावें लागतें. त्यांतही आगगाडीचे रस्ते बांधणें, कालवे काढणें, ट्रॅमगाड्या, तारायंत्रें, वीज इत्यादिकांचा पुरवठा करण्याची लोकोपयोगी कामें करणें यांस लागणारें भांडवलही सरकारनें कर्जाच्या रूपानें उभारण्याची पद्धत पडल्यापासून कर्ज काढणें हें सरकारी जमाखर्चाचें कायमचेंच अंग होऊन बसलें आहे. कित्येक लोकांचें असें म्हणणें आहे कीं, पूर्वी प्रजाजनांची सांपत्तिक स्थिति फारच मागसलेली असल्यामुळें राजे लोक व सरकार यांस आपल्या नेहमीच्या उत्पन्नातून कांहीं भाग युद्धांसारख्या संकटकालीं किंवा तलाव, कालवे यांसारख्या लोकहितवर्धक कार्यास खर्च करण्यास सापडावा म्हणून बाजूस काढून ठेवावा लागे. परंतु लोकांची आर्थिक स्थिति सुधारून त्यांजमध्यें द्रव्याचा प्रवाह सारखा वाहत राहिल्यापासून सरकारला केवढीही रक्कम लागली तरी ती लोकांकडून कर्जाच्या रूपानें मिळणें शक्य झालें. यावरून् राष्ट्रीय कर्ज हे राष्ट्राच्या सांपत्तिक प्रगतीचें द्योतक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या युक्तिवादांत सत्याचा फारच थोडा अंश आहे. तो हा कीं, हल्लीं युद्धासारख्या विध्वंसक किंवा आगगाडी कालवे इत्यादि उत्पादक कार्यार्थ जो अवाढव्य खर्च लागतो तो लोकांकडून उपलब्ध होण्यास त्यांच्या स्वतःजवळ असलेला उपयुक्त वस्तूंचा सांठा मुबलक असावयास पाहिजे. मुळात लोकांजवळच

संपत्ति नसेल तर करांच्या व कर्जाच्या रूपानें ती सरकारास मिळूं शकणार नाहीं, हे उघड आहे.

परंतु राष्ट्रीय कर्ज वाढलें म्हणून एकंदर समाजाची संपत्तिक स्थिति भरभराटीची आहे, असें समजणाऱ्या लोकांच्या म्हणण्याचा खरा अर्थ, त्या समाजांतील सर्व व्यक्तींची व वर्गाची आर्थिक प्रगति झालेली आहे असा असतो. सरकारास कर्ज देणें हे सामान्य धंदेवाल्यास अगर संकटग्रस्त किंवा चैनी उपभोक्त्यास कर्ज देण्यासारखेंच असून ज्या लोकांचा व वर्गाचा व्याजानें पैसे कर्जाऊ देण्याच्या पद्धतीनें फायदा होतो त्यांच्याच आर्थिक परिस्थितीचें सरकारी कर्जावरून फार झालें तर अनुमान काढतां येईल. मजूर वर्ग, गरीब लोक व बहुतेक मध्यम वर्ग यांच्या परिस्थितीचा सरकारी कर्जाच्या वाढीशी अन्योन्य संबंध फारसा असत नाहीं. शिवाय, राष्ट्रीय कर्ज वाढलें म्हणजे सामाजिक संपत्ति वाढली असें म्हणण्यांत खुद्द सरकारची सांपत्तिक स्थितीही समाधानकारक आहे, असें ध्वनित केलें जातें. परंतु हा निष्कर्ष डोळे मिटून कबूल केल्यास एखाद्या उधळ्या जहागिरदाराला व एका धाडसी धंदेवाल्याला बरेंच मोठें कर्ज आहे म्हणून दोघांचीहि भरभराट होत आहे, असें मानण्याइतकेंच तें चुकीचें होईल. एकंदर समाजाची आर्थिक प्रगति, पतीवर व्याजानें कर्ज देण्याच्या पद्धतीचा प्रसार, देशांत शांततेचें व चिरस्थायी राज्यपद्धतीचें प्रस्थापन व लोकसत्ताक राष्ट्रांतील प्रजाजनांस सरकारबद्दल वाटणारी आपलेपणाची भावना या सर्व कारणांमुळें सरकारला आपल्या पतीवर स्वदेशी व परदेशी भांडवलवाल्यांकडून कर्ज उभारणें शक्य झालें आहे. या कर्जाच्या परिमाणावरून एखाद्या सरकारच्या व समाजाच्या सांपत्तिक स्थितीविषयीं अनुमान काढण्यापूर्वी कर्ज उत्पादक कार्याकरितां अगर विध्वंसक कार्याकरितां काढलेलें आहे, तें स्वराष्ट्रीयाकडून अगर परराष्ट्रीयांकडून घेतलेलें आहे, इत्यादि गोष्टींचा पूर्णपणें विचार केला पाहिजे.

हल्लीं अर्थशास्त्रज्ञ साधारणपणें असें समजतात कीं, सरकारला सामान्यतः प्रतिवर्षी खर्चास लागणारी रक्कम करांच्या व सरकारी उत्पादनासारख्या इतर टिकाऊ मार्गांनींच मिळविली पाहिजे. अंदाजापेक्षां जमेंत खोट येऊन अगर खर्चांत वाढ होऊन जमाखर्चांत तूट पडली व ही तूट नेहमीं तशीच राहण्याचा संभव आहे, असें वाटूं लागलें तर करांच्या दरांत अगर संख्येंत वाढ करून ती भरून काढली पाहिजे. परंतु युद्धासारखें, दुष्काळासारखें, जपानांतील धरणीकंपासारखें एखादें महासंकट उद्भवलें तर त्याचें निवारण करण्यास लागणारा प्रचंड खर्च उत्पन्नांत तात्कालिक वाढ करून भागविणें शक्य नसतें व अशा वेळीं कर्ज उभारणें हाच एक मार्ग व्यवहार्य असतो. तरी देखील काढलेल्या कर्जावरील निदान व्याज देऊन टाकण्यास पुरण्याइतकें उत्पन्न करांपासून मिळविलें

पाहिजे. सरकारी कर्ज उभारणें, व विशेषतः युद्धासारख्या बहुंशी अनुत्पादक कार्यांत तें खर्च करणें, म्हणजे राष्ट्रांतील पुढील पिढ्यांच्या प्रजाजनांवर कायमचा बोजा लादून ठेवणें होय. आगगाड्या, कालवे ट्रॅमगाड्या, गॅस व वीज यांचा पुरवठा, बंदरांची सुधारणा, पाण्याची सोय, इत्यादि लोकहितवर्धक व उत्पादक कार्यास जो खर्च येतो तो शक्य तितका सरकारनें आपल्या उत्पन्नांत बचत करून भागवावा व पुढें त्या धंद्यांपासून येणारें व्याज व नफा यांमुळें करांचें ओझें कमी करण्यास अगर प्रजेच्या सुखवर्धनार्थ खर्च करण्यास तयार असावें, ही सर्वांत उत्तम गोष्ट होय. परंतु यांपैकीं बहुतेक सर्व कार्यास एवढा प्रचंड खर्च लागतो कीं, सरकारच्या शिलकेंतूनच तो करावयाचा असें म्हटल्यास ती केली जाणें प्रायशः अशक्यच असतें. ज्याप्रमाणें एखादा व्यापारी अगर धंदेवाला आपल्या धंद्यास लागणाऱ्या खर्चाचा पूर्ण अंदाज करून त्यावर मिळणारें उत्पन्न अधिक असल्यास धंदा चालविण्याकरितां कर्ज काढण्यास कचरत नाहीं, त्याचप्रमाणें सरकारनेंही एखाद्या उत्पादक कार्यार्थ कर्ज काढलें तर त्यांत कांहीं वावगें नाहीं. अवर्षणामुळें दुष्काळ पडूं नये म्हणून पाटबंधारे, कालवे इत्यादि कामें सरकार आपल्या अंगावर घेत असतें. अशा प्रकारची कामगिरी सकृद्दर्शनीं उत्पादक वाटत नसली तरी ती प्रतिबंधक स्वरूपाची व लोकहितास आवश्यक असल्यानें तिच्याकरितां सरकारनें कर्ज उभारलें व व्याज आणि मुद्दल हीं आपल्या एकंदर वसुलांतून हळूहळू देऊन टाकली तरी चालण्यासारखें असतें.

कित्येक वेळा, व विशेषतः युद्धकर्जाच्या बाबतींत, सरकार जेव्हां कर्ज उभारतें तेव्हां व्याजाचे दर चढीचे असून पुढें शांततेच्या अगर व्यापारांतील मंदीच्या काळांत ते उतरतात. अशा वेळीं सरकार कमी व्याजाच्या दरानें नवें कर्ज उभारून जुन्या भारी व्याजाच्या कर्जाची फेड करतें व प्रजाजनांवरील करांचा बोजा त्यामानानें हलका होतो. सरकारनें आपल्या उत्पन्नांतून दरसाल कांहीं तरी भाग बाजूस काढून ठेवून हळूहळू अनुत्पादक कर्ज फेडून टाकावें ही गोष्ट तात्त्विक दृष्ट्या सर्व राष्ट्रांतील फडणवीस कबूल करीत असले, तरी एका बाजूनें कर कमी करण्याबद्दल प्रजेची ओरड व दुसऱ्या बाजूनें खर्च वाढविण्याबद्दल प्रत्येक खात्याची व राजकीय दृष्ट्या बलवान असलेल्या वर्गांची मागणी यांमुळें व्यवहारांत मात्र अनुत्पादक कार्याकरितां एकदा कर्ज काढलें म्हणजे त्याची फेड करणें जवळ जवळ अशक्य होतें. सरकारी कर्जांचे ते काढण्याच्या हेतूवरून उत्पादक व अनुत्पादक हे जसे दोन वर्ग करतां येतात तसेंच कर्ज काढण्याच्या पद्धतीप्रमाणें शाश्वत अगर कायमचें व हंगामी असें कर्जांचें दुसरेंही एक वर्गीकरण करतां येतें. ज्या कर्जाची अमुक एका वेळेपूर्वी फेड करण्यास सरकार बांधलें गेलेलें नसतें, तें कायमचें कर्ज होय. असें कर्ज सरकार आपण होऊन केव्हांही परत देऊं लागलें तर मात्र धनकोस तें घ्यावें लागतें. अशीं कर्जें म्हणजे

ठराविक उत्पन्नांची सरकारी वर्षासनेंच असल्यानें बाजारांतील व्याजाचा दर जसजसा कमीजास्त होतो तसतसा अशा कर्जरोख्यांचा भावही बदलतो. जें कर्ज ठराविक वेळी परत करण्याची सरकारनें हमी घेतलेली असते त्या कर्जास हंगामी कर्ज असें म्हणतात. महिनावार मुदतीनें काढलेल्या खजिन्याच्या हुंड्या व निरनिराळ्या ठराविक वर्षांच्या मुदतीचे कर्जरोखे यांचा हंगामी कर्जांत समावेश होतो. असलें कर्ज फार मोठ्या प्रमाणांत काढलेलें असेल तर सरकारी खर्च, करांचा बोजा, धंदेवाल्यांचें उत्पादक सामर्थ्य व समाजाचे एकंदर आर्थिक व्यवहार हे सर्व अनिश्चित होऊन देशाची प्रगति व इभ्रत यास धोका येतो. एवढ्याकरिता अनुत्पादक कर्जाचा फार मोठा भाग हंगामी स्वरूपांत, निदान कमी मुदतीच्या रोख्यांत, न ठेवण्याची काळजी बाळगावी लागते.

**१८ स्थानिक संस्थांचें उत्पन्न व त्यांचा खर्च**--निव्वळ तात्विक दृष्ट्या सरकारी व स्थानिक संस्थाच्या जमाखर्चात विशेष फरक आहे, असें नाही. परतु स्थानिक संस्थांचा आपापल्या हद्दीतील राहिवाशांवर कर लादण्याचा अधिकार त्यांस मध्यवर्ति सरकारकडून मिळालेला असून करांच्या विवक्षित मर्यादा व खर्चाच्या बाबी यांवरही त्या सरकारचें थोडेंबहुत नियंत्रण असतें. उलट, स्थानिक संस्थांच्या कामगिरीचें क्षेत्र मर्यादित असल्यामुळे कोणत्या कामगिरीपासून कोणकोणत्या राहिवाशास लाभ होतो, हें ठरवून त्यांच्यावर त्यांस मिळणाऱ्या लाभाच्या प्रमाणांत कर बसवितां येतात. उदाहरणार्थ, कांही भांडवल खर्च करून पिण्याच्या पाण्याची नागरिकाकरितां विशेष सोय करण्यांत आली असेल तर प्रत्येक इसमास जेवढें पाणी लागेल तेवढें मोजून देऊन त्यामानानें पाणीपट्टी वसूल करतां येते. परंतु स्थानिक संस्थांनाही आपल्या क्षेत्रांतील सर्व नागरिकांच्या हिताकरितां करावी लागणारी कामगिरी कांही थोडी नसते. रस्ते करणे व ते व्यवस्थित ठेवणे, दिवे लावणें, आरोग्य राखणें, शिक्षण देणें इत्यादि गोष्टींपासून कोणत्या नागरिकांचा किती फायदा झाला हें नक्की ठरविणें अशक्य असतें. सर्व नागरिकांवर सारखा कर बसवूनच अशा कार्यांचा खर्च भागवावा लागतो. हे कर बसवितांना करग्रहण व करांचा भार यांबद्दल मागें जे नियम सांगितले ते ध्यानांत घ्यावे लागतात, हें खरें आहे. परतु स्थानिक संस्थांचा खर्च व ते भागविण्यास बसवावे लागणारे कर यांचें राहिवाशांच्या उत्पन्नाशीं फारच अल्प प्रमाण असल्यामुळें त्यांचा शास्त्रीय दृष्ट्या जेवढा विचार व्हावयास पाहिजे तेवढा होत नाही.

बहुतेक सर्व राष्ट्रांतील स्थानिक संस्था घरपट्टी बसवून आपल्या उत्पन्नाचा बराच मोठा भाग मिळवितात. हा कर लादण्याचे दोन मुख्य प्रकार आहेत. कित्येक ठिकाणी प्रत्येक भाडेकऱ्यास कर द्यावा लागतो तर दुसऱ्या कांहीं ठिकाणी तो फक्त जागेच्या मालकांकडूनच घेतला जातो. मागें

अशा करांच्या भाराची विभागणी कोणत्या प्रमाणांत होते याबद्दल विवेचन केलेलें आहे. त्यावरून स्थानिक संस्थेनें आपणांस कोणाकडून कर घ्यावयाचा आहे, हें ठरवून त्याजवळूनच तो प्रत्यक्षपणे वसूल करावा हे इष्ट होय, असें दिसून येईल. शिवाय स्थानिक संस्थांच्या कामगिरीपासून सर्व लोकांस जवळ जवळ सारखाच फायदा होत असल्यानें पुष्कळ वाबतींत सर्वांकडून सारखीच कराची रक्कम घेण्यात येते. करांचें प्रमाण कर देणाराच्या सामर्थ्याप्रमाणें वाढवावयाचें असें ठरविलें तर तें सामर्थ्य कसें मोजावयाचें, हा प्रश्न उद्भवतो. बहुतेक राष्ट्रांत स्थावर मालमत्तेच्या किमतीवर अशा करांचें प्रमाण ठरविण्यात येतें. कारण कित्येक वेळा उत्पन्न अनिश्चित तर कित्येक वेळा तें एनजिनसी असल्यामुळें तें प्रत्येक वेळेस बरोबर मोजतां यावयाचें नाही. ही अडचण दूर करण्याकरिता हिंदुस्थानांतील जमीनधाऱ्यासारख्या करावर किंवा कांही पाश्चात्य देशांतील प्राप्तीवरील करावरच सरकार स्थानिक संस्थांस पट्टी बसविण्याची परवानगी देते. शहरवासीयांची जंगम संपत्ति अदृश्य व चलनशील असल्यामुळे तिच्यावर पद्धशीरपणें कर बसवून ते वसूल करणें स्थानिक संस्थास अशक्य असतें.

सरकारप्रमाणें स्थानिक संस्थासही आपला खर्च करतांना सामाजिक मितव्ययाचें तत्व ध्यानांत बाळगावें लागतें. परंतु पुष्कळ वेळां अशा संस्थावर कांही विशिष्ट व्यक्तींचा अगर जनसमूहाचा पगडा असेल तर सर्व लोकावर कर बसवून मिळविलेल्या पैशाचा विनियोग मात्र कांही विवक्षित लोकांच्या हितवर्धनार्थ केला जातो. नागरिकामध्यें स्थानिक संस्थांच्या जमा-खर्चाची छाननी करण्याचा जागरूकपणा ज्यामानानें अधिक असेल त्यामानानें स्थानिक खर्च अयोग्य रीतीनें होण्याची भीती कमी होईल. कित्येक स्थानिक संस्था, ट्रॅमगाड्या चालविणें, लहान सहान आगगाड्यांतून माल व उतारू यांची वहा-तुक करणें, टेलीफोन, गॅस, वीज इत्यादि सोयी नागरिकास उपलब्ध करून देणें असली मोठ्या खर्चाची कामेंही आपल्या अंगावर घेऊन ती चालविण्यास कर्ज उभारतात. एखाद्या ठिकाणी दुष्काळ, पूर, सांथीचे रोग, बंडखोरी इत्यादि आकस्मिक संकटे उद्भवली तर त्यांचें निवारण करण्याकरिता होणारा खर्चही कर्ज उभारूनच भागवावा लागतो. स्थानिक संस्थांचें उत्पन्न, त्यांचा खर्च व या दोहोंची कांहीं कारणानें तोंडमिळवणी न झाली तर त्यांस काढावें लागणार कर्ज या सर्वांबद्दल बहुतेक राष्ट्रांतील सरकारांनी विस्तृत कायदे केलेले असून, ते कर-तांना सरकारचें उत्पन्न, खर्च व कर्ज याबद्दल मागें जी सर्वसाधारण तत्त्वें सांगि-तली आहेत तीच मुख्यत्त्वेंकरून ध्यानांत घेतलेली असतात.

सार्वजनिक संस्थांच्या द्वारा प्रजाजनांस मिळणाऱ्या सुखसोयींत जसा सरकारी व स्थानिक संस्थांच्या कामगिरीचा अंतर्भाव करावा लागतो त्याचप्रमाणें सार्वजनिक

खर्चाकरितां प्रजेस किती भार सोसावा लागतो, हे ठरवितांना सरकारचें व स्थानिक संस्थांचे उत्पन्न मिळविण्याचे कराच्या स्वरूपाचे सर्व मार्ग हिशेबात धरावे लागतात व सरकारी आणि स्थानिक कराची बेरीज करूनच प्रत्येक नागरिकावरील एकंदर कराचा बोजा ठरवावा लागतो. कांहीं विवक्षित कर तर स्थानिक संस्था मध्यवर्ति सरकारच्या कराच्या अनुरोधानेच बसवीत असतात. उदाहरणार्थ, राष्ट्राच्या सरहद्दीवर घेतल्या जाणाऱ्या जकाती आणि प्रत्येक स्थानिक संस्था आपल्या हद्दीवर घेत असलेल्या जकाती यांत बरेंच साम्य आहे. परचक्रापासून संरक्षण हे मध्यवर्ति सरकारचे कार्य जेवढे महत्त्वाचे आहे तेवढीच, किंबहुना त्याहूनही जास्त, महत्त्वाचीं अशीं आरोग्य, प्राथमिक शिक्षण, निर्धनास मदत इत्यादि कामें स्थानिक संस्था करीत असतात. या कामाचा व्याप वाढता असल्यानें स्थानिक उत्पन्नाचें व खर्चाचे सरकारी उत्पन्नाशीं व खर्चाशीं असलेलें प्रमाणही वृद्धिंगत होत आहे. प्रजाजनांच्या तात्कालिक हिताचीं कामें स्थानिक संस्थाच करीत असल्यानें त्यांच्या उत्पन्नांतून आवश्यक खर्च न भागला तर मध्यवर्ति सरकारास त्यांना ठराविक देणगी-च्या रूपानें, एखादा कर किंवा करावरील पट्टी तोडून देऊन, किंवा पैसे कर्जाऊ देऊन मदत करावी लागते. यावरून राष्ट्रांतील प्रजाजनांस सार्वजनिक सुखसोयी किती व कोणत्या प्रमाणांत मिळतात आणि सार्वजनिक खर्चाचा बोजा त्यास किती सहन करावा लागतो याची वास्तविक कल्पना येण्यास सरकारी व स्थानिक उत्पन्न, खर्च आणि कर्ज यांचा एकत्र विचार केला पाहिजे, हे दिसून येईल.



# प्रकरण पांचवें



## संपत्तीचा उपभोग

**१ उपभोग**--प्रस्तुत ग्रंथाच्या प्रारंभी अर्थशास्त्र ह्या विषयासंबंधी वाचकांस सामान्य माहिती करून देतांना मनुष्याच्या आधिभौतिक गरजा व त्या भागविण्याकरितां ते करीत असलेले प्रयत्न हाच अर्थशास्त्राचा मुख्य विषय होय असे सांगितलें आहे. मनुष्याच्या आर्थिक व्यवसायास प्रारंभ होतो तो त्याच्या गरजापासून होत असून त्या गरजा भागल्या म्हणजे त्याच्या प्रयत्नाची सिद्धि झाली असें समजलें पाहिजे. मनुष्यमात्र निरनिराळ्या प्रकारांनी जो जो प्रयत्न करतो तो तो आपली एखादी गरज भागविण्याकरितांच असतो व कांही तरी पदार्थ अगर कामगिऱ्या मिळवूनच त्यास आपलें समाधान करून घ्यावें लागतें. उपयुक्त वस्तु वापरून मनुष्ये आपल्या निरनिराळ्या गरजांचे समाधान करून घेतात, ह्या त्यांच्या कृतीलाच संपत्तीचा उपभोग असें म्हणतात. उपयुक्ततेचें अस्तित्व सर्वस्वी मनुष्याच्या भोगेच्छेवर अवलंबून असल्यानें एकंदर 'संपत्ती' चें आर्थिक महत्त्वही उपभोक्त्याच्या गरजांचें योग्य रीतीनें समाधान होण्यांत आहे हें विसरतां कामा नये. मनुष्यांच्या गरजा हा आर्थिक व्यवसायाचा उगम व संपत्तीचा उपभोग हाच त्याचा शेवट होय. आर्थिक व्यवसायही मुख्यतः संपत्तीच्या उत्पादनार्थ अंगिकारावे लागत असल्यानें अर्थोत्पादनास साहजिकपणेंच विशेष महत्व आहे. परंतु दिवसानुदिवस परस्पर देवघेवीनें आपल्या गरजा भागविण्याचा प्रघात वाढत्या प्रमाणावर पडत असल्यामुळें संपत्तीच्या विनिमयास उत्पादनाइतकेंच, किंबहुना कांहीं अंशीं थोडेंसें अधिक प्राधान्य देणें भाग आहे. एका दृष्टीनें तर उत्पादन व विनिमय हीं दोन्हीं अंगें एकरूपच समजावयास हरकत नाहीं. कारण उपभोग्य वस्तूंतील उपयुक्तता वाढविणें हें मूलभूत आर्थिक महत्वाचें कार्य संपत्तीचें 'उत्पादन' होऊन 'विनिमय' द्वारा ती वस्तुरूपानें उपभोक्त्यांच्या हातांत जाईपर्यंत चालू असतें. परंतु उत्पादक श्रमाच्या मानानें समाजांतील निरनिराळ्या वर्गांत संपत्तीची 'विभागणी' होऊन मग उपभोक्ते या नात्यानें निरनिराळे लोक आपणांस जरूर असलेल्या वस्तु खरेदी करतात व त्यांच्या 'उपभोगानें' आपल्या आर्थिक परिश्रमाचें चीज करून घेतात. प्रस्तुत ग्रंथांतील अर्थशास्त्रविषयक विवेचन उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग ह्या अनुक्रमानें केलें आहे तें आर्थिक व्यवसायाच्या ओघास अनुरूरून आहे हें ह्यावरून दिसून येईल.

कांहीं उद्यमशील मनुष्यांस श्रमाची इतकी आवड असते की ते करीत असलेले व्यवसाय हे दुसरी एखादी उपयुक्त वस्तु मिळविण्याचें साधन असें न समजतां

स्वतःच त्यांचें उद्दिष्ट असें मानलें तरी चालण्यासारखें असतें. मागें खेळ व करमणूक यांप्रीत्यर्थ होणारे श्रमही साध्यभूत असतात असें म्हटलें आहे. उद्यमशील व क्रीडोत्सुक मनुष्यांचे हे अपवाद सोडून दिले तर एकंदरीनें 'उपभोग' हा आर्थिक व्यवसायाचा हेतु व उद्दिष्ट असतें असें म्हणण्यास हरकत नाही. एवढ्यावरून उपभोगामुळें प्रत्यक्षपणें संपत्तीच्या उत्पादनावर कांही परिणाम होतो असें मानणें मात्र चूक होईल. कारण 'उपभोग' हा अर्थोत्पत्तीचा एक प्रमुख हेतु असला तरी निसर्ग, भांडवल व श्रम ह्यांप्रमाणें तो उत्पादनाचा घटक होऊं शकत नाही. एखाद्या वस्तूच्या उपभोगार्थ असलेली लोकांची मागणी वाढली अगर कमी झाली तर त्या वस्तूच्या किंमतीत फेरबदल होऊन अप्रत्यक्षपणें उत्पादनावर व विभागणीवर काय परिणाम होईल तो निराळा. संपत्तीचा उपभोग हा सर्व आर्थिक व्यवसायांचें उद्दिष्ट असूनही अर्थशास्त्रविषयक विवेचनांत त्यास प्रमुख स्थान न मिळण्याचें दुसरें एक कारण असें आहे की वस्तूंचा उपभोग हा केवळ आर्थिक विषय नसून तो बहुंशी सामाजिक व नैतिक महत्त्वाचा आहे. उपभोगाचें निव्वळ आर्थिक दृष्ट्या अवलोकन करावयाचें असें म्हटलें तरी देखील सरूदर्शनी वाटतें त्यापेक्षां त्यास अधिक महत्त्व आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. विशेषतः संपत्तीच्या उपभोगाच्या निरनिराळ्या मार्गांचा, उत्पादन, विनिमय व विभागणी याबद्दल समाजांत जे प्रचार व ज्या संस्था अस्तित्वांत असतात त्यांवर काय परिणाम होत आहे हें पाहणें जरूर असतें. शिवाय, सामान्य मनुष्यांची भोगेच्छा, किंवा उपयुक्त वस्तूंबद्दल त्यांस वाटणारी गरज, ही विविध मार्गांनी वाढत असल्यानें ह्या नवीन गरजांचा समाजांतील एकंदर आर्थिक परिस्थितीशीं काय संबंध आहे हेंही ठरविणें प्राप्त आहे. सामान्य जीवितक्रमास आवश्यक समजल्या जाणाऱ्या वस्तूही सर्व वर्गांस पुरेशा मिळत नाहीत ही जाणीव बहुतेक समाजहितचिंतकास टोंचीत असल्यानें दिवसानुदिवस 'उपभोग' ह्या विषयास योग्य महत्व प्राप्त होत आहे. संपत्तीच्या उत्पादनाकरितां मनुष्यप्राणी जन्माला आला नसून मनुष्याच्या सुखाकरितां संपत्तीचें अस्तित्व आहे, ह्या वचनाची सत्यता जों जों लोकांस पटेल तों तों संपत्तीच्या उपभोगासंबंधी अधिक लक्ष्यपूर्वक विचार झाल्याशिवाय राहणार नाही. एखाद्या समाजांतील सर्व व्यक्तींच्या प्राथमिक गरजा भागल्या असें धरून चाललें तरी अर्वाचीन प्रगमनशील राष्ट्रांतील नागरिकांच्या गरजा सारख्या वृद्धिंगत होत असतात. गरजांच्या ह्या अमर्याद वाढीचा संपत्तीच्या उपभोगावर व उत्पादनावर दोन प्रकारांनी परिणाम होत असतो. पहिली गोष्ट ही की जसजशा नवीन गरजा निर्माण होतात तसतसा उपभोक्त्यांच्या मागणीत फरक होत जाऊन शेवटीं उत्पादन व विनिमय ह्यावरही परिणाम झाल्याशिवाय राहत नाही. दुसरें असें की एकंदर गरजांची संख्या वाढत असतांच ज्यांस आपण सामान्य माणसाच्या आवश्यक गरजा असें समजतों त्याही वाढत व बदलत अस-

जात. त्यामुळें उपभोग व उत्पादन ह्यांचा मेळ बसणें दुःसाध्य होते. मनुष्यांच्या गरजांतील अमर्याद वाढीचा विशेष, नैसर्गिक उत्पादन साहित्याचा मर्यादित पुरवठा व ह्या दोन परस्पर विरोधी गोष्टींची तोंडमिळवणी करण्याकरिता अस्तित्वात आलेल्या सामाजिक संस्था व रीतीभाती ह्यांचा विचार करणें अर्थशास्त्राचें पूर्णत्वानें ज्ञान होण्यास आवश्यक आहे. उपभोगातील, म्हणजे मागणीतील, फेरबदलाचा उत्पादनांतील, म्हणजे पुरवठ्यांतील, फेरबदलाशीं किती निकट संबंध आहे ह्याबद्दल मूल्योद्भवाच्या तत्वास अनुसरून उत्पादन, विनिमय व विभागणी ह्यामध्यें जे अनेक 'व्यापार' घडून येतात त्याचें विवेचन करताना मागें दिग्दर्शित केलेलेंच आहे. प्रस्तुत स्थळीं उपभोगासंबंधीच्या निरनिराळ्या प्रचाराचा इतर आर्थिक घटनेवर कस कसा परिणाम होतो हेंच मुख्यत्वानें पहावयाचें आहे.

संपत्तीच्या उपभोगासंबधी विस्तरशः विवेचन करण्यापूर्वी उपभोग ह्या शब्दाचा अर्थ निश्चित करणें आवश्यक आहे. मनुष्याची गरज भागविण्याप्रीत्यर्थ संपत्तीचा होणारा विनियोग म्हणजे 'उपभोग' असें वर म्हटलें आहे, व ही व्याख्या इतकी स्पष्ट आहे कीं, तिजबद्दल शंका राहण्याचें वास्तविक कारण असूं नये. परंतु कित्येक ग्रंथकार उपभोगाचे 'उत्पादक' उपभोग व 'अंतिम' उपभोग असें एक वर्गीकरण करीत असतात. ज्या उपयुक्त वस्तूचा मनुष्याच्या सुखवर्धनार्थ तात्काल उपयोग न होता इतर उपभोग्य वस्तु निर्माण करण्यास विनियोग केला जातो त्याच्या कार्यास उत्पादक उपभोग म्हणावें असें सुचविण्यात येतें. उदाहरणार्थ, अंगात घालावयास कपडे शिवण्याकरिता जें कापड तयार होतें, तें तयार करताना विणकराचा माग, अगर अर्वाचीन पद्धतीच्या गिरणीतील यंत्रे ह्यांची हळूहळू झीज होत असते व उत्पादन कार्यार्थ त्याचा व्यय होणें हा त्याच्यापुरता 'उपभोग' असेंच म्हटलें पाहिजे. परंतु तयार कापड हें तात्काल मनुष्याच्या एखाद्या गरजेचें समाधान होण्यास उपयोगी पडत असल्यानें व त्या कार्यांतच उपयुक्त वस्तु ह्या दृष्टीनें त्याचें अस्तित्व संपत असल्यानें कापड मनुष्याकडून वापरलें जाणें हा त्याचा 'अंतिम' उपभोग होय. ह्या वर्गीकरणास शास्त्रीय अगर व्यावहारिक महत्व म्हणण्यासारखें नाहीं. तयार वस्तूंच्या उत्पादनास साहाय्यभूत मार्गानें उपयोगी पडणाऱ्या वस्तूंच्या कार्यास जर उत्पादक उपयोग म्हणावयाचें तर कारखान्यातील मजुरांस मजूरी मिळते व त्यांतून ते आपल्या अन्नवस्त्राच्या गरजा भागवितात त्यासही उत्पादक उपभोग म्हणावें लागेल. ह्यावर प्रस्तुत वर्गीकरणाच्या पुरस्कर्त्यांचें असें म्हणणें आहे कीं मजूर हे समाजाचे घटक असून त्यांच्या गरजांची तृप्ति होणें हें सर्व संपत्तीचें अंतिम कार्य असल्यानें त्यांच्या उपभोगास 'उत्पादक' असें म्हणतां येणार नाहीं. ह्या उत्तरांत अर्थातच पुष्कळ तथ्य आहे. परंतु मनुष्य व त्याच्या गरजा हा अर्थशास्त्राचा मुख्य विषय व त्या 'गरजा' भागविणें म्हणजे 'संपत्तीचा

उपभोग ' असे एकदां कबूल केलें म्हणजे यंत्रसामुग्री, कच्चा अगर अर्धवट तयार झालेला माल ह्यांच्या उत्पादन कार्यात होणाऱ्या व्ययास ' उपभोग ' म्हणणें हें योग्य होणार नाही. प्रस्तुत प्रकरणांत उपभोग हा शब्द खऱ्या शास्त्रीय अर्थानें वापरलेला असून वरील वर्गीकरणांतील 'अंतिम' स्वरूपांच्या गरजा भागविण्यासंबंधीच ह्या स्थळीं विवेचन करण्याचें योजिलें आहे.

**२ मितव्यय**—एकंदर समाजाच्या दृष्टीनें, त्याचप्रमाणें समाजातील बहुतेक व्यक्तींच्या दृष्टीनेंही गरजांच्या मानानें उपयुक्त वस्तूंचा पुरवठा नेहमींच मर्यादित असतो, असें म्हणावयास हरकत नाही. म्हणून सामान्य इसमापुढे नेहमीं जो प्रश्न दत्त म्हणून उभा असतो तो उपलब्ध उत्पन्नांत शक्य तितक्या अधिक गरजा भागविण्यासंबंधी होय. मध्यम वर्गांतील एखाद्या गरिबशा कुटुंबांतील सुगृहिणीचें उदाहरण घेतल्यास आपणास असें दिसून येईल कीं एकंदर घरखर्चापासून कुटुंबाच्या संसारसुखांत जास्तींत जास्त भर पडेल अशा धोरणानें ती एकंदर गरजांत खर्च विभागून देते. एखाद्या महिन्याच्या शेवटीं जर तिला असें दिसून आलें कीं साखरेवर वाजवीपेक्षां अधिक खर्च झाल्यानें दूधातुपांत तूट आली व त्यामुळें एकंदरीनें कुटुंबांत असमाधान राहिलें तर ती लगेच कमी साखर घेऊन अधिक दूधतूप घेते. हजारों स्त्रिया प्रायः नैसर्गिक अंतःप्रेरणेनें त्यांस मिळणाऱ्या सामुग्रींतच, 'एक सुतळीचा तोडाही वाया जाऊं न देतां' संसार करीत असतात. ह्या नेहमीं दिसून येणाऱ्या गोष्टींतच अर्थशास्त्रविषयक एका महत्वाच्या तत्वाचें बीज असून सामान्यतः सर्व मनुष्यांच्या उपभोगास तें लागू पडतें. त्यांच्या गरजांच्या मानानें त्यांस उपलब्ध असलेल्या उपभोगसामर्थ्याचें, म्हणजे त्यांच्या उत्पन्नाचें, प्रमाण मर्यादित असून आपलें उपभोगसामर्थ्य निरनिराळ्या उपभोग्य वस्तूंत विभागून त्यापासून अधिकांत अधिक उपभोग घेण्याची त्यांची प्रवृत्ति असते. मागें प्रास्ताविक भागांत सर्व आर्थिक व्यवसायांच्या मुळाशीं मितव्ययाचें तत्व आढळून येतें असें म्हटलें आहे. उपभोग ह्या आर्थिक व्यवसायांत मनुष्य साधारणतः ह्याच तत्वाचें पालन करतो असें सहज दिसून येईल. म्हणजे विविध प्रकारच्या आपल्या गरजा भागवितांना उपभोगसामर्थ्याचा कमींत कमी व्यय करून एकंदरीनें उपभोगसौख्य मात्र अधिकांत अधिक लाभावें अशी तो खटपट करतो. एवढ्याचकरितां एखाद्या वस्तूच्या उपभोगापासून प्रमाणापेक्षां कमी समाधान होतें असें त्यास वाटूं लागतांच तो ती वस्तु अधिक वापरण्याऐवजीं दुसरी एखादी गरज भागविण्यास प्रवृत्त होतो, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. गरजा मनुष्याच्या भोगेच्छेवर पगडा बसविण्याकरितां परस्परांत चढाओढ करतात असें जें मागें सांगितलें आहे त्याचें महत्व उपभोगांतील मितव्ययाच्या तत्वानें वाचकांस विशेष पटेल.

उपभोगसामर्थ्य, म्हणजे उपयुक्त वस्तु मिळविण्याचें सामर्थ्य, जास्तींत जास्त फायदेशीर मार्गानें उपयोगांत आणण्याची साधारण माणसांची प्रवृत्ति व्यवहारी जमाखर्चांतील इतर अनेक उदाहरणावरून विशेष ध्यानात घेण्यासारखी आहे उपभोगसामर्थ्य, म्हणजे प्रत्येक माणसाची संपत्ति, ही जमा व तिचा प्रत्यक्ष उपभोगार्थ विनियोग हा त्या माणसाचा खर्च असेच समजलें पाहिजे. सामान्य संसारी मनुष्य आपला खर्च कसा निर्यमित करतो ह्याचे सूक्ष्म अवलोकन केल्यास आपणास असें दिसून येईल कीं तो उपभोगांतील मितव्ययाचें वर सांगितलेलें तत्वच मुख्यतः पाळीत असतो. एखाद्या बाबतीवर खर्च करावा किंवा नाहीं असा प्रश्न मनुष्याच्या मनापुढें उभा राहिला म्हणजे त्या खर्चापासून आपणास होणार समाधान दुसऱ्या एखाद्या मार्गानें होणाऱ्या खर्चापेक्षा अधिक आहे किंवा नाहीं हें ठरविण्याकडेच त्याच्या मनाचा कल असतो. खर्चाच्या प्रत्येक बाबीची उपभोक्त्याच्या मनात अशी तुलनात्मक छाननी होत असल्यानें शेवटीं तो आपल्या एकंदर उत्पन्नाची निरनिराळ्या खर्चाच्या बाबींत जी विल्हेवाट करतो ती त्यास जास्तींत जास्त सुखदायक होते असें म्हटलें पाहिजे. एखाद्या गोष्टीवर प्रमाणाबाहेर खर्च होत आहे, म्हणजे होणाऱ्या खर्चाच्या मानानें समाधान कमी होत असून दुसऱ्या एखाद्या मार्गानें खर्च केल्यास अधिक समाधान होण्याची खात्री आहे, असें त्यास वाटल्यास तो तावडतोब एका बाबीवरील खर्च कमी करून दुसरीवर खर्च करण्यास तयार होतो. सर्व बाबीवरील खर्च असा जास्तींत जास्त सुखदायक प्रमाणापर्यंतच होत असल्यानें प्रत्येक प्रकारच्या खर्चापासून उपभोक्त्यास होणार 'सीमागत' समाधान सारखेंच असलें पाहिजे हें उघड आहे. उदाहरणार्थ, एखादा इसम अन्नखर्चावर पन्नास रुपये व वस्त्रप्रावरणावर दहा रुपये खर्च करीत असला तर खाद्यपदार्थांच्या शेवटल्या अंशापासून त्याचें जितकें समाधान होतें तितकेंच कपड्यांच्या शेवटल्या अंशापासून होत आहे असें समजणें भाग आहे. कारण अन्न व वस्त्र ह्यांचें प्रस्तुत उदाहरणांतील सीमागत समाधान कमी जास्त असेल तर खर्चाचें प्रमाण कमीजास्त झाल्याशिवाय, म्हणजे अन्न अगर कपडेलत्ते ह्यांपैकीं एका बाबीवरील खर्च कमी होऊन दुसरीवरील खर्चांत वाढ झाल्याशिवाय राहणार नाहीं. सामान्य मनुष्य आपलें एकंदर उपभोगसामर्थ्य निरनिराळ्या खर्चाच्या बाबींवर कसें विभागून देतो ह्याबद्दल वरील अनुभवावरून पुढील आर्थिक नियम बनविण्यात आला आहे. 'विवक्षित खर्चापासून अधिकांत अधिक समाधान मिळवावयाचें असेल तर ज्या निरनिराळ्या प्रकारच्या वस्तु उपभोक्ता वापरीत असेल त्यांपैकीं प्रत्येक प्रकारच्या वस्तूची त्यास वाटणारी सीमागत उपयुक्तता सारखी असावयास पाहिजे.' अन्नखर्चांतीलच आपण दोन घरगुती उदाहरणें घेऊं. भाजीपाल्यावर पांच रुपये खर्च होऊन दुधावर दहा रुपये खर्च होत असेल तर पांच रुपयास मिळणाऱ्या भाजीची

उपभोक्त्यास जेवढी सीमागत उपयुक्तता वाटते तेवढीच दहा रुपयांस मिळणाऱ्या दुधाचीही वाटली पाहिजे, हें उघड आहे. क्षणभर आपण असें समजूं कीं पाच रुपयांस तीस शेर भाजी मिळत असून दहा रुपयांस चाळीस शेर दूध मिळत आहे, व भाजीच्या तिसाव्या शेराची उपभोक्त्यास जी उपयुक्तता वाटत आहे ती दुधाच्या चाळीसाव्या शेराच्या उपयुक्ततेहून कमी आहे. अशा स्थितींत सामान्य व्यवहारी मनुष्य तीस शेरा ऐवजीं एकोणतीस शेरच भाजी घेऊन चाळीस शेरांहून थोडें अधिक दूध घेतल्यावांचून राहणार नाहीं.

एक गरीब स्थितीतील मनुष्य व एक अत्यंत श्रीमान मनुष्य ह्यांच्या खर्चाच्या प्रकारांची आपण तुलना केली तर आपणांस साधारणपणें असें दिसून येईल कीं गरीब माणसाच्या खर्चाचें बरेंच मोठें प्रमाण अन्नखर्चासारख्या प्राथमिक महत्वाच्या गरजा भागविण्यांत खर्च होत आहे, व छानछोकीचा कपडा-लत्ता, अनेक शोभिवंत पदार्थ व निरनिराळया प्रकारची करमणुकीची साधनें इत्यादिकांवर त्याच्या संपत्तीचा झालाच तर फार थोड्या भागाचा व्यय केला जात आहे. उलटपक्षीं, धनाढ्य माणसाच्या अन्नखर्चाची रक्कम गरीबाच्या अन्नखर्चाहून मोठी असली तरी त्याच्या अलोट संपत्तीचा फारच थोडा भाग खाण्यापिण्याच्या वस्तु खरेदी करण्याकडे खर्चला जातो. सुंदर इमारती, उंची कपडे, अनेक प्रकारचे शोक, किंबहुना स्वतःच्या मनास आल्हाद देणाऱ्या अनेक मूल्यवान वस्तु व कामगिऱ्या ह्या विकत घेण्यास लागणाऱ्या रकमेनेंच त्याचे खर्चखातें मुख्यतः अडविलेलें आहे असें आपणांस दिसेल. गरीब मनुष्यास सहा आणे वाराच्या कापडा ऐवजीं आठ आणे वाराचें कापड घेण्यापासून जें समाधान वाटण्याची अपेक्षा असते त्याहून शेर दोनशेर दुधतूप अधिक घेण्यापासून जास्त समाधान होईल अशी त्याची खात्री असते. धनिकास मात्र खाद्यपेय वस्तूंवर वाढता खर्च करून अधिक समाधान प्राप्त करून घेण्याची विशेष आशा नसल्यानें ती रक्कम घरबांधणीच्या सुधारणेंत अगर अधिक शोभिवंत किंवा आल्हादजनक वस्तु मिळविण्यांत खर्च केल्यास त्यामानानें अधिक समाधान होईल असें त्यांस वाटतें. संपत्तीच्या विभागणीतील विषमतेमुळें कांहीं वर्गास प्राथमिक स्वरूपाच्या आवश्यक गरजाही भागवितां येत नसतां कांहीं वर्गास अनेक फाजील व चैनीच्या मार्गांनी हवा तसा खर्च करतां येतो ही गोष्ट एकंदर समाजाच्या उपभोगास मितव्ययाचें तत्व लावलें तर समर्थनीय ठरणार नाहीं. परंतु ही विषमता दूर होणें निदान सद्यःस्थितींत तरी अशक्यप्राय असल्यानें समाजांत प्रचलित असलेल्या 'चैनी' चा एकंदर आर्थिक परिस्थितीवर काय परिणाम होतो याबद्दल स्थूलमानानें विवेचन करणें आवश्यक आहे. तसेंच मितव्ययाच्या तत्वानुसार वैयक्तिक उपभोगाचें निरनिराळे मार्ग ठरत असतां विवक्षित रकमेचा उपभोग तात्काल घ्यावा अगर ती रक्कम तशीच शिल्लक ठेवून अगर व्याजीं लावून

पुढें खर्च करावी हाही प्रश्न उपस्थित होतो. ज्यामानानें मनुष्यांचें उपभोग-सामर्थ्य वाढतें असतें त्यामानानें तात्कालिक उपभोगाऐवजी पुढें मिळणाऱ्या उपभोगाकरितां आपल्या सामर्थ्याचा कांहीं भाग राखून ठेवण्याची त्याची अधिक तयारी होते. राखून ठेवलेल्या ह्या उपभोगसामर्थ्यासच आपण 'बचत' अगर 'शिल्लक' असें म्हणतों. समाजांतील उत्पादनाच्या प्रगतीस अशा 'शिलके' चें किती महत्व आहे ह्याबद्दल मागील अनेक प्रकरणांत उल्लेख आलेला आहे. प्रस्तुतस्थळीं निव्वळ उपभोगाच्या व मितव्ययाच्या तत्त्वास अनुसरून चैन, व्यसनें, बचत इत्यादिकांचा विचार करावयाचा आहे.

**३ चैन**— अर्थशास्त्रांतील अनेक शब्दांप्रमाणे 'चैन,' ह्या शब्दाचाही अभिप्रेत आशय व त्याची व्याप्ति ह्याबद्दल आगाऊ फोड केल्याशिवाय चालणार नाही. साधारण व्यवहारात चैन म्हणजे असामान्य सुखलालसेची तृप्ति करून घेण्याचा प्रयत्न असें समजलें जातें. चैन ह्या शब्दाचा असा उपयोग केल्यास त्यामध्यें एक प्रकारची नैतिक निर्भत्सना आपोआप अभिप्रेत होते. अर्थशास्त्रांत चैन हा शब्द वापरतांना अर्थातच कोणत्याही प्रकारचा नैतिक विचार प्रकट करण्याचा हेतु नसतो. 'अनावश्यक वस्तूंचा उपभोग' म्हणजे चैन, 'फाजील गरज भागविणे' म्हणजे चैन, 'फाजील उपभोग' म्हणजे चैन, 'अवास्तव वैयक्तिक उपभोग' म्हणजे चैन, अशा अनेक व्याख्यांच्या साहाय्यानें निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञाकडून चैन ह्या शब्दाचा अर्थ निश्चित करण्याचा प्रयत्न झालेला आहे. ह्या व्याख्यांतील 'अनावश्यक' 'फाजील' 'अवास्तव' इत्यादि विशेषणावरून चैन ह्या शब्दाचा अर्थ व त्याची व्याप्ति ही किती अनिश्चित आहेत हें वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. 'आवश्यक' 'प्रमाणशीर' व 'वास्तविक' गरजा अगर उपभोग म्हणजे काय हें आधीं ठरविल्याशिवाय अनावश्यक, फाजील व अवास्तव ह्या शब्दांस अर्थ येत नाहीं. परंतु वस्तूंची 'आवश्यकता' ही निश्चित नसून ती नेहमी बदलत असते. स्थळ, काल व व्यक्ति ह्यांपैकीं प्रत्येकांतील फेरबदलास अनुसरून आवश्यकतेबद्दलच्या कल्पनाही बदलतात. उदाहरणार्थ, इंग्लंडमध्ये बहुतेक वर्षभर गरम कपडे घालणें हे आवश्यक समजले जाते; परंतु हिंदुस्थानांत मात्र अतिशय थंडीच्या कांहीं दिवसातच लोंकरीचे कपडे आवश्यक समजले जातात. तसेंच एखाद्या इसमास दररोज दूर कामावर जावयाचें असल्यामुळें त्यानें पायगाडी वापरली तर तिची त्यास आवश्यकता आहे असें मानण्यांत येईल; उलट सहज इकडे तिकडे हिंडण्याकरितां एखाद्यास पायगाडी लागू लागली तर ती अनावश्यक अतएव चैनीची वस्तु आहे असेंच साधारण लोक समजतील. वस्तूंच्या 'आवश्यकते' बद्दलच्या ह्या सापेक्षतेमुळें 'चैन' ह्या शब्दाची व्याप्तीही नेहमी अनिश्चित असते. विशेषतः मनुष्यांच्या गरजांच्या एका विवक्षित गुणामुळें चैन ह्या शब्दास कायमचा असा अर्थच उरत नाही. एखादी गरज नुकीच

दृष्टोपत्तीस येऊन ती कांहीं लोकच भागवीत आहेत तोंपर्यंत ती अनावश्यक ह्या सदरांत सहजच मोडते. परंतु हळूहळू समाजांतील बहुतेक लोकांस ती गरज भागविता येऊं लागली म्हणजे तिचें नाविन्य व दुर्मिळता ही नाहींशीं होऊन ती आवश्यक समजली जाते. उदाहरणार्थ, कांहीं वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व भागांत चहा ही अनावश्यक म्हणून चैनीची वस्तु समजली जाई. तेंच आज बहुतेक भागांत चहा पिणें म्हणजे 'चैन' करणें होय असें कोणी म्हटल्यास त्याचें हंसें झाल्याशिवाय राहणार नाहीं. यावरून चैन म्हणजे विवक्षित काळीं विवक्षित समाजांत ज्या गरजा अनावश्यक समजल्या जातात त्या भागविणाऱ्या वस्तूंचा उपभोग घेणें होय, ही गोष्ट स्पष्ट होईल.

सर्व काळीं व बहुतेक सर्व देशांत चैन ही अनिष्ट गोष्ट होय असेंच सामान्य लोक-मत आहे. परंतु हें मत मुख्यतः नैतिक स्वरूपाचें असून 'चैन' करणाऱ्या व्यक्तींच्या जीवनक्रमाचा विचार करून तें बनविलेलें असतें. एकंदर समाजाच्या निव्वळ आर्थिक हिताच्या दृष्टीनें चैन हितावह अगर हानिकारक आहे, ह्याबद्दल थोडासा मतभेद दिसून येतो. कित्येक लोकांच्या मतें 'मनुष्य उत्पादनास कार्य-क्षम बनण्यास त्याचें शरीर व मन हीं अगदीं प्रफुल्ल व तेजस्वी असावयास पाहि-जेत. कांहीं अनावश्यक परंतु आल्हादकारक वस्तूंच्या उपभोगानें मनुष्यांच्या सर्व शक्ति जागृत होत असल्यामुळें चैन कार्यक्षमतेस पोषक आहे असें म्हणण्यास हर-कत नाहीं.' मागें आवश्यक वस्तूंत दोन भेद असून कांहीं वस्तु निव्वळ जीवित-रक्षणास आवश्यक व दुसऱ्या कांहीं कार्यक्षमतेस आवश्यक असतात म्हणून सांगि-तलें आहे. ज्या अनावश्यक वस्तूंच्या उपभोगाचा चैन ह्या नांवानें सामान्यतः उल्लेख केला जातो त्यांत कार्यक्षमतेस आवश्यक असलेल्या वस्तूंचा अंतर्भाव केलेला असेल तर वरील मतांत कांहींसा तथ्यांश आहे असें कबूल केलें पाहिजे. परंतु सुशिक्षित लोकमताच्या दृष्टीनें ज्यांस चैनीच्या वस्तु असें ठरविलेलें असतें त्यांत निव्वळ अस्तित्वास व वाढत्या कार्यक्षमतेस दोहोंसही आवश्यक असलेल्या वस्तूंचा अभाव असतो. आतां प्रत्येक मनुष्य चैन करतो ती त्यास सुख व्हावें म्हणूनच करतो व त्या प्रकारचें व तसें सुख त्यास दुसऱ्या एखाद्या मार्गानें मिळ-विता येण्यासारखें नाहीं, असें गृहीत धरलें तरीही तशा चैनीमुळें त्याची कार्यक्षमता वाढते, अगर त्यानें तशी चैन न केली तर त्याची कार्यक्षमता कमी होईल असें म्हणतां यावयाचें नाहीं. कित्येक ग्रंथकार व सामान्य लोक चैनीमुळें वस्तूंस असलेली मागणी वाढून उत्पादनास उत्तेजन मिळतें व मजूरवर्गास काम मिळतें असें प्रतिपादन करतात. 'श्रीमंतांनीं चैन केल्याशिवाय गरीबांस तरी पैसा कसा मिळावा!' असाही एक प्रश्न अर्थवट कुचेष्टेनें नेहमीं विचारला जातो. परंतु प्रस्तुत ग्रंथांत संपत्तीच्या उत्पादनाबद्दल व विभागणीबद्दल जें विवेचन केलेलें आहे त्यावरून

चैनीच्या इष्ट परिणामांबद्दलची ही कल्पना भ्रममूलक आहे हें सहज दिसून येईल. चैन करणें म्हणजे अनावश्यक गरजा भागविणें; त्या न भागविल्या तर निदान आज कालच्या परिस्थितींत तरी व्यक्तीचें उपभोगसामर्थ्य, अगर त्याजजवळील संपत्ति, व्यर्थ पडून न राहतां दुसरी एखादी आवश्यक गरज भागविण्यांत अगर उत्पादन-कार्यांत खर्च केली जाईल असें खात्रीपूर्वक म्हणता येईल. असें झाल्यास उत्पाद-नास प्रत्यक्ष मदत मिळून मजुरास अनठायी मागणी व आवश्यक वस्तूंचा समा-जांतील पुरवठा ही दोन्ही वाढतील. चैनीच्या वस्तु, विशेषतः सोन्याचांदीचे दागिने व जडजवाहीर, विशेष मूल्यवान असल्यानें व्यक्तीस त्याचप्रमाणें समाजा-सही त्यांचा अडीअडचणीच्या प्रसंगीं उपयोग होतो, हा चैनीचा इष्ट परिणाम होय असेंही कित्येक वेळां सांगण्यांत येतें. हिंदुस्थानांत बहुतेक संपत्ति दागदागि-न्यांच्या स्वरूपानें ठेवण्याची चाल आहे तीही थोड्या प्रमाणांत ह्या समजावरूनच पडलेली आहे यांत शंका नाहीं. परंतु अधिक विचाराअंतीं हा समजही खरा नाहीं हें सहज दिसून येईल. अडचणीच्या प्रसंगाकरितां बेगमी करण्याचा मूल्य-वान उपभोग्य जिन्नस खरेदी करणें हा एकच अगर सर्वांत किफायतशीर मार्ग आहे असें निदान अर्वाचीन काळीं तरी कोणी म्हणूं शकणार नाहीं. तीच संपत्ति उत्पादनाचें साहाय्यक भांडवल म्हणून उपयोगांत आणली तर त्यांत एकंदर समा-जाचा फायदा झाल्याशिवाय राहत नाहीं व व्यक्तिशः मालकासही मूळ रकमेंत व्याजाची व नफ्याची भर पडून अधिक संपत्ति संकटकाळीं उपलब्ध होऊं शकेल. तसेंच चैन करण्यामुळें मनुष्यांची स्वसुखाबद्दलची आसक्ति एवढी वाढते कीं ते आपली चैन कमी होईल ह्या भीतीनें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मार्गांनीं संततिनियमन करतात व त्यामुळें लोकसंख्येच्या वाढीचें आपोआप नियंत्रण होतें, असाही एक युक्तिवाद कांहीं थोड्या जणांच्या तोंडून ऐकूं येतो. परंतु अनावश्यक वस्तू वापर-ण्याऐवजी आपली संपत्ति आवश्यक वस्तूंच्या उत्पादनार्थ गुंतविणें ह्यांत समाजाचें अधिक हित आहे कां असुरी आप्पलपोटेपणानें श्रीमंतांनी अवास्तव वैयक्तिक उपभोग करण्यानें त्यांचें व समाजाचें कल्याण साधणार आहे ? ह्या प्रश्नास कोणीही समंजस मनुष्य जें उत्तर देईल त्यावरून ह्या विचारसरणीस आपोआप उत्तर मिळेल.

चैनीचा संपत्तीच्या उत्पादनावर होणारा परिणाम बहुतेक नेहमींच अनिष्ट स्वरू-पाचा असतो. शिवाय उपभोगाच्या मितव्ययासंबंधानें वर जें तत्त्व सांगितलें आहे त्यावरून समाजांतील सर्व वर्गांस आवश्यक गरजाही पूर्णपणें भागवितां येत नसतां कांहीं थोड्या लोकांनी अनावश्यक गरजा भागविण्यांत संपत्तीचा व्यय करीत असावें हें आर्थिक दृष्ट्या हानिकारक आहे हें उघड होईल. एखादी गरज कार्य-क्षमता वाढविण्यास आवश्यक आहे किंवा नाहीं हें ठरविण्याची एक सामान्य कसोटी अशी आहे कीं, जी गरज भागविल्यानें उपभोक्त्यांचें सामर्थ्य उपभोगार्थ

होणाऱ्या खर्चाच्या प्रमाणापेक्षां अधिक प्रमाणांत वाढतें ती आवश्यक गरज होय. ज्या मानानें उपभोगार्थ होणाऱ्या खर्चापेक्षां अधिक प्रमाणांत उत्पादक सामर्थ्य वाढल त्यामानानें ती गरज अधिक आवश्यक स्वरूपाची समजली पाहिजे, हेंही ओघानेंच प्राप्त होतें. समाजांतील सर्व वर्गांच्या व व्यक्तींच्या उत्पादकसामर्थ्यांत जास्तीत जास्त वाढ व्हावयाची असेल तर गरीब वर्गास आवश्यक वस्तूंचा भरपूर पुरवठा मिळणें जरूर आहे. एखाद्या लक्षाधीशास एक मोटार अधिक मिळाल्यानें कदाचित् प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष मार्गानें त्याच्या उत्पादकतेंत थोडी वाढ होत असेल. परंतु तेच पैसे उत्पादककार्यांत प्रत्यक्षपणें गुंतविले तर इतर गरीब वर्गाच्या कमाईत जी वाढ होईल ती अर्थोत्पादनाच्या व सामाजिक उपभोगाच्या दृष्टीनें किती तरी अधिक महत्त्वाची ठरेल. आपण सामान्यतः ज्या वस्तूंस आवश्यक म्हणतों त्यांच्याप्रमाणेंच शिक्षणविषयक अगर कलाकुसरीच्या अनेक सुखसोयींची गोष्ट आहे. निखालस आवश्यक गरजा भागविल्यानंतर मनुष्यास अधिक प्रगमनशील व उत्पादक बनविण्यास ह्या वस्तू व कामगिऱ्या मदत करतात याबद्दल दुमत नाही. परंतु समाजाच्या दृष्टीनें ह्या सुखसोयींचाही एकंदर सर्व वर्गांत प्रसार होणें हें ह्या व ह्याहून अधिक मूल्यवान व आल्हादजनक अशा दुसऱ्या कित्येक वस्तु कांही थोड्या लोकांनी वापरण्याहून अधिक इष्ट आहे.

अनावश्यक गरजा भागविण्यामुळें व्यक्तिशः मनुष्यास होणारें समाधान व त्या भागविण्याकरितां एकंदर समाजास सोसावा लागणारा त्रास व खर्च ह्यांतील परस्पर प्रमाणावरून कित्येक ग्रंथकारांनी चैनीचे समर्थनीय व असमर्थनीय असे दोन भाग पाडले आहेत. ज्या प्रकारच्या चैनीमुळें समाजाच्या उत्पादन खर्चाच्या मानानें व्यक्तीस होणारें समाधान अल्प असतें ती चैन असमर्थनीय होय असें ते म्हणतात. आपल्याकडे चैनीच्या अतिरेकासंबंधानें ‘ अत्तराचे दिवे जाळणें ’ अशी एक म्हण प्रचारांत आहे. दिव्यांत तेलाच्या ऐवजी अत्तर घातल्यानें एखाद्या व्यक्तीस जें वास्तविक अगर काल्पनिक समाधान व्हावयाचें तेवढ्याकरितां पैसा व श्रम ह्यांचा प्रमाणाबाहेर खर्च करणें भाग पडतें. अशा उपभोगांत त्या व्यक्तीच्याच नव्हे तर एकंदर समाजाच्या दृष्टीनेंही ‘ उधळपट्टी ’ झाली असें म्हटलें पाहिजे. आपण सामान्यतः पैशाच्या बेसुमार खर्चास उधळपट्टी म्हणतों, ही व्यावहारिक कल्पना थोडी बदलून ज्या उपभोगामुळें व्यक्तीच्या अल्पशा समाधानाकरितां समाजाला श्रम व भांडवल ह्यांचा प्रमाणाबाहेर खर्च करावा लागतो त्यास समाजाच्या आर्थिक सामर्थ्याची उधळपट्टी असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. ह्या दृष्टीनें सर्व समाजांत चालणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या उपभोगांचें परीक्षण केल्यास आपणांस अनेक चमत्कारिक व उद्बोधक गोष्टी आढळून येतील. त्या सर्वांचा येथें निर्देश करीत न बसतां साधारण लोकमतही ज्या प्रकारच्या उपभोगास

निव्वळ चैन अगर उधळपट्टी असें न संबोधतां 'व्यसन' ह्या सार्थ नांवानें उल्लेखितें त्या अनिष्ट स्वरूपाच्या उपभोगाचें आर्थिक स्वरूप काय आहे याबद्दल थोडा विचार करणें योग्य आहे.

**४ व्यसनें**— उपभोग हा निव्वळ आर्थिक महत्त्वाचा विषय नसून नैतिक व सामाजिक दृष्टीनेंही व्यक्तीच्या गरजा व त्या भागविण्याचे मार्ग ह्यांचा विचार करावा लागतो असें जें वर म्हटलें आहे तें व्यसनांच्या बाबतींत विशेष लागू पडतें. सकृद्दर्शनीं आपणांस असें वाटतें कीं खासगी व्यक्तींनीं समर्थनीय मार्गांनी मिळविलेल्या संपत्तीचा त्यांनी कसाही उपभोग घेतला तरी त्यांत इतर व्यक्तीस अगर समाजास हात घालण्याचें कारण नाहीं. परंतु व्यक्ति व समाज ह्यांच्या हितसंबंधांत व आयुष्यक्रमांत इतकी फारकत करतां येत नाहीं एवढेंच नव्हे, तर जें वर्तन प्रत्यक्षपणें व्यक्तीस अनुत्पादक व अनीतिमान बनवितें त्याचा शेवटीं समाजाच्या आर्थिक व नैतिक प्रगतीवर विपरीत परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं, ही गोष्ट प्रत्येक देशांतील विचारी पुरुषांस फार प्राचीन काळापासून पटलेली आहे. सर्व धर्मांत निरनिराळ्या प्रकारच्या दुराचाराबद्दल जे निषेध घातलेले आहेत ते आर्थिक व नैतिक प्रगतीस पोषक असेच आहेत. समाजांत अनेक प्रकारचीं व्यसनें प्रचलित असून कमी जास्त प्रमाणांत त्यांचा समाजाच्या आर्थिक व नैतिक जीवितक्रमावर अनिष्ट परिणाम होत असतो. त्यांतल्या त्यांत मद्यपानाचें व्यसन बहुतेक सर्व धर्मांनी त्याज्य ठरविलेलें असून निदान त्याच्या अतिरेकाच्या अनिष्टतेबद्दल तरी सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत एकमतच आहे. शिवाय, व्यसनांचे व्यक्तींच्या उत्पादकतेवर व नीतिमत्तेवर होणारे अनिष्ट परिणाम बेकारी, रोग व गुन्हेगारी ह्यांची वाढ होऊन एकंदर समाजासही कसे भोगावे लागतात हें दारूबाजीच्या व्यसनावरून सर्वांस सहज दिसून येतें. एवढ्याच करितां मद्यपानाचें उदाहरण घेऊन व्यसनांचा समाजाच्या आर्थिक परिस्थितीशीं कोणता संबंध आहे व या बाबतींत समाजानें कोणतें धोरण स्वीकारणें आवश्यक आहे ह्याबद्दल येथें विचार करणें युक्त होय.

मद्यपानाच्या कार्यक्षमतेवर होणाऱ्या परिणामाविषयीं जीं तात्त्विक व व्यावहारिक अनुमानें बांधलीं जातात त्यांच्या स्वरूपांत कांहीसा मतभेद दृष्टीस पडतो. सर्व प्रकारचें मद्यपान मूलतः शारीर व वैद्यक दृष्ट्या अनिष्ट असून शेवटीं मद्यप्याच्या सर्व गात्रांतील उत्पादक शक्ति नाश पावून तो संपत्तीचा उत्पादक ह्या नात्यानें समाजास पारखा होतो, असें कित्येकांचें म्हणणें आहे. आमच्याकडील प्राचीन धर्मशास्त्रें व अर्वाचीन बहुमत ह्याच विचारसरणीचा पुरस्कार करणारीं आहेत. पाश्चात्य राष्ट्रांत, व विशेषतः अमेरिकेमध्यें, वैद्यकशास्त्रपारगत व समाजधुरीण अशा अनेक लोकांसही हीच विचारसरणी पटलेली आहे. अमेरिकेमध्यें तर मद्य-

पानास कायद्यानें प्रतिबंध केलेला असून यूरोपमधीलही अनेक राष्ट्रांत 'व्यवहार्य व शक्य' असेल तर कायद्यानें मद्यपानास बंदी करणें 'इष्ट' आहे असें मत प्रादुर्भूत होत आहे. उलट, कित्येक सामान्य सुशिक्षित लोक व कांहीं विद्वान भिषग्वर मद्याचें नियमित सेवन शरीरवृद्धीस अपायकारक नसून उलट पोषकच आहे असें प्रतिपादन करतात. अशा लोकांचें इंग्लंड हें माहेर घर आहे. राष्ट्रांतील लोकांचा शारीरिक व मानसिक उत्साह आणि त्यांची आर्थिक परिस्थिति ह्यांची तुलना करून वरील भिन्न मतांची प्रचीती पहावी असें म्हटलें तर इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि 'मद्यपी' राष्ट्रें दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रांस भौतिक अगर बौद्धिक उत्कर्षांत हार जातील असें नाहीं. उलटपक्षीं, अमेरिकेसारख्या आर्थिक प्रगतीच्या शिरोभागीं असणाऱ्या राष्ट्रानें आपली दारूचीं दुकानें कोरडीं टाकल्यापासून त्या राष्ट्राची कोणत्याही रीतीनें अधोगति झालेली न दिसतां उलट गेल्या आठ दहा वर्षांत कित्येक अनुकूल कारणांनीं त्या राष्ट्राचा आर्थिक उत्कर्ष झालेला दिसून येतो. ह्या वर्धमान वैभवांतील केवढा भाग मद्यपानबंदीच्या धोरणाचें फळ आहे, ह्याचें निश्चित उत्तर देतां येणें अर्थातच अशक्य आहे. तरीही निदान त्या धोरणानें अमेरिकेची आर्थिक स्थिति खालावली असें तरी कोणास म्हणता येणार नाहीं हें उघड आहे. निव्वळ लोकांच्या सरासरी आयुमर्यादेवरून मद्यपानाचा कार्यक्षमतेवर होणारा परिणाम आजमावयाचा असें ठरविलें तरी डेन्मार्क, फ्रान्स व इंग्लंड हीं यूरोपमधील मद्याचा सर्वांत अधिक फडशा पाडणारी राष्ट्रें दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांपेक्षां सरासरीनें अधिक कालपर्यंत जगणाऱ्या प्रजाजनांनीं भरलेलीं आहेत असें आपणांस दिसेल. एकमताच्या आणि प्रबल अशा वैद्यकीय निकालाच्या अभावीं व व्यवहारांतील निव्वळ शारीरिक चिन्हांच्या अनुभवावरून नियमित मद्यपानानें लोकांची कार्यक्षमता प्रत्यक्षरीत्या कमी होते असें म्हणतां यावयाचें नाहीं. तरीही ज्या गरीब वर्गांतील लोकांस आपल्या नित्याच्या आवश्यक गरजाही भागवितां येत नाहींत त्यांनीं दारू सारख्या चैनीच्या वस्तुप्रीत्यर्थ आपल्या उत्पन्नांतील कांहीं भाग खर्च करणें हें तर सर्वथैव असमर्थनीय ठरतें. विशेषतः मद्यपानाच्या ह्या व्यसनाकडे कुटुंबाच्या स्वास्थ्याच्या दृष्टीनें पाहिल्यास तें किती त्याज्य आहे ह्याबद्दल कोणाही समंजस इसमाची सहज खात्री पटेल.

मद्यपान ही गोष्ट जात्याच एवढी भयंकर आहे कीं तिच्या नियमितपणाच्या मर्यादा झुगारल्या जाऊन तिला 'दारुबाजी'चें स्वरूप केव्हां प्राप्त होईल ह्याचा नियम नसतो. मनुष्यास शारीरिक व मानसिक अधोगतीस नेऊन पोहोंचविणारें दारूबाजीसारखें दुसरें व्यसन क्वचितच सांपडेल. वास्तव, नियमित मद्यपानानें आर्थिक दृष्ट्या विशेष हानि होत नाहीं ही गोष्ट गृहीत धरली तरी समाजांत मद्यपानास मोकळीक ठेवल्यानें लोक 'दारुबाज' बनून चोरी, दरोडेखोरी, खून, मारामाऱ्या इत्यादिक सामाजिक गुन्हेगाऱ्यांस व आळस आणि निरुत्साह ह्या

आर्थिक अरिष्टांस बळी पडण्याची फार मोठी भीति असते. ही गोष्ट ध्यानांत घेऊन समाजानें ह्या व्यसनावर कांहीं तरी नियंत्रण घातलें पाहिजे ही विचारसरणी आतां सर्वसंमत झालेली आहे. निरनिराळ्या राष्ट्रांतील सरकारांच्या मद्यपानविषविषयक धोरणावरून आपणास त्यांचे तीन वर्ग पाडतां येतील. पहिला वर्ग बोलून चालून दारूस मुक्तद्वार ठेवणाऱ्या राष्ट्रांचा. सुधारलेल्या राष्ट्रांतील सरकारें निदान वरकांती तरी आपणांस दारूबाजीचें शत्रु म्हणवीत असल्यानें ह्या वर्गात फार तर कांहीं मागासलेलीं राष्ट्रें मात्र सांपडतील. दुसरा वर्ग मद्यपानास सर्वस्वी मज्जाव करणाऱ्या सरकारांचा. ह्या वर्गात निदान सध्यां तरी अमेरिका हें एकच राष्ट्र असून त्या देशांत दारूचा फक्त वैद्यांच्या औषधांत उपयोग करण्याची परवानगी आहे. ह्या धोरणाचा एकंदर देशाच्या आर्थिक परिस्थितीवर प्रत्यक्षपणें विशेष अनुकूल परिणाम झाल्याचा पुरावा आजमितीस उपलब्ध नाहीं. तरी अप्रत्यक्षपणें समाजांतील लोकांची गुन्हेगारी कमी होऊन त्या लोकांचा व सरकारचाही आर्थिक व नैतिक दृष्ट्या फायदा झालेला आहे यांत शंका नाहीं. तिसरा वर्ग म्हटला म्हणजे ह्या धोरणावर अन्यायाचा व अव्यवहार्यतेचा छाप मारून मद्यपानाचें केवळ 'नियमन' करणाऱ्या राष्ट्रांचा होय. आर्थिक व सामाजिक स्वरूपाच्या अनेक बाबींत समाजहितसंरक्षणार्थ सर्व सुधारलेलीं सरकारें आज राष्ट्रांतील व्यक्तींच्या स्वातंत्र्यास व बेलगामी वर्तणुकीस आळा घालीत आहेत हें पाहून देखील या तृतीयवर्गी राष्ट्रांस व्यक्तिस्वातंत्र्याचा मुद्दा पुढें आणून मद्यपानबंदीच्या धोरणास विरोध करण्याचा मोह आवरत नाहीं. परंतु ह्या मुद्यास उत्तर देत बसण्याइतकी देखील आज त्याची मातब्बरी राहिलेली नाहीं. निरनिराळ्या धर्मांत मनुष्यांच्या उपभोगाविषयीं घालून दिलेले विधिनिषेध पाहिले तर फार प्राचीन काळापासून समाजहितार्थ व्यक्तींच्या उपभोगस्वातंत्र्यास आळा घालण्याची इष्टता सर्वमान्य आहे असें आपणांस दिसून येईल. व्यक्तिस्वातंत्र्याचे अहर्निश गोडवे गाणाऱ्या इंग्लंड देशामध्येंही आठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत उदारमतवादी समाजशास्त्रज्ञांच्या मतांचा प्रसार होईपर्यंत पार्लमेंट सभेनें अनेक प्रकारच्या चैनीच्या वस्तूंच्या उपभोगावर नियंत्रण घातलेलें असे. हेंच धोरण समाजहिताच्या वाढत्या कळकळीमुळें आजकाल अनेक मार्गांनीं अंगिकारिलें जात असून सरकारनें व्यक्तींच्या उपभोगस्वातंत्र्यांत मुळींच हात घालतां कामा नये, ह्या मताच्या समर्थनास तात्त्विक अगर ऐतिहासिक पुरावा मुळींच सांपडावयाचा नाहीं. निखालस मद्यपानबंदीचें धोरण व्यवहार्य आहे किंवा नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर अर्थातच प्रत्येक ठिकाणच्या विशिष्ट परिस्थितीस अनुसरून द्यावयास पाहिजे. कांहीं शंकेखोर लोकांचें असें म्हणणें असतें कीं 'अलीकडे मद्यार्काचा कित्येक नित्योपयोगी वस्तूंत अंतर्भाव होत असून अनेक शास्त्रीय शोधांच्या साहाय्यानें थोड्या खर्चानें मद्यार्क मिळविणें हें

शक्य झालेलें आहे. ह्यास्तव कायद्यानें मद्यपानास उघडपणें बंदी केली तरी गुप्त रीतीनें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत तें चालू राहणारच.' ह्याविषयी अमेरिकेचा अनुभव असावा तितका उत्साहजनक नसला तरी तो अगदी नैराश्यपूर्ण आहे असेंही म्हणतां यावयाचें नाही. एकंदरीनें स्थानिक परिस्थिति मद्यपानबंदीच्या व्यवहार्यतेस प्रतिकूल नसल्यास तें धोरण स्वीकारण्यांत समाजाचें आर्थिक दृष्ट्या हित आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मद्यपानास कायदेशीर प्रतिबंध करण्याचा हा प्रश्न अनेक राजकीय व सामाजिक अडचणींमुळें विशेषच दुर्घट झाला असून व्यवहारांत तो सहजासहजी अगर तात्काल सुटण्यासारखा नाही. यास्तव मद्यपानाचा सर्वस्वी नायनाट केला जावा असें प्रतिपादन करणाऱ्या लोकांसही मद्यपानाचें मर्यादित नियंत्रण करणाऱ्या अनेक सुधारणांचा मुख्यतः पुरस्कार करावा लागतो. मद्यपानाची कदाचित् व्यक्तिशः नागरिकांस मुभा असली तरी दारूच्या निशेंत त्यांकडून जे गुन्हे घडतात त्यांबद्दल त्यांस कडक शासन होणें आवश्यक आहे व बहुतेक सर्व राष्ट्रांत पोलिस व न्यायाधीश यांच्या दराऱ्यानें निव्वळ दारूबाजीच्या गुन्ह्यांस बराच आळा बसत आहे असें अनुमान निघतें. शिवाय, मद्यपानबंदी सर्व राष्ट्रांस अव्यवहार्य वाटली तरी एखादा प्रांत, जिल्हा, तालुका, गांव, अगर पेठ येथें राहणाऱ्या नागरिकांस जर मद्यपानास पूर्ण मनाई करणें इष्ट आहे असें वाटत असेल तर निदान त्यांस तरी त्यांच्या भागापुरती कायदेशीर बंदी करण्याचें स्थानिक स्वातंत्र्य देणें इष्ट व न्याय्यही आहे. ह्या व इतर मद्यपानविरोधी सूचनांस तात्त्विक अडचणी विशेष नसल्या तरी व्यवहारांत दारूच्या व्यापाऱ्यांचा पैसा सरकारास मोह पाडून सुधारणांच्या गाड्यास खीळ घालण्यास समर्थ असतो. विशेषतः लोकसत्ताक राष्ट्रांत असें होण्याची अधिक भीति असते. हिंदुस्थानसारख्या ज्या राष्ट्रांत सरकार पूर्णपणें लोकप्रतिनिधींस जबाबदार नाही व जेथें सरकार दारूचें उत्पादन व विक्री यांवर जबर कर बसवून आपल्या वसुलाचा बराच मोठा भाग मिळवितें तेथें तर प्रत्यक्ष सरकारच मद्यपानास आळा घालणाऱ्या प्रत्येक सूचनेस उघड अगर प्रच्छन्न विरोध करीत असलेलें दिसतें. तरी एकंदरीनें मद्यपानाचें नियमन किंबहुना नाश होणें आवश्यक असून सरकारनें एकदम कायदा करून, स्थानिक स्वातंत्र्य देऊन अगर गुत्त्यांची संख्या व दारूचें परिमाण एकसारखें उतरवून ही गोष्ट घडवून आणणें जरूर आहे. कांही कारणानें सरकार असें न करील तर लोकांनी खाजगी संस्थांच्या द्वारें सर्व समर्थनीय व उपलब्ध मार्गांनी हें व्यसन नाहीसें करण्याची खटपट करावी. दारू व इतर व्यसनें हीं समाजाच्या उत्पादक शक्तीस व सामाजिक प्रगतीस लागलेली कीड असून सरकार व लोक ह्यांनीं तिचा शक्य तितका बीमोड करणें आर्थिक दृष्ट्याही आवश्यक आहे.

व्यसनांसंबंधी आर्थिक दृष्ट्या विचार करतांना एक गोष्ट मात्र ध्यानांत ठेवावयास हवी, ती ही कीं अगदीं रानटी अवस्थेंतील मनुष्यांपासून तों अत्यंत सुधारलेल्या व सुशिक्षित इसमांपर्यंत बहुतेक सर्व अवस्थांतील लोकांत कोणत्यानाकोणत्या तरी व्यसनाचें अस्तित्व दिसून येतें. मनुष्यप्राणी जात्या आळशी आहे हे विधान सर्वथैव मान्य न मानलें तरी जोराच्या व दीर्घकालीन श्रमानें येणारा थकवा दूर करण्यास कांहीं तरी उत्तेजक पदार्थ आवश्यक आहे, असें आपल्या वागणुकीनें बहुतेक लोक सिद्ध करीत आले आहेत ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं. जुनें धर्मग्रंथ व आमच्याकडील कौटिल्यासारखे प्राचीन अर्थशास्त्रज्ञ ह्यांचें मतही विशेष हानिकारक व्यसनास बंदी करावी व इतर कमी अनिष्ट व्यसनाचें सरकारनें प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें नियंत्रण करावें असेंच असल्याचें दिसून येतें. कौटिल्याच्या वेळीं दारूचे गुत्ते होते व त्यांवर सरकारी देखरेख असून जबर करही लादलेले असत. आजही सर्व राष्ट्रांत दारूशिवाय, अफू, गांजा, कोकेन इत्यादि इतर अंमली व मादक पदार्थांचें सेवन मोठ्या प्रमाणावर होत असलेलें दृष्टीस पडतें. दारूस बंदी करणें अगर मद्यपानाचें नियमन करणें ज्या कारणांनीं इष्ट ठरतें त्याच कारणांनीं ह्या व इतर व्यसनास आळा घालण्याच्या धोरणाचें समर्थन होऊं शकतें. चीनसारख्या पौरस्त्य राष्ट्रांत अफूचें अपरिमित सेवन होत असलेलें पाहून कित्येक युरोपियन राष्ट्रांस कळवळा येतो, व चिनांत अफूचें सेवन मर्यादित व्हावें म्हणून ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानास आपला किफायतशीर अफूचा व्यापार बंद करण्यासही भाग पाडलें. हिंदुस्थानांत अफू व दारू ह्या दोन्ही व्यसनांचा बराच प्रसार झालेला आहे, ही गोष्ट खरी असली तरीही इकडील लोकमत ह्या दुष्ट संवयींस सर्वस्वी प्रतिकूल असेंच आहे. इंग्लंडमधील व इतर यूरोपियन राष्ट्रांतील 'दारूबाज' लोकांनीं चिनांतल्या 'अफूबाजी' विरुद्ध चळवळ करावी आणि मद्यपानप्रतिबंधाच्या सूचनेस मात्र व्यक्तिस्वातंत्र्याच्या व उत्तेजक पेयाच्या आवश्यकतेच्या सबबी पुढें कराव्या, हे मनोरंजक नाहीं असें कोण म्हणेल ?

**५ बचत**—समाजाच्या आर्थिक प्रगतीस सर्वांत आवश्यक असलेली बाबत म्हणजे वाढतें उत्पादनसामर्थ्य हें होय. दिवसानुदिवस उत्पादनपद्धतीची जी उत्क्रान्ति होत आहे तिच्यांत भांडवलाचें सर्वगामी वर्चस्व अधिकाधिक स्पष्ट होत आहे, व ज्या राष्ट्रांस आपली आर्थिक उन्नति करून घ्यावयाची असेल त्यांस भांडवलाचा भरपूर पुरवठा मिळविल्याशिवाय गत्यंतर नाहीं, ह्याबद्दल मागें विवेचन केलेलें आहे. भांडवलाची वाढ करण्याचा एकच टिकाऊ उपाय असून, तो समाजांतील व्यक्तींनीं आपल्या उत्पन्नांतून कांहीं बचत करून रक्कम शिल्लक टाकणें हा होय. उपभोगाच्या निरनिराळ्या प्रकारांचा समाजाच्या उत्पादकतेवर ज्याप्रमाणें बरावाईट परिणाम होतो त्याचप्रमाणें उपभोग तात्कालिक होणें अगर पुढें ढकलला

जाणें ह्याचाही समाजांतील भांडवलाच्या पुरवठ्याशीं, म्हणजे अर्वाचीन आर्थिक घटनेच्या जीवनाशीं, अत्यंत निकट संबंध आहे, असें ह्यावरून दिसून येईल. खरें म्हटलें तर उपभोग व उत्पादन ह्यांच्यांतील विशेषांची परस्पर प्रतिक्रिया योग्य मार्गानें व वाढत्या प्रमाणांत झाल्याशिवाय एकंदर आर्थिक उत्कर्ष होणेंच अशक्य आहे. साधारणतः आपणांस उत्पन्नांत वाढ झाल्याशिवाय उपभोगांत सुधारणा होणार नाही असें वाटतें व बहुंशीं हा समज खराही आहे. परंतु मनुष्यांच्या वास्तविक गरजांत वाढ झाल्याशिवाय म्हणजे अनेक प्रकारच्या उपयुक्त वस्तु मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून त्यास्तव मनुष्यें जरूर तो त्रास सोसण्यास व खटपट करण्यास तयार झाल्याशिवाय मागणीमध्यें वाढ होऊन उत्पादनास उत्तेजन मिळत नाहीं. तसेंच उत्पादनांत वाढ होऊन मनुष्यांचे श्रम अधिक किफायतशीर होऊं लागल्याशिवाय त्यांस उपभोग पुढें ढकलण्याचें म्हणजे बचत करण्याचें सामर्थ्य येत नाही. इष्ट स्वरूपाच्या व कार्यक्षमता वाढविणाऱ्या गरजाची वाढ, उत्पादनास उत्तेजन, सामाजिक घटकाच्या उत्पन्नात चढ व बचत करून उत्पादन अधिक किफायतशीर होण्यास आवश्यक असलेल्या भांडवलाचा पुरवठा करण्याची त्यांची तयारी ह्या सर्व गोष्टी परस्परांशीं संलग्न असून त्यांपैकीं एकीचा विचार करतांना तिचा इतरांशीं असलेला संबंध विसरून चालणार नाहीं.

इतर आर्थिक शब्दांप्रमाणें बचत ह्या शब्दाचाही व्यवहारांत अनेक अर्थांनी उपयोग केला जातो. कित्येक वेळां उपभोगाच्या मितव्ययाचें जें तत्व वर सांगितलें त्याचें पालन करणारास तो बचत करतो असें आपण म्हणतो. म्हणजे एखाद्या मनुष्याचें पन्नास रुपये महिना उत्पन्न असून तो आपल्या तात्कालिक गरजा भागविण्यांतच सर्व रक्कम खर्च करीत असला तरी जर त्यास लागणाऱ्या एकंदर वस्तु तो अगदी काटेकोरपणानें म्हणजे किंमतीचें व परिमाणाचें अत्यंत किफायतशीर कोष्टक बनवून मिळवीत व वापरीत असेल तर तो 'बचत' करतो असें आपण म्हणूं. परंतु वास्तविकपणें आपलें उपभोगसामर्थ्य निरनिराळ्या तात्कालिक गरजांत त्यांच्या उपभोगानें होणाऱ्या समाधानाच्या प्रमाणांत विभागून देणें हा 'मितव्यया'चा केवळ एक भाग होय. उपभोगसामर्थ्य तात्काल खर्च करावें किंवा त्याच सामर्थ्याच्या साहाय्यानें पुढें अधिक समाधान मिळेल ह्या आशेनें तें राखून ठेवावें हा उपभोगाच्या मितव्ययाचा निराळा भाग असून केवळ त्यासच बचत ह्या नांवानें संबोधणें योग्य आहे. तात्कालिक गरजा भागविण्यांत दाखविला जाणारा मितव्यय हा जसा 'बचत' नव्हे त्याचप्रमाणें शिलकीं टाकलेलें उपभोगसामर्थ्य, म्हणजे गांठींचा पैसा, व्याजीं लावणें अगर इतर उत्पादक कार्यांत गुंतविणें हेंही 'बचत' ह्या आर्थिक क्रियेचें आवश्यक अंग नाहीं. समाजाची सांपत्तिक भरभराट होण्यास निव्वळ लोकांच्या गांठीं पैसा राहून

भागावयाचें नाहीं, तो उत्पादनास साहाय्यक भांडवल उपलब्ध करून देण्यांत खर्चिला पाहिजे ह्यांत शंका नाही. तरीही 'बचत' ही क्रिया स्वतंत्र असून शिल्लक रकमेचा उत्पादक भांडवल म्हणून उपयोग न झाला तरीही व्यक्तीच्या दृष्टीनें ती 'बचत' झाली असेंच म्हटलें पाहिजे. उदाहरणार्थ, दुष्काळांत आपल्या कुटुंबास खावयास अन्न मिळावें यास्तव सुगीच्या दिवसांत शेतकऱ्यानें कांहीं धान्य राखून ठेविलें तर ती त्याची 'बचत' त्याचें व समाजाचें आर्थिक सामर्थ्य वाढविण्यास कारणीभूत होईल ह्यांत शंका नाहीं. व्यक्तिमात्राच्या 'बचत' करण्याच्या प्रवृत्तीचें व सामर्थ्याचें आर्थिक महत्त्व ध्यानांत घेतां एका प्रकारच्या 'बचती'पासून समाजाची हानी होण्याची खात्री असते असें स्पष्ट दिसेल. ज्या इसमांस आपली कार्यक्षमता राखण्यास आवश्यक असलेल्या तात्कालिक गरजाही नीटपणें भागविता येत नाहीत त्यानें आपल्या उत्पन्नांतून कांही भाग शिल्लक टाकणें म्हणजे आपलें व समाजाचें उत्पादक सामर्थ्य कायमचें कमी करणें होय. तसेंच कित्येक श्रीमान लोक संपत्तीचा तात्काल उपभोग घेत नाहीत एवढेंच नव्हे तर उत्पादक कार्यांत आपली बचत गुंतवीतही नाहीत. अशा लोकांच्या शिलकेपासून समाजाच्या आर्थिक प्रगतीस उत्तेजन मिळत नाहींच, परंतु बिचाऱ्या कृपणांच्या दृष्टीनेंही त्यास आपल्या संपत्तीचा खरा उपभोग घेतां येत नाहीं. एकंदर समाजाच्या दृष्टीनें असे लोक गंजविरील श्वानाप्रमाणेंच होत. समाजाच्या आर्थिक प्रगतीस पोषक असलेली बचत म्हणजे कार्यक्षमतेस आवश्यक असलेल्या गरजा भागवून शिल्लक उरलेल्या उपभोग सामर्थ्याचा संचय करणें हीच होय.

लोकांकडून बचत केली जाऊन अर्थोत्पादनास व संपत्तीच्या अंतिम उपभोगास जी मदत व्हावयाची तिचा समाजाला फायदा मिळण्यास अनेक गोष्टींची आवश्यकता आहे. त्यांपैकीं दोन गोष्टी अशा आहेत कीं त्यांच्या अभावीं यत्किंचितही बचत होणें शक्य नाहीं. आवश्यक गरजा भागवून जें उत्पन्न शिल्लक राहील तीच खरी बचत होय. म्हणून जोंपर्यंत मनुष्यांस त्यांच्या श्रमाच्या साहाय्यानें आपल्या तात्कालिक गरजा भागविण्यास आवश्यक असलेल्या रकमेहून अधिक उत्पन्न मिळत नाहीं, तोंपर्यंत त्यांजकडून बचत केली जाईल अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील ज्या शेतकऱ्यांस आपल्या जमीनीपासून स्वतःच्या चार दोन गरजा भागविण्यापुरतेंही उत्पन्न मिळत नाही त्यांनी दुष्काळाच्या दिवसांत आपल्या उपभोगास उपयोगी पडण्याकरितां काही बचत करावी असें कोणी म्हटलें तर तें साध्या व्यवहारज्ञानासही सोडून होईल. बचत होण्यास आवश्यक असलेली दुसरी गोष्ट म्हणजे उपभोक्त्यांची दूरदृष्टि ही होय. भविष्यकाळीं गरजा भागवून जो उपभोग घ्यावयाचा त्याबद्दल अगाऊ अंदाज करून तात्काल उपभोग घेणें अधिक श्रेयस्कर का बचत करणें विशेष मितव्ययाचे, हें

ठरविण्याइतकी दूरदृष्टि सर्वच माणसांत असते असें नाही. समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत तिचें अस्तित्व अत्यंत पुसट असतें. आर्थिक उत्क्रान्तीच्या पुढील अवस्थांत मात्र ही धोरणी मनोवृत्ति बळावत जाते. तरी आज देखील समाजाच्या कित्येक वर्गांत अशा दूरदृष्टीचा अभाव असतो. आपल्याकडील कित्येक कारागिर व मजूर पैसे मिळतील त्या दिवशीं प्रमाणाबाहेर अनेक प्रकारचे खर्च करून पुन्हां बेकारींत भीक मागण्यास अगर कर्ज काढण्यास तयार होतात. ह्या लोकांस आपला धंदा सतत चालणारा नसून अधूनमधून खाडे होणें अपरिहार्य आहे हें माहीत असूनही ते कामावर असतांना मिळालेल्या मजूरींतून मुद्दाम 'बचत' करण्याचा विशेषसा प्रयत्न करीत नाहीत. तात्कालिक उपभोग व भविष्यकालीन गरजांची बेगमी ह्यांची परस्पर तुलना योग्यप्रकारें करतां न आल्यानें कित्येक लोक बचत करून जमविलेल्या पैशाचा अनुत्पादक मार्गानें खर्च करण्यास तयार होतात. हिंदुस्थानांतील शेतकरी व मजूर वर्ग ह्यापैकीं कित्येक लोक मोठ्या कष्टानें चार पैसे जवळ बाळगून शेवटीं ते लग्नकार्यांतील अगर प्रेतसंस्कारांतील अनेक अनावश्यक भागांवर खर्च करतात. अशा लोकांपैकीं कित्येकांस ते करीत असलेला खर्च अवास्तव व अनावश्यक आहे ह्याबद्दल पूर्ण जाणीव असते. तरी सामाजिक अगर धार्मिक बंधनांपुढें मान वांकविणें त्यांस भाग पडतें. उपभोगाच्या इतर भागाप्रमाणें बचत करणें हेंही प्रचलित सामाजिक व धार्मिक विचारांवर कांही अंशीं अवलंबून असतें असें ह्यावरून दिसून येईल.

तात्कालिक गरजांस पुरून उरण्याइतकें उत्पादन व उपभोक्त्यांत दूरदृष्टीचें अस्तित्व ह्या दोन महत्त्वाच्या बाबींशिवाय इतरही कांही गोष्टींनीं बचत करण्यास उत्तेजन मिळूं शकतें. सामान्य मनुष्याचें जीवित व त्याची मालमत्ता सुरक्षित राहण्याची जर खात्री नसेल तर समाजांत तात्काल उपभोग घेण्याच्या प्रवृत्तीचा प्रसार होऊन लोक बचत करण्यास तयार होणार नाहींत, व केलेली बचतही उघडपणें उत्पादक मार्गांत न गुंतवितां तशीच पुरून ठेवतील. किंबहुना, जीवित व वित्त हीं ज्या समाजांत धोक्यांत असतात तेथें उपलब्ध उत्पन्नाचा तात्काल उपभोग घेणेंही विशिष्ट मर्यादेच्या बहेर अशक्यप्राय होतें. कारण एखादा मनुष्य त्याच्या खर्चाच्या मानावरून विशेष श्रीमंत आहे असें दिसून आल्यास चोर अगर सरकार त्यास लुबाडल्याशिवाय रहात नसत. आपण मिळविलेली संपत्ति चिरकाल आपल्याच ताब्यांत राहील व भविष्यकाळीं मिळणारें उपभोगसौख्य खात्रीनें प्राप्त होईल असा भरंवसा असला तर मनुष्याची नैसर्गिक दूरदृष्टि त्यास त्याच्या उत्पन्नांतून शक्य तितका भाग शिल्लक टाकण्यास प्रवृत्त करते. तशांत खाजगी अगर सरकारी सेव्हिंग बँका, प्रॉव्हिडंड फंड अगर इतर बेगमीवजा मदत करणाऱ्या संस्था देशांतील निरनिराळ्या भागांत अस्तित्वांत आल्यास ह्या प्रवृत्तीस विशेषच

उत्तेजन मिळतें. लोकांची बचत वाढून समाजांतील भांडवलाचा पुरवठा वृद्धिंगत होऊं लागला म्हणजे राष्ट्राचें उत्पादक सामर्थ्य, लोकांची उपभोगशक्ति व त्यांकडून बचत केली जाण्याची शक्यता ह्यांतही नैसर्गिकरणें वाढ होतें.

**६ राहणीचें मान**—सर्व आर्थिक प्रगतीचें ध्येय व्यक्तिमात्रास अनेक उपभोग्य वस्तु उपलब्ध करून देणें व त्याचा जीवनक्रम इष्ट स्वरूपाच्या आर्थिक व्यवसायांनी परिपूर्ण करणें हें होय. उपभोग म्हणजे मनुष्याच्या गरजा भागविणें, व त्याकरितां जी खटपट करावी लागते तो त्याचा आर्थिक व्यवसाय, ह्या दोहोंमध्यें एखाद्या विवक्षित काळीं जें परस्पर प्रमाण ठरून गेलेलें असतें त्यासच राहणीचें मान असें म्हणावयास पाहिजे. सामान्य लोक व कित्येक अर्थशास्त्रज्ञ साधारणतः मनुष्य आपल्या विवक्षित वर्गांतील लोकांकडून अन्नें व हालअपेष्टा सोसाव्या न लागतां जीवनक्रम चालविण्यास ज्या गरजा भागविणें आवश्यक समजलें जातें त्यांच्या समुच्चयास त्या वर्गाचें राहणीचें मान असें समजतात. हा समज बहुंशी खरा असला तरी उपभोगाचें आर्थिक महत्व लक्ष्यांत येण्यास राहणीच्या मानाचें निव्वळ गरजांच्या दृष्टीनें निरीक्षण न करतां आर्थिक व्यवसायाशीं जीवनक्रमाचा कोणता संबंध आहे, हें पाहिलें पाहिजे. 'आर्थिक उत्क्रान्तीच्या प्राथमिक अवस्थांत व्यवसायांचा उगम गरजांपासून होतो; परंतु जसजशी समाजाची आर्थिक प्रगति होत जाते तसतशी लोकांची व्यवसायबुद्धि जागृत होत जाऊन तिला योग्य कार्यक्षेत्र मिळण्याकरितां अनेक प्रकारच्या गरजा उत्पन्न होतात;' हें प्रसिद्ध इंग्रज अर्थशास्त्रज्ञ मार्शल ह्याचें मत उपभोगाच्या आर्थिक प्रगतीवर होणाऱ्या परिणामाचें विवेचन करतांना ध्यानांत ठेवावयास पाहिजे. प्रत्येक वर्गांतील उपभोगाचें सरासरी परिमाण म्हणजे त्या वर्गाचें राहणीचें मान असें स्थूलमानानें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या राहणीच्या मानाचा व्यक्तींच्या कमाईवर व एकंदर समाजांतील संपत्तीच्या वाढीवर काय परिणाम होतो ह्या महत्वाच्या प्रश्नाचा येथें थोडक्यांत विचार करणें आवश्यक आहे.

राहणीचें मान म्हणजे व्यवसाय व गरजा ह्यांची विवक्षित काळीं बसलेली घडी हें ध्यानांत ठेवल्यास राहणीच्या मानांत वाढ झाल्यानें निरनिराळ्या वर्गांची कमाई वाढते किंवा नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तर देणें सोपें आहे. राहणींत वाढ म्हणजे केवळ एखाद्या वर्गानें अगर व्यक्तीनें पूर्वीपेक्षां अधिक उपयुक्त वस्तूंचा उपभोग घेण्यास एकदम तयार होणें नव्हे; तर त्या अधिक वस्तूंकरितां योग्य व जरूर ती खटपट करण्यास तयार व समर्थ असणें होय, हें कबूल केलें तर राहणीच्या मानांत वाढ झाल्यानें शेवटीं विशिष्ट वर्गांची व व्यक्तींची कमाई वाढेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण व्यक्तींची उपभोक्ते म्हणून मागणी व उत्पादक म्हणून कार्यक्षमता वाढल्यानें एकंदर समाजाचें निव्वळ उत्पन्न व त्यांतील विवक्षित वर्गाचा भाग हेही साहजिकपणें वृद्धिंगत होतात.

राहणीच्या मानांतलि चढामुळें कमाई वाढते असें म्हणण्यास इतरही अनेक कारणें व आधार आहेत. एक तर विशिष्ट वर्गांतील वाढत्या राहणीनें त्या वर्गांतील मजूरांचा पुरवठा मर्यादित होतो. लोकसंख्येची वाढ व आर्थिक प्रगति ह्यांच्यांतील परस्पर संबंधाचें पुढें विवेचन केलें आहे त्यावरून उपयुक्त वस्तूंचा पुरवठा किंवा चरितार्थाची आवश्यक साधनें ह्यांचें लोकसंख्येच्या वाढीवर नैसर्गिक नियंत्रण असतें ही गोष्ट वाचकांस दिसून येईल. एखाद्या देशांतील अगर वर्गांतील लोकांची चरितार्थाच्या आवश्यक साधनांबद्दलची कल्पना वाढली तर प्रत्येक व्यक्तीस लागणाऱ्या उपयुक्त जिनसांचें परिमाण वृद्धिगत होऊन त्यामानानें त्यांच्या संख्येची वाढ मर्यादित होईल ह्यांत शंका नाही. राहणीच्या मानांत सुधारणा होऊन मजूरांचा पुरवठा कसा मर्यादित होतो हें प्रतिवर्षी इतर राष्ट्रांतून अमेरिकेंत वसाहत करावयास जाणाऱ्या लोकांतील वाढीच्या प्रमाणावरून स्पष्ट दिसून येते. नवीन वसाहतवाल्याची राहणी साधारणपणें कमी प्रतीची असल्यामुळें, म्हणजे कमी उपयुक्त वस्तूंच्या उपभोगानें त्यांची तृप्ति होत असल्यानें, त्यांच्यांतील संख्येच्या वाढीचें प्रमाण बरेंच मोठें असतें. परंतु त्यांच्या मुलाबाळांस अमेरिकेंत राहण्याची संवय झाली म्हणजे अनेक उपयुक्त वस्तु वापरण्याची व परिश्रम करून त्या मिळविण्याची त्यांची इच्छा बळावते. त्यामानानें लग्न करून राहणें ही गोष्टही त्यास कमी महत्त्वाची वाटून त्यांच्यातलि संख्येच्या वाढीस साहजिकपणें आळा बसतो. वसाहतवाल्यांची पहिली पिढी व पुढील पिढ्या ह्यांच्यांतील वाढीच्या प्रमाणांत दिसून येणारें अंतर हा राहणीच्या मानाच्या श्रमाच्या पुरवठ्यावर होणाऱ्या परिणामाचें प्रत्यक्ष उदाहरण होय. शिवाय राहणीतलि सुधारणेचा मजूरांच्या उत्पादकतेवर व आत्मप्रत्ययावर जो इष्ट परिणाम होतो त्यामुळें त्यांची कमाई वृद्धिंगत होण्यास विशेष मदत होते असें म्हटलें पाहिजे. वर जी राहणीच्या मानाची व्याख्या केली त्यांत गरजांबरोबर त्या भागविण्याकरितां करावी लागणारी खटपट हीही ध्यानांत घेणें आवश्यक आहे असें म्हटलें आहे. त्यावरून राहणीचें मान वाढलें म्हणजे अधिक गरजा भागविण्यास लोक अधिक खटपट करूं लागतात व त्यांची उत्पादकता वाढून त्यांच्या व समाजाच्या निव्वळ उत्पन्नांत भर पडते, हें उघड होईल. आपल्या वाढत्या गरजा आपण वाढत्या परिश्रमानें भागविण्यास समर्थ आहोंत ही गोष्ट जसजशी निरनिराळ्या वर्गांस पटते तसतसा त्यांचा आत्मविश्वास व स्वाभिमान दृढतर होऊन ते अधिक कार्यक्षम होतात ह्यांत शंका नाही. शिवाय, प्रचलित राहणीचें मान जीवनास अगर कार्यक्षमतेस आवश्यक असणाऱ्या गरजांहूनही कमी असेल तर राहणी सुधारल्यास त्यांचें शारीरिक व मानसिक बल वाढून त्यांची उत्पादकता व कमाई ह्यांतही वाढ होईल.

राहणीच्या मानांत सुधारणा झाल्यानें मनुष्यांची कार्यक्षमता व उत्पादकता ह्यांत वाढ होऊन त्यांच्या कमाईत भर पडते हा सिद्धान्त सामान्यतः खरा असला तरी

त्यामध्यें वाढत्या उत्पादकतेस आर्थिक परिस्थितीची अनुकूलता असणें ही गोष्ट गृहीत धरलेली असते हे विसरतां कामा नये. सांपत्तिक दृष्ट्या ज्यांची सारखी भरभराट होत आहे त्या राष्ट्रांत साधारणतः भांडवल, यांत्रिक सुधारणा इत्यादिकांच्या साहाय्यानें अधिक संपत्ति उत्पन्न करण्याचे नवीन मार्ग नेहमीं उघडले जात असतात. विशेषतः अमेरिकेसारख्या राष्ट्रांत अनेक प्रकारची नैसर्गिक सामुग्री व जवळ जवळ अमर्याद भांडवलाचा पुरवठा ही उत्पादक साधनें मानवी श्रमाच्या कार्यक्षमतेस योग्य क्षेत्र मिळवून देण्यास नेहमीं तत्पर असतात. ज्या राष्ट्रांत अगर वर्गांत अर्थोत्पादनास आवश्यक असलेली श्रमाशिवाय इतर सामुग्री व घटना ह्यांची अनुकूलता नसते तेथें राहणीचें मान वाढून व्यक्तींची शारीरिक व मानसिक शक्ति बलवत्तर झाली तरी समाजाच्या अगर त्याच्या एकंदर कमाईत भर पडण्याची विशेष आशा नसते. हिंदुस्थानांतील पांढरपेशा वर्गाचें एकच उदाहरण पाहिल्यास निव्वळ राहणीचें मान वाढलें तर तेवढ्यानें कमाई वाढतेच अशी खात्री नसून उलट त्याच कमाईत अधिक गरजा भागविण्याचा प्रयत्न करावा लागल्यानें कित्येक व्यक्तींस असमाधान व हलाखी ही पदरीं बांधून घ्यावी लागतात हें उघड होईल.

राष्ट्राची उत्पादकता वाढण्यास व आर्थिक प्रगति होण्यास बहुजन समाजाची राहणी सुधारणें आवश्यक आहे हे मत सर्वमान्य आहे. ह्याच धोरणास अनुसरून गरीब उपभोक्त्यांच्या संस्था व सरकार आपापल्या सामर्थ्याच्या मानानें गरीब वर्गाच्या राहणीचें मान वाढविण्याचा प्रयत्न करीत असतात व त्यांबद्दल प्रस्तुत प्रकरणांतच पुढें विवेचन केलेलें आहे. परंतु राहणीच्या आर्थिक परिस्थितीवर होणाऱ्या परिणामांचा विचार करतांना ह्या बाबतींत समाजानें ज्या दोन तीन महत्त्वाच्या मार्गांनीं सुधारणा घडवून आणणें इष्ट आहे, त्याचा थोडक्यात उल्लेख करणें जरूर आहे. मनुष्याच्या गरजांपैकीं अगदीं प्राथमिक स्वरूपाच्या अशा तीनच गरजा होत. त्या म्हटल्या म्हणजे खाण्यापिण्यास अन्नपाणी, थंडी वारा, ऊन इत्यादि नैसर्गिक उपाधींपासून स्वतःचें संरक्षण करण्यास जरूर तेवढीं वस्त्रें व निवाऱ्याच्या ज्या जागेस मनुष्य आपलें 'घर' म्हणूं शकेल अशी एखादी जागा. ह्या तिन्ही बाबतींत गरीब वर्ग अज्ञानानें अगर दारिद्र्यानें आपल्या गरजा नीटपणें भागविण्यास समर्थ नसला तर समाजानें त्यास योग्य ती मदत करणें आवश्यक आहे. खाण्यापिण्याचे पदार्थ शुद्ध स्वरूपांत विकले जावे व फसवणुकीनें त्यांच्यांत कांहीं भेसळ केली जाऊं नये ह्याबद्दल सरकार जे कायदे करतें ते मुख्यतः गरीबांचे अज्ञान व दारिद्र्य ह्यांपासून बेकायदेशीरपणानें इतर कोणीही फायदा घेऊं नये, म्हणूनच होय. शिवाय, प्रत्येक मनुष्य आपली दुसरी कोणतीही गरज नीटपणें न भागली तरी निदान अन्नाची, व थोड्या कमी प्रमाणांत वस्त्राची, गरज शक्य तितक्या पूर्णपणानें भागविण्याची खबरदारी घेतो. परंतु राहण्याची पुरेशी व सोयीस्कर जागा ही गरज अशी आहे की तिचें योग्य

महत्त्व प्रत्यक्ष गरीब वर्गांच्या नीटपणें ध्यानांत येत नाही. मात्र लहान व कोंदट जागेंत कुटुंबांस रहावें लागणें एकंदर समाजाच्या दृष्टीनें आरोग्याच्या, नीतिमत्तेच्या व कार्यक्षमतेच्या बाबतींत अत्यंत अनिष्ट होय. ह्यास्तव समाजानें म्हणजे सरकार अगर स्थानिक संस्था ह्यांनीं, गोरगरीबांस माफक भाड्यानें मिळण्याजोग्या सोयीवार जागा उपलब्ध करून देणें आवश्यक आहे व ह्या मार्गानें अनेक देशांत सुधारणा झालेली असून हिंदुस्थानांतही तसा उपक्रम करण्यांत येत आहे.

आधुनिक सुधारणेच्या काळात सामान्य मनुष्यास राहणींतील ज्या एका भागाविषयीं विशेष महत्व वाटत नाही तो भाग म्हणजे विसांवा अगर फुरसत हा होय. मनुष्याच्या एकंदर व्यवसायांचे दोन वर्ग केल्यास त्यांतील कांहीं श्रम त्याचा तात्कालिक चरितार्थ चालविण्यास साधनीभूत असतात व कांहीपासून त्यांस मनोरंजन, ज्ञान, भावनाचें इष्ट पोषण इत्यादि मानसिक व नैतिक स्वरूपाचें सुख मिळतें असें दिसेल. वाढत्या राहणीच्या मानांत निव्वळ जीवितास आवश्यक असणाऱ्या गरजांपेक्षां ह्या इतर गरजांचे महत्व अधिक असते. ज्यामानानें मनुष्याचा काल निव्वळ उदरभरणाच्या विवचनेत न जाता अनेक प्रकारच्या मानसिक व आध्यात्मिक उन्नतिप्रीत्यर्थ त्यांस आपले श्रम व वेळ ह्याचा उपयोग करतां येईल त्या मानानें तो समाज अधिक प्रगमनशील व सुधारलेला समजला जाईल ह्यांत शंका नाहीं. यास्तव बहुसंख्याक गरीब व मजूर वर्गास आपापल्या धंद्यात कमी तास काम करून चरितार्थ चालविण्याइतकें उत्पन्न मिळूं लागलें तर त्यांस स्वतःची मानसिक व नैतिक उन्नति करून घेण्यास फुरसत मिळेल. निव्वळ आर्थिक दृष्ट्याहि कामकऱ्यांस अधिक फुरसत देणें हे कित्येक वेळां फायदेशीर ठरतें. मनुष्याचे स्नायू व ज्ञानतंतू हे एखाद्या यंत्राप्रमाणें नसून त्यांच्यांतील उत्पादकता मर्यादित असते. अधिक काल काम केल्यास त्या मानानें मनुष्याचा उत्साहभंग होऊन ते कंटाळतात व त्यांची कार्यक्षमता कमी होते. कामाचे तास कमी करून त्यांस फुरसतीचा वेळ अधिक मोकळा ठेवला तर त्या मानानें त्यांचा उत्साह व कार्यक्षमता वाढून कमी तासांतही एकंदरीनें अधिक काम करण्यास ते समर्थ होतात. विशेषतः आपला फुरसतीचा वेळ ते निव्वळ आळसांत अगर व्यसनांत न घालवितां स्वतःची कार्यक्षमता वाढविण्यांत खर्च करतील तर त्यांची उत्पादकता व कमाई ह्यांतही वाढ झाल्याशिवाय राहणार नाहीं. गरीब नागरिकांस हवा खाण्यास, खेळण्यास, मनोरंजन करून घेण्यास, अनेक प्रकारची उपयुक्त माहिती मिळविण्यास सरकार व स्थानिक संस्था ह्यांनीं मोफत अगर माफक दरानें व्यवस्था केली तर सर्वांत मोठ्या अशा कामकरी वर्गास फुरसतीचा योग्य विनियोग करावयास सांपडून त्यांची राहणी प्रत्यक्षपणें सुधारून त्यांचें व समाजाचें अंतिम हित साधतें.

कामाचे तास कमी करून कामकऱ्यांस फुरसत ठेवल्यानें त्यांच्या राहणींत जी वाढ होते ती आर्थिक उत्पादकतेस पोषक आहे, हें विधान व्यवहारांत लागू करतानां स्थलकालवर्तमानाचा पूर्ण विचार करणें आवश्यक आहे. ज्या राष्ट्रांतील लोकांची राहणी आधीच इतकी सुधारलेली आहे कीं अधिक फुरसतीचा त्यांच्या शारीरिक अगर मानसिक शक्तीवर विशेषसा इष्ट परिणाम होण्यासारखा नाहीं तेथील लोकांचे कामाचे तास कमी केले तर दर तासी होणारें काम विशेष वाढण्याचा संभव नसतो. कित्येक विद्वान अर्थशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं इंग्लंडमध्यें हल्ली ह्या स्वरूपाची अवस्था प्राप्त झाली आहे. उलट, अमेरिकेंतील एका संस्थानांतील पुढील हकीकतीकरून सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी तेथें फुरसतीच्या वाढीनें राहणी सुधारून मजूरांची व धंद्याची उत्पादकता वाढली असें आपणांस दिसून येईल. 'इलिनॉय ह्या संस्थानांतील कोळशाच्या खाणींमध्यें सन १८९४ ते १९०० ह्या कालांत ३४,००० कामकरी श्रम करीत असत. इ. स. १८९४ ते ९६ येथवर ते दररोज दहा तास काम करीत असत व सरासरीनें प्रत्येक मजूर दररोज २,७ टन कोळसा वर काढीत असे. सुटीचे दिवस वजा जातां ह्या दरानें एक वर्षांत तेथील खाणींतून १,६८,९१,२०० टन कोळसा बाहेर पडे. पुढील चार वर्षांत कामाचे तास रोजी आठ ठरविण्यांत आले. ह्याचा परिणाम असा झाला कीं मजूर सरासरीनें दररोज ३·२ टन कोळसा उकरून काढूं लागले व एकंदरीनें खाणींचें उत्पन्न प्रतिवर्षी २,१५,४२,००० टन इतकें होऊं लागलें. ह्यावरून दररोज मजूरांस दोन तास विश्रांति दिल्यानें त्यांचें शारीरिक व मानसिक जीवन इतकें जोमदार बनलें कीं ते पहिल्यापेक्षां ४६,५०,८०० टन कोळसा अधिक काढण्यास समर्थ झाले हें ध्यानांत येईल. मजूरांच्या राहणीच्या दृष्टीनें तसेंच राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें ही गोष्ट सर्वथैव हितावह झाली, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. मनुष्यांस उदरभरणार्थ बाजवीपेक्षां अधिक काळ काबाडकष्ट करावे लागत असल्यास त्यांना फुरसत मिळवून देणें हें व्यक्तीच्या व समाजाच्या दृष्टीनें जसें हितावह आहे त्याचप्रमाणें व्यक्तिशः सामान्य लोक जर आपला वेळ कांहीं काम न करतां आळसांत घालवीत असतील अगर कामावर असतांनाही सर्व शारीरिक व मानसिक शक्ति एकवटून श्रम करण्याकडे त्यांची प्रवृत्ति नसेल तर निव्वळ कामाच्या तासावरून त्यांची उत्पादकता ठरविणें अव्यवहार्य व अयुक्त ठरेल. अशा प्रकारच्या लोकांची फुरसत कमी करून उलट त्यांस अधिक काम मिळण्याची व ते कामावर असतांना अधिक तत्परतेनें श्रम करण्यास ते समर्थ होण्याची व्यवस्था करावयास पाहिजे.

**७ लोकसंख्येची वाढ**–उत्पादनाचा प्रभावी घटक व सर्व अर्थोत्पत्तीचा उपभोक्ता ह्या दुहेरी नात्यानें अर्थशास्त्रांत अथपासून इतिपर्यंत 'मनुष्य' हाच प्रामुख्यानें वावरत असतो. मनुष्यांची संख्या, त्यांच्या वाढीचें मान, मजूरांचा

पुरवठा, उत्पादनपद्धतीचा किफायतशीरपणा, उत्पादक घटकांची कमाई व समाजांतील राहणीचें मान ह्या सर्व आर्थिक बाबींचा परस्पर संबंध अत्यंत निकट आहे. अमेरिकेतील नव्या वसाहतवाल्यांचें उदाहरण घेऊन राहणीच्या मानाचा कार्यक्षमतेवर व लोकसंख्येच्या वाढीवर जो परिणाम होतो त्याचें स्वरूप वर दिग्दर्शित केलें आहे. सजीव सृष्टींतील इतर प्राण्यांच्या वाढीशी मनुष्यांच्या वृद्धीची तुलना केल्यास आपणांस राहणीच्या मानाचें, म्हणजे मनुष्यें स्वतःस ठराविक वस्तु उपभोगावयास मिळणें आवश्यक आहे असें समजतात त्या त्यांच्या मानसिक भावनेचें लोकसंख्येच्या वाढीच्या दृष्टीनें असलेलें महत्त्व दिसून येईल.. इतर प्राण्यांत खाणें, पिणें इत्यादि इतर गरजाप्रमाणें मैथुन व्यवहारही नैसर्गिक अंतःस्फूर्तीनें होत असतो. त्यापैकीं कोणतीही एक गरज भागवितांना इतर गरजा भागविण्याच्या त्यांच्या उपभोगसामर्थ्यावर काय परिणाम होईल ह्याबद्दल विचार करण्याची त्यांस पात्रता नसते; त्यामुळें पशुपक्ष्यांची संख्या व त्यांच्या अस्तित्वास आवश्यक असलेलीं साधनें ह्यांचा मेळ बसविण्याचें काम निसर्गास अगर मनुष्यास करणें भाग पडतें. स्वतः मनुष्यांच्या संख्येची वाढ प्रत्यक्षपणें नियंत्रित करण्यास मनुष्येतर दुसरी एखादी शक्ति अस्तित्वांत नाहीं. त्यामुळें लोकसंख्या व उपजीविकेचीं साधनें ह्यांचें गुणोत्तर मनुष्यांनीं स्वतः नियमित न केलें तर निसर्गास अनेकविध मार्गांनीं तें घडवून आणावें लागलें. परंतु स्वोन्नतीची इच्छा, आत्मसंयमन व दूरदृष्टि ह्या भावना मनुष्यांत उपजतच सांपडत असून सामाजिक प्रगतीच्या चढत्या अवस्थांत हे गुण वृद्धिंगत होत असल्यानें लोकसंख्येच्या वाढीचें मनुष्यकृत प्रयत्नांनीं नियमन करणें शक्य झालें आहे.

लोकसंख्येच्या वाढीसंबंधानें विवेचन करतांना 'माल्थस' नांवाच्या प्रसिद्ध इंग्रज गृहस्थानें ह्याप्रश्नाविषयीं जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांचा प्रामुख्यानें उल्लेख करणें आवश्यक आहे. इंग्लंडमध्यें आठराव्या शतकाच्या शेवटीं जी सामाजिक व आर्थिक परिस्थिति होती तिच्या व त्याकालापूर्वी सामान्यतः सर्व राष्ट्रांत जो अनुभव येत असे त्याच्या आधारानें माल्थसनें लोकसंख्येच्या वृद्धिसंबंधीं कांहीं प्रमेयें बनविलीं होतीं; त्यांचें स्थूल स्वरूप पुढें दिल्याप्रमाणें आहेः— (१) प्रत्येक राष्ट्रांतील लोकांची संख्या एवढी झपाट्यानें वाढते कीं रोग, दुष्काळ, युद्धें इत्यादि नैसर्गिक व दूरदृष्टि, आत्मसंयमन इत्यादि मानवी उपायांचें नियंत्रण नसतें तर माणसांचा फाजील सुळसुळाट झाला असता. कारण, (२) निसर्गांतील उत्पादक द्रव्यांचा जो पुरवठा प्रत्येक देशाच्या वांट्यास आलेला असतो त्याहून अधिक जीवितसाधनांचा तेथील लोकांस पुरवठा होणें अशक्य असतें.• ह्यास्तव, (३) मनुष्यांनीं आपापल्या देशाची परिस्थिति ओळखून धोरणी वृत्तीनें जननसंख्येस आळा घालणें इष्ट आहे. यूरोपखंडांतील कांहीं प्रमुख राष्ट्रांची लोक-

संख्या कोणत्या प्रमाणांत वाढत आहे हें पाहून त्यानें साधारणतः २५ ते ३० वर्षांत लोकसंख्येची दुप्पट होते असें अनुमान बांधलें होतें. ह्या वेगानें सर्व राष्ट्रांची लोकसंख्या सारखी वाढत गेल्यास विस्तीर्ण भूतलावरही मनुष्यास पुरेशी जागा उरणार नाही हें उघड आहे. त्याचप्रमाणें मनुष्यांच्या उत्पादक शक्तींत व निसर्गांतील अनेक वस्तु स्वतःच्या सुखवर्धनार्थ उपयोगांत आणण्याच्या त्यांच्या सामर्थ्यांत जरी सुधारणा होत राहिली तरी एकंदरीनें नैसर्गिक साधनांचा पुरवठा मर्यादित असल्यानें लोकसंख्येच्या वाढीवरही मनुष्यकृत नियमनाच्या अभावीं नैसर्गिक नियंत्रण असतें हेंही कबूल केलें पाहिजे. एखाद्या विवक्षित वेळीं उत्पादक पद्धतींत विशेष झपाट्यानें सुधारणा होत असेल तर त्या मानानें राष्ट्राचें निव्वळ उत्पन्न वाढून अधिक लोकसंख्येस चरितार्थ चालविता येईल हे खरें; व आजवर ज्या राष्ट्रांत अशा सुधारणा घडून आल्या तेथेंच लोकसंख्येची विशेष वाढ झालेली आपणांस दिसते. अशा ठिकाणीं नैसर्गिक द्रव्यांत वास्तविक वाढ न होतांही लोकसंख्येचें मान वाढतें राहूं शकतें. परंतु अशा सुधारणांचें अस्तित्व ज्यामानानें कमी असेल त्यामानानें जीवितसाधनें मर्यादित होऊन लोकसंख्येच्या वाढीस आळा घालणें अगर नैसर्गिक रीत्या तो घातला जाणें आवश्यक आहे. विशेषतः समाजातील प्रत्येक व्यक्ति, इतर पशुइत्यादि प्राण्यांप्रमाणें निव्वळ जीवितधारणेवर संतुष्ट न राहतां अधिकाधिक गरजा भागविण्याचा प्रयत्न करीत असल्यानें एकंदर समाजास उपलब्ध असलेल्या नैसर्गिक देणगीच्या मानानें त्याच्यांतील व्यक्तींची संख्या किती आहे हा प्रश्न महत्त्वाचा ठरतो.

नैसर्गिक देणगी, अगर प्रत्येक राष्ट्राच्या वांट्यास आलेल्या उत्पादक द्रव्यांचा पुरवठा, म्हणजे मुख्यतः शेतजमीन होय असें माल्थसच्या वेळीं समजलें जाई. जगातील सर्व राष्ट्रांचा सामुदायिक स्वरूपाचें विचार केला तर हा समज विशेषसा अयथार्थ नाहीं. मनुष्याच्या सर्व गरजांमध्यें प्राथमिक गरज म्हणजे खाद्यपदार्थांसंबंधींची होय. आतां खाद्य पदार्थ धान्य, पशुपक्षी, अगर मत्स्य, ह्यांपासूनच माणसास तयार करावे अगर मिळवावे लागतात. जलाशयांतील प्राण्यांचा पुरवठा सकृद्दर्शनीं अमर्याद वाटला तरी वाढत्या उत्पादनास लागणाऱ्या वाढत्या श्रमामुळें तो अपुराच ठरतो ह्यांत शंका नाहीं. पशुपक्ष्यांचें अस्तित्व झाडफळा, गवत, धान्य इत्यादि रूपानें शेवटीं शेत जमिनीवर अवलंबून असतें. ह्यावरून एकंदर मनुष्यसमाजाच्या दृष्टीनें जगांतील शेतजमिनीचा पुरवठा व तिची उत्पादकता म्हणजे पर्यायानें मनुष्यांच्या संख्येस असलेली मागणी असें म्हटलें तर तें चालण्यासारखें आहे. एखाद्या विवक्षित राष्ट्रास विवक्षितकाळीं शेतजमिनीखेरीज खाणी, अरण्यें ह्यांसारख्या नैसर्गिक अगर मोठमोठ्या कारखान्यासारख्या कृत्रिम साधनांनीं तयार केलेला माल परदेशीं पाठवून त्या मोबदला इतर राष्ट्रांच्या शेत जमिनींत उत्पन्न

झालेल्या खाद्य वस्तू स्वतःस मिळवितां येतात हें खरें. माल्थस यांस अंतर्राष्ट्रीय दळणवळण व व्यापार ही वाढून स्वदेशांत न मिळणाऱ्या वस्तु परदेशाहून आणण्याची जी सोय गेल्या शतकांत झालेली आहे तिची पूर्णपणें कल्पना करतां येणें अर्थातच शक्य नव्हतें. त्याचप्रमाणें उपजीविकेच्या साधनांत वर सांगितलेल्या उत्पादक पद्धतींतील सुधारणांमुळें होणाऱ्या वाढीची माल्थसची कल्पना अलीकडील शास्त्रीय शोधांच्या मानानें अगदींच अपुरी असावी त्यांतही आश्चर्य नाहीं. परंतु सर्व राष्ट्रांच्या दृष्टीनें मिळून विचार करतां व परदेशांत पाठवाव्या लागणाऱ्या तयार वस्तूंस कच्चा माल व उत्पादनाची साधनें निसर्ग निर्मित वस्तूंपासून मिळवावी लागतात हे ध्यानांत घेतां माल्थसची अनियंत्रित लोकसंख्येच्या वाढीबद्दलची भीति अगदींच निराधार आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं.

मनुष्यें आपण होऊन बुद्ध्या अगर नैसर्गिक स्फूर्तीनें जें संततिनियमन करतात त्याबद्दल माल्थसची जी नैराश्यजनक व अनुदार कल्पना होती, ती मात्र विशेष समर्थनीय ठरत नाहीं. मनुष्यें जात्या विकारवश व अदूरदृष्टि असतात व नैसर्गिक साधनांच्या मानानें त्यांची संख्या नेहमीं वाढती असते ह्या गोष्टी गृहीत धरून त्यानें असा निष्कर्ष काढला कीं रोगराई, दुष्काळ व युद्धें इत्यादि मनुष्य संहारक अरिष्टें लोकसंख्येचें जीवितसाधनांच्या पुरवठ्याशीं योग्य प्रमाण प्रस्थापित करण्याचे सृष्टिदेवतेचे मार्गच होत. अर्थातच ह्या आपदा टाळावयाच्या असतील तर मनुष्यांनीं जाणूनबुजून आपली संख्या मर्यादित केली पाहिजे अशी शिकवणूक समाजांत प्रसृत करणें भाग पडलें. ह्या विचारसरणींत दोन महत्त्वाचे दोष आहेत हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. एकतर दुष्काळ, रोगराई अगर युद्धें ह्यांमुळें उपलब्ध साधनांच्या मानानें लोकसंख्या मर्यादित होते हें खरें असलें तरी तेवढ्यावरून हीं अरिष्टें सर्वस्वी अगर मुख्यतः जीविताचीं साधनें व लोकसंख्या ह्यांच्या विषम प्रमाणामुळें उद्भूत होतात असें म्हणतां यावयाचें नाहीं. दुसरें असें कीं मनुष्याची सामान्य दूरदृष्टि, स्वतःच्या राहणीच्या मानांत सुधारणा घडवून आणण्याची त्याची महत्त्वाकांक्षा व आपल्यावर अवलंबून असणाऱ्या इसमांचा चरितार्थ चालविण्यासंबंधी त्याची कर्तव्यजागृति इत्यादि कारणांनीं साधारण सुबुद्ध मनुष्य साहजिकपणें आपला संसार आटोपता ठेवण्याचा प्रयत्न करीत असतो. लोकसंख्येच्या तात्विक नियमांवरून आपली व्यावहारिक वागणूक ठरविणारे फार तर उच्च व मध्यम हे दोनच वर्ग होत. त्यांतील श्रीमंत वर्गास उपजीविकेचीं साधनें विपुल असल्यानें माल्थसच्या शिकवणुकीनें त्यांस आपला क्रम बदलणें जरूर वाटत नाहीं. मध्यम वर्ग मात्र आधींच नैसर्गिकपणें साधनांचा मर्यादित पुरवठा व त्या पुरवठ्यावर, विवाहसंबंधासारख्या अधिक तीव्र मागणीचा आघात करणाऱ्या त्याच्या गरजा ह्यांच्या कचाटींतून कसें सुटावें ह्या कोड्यांत पडलेला असतो. सामान्यतः कोण-

त्याही देशाचें उदाहरण घेतलें तर आपणास असें दिसून येईल कीं श्रीमंत लोक व गोरगरीब ह्या वर्गांत विवाहकालीं असलेली वयोमर्यादा सरासरीनें कमी असते, व मध्यम वर्गांत ती अधिकांत अधिक असते. ह्याच मधल्या स्थितींतील लोकांवर माल्थसच्या शिकवणुकीचा अनिष्ट परिणाम होऊन फ्रान्ससारख्या देशांत त्याच्या पंथाच्या नावाखालीं अनेक अनीतिमान व समाजहितविघातक प्रकार चालू आहेत. दूरदृष्टीच्या प्रतिबंधक उपायांविषयीं माल्थसचें मत असें होतें कीं मनुष्यांनीं जरूर तेवढ्या उशीरा लग्न करून आपोआप जें संततिनियमन होईल तें करावें. कुटुंबाचा आकार सरासरीनें केवढा होईल ह्याचा अदाज करून आपल्या कुटुंबाचा निदान आपल्या वर्गांतील राहणीच्या मानानें तरी चरितार्थ चालविता येण्याइतकें स्वतःचें आर्थिक बल वाढल्याशिवाय कोणीही लग्न करूं नये, असा ह्या शिकवणीवरून व्यावहारिक निष्कर्ष निघतो व तो सामान्य दूरदर्शीपणास व व्यवहार ज्ञानास धरून असल्यानें अनेक मनुष्यांची वागणूकही त्यास अनुसरूनच असते। परंतु विकृत मनोवृत्तीचे कित्येक आधुनिक लोक माल्थसच्या विचारसरणीवर अगदीं अनपेक्षित असा नवा अर्थ लादून संभोगस्वातंत्र्य व संततिनियमन ह्यांचा एकसमयावच्छेदकरून लाभ मिळवूं पहातात. विवाहापूर्वी व तदनंतरही ह्या स्वरूपाच्या वागणुकीपासून अनेक नैतिक व सामाजिक तोटे होतात, हे सांगावयास पाहिजे असें नाहीं. वर सांगितलेलीं दुष्काळादि अरिष्ट व लोकसंख्येची वाढ ह्यांच्यांतील कार्यकारण संबंधाची आत्यंतिक कल्पना व सामान्य सुशिक्षित वर्गांत असलेल्या नैसर्गिक दूरदृष्टीची अपुरी जाणीव ह्या दोन दोषामुळें माल्थसच्या पाहिल्या व मुळांत यथार्थ असलेल्या प्रमेयाचें, म्हणजे लोकसंख्येच्या नैसर्गिक साधनांच्या मर्यादेत परवडण्यावर असलेल्या अंतिम अवलंबनाचें, अलीकडील कित्येक लोकांस महत्व वाटत नाहींसें झालें आहे.

माल्थसच्या सिद्धान्तांतील अपुरेपणा व सापेक्षता हीं योग्यपणें ध्यानांत येण्यास लोकसंख्येच्या वाढीच्या बाबतींत अमेरिका व हिंदुस्थान ह्या देशांतील परिस्थितीची तुलना केली तर ती उपयुक्त ठरेल. आपल्याकडे बहुतेक वर्गांत लग्न करणें व संतति वाढविणें हें धार्मिक कर्तव्यच होय असें समजलें जातें. तसेंच अनेक राजकीय व आर्थिक कारणांनीं हिंदुस्थानांतील उद्योग धंद्यांची व शेतकीची पूर्वी इतकी भरभराट राहिली नसल्यानें देशांत दारिद्र्य वाढत्या प्रमाणावर दिसून येतें. उलटपक्षीं, उद्योगधंदे व शेती ह्यांची पूर्वी भरभराट असूनही युद्ध व दुष्काळ ह्यांचें हिंदुस्थानांत सहसाच ठाणें बसलेलें असे ही गोष्ट ध्यानांत घेणें आवश्यक आहे. शिवाय हल्लीं लोकसंख्या वाढत असूनही युद्ध, दुष्काळ अगर रोगराई इत्यादि अरिष्टास पूर्वीपेक्षां अधिक माणसें बळी पडतात असा पुरावा नाहीं. अमेरिकेंत तर जमीन व वसाहत ह्या दोन्ही कारणांनीं लोकसंख्येंत प्रचंड प्रमाणावर वाढ होत असून देशांतील उत्पादक

साधनांच्या विपुलतेमुळे अर्थोत्पादन त्याहीपेक्षां अधिक प्रमाणांत वृद्धिंगत होत आहे. संख्या, अर्थोत्पादन व राहणीचें मान ही सर्व चढीची असून रोग, दुष्काळ व युद्ध ह्यांचा तर पूर्ण अभाव दृष्टीस पडतो. उलट तेथील कित्येक सुबुद्ध लोकांस वरिष्ठ वर्गांत जन्म संख्येचें प्रमाण कमी असतें, ह्याबद्दल विशेष चिंता वाटते. कार्यक्षम मनुष्यांतील गुण आनुवंशिक संस्कारानें पहिल्या पिढीस योग्य प्रमाणांत न मिळाले तर एकंदर समाजातील कर्तबगारीचा पुरवठा मर्यादित होऊन राष्ट्राचा ऱ्हास होईल अशी सद्‌गृहस्थ ग्रंथकारास भीति वाटते. आनुवंशिक संस्कारानें गुणांचा कितपत पुरवठा होतो व उलट पक्षीं, अडचणींशीं झगडताना मनुष्याच्या गुणांचा जो विकास होतो त्यापासून समाजाचा किती फायदा होतो ह्या प्रश्नाच्या उत्तरावरूनच ही भीति साधार आहे किंवा कसे हे ठरविलें पाहिजे. एकंदरीनें व्यक्तींच्या आनुवंशिक गुणामुळे समाजाचा उत्कर्ष न आला तरी सर्व राष्ट्रांतून एक सारखे कर्तबगार लोक मिळत राहिल्यानें समाजाचें हित व्हावयाचें राहत नाहीं, हे मात्र ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे.

**८ उपभोग व खासगी संस्था**—प्रत्येक मनुष्यास उपलब्ध असलेल्या उपभोगसामर्थ्याचा त्यास मितव्ययाच्या तत्वानुसार पूर्ण फायदा मिळणें इष्ट आहे असें व्हावयाचें म्हणजे एकतर त्यास पाहिजे असलेला प्रत्येक जिन्नस शक्य तितक्या कमी किंमतीस मिळाला पाहिजे व तो ज्या निरनिराळ्या वस्तु वापरतो त्या त्याच्या कार्यक्षमतेस हानिकारक नसून त्याच्या उपभोगापासून त्यास होणारें समाधान सामाजिक श्रमाच्या मानानें अपुरें असतां कामा नये. व्यक्तिमात्रांत जी नैसर्गिक दूरदृष्टि असते तिच्या योगानें बहुतेक बाबतींत ती मितव्ययाचें तत्व सहज अंमलांत आणते परंतु गरीब वर्ग व मध्यम वर्गांतील कनिष्ठ प्रतीचे लोक ह्यांस अनेक कारणांनीं योग्य किंमतीस व चांगला माल मिळण्याची अडचण पडते; व त्यांच्या अज्ञानामुळें व दुर्बलतेमुळें ते कोणत्या ना कोणत्या तरी व्यसनास बळी पडण्याचा संभव असतो. ह्या दोन्ही अडचणींतून सामान्य उपभोक्त्याची सुटका होण्याचा एकच खात्रीचा मार्ग असून तो उपभोक्त्यांनीं आपल्या संस्था स्थापून उत्पादकांकडून चांगला माल शक्य तितक्या कमी किंमतीस विकत घेणें व आपापसांत सुधारणा घडवून आणून हानिकारक वस्तूंचा उपभोग मर्यादित करणें हाच होय.

उत्पादक व उपभोक्ते ह्यांचें अंतिम हित एकच असतें व पूर्ण स्पर्धा व चलनशीलता ह्यांचें समाजांत अस्तित्व असल्यानें उपभोक्त्यांस प्रसन्न करण्याकरितां उत्पादक शक्य तितका चांगला माल कमींत कमी किंमतीस देण्याचा प्रयत्न करीत असतात हे गृहीत धरून कित्येक ग्रंथकार वर निर्दिष्ट केलेल्या वैयक्तिक किंवा संघटित प्रयत्नांची जरूर नाहीं असें प्रतिपादन करतात. ह्या मतांत गृहीत मानलेली गोष्ट, म्हणजे स्पर्धा व चलनशीलता ह्यांचें अस्तित्व, ही नेहमीच्या व्यवहारांत फारच अपूर्णतेनें दृष्टिगोचर होते, हें मागील कित्येक भागांवरून वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच.

शिवाय, उपभोक्त्यास खुष करण्यात उत्पादकाचा कोणताही वैयक्तिक प्रेमभावाचा अगर सामाजिक कर्तव्यतत्परतेचा हेतु नसून केवळ स्वतःस अधिकांत अधिक फायदा करून घेण्याचें आवश्यक साधन म्हणूनच तो गिऱ्हाइकाचें समाधान होईल अशी खटपट करतो. त्यास जर असें दिसून आलें की गिऱ्हाइकाच्या अज्ञानानें अगर दुर्बलतेनें वाईट प्रतीचा माल वाढत्या किंमतीनें घेण्यास त्यास भाग पडतां येईल तर तो तसें करण्यास चुकणार नाही. खेडेगावांत एकच एक दुकान असून त्या दुकानदाराशी उधारीनें व्यवहार करणाऱ्या सामान्य इसमाचें उदाहरण घेतल्यास आपणांस असें दिसून येईल की मक्तेदाराचा फायदा मिळूनही निव्वळ फसवेगिरीनें गिऱ्हाईकाकडून कमी प्रतीच्या मालास अधिक किंमत घेण्यात येते. मोठमोठ्या शहरांतही असा प्रकार थोड्याफार प्रमाणात चालू असतो. वास्तव अनेक उपभोक्त्यांनी आपलें उपभोगसामर्थ्य एकवटून निरनिराळ्या वस्तूंबद्दलची मागणी संकलित स्वरूपानें व मोठ्या प्रमाणावर केली तर त्यास माल चांगला व स्वस्त मिळण्याची खात्री असते.

उपभोक्त्यांच्या अशा संस्था सामान्यतः सहकार्याच्या तत्वावर चालविलेल्या असतात. त्यांच्या व्यवस्थेतील तपशीलांत अर्थातच थोडा फार फरक असतो. कित्येक संस्था बाजार भावानें चांगला माल आपल्या सभासदांस देऊन होणारा नफा भांडवलाच्या अगर खरेदीच्या प्रमाणांत त्यास वाटून देतात. कांही मंडळ्यांत मालाची किंमतच बाजारांतील दराहून कमी ठेवलेली असते. उपभोक्त्यांच्या संस्थेचे दुसरें कार्य म्हणजे अनिष्ट स्वरूपाचा उपभोग टाळणें हे होय. मद्यपान, इतर मादक पदार्थांची व्यसनें, मांसाहार इत्यादि विशिष्ट वर्गास अपायकारक वाटणाऱ्या वस्तूंचा उपभोग शक्य तितका मर्यादित करावा ह्या हेतूनें अनेक स्वतंत्र संस्था स्थापन झाल्या आहेत किंवा हेंच कार्य किफायतशीर खरेदी करण्याकरितां अस्तित्वांत आलेल्या इतर मंडळ्याकडून केलें जात आहे. विशेषतः मजूरवर्गास आत्मसुधारणेकरितां जे अनेक प्रयत्न करावे लागतात त्यांतच मितव्यय व निर्व्यसन ह्यांचा अंतर्भाव होत असल्यानें मजूर संघांच्या जोडीनें व त्यांच्याशी सहकार्य करून ज्या संस्था चालविल्या जातात त्या विशेष उपयुक्त व लोकप्रिय झालेल्या आहेत. मध्यम वर्गातही ज्यामानानें मितव्ययाच्या तत्वाबद्दल आस्था व सहकार्यानें काम करण्याची सवय ह्यांचा प्रसार झाला असेल त्यामानानें उपभोक्त्यांच्या संस्था अधिक यशस्वीपणे चालविलेल्या दिसतात. कित्येक आत्यंतिक समाजसत्तावादी सहकृत उपभोगास विरोध करतांना दृष्टीस पडतात, ही मात्र शोचनीय गोष्ट होय. भांडवलवाले व मजूर, उत्पादक व उपभोक्ते, श्रीमंत व गरीब ह्यांमध्यें वैरभाव कायम राखणें हे क्रान्तिकारक समाजसत्तावाद्यांचें आद्यकार्य होऊन बसलें आहे. त्यामुळें ज्या संस्थांच्या अगर प्रचाराच्या योगानें मजूरवर्गाचें व इतर उपभोक्त्यांचें अधिक समाधान होण्याची खात्री असते त्यांस समाजसत्तावाद्यांतील कांही कट्टरांकडून नेहमी अडथळा आणला जातो. मजूरांची व गरीब वर्गाची स्थिति सुधारण्याकरितां

समाजसत्तावाद्यांची चळवळ नसून कांही चळवळे व क्रान्तिकारक ह्यांचें स्तोम कायम रहावें म्हणून ते मजूरवर्गाची खरीखोटी गाऱ्हाणी पुढें करतात, असें वरील अनुभवावरून कोणी म्हटल्यास तें सर्वस्वी अयथार्थ होईल असें नाही.

उपभोक्त्याच्या अनेक संस्थांपैकी घर बांधणीकरितां स्थापन झालेल्या मंडळ्यांचा विशेष उल्लेख करणें जरूर आहे. मोठ्या प्रमाणावर अर्थोत्पादन करण्याच्या पद्धतीचा प्रसार होऊं लागल्यापासून लोकवस्ति मोठमोठ्या शहरांत खेंचली जात आहे. गरीब वर्गांतील लोकांच्या उत्पन्नांतील बहुतेक सर्व भाग अन्नवस्त्रावर खर्च होत असल्यानें त्यास राहण्याची चांगली जागा मिळविण्याची ऐपत नसते. गोरगरीब व मजूर ह्यांची वसतिस्थानें ज्यांनी पाहिली आहेत त्यास तीं आरोग्याच्या, कार्यक्षमतेच्या अगर नीतिमत्तेच्या दृष्टीनें किती असमाधानकारक असतात हे सांगावयास पाहिजे असें नाही. उपभोक्त्यांनी आपापल्या संस्थांच्या द्वारें चांगलीं घरें भाड्यानें अगर मालकी हक्कानें मिळविण्याची खटपट केली तर ती थोडी बहुत यशस्वी होईल ह्यांत शंका नाही. परंतु त्यांचें आर्थिक सामर्थ्य व पत ही इतकी अपुरी असतात की निव्वळ स्वावलंबनानें गरीब वर्गास हा प्रश्न सुटण्यासारखा नाही. म्युनिसिपॉलिट्या, लोकल बोर्डें, व सरकार इत्यादि समाजसंस्थांच्या व लोकहिततत्पर भांडवलवाल्याच्या साहाय्यानें पुरेशीं सोयीस्कर घरें बांधून तीं गोरगरिबास माफक दरानें भाड्यानें दिली तरच त्यास चांगली जागा मिळणें शक्य आहे. घरसुधारणेनें त्यांतील मनुष्यांचें राहणीचें मान व त्यांची कार्यक्षमता ही वृद्धिंगत होऊन त्यांचा व समाजाचा शेवटीं फायदा होईल ह्यांत शंका नाही. मध्यम वर्गांतील लोकांस मात्र सहकार्याच्या शक्तीवर भांडवल उभारून कांहीशा सरकारी मदतीनें चांगलीं घरें मिळविणें शक्य आहे. निरनिराळ्या देशांतील अनेक उद्योगधंद्यांच्या केंद्रांभोंवतीं जीं उपनगरें वसलेलीं असतात त्यांतील कित्येकांमध्यें मध्यम वर्गानें सहकार्याच्या तत्वावर उभारलेलीं घरें प्रामुख्यानें दृष्टीस पडतात. अनेक सामाजिक संस्थास घरबांधणीच्या ह्या व इतर योजनांप्रीत्यर्थ जो त्याग करावा लागतो त्याचें एकंदर समाजास शेवटीं इष्ट फल मिळाल्याशिवाय रहात नाही.

**९ उपभोग व सरकार**– सर्व धर्मांतील प्राचीन धर्मग्रंथ व रीतिरिवाज पाहिले तर व्यक्तिमात्राच्या उपभोगस्वातंत्र्यावर समाजहितार्थ नियंत्रण घालणें युक्त आहे एवढेंच नव्हे, तर समाजांतील धुरीणांनी व्यक्तिहितास जी गोष्ट बाधक आहे असें ठरविलें तिचा उपभोग नियमित करणेंही आवश्यक आहे असा पुरातन कालापासून समज प्रचलित आहे, असें आपणांस दिसून येईल. धर्ममतांनी व्यक्तीचें सर्व व्यवहार ठरण्याचा काळ निघून गेल्यानंतरही मध्ययुगांत बहुतेक राष्ट्रांतील सरकारांकडून चैनीच्या व व्यसनाच्या स्वरूपाच्या वस्तूंच्या उपभोगावर निरनिराळीं नियंत्रणें घातलीं जात. कांहीं वस्तूंचा उपभोग सर्वस्वीं बेकायदेशीर ठरविलेला

असून दुसऱ्या कांही वस्तूंवर कर लादून अगर प्रत्यक्षपणें तसा कायदा करून त्यांचा प्रसार मर्यादित केला जाई. पुढे पुढे मात्र विशेषतः यूरोपखंडांतील प्रगमनशील राष्ट्रांतील सरकारांवर उदारमतवादी तत्वज्ञांच्या व अर्थशास्त्रज्ञांच्या मताचा पगडा बसून व्यक्तिमात्राचे सर्व आर्थिक व्यवहार स्वतंत्र असावे हे धोरण अनुसरण्यांत येऊं लागलें. परंतु लवकरच निर्भेळ व्यक्तिस्वातंत्र्याचे अनेक दोष लोकांच्या प्रत्ययास येऊन मनुष्यास सामान्यतः सर्व व्यवहारांत स्वातंत्र्य असावे हे इष्ट असलें तरी ज्या ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या व्यक्तींच्या अनिष्ट वागणुकीनें समाजाचा तोटा होतो ती वागणूक जबरदस्तीनें सुधारणें न्याय्य व आवश्यक आहे, असें सुशिक्षित लोकमत बनूं लागलें. विशेषतः प्रस्तुत ग्रंथाच्या प्रास्ताविक भागांत सामाजिक घटकांच्या अन्योन्यावलंबनाचें जें तत्त्व सांगितलें आहे तें दिवसानुदिवस अधिक मान्यता पावत असल्यानें व्यक्तींच्या अनिष्ट उपभोगाची जबाबदारी पर्यायानें समाजावर पडते हें जाणून अधुनिक सरकार उपभोगास सामान्यतः पूर्ण स्वातंत्र्य देऊन जरूर तेथें मात्र त्यास योग्य दिशा लावण्याचा प्रयत्न करतात. त्यांचा हा प्रयत्न दोन स्वरूपाचा असतो. कांही प्रकारचा उपभोग कायद्यानें बंद अगर मर्यादित केलेला असतो व इतर कांही असमाधानकारक प्रकारच्या उपभोगास सरकार आर्थिक व इतर मदत करून समाजहितास त्याचा अडथळा न येण्याची व्यवस्था करतें. प्रस्तुत स्थळीं उपभोगासंबंधीच्या ह्या दोन्ही प्रकारच्या सरकारी कामगिरीचा थोडक्यांत उल्लेख करावयाचा आहे.

वैयक्तिक व सार्वजनिक आरोग्यास हानिकारक असलेल्या अनेक वस्तूंचा उपभोग सरकारी रीत्या मर्यादित केला जातो. मागें दारु व इतर मादक पदार्थ ह्यांचें समाजांतून उच्चाटण करण्याचे धोरण कांही राष्ट्रांनीं स्वीकारले आहे असें सांगितलेलें वाचकांस आठवत असेलच. इतर राष्ट्रांतही ह्या वस्तूंचा उपभोग लोकमतास अनुसरून योग्य व शक्य तितका नियमित केला जातो. मनुष्यमात्रास आवश्यक असलेले खाण्यापिण्याचे पदार्थ शुद्ध स्वरूपांत विकले जावे, त्यांत इतर कमी प्रतीच्या वस्तूंची भेसळ केली जाऊं नये असा सामान्य सरकारी कायदा असतो तोही व्यापाऱ्यांनीं फसवणुकीनें लोकांजवळून पैसे लुबाडूं नयेत व देशांत रोगकारक खाद्य पदार्थांचा प्रसार होऊं नये म्हणूनच होय. आपल्याकडे तुपांत चरबी, रव्यांत पीठ, दुधांत पाणी इत्यादि अनेक भेसळीचे पदार्थ विकतांना दिसतात. ह्या प्रकाराबद्दल लोकमतांत योग्य जागृति असती व सरकारही हल्लीपेक्षां समाजहितास अधिक दक्ष असतें तर ह्या प्रकारांविरुद्ध अस्तित्वांत असलेले कायदे नेहमीं अमलांत आणावे लागले असते. विशेषतः शास्त्रीय शोधांच्या वाढीमुळें प्रत्येक पदार्थास बदली पदार्थ मिळत असल्यानें स्वार्थी व्यापाऱ्यांस कमी किंमतीचा माल भारी किंमतीचा म्हणून विकावयास सांपडतो व कित्येक उपभोक्तेही

चांगली वस्तु विकत घेण्याची ऐपत नसल्यानें कमी प्रतीचा माल अधिक दिखाऊ करून मिळाला तरी आपलें समाधान मानतात. सामाजिक आरोग्य व नीतिमत्ता ह्या दोहोंच्या दृष्टीनें हा प्रकार बंद होणे इष्ट आहे. शहरांतील चहाच्या व फराळाच्या दुकानांवर स्थानिक व मध्यवर्ति सरकार आपली हुकुमत ठेवून आरोग्यदृष्ट्या त्यांजवर कांही नियंत्रणें घालतें, हें बहुतेकांस माहीत असेल. दुधाच्या बाजारांत मालाच्या शुद्धतेबद्दल नेहमी तपासणी केली जाते तीही मुख्यतः अनिष्ट स्वरूपाचा उपभोग मर्यादित करण्याच्या हेतूनेच होय. स्थानिक संस्था व सरकार ह्यांनी निरनिराळ्या उपयुक्त वस्तूंच्या व्यापाराप्रीत्यर्थ 'बाजार' बांधून देणें जरूर आहे, हें सर्वमान्य मत उपभोक्त्यांस माल मिळविण्याची सोय व्हावी ह्या इच्छेचेंच निदर्शक होय. प्रजाजनांतील फार मोठा वर्ग रोगकारक व कोंदट हवेच्या व धोक्याच्या घरात राहिल्यास राष्ट्राचें नुकसान होण्याची खात्री असल्यानें पडावयास झालेल्या व कोंदट हवेच्या घरांत कोणीही न राहता तीं पाडून टाकावीं असा सरकारास कायदा करता येतो. सामान्य लोकास अगर स्थानिक संस्थास मदत करून नवीन हवाशीर व स्वस्त घरें बांधण्याचें कार्यही सरकारास अंगिकारता येते. जुगार अगर सोडत खेळणें हाही मनुष्याच्या उपभोगविषयक अपव्ययाचाच एक मासला असून त्याचें नियंत्रण अगर प्रतिबंधन सरकारास करावें लागते.

दुष्काळ अगर एखादें महायुद्ध ह्यामुळें अगर दुसऱ्या कोणत्याही कारणानें मनुष्याच्या जीवनास अगर त्याच्या महत्त्वाच्या उद्योगधंद्यांस आवश्यक असलेल्या वस्तूंचा पुरवठा मर्यादित झाला तर उपलब्ध पुरवठा उपभोक्त्यात नीटपणें विभागून देण्याची कामगिरी सरकारासच करावी लागते. क्वचित् प्रसंगी तर सर्व माल प्रत्यक्षपणे आपल्या हुकमतीखालीं घेऊन सरकार त्याची ठराविक प्रमाणांत व योग्य भावानें विक्री करतें. परंतु मर्यादित पुरवठ्याची उपभोक्त्यात विभागणी करण्याचा सामान्य मार्ग म्हणजे खाजगी व्यापाऱ्यांकडूनच त्या त्या वस्तूंचें उत्पादन व विक्री करवावयाची व त्या बाबतीत त्याजवर जरूर तीं नियंत्रणें घालावयाची हा होय. विशेषतः पुरवठ्याचा मर्यादितपणा ज्यांच्या पथ्यावर पडतो त्या मध्यस्थ व्यापाऱ्यांच्या व उत्पादकांच्या फाजील नफा मिळविण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीचें नियमन करणें सरकारास आवश्यक असतें. गेल्या महायुद्धाचे वेळीं व सन १९१८ सालच्या दुष्काळांत धान्य, राकेल इत्यादि आवश्यक वस्तूंच्या व्यापारावर हिंदुस्थानांतील सरकारनेंही आपली हुकुमत बसविलेली होती व किंमती आणि नफा ह्यांचेंही नियमन केलें जात असें हें बहुतेकास ठाऊक असेल. ह्यावरून उपभोगाचा कार्यक्षमतेवर व राष्ट्राच्या आर्थिक परिस्थितीवर होणारा महत्त्वाचा परिणाम ध्यानांत घेऊन विधायक, नियामक व प्रतिबंधक मार्गांनी सरकार राष्ट्रांतील उपभोगाची, म्हणजे राहणीच्या मानाची, सुधारणा करण्याचा प्रयत्न करतें हें स्पष्ट होईल.

# भारतीय अर्थशास्त्र

## भाग दुसरा

## प्रकरण पहिलें

### राष्ट्रीय अर्थशास्त्र

**१ भारतीय अर्थशास्त्र**–ह्या ग्रंथाच्या उपोद्घातांत म्हटल्याप्रमाणें[1] हिंदुस्थानापुढे सध्यां आर्थिक व सामाजिक महत्त्वाचे जे अनेक प्रश्न उभे आहेत त्यांचा राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें सांगोपांग विचार होण्यास वाचकांस साहाय्य व्हावें ह्या हेतूनें आम्हीं येथवर अर्थशास्त्राच्या प्रमुख सिद्धांतांचें विवेचन केलें आहे. विशेषतः तज्ज्ञसंमत शास्त्रीय सिद्धांतांच्या साहाय्यानें येथील आर्थिक परिस्थितीचें आकलन अगर स्पष्टीकरण करतांना, पाश्चात्य राष्ट्रांतील परिस्थिति कित्येक बाबतींत भिन्न असल्यानें, त्यासंबंधाचे विवक्षित सिद्धांत हिंदुस्थानास गैर लागू असल्याचें दिसून येईल. अशा प्रसंगी मूलभूत महत्त्वाच्या आर्थिक सिद्धांतांच्या आधारानें व राष्ट्रहिताच्या दृष्टीनें विशिष्ट परिस्थितीचा स्वतंत्रपणें विचार करूनच आपलीं मतें व आपलें धोरण हीं ठरविलीं पाहिजेत. हिंदुस्थानांत संपत्तीचें उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग हीं कसकशीं घडून येतात ह्याचें संपूर्ण व तुलनात्मक विवेचन पुढील सर्व प्रकरणांत केलेलें आहे, त्यावरून हिंदी परिस्थितीचें वैशिष्ट्य सहज ध्यानांत येईल. देशकालवर्तमानास अनुसरून तात्त्विक सिद्धांतांचें सद्यःकालीं हिंदुस्थानांत जें स्वरूप दृष्टिगोचर होतें व प्रचलित आर्थिक प्रश्न राष्ट्रीय हिताच्या अनुरोधानें सोडवितांना जें व्यावहारिक धोरण इष्ट ठरतें त्याचें पद्धतशीर व समुच्चयरूपानें दिग्दर्शन करणें हेंच भारतीय अर्थशास्त्राचें विशिष्ट कार्यक्षेत्र व उद्दिष्ट होय.

मनुष्यस्वभाव व निसर्ग ह्यांच्या अक्षय टिकणाऱ्या विशेषांवर अवलंबून अर्थशास्त्राची रचना केली असल्यानें, इतर राष्ट्रांप्रमाणें हिंदुस्थानांतही सर्वसंमत आर्थिक तत्त्वें लागू पडलींच पाहिजेत असा कित्येक ग्रंथकार व अर्थशास्त्रज्ञ ह्यांचा

---

१ मागें पान १६ पहा.

आग्रह असतो. आर्थिक विचारसंघटणेस जर ' शास्त्र ' म्हणावयाचें तर तें गणित, ज्योतिष, पदार्थविज्ञान इत्यादि शास्त्राप्रमाणें सर्व काळीं व सर्व ठिकाणीं सारखेंच लागू पडणारें असलें पाहिजे असा युक्तिवाद कोणीं केल्यास तो वर वर पहाणारास पटण्यासारखा आहे. मनुष्याच्या शरीररचनेवरून व अनेक रसायनांच्या व औषधांच्या गुणधर्मांवरून ठरविलेलें शारीर अगर वैद्यक शास्त्र हें देखील जर सर्व राष्ट्रांत व सर्वकाळीं एकच समजलें जातें तर निसर्गदत्त वस्तूंच्या साहाय्यानें मनुष्य आपल्या गरजा भागविण्यास जे यत्न करतो त्यांचा विचार करणारें अर्थशास्त्र हेंही सर्व जगभर एकच कां असूं नये, हा मुद्दा सकृद्दर्शनीं ' भारतीय अर्थशास्त्रा'च्या प्रवर्तकांस व विद्यार्थ्यांस निरुत्तर करणारा आहे असा भासतो. यास्तव पहिल्या प्रथम ' भारतीय अर्थशास्त्र ' म्हणजे काय, त्याच्या स्वतंत्र अस्तित्वाची जरूर आहे किंवा नाहीं व विशिष्ट परिस्थितीला अनुसरून विशिष्ट तत्त्वांचा व धोरणाचा पुरस्कार करण्यांत मूलभूत महत्त्वाच्या आर्थिक सिद्धांतांची पायमल्ली होते किंवा कसें ह्या प्रश्नांचें समाधानकारक उत्तर मिळविल्याशिवाय प्रतिपाद्य विषयांत पुढें पाऊल टाकतां येणार नाहीं.

प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या संगीत, वैद्यक, ज्योतिष इत्यादि शास्त्रांप्रमाणें त्याकाळीं जे अर्थशास्त्रीय विचार प्रचलित होते त्यास कोणी भारतीय अर्थशास्त्र असें म्हटल्यास तें एका अर्थानें खरें ठरणार आहे. मागें[1] उपोद्धातांत सांगितल्याप्रमाणें प्राचीन काळीं आध्यात्मिक विषयांच्या अनुषंगानेंच आधिभौतिक प्रश्नांचा विचार करण्याची पद्धत सर्वत्र प्रचलित होती असें आपल्या अनेक धर्मग्रंथांवरून सिद्ध होण्यासारखें आहे. परंतु मनुष्यांच्या आधिभौतिक व वासनात्मक जीवनाचा स्वतंत्रपणें विचार करून त्यांच्या वैयक्तिक व सामुदायिक स्वरूपाच्या ऐहिक उन्नतीबद्दल संघटित विचारपद्धति त्यावेळेस अस्तित्वांत होती असें म्हणण्यास निदान आज मितीस तरी पुरेसा आधार नाहीं. कौटिल्याचें ' अर्थशास्त्र ' अगर त्याच्याच काळीं जे इतर कमी प्रख्यात ग्रंथकर्ते होऊन गेले त्यांचे ग्रंथ ह्यांमधून राष्ट्रांच्या, विशेषतः राज्यांच्या, सांपत्तिक प्रगतीबद्दल अत्यंत सूक्ष्मपणें विचार केलेला आढळतो. मध्ययुगीन मर्कंटॅलिस्ट व कॅमेरॅलिस्ट ह्यांच्या विचारपद्धतीशीं, किंबहुना अर्वाचीन ' सरकारी अर्थशास्त्रीय ' पद्धतीशीं आमच्याइकडील प्राचीन ' अर्थशास्त्रज्ञां'चे विचार बरेचसे जुळण्यासारखे आहेत ह्यांत शंका नाहीं. परंतु अशा ग्रंथांतून मुख्यतः राजा अगर सरकार ह्या संस्थेच्या सांपत्तिक परिस्थितीचाच विचार केला असल्यानें व्यक्ति व समाज ह्यांच्या आधिभौतिक जीवनाचें स्वतंत्र व संपूर्ण निरीक्षण त्यांत आढळत नाहीं. कौटिल्य व इतर ग्रंथकार ह्यांच्या लिहिण्यावरून त्या काळीं ' वार्ता ' ह्या नांवाचें अर्वाचीन अर्थशास्त्राचें क्षेत्र प्रमुखपणें

[1] मागें पान ८२–८५ पहा.

पुढें ठेवणारें एक अर्थशास्त्र अस्तित्वांत होतें हें उघड दिसतें. 'वार्ता हें शास्त्र अत्यंत उपयोगी असून त्याच्याच साहाय्यानें धान्य, गुरें, सोनें, जंगलांतील पदार्थ व भरपूर मजूर मिळवितां येतात; वार्ता शास्त्राच्या साहाय्यानें मिळविलेल्या खजिन्याच्या व सैन्याच्या बळावर राजांस स्वपक्ष व शत्रुपक्ष ह्या दोघांवरही हुकमत चालवितां येते.' असें कौटिल्यानें आपल्या ग्रंथांत म्हटलें आहे.[1] परंतु दुर्दैवानें त्या शास्त्राचा नांव घेण्यासारखा एकही ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. ह्यावरून निदान एवढें अनुमान तरी निश्चितपणें निघतें कीं, 'वार्ता' शास्त्राची वाढ मध्येच खुंटली असली पाहिजे. भारतीय अर्थशास्त्र म्हणजे प्राचीन काळीं हिंदुस्थानांत आर्थिक प्रश्नांबद्दल जो मत प्रसिद्ध होतें त्याचा संग्रह नव्हे हें स्पष्टपणें सांगणें आवश्यक आहे.

हिंदुस्थानांतील सांपत्तिक व सामाजिक परिस्थिति प्रमाणभूत समजून तिच्या अनुरोधानें पाश्चात्य अर्थशास्त्राच्या तोडीचें एखादें सर्वस्वी नवें अर्थशास्त्र निर्माण करण्याची मूढ महत्त्वाकांक्षा हिंदी अर्थशास्त्रज्ञ बाळगीत नाहींत हेंही एकदां उघडपणें सांगणें आवश्यक आहे. तरीही इंग्लंड, जर्मनी, ऑस्ट्रिया, अमेरिका इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांत सर्वमान्य अर्थशास्त्राचे विशिष्ट पंथ आढळतात त्याप्रमाणें हिंदुस्थानांत एक स्वतंत्र पंथ निर्माण झाला असून दिवसानुदिवस तो बळावत आहे हें कोणास नाकबूल करतां यावयाचें नाहीं. मनुष्यस्वभाव व निसर्गनियम हे सर्व ठिकाणीं व सर्वकाळीं सारखेच असतात हें विधान स्थूलमानानें खरें असलें तरी निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या प्रदेशांत मनुष्यस्वभावाचे व नैसर्गिक परिस्थितीचे कांहीं विशेष प्रमुखपणें दिसून येतात हा सार्वत्रिक अनुभव आहे. सर्वसामान्य परिस्थितीस सामान्यतः लागू पडणारें अर्थशास्त्र हें स्वतंत्र मानलें तरीही विशिष्ट राष्ट्रांच्या इतिहासांतील विवक्षित कालखंडांत तीव्रपणें भासणाऱ्या भिन्न परिस्थितीस अनुसरून सामान्य अर्थशास्त्राचा विशिष्ट पंथ व्हावयाचा राहत नाहीं. इंग्लंडमधील उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञ, जर्मनीमधील राष्ट्रहितदक्ष ग्रंथकार, ऑस्ट्रियामधील तत्त्वनिष्ठ विचारवंत, अमेरिकेंतील अर्वाचीन आर्थिक संघटनेचे निःसीम उपासक इत्यादिकांचा अनुक्रमें ब्रिटिश, जर्मन, ऑस्ट्रियन व अमेरिकन अर्थशास्त्रीय पंथ या नांवानें उल्लेख केला जातो. ह्यांशिवाय पुराणमताभिमानी, समाजसत्तावादी, ऐतिहासिक इत्यादि पंथही युरोपांत आजवर होऊन गेले व आजही कांहीं अस्तित्वांत आहेत. ह्यांपैकीं कित्येक पंथांचा तर सर्वमान्य समजल्या जाणाऱ्या अर्थशास्त्राशीं केवळ किरकोळ बाबतींत अगर व्यावहारिक धोरणांतच नव्हे तर अर्थशास्त्राचें उद्दिष्ट, अर्थशास्त्राची विचारपद्धति, अर्थशास्त्राची क्षेत्रमर्यादा, मूल्य, विभागणी, उत्पादन वगैरे महत्त्वाचे सिद्धान्त इत्यादि

१ कृषि-पाशुपाल्ये वाणिज्या च वार्ता । धान्यपशुहिरण्यकुप्यविष्टिप्रदानादौपकारिकी । तया स्वपक्षं परपक्षं च वशीकरोति कोशदण्डाभ्याम् ।

प्रमुख मुद्यांबद्दलही तीव्र मतभेद असतो. महायुद्धामुळें केवळ युरोपमध्येंच नव्हे तर सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत जी औद्योगिक व सामाजिक क्रान्ति घडून आली आहे तिच्यामुळें सर्व रूढ आर्थिक कल्पनांना भयंकर धक्का बसला असून त्यांची विस्कळित झालेली घडी अजूनही नीटपणें बसली नाही. अर्थशास्त्राच्या एखाद्या विरोधकानें 'सर्वमान्य' असें अर्थशास्त्र अस्तित्वांतच नाही, केवळ निरनिराळे आर्थिक पंथ प्रचलित आहेत असें म्हटलें तर गेल्या पाऊणशें वर्षांच्या अर्थशास्त्राच्या इतिहासांत त्यास स्वमत समर्थनार्थ भरपूर पुरावा मिळेल. अलीकडील अगदी पहिल्या प्रतीच्या तात्त्विक ग्रंथांतही निव्वळ तत्त्वशोधनाच्या भागाबरोबरच विशिष्ट परिस्थितीस योग्य असें विशिष्ट धोरण प्रतिपादणारा व्यावहारिक दृष्ट्या अधिक महत्त्वाचा भाग गोंवलेला असतो. अर्थातच ग्रंथकर्त्यांच्या स्वतःच्या राष्ट्रांतील परिस्थितीच्या मानानें हें धोरण निरनिराळ्या ग्रंथांतून भिन्न असलेलें दिसतें. ह्या शिष्टसंमत प्रचाराचा अंगीकार करणें म्हणजे अर्थशास्त्रास कोणत्याही तऱ्हेचा कमीपणा आणणें होय, असें आम्हांस वाटत नाही. हिंदी परिस्थिति आणि हिंदुस्थानाच्या सांप्रतच्या गरजा ह्या ध्यानांत घेऊन हिंदी अर्थशास्त्रज्ञांनीं आपली विचारमालिका बनविली व अनेक आर्थिक बाबतींत विवक्षित व्यावहारिक धोरण आंखलें व त्यास हिंदी अगर भारतीय अर्थशास्त्र ह्या रूढ व बहुशी यथार्थ नांवानें संबोधलें तर त्यास पाश्चात्य ग्रंथकारांनीं अगर हिंदुस्थानांतील त्यांच्या अंधभक्तांनीं नाकें मुरडण्याचें कांहीं कारण नाहीं असें आमचें मत आहे.

हिंदुस्थान ब्रिटिश अमलाखालीं जाऊन फार वर्षें झालीं नाहींत तोंच त्याकाळीं इंग्लंडमध्यें प्रस्थापित झालेल्या उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या धोरणाचीं कडू फळें हिंदवासीयांस दिसूं लागलीं. अंतर्गत सामाजिक व औद्योगिक क्रान्तीस इष्ट वळण लावण्याचा विधायक मार्ग तर दूरच राहिला, परंतु परदेशी व्यापाऱ्यांशीं, विशेषतः इंग्लिश कारखानदारांशीं, चढाओढ करण्यास हिंदी कारागीर त्याकाळीं असमर्थ आहेत हें स्पष्टपणें दिसत असूनही खुल्या व्यापाराचें तत्त्व हिंदुस्थानावर लादण्यांत आलें. अशा अदूरदृष्टि व चुकलेल्या धोरणाचे वाईट परिणाम दुष्काळ, रोगराई, हलाखी, दारिद्र्य इत्यादि स्वरूपांनीं लवकरच हिंदी लोक व सरकार ह्यांच्या नजरेस येऊं लागले. अशा परिस्थितींत, ज्या मूठभर हिंदवासीयांस पाश्चात्य शिक्षणाचा लाभ मिळालेला होता व ज्यांच्या सूक्ष्म दृष्टीस इंग्रजी आर्थिक विचाराचे हिंदुस्थानाच्या हितावर होणारे अनिष्ट परिणाम दिसत होते त्यांनी सरकारच्या आर्थिक धोरणावर टीका करण्याचें जोखमीचें काम स्वतःच्या शिरावर घेतलें. सरकारी धोरण राष्ट्रहितास विघातक आहे हें दाखवितानाच हळुहळु विधायक स्वरूपाच्या सूचना व युक्तिवाद ते करूं लागले. दिवसानुदिवस ही चर्चात्मक व विधायक प्रवृत्ति वाढत जाऊन आजमितीस तात्त्विक व व्यावहारिक

महत्त्वाच्या अनेक आर्थिक प्रश्नांसबंधी विशिष्ट मतें प्रतिपादणारा हिंदी अर्थशास्त्रज्ञांचा स्वतंत्र पंथ निर्माण झालेला आहे. त्यांच्यामध्येंही कमीजास्त महत्त्वाच्या कित्येक बाबतीत तीव्र मतभेद आहेत हें सांगण्याचें विशेष कारण आहे असें नाहीं. पाश्चात्य देशांतील अनेक पंथांतन असेच तीव्र भेद नेहमी असतात व स्वतंत्र विचाराच्या प्रगतिचें ते एक चिन्ह होय असेंच मानण्यात येतें. हिंदी अर्थशास्त्रज्ञांतील हे अपरिहार्य व काहीं अंशीं आवश्यक आणि हितावह मतभेद बाजूस ठेवले तर हिंदुस्थानाच्या आर्थिक इतिहासाचें आकलन, सध्यांची सांपत्तिक परिस्थिति व भविष्यकालीन प्रगतीची योग्य दिशा ह्यांसंबंधानें त्याजमध्यें मतैक्य आहे असेंच आपणास दिसून येईल. आजवर अर्थशास्त्राच्या निरनिराळ्या सिद्धांताची जी सार्वत्रिक वाढ झाली आहे त्यावरून हिंदी अर्थशास्त्रज्ञांच्या स्वतंत्र प्रयत्नानें शेवटीं अर्थशास्त्रासही सर्वसाधारण व सर्वमान्य स्वरूप प्राप्त होण्यास मदत होईल अशी आशा बाळगिल्यास ती अस्थानीं होय असें म्हणता येणार नाहीं एवढेंच नव्हे, तर अर्थशास्त्राचा तत्त्वें आरतीत जास्त विस्तृत अनुभवाच्या पायावर उभारावीं असें वाटणाऱ्या कित्येक पाश्चात्य ग्रंथकाराची इच्छा व आग्रह असा असतो कीं हिंदुस्थानासारख्या प्रचंड व भिन्न परिस्थितीच्या राष्ट्रांतील अनुभवास जुळणारीं विशिष्ट तत्त्वें प्रतिपादन आल्यास अर्थशास्त्राचा सार्वत्रिकपणा व बिनचूकपणा अधिक वाढेल.

**२ रानड्यांचें संस्थापक कार्य**--हिंदुस्थानांत इंग्लंडची राजसत्ता प्रस्थापित झाल्यापासून येथें जें नवीन पद्धतीचें सरकार स्थापन झालें त्याचा मुख्य उद्देश असा होता कीं सर्व देशभर आपला दरारा बसवून प्रजेचें वित्त व जीवित ह्यांचें संरक्षण करावें आणि अशा शांततामय वातावरणांत ब्रिटिश व्यापाऱ्यांस येथील कच्च्या मालाचा पुरवठा व तयार मालास असलेल्या येथील लोकांच्या मागण्या ह्यांचा पूर्ण फायदा करून घेण्यास जरूर तेवढ्या सवलती द्याव्या. ज्या प्रसिद्ध ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारानंतर पुढें सर्व हिंदुस्थानाचें सार्वभौमत्व इंग्लंड देशास लाभलें ती एक सामान्य व्यापारी मंडळी होती हें सर्वश्रुत आहे. हळुहळु त्या कंपनीचे व्यापारविषयक मक्तेदारीचे हक्क कमी केले जाऊन इ. स. १८५८ सालीं जेव्हां हिंदुस्थानांतील राज्यकारभाराचीं सूत्रें ब्रिटिश सरकारानें आपल्या ताब्यांत घेतलीं तेव्हां कंपनीचा व्यापारविषयक व्यवहार संपुष्टातच आलेला होता. तरीही सन १६०० मध्यें ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाल्यापासून आजतागायत, व विशेषतः कंपनीसरकारच्या धोरणामुळें येथील उत्पादक धंदे बुडाल्यापासून, शेंकडा नव्याण्णव इंग्लिश लोक हिंदुस्थान देश म्हणजे ब्रिटिश कारखान्यास कच्चा माल पुरवणारा मळा, इंग्लंडमध्यें तयार केलेला माल किफायतशीर भावानें विकण्यास सोयीस्कर बाजार आणि शेंकडों इंग्रजांस लठ्ठ पगार व विपुल नफा मिळण्याचें एक ठिकाण होय असें मानीत आले आहेत, ही गोष्ट निर्विवाद आहे किंबहुना, अमेरिकेंतील वसाहती,

साऊथ आफ्रिका, कॅनडा व ऑस्ट्रेलिया ह्यांबरोबरच हिंदुस्थानाचाही एके काळी 'मळा' अगर प्लँटेशन ह्या नांवानें उल्लेख केला गेला असल्यास आश्चर्य नाहीं. ह्यांपैकी अमेरिका तर स्वतंत्र राष्ट्र बनलें आणि इतर वसाहतींस देखील स्वतंत्रप्राय राष्ट्रांचा म्हणजे 'डोमिनिअन्स' चा दर्जा प्राप्त झाला. हिंदुस्थान देश मात्र अजून परकीय सत्तेखाली तसाच राहिला आहे. वसाहतीस आपले अंकित ठेवून त्याच्यापासून शक्य तेवढा फायदा उकळावा हे धोरण सर्वच युरोपियन राष्ट्रांनी गेल्या तीन शतकांत अंगीकारिलें आहे. हिंदुस्थान सरकारचें व्यापारविषयक धोरण, दळणवळणाची साधनें वाढविण्याचा विशिष्ट दिशेनें होत असलेला उपक्रम व निरनिराळे कर लादताना दिसून येणारी सरकारी मनोरचना ह्यावरून राजकीय सत्तेच्या जोरावर स्वराष्ट्राचें म्हणजे इंग्लंडचें आर्थिक हित साधावें हेंच ध्येय उघड होतें. परकी राजसत्तेमुळें लष्कर, सरकारची जबाबदारीची मानमरातबाची नोकरी वगैरे राजकीय व्यवसायांस तर हिंदी लोक तात्काळच पारखे झाले, परंतु इंग्लिश व्यापारास उत्तेजन देण्याच्या सरकारी धोरणामुळे व्यापार, उद्योगधंदे, कलाहुन्नर इत्यादि धनोत्पादक व राष्ट्राच्या आर्थिक सुस्थितीस सर्वथैव आवश्यक असलेल्या शांततामय मार्गांतूनही त्याचें हळुहळू उच्चाटण होऊं लागलें. शेती हा एकच धंदा सर्वांस खुला असा राहिला. इतर धंद्यांतून व नोकरीपेशांतून निघालेले बहुतेक लोक प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें शेतीवरच अवलंबून राहूं लागले. काही अंशी उतरत्या पैदाशीमुळें जमिनीचें उत्पन्न आपोआप कमी झालें म्हणून, काही अंशी जमिनीच्या मशागतीस पुरेसें भांडवल लोकांजवळ राहिलें नाही म्हणून व बहुशी सरकारला आपला लष्करी व आगगाड्यांच्या धंद्यांत होणाऱ्या तोट्यासारखा इतर खर्च भागविण्यासाठीं जमीनीवर जबर सारा लादावा लागला म्हणून हा प्रमुख धंदाही लवकरच डबघाईस आला. एकंदरीत अर्थोत्पादनाचे सर्वच मार्ग हिंदी लोकांस बंद होऊन सार्वत्रिक दृष्ट्या त्यांची कुचंबणा होऊं लागली. वरवर निव्वळ आर्थिक भासणाऱ्या ह्या आपत्तीचा हिंदवासीयांच्या मनोरचनेवर, त्यांच्या आत्मप्रत्ययावर, त्यांच्या संस्कृतीवरही अनिष्ट परिणाम होऊं लागला. पाश्चात्य विद्येनें सुसंस्कृत झालेले थोडेसे प्रमुख हिंदी लोक व क्वचित्प्रसंगी काही इंग्रज अधिकारी व ब्रिटिश मुत्सद्दी ह्यांस हिंदुस्थानाचें जीवनचित्र अत्यंत भेसूर व निराशाजनक वाटूं लागलें. इंग्लंडसारखें औद्योगिक व राजकीय प्रगतीच्या शिखरास पोहोंचलेलें राष्ट्र सोडून जर्मनीसारखीं युरोपांतील व युनायटेड स्टेट्ससारखीं अमेरिकेंतील राष्ट्रें पाहिलीं तर त्यांची नैसर्गिक परिस्थिति व ब्रिटिश राष्ट्राशीं होणाऱ्या औद्योगिक चढाओढीचे त्याजवर होणारे अनिष्ट परिणाम ह्या बाबतीत त्यांच्याशी आपलें बरेंच साम्य आहे असें दादाभाई नौरोजी, वाच्छा, दत्त, जोशी इत्यादि आपल्या इकडील प्रमुख विद्वानांस दिसून येऊं लागलें. साम्राज्याच्या लढाया मारण्याकरितां सदा सर्वकाळ जय्यत सैन्य ठेवून त्यावर प्रमाणा-

बाहेर खर्च करण्याचें, परदेशी व्यापारावर जकात न बसविण्याचें, शेतीवर जबर कर लादण्याचें, व चलनाची योग्य सुधारणा न करण्याचें सरकारचें धोरण चालू राहील तर आर्थिक व नैतिक दृष्ट्या राष्ट्राचा उत्तरोत्तर ऱ्हास झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी त्यांची पूर्ण खात्री पटली.

स्वदेशी धंद्यांची अवनति, लोकांचें वाढतें दारिद्र्य, देशांत कायमचें ठाणें देऊन बसलेला दुष्काळ, शेतकरी वर्गाचा मनस्वी कर्जबाजारीपणा, त्यांजवर पडणारा सरकारी कराचा भार व एकंदर समाजाची हळूहळू शेतजमिनीकडे ओढले जाण्याची व खेडवळपणांत कुचंबण्याची प्रवृत्ति ही सर्व संकटें परस्परांशी संलग्न असून ब्रिटिशांच्या राज्यसंस्थापनेमुळें हिंदुस्थानांत जें सर्वांगीण परिवर्तन झालें त्या एका गोष्टीपासूनच त्यांचा उगम झाला आहे ही गोष्ट पहिल्या प्रथम न्यायमूर्ति रानडे ह्यांच्याच निदर्शनास आली. वास्तविकपणें देशांतील प्रमुख धंदा शेतकी हा असणें, एकंदरीनें अर्वाचीन औद्योगिक प्रगतीच्या मानानें लोक मागसलेले असणें व इंग्लंडच्या चढाओढीस टक्कर देण्याइतकी देशी कारागिरांत कुवत नसणें ह्या बाबतीत हिंदुस्थानाचें जर्मनी व अमेरिका ह्या देशांच्या परिस्थितीशीं पूर्ण साम्य होतें. परंतु त्या त्या राष्ट्रांतील विचारी पुरुष व राष्ट्रीय सरकार ह्यांनी उदारमतवादी इंग्लिश अर्थशास्त्रज्ञाच्या सिद्धांताचा पोकळपणा वेळीच ओळखिला आणि परदेशी व्यापारावर जरूर तेवढें नियंत्रण घालून व अनेक मार्गांनी देशी धंद्यांस उत्तेजन देऊन आपलें आर्थिक व राजकीय स्वातंत्र्य राखलें. हिंदुस्थान मात्र परकी अंमलाखाली असल्यानें जे सिद्धांत व जें धोरण इंग्लंडला हितावह व इष्ट वाटत होतें तेंच हिंदुस्थान सरकारावर लादलें जात असे. हिंदुस्थानांतील विचारी लोक, सरकारचे अधिकारी व इंग्रज अर्थशास्त्रज्ञ आणि मुत्सद्दी ह्यांस वरील धोरणांतील चूक कळून यावी ह्या उच्च हेतूनें प्रेरित होऊन इ. स. १८९२ सालीं न्या. रानडे ह्यांनी 'हिंदी अर्थशास्त्र' ह्या नांवाचा आपला प्रख्यात निबंध लिहिला. अर्थशास्त्राचे सिद्धांत देशकालपरिस्थितीशी सापेक्ष असतात व सामुदायिक हितवर्धनार्थ स्वैर व्यक्तिस्वातंत्र्यास आळा घालणें समर्थनीय व इष्ट असतें ह्या दोन मुद्यांवर भर देऊनच प्रस्तुत लेख रानड्यांनी लिहिला आहे. उदारमतवादी आर्थिक मतें सोडून देऊन हिंदुस्थान सरकारनें राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीची विधायक जबाबदारी आपल्या अंगावर घेतली पाहिजे, हें येथील अधिकारी व इंग्लंडातील मुत्सद्दी ह्यांच्या मनावर बिंबवावें हा रानड्यांचा प्रमुख उद्देश होता.

रानड्यांच्या मतांचाच अनुवाद अगर परिपोष करणारे इतर विद्वान् लोकही हळूहळू पुढें येऊं लागले; त्यांपैकीं कित्येकांच्या नांवांचा वर उल्लेख केला आहे. जर्मनीमध्ये इ. स. १८४० च्या सुमारास लिस्ट ह्या प्रसिद्ध ग्रंथकारानें असें प्रतिपा-

दून केलें होतें[1] कीं आर्थिक प्रगति होण्यास राष्ट्रहिताकडे मुख्यतः लक्ष द्यावयास पाहिजे. राजकीय व सामाजिक बाबतीत ज्याप्रमाणें प्रत्येक राष्ट्र प्रथमतः स्वायत्त होण्याचा प्रयत्न करतें व आंतरराष्ट्रीय सलोखा व दळणवळण वाढविण्याचें धोरण आपल्या तात्कालिक हिताच्या आड येऊं देत नाहीं, त्याप्रमाणें खुला व्यापार अगर व्यक्तिस्वातंत्र्य ह्या तात्त्विक विचारांची कांस धरून राष्ट्राच्या आर्थिक व राजकीय स्वातंत्र्यास मुकण्याचा कोणी वेडेपणा करूं नये असें तो प्रतिपादीत असे. केवळ सामाजिक स्वरूपाच्या कोणत्याही शास्त्रांत मनुष्यांचा अगर त्यांच्या कृतीचा व्यक्तिशः विचार करण्याचें मुळींच कारण नसतें. विवक्षित समाजाचे घटक ह्या नात्यानेंच व्यक्तीस महत्त्व येत असतें. अर्थशास्त्रांत आर्थिक प्रगति व आर्थिक हित ह्यांचें विवेचन करावयाचें झाल्यास तेंही विवक्षित समाजाची विशिष्ट परिस्थिति पुढें ठेवून केलें पाहिजे. व्यक्तीस समाजाशिवाय अस्तित्व नाहीं व एकंदर राष्ट्राची व समाजाची प्रगति घडवून आणणें हेंच सर्व सामाजिक शास्त्रांचें उद्दिष्ट असलें पाहिजे. तसें करतांना व्यक्तींच्या हिताचें व स्वतंत्रतेचें नियंत्रण करणें कित्येक बाबतीत अपरिहार्य असतें. केवळ प्रत्येक व्यक्तीनें आपापल्या परीनें स्वतःचें सुख वाढविण्याचा प्रयत्न केला असतां तेवढ्यानें कार्यभाग होत नसून सर्व राष्ट्राचें आर्थिक हितहि त्यानें साधेल असें नाहीं व राष्ट्राच्या खऱ्या आर्थिक प्रगतीतच वैयक्तिक हिताचा अंतर्भाव होतो, हें लिस्टनेंच पहिल्या प्रथम विशद करून दाखविलें. तसेंच राष्ट्राची आर्थिक प्रगति घडवून आणावयाची असेल तर व्यक्तिशः नागरिकांच्या व्यवसायाचें व विवक्षित राष्ट्राच्या परराष्ट्रांशीं येणाऱ्या संबंधाचें योग्य नियमन करणें आवश्यक आहे, ही गोष्ट लिस्टचा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून सर्वत्र मान्यता पावली आहे. रानडे व त्यांचे समकालीन विद्वान् व त्यानंतर आजवर जे जे हिंदी अर्थशास्त्रज्ञ झाले त्यांतील बहुतेकजण ह्याच मताचा पुरस्कार करणारे आहेत. राजकीय बाबतींत हिंदी लोकांत राष्ट्रीयत्वाची भावना जागृत होऊं लागल्यापासून तर वरील मतास विशेष पाठिंबा मिळूं लागला. धर्म, जात, भाषा, स्थानिक हित, चालीरीती इत्यादि अनेक महत्त्वाच्या बाबतींत भिन्न असलेले हिंदी लोक परराष्ट्रीय व्यापार, प्रचंड प्रमाणावर चालणारे नवीन उद्योगधंदे, सरकारचें वाढतें कर्ज, चलनपद्धति व हुंडणावळ, आगगाड्यांचा प्रसार, सरकारचें लष्करी धोरण, मजूरवर्गाच्या उन्नतीचा प्रश्न इत्यादि औद्योगिक, व्यापारविषयक व आर्थिक बाबतींत एकच आहेत ही भावना दररोजच्या अनुभवानें उत्तरोत्तर बळावत आहे. आर्थिक व राजकीय प्रगतीसंबंधीं आज सर्व देशभर राष्ट्रहिताच्या एकनिष्ठ धोरणानें विचार व चळवळ चालू आहे, हें कोणासही सहज दिसून येईल. आर्थिक विचारांसंबंधीं बोलतांना तरी एकराष्ट्रीयत्वाच्या ह्या भावनेचा उगम रानड्यांच्या नवमतसंस्थापनारूप कार्यावरून झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

१ मागें पान १२ पहा.

**३ राष्ट्रप्रेम व विश्वबंधुत्व**—सोळाव्या[१] व सतराव्या शतकांत युरोपखंडांत एकराष्ट्रीयत्वाची व राजकीय स्वातंत्र्याची जी लाट उसळली होती तिला अनुसरून सर्व महत्त्वाच्या युरोपियन राष्ट्रांतील सत्ताधिकाऱ्यांनी उद्योगधंदे व व्यापार ह्यांचें नियंत्रण करून राष्ट्राचें सामर्थ्य वाढविण्याचें व्यावहारिक धोरण अंमलांत आणलें. उपोद्धातांत 'व्यापारी अर्थशास्त्रज्ञ' ह्या नांवानें ज्यांचा उल्लेख केला आहे त्या ग्रंथकारांच्या व मुत्सद्यांच्या मताचाच ह्या काळांत युरोपीयन राष्ट्रांतील सरकारांवर पगडा बसलेला होता. परंतु त्यांची विचारसरणी कोणत्याहि सुसंगत तात्त्विक पद्धतीवर उभारलेली नसून त्यांचें तात्कालिक उद्दिष्ट मिळविण्याचें साधन ह्या दृष्टीनेंही ती भ्रामक व अदूरदृष्टि होती. अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत व एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षांत व्यक्तिस्वातंत्र्यवादी ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांनी आपल्या पद्धतीची शास्त्रीय पायावर रचना करून बहुतेक सर्व राष्ट्रांतील सरकारांकडून आपल्या धोरणास संमती मिळविली. परंतु लवकरच आपापल्या देशाच्या तात्कालिक व व्यावहारिक अडचणींशीं झगडतांना यूरोपांतील इतर राष्ट्रें व अमेरिका येथील लोक व सरकार ह्यांचा इंग्रजी अर्थशास्त्रज्ञांच्या विश्वबंधुत्वाबद्दलच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनांवरील विश्वास उडूं लागला. राष्ट्रप्रेमानें प्रेरित होऊन आपापल्या देशाचा व्यापार व उद्योगधंदे ह्यांचें संरक्षण करण्याचें व सरकारी मदतीनें राष्ट्राची आर्थिक स्थिति सुधारण्याचें धोरण त्यांनीं स्वीकारलें. लिस्टसारख्या विद्वान् ग्रंथकारांनीं ह्या व्यावहारिक धोरणास तात्त्विक विवेचनाचेंही पाठबळ दिलें. साधारणपणें विसाव्या शतकाच्या सुरवातीस इंग्लंडखेरीज सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत संरक्षणात्मक व राष्ट्रीय बाण्याच्या आर्थिक विचारपद्धति अंमलांत आल्या होत्या. परंतु संरक्षक पद्धतीमुळें प्रत्येक राष्ट्राची सांपत्तिक परिस्थिति जसजशी सुधारूं लागली तसतसें परराष्ट्रीय व्यापार, अंतर्राष्ट्रीय पेढ्यांचे व्यवहार इत्यादि मार्गांनी राष्ट्राराष्ट्रांतील दळणवळण वाढून त्यांचे आर्थिक हितसंबंधही परस्परांशी एकजीव होऊं लागले. महायुद्धापूर्वी कांहीं वर्षें बहुतेकांस असें वाटे की ज्या राष्ट्रांचें व्यापार, उद्योगधंदे इत्यादि महत्त्वाच्या बाबतीत एवढें एकीकरण झालें आहे त्यांच्यांतील आंतर्राष्ट्रीयत्वाच्या भावनेच्या वाढीमुळें अगर निव्वळ स्वराष्ट्राचें आर्थिक नुकसान होईल ह्या भीतीमुळें तरी राष्ट्राराष्ट्रांतील यादवी ह्यापुढें बंद पडेल. महायुद्धाच्या प्रचंड वणव्यांत मात्र विश्वबंधुत्व व शांतता ह्यांच्या पुरस्कर्त्यांच्या बहुतेक आशा जळून खाक झाल्या ह्यांत आश्चर्य नाही. परंतु महायुद्धाचे तात्कालिक व दीर्घकालीन परिणाम जसजसे सर्व सुधारलेल्या राष्ट्रांस जाणवूं लागले तसतसे पुनः अंतर्राष्ट्रीय सहकार्य व चिरकालिक शांततास्थापन ह्या ध्येयांच्या अनुरोधानें विचारपरिवर्तन होण्यास सुरुवात झाली. महायुद्धानंतर जो अंतर्राष्ट्रीय तह घडून आला त्याचाच

१ मागें पानें १० ते १२ पहा.

एक महत्त्वाचा भाग म्हणून राष्ट्रसंघ ह्या नांवाची एक संस्था स्थापण्यांत आली जगांतील लहानमोठी बहुतेक सर्व राष्ट्रं ह्या संस्थेचे सभासद झाली आहेत. शांततामय मार्गांनी राष्ट्राराष्ट्रांतील सलोखा व दळणवळण वाढवून सर्वनाशक यादवीस मूठमाती द्यावी हाच वरील संस्थेचा मुख्य उद्देश आहे; व वार्षिक आणि नैमत्तिक अशा अनेक अंतरराष्ट्रीय परिषदांच्या साहाय्यानें आपलें उद्दिष्ट साधण्याचा ती प्रयत्न करीत आहे. अंतर्राष्ट्रीयत्वाचा अशा रीतीनें विजय झाल्याचीं बाह्य चिन्हें दिसत असतां लहान मोठ्या सर्व राष्ट्रांत स्वायत्ततेची व स्वतंत्र प्रगतीची जाणीव मात्र वाढत्या प्रमाणावर दिसून येत आहे. किंबहुना महायुद्धानंतरचा तहनामा व राष्ट्रसंघाची घटना ह्यांमध्यें लहान सहान राष्ट्रांस स्वतंत्रता व स्वयनिर्णय हे हक्क बहाल केले गेल्यानें राष्ट्रीयत्वाची भावना विशेष फैलावली आहे. तसेच इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, इटली व जपान इत्यादि प्रमुख राष्ट्रं पुन्हां आपापली सामाजिक व राजकीय घडी नीट बसवून आर्थिक प्रगति व व्यापारी साम्राज्य ह्यांच्या मागें लागूं पहात आहेत. इटलीसारखें स्वतंत्र पाश्चात्य राष्ट्र व चीनसारखें कमकुवत पौर्वात्य राष्ट्र ह्या दोहोंतील सद्यःकालीन चळवळीकडे पाहिले तर अंतर्राष्ट्रीयत्वाच्या देखाव्याच्या मागें प्रत्येक राष्ट्र आपापल्या हितास जिवापाड जपत असलेलेंच आपणांस दिसून येईल. हिंदुस्थानाचा राजकीय व आर्थिक दृष्ट्या अजून पूर्णपणें एकजीव झालेला नाहीं; व्यापार व उद्योगधंदे ह्यांची योग्य प्रगति होण्यास नुक्तीच कोठें सुरुवात होत आहे आणि ज्या ब्रिटिश साम्राज्याचा घटक म्हणून राष्ट्रसंघांत हिंदुस्थान वसाहती व इतर राष्ट्रें ह्यांच्या बरोबरीनें भाग घेत असते तेथेंही पूर्ण राजकीय अगर आर्थिक स्वायत्तता त्यास मिळालेली नाहीं; अशा चमत्कारिक परिस्थितीत राष्ट्रीयत्वाविरुद्ध अंतर्राष्ट्रीयत्व ह्याचा बाहेरच्या जगांत चाललेला हा झगडा आपल्या खऱ्या हितसंबंधास कितपत लाभतो हे फार काळजीपूर्वक पाहणें जरूर आहे.

वॉशिंग्टन येथे भरलेली अंतर्राष्ट्रीय मजूर परिषद व जिनोआ येथें भरलेली चलनविषयक सभा ह्या दोहोंचेंच उदाहरण घेतल्यास अंतर्राष्ट्रीयत्वाच्या भावनेच्या नव्या वाढीचा आपल्या खऱ्या हितसंबंधांवर कसा परिणाम होणार आहे हे स्पष्ट दिसेल. हिंदी मजूर वर्गाच्या स्थितीत सुधारणा घडवून आणणारे गेल्या पांच सहा वर्षांत जे अनेक कायदे पास करण्यांत आले ते मुख्यतः वॉशिंग्टन परिषदेच्या ठरावामुळेंच होत. परंतु हिंदुस्थान सरकारच्या चलनविषयक धोरणांत त्याचबरोबरच राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अनिष्ट असे जे कित्येक फेरबदल झाले तेही जिनोआ येथील परिषदेंतच उगम पावले असें म्हटलें पाहिजे. वास्तविकपणें इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतही एका बाजूस तोंडानें अंतर्राष्ट्रीयत्वाचा जप करीत उलट बाजूस तेथील सरकार हातानें स्वराष्ट्राचें अनेक सुष्ट दुष्ट मार्गांनी हित करण्यांत

गुतलें आहे, तर तेथील प्रमुख व्यापारी, पेढीवाले व उद्योगधंद्यांचे चालक आपपल्या सरकारच्या धोरणांचा पूर्ण फायदा घेऊन राष्ट्राराष्ट्रांमधील जकाती व इतर व्यापारी प्रतिबंध दूर करणें आवश्यक आहे अशा अर्थाची वायफळ व्याख्यानें मात्र झोडीत आहेत. तात्पर्य, महायुद्धामुळें अंतर्राष्ट्रीयत्वाच्या भावनेला जी नवीन चालना मिळाली तिची आपापल्या राष्ट्राच्या अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय प्रगतीच्या दृष्टीनें फलश्रुति काय आहे त्याबद्दल कोणाचाच ठाम निश्चय झालेला नाही. तरी बऱ्या वाईट मार्गांनी आपलें औद्योगिक व व्यापारी बळ वाढवून आपलें आर्थिक साम्राज्य लहान व मागसलेल्या राष्ट्रांत स्थापण्याचें बलाढ्य पाश्चात्य राष्ट्राचें धोरण सुटलेलें नाही हे अर्थपूर्ण चिन्ह आपण दृष्टिआड होऊं देतां कामा नये. जपानसारख्या लहानशा व औद्योगिक बाबतींत मागसलेल्या राष्ट्रानें पाश्चात्य राष्ट्रांच्या अर्थ-लालसेचें संकट वेळेवर ओळखून ज्याप्रमाणें आपलें आर्थिक धोरण आंखलें त्याचप्रमाणें हिंदुस्थानासही आपला प्रगतीचा मार्ग ठरवितांना अत्यंत सावधगिरी बाळगली पाहिजे. असें धोरण स्वीकारण्यांत कोणत्याही प्रकारचा निष्कारण शंकेखोरपणा अगर निराशावाद प्रकट होत नसून पुढारलेल्या राष्ट्रांचा व त्यामध्यें झालेल्या आर्थिक विचारांच्या वाढीचा इतिहासच आर्थिक धोरण परिस्थित्यनुरूप बदललें पाहिजे हे कंठरवानें सांगत आहे. प्रत्यक्ष इंग्लंडमध्यें युद्धोत्तर कालांत संरक्षक व उत्तेजक धोरण अर्धवट गुप्तपणें व अर्धवट उघडपणें आमलांत येत आहे. प्रोफेसर मार्शल ह्यांच्यासारखे उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञही 'चिकित्सक पद्धतीनें जी आर्थिक तत्वें बनविलेलीं असतात त्यांचें सत्य सर्व साधारण असलें तरी प्रत्येक देश व प्रत्येक काळ ह्यांच्या अडचणी निरनिराळ्या असतात व सामाजिक परिस्थितींत भिन्नता असल्यास आर्थिक सिद्धांतही बदलणें आवश्यक आहे हें नीट ध्यानांत ठेवलें पाहिजे' असें मत प्रतिपादन करूं लागले आहेत. केवळ कोत्या, अदूरदृष्टि अगर भावनापूर्ण बुद्धीनें नव्हे तर खऱ्या राष्ट्रहिताचा व अंतर्राष्ट्रीय संघटना भक्कम पायावर उभारण्याचा शास्त्रीय व इतिहाससिद्ध मार्ग म्हणून हिंदी अर्थशास्त्रज्ञांस आपली मुख्य दृष्टि स्वदेशाच्या आर्थिक उन्नतीवर ठेवून सामान्य अर्थशास्त्राची तत्वें विवेचकबुद्धीनें ग्रहण करणें अपरिहार्य आहे. राष्ट्रसंघ व अंतर्राष्ट्रीय परिषदा ह्यांचे हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीवर काय परिणाम होतील हे ठरवितां-नाही हीच विवेचक व राष्ट्रीयत्वाची दृष्टि बाळगली पाहिजे हें उघड आहे.

**४ हिंदुस्थानची आर्थिक प्रगति**—वर निर्दिष्ट केलेल्या विशिष्ट पद्धतीनें हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करीत असतां मुख्यतः पुढील पांच मुद्यांवर भर द्यावा लागतो. (१) नैसर्गिक परिस्थिति; ही बदलणें मनुष्यास अंशतःच शक्य असतें; (२) हिंदी संस्कृति, म्हणजे हिंदी लोकांची परंपरागत चालत आलेली ध्येयें, सामाजिक संस्था, व आचारविचार ह्यांचा समूह;

(३) पाश्चात्य राष्ट्रांतील संस्कृति व त्यामध्यें होणाऱ्या घडामोडी ह्यांचा हिंदुस्थानावर होणारा परिणाम; (४) सरकारचें धोरण; (५) हिंदी लोकांच्या स्वतःच्या भविष्यकालीन प्रगतीविषयींच्या आकांक्षा. अनेक आर्थिक प्रश्नांचा सूक्ष्म विचार करतांना ही पांची कारणें स्वतंत्रपणें अगर समुच्चयरूपानें ध्यानांत बाळगावीं लागतात. शिवाय, हिंदुस्थानाचा प्रचंड आकार, देशाच्या निरनिराळ्या भागांत दिसून येणारी भूगोलिक भिन्नता, बौद्धिक व सामाजिक बाबतींत आढळणारी विविधता इत्यादि कमी अधिक महत्वाच्या अडचणींनी तर सर्व हिंदुस्थानासंबंधीं एखादें सामान्य आर्थिक मत ठोकून देणें कठीण व धोक्याचें होतें. तरीही वरवर ठोकळ भासणाऱ्या ह्या विविधतेच्या व भिन्नतेच्या बुडाशीं सर्व हिंदुस्थानास सामान्य असलेले अनेक बौद्धिक, सामाजिक व आर्थिक विशेष आहेत हे विसरतां कामा नये. विशेषतः बाहेरील जगाशीं देशाचा घडून येणारा वाढता संबंध व ब्रिटिश राज्यपद्धतीनें आमच्या सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनावर होणारे परिणाम हे सर्व देशास सारखेच लागू असून त्यामुळें आपली सामाजिक व आर्थिक प्रगति एका विशिष्ट मार्गानें घडून येत आहे. किंबहुना, सर्व जगभर आधींच अस्तित्वांत आलेल्या व जोरानें वृद्धिंगत होत असलेल्या अर्वाचीन औद्योगिक घटनेच्या ओघांत हिंदुस्थान यदृच्छेनें ओढलें जात आहे असेंही आपणांस दिसून येईल. परराष्ट्रीय व्यापार, मोठ्या प्रमाणावर चाललेले उद्योगधंदे, गिरण्यांतील मजूरांचे संघ, एक सामान्य चलनपद्धति, पेढ्यांच्या व्यवहाराचें एकीकरण, मध्यवर्ती सरकारच्या हातांतील कर आणि राष्ट्रीय खर्च ह्यांच्यासंबंधाचा एकछत्री कारभार, देशाच्या भिन्नभिन्न भागास निगडित करून टाकणाऱ्या आगगाड्या वगैरे कारणांनीं हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची भावना दिवसानुदिवस वृद्धिंगत होणें अपरिहार्य आहे. ह्या अंध प्रगतीचा आपल्या इकडील लोकांच्या धार्मिक कल्पना, जातिभेद, चढाओढीनें आर्थिक संबंध न ठरावतांना ठराविक चालीरीती अबाधित राखण्याची संवय, एकदरीनें लोकांत दिसून येणारा चलनशीलतेचा अभाव आणि आहे त्यांत सुख मानून राहण्याची प्रवृत्ति इत्यादि विशिष्ट गुणावगुणांशीं काय संबंध येऊन पोहोंचतो हें काळजीपूर्वक ठरविलें पाहिजे. संपत्तीचें उत्पादन, लोकसंख्येची वाढ, पदार्थांच्या किंमती, मजूरीचे दर, जमिनीचा खड व घरांची भाडीं, नफा, चलन, पेढ्या, राहणीचें मान वगैरे अनेक महत्वाचे व परस्पराशीं संलग्न असलेले प्रश्न सोडवीत असतां इकडील लोकांचे व संस्थांचे अनेक विशेष ध्यानांत बाळगावे लागतात.

पाश्चात्य राष्ट्रांच्या उदाहरणानें अगर त्यांच्याशीं येणाऱ्या आपल्या नित्य संबंधानें नकळत आपलें आर्थिक जीवनही त्यांच्याच वळणावर जात आहे ही गोष्ट उघड असून तिचा वेळेवरच योग्य विचार होणें आवश्यक आहे. अर्वाचीन आर्थिक प्रगतीचा मार्ग यशस्वी रीतीनें चालून गेलेले पुढारलेले भाईबंद ह्या नात्यानें पाश्चात्य

राष्ट्रांचे कायदे, त्यांच्या संस्था व आचारविचार इत्यादिकांचा आम्ही सर्रहा व डोळे मिटून अंगिकार करावा की काय हाही एक महत्वाचा प्रश्न आहे. जपान ह्या पौर्वात्य राष्ट्रानें ह्याच संपूर्णानुकरणाचा मार्ग स्वीकारला आहे व तसें करण्यापासून एकंदरीनें त्या देशाचा फायदाच झाला असें निदान वरवर पहाणारास तरी दिसून येईल. उलटपक्षी, प्रत्यक्ष पाश्चात्य राष्ट्रांत प्रचलित आर्थिक घटनेबद्दल तीव्र असंतोष पसरला असून यूरोप व अमेरिका ह्या खंडांतील प्रमुख राष्ट्रांतील औद्योगिक पद्धति अत्यंत सदोष अतएव त्याज्य होय हे मत प्रसृत करणारा एक फार मोठा वर्ग तिकडे निर्माण होत आहे. आततायी मार्गांनी समाजघटना सुधारण्याचा प्रयत्न करणारे रशियांतील बोल्शेव्हिक लोक सोडून दिले तरी सामान्यतः प्रचलित आर्थिक घटनेत अनेक महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत हे मत सर्व पाश्चात्य राष्ट्रांत मान्य झालें आहे हे निर्विवाद आहे.

अशा अनिश्चित परिस्थितींत हिंदुस्थानानें कोणता मार्ग चोखाळावा ह्याबद्दल तीन प्रमुख मतें दृष्टीस पडतात. (१) पहिला पंथ पुराणमताभिमानी लोकांचा असून झाली एवढी अर्वाचीन सुधारणा पुरे झाली, उलट आपण आपल्या जुन्या संस्था व आचारविचार ह्यांचेंच पुनरुज्जीवन करावें असें त्यांच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें असते. पाश्चात्य राष्ट्रांतील अनेक भयंकर स्वरूपाचे सामाजिक दोष व प्रचलित आर्थिक घटनेबद्दलची तेथील लोकांची साशंक वृत्ति ह्यांमुळें मनुष्यस्वभावात विशेषतः हिंदी लोकांत अंगभूत असलेल्या पुराणमताभिमानास विशेष बळकटी येते. हा पक्ष साधारणतः वाटतो त्यापेक्षां अधिक बळकट आहे असें म्हटलें पाहिजे. (२) दुसरा पक्ष सुधारणावादी अगर उदारमतवादी लोकांचा होय. पाश्चात्य सुधारणा सर्वस्वी निर्दोष अगर ग्राह्य आहे किंवा आपल्या इकडील आर्थिक व सामाजिक घटना सर्वांशी टाकाऊ आहे असें ह्या पक्षाचे लोक म्हणत नाहीत; आपल्या घटनेतील व संस्कृतींतील उत्तम अंगें कायम राखून जरूर तेथें पाश्चात्य राष्ट्रांतील अनुभवाच्या साहाय्यानें सुधारणा घडवून आणणें राष्ट्रहितास आवश्यक आहे असें ते प्रतिपादतात. विशेषतः प्रगमनशीलता, व्यक्तिस्वातंत्र्य, समता व सहकार ह्यांचा आपल्या इकडील आर्थिक पद्धतीत अंतर्भाव केल्याशिवाय राष्ट्राची उन्नति होणें दुरापास्त आहे असें त्यांचे मत आहे. (३) तिसरा पंथ हिंदुस्थानांतील सामाजिक व आर्थिक पद्धति आमूलाग्र बदलून विश्वकुटुंबात्मक अगर दुसऱ्या एखाद्या प्रकारची समाजसत्ता येथें स्थापावी असें म्हणणाऱ्या क्रान्तिकारकांचा आहे. जपानप्रमाणें हिंदुस्थानानेंही पाश्चात्य भांडवलशाहीचें व समाजरचनेचें पूर्ण अनुकरण करावें असें म्हणणारासही ह्या क्रांतिकारकांच्या ओळींत घसविणें आवश्यक आहे. ब्रिटिशांचें शांततामय राज्य, पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार, दळणवळणाच्या साधनांत प्रत्यही घडून येणाऱ्या सुधारणा ह्यांमुळें इतर राष्ट्रांशी येणारा आमचा निकट संबंध व नुकत्याच घडलेल्या महायुद्धामुळें अंतर्राष्ट्रीय

संस्थांशी हिंदुस्थानास करावा लागणारा व्यवहार ह्या कारणामुळे हिंदुस्थानाचे सामाजिक व आर्थिक भवितव्य काय असावें ह्याबद्दल विशेष वादविवाद होत आहे. निदानपक्षीं, सध्या यदृच्छेनें घडून येत असलेली नव्याजुन्याची सरळमेसळ इष्ट नसून सामाजिक उत्क्रान्तीस कांही तरी विशिष्ट धोरणाचें वळण लावणें आवश्यक आहे हे मत प्रस्थापित झाले आहे, व ह्याच मताच्या अनुरोधानें आर्थिक प्रश्नाचा शास्त्रीय व व्यावहारिक रीत्या अभ्यास होणें आवश्यक आहे.

अर्थशास्त्राचे सामान्य सिद्धांत येथील परिस्थितीस लागू करताना ज्या कित्येक गोष्टींबद्दल सावधगिरी बाळगावी लागते त्यांतच हिंदी लोकांचें आर्थिक उद्दिष्ट व सामाजिक ध्येय ह्यासंबंधीच्या कल्पनांचा प्रामुख्यानें अंतर्भाव केला पाहिजे, हें उघड आहे. परंतु तेवढ्यावरून हिंदी लोक म्हणजे पाश्चात्य राष्ट्रें ज्या पृथ्वीवर राहतात तिचे रहिवाशी नसून शनि किंवा मगळ ह्यासारख्या दुसऱ्या एखाद्या ग्रहावर वास्तव्य करणारे आहेत, अगर त्या दोघांतील मानसिक, शारीरिक अगर भौगोलिक भेद अत्यंत तीव्र आहेत असें मानणें चूक व राष्ट्राच्या खऱ्या प्रगतीस अपायकारक आहे हेही स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. निरनिराळ्या लोकांचें बौद्धिक ध्येय भिन्न आहे किंवा त्यांच्या संस्कृतींत महदंतर आहे अशा केवळ तात्विक स्वरूपाच्या वादविवादावरून व्यवहारिक महत्त्वाची अनुमानें काढणें अत्यंत धोक्याचें आहे. उदाहरणार्थ, पौर्वात्य राष्ट्रांतील लोक कधींही आपले आचार विचार बदलत नाहीत, हिंदी लोक एकंदरीनें परमार्थपरायण असून ऐहिक प्रगतीची त्यास महत्त्वाकांक्षा नाही, असली विधानें व्यावहारिक अनुभवाशीं ताडून पाहिल्यास भ्रामक व पाश्चात्य राष्ट्राच्या दृष्टीनें मानभावीपणाची ठरतात. आगगाड्यांच्या धंद्यावरील सरकारी हुकूमत, आंतरराष्ट्रीय व्यापाराची वाढ, शेतजमिनीवरील सरकारची मालकी, हिंदी लोकांचा स्वार्थपराङ्मुख व परमार्थपरायण स्वभाव, जमीनदारांच्या कुळांचें संरक्षण करणारे कायदे, हिंदी चलनपद्धतीची सुधारणा इत्यादि व्यावहारिक व तात्विक प्रश्नांचा विचार कर्तव्य असता अनेक प्रकारची भरमसाट विधानें जबाबदार म्हणविणाऱ्या लोकांकडून व अधिकाऱ्यांकडून केली जातात. एका बाजूस सामान्य जनसमूहाचें अर्थशास्त्राबद्दलचें अज्ञान व जुन्यास चिकटून रहाण्याची संवय आणि उलट बाजूस सरकार अगर कांही स्वहितदक्ष लोकांचे वर्ग ह्यांचा भ्रामक व अन्यायमूलक मतें प्रस्थापित करण्यास्तव चाललेला आट्टाहास ह्यांतून अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यास आपला मार्ग काढणें आवश्यक आहे. देशांतील लोकसंख्या वाढत्या प्रमाणावर असून सामान्य लोकांचें राहणीचें मान असमाधानकारक आहे ह्या एकाच गोष्टीवरून खऱ्या शास्त्रीय ज्ञानाची व शास्त्रशुद्ध आर्थिक धोरणाची राष्ट्रास किती जरूर आहे हे उघड होईल. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतून परराष्ट्रांस धान्य पाठविलें जातें ह्या एका कारणानें अन्नाची महागाई झाली किंवा गाई म्हशींची

कत्तल वाढत्या प्रमाणांत होऊं लागली म्हणूनच दुधाचा दुष्काळ झाला असें म्हणणारे लोक व हिंदुस्थानांतील शेतजमीन सरकारच्या मालकीची आहे किंवा ज्या पद्धतीत सोन्याचें व्यवहारांतून उच्चाटण केलें आहे तीच चलनपद्धति हिंदुस्थानास हितावह आहे असें म्हणणारें सरकार ह्या दोहोंच्या आवडीनिवडीस न जुमानतां राष्ट्रीय हिताचें ध्येय व शास्त्रीय सत्याचें साधन ह्यांची कांस धरूनच अर्थशास्त्रज्ञानें आर्थिक व सामाजिक परिस्थितीच्या परीक्षणास हात घातला पाहिजे.

**५ व्यावहारिक महत्त्वाचे कांहीं आर्थिक प्रश्न**—भारतीय अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यापुढें जे असंख्य प्रश्न उभे राहतात त्यांतील महत्त्वाच्या कांहीं प्रश्नांचा येथें निर्देश करणें आवश्यक आहे. हिंदी लोकांच्या धार्मिक कल्पना व सामाजिक आचारविचार ह्यामुळें त्यांच्या आर्थिक प्रगतीस अडथळा होत आहे काय? हिंदी लोकांचें जीवितध्येय विशिष्ट स्वरूपाचें आहे असें समजलें जातें; तें ध्येय इतर राष्ट्रांच्या संस्कृतीशीं त्यांच्या येणाऱ्या संबंधामुळें बदलूं शकेल किंवा नाहीं? हिंदी संस्कृति म्हणजे काय, ती बदलत्या परिस्थित्यनुरूप बदलेल किंवा नाहीं? हिंदुस्थानांत पाश्चात्य पद्धतीची औद्योगिक घटना अस्तित्वांत येणें इष्ट आहे किंवा कसें? हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावरचे उद्योगधंदे व कारखाने स्थापन होऊं शकतील किंवा नाहीं? लहानसहान उद्योगधंदे, त्यास योग्य उत्तेजन दिल्यास, फायदेशीर ठरतील किंवा नाहीं? शेतीचें उत्पन्न वाढविण्याकरितां व जमीनदार आणि कुळें ह्यांच्यांतील संबंध सलोख्याचे राखण्याकरितां काय उपाय योजले पाहिजेत? जातिभेद व आर्थिक प्रगति ह्यांचा परस्परांवर काय परिणाम होतो? आपली शिक्षणपद्धति आर्थिक प्रगतीस अनुकूल आहे काय? जमीनधाऱ्याची पद्धत, सरकारी उत्पन्न मिळविण्याचे व खर्च करण्याचे मार्ग, प्रजाजनांवर पडणाऱ्या करांचा बोजा, आणि परराष्ट्रीय व्यापारावर जकाती बसविण्याचें सरकारी धोरण ह्या बाबतींत कोणत्या सुधारणा घडून येणें आवश्यक आहे? विशेषतः ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांशीं हिंदुस्थानाचे व्यापारी संबंध कोणते असावे? हिंदी उद्योगधंद्यास परदेशाहून भांडवल कर्जाऊ आणणें जरूर अगर इष्ट आहे किंवा काय? चलनपद्धति व परराष्ट्रीय हुंडणावळ ह्या बाबतींत हिंदुस्थानाचें धोरण काय असावें? शेती व उद्योगधंदे ह्यांजवर उपजीविका करणारा मजूर वर्ग सुस्थितींत अगर कार्यक्षम आहे काय? त्यांची स्थिति सुधारण्यास मजूरसंघाच्या चळवळीचा उपयोग कितपत होईल? स्थानिक संस्थांचे उत्पन्न व खर्च ह्यांत कोणत्या सुधारणा होणें आवश्यक आहे? लोकांच्या दानबुद्धीचा अधिक चांगल्या तऱ्हेनें उपयोग कसा करून घेतां येईल? समाजांतील खालच्या वर्गाचें उत्पादक सामर्थ्य व आर्थिक परिस्थिति कशी सुधारेल? संरक्षक पद्धतीचा हिंदी गिऱ्हाइकांच्या हितसंबंधावर काय परिणाम होईल? हे व असले अनेक प्रश्न भारतीय अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांस

समजून घेणें आवश्यक आहे. त्यांचा विचार करून आपली मतें बनवितांना केवळ बौद्धिक कसरत अगर शब्दांचें अवडंबर करावयाचें नसून व्यक्ति, समाज व सरकार ह्यांचे योग्य मार्गांनी जास्तींत जास्त हित कसें साधेल हेंच पहावयाचें असतें.

शेवटीं भारतीय अर्थशास्त्राचें कार्यक्षेत्र व उद्दिष्ट थोडक्यांत दिग्दर्शित करावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल की, अर्थशास्त्राच्या सिद्धांतांच्या दृष्टीनें हिंदी लोकांच्या सांपत्तिक व सामाजिक परिस्थितीचें परीक्षण करून सध्यांच्या अंतर्गत व परराष्ट्रीय खळबळीच्या काळांत त्यांच्या राहणीचें मान वाढून त्यांचें जीवन अधिक सुखमय कोणत्या मार्गांनी होईल हें ठरविणें हिंदी अर्थशास्त्राचें मुख्य कार्य होय. जमीनदार, शेतकरी, भांडवलवाले, मजूर, नोकरवर्ग, मध्यम वर्ग वगैरे सर्व दर्जाचे समाजांतील लोक आज आपापल्या परिस्थितीबद्दल असंतुष्ट आहेत. अंतर्राष्ट्रीय परिषदांतून वसाहतीच्या प्रतिनिधींच्या शेजारी खुर्चीस खुर्ची लावून बसणाऱ्या हिंदी गृहस्थांस सुद्धा हिंदुस्थानांतील परिस्थितीच्या बाबतींत परिणामकारक व विधायक कार्य करण्यास हक्क व संधि हीं नाहींत. गोऱ्या वसाहतवाल्यांस हिंदी लोकांचें सहकार्य निव्वळ मजूर ह्या नात्यानें पाहिजे असून हिंदी वसाहतवाल्यांस साधे माणुसकीचे हक्क देण्यासही ते तयार नाहीत. आमच्या इकडील जुन्या इंग्रजी अर्थशास्त्रज्ञांचे कांही अंधभक्त व आर्थिक साम्राज्याचे इंग्रजी पुरस्कर्ते हे हिंदुस्थानांतील कच्च्या मालाचा व वाढत्या बाजाराचा साम्राज्याकरितां, म्हणजे मुख्यतः इंग्लंडकरतां, उपयोग करून घेण्याच्या धोरणाचें समर्थन सारखें करीतच आहेत. प्रगतिची हेटाळणी करणारे कांहीं लोक चार चैनीच्या व भपकेदार वस्तूंच्या पटलानें झांकलेलें हिंदुस्थानाच्या दारिद्र्याचें व अवनतीचें चित्र पाहून ' सर्व अर्वाचीन सुधारणा टाकून द्या ' असें आपल्या देशबांधवांस सांगत आहेत. राजकीय व आर्थिक बाबतींत राष्ट्रीयत्वाची भावना वाढत्या प्रमाणावर प्रकट केली जात असून उलटपक्षीं परराष्ट्रीय व्यापार, अंतर्राष्ट्रीय पेढ्यांचे पतीचे व्यवहार, उद्योगधंद्यांस लागणाऱ्या अनेक महत्त्वाच्या साधनांचा पुरवठा वगैरे बाबतींत अगदी साधारण माणसाचें जीवितही परदेशी घडामोडींवर अवलंबून बसलें आहे. संस्था, मतें, परिषदा, सुधारणा वगैरे अर्वाचीन बाबींच्या गलबल्यांत शेवटी हिंदुस्थान देश उत्तरोत्तर कमी दरिद्री होत आहे का अधिक ? ह्या प्रश्नाचें उत्तर जो तो आपापल्या मनोरचनेस अगर पूर्वग्रहास अनुसरून देत आहे. अशावेळीं शक्य तितक्या निर्विकार व पूर्वग्रहविरहित बुद्धीनें हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीचें शास्त्रीय सिद्धांतांच्या साहाय्यानें परीक्षण करून हिंदी लोकांच्या सर्वांगीण सांपत्तिक सुधारणेकरितां योग्य तो मार्ग निस्पृहतेनें व स्पष्टपणें दिग्दर्शित करणें हेंच भारतीय अर्थशास्त्राचें उद्दिष्ट व कार्यक्षेत्र होय.

---

# प्रकरण दुसरें

## हिंदी संस्कृति

**१ अर्वाचीन सुधारणेचें स्वरूप**- निरनिराळ्या देशांतील लोकांमध्ये धर्म, नीति, राजकारण, उद्योगधंदे, व्यापार व सामाजिक रीतिभाति इत्यादिकांबद्दल ज्या कल्पना सध्यां रूढ आहेत त्यांची उत्क्रान्ति कसकशी होत आली आहे याचें सूक्ष्म अवलोकन केल्यास अर्वाचीन प्रगतीचें खरें स्वरूप दृष्टोत्पत्तीस येण्यास मदत होईल. जगांतील सर्व राष्ट्रांचा मिळून एकत्रित इतिहास लिहावयाचा झाला तर अनेक कल्पना, विचार व संस्था ह्यांच्या उत्क्रान्तीस, तसेंच अनेक लहानमोठीं राष्ट्रें व लोक ह्यांच्या सत्तेचा उगम, वाढ व ऱ्हास ह्यांच्या इतिहासास प्रमुख स्थान देणें आवश्यक ठरेल. प्रत्येक राष्ट्र व तेथील लोक ह्यांच्या जीवनक्रमात व सामाजिक संस्थांत कांहीं विशिष्ट कल्पनांस व विचारास प्रामुख्य दिलेलें दिसून येत असून त्या त्या राष्ट्रांच्या ऱ्हासानंतरही त्यांचे वंशज व एकंदर सुधारलेलें जग ह्यांजकडे त्या कल्पनांचा व विचारांचा वारसा जाऊन त्यास आपापल्या कल्पना व विचार बनविण्यास त्यापासून मदत होते हें उघड आहे. ह्याच न्यायानें पाश्चात्य राष्ट्रांतील अर्वाचीन सुधारणा ही ग्रीस, रोम इत्यादि प्राचीन युरोपीयन राष्ट्रांच्या तसेंच युरोपच्या वायव्य प्रांतांत राहणाऱ्या जुन्या ट्युटॉनिक जातीच्या व ईजिप्त, पॅलेस्टाईन, इत्यादि पौरस्त्य राष्ट्रांच्या विचारसंपत्तीपासून व त्यांच्या अनेक संस्थांचबद्दलच्या अनुभवापासून निर्माण झाली आहे असें म्हटलें पाहिजे. अर्वाचीन सुधारणेची निश्चित व्याख्या करणें दुरापास्त आहे. सांपत्तिक भरभराट व नैतिक अधःपात किंवा बौद्धिक व नैतिक वाढ आणि सांपत्तिक दुर्दशा ह्यांचें एकत्र वास्तव्य अनेक वेळा दिसून येत. विवक्षित राष्ट्रांत विवक्षित वेळीं सांपत्तिक व नैतिक अगर बौद्धिक बाबतींत जी स्थिति दिसून येते ती ऐतिहासिक व भौगोलिक स्वरूपाच्या अनेक कारणांचा परस्परांवर परिणाम होऊन उत्पन्न झालेली असून त्याच नियमानुसार तिची उत्क्रान्ति होत असते हे निर्विवाद आहे.

विचार व संस्था ह्यांचा परस्परांशीं असलेला निकट संबंध व त्यांच्यांतील क्रमाक्रमानें अहितावह विचारांचा व संस्थांचा नाश होऊन विवक्षित राष्ट्रास तसेंच एकंदर मानवसमाजास अधिक हितावह असलेल्या विचारांचा व संस्थांचा प्रसार होण्याची शक्यता ह्यांवर अर्वाचीन प्रगति अवलंबून आहे. परंतु अशी प्रगति होणें संभवनीय आहे किंवा नाहीं, व खऱ्या हितावह प्रगतीचें स्वरूप काय ह्याबद्दल मात्र अनेक भिन्न मतें आग्रहानें प्रतिपादिलीं जातात. कित्येक लोकांस तर व्यक्ति, राष्ट्र अगर मनुष्यसमाज हीं एकसारखीं सुधारत जातील, म्हणजे नैतिक व सांप-

त्तिक प्रगतीच्या मार्गावर त्याचें पाऊल सारखें पुढें पडत जाईल, ही कल्पनाच असंभाव्य वाटते. ' भौतिक शास्त्रांची व अनेक शारीरिक सुखसोयींची एवढी वाढ होऊनही मनुष्याची शारीरिक वाढ झाली आहे काय ? त्यास खरोखर अधिक सुख लाभत आहे काय ? प्रेम, स्वातंत्र्य व समता ह्यांचा मनुष्यसमाजात अधिक प्रसार झालेला आहे काय ? ' हे व अशासारखे दुसरे प्रश्न कित्येक सुधारणाविरोधी पक्षीयांकडून अनेक वेळां विचारले जातात. शास्त्रीय ज्ञान, नैसर्गिक शक्तिवरील मनुष्याची सत्ता, परस्पराशी सहकार्यानें काम करण्याची संवय इत्यादि शारीरिक सुखवर्धनाच्या साधनांची वाढ झालली आहे ही गोष्ट कबूल करणें त्यांस भाग पडतें. परंतु असल्या ' सुधारणेस ' सांपत्तिक, आधिभौतिक, ऐहिक, अतएव त्याज्य समजण्याची त्यांमध्यें प्रवृत्ति दिसून येते. मागें[1] अर्थशास्त्राचा नीतिशास्त्राशी अगर आध्यात्मिक प्रगतीशी विरोध नाही हे दर्शवितांना शेकडा नव्याण्णव लोकांना स्वतःच्या आधिभौतिक गरजा भागविणें हीच प्रमुख, निदान तात्कालिक महत्त्वाची, बाब आहे असें वाटतें, ही गोष्ट नमूद केलेली आहे. आधिभौतिक गरजा नीटपणें भागल्याशिवाय नैतिक प्रगतीसही वाव राहणार नाही व अर्वाचीन पद्धतीनें आपल्या आधिभौतिक गरजा भागवीत असता अनेक नैतिक गुणांचा विकास होण्यास मदत होते हेही ध्यानात ठेवणें आवश्यक आहे. आधिभौतिक व नैतिक प्रगति ह्यांमध्यें दाखविला जाणारा विरोध मुळातच भ्रममूलक असून वास्तविकपणें मानवी प्रगतीची परस्परपरिपोषक अशी ती दोन अंगें आहेत हें मत प्रस्तुत प्रकरणात पुढें अधिक विशद केलेलें आहे. अर्वाचीन सुधारणा अगर प्रगति ह्यांचें सारसर्वस्व म्हणजे सांपत्तिक वाढ असें नसून राष्ट्राच्या प्रगतीचें, तेथील लोकांची सांपत्तिक भरभराट हें एक महत्त्वाचें निदर्शक चिन्ह होय असें म्हटल्यास तें बरोबर ठरेल एवढेंच येथें नमूद करणें जरूर आहे. कोणत्याही राष्ट्रातील सामान्य अगर सुसंस्कृत लोक घेतले तर आपला देश ' गरीब ' होत आहे की ' श्रीमंत ' होत आहे ह्यावरूनच ते आपापल्या राष्ट्राची प्रगति अगर अधोगति होत आहे हे ठरवितात, असा आपला नित्याचा अनुभव आहे, आणि म्हणूनच अर्वाचीन सुधारणा व प्रगति ह्यांचें द्योतक काय ? असें कोणी विचारल्यास त्यास काहीं विशिष्ट चिन्हांकडे चिनदिक्कत बोट दाखवून उत्तर देतां येईल; लोकसंख्येची प्रमाणशीर वाढ, ज्ञान व विशालदृष्टि ह्यांचा प्रसार, शांतता व कायदेशीर नियमन ह्यांची संस्थापना, उच्च प्रतीच्या रसिकतेचा उद्भव, सार्वजनिक आरोग्याची सुधारणा, शास्त्रीय शोधाचा उद्योगधंद्यांच्या उत्कर्षाकडे उपयोग करून घेऊन वाढत्या प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन करण्याचा प्रयत्न, सामान्य जनतेस बौद्धिक व सामाजिक सुखसोयी मिळण्याची शक्यता व सवलत; ह्या प्रमुख चिन्हांचें ज्या राष्ट्रात समाधान-

१ पान ८ पहा.

कारक प्रमाणांत अस्तित्व दिसून येतें तें राष्ट्र आधिभौतिक, नैतिक, सामाजिक वगैरे कोणत्याही दृष्टीनें साधारणतः प्रगमनशीलच असेल.

अर्वाचीन प्रगतीचीं वर नमूद केलेलीं चिन्हें पाहणारास अलीकडील प्रगतीचें बाह्य निदर्शक म्हणजे स्वतःच्या सुखवर्धनार्थ मनुष्यानें निसर्गावर मिळविलेलें प्रभुत्व हें होय ही गोष्ट सहज दिसून येईल. वाढत्या ज्ञानाच्या साहाय्यानें जसजसें अर्थोत्पादनाचें प्रमाण वृद्धिंगत होत जातें तसतशी लोकसंख्येंत भर पडून व लोकांच्या राहणीचें मान सुधारून त्यांच्या मागणींतही बेसुमार वाढ होते. एका बाजूस वाढतें उत्पादन व दुसऱ्या बाजूस त्याहूनही जोरानें वाढणारी उपभोगविषयक मागणी ह्यांच्यातील ओढाताण मात्र प्रगतिपर देशांतही कायम राहते. तसेंच, उत्पादनास शास्त्रीय ज्ञानाचें साहाय्य मिळाल्यापासून भांडवलाचें वर्चस्व, मोठ्या प्रमाणावर धंदा करण्याची आवश्यकता, संपत्तीच्या विनिमयाची व विभागणीची अनेक अर्वाचीन साधनें वापरण्याची संवय इत्यादिकांची वाढ होऊन सामाजिक व आर्थिक घटना गुंतागुंतीची व स्पर्धात्मक झालेली आहे. सुखसोयींची वाढ झालेली असूनही समाजातील फार मोठ्या वर्गास जीवनकलह अत्यंत तीव्र व कष्टमय भासत आहे, ह्या अनुभवावरून अर्वाचीन सुधारणा म्हणजे निव्वळ आभास किंवा मोहजाल आहे असें सकृद्दर्शनी कोणास वाटल्यास आश्चर्य नाहीं. परंतु किंचित् खोल विचार केल्यास आपणास असें दिसून येईल कीं हा निराशावाद वास्तविकपणें योग्य नाहीं. अर्वाचीन आर्थिक सुधारणेचे केवळ दोष एकत्र करून तेवढ्यावरून तिला आभासात्मक व कुचकामाची ठरविल्यास तें न्याय्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. शिवाय, त्याच अनुरोधानें बोलावयाचें म्हणजे अलीकडील कायदेशास्त्र अगर राजकारणशास्त्र हींहि टाकाऊ आहेत असें सिद्ध करतां येईल. प्रजासत्ताक राष्ट्रांत प्रत्येक नागरिकास समान हक्क दिलेले असतात, परंतु आपापले हक्क व हित ह्यांच्या संरक्षणासाठीं प्रत्येकास जागरूक राहावें लागून अनेक प्रसंगीं त्यांच्या संरक्षणार्थ जोराची खटपट करावी लागते. एवढ्यावरून राजकीयदृष्ट्या जगांत प्रगति झालीच नाहीं किंवा प्रजासत्ताक राज्यपद्धतीपेक्षा जुनी राजसत्तात्मक व जुलमी राजपद्धति चांगली असें कोणी समंजस मनुष्य म्हणत नाहीं. तसें म्हटलें तर अर्वाचीन आर्थिक पद्धतीस तिच्यांतील जीवनकलहाच्या तीव्रतेमुळें टाकाऊ समजणाऱ्या लोकांस रानटी स्थिति म्हणजे ज्या वेळेस मनुष्याच्या गरजा व त्यांच्यावर असलेले निर्बंध हे सर्वांत कमी होते तीच स्थिति अत्यंत पसंत पडावयास पाहिजे! सारासार विचार केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं आर्थिक उत्क्रान्तीच्या प्रत्येक अवस्थेंत कांहीं चांगले व कांहीं वाईट विशेष हे असतातच; एकंदरीनें चांगल्यांचें प्रमाण वाढतें असल्यास त्यासच सुधारणा अगर प्रगति असें म्हणावयास हवें. अलीकडील सुधारणा कुचका-

माची आहे असें म्हणणारांस शास्त्रीय ज्ञानाच्या साहाय्यानें उत्पन्न होणाऱ्या अनेक सुखसोयी मात्र हव्या, परंतु स्पर्धा, भांडवलाची जरूरी, विनिमयाची गुंतागुंतीची व नाजुक घटना हीं तेवढीं नकोत! तुमच्या मतें सर्वथैव निर्दोष व इष्ट असलेली परिस्थिति तरी केव्हां अस्तित्वांत होती असें ह्या लोकांस विचारल्यास त्यांपैकीं फारच थोड्यांस निश्चित उत्तर देतां येईल व त्या उत्तरांतही अनेक तऱ्हा होऊन जुना काळ चांगला असें म्हणणारांत देखील एकवाक्यता होत नाही हें स्पष्ट दिसेल. ह्या निराशावादी टीकाकारांच्या मतें सर्वथैव सुखी असलेला जुन्या काळचा शेतकरी अगर कारागीर घेतला तरी त्यांच्या वेळीं त्यांस लागणाऱ्या उत्पादनाच्या अगर उपभोगाच्या वस्तु अनायासें मिळत होत्या असें नाही. अलीकडील आर्थिक घटनेंत स्वार्थ, कलह व गोंधळ ही प्रामुख्यानें दिसून येणारीं व्यंगें असून तीं दूर करण्याची खटपट होणें जरूर आहे असें कोणी म्हटल्यास त्यास अर्थशास्त्राचा पूर्ण दुजोराच मिळेल. परंतु पूर्वीपेक्षा हल्लींची परिस्थिति बरी असून एकंदरीनें अधिक इष्ट व सुखावह आहे हें नाकबूल करणं अशक्य आहे. अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय दळणवळणाच्या साधनांची वाढ, प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा प्रसार, व्यापार व उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर चालविण्याची आवश्यकता इत्यादि अर्वाचीन आर्थिक घटनेचे विशेष समूळ नाहीसे करूं पाहणें फारसें व्यवहार्य नाहीं. जुन्या संस्था व आचारविचार नव्या परिस्थितींत लागू पडण्यासारखे नाहीत, ह्यास्तव प्रत्येक देशानें आर्थिक उत्क्रांतीचा ओघ ध्यानांत घेऊन नव्या अडचणीस नवे उपाय व नवीन विचारांस अनुरूप असे नवे प्रचार अस्तित्वांत आणल्याशिवाय गत्यंतर नाही.

**२ आर्थिक प्रगति व नीतिशास्त्र**—सामान्य सुबुद्ध लोक व कित्येक इतर बाबतींत विश्वसनीय असलेले विद्वान ग्रंथकार ह्यांच्या मनांत आर्थिक प्रगतीसंबंधानें तुच्छतेची नसली तरी साशंकतेची वृत्ति वसत असते व एकंदर समाजाकडून स्वोन्नतीप्रित्यर्थ होणाऱ्या प्रयत्नांवर त्यांच्या मतांचा अनिष्ट परिणाम होत असतो. ह्यास्तव आर्थिक प्रगति व नीतिशास्त्र ह्यासंबंधानें आणखी थोडें विवेचन करणें आवश्यक आहे. स्वतःच्या आधिभौतिक गरजा भागविण्याकरितां मनुष्यें जे प्रयत्न करतात त्यांत नैतिक महत्त्वाचा कांहींच भाग नसतो व एकंदर मनुष्यसमाजाचें उच्चतम हित साधावयाचें असेल तर व्यक्तिशः प्रत्येक मनुष्यानें आपल्या आध्यात्मिक उन्नतीच्या मागें लागलें पाहिजे, हें मत प्रायशः भ्रममूलक व अत्यंत अनर्थावह आहे. आध्यात्मिक हितार्थ झटणाऱ्यास देखील कांहीं प्राथमिक गरजा भागविण्यापुरती तरी खटपट करणें आवश्यक असतें, असें मागें उपोद्घातांत सांगितलेंच आहे.[१] प्रत्यक्ष नीतिशास्त्र पाहिलें तर तेंही प्रत्येक मनुष्याची समाजाबद्दलची व समाजांतील इतर व्यक्तींसंबंधाची कर्तव्यें काय आहेत हें त्यास सांगण्याचा प्रयत्न करतांना दिसतें. ह्या नैतिक संबंधांत स्वतःच्या

१ पान ८ पहा.

आधिभौतिक गरजा भागविण्याचा प्रयत्न करीत असतां प्रत्येक मनुष्याचा समाजांतील इतर व्यक्तीशीं जो संबंध येतो त्याचाही अंतर्भाव अवश्य होतो. ह्यावरून आर्थिक व्यवसाय आणि नीतिमत्ता ह्यांमध्ये विरोध नसून मनुष्यांनी समाजहितास बाधक होणार नाहीं अशा रीतीनें आपली वागणूक कशी ठेवावी हें ठरविणें हें नीतिशास्त्राचें काम आहे ही गोष्ट स्पष्ट होईल. मनुष्य स्वतःच्या अनेक गरजा भागविण्यास्तव खटपट करूं लागला म्हणजे त्याच्या शारीरिक व मानसिक गुणांचा विकास होत जाऊन समाजांतील इतर व्यक्तींशीं त्याचे निरनिराळ्या प्रकारचे संबंध जडून येतात. व्यक्ति व समाज ह्यांच्या आर्थिक व नैतिक प्रगतीचा मनुष्यांच्या नैसर्गिक गुणांचा योग्य विकास हा एकच पाया आहे. स्वार्थ व परोपकार ह्या दोन्ही भावना मनुष्यस्वभावांत उपजत असून त्यांच्या नियमित सहकार्यानें समाजाचें नैतिक हित कसें होईल हें नीतिशास्त्रज्ञांस व आर्थिक प्रगति कशी घडून येईल हे अर्थशास्त्रज्ञास पहावयाचें असतें. कुटुंबांतील धनार्जन करणारा मनुष्य व परस्पर सहकार्यानें समाजाच्या अनेक गरजा भागविणारे असंख्य कारागिर ह्यांच्या उदाहरणावरूनही हेंच सिद्ध होईल, कीं जी गोष्ट खरोखर आर्थिक दृष्ट्या इष्ट आहे ती नैतिक दृष्ट्या समर्थनीय ठरलीच पाहिजे. एखाद्या विवक्षित बाबतीत अर्थशास्त्र व नीतिशास्त्र त्यांच्या शिकवणुकीत विरोध आहे असें दिसलें तरी तो निव्वळ गैरसमज असून दोन्हींपैकीं कोणत्या तरी एका शास्त्राच्या शिकवणुकींत एकांगीपणा आहे असेंच त्यावरून सिद्ध होईल. अर्वाचीन सुधारणेमुळें मनुष्य अधिक आप्पलपोटा, लबाड व निर्घृण झाला असून एकंदर समाजाची नीतिमत्ता बिघडली आहे हें मत तर अत्यंत भ्रामक आहे. स्वतःचें शारीरिक सुख अनेक अनीतिमान मार्गांनी साधून घेण्याची संधी व तसें करण्याचा मोह उत्पन्न करणारे प्रसंग अलीकडील औद्योगिक पद्धतीमुळें अधिक प्रमाणांत उपस्थित होतात असें घटकाभर धरून चाललें तरी तेवढ्यावरून सर्व अर्वाचीन सुधारणा अनीतिमान आहे असें ठरत नाहीं. व्यक्ति व एकंदर समाज ह्यांच्या मनावर खऱ्या नैतिक तत्त्वाचा पगडा वाढत्या प्रमाणावर बसत असून गरीब लोकांसही शिक्षण व कला ह्यांचा थोडाफार आस्वाद घेऊं देण्याच्या सोयी, स्वावलंबनानें व परस्पर सहकार्यानें आत्मोन्नति करून घेण्याचे अनेक वर्गांतील लोकांचे प्रयत्न, प्राणिसंरक्षक संघ, अनेक प्रकारची गुलामगिरी नाहींशी करण्याची खटपट करणाऱ्या संस्था व पतीचे व्यवहार करणाऱ्या प्रचंड अंतर्राष्ट्रीय पेढ्या इत्यादि सामाजिक व आर्थिक संस्था बहुजनसमाजाच्या वाढत्या नीतिमत्तेची साक्ष देण्यास समर्थ आहेत. नीतिमत्तेंत केवळ खोटें बोलूं नये, चोरी करूं नये इत्यादि नकारांचाच अंतर्भाव न करतां आपले शेजारी, देशबांधव किंबहुना सर्व देशांतील आपले मानवबंधु ह्यांच्या सुखदुःखांत वांटेकरी होऊन प्रत्यक्षपणे त्यांस मदत करण्यास तयार होणें, दररोजच्या लहानमोठ्या व्यवहारांत परस्पर विश्वास व सचोटी बाळ-

गणें, उच्च शिक्षणानें व कलाभिज्ञतेनें आपले विचार व भावना सुसंस्कृत करणें ह्या गोष्टीसही नीतिमत्तेचें प्रमुख अंग मानलें तर पूर्वीपेक्षां अलीकडील काळांत नीतिमत्ता अधिक आहे एवढेंच नव्हे, तर वाढत्या उत्पादनानें व शैक्षणिक सोयींच्या प्रसारामुळें समाजांतील ज्या मोठ्या वर्गास पूर्वी विधायक नीतिमत्तेचा विशेषसा गंध नव्हता त्यामध्येंही आजकाल नीतिमत्ता पसरली आहे असें म्हटलें पाहिजे. निव्वळ शारीरिक गरजांपेक्षां मानसिक व भावनात्मक समाधान हें साधारणतः उच्चतर नीतिमत्तेचें असतें हें खरें; परंतु ह्या वचनाचा फायदा खाणें पिणें, कपडेलत्ते, राहण्याच्या सोयी इत्यादि प्राथमिक गरजा भागविण्याइतकें तरी ज्यांस आर्थिक सामर्थ्य आहे त्यांसच व्हावयाचा. आर्थिक प्रगति व नीतिशास्त्र ह्यांच्या परस्परांवर होणाऱ्या परिणामाचा हिंदुस्थानाच्या दृष्टीनें विचार करतांना विशेष काळजी बाळगिली पाहिजे; तसें न केलें तर अन्नान्नदशा झालेल्या शेतकऱ्यांस, बेकार मजूरांस, ज्यांचे जुने धंदे बुडालेले आहेत अशा कारागिरांस आणि सामाजिक कुचंबणेच्या परमावधीस पोहोंचलेल्या मध्यम व कनिष्ट वर्गास नीतिमत्तेचा बागुलबुवा पुढें करून आर्थिक विमोचनाच्या मार्गावरून परावृत्त करण्याचें अक्षम्य पाप मात्र घडेल.

आर्थिक संपत्ति व नैतिक प्रगति ह्यांच्या परस्पर संबंधाविषयी हिंदुस्थानांत जें मत प्रचलित आहे त्याविषयी अनेक लोकांच्या भिन्न कल्पना आहेत. पौरस्त्य देश म्हणजे आध्यात्मिक जीवनाचें माहेरघर व पाश्चात्य देश म्हणजे केवळ जडवादाचा बाजार असा एक समज सर्व पाश्चात्य राष्ट्रांत व पौर्वात्य राष्ट्रांतील कित्येक लोकांच्या मनांतही दृढमूल झालेला आहे. हिंदुस्थान, चीन इत्यादि पौरस्त्य देशातील लोक अध्यात्म व तत्वज्ञान ह्यांच्या मागें लागणारे आहेत असें म्हणण्यांत पाश्चात्यांचा खरा हेतू तिरस्कारा व अनुकंपा व्यक्त करण्याचा असूनही आमच्या इकडील कित्येक लोकांस पाश्चात्य ग्रंथकारांच्या असल्या विधानांत आपला गौरव केलेला आहे असें वाटतें हें दुर्दैव होय. विशेषतः हिंदी अध्यात्मवाद म्हणजे ऐहिक जीवनासंबंधींच्या आचारविचारांस फांटा देऊन पारमार्थिक हितार्थ झटणें किंवा हताश दैववाद स्वीकारून गूढ संशोधन करीत बसणें ह्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं, व आधिभौतिक प्रगतीचें क्षेत्र जे पाश्चात्य देश तेथील लोकांत मनाचा कणखरपणा व आशावादित्व ह्यांच्या साहाय्यानें श्रम करून प्रगति घडवून आणण्याचा विशेष नैतिक गुण आहे असें मानणाऱ्या पाश्चात्य ग्रंथकारांच्या मतांविरुद्ध वेळीच सावध होणें आवश्यक आहे. लोकांच्या मनोरचनेचा त्यांच्या प्रगतीवर हटकून बरावाईट परिणाम होत असल्यानें वरील मतांत ऐतिहासिक दृष्ट्या कितपत सत्य आहे, पाश्चात्यांच्या जीवितध्येयांशीं तुलना केल्यास हिंदी लोकांच्या ध्येयाचें वैशिष्ट्य कोणतें, आणि ह्यापुढील काळांत हिंदी लोकांच्या मनोरचनेचा त्यांच्या प्रगतीवर काय परिणाम होण्यासारखा आहे हें ठरविणें आवश्यक आहे.

इंग्लंड, अमेरिका, फ्रान्स अगर जर्मनी इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतील अर्वाचीन परिस्थितीशी हिंदुस्थानाच्या सद्यःस्थितीची तुलना केल्यास हिंदुस्थानात अगदी प्राचीन कालच्या सामाजिक घटनेचे नाही तरी निदान मध्ययुगीन कालांतील अनेक विशेष अजूनही प्रामुख्यानें अस्तित्वांत असलेले दिसतात. समाजातील फार मोठ्या वर्गाच्या जीवनक्रमावर एक प्रकारचा खेडवळपणा, मांद्य व दारिद्र्य ह्यांचा स्पष्ट ठसा उमटलेला दिसतो. वंशपरंपरागत साधनें व ठराविक पद्धति ह्यांच्या साहाय्यानें चालविलेला शेतकी हा एकच लोकांच्या उपजीविकेचा मुख्य धंदा आहे; आणि ह्याच अनुभवावरून कित्येक लोक हिंदवासीय म्हणजे जात्या आध्यात्मवादी व पारमार्थिक चिंतनांत मग्न होणारे असून आधिभौतिक प्रगतीच्या क्षेत्रात त्याजकडून काही विशेष कामगिरी होण्याची आशा बाळगणे व्यर्थ आहे असें मत प्रतिपादितात. अर्थातच हिंदुस्थानात प्राचीन व ऐतिहासिक काळात अनेक उद्योगधंदे, विद्या, कला, हुन्नर इत्यादि भौतिक प्रगतीची मुख्यांगं पूर्णत्वास पोहोंचली होती ही गोष्ट हिंदी लोक ऐहिक प्रगतीस नालायक आहेत असें ठरवितांना प्रायः दृष्टीआड केलेली असते. परंतु ऐतिहासिक पुराव्यावरून हिंदी लोक हे जात्या भौतिक प्रगति घडवून आणण्यास अगर आधिभौतिक सुखसोयींचा रसिकतेनें उपभोग घेण्यास नालायक नाहीत एवढी तरी गोष्ट निर्विवाद सिद्ध होण्यासारखी आहे असें आमचें मत आहे. उत्पत्ति, प्रगति, स्थिति व लय हा निसर्गाचा चक्रनेमिक्रम व्यक्ति व राष्ट्र ह्यांच्या मागें लागलेलाच आहे. ग्रीस, रोम इत्यादि ज्या पाश्चात्य राष्ट्रांच्या प्राचीन संस्कृतीचे इतके गोडवे गाइले जातात तीं राष्ट्रें आज नामशेषच झालेलीं आहेत. युद्ध व राजकारण ह्यांत आज एकाचा जय तर उद्या दुसऱ्याचा हा क्रम चाललेलाच आहे. तो विसरून जाऊन हिंदुस्थानदेशाच्या ऐहिक प्रगतीसंबंधी भरमसाट विधानें करणें न्याय्य होणार नाही. उलट पक्षी, ग्रीस व रोमसारखीं हिंदुस्थानाच्या मानानें अर्वाचीन ठरणारीं राष्ट्रेंही जेथें आपापल्या संस्कृतीस पारखीं झालीं तेथें हिंदुस्थानासारख्या जुनाट देशानें आपलें स्वत्व व संस्कृति हीं चव्हेंशी कायम राखली हें हिंदी लोकांच्या मनोरचनेच्या व त्यांच्या संस्कृतीच्या आणि संस्थांच्या जिवंतपणाचें व कणखरपणाचें लक्षण होय असेंच म्हटलें पाहिजे.

**३ इतिहासाची साक्ष**— हिंदी लोकांमध्यें संख्येनें व संस्कृतीनें फार मोठा असलेला वर्ग म्हणजे हिंदूंचा होय. त्यांच्या धार्मिक वाङ्मयात वेदग्रंथांना प्रामुख्य दिलें पाहिजे. वेदकाल हा खिस्तजन्मापूर्वी किती शतकें न्यावयास पाहिजे ह्यांविषयीं विद्वानांत मतभेद असला तरी वेदांमध्यें मनुष्याचे विचार व भावना ह्यांचें जें वर्णन केलेलें आहे तें सर्व जगाच्या वाङमयांत कालमानाच्या दृष्टीनें ' अपूर्व ' आहे ह्याबद्दल कोणालाच शंका नाही. विशेषतः प्रस्तुतस्थळीं ध्यानात बाळगण्यासारखी गोष्ट म्हणजे वैदिक वाङ्मयावरून त्यावेळचे हिंदी लोक हे तरी निदान निष्क्रिय

गूढसंशोधक नसून स्वतःच्या श्रमानें आपली सांपत्तिक परिस्थिति सुधारण्याची अहर्निश खटपट करणारे होते ही गोष्ट स्पष्टपणें दिसणारी आहे. हिंदूंचे मुख्य ऐतिहासिक ग्रंथ रामायण व महाभारत हे होत; व त्यांमध्येंही प्रगमनशील व जोमदार संस्कृतीचें चित्र रेखाटलेलें आपणांस दिसून येतें. वैदिक अगर महाभारताचा काळ सोडून ऐतिहासिक काळाकडे नजर टाकिली तरी चंद्रगुप्त, अशोक, समुद्रगुप्त, हर्ष इत्यादिकांचीं उत्तर हिंदुस्थानांतील साम्राज्यें व चालुक्य, राष्ट्रकूट, चोल वगैरे विख्यात घराण्यांचीं दक्षिणेंतील राज्यें हीं हिंदूंना निदान त्या काळापर्यंत तरी ऐहिक प्रगतीस विन्मुख होण्याचें धोरण स्वीकारलें नव्हतें हे सिद्ध करण्यास समर्थ आहेत. हिंदुस्थानाचे धाडसी दर्यावर्दी, जावासारख्या परद्वीपांत जाऊन ' नवे हिंदुस्थान ' निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारे वसाहतवाले, चीन जपान पासून रोम, मिसरपर्यंत स्वतःच्या जहाजांत क्रोडो रुपयाचा व्यापार चालविणारे साहसी व्यापारी या सर्वांच्या साक्षीवरून असें सिद्ध होतें काय, कीं हिंदी लोक पारमार्थिक चिंतनामार्गे लागून आधिभौतिक प्रगतीस स्वभावतःच नालायक झालेले आहेत ! मॅगॅस्थेनिस, ह्युएन त्संग, अल्बेरूनी इत्यादि परदेशी प्रवाशांनीं हिंदुस्थानांत दीर्घकालपर्यंत राहून व फिरून येथील तत्त्वज्ञान व वाङमय ह्यांचेंच कौतुक केलें नसून शास्त्र, कला, उद्योगधंदे व व्यापार ह्यांची त्याकाळीं जी प्रगति झाली होती तिनेंही ते थक्क होऊन गेले होते ह्याचें प्रत्यंतर ह्यांच्या ग्रंथांत पूर्णपणें सांपडतें. केवळ पाश्चात्य राष्ट्रांतच नव्हे तर आजमितीस प्रत्यक्ष हिंदुस्थानांतही शाळा व कॉलेजें ह्यांतील विद्यार्थ्यांस प्राचीन संस्कृति म्हणजे ती एक ग्रीसची व रोमची असा पाठ शिकविण्याचा प्रघात पडून गेला आहे. प्राचीन व मध्ययुगीन कालांत हिंदुस्थानानें विचारक्षेत्रांत व कार्यक्षेत्रांत जें स्पृहणीय यश मिळविलें होतें त्याकडे अभिमानानें तर राहोच पण नुसत्या कुतूहलानेंही फारसें कोणी पहात नाहीं. परंतु कोणाही निःपक्षपाती मनुष्यास निदान त्या कालच्या पुराव्यावरून असें कबूल करावें लागेल कीं ऐहिक व पारमार्थिक ज्ञान आणि प्रगति ह्यांमध्यें वैभवाच्या शिखरास पोहोंचलेल्या राष्ट्रांत त्याकाळीं हिंदुस्थानाचा समावेश होत असून इतर पौरस्त्य व पाश्चात्य राष्ट्रें आदरयुक्त दृष्टीनें हिंदुस्थानाकडे पहात असत.

अर्वाचीन काल हा बोलून चालून हिंदी संस्कृतीच्या अधोगतीचा इतिहास. परंतु तशा स्थितींतही विजयानगरचे राजे, मोंगल बादशहा व महाराष्ट्रीय योद्धे आणि मुत्सद्दी यांनी मोठमोठालीं साम्राज्यें स्थापन केलीं आणि चालविलीं. हिंदी लोक म्हणजे स्वस्थ बसून होईल तें पहाणारे व कर्तृत्वशून्य असावयाचे ह्या मिथ्या आरोपास वरील ऐतिहासिक पुराव्यांत ज्यांस समाधानकारक उत्तर मिळणार नाहीं त्यांच्या ग्रहणशक्तीचें व न्यायबुद्धीचें कौतुक करावें तेवढें थोडेंच ! प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारचा हिंदुस्थानांत अंमल सुरू झाल्यावरही त्याच्या ज्या अधिकाऱ्यांनी साम्रा-

ज्यवादाचे विकृत चष्मे डोळ्यावर चढविले नव्हते त्यांस हिंदुस्थान देश कित्येक बाबतीत इंग्लंडपेक्षांही सुधारलेला आहे हें कबूल करण्यास दिक्कत वाटत नसे[1]. राष्ट्रांची संस्कृति व्यापारी तराजूंत जोखावयाची असें म्हटले तरी यांत्रिक सुधारणा घडून येण्यापूर्वी अनेक शतकें व त्यानंतर कित्येक वर्षे हिंदुस्थानांतील कापड, रंग वगैरे पक्का माल इंग्लंडमध्ये तेथील मालापेक्षां सुबक व स्वस्त ठरत असे हें निर्विवाद असून, हिंदुस्थानावरील औद्योगिक नालायकीचा डाग आगंतुक आहे हें त्यावरून सिद्ध होईल. ग्रेटब्रिटनमधील लोक ज्या वेळेस अंगास रंग लावून रानोमाळ व दऱ्याखोऱ्यांतून भटकत फिरत होते तेव्हां हिंदुस्थानांत भरभराटीची संस्कृति वास्तव्य करीत होती, हे प्रत्यक्ष इंग्रज ग्रंथकारांसही कबूल आहे.

प्रत्येक देशांतील नैसर्गिक परिस्थिति व भूगोलिक विशेष ह्यांच्या अनुरोधानें तेथील लोकांची संस्कृति ठरत असते, हे बव्हंशी खरें असलें तरी कांही बहिर्गत गोष्टींचाही राष्ट्रांच्या इतिहासावर फार मोठा परिणाम कधी कधी होतो हे विसरतां कामा नये. पंधराव्या शतकाच्या शेवटी तुर्की सत्तेची कॉन्स्टॅन्टिनोपल येथें स्थापना, मुसलमान व ख्रिश्चन ह्यांमधील दीर्घकालपर्यंत व अनेक देशात चालू असलेले झगडे, ख्रिश्चन धर्मातही फूट पडून भिन्न पक्षांत उत्पन्न झालेली तेढ, राष्ट्रीय सरकारें व स्वतंत्र धार्मिक पीठें याचे संस्थापन, अमेरिकेचा शोध, सोन्याचांदीच्या खाणी सांपडून त्या धातू विविध मार्गांनी मिळविण्याची खटपट, पौरस्त्य राष्ट्रांशी चालणाऱ्या व्यापाराची मक्तेदारी मिळविण्याकरिता पाश्चात्य राष्ट्रांत झालेल्या झटापटी, उत्तर समुद्रांत इंग्लंडास सांपडलेली निवाऱ्याची जागा इत्यादि भूगोलिक व ऐतिहासिक कारणांच्या प्रभावानेंच यूरोप व इंग्लंड ह्यांच्यातील प्रगति विशिष्ट मार्गानें निर्माण झाली आहे ह्यांत संशय नाहीं. हिंदुस्थानात हवापाणी व नैसर्गिक परिस्थिति अनुकूल असल्यानें लोकांस विशेष खटपट न करता आपल्या प्राथमिक गरजा भागवितां येत हे खरें; परंतु देशाचा विस्तार अफाट असल्यामुळें सर्व हिंदुस्थानभर एक राजसत्ता दीर्घकालपर्यंत टिकत नसे. परदेशी शत्रूंच्या स्वाऱ्या व अंतर्गत बडाळी ह्यांपासून जीवित व वित्त ह्यांचे संरक्षण करण्यास जागजागी स्वतंत्र

[1] "परंतु शेतीची चांगली पद्धत, उद्योगधंद्यांतील सर्वोत्कृष्ट कौशल्य, शौक व सोय ही भागविण्यास लागणाऱ्या सर्व वस्तु उत्पन्न करण्याचे सामर्थ्य, प्रत्येक खेड्यांत वाचन, लेखन व अंकगणित हे विषय शिकविणाऱ्या शाळांची संस्थापना, परस्पर पाहुणचार व दानवृत्ति ह्यांचा सार्वत्रिक प्रसार; आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्त्रीजनास आदरानें, विश्वासानें व कोमलतेनें वागविण्याची पद्धत; इत्यादि चिन्हांवरून जर राष्ट्रांची संस्कृति ठरवावयाची असेल तर हिंदुस्थान देश युरोपांतील एकाही राष्ट्रापेक्षा कमी प्रतीचा नाहीं, व संस्कृति ही जर आंतर्राष्ट्रीय व्यापाराचा जिन्नस होऊं शकेल तर इंग्लंडचा फायदा त्या मालाची आयात करण्यात आहे, अशी माझी खात्री आहे." हे मत सर टॉमस मन्रो ह्या मद्रासच्या गव्हर्नराचे आहे.

व्यवस्था करणें भाग पडे. ग्रीस देश लहान असूनही तेथील भूगोलिक परिस्थिती-मुळें तेथील लोकांची राजकीय संघटना होऊं शकली नाहीं व राष्ट्रीय ऐक्याच्या अभावीं त्या देशाच्या स्वातंत्र्याचा व संस्कृतीचा ऱ्हास झाला, हे इतिहासज्ञांस विदित आहे. कांहीं अंशीं हिंदुस्थानांतही तोच प्रकार झालेला आहे असें मानण्यास हरकत नाही. लहानसहान प्रदेशाच्या संरक्षणाची स्वतंत्र व्यवस्था करावी लागल्यानें उद्योग धंदे व व्यापार ह्यांसही स्थानिक व संकुचित स्वरूप प्राप्त होऊं लागलें व काही लोक लढण्याकरिता, काही शेतकीकरता, आणि कांही व्यापाराकरितां अशी वंशपरंपरा वर्णवारी लावण्याची पद्धत पडून गेली. सुधारलेल्या व प्रगमनशील लोकांचा पूर्णपणें अगर अर्धवट रानटी स्थितीत असलेल्या लोकाशी निकट संबंध आल्यास पुढारलेल्या संस्कृतीचे पुरस्कर्ते अनेक अमानुष उपाय योजूनही असंस्कृतांचा बीमोड करण्यास मागें पुढें पाहत नाहीत, हे अमेरिकेनें रेडइंडियन व नीग्रो लोकांबद्दल आणि इंग्लडनें ऑस्ट्रेलियांतील मेओरी लोकाबद्दल स्वीकारलेल्या धोरणावरून उघड होतें. आर्य लोकाचा एतद्देशीय रानटी जातींशी असाच निकट संबंध आला असता त्यानी निर्दालनाचें धोरण न स्वीकारता समाजाच्या घटनेंत येथील मूळच्या लोकासही एक सर्वमान्य भाग मोकळा ठेवून व नोकर अगर अर्धवट सामाजिक गुलाम म्हणून का होईना पण त्यास आपणात सामील करून घेतलें, हे निदान संस्कृतीच्या दृष्टीनें तरी अधिक समर्थनीय व अभिमानास्पद होय ह्यात शंका नाही. आर्यांच्या वसाहतकालापासून आजतागाईत अनेक निरनिराळ्या संस्कृतीचे प्रत्यक्ष व प्रच्छन्न हल्ले हिंदी संस्कृतीवर झाले असून देखील ती आज प्रायः अभिन्न आहे त्याचें श्रेय बव्हंशी वर्ण व जाति ह्या संस्थास द्यावयास हवे. संस्कृतीतील सात्विकता व समाजसंरक्षणाच्या साधनांतील कल्पकता हे दोन्ही गुण वर्णभेदात पहिल्या प्रथम आढळून येत असत हे ध्यानात ठेवले पाहिजे. ह्याच पद्धतीस पुढे विकृत स्वरूप प्राप्त होऊन लोकाची दृष्टि संकुचित झाली व पुराणाभिमान वाढून आहे तें राखावें व अधिकाची हाव धरूं नये असें लोकास वाटू लागलें. भूगोलिक, राजकीय, सामाजिक, औद्योगिक, बौद्धिक वगैरे सर्वच बाबतीत संकुचितपणा व प्रगतीस विरोध ही पसरत चालली. पाश्चात्य संस्कृति काय किंवा पौरस्त्य संस्कृति काय, कोणाचाच खरा धर्मतत्त्वें अगर अध्यात्मज्ञान ह्यांच्यावरून सर्वथैव उलगडा होत नसून अनेक भूगोलिक व ऐतिहासिक गोष्टीवरून त्याचा ओघ ठरत असतो हें ध्यानात ठेवलें पाहिजे. खरें म्हटलें तर खिस्ती धर्मातही अध्यात्माचें महत्त्व ठासून वर्णिलेलें असून खिस्ताचे पुजारी आपल्या धर्मबांधवांस ऐहिक प्रगतीच्या मोहजालात न सांपडण्याबद्दल कंठरवानें सागत आले आहेत. सामान्य खिस्ती लोकही धर्मभोळेपणात हिंदी लोकापेक्षां विशेष कमी आहेत असें नाही. परंतु सर्वच राष्ट्रात खरीं धर्मतत्त्वें नेहमी मागें रहात असून व्यवहारधर्म हा आधिभौतिक परिस्थितीवरून ठरत असतो. खिस्ताचा

दैववाद किंवा साधा आणि कष्टमय जीवनक्रम चालविण्याची त्याची शिकवणूक जागच्याजागी राहून स्वतःच्या कर्तृत्वाच्या जोरावर जी संधि येईल तिचा आपल्या आधिभौतिक प्रगतीस उपयोग करून घेण्याचा क्रम खिश्चन राष्ट्रांनी चालविला आहे. स्वराष्ट्रांतील हा अनुभव विसरून पाश्चात्य ग्रंथकार हिंदवासीयांस आपला अध्यात्मवाद व धार्मिक समजुती टाकून देण्याचा उपदेश करीत आहेत; तर उलटपक्षीं आमच्या इकडील कांहीं लोक जुन्या धार्मिक आचारविचारांचें पुनरुज्जीवन करण्याच्या खटाटोपांत गुंतलेले दिसत आहेत. ह्या दोन्ही आत्यंतिक मताचा योग्य विचार करून हिंदी संस्कृतींत प्रगतीस आवश्यक अशा पाश्चात्य पद्धतीच्या सुधारणा घडवून आणणें आवश्यक आहे. हिंदी संस्कृतीचा हाच विशेष आहे की जरूर तेथें बदल करून मुख्य भाग कायम राखावयाचा. आज हजारों वर्षे जी संस्कृति टिकाव धरून राहिली ती तडजोडीनें व परस्पर प्रतिक्रियेनेंच टिकली आहे व यापुढेंही हिंदी राष्ट्रास आपली प्रगति करून घ्यावयाची असेल तर संस्कृतीच्या तडजोडीचें धोरण स्वीकारणें आवश्यक आहे.

**४ भिन्न संस्कृतींचा मिलाफ**–हिंदू, बौद्ध व मुसलमान राजांच्या अमलाखालीं हिंदुस्थानाची जी राजकीय व सांपत्तिक प्रगति झाली होती, त्यावरून हिंदूधर्मावर संसारपराङ्मुखतेविषयीं घेतले जाणारे आक्षेप फोल आहेत हें सिद्ध होतें. अनेक शतकांपूर्वीं तयार केलेल्या आमच्या नीतिशास्त्र, धर्मशास्त्र, शिल्पशास्त्र व अर्थशास्त्र इत्यादि विषयांसंबंधींच्या ग्रंथांत राज्यव्यवस्था, सामाजिक घटना, आर्थिक कर्तव्यें, कला व हुन्नर आणि कायदे व न्याय ह्यांचा संपूर्ण विचार केलेला असून वैयक्तिक व सामाजिक हित, आधिभौतिक व आध्यात्मिक प्रगति ह्यांचा हिंदू समाजाच्या पुढाऱ्यांनीं योग्य मेळ घातलेला होता हें निःसंशय ठरतें. कौटिल्याच्या अर्थशास्त्रापासून तो अबुल फजलाच्या ऐनेअकबरीपर्यंत, राज्यव्यवस्थेसंबंधानें लिहिलेले सर्व ग्रंथ राजांनीं प्रजाजनांचें ऐहिक व पारमार्थिक हितवर्धन करून आपलें बल व वैभव कसें वाढवावें हेंच सांगतात. मुसलमानी अंमलांत भिन्न संस्कृतींचा झगडा पहिल्याप्रथम सुरू होऊन लवकरच त्यांचा मिलाफ झाला. बहामनी राज्य व विजयानगरचें राज्य हीं परकी संस्कृतीशीं जरूर तेवढा मेळ करून घेऊन आपली प्रगती घडवून आणण्याच्या हिंदुधर्मांतील सामर्थ्याचीं ठळक उदाहरणें आहेत. मराठी साम्राज्याचे संस्थापक श्रीशिवाजी महाराज किंवा त्यांनीं लावलेल्या वृक्षाची सर्व देशभर वाढ करणारे बाळाजी व बाजीराव हे अत्यंत धार्मिक असून अनेक साधुसंतांच्या प्रेरणेनें व उपदेशानें आपलें कार्य करीत असत हें सर्वविश्रुत आहे. संपत्ति व कीर्ति ह्यांच्या अर्जनार्थ हिंदू लोक भरतखंडाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकास जाण्यास कचरत नसत एवढेंच नव्हे तर परद्वीपांतही आपला धर्म व सत्ता स्थापण्याचा त्यांनीं प्रयत्न केल्याचे भरपूर पुरावे उपलब्ध

आहेत. मोठमोठे कारखाने व पेढ्या असणें हेंच एक आधिभौतिक प्रगतीचें चिन्ह आहे असें म्हटलें तर अठराव्या शतकापर्यंत यूरोपमध्यें तरी असले कारखाने व पेढ्या किती होत्या, व आजमितीस तरी कित्येक युरोपियन राष्ट्रांत त्या हिंदुस्थानापेक्षां कितीशा अधिक आहेत ?

ऐतिहासिक काळ सोडून प्रत्यक्ष आजची स्थिति पाहिली तरी आमची धार्मिक तत्त्वें भौतिक प्रगतीच्या विशेष आड येत नाहीत असेंच दिसेल. एक तर, सर्व देशभर केवळ राजकीय दृष्ट्याच नव्हे तर आर्थिक दृष्ट्याही आज युरोपियन लोकांचें म्हणजे पर्यायानें पाश्चात्य सुधारणेचेंच वर्चस्व आहे. दुसरें असें की, बत्तीस कोटी लोकसंख्येपैकीं ½ हून जास्त लोक मुसलमान व इतर धर्मांचे आहेत. त्यांचा धर्म जर समता व आशावाद ह्यांच्या पायावर उभारलेला आहे तर त्यांची स्थिति हिंदूंच्या इतकीच किंबहुना त्यांच्याहूनही हलाखीची कां असावी ? उलट, अर्वाचीन औद्योगिक घटनेचा पूर्णपणें फायदा घेऊन लक्षाधीश होणारे हिंदी व्यापारी, कारखानदार, सराफ वगैरे कोणत्या जातीचे व कितपत पाश्चात्य ज्ञान मिळविलेले लोक आहेत ? मारवाडी, जैन, भाट्ये, चेटी, खोजे, मेमन, बोहोरी इत्यादि लोकांतील ज्यांनी 'पाश्चात्य' पद्धतीनें लाखों रुपये गांठीस बांधले आहेत त्यापैकीं किती जणांनी आपल्या धार्मिक कल्पना सोडून पाश्चात्य संस्कृतीचा अंगिकार केला आहे ? उलट इंग्रजी वळणानें वागणारी एक पारशी जात सोडून दिली तर उद्योग, व्यापारधंदा, सराफी इत्यादि अर्वाचिन औद्योगिक घटनेच्या केंद्रस्थानीं हिंदी धर्मसमजुतीस घट्ट धरून बसणारे, सामाजिक रीतिभातीत अगदी पुराणप्रिय असलेले व फारसे 'सुशिक्षित' नव्हेत असेच लोक आपणांस आढळून येतील. हिंदूंपैकीं ज्या थोड्या लोकांनी पाश्चात्य शिक्षण घेऊन नव्या संस्कृतीची फळें चाखली आहेत त्यांची स्थिति त्या मानानें किती तरी हलाखीची आहे ! निरनिराळ्या स्वरूपांच्या ह्या अनुभवांवरून आपणांस असें दिसून येईल की जीस अर्वाचीन सुधारणा असें आपण म्हणतों ती कोणत्याही आध्यात्मिक तत्त्वावर अगर धर्मसमजुतीवर अवलंबून नसून प्रस्तुत ग्रंथाच्या प्रास्ताविक प्रकरणांत वर्णन केलेल्या उत्पादन, विनिमय, विभागणी इत्यादि संबंधाच्या विशिष्ट आर्थिक घटनेमुळेंच पाश्चात्यांच्या मनोरचनेवर एक प्रकारचा आत्मविश्वासाचा व आशावादित्वाचा छाप बसलेला आहे. नव्या काळास योग्य अशा मार्गांनी हिंदी लोक आपली प्रगति करून घेण्याची खटपट करूं लागल्यास त्यांची धर्मतत्त्वें त्यांच्या आड न येतां कर्तृत्वाच्या जोरावर त्यांसही आपले आर्थिक व्यवहार प्रगमनशील करणें शक्य होईल. बाजारांत जेथें जेथें हिंदी व युरोपियन प्रतिस्पर्ध्यांचा संबंध येतो तेथें किंवा ब्रिटिश वसाहतींत, हिंदी लोक द्रव्यार्जन करण्यास नालायक अगर पराङ्मुख आहेत असा कोणा युरोपियनास अनुभव आला आहे काय ? हिंदी

संस्कृतीचा आमच्या मतें ह्याच विशेष आहे की परिस्थित्यनुरूप ऐहिक व पारमार्थिक हिताची तोंडमिळवणी कशी करावी हे तिच्यांत स्पष्टपणें दर्शविलेलें आहे.

**५ हिंदु अध्यात्मपद्धति**—परिस्थितीप्रमाणें आचारविचार बदलणें व ऐहिक आणि पारमार्थिक हिताचा मेळ बसविणें हे आर्यसंस्कृतीचे विशेष आहेत असें म्हटलें तर हिंदु अध्यात्मपद्धति स्वतंत्र अशी कांहीच शिल्लक रहात नाही, असा कांहीं जणांचा आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु तो अगदीच पोकळ आहे हें थोड्या विचाराअंतीं सहज दिसून येईल. निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत मनुष्यांच्या वर्तणुकीस मार्गदर्शक होणारे आणि एकंदर जीविताचें प्रमाणशीर व परस्पर परिपोषक स्वरूप प्रकट करणारे अनेक नियम तयार करून त्यांच्या साहाय्यानें आध्यात्मिक, नैतिक व आधिभौतिक विचार व कल्पना ह्यांची बनविलेली एकसूत्री पद्धति म्हणजे हिंदु-अध्यात्मपद्धति असें म्हणणें योग्य आहे. मनुष्यस्वभावाची व मानवी जिविताचीं अनेक अंगें आहेत हें न विसरतां आपल्या वासना व भावना ह्यांचें विवेचक बुद्धीनें नियमन करून सर्व नैसर्गिक शक्तींचा प्रमाणशीर परिपोष मनुष्यानें करावा हीच हिंदु अध्यात्मानें मनुष्याच्या वागणुकीची कसोटी ठरविलेली आहे. निव्वळ वासनाक्षय म्हणजे सुख नव्हे हें मत आमच्या अध्यात्मपद्धतीत मान्य केलें असून जीवनक्रम शक्य तितका उच्च दर्जाचा ठेवून त्यांतील इंद्रियविषयक सुखापेक्षां बुद्धिग्राह्य सुखावरच मनुष्यानें जास्त निष्ठा ठेवावी हें मत तिच्यात स्पष्टपणें नमूद केलेलें आहे. आमची पुराणें, शास्त्रें, धार्मिक ग्रंथ आणि काव्यें, नाटकें, इतिहास इत्यादि सामाजिक व बौद्धिक विषयांवरील वाङ्मय ह्यांमध्येंही प्रस्तुत मताचाच पुरस्कार केलेला उघड दिसतो. इकडील कायदे, सामाजिक संस्था व चालीरीति हीं देखील वरील तत्वाच्या पायावर उभारलेली आहेत हें सूक्ष्म विचार केल्यास दिसून येईल. ह्यावरून प्रत्येक हिंदु मनुष्य दररोजचे असंख्य व्यवहार करतांना जाणूनबुजून वरील तत्व अंगिकारित असतो असें म्हणण्याचा आमचा आशय आहे असें कोणी समजूं नये. परंतु मनुष्यांच्या व्यावहारिक वर्तणुकीवर त्यांच्या धार्मिक व नैतिक मताचा जो कांही परिणाम सामान्यतः होत असतो तो हिंदु मनुष्याच्या बाबतीत वरील प्रकारचा, म्हणजे निव्वळ इंद्रियविषयक सुखामार्गे प्रमाणाबाहेर न लागतां बुद्धिग्राह्य सुखास जवळ करण्याच्या स्वरूपाचा आहे एवढें सांगणें आवश्यक आहे.

जगांतील परमोच्च, अनादि व अनंत तत्व हेंच काय तें सत्य व ऐहिक संपत्ति सर्वथैव आभासात्मक असल्यानें मनुष्यानें वासनाक्षय करून व अहंकार टाकून आत्मसिद्धीच्या मार्गास लागावें, ह्या मताचा पुरस्कार करणाऱ्या ऋषींचा व ग्रंथकारांचा एक पथ फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानात अस्तित्वांत आहे हें खरें. उपनिषदें व आद्य शंकराचार्यांचे ग्रंथ ह्यांमध्यें प्रस्तुत मताचा विशेष प्रामुख्यानें

पुरस्कार केलेला आढळतो. अर्वाचीन पाश्चात्य ग्रंथकारासही नीतिशास्त्राचा विचार कर्तव्य असता अध्यात्मवादांतील जीवितध्येय हें मनुष्यांच्या वर्तणकीच्या नीतिमत्तेची एक कसोटी होय असें समजूनच चालावें लागतें. आमच्या इकडील नीतिशास्त्रांत ही कसोटी म्हणजे वासना व अहंकार ह्यांचें विवेकाच्या साहाय्यानें नियमन करणें ही समजली जाते. त्यांतही, इकडील ग्रंथकारांचा विशेष हा आहे की, त्यांनी पारमार्थिक धर्म व व्यवहार ह्यांची सरमिसळ केलेली नसून प्रत्येक मनुष्यास त्याच्या जीवितसिद्धीस आवश्यक असलेला मार्ग निराळा असला तरी वर्णाश्रमधर्मास अनुसरून त्याची विशिष्ट व्यावहारिक कर्तव्यें त्यानें समाधानकारकरीत्या केलीच पाहिजेत असा त्यांचा आग्रह आहे. वर्णाश्रमधर्म किंवा विशेषधर्म आणि साधारण धर्म किंवा सामान्य धर्म ह्यांमध्यें भेद आहे व तो तसा असला पाहिजे हें इकडील जुने विद्वान विसरत नसत. शिवाय, वर्णाश्रमधर्माची ज्यांस थोडीशी माहिती आहे त्यांस वासनाक्षय अगर संन्यास हें ध्येय प्रत्येक सामान्य इसमापुढें ठेवण्याचा हिंदुधर्मात प्रयत्न अगर आग्रह केलेला नसून विशिष्ट आश्रमांतील कर्तव्यें योग्यपणें पार पाडीत असतांच स्वतःचें मन, बुद्धि व वासना ही शुद्ध करण्याचा त्यानें प्रयत्न करावा व तसें करण्यांत ज्यास यश येईल त्यानेंच पुढें संन्यासमार्गावर पाऊल ठेवावें असें शिकविलें जाई, ही गोष्ट अवगत आहे. स्वार्थ व परमार्थ ह्यांचा मेळ घालून प्रगतिपर मार्गानें साध्य होणारी जीवनसिद्धी ही हिंदू अध्यात्मवादाचें विशिष्ट स्वरूप आहे हें यावरून सिद्ध होईल.

६ **हिंदूसमाजरचना**— आमच्या इकडील सामाजिक संस्था व समाजघटनाविषयक मतें ह्यांचा थोडक्यांत उल्लेख केल्यास वरील निर्णयाचा अधिक खुलासा होईल. हिंदुस्थानांत नुकेच वसाहत करून राहिलेल्या ज्या आर्य लोकांनी वेद-रचना केली त्याच्यात ऐहिक संपत्ति मिळविण्याची व तिचा उपभोग घेण्याची इच्छा पूर्णपणें जागृत होती असें दिसतें. निरनिराळ्या वैदिक ऋचामध्यें संतति व संपत्ति मिळण्याकरिता व ऐहिक शत्रूंचे निर्दालन होण्याकरितां देवांची प्रार्थना केलेली आहे. हिंदूधर्माचें एक प्रमुख अंग समजला जाणारा जातिभेद हा त्या काळीं अस्तित्वांत नसून सामाजिक व आर्थिक परिस्थिति जन्मावर अवलंबून नसे हेंही वेदांवरून सिद्ध होत आहे. परंतु आर्यांचे यज्ञयाग व दररोज करावयाचे अनेक धार्मिक विधि ह्यांबद्दल क्रमाक्रमानें असंतोष उत्पन्न होऊन उपनिषदांमध्यें मुख्यतः ज्ञानमार्गावर भर देण्यांत आला आहे. पारमार्थिकधर्माचा व्यवहारधर्माशीं असलेला संबंध तोडून संन्यासमार्गास उत्तेजन देण्याचें काम जैन व बौद्ध धर्म ह्यांनी विशेष जोरानें केलें. अशा रीतीनें 'युद्ध, शिकार, स्त्रीदाक्षिण्य, व ऐहिक सुखोपभोग इत्यादि कर्तृत्वमय सद्गुणांचा क्रमाक्रमानें ऱ्हास होऊन जीवित आणि प्राण ही जणूं महासंकटें आहेत असें मानणारे व युद्धकला, औद्योगिक कौशल्य, ललितकला इत्यादिकांचा होणारा गौरव म्हणजे निष्कारण शोक व रडारड आहे अशी समजूत असलेले

तत्त्वज्ञानी पुढें येऊं लागले.'[1] कालांतरानें हिंदुस्थानांत बौद्धधर्माचा ऱ्हास होऊन वैदिक धर्माची पुनः स्थापना झाल्यावरही हिंदु धर्मामध्यें संन्यासाचें ध्येय कायम टिकलें. तरी आधिभौतिक गरजांच्या प्रभावानें व्यवहारांत मात्र शास्त्र व कला ह्यांस उत्तेजन मिळत राहिलें. मनु व याज्ञवल्क्य इत्यादिकांच्या स्मृति व धर्मशास्त्रें यांत अनेक व्यावहारिक गोष्टींचा प्रवृत्तिपर दृष्टीनें सूक्ष्म विचार केलेला आढळतो. हिंदूंच्या नीतिशास्त्रांतील प्रमुख ग्रंथ म्हणजे भगवद्गीता, शुक्राचार्य व कामंदक ह्यांचे ग्रंथ आणि चाणक्याच्या अर्थशास्त्रासारखे इतर ग्रंथ ह्यांमधून श्रुतिसिद्ध अध्यात्ममार्गाशीं विरोध न आणतां व्यवहारांतील असंख्य व्यापारांचा व चळवळींचा योग्यपणें विचार करून एकंदर समाजाचें धारण व पोषण कसें करावें हें त्या वेळच्या परिस्थितीस अनुलक्षून उत्कृष्टपणें दिग्दर्शित केलें आहे.

हिंदुस्थानाच्या इतिहासांत धार्मिक, राजकीय व सामाजिक स्वरूपाचीं जी अनेक वादळें होऊन गेलीं त्यांतून आर्यसंस्कृतीचें तारूं सुरक्षित कसें न्यावें हा बिकट प्रश्न अनेक वेळां उत्पन्न झालेला आहे. परकी शत्रूंचें संयमन, भिन्न जातींचें एकीकरण, समाजाची वर्गवार विभागणी, निरनिराळ्या वर्गांमध्यें स्वतंत्र आर्थिक कर्तव्यांची वाटणी, प्रत्येक वर्गाचे कायदेशीर हक्क व कर्तव्य ह्यांचें सूक्ष्म निदर्शन, कला, हुन्नर, उद्योगधंदे इत्यादिकांबद्दलचे नियम सुधारण्याची आवश्यकता वगैरे अनेक मार्गांनीं त्या वेळच्या विद्वान लोकांनीं समाजहितवर्धनार्थ खटपट केलेली आहे. आमच्या इकडे अनेक प्रकारचीं शास्त्रें असून त्यांच्यांत समाजरचना व समाजहित ह्यांचा निरनिराळ्या मार्गांनीं विचार केलेला आहे तो ह्याच कारणामुळें होय. एकाच सामाजिक प्रश्नाबद्दल निरनिराळ्या ग्रंथकारांत तीव्र मतभेद असून स्वमतप्रसारार्थ त्यांचे विरोधी पंथही बनत. अनेक स्मृतींत व धर्मग्रंथांत समाजशास्त्राच्या पद्धतीनें व्यवहारधर्म, कायदे व राज्यकारभार ह्यांचाही विचार केलेला आढळतो. समाजघटनेचा व्यावहारिक महत्त्वाचा भाग नीतिग्रंथांत दिलेला असून 'नीतिशास्त्र म्हणजे सद्गुण, संपत्ति, उपभोग, व मुक्ति ह्यांचा उगम' असें शुक्रनीति ह्या ग्रंथाच्या कर्त्याचें म्हणणें आहे. ह्यावरून मानवी जीविताचा व समाजरचनेचा आर्थिक, नैतिक व आध्यात्मिक दृष्ट्या संपूर्ण विचार करून समाजहितसंवर्धनाचे मार्ग सुचविले जात हें उघड होईल. शुक्रनीतिकार तर असें म्हणतात कीं, वेदान्त, व्याकरण, न्याय इत्यादि व्यवहारास निरुपयोगी असलेल्या शास्त्रांपेक्षां नीतिशास्त्राचें, म्हणजे अर्वाचीन समाजशास्त्राचें, महत्त्व अधिक आहे. ज्या विशिष्ट हेतूनें अगर ज्या विशिष्ट आचाराच्या समर्थनार्थ वरील विचार प्रकट केले जात ते हेतु व आचारविचार वादग्रस्त म्हणून आज बाजूस ठेवले तरी समाजाचे सर्व भाग व व्यवहाराचीं सर्व अंगें ह्यांचा संकलित दृष्ट्या विचार करण्याची पूर्वी पद्धति प्रचलित होती हें विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

---

१ रानडेः—संकीर्ण लेख.

समाजांत बेबंदशाही व गोंधळ न होतां स्थैर्य व समतोलपणा राहावा असा सर्वदा कटाक्ष ठेवण्यांत येई. संन्यासमार्गापेक्षां प्रवृत्तिपर कर्मयोग श्रेयस्कर असें स्पष्टपणें सांगणारा भगवद्गीतेसारखा धर्मग्रंथ व चाणक्याच्या अर्थशास्त्रासारखा नीतिग्रंथ ह्यांमध्यें वरील मतांचा विशेष अनुभव येतो. चार्वाकपंथाचे निस्सीम भौतिक सुखलालसेनें प्रेरित झालेले ग्रंथ कधीही लोकप्रिय न होतां आत्मसिद्धि हें आध्यात्मिक ध्येय व्यवहारांतही सोडता कामा नये हेंच मत शेवटपर्यंत कायम टिकलें.

**७ आर्थिक व्यवसाय व त्यांचा हेतु**— इहलोकच्या मानवी जीविताचें अस्तित्व व त्याचे विविध प्रकार हे गृहीत धरून मनुष्यस्वभावाच्या मर्यादित गुणांच्या साहाय्यानें मनुष्यास अधिकांत अधिक सुख कसें प्राप्त करून घेतां येईल हाच हिंदु समाजशास्त्रज्ञांपुढें मुख्य प्रश्न होता हें वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. धनार्जनाचा प्रमुख प्रेरक हेतु म्हणजे वासना ह्या होत; त्या सर्वस्वी नाहीशा करणें शक्य नाही; म्हणून विवेकबुद्धीनें त्याचें नियमन करून खरें सुख, वासनाची तृप्ति न होतांही माणसास प्राप्त व्हावें असा उद्देश पुढे ठेवून समाजशास्त्रविषयक हिंदी ग्रंथ लिहिले आहेत हें उघड आहे. अर्थेच्छु अगर उपभोगेच्छु मनुष्य हा अर्थशास्त्राचा प्रमुख विषय आहे असें मानणाऱ्या जुन्या अर्थशास्त्रज्ञाच्या मताचा आता सर्वत्र निषेध झालेला असून मनुष्यस्वभावांत आधिभौतिक व अध्यात्मिक गुण एकत्र वसत असतात व त्याचा संकलित रीतीनें विचार केला पाहिजे हे मत अलीकडे पाश्चात्य राष्ट्रांतही मान्य होऊं लागलें आहे. स्वतःस अधिकात अधिक सुख लाभावें अगर कमीत कमी दुःख व्हावें ह्या उद्देशानें मनुष्य प्रायशः सर्व व्यापार करतो व तसें करण्यांत त्याचे अंतिम हेतु उच्च अगर नीच असूं शकतात हे मानसशास्त्राचें सामान्य तत्व हिंदू ग्रंथकारास पूर्णपणें अवगत होतें. आधिभौतिक वासना व त्या तृप्त करण्यास करावे लागणारे प्रयत्न हे अपरिहार्य असून केवळ त्याच्या संयमनानें अंतिम सिद्धि करून घेणें इष्ट आहे, हें मत भगवद्गीतेसही मान्य आहे. वासना व प्रयत्न ह्याच्यातील कार्यकारणसंबंध मनु, नारद इत्यादि स्मृतिकारानी विशद केलेला आहे. ' सांपत्तिक मोबदला मिळण्याकरितां श्रम करणें स्तुतीस पात्र होणार नाही, हे खरें असलें तरी इतका निःस्वार्थीपणा इहलोकांत सांपडणें अशक्य आहे; वेद व वेदात सांगितलेली अनेक कर्में ही मनुष्याच्या मोबदल्यासाठी काम करण्याच्या इच्छेवरच अवलंबून आहेत. ' पुण्यकर्म करण्यानें सुख लाभतें, परंतु पुण्य करण्यास तरी जवळ संपत्ति लागते; ह्यास्तव पुण्यमार्गीयांसही धनार्जन करणें आवश्यक आहे, असें दुसऱ्या एका स्मृतिकाराचें मत आहे.

मनुष्यानें इंद्रियविषयक वासना शक्य तितक्या कमी करून उच्च प्रतीच्या गरजा वाढवाव्या व त्यांच्या तृप्तीनें व त्याप्रीत्यर्थ कराव्या लागणाऱ्या व्यवसायानें आपल्या सर्व सद्गुणांचा व शक्तींचा विकास करून घ्यावा, हें मत अलीकडील पाश्चात्य

नीतिशास्त्रज्ञांस मान्य होत आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. आर्थिक विचारांचा वाराही त्याच दिशेस वाहत असून 'शक्तीच्या उपयोगाप्रमाणें संपत्तीचा पाठलाग हाही मुळांत चांगला अगर वाईट कांहीच नसतो; आणि त्यावर आत्यंतिक जड-वादाचा आरोप करण्यापूर्वी त्या संपत्तीचा उगम, तिच्या उत्पादनाचे व विनियोगाचे मार्ग आणि उपभोक्त्याचे इतर विशेष ह्यांचाही विचार करावयास पाहिजे,' असा सावधगिरीचा-इशारा देणें आधुनिक ग्रंथकारांस इष्ट वाटत आहे. फलाशा सोडून सामाजिक कर्तव्य करीत राहणें इष्ट आहे हें भगवद्गीतेचें मतही ध्यानांत घेणें आव-श्यक आहे. प्रायशः सर्वकाळीं, व विशेषतः आजकाल, प्रत्येक देशांतील फार मोठा वर्ग दारिद्र्यांत खितपत असतो व संपत्ति आणि सुख ह्यांच्यांतील दुजा भाव त्यास पटवून देऊन धनार्जनाबद्दलची त्यांची उत्सुकता कमी करण्याचा प्रयत्न करणें रास्त होणार नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. 'न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नो द्विजेत् प्राप्यचाप्रियम्' ह्या तत्त्वानुसार निर्माहित झालेली बुद्धि असणें निव्वळ आर्थिक दृष्ट्याही फायदेशीर आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. सामान्य लोकांचें आर्थिक जीवन आणि त्याचा धर्म ह्याचा पाश्चात्य देशांत जो तीव्र विरोध दिसून येतो तवढा हिंदुस्थानांत दिसत नाहीं ह्याचें श्रेय, स्वार्थ व परमार्थ ह्यांच्यात तडजोड करून, व्यवहार करीत असतांच पारलौकिक हित साधण्याच्या हिंदु धर्मपद्धतीस दिलें पाहिजे हे उघड आहे.

**८ हिंदी संस्कृति व भारतीय अर्थशास्त्र**— मागील प्रकरण व प्रस्तुत प्रकरणांतील येथवरचा भाग ह्यामध्ये भारतीय अर्थशास्त्र व हिंदी संस्कृति ह्यांसंबं-धानें जें विवेचन केलें आहे त्याविषयीं सामान्यपणें आणखी चार शब्द लिहिणें आवश्यक आहे. जगातील सर्व देशांत जे लहानमोठे अनेक फेरबदल होत आहेत त्याच्या भोंवऱ्यात यदृच्छेनें हिंदुस्थानदेश सांपडलेला आहे. केवळ सुशि-क्षित वर्गांतच नव्हे तर एकंदर हिंदी समाजात पाश्चात्य विचार व आचार ह्यांचा प्रसार होत आहे. आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार वाढत्या प्रमाणावर होत असून त्यामुळें हिंदवासीयांच्या मनोरचनेंत व व्यावहारिक जीवनक्रमात खळबळ उडून गेली आहे. जातिभेद, कारागिरांचे संघ, गण व श्रेणि ह्यासारख्या संस्था ह्याची मुळें कमजोर होऊं लागली आहेत. मजुरीनें नोकरी मिळण्याच्या सोयी, पदार्थांच्या वाढत्या किमती, मजूरीच्या दरांत होणारे चढउतार, कारखानदारांचा नफा, राहणीचें मान इत्यादि अवघड प्रश्नांस जुन्या संस्थांकडून अगर आचारवि-चारांतून समाधानकारक उपाय सुचविले जाण्याची आशा नाहीं. नवीन औद्यो-गिक प्रगतीमुळे जुन्या समाजव्यवस्थेचो छकलें होण्याची भीति पडल्यामुळें कित्येक समंजस व पुढारी लोक जुन्या संस्कृतीचें पुनरुज्जीवन व अर्वाचीन पद्धतीचा त्याग करण्याचा प्रयत्न करीत आहेत. परंतु परिस्थितीच्या जोरदार ओघापुढं

असल्या प्रयत्नांस म्हणण्यासारखें यश मिळेल असें वाटत नाहीं. ह्यास्तव आज-पर्यंत आर्यसंस्कृतीचे इतर संस्कृतींशी जे अनेक झगडे झाले त्यांतून तडजोड व वरवर परकी वाटणाऱ्या गोष्टी आत्मसात् करण्याचें सामर्थ्य ह्या गुणांच्या जोरावर जसें तिनें आपलें डोकें वर ठेवलें आहे त्याचप्रमाणें सध्यांच्या संक्रमणावस्थेंत हिंदी संस्कृतीतील आवश्यक व हितावह भागाचें रक्षण करून पाश्चात्य पद्धतीचे प्रगतिपर आचार-विचार जरूर तेथें अवलंबिण्याचें धोरण हिंदी अर्थशास्त्राच्या अभ्यासकांस स्वीकारलें पाहिजे.

पाश्चात्य राष्ट्रांतही नव्या औद्योगिक पद्धतीच्या अनियंत्रित अंमलापासून जे सामाजिक दोष उत्पन्न झालेले आहेत ते हिंदुस्थानात उद्भवू न देण्याची वेळीच काळजी घेतली पाहिजे. परंतु पाश्चात्यांची प्रगतीबद्दलची उत्सुकता, ज्ञानलालसा, शास्त्रीय शोधांविषयी हव्यास, संघटनाचातुर्य ह्या बाबतीत हिंदुस्थानात फारच मोठी सुधारणा घडून येणें आवश्यक आहे हें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. जगांतील सर्व प्राचीन-अर्वाचीन संस्कृतींच्या अजबखान्यात निव्वळ एक जुनाट व मौजेची वस्तु म्हणून हिंदी संस्कृतीस मांडण्याची कोणाची महत्त्वाकांक्षा असेल तर गोष्ट निराळी. परंतु संस्कृति म्हणजे व्यक्ति व राष्ट्र ह्यांचें सर्वांगीण हित साधून त्यांस प्रगतीच्या व वैभवाच्या मार्गावर अग्रेसर ठेवणारी बलवान शक्ति असा खरा अर्थ ज्या कोणांस मान्य असेल त्यांनीं अनुकरणप्रियतेचा दोष पदरीं घेऊनही वरील मार्गानें पाश्चात्य सुधारणेंतील इष्ट भाग आपलासा करून घेणें आवश्यक आहे हें निरंतर ध्यानांत ठेवलें पाहिजे. बदलत्या परिस्थितीत स्वतःचा चरितार्थ चालविण्याची आवश्यकता व प्रजासत्ताक राज्यपद्धतीचा उदय ह्या कारणांमुळें अनेक बाबतीत जुने आचारविचार आपोआप नष्ट होत असतां लाखों गलेलठ्ठ संन्यासी, साधू व भिकारी ह्यांस पोसणें, किंवा कोट्यवधि देशबांधवास जुन्या मोडक्या तोडक्या वचनाच्या आधारावर आर्थिक व सामाजिक गुलामगिरींत ठेवण्याचा हट्ट धरणें ह्यासारखा दुसरा आत्मघातकीपणा सापडणें अशक्य आहे. स्त्रियांस अज्ञानांत व परवशतेंत ठेवण्याची आमची पद्धति व होतां होईल तों जागचे न हालता दैवावर हवाला ठेवून राहण्याची आमची संवय हेही त्याच तोडीचे दोष असून ते आमच्या खऱ्या संस्कृतीच्या व सामाजिक जीवनाच्या ऱ्हासाची स्पष्ट चिन्हें होत. पाश्चात्य संस्कृतींत दोष आहेत म्हणून वरील दोषांवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करणें मूर्खपणाचें आहे. नव्या-जुन्यांतील बऱ्या-वाईटाचा पद्धतशीर विचार करून विशिष्ट वळणानें सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न होत नसल्यानें आज प्रायः पाश्चात्य व पौरस्त्य समाजरचनाचे दोष मात्र आमच्याइकडे एकत्र झालेले दिसतात. हिंदी संस्कृतीशीं संलग्न असलेल्या वरील दोषांबरोबरच उत्पादनाचा अतिरेक, सट्टेबाजी, मक्तेदारी, खाण्यापिण्याच्या पदार्थांत सळमेसळ करण्याचा प्रघात,

अवास्तव नफा मिळविण्याची हाव, स्पर्धा, निरनिराळ्या जाती व वर्ग ह्यांमधील तंटे, मद्यपानाची संवय, जाहिरातींसाठीं लाखों रुपये खर्च करण्याची पद्धति, बेकारी इत्यादि पाश्चात्य देशांतील प्रमुख दोषहि हळुहळू हिंदुस्थानांत डोकावूं लागले आहेत. ह्या सामाजिक व राष्ट्रीय संकटांचा वेळीच विचार करून इष्ट सुधारणांचा परिपोष व हानिकारक दोषांचें उच्चाटण करणें आवश्यक आहे. आर्थिक धोरण व आर्थिक परिस्थिति ह्यांच्या बाबतींत तरी नव्या-जुन्याची सांगड सुकर करणाऱ्या व व्यक्ति आणि समाज ह्यांच्या हितास अनुकूल असलेल्या कोणत्या सुधारणा होणें आवश्यक आहे ह्याचा पुढें येणाऱ्या प्रकरणांत योग्य स्थळीं उलगडा केला आहे.



# प्रकरण तिसरें

## नैसर्गिक परिस्थिति

**१ संपत्तीच्या उत्पादनाचें महत्त्व**—मागें पहिल्या प्रकरणामध्यें संपत्तीच्या उत्पादनाचें निव्वळ तात्त्विक दृष्ट्या विवेचन केलेलें आहे, त्यावरून शेंकडा नव्याण्णव लोकांचा सामान्य जीवनक्रम आधिभौतिक गरजा भागविण्यास कराव्या लागणाऱ्या श्रमांनीं व्याप्त झालेला असतो व तो चालविण्याकरितां मनुष्यास अनेक निसर्गदत्त वस्तूंचें साहाय्य घेणें आवश्यक असतें, हें वाचकांच्या ध्यानात आलें असेल. नैसर्गिक परिस्थितीच्या साहाय्यानें मनुष्य अर्थोत्पादनार्थ श्रम करीत असतां प्रायः तो श्रमाच्या मितव्ययाचें, म्हणजे कमींत कमी कष्टानें अधिकांत अधिक समाधान प्राप्त करून घेण्याचें, तत्त्व आचरित असतो हेंही तेथें सांगितलें आहे. विवक्षित राष्ट्रांत उत्पादनाची ज्या मानानें प्रगति झाली असेल त्या मानानें सामान्यतः तेथील लोकांची सांपत्तिक परिस्थिति समाधानकारक असण्याचा अधिक संभव असतो; अर्थशास्त्रास मनुष्याच्या उत्पादनविषयक व्यवसायापासून सुरुवात होते ती ह्याच कारणामुळें होय. उत्पादनाचा खरा अर्थ नैसर्गिक वस्तूंच्या साहाय्यानें, म्हणजे त्यांच्यांतील उपयुक्तता मिळवून व जरूर तर ती वाढवून, स्वतःच्या गरजा भागविणें हा असल्यामुळें भूमि अथवा निसर्ग हा उत्पादनाचा प्राथमिक महत्त्वाचा घटक ठरतो. हिंदुस्थानात विस्तृत प्रदेश, सुपीक जमिन, अरण्यें, खाणी, हजारों मैल पसरलेला समुद्रकिनारा, निरनिराळ्या प्रकारचें हवामान, इत्यादि अनेक बाबतींत नैसर्गिक परिस्थिति अर्थोत्पादनास अनुकूल असूनही येथील लोकांची स्थिति सामान्यतः हलाखीची आहे. ह्याचें बहुतेक सर्व लोकांस आश्चर्य वाटतें. हिंदी लोकांत नेटानें अगर कुशलतेनें श्रम करण्याची अपात्रता आहे असें म्हणावें तर आजपर्यंतच्या इतिहासावरून तसें सिद्ध होऊं शकत नाहीं. भूमि, श्रम, भांडवल ह्या घटकांचें योग्य रीतीनें संघटन करण्याचें कार्य हिंदुस्थानात व्हावें तसें झालेलें नाहीं किंवा येथील सध्याचें सरकार देशाच्या आर्थिक प्रगतीस करावी तेवढी मदत करीत नाहीं, हीही हिंदुस्थानाच्या सर्वविश्रुत दारिद्र्याची कारणें असूं शकतील. निसर्ग, श्रम, भांडवल, संघटना, सरकारी मदत ह्यांपैकीं प्रत्येक बाबतींत हिंदुस्थानाची परिस्थिति कशी आहे ह्याचा क्रमशः विचार केल्याशिवाय प्रस्तुत प्रश्नाचा खुलासा होणार नाहीं. परंतु हिंदुस्थानाच्या दारिद्र्याचें एक विशिष्ट स्वरूप येथें उघडपणें सांगितल्याखेरीज उत्पादनाचें आपल्या देशात विशेष महत्त्व कां आहे हें वाचकांच्या ध्यानात यावयाचें नाहीं.

इंग्लंड, जर्मनी अमेरिका इत्यादि मोठमोठीं संपन्न राष्ट्रें पाहिलीं तर त्यांमध्येंही श्रीमंत लोक मूठभर असून एकंदर बहुजनसमाज गरीब असतो असा सामान्य अनुभव आहे, व

त्यावरून दारिद्र्य, हें हिंदुस्थानाच्याच तेवढें मागें लागलें आहे असें नाहीं, असा एक समज होण्याचाही संभव आहे. परंतु पाश्चात्य राष्ट्रांतील गरीबी व हिंदुस्थानाचें दारिद्र्य ह्यांच्यात अत्यंत महत्त्वाचा फरक असा आहे की तिकडील देशांत निसर्गाच्या साहाय्यानें लोकांनी उत्पन्न केलेल्या एकंदर संपत्तीचें परिमाण इकडल्यापेक्षा शेकडों पटीनी अधिक आहे, म्हणजे गरीबी ही प्रायः उत्पादनाच्या कमजोरपणाचा परिणाम नसून उत्पन्न झालेल्या संपत्तीची विभागणी समतेनें होत नाही म्हणून त्या राष्ट्रांतील सामान्य लोकांत सापेक्षतः गरीबी आहे असें म्हणावयाचें एवढेंच. हिंदुस्थानांत लोकसंख्येच्या मानानें एकंदर राष्ट्रीय उत्पन्नच एवढें कमी आहे की सर्व राष्ट्रांतील लोकांची वार्षिक कमाई एकत्र करून ती सारखी वाटून दिली तरी माणशी प्रतिवर्षी शंभर रुपयांपेक्षा अधिक उत्पन्न मिळावयाचें नाहीं. 'इंग्लंड, अमेरिका किंवा जर्मनी ह्या राष्ट्रांतील गरीबी हा संपत्तीच्या विभागणीचा प्रश्न आहे हिंदुस्थानांत तो उत्पादनाचाच प्रश्न आहे.' असें एका इंग्रज ग्रंथकारानें म्हटलें आहे, तें आजही खरें आहे. महायुद्धानंतरच्या काळांत इंग्लंडमध्ये गरीबी व बेकारी बेसुमार वाढली आहे असें आपण ऐकतो. परंतु त्याचें मुख्य कारण म्हणजे इंग्रज लोकांचें उत्पादक सामर्थ्य कमी झालें हें नसून जगांतील जीं राष्ट्रं इंग्लंडचा माल विकत घेत असत त्यास स्वतःच्या गरजा पुर्वीइतक्या भागविण्याचें त्राण राहिलें नाहीं हेंच होय. उपभोगांत म्हणजे राहणीच्या मानांत सुधारणा झाल्या खेरीज उत्पादनाचें सामर्थ्यही विवक्षित मर्यादेपलीकडे जाऊं शकत नाहीं ही गोष्ट हिंदुस्थानासही लागू असली तरी आज मितीस आपल्या देशापुढें जो प्रश्न प्रामुख्यानें उपस्थित झालेला आहे तो उपभोगविषयक नसून उत्पादक सामर्थ्याची अनेक पटींनी वाढ कशी करावी असा तो प्रश्न आहे. ह्यावरून हिंदी लोकांचें राहणीचें मान, किंवा संपत्तीच्या विभागणीची त्यांची पद्धत ही निर्दोष आहे असें समजण्याचें कारण नाहीं परंतु हिंदुस्थानांत दिसून येणारें दारिद्र्य, हलाखी, रोगटपणा, निस्तेज वृत्ति ह्या अनिष्ट गोष्टी दूर होऊन लोकांच्या राहणीच्या मानांत थोडी तरी सुधारणा व्हावयाची असेल तर संपत्तीच्या उत्पादनांतच प्रथम वाढ झाली पाहिजे हें उघड आहे. 'आडांत नाहीं तर पोहऱ्यांत कुठून येणार?' ह्या न्यायानें सर्वच देशांत उत्पादनाचें महत्त्व विभागणी अगर उपभोग ह्यापेक्षा अधिक असतें हें खरें. परंतु एका बाजूस निसर्गाची सुबत्ता व दुसऱ्या बाजूस अठराविश्वे दारिद्र्य ह्या कुटिल कोड्यांतून हिंदुस्थानास आपली सुटका करावयाची असल्यानें उत्पादनाचें महत्त्व येथें विशेष आहे, हें कळणें आवश्यक आहे.

**९ महत्त्वाचे भौगोलिक विशेष**— मागील प्रकरणांत हिंदी संस्कृतीविषयी स्थूलमानानें विवेचन केलेलें आहे त्यावरून इकडील नैसर्गिक परिस्थितीचा लोकांचे जीवन, त्यांचा इतिहास व त्यांची मनोरचना ह्यावर किती स्पष्ट ठसा उमटलेला आहे हे उघड दिसेल प्राचीन काळची ग्रीस व रोम आणि अर्वाचीन काळची इंग्लंड, हॉलंड व अमेरिका ही पाश्चात्य राष्ट्रं भौगोलिक व नैसर्गिक परिस्थितीचा आर्थिक

प्रगतीशीं किती निकट संबंध आहे हे उघडपणें दर्शवितात. विशेषतः इंग्लंडच्या बाबतींत तर हा संबंध विशेष महत्त्वाचा व ध्यानांत ठेवण्याजोगा आहे. त्या देशास असलेलें स्वतंत्र बेटाचें स्वरूप, लांब व खडबडीत किनारा, कोळसा व लोखंड ह्यांचे सान्निध्य, तेथील दमट व थंड हवा इत्यादि नैसर्गिक विशेषाचा प्रत्यक्ष पुरावा इंग्रजांच्या आर्थिक, सामाजिक व राजकीय जीवनांत सहज सापडण्यासारखा आहे हिंदुस्थानात विस्तृत खंडप्राय प्रदेश, मोठमोठे पर्वत व नद्या, उष्ण, दमट व थंड हवेचें निरनिराळ्या भागात अस्तित्व, एकंदर प्रदेशाची, आशिया खंडास जोडून असलेला उत्तरभाग व तेथून हिंदी महासागरात ढकलेला गेलेला द्वीपकल्प भाग ह्यांत विभागणी इत्यादि विशेषांचे येथील लोकावर अनेक महत्त्वाचे परिणाम झालेले आहेत हें सांगावयास नको. निरनिराळे प्रांत व एकाच प्रांतांतील निरनिराळे जिल्हे ह्यांमध्ये सांपत्तिक परिस्थिति, उद्योगधंद्याची व शेतीची वाढ, शारीरिक व मानसिक गुणावगुण, सामाजिक रीति [illegible] इत्यादि बाबतीत अनेक प्रसंगीं जमिनअस्मानाचे अंतर दृष्टीस पडते, तें मुख्यतः स्वाभाविक परिस्थितीतील भिन्नतेमुळे होय, ह्यात शंका नाही.

आकार, नैसर्गिक विशेष, हवापाणी इत्यादि बाबतीत हिंदुस्थान हें वास्तविकपणें एक खंड असून निरनिराळ्या विशेषाचे बाबतीत भिन्नता व साम्य हीं सर्व देशभर दिसून येतात. वायव्य सरहद्दीवरील प्रांतापासून तों ब्रह्मदेशापर्यंतच्या प्रदेशांत अनेक स्वाभाविक व कृत्रिम मर्यादा असून त्यांपैकी कित्येक अर्वाचीन सुधारणा व मध्यवर्ती राजसत्तेची संस्थापना ह्यांच्या योगानें हळूहळू नाहीशा होत आहेत. हिंदुस्थान राजकीय दृष्ट्या एकजीव झालेलें असल्याने आर्थिक दृष्ट्याही निरनिराळ्या भागाचें एकीकरण होत आहे. उत्तर हिंदुस्थान हे भौगोलिक दृष्ट्या आशिया खंडाच्या मुख्य भागापैकीच एक अवयव असून दक्षिण हिंदुस्थान मात्र उत्तरेशिवाय इतर सर्व बाजूंनी समुद्रवलयांकित आहे. उत्तरभाग समशीतोष्ण कटिबंधात असून दक्षिण देश उष्ण कटिबंधात आहे. देशाची जास्तीत जास्त लांबी दोन हजार मैल व सर्वांत जास्त रुंदी अडीच हजार मैल असून समुद्रकिनारा पांच हजार मैल आहे. इतर राष्ट्रांच्या प्रदेशास लागून असलेली हिंदुस्थानची सरहद्द एकंदर सहा हजार मैल आहे. तुलनात्मक दृष्टीनें बोलावयाचें तर हिंदुस्थानदेश इंग्लंडच्या राज्यापेक्षा पंधरापट मोठा किंवा रशियाशिवाय इतर यूरोपखंडाच्या बरोबरीचा आहे. उत्तर, वायव्य व ईशान्य ह्या दिशास हिमालय व त्यास लागून असलेल्या इतर पर्वतांच्या रांगा आणि उरलेल्या बाजूंस अफाट समुद्र अशा अजिंक्य समजल्या जाणाऱ्या सरहद्दी असूनही अनेक वेळा ह्या मार्गानीं परकी लोकांच्या स्वाऱ्या होऊन त्या यशस्वी झालेल्या आहेत औद्योगिक प्रगति होऊन ती दीर्घकालपर्यंत टिकण्यास वित्त व जीवित ह्यांची शाश्वती असावी लागते, ती वारंवार होणाऱ्या परदेशच्या हल्ल्यांमुळें मिळूं शकत नाहीं व ह्या बाबतीत ब्रिटिश सत्तेच्या स्थापनेपूर्वी एकंदर हिंदुस्थानाची स्थिति असमाधानकारक होती हें सर्वांस माहीतच आहे. उलट, दूरवर पसरलेला समुद्रकिनारा व त्यालगत असलेलीं अनेक लहान-

मोठीं बंदरें ह्यांच्या साहाय्यानें प्राचीन कालापासून हिंदुस्थानाचा परदेशांशीं व्यापार व बौद्धिक दळणवळण चालू असे. पूर्वेकडील जावा वगैरे बेटांत हिंदू वसाहती असून हिंदी संस्कृतीचा हिंदुस्थानाबाहेरही चीन–जपान व त्याही पलीकडील काही प्रदेश ह्यां पर्यंत त्याकाळी प्रसार झालेला होता हे पॅसिफिक महासागरातील कित्येक बेटांच्या परिस्थितीवरून सिद्ध होत आहे. अंतर्राष्ट्रीय व्यापार व पाश्चात्य देशांशी दळणवळण ह्यांच्या योगानें आज हिंदुस्थानच्या आर्थिक जीवनावर जे महत्त्वाचे परिणाम होत आहेत तेही समुद्रकिनाऱ्याच्या अस्तित्वामुळे होत, हे इतर पौरस्त्य राष्ट्रांशी ह्या बाबतीत तुलना केल्यास सहज दिसून येईल.

नैसर्गिक विशेषाच्या दृष्टीने पाहिले तर हिंदुस्थानाचे चार स्थूल भाग पडतात. पहिला भाग उत्तर, वायव्य व ईशान्य ह्या दिशाकडील मोठमोठ्या पर्वताचा होय. ह्या पर्वताच्या पायथ्यापासून दक्षिण बाजूस पसरत जाणारा सखल प्रदेश व धनधान्याची समृद्धि करणाऱ्या त्याच्यातील अनेक प्रचंड नद्या ह्याचा दुसऱ्या स्वतंत्र भागात समावेश केला पाहिजे. दक्षिण देशातील डोंगरमाथ्याचा सपाट प्रदेश हा तिसरा विभाग असून त्याच्याच डाव्या व उजव्या बाजूस असलेले लांबोडके किनाऱ्याचे प्रदेश, मलबार व कारोमांडल, हे चवथ्या भागांत समाविष्ट करणे योग्य आहे. हिंदुस्थानच्या नैसर्गिक परिस्थितीचा विचार करतांना हिमालय पर्वताला विशेष महत्त्व दिले पाहिजे; कारण सामान्यतः सर्व देशातील पाऊस, वारा, उष्णता व हवामान ही त्या पर्वतावर अवलंबून आहेत. उत्तर हिंदुस्थानाचा मैदानी प्रदेश सिंधु, गंगा, यमुना, ब्रह्मपुत्रा ह्या नद्यातून वाहून येणाऱ्या पाण्यानें व गाळाने सुपीक व समृद्ध करून सोडलेला आहे. ह्या प्रदेशाच्या पूर्वबाजूस पडणाऱ्या पावसाचें प्रमाण सबंध देशात अधिक असून पंजाबच्या बाजूस तें हळूहळू कमी होत गेले आहे. पंजाबांतील जमीन देखील सुपीक असून अन्य मार्गांनी पाणी मिळताच तेथेही धान्याची समृद्धि होत आहे. आर्यांच्या संस्कृतीस हिंदुस्थानात पहिल्या प्रथम निवासस्थान मिळालें ते ह्याच संपन्न उत्तर देशात होय. दक्षिणेकडील सखल प्रदेशातही जेथे नद्यांचे पाणी विपुल आहे तेथे अगर विहिरी, तळी वगैरे खणण्याची जेथे सोय आहे तेथे धान्याची समृद्धि असून त्या मानानें लोकवस्ति दाट आहे. विंध्याद्रीच्या रांगांनी हिंदुस्थानाची दोन छकले केली असून दक्षिण देश, त्यांतील घाटमाथ्यावरील मैदान व दोन्ही बाजूंचे डोंगराळ प्रदेश हे सर्वस्वी ह्याच पर्वताच्या विस्तारामुळे बनलेले आहेत. पश्चिमघाटामुळे एक चिंचोळा प्रदेश दक्षिण द्वीपकल्पाच्या मुख्य प्रदेशापासून काहीसा निराळा झाला असून पूर्वेकडील घाटाने मात्र महानदी, कृष्णा, कावेरी ह्यांच्या साहाय्याने भरभराटीस आलेला रुंद भाग सोयीवार मोकळा ठेवला आहे. खुद्द दक्षिणेत नद्या मोठ्या व खोल असून आणि पाऊस चांगला पडत असूनही धनधान्याची समृद्धि तेथे दिसून येत नाही. कारण नद्यांचा उतार मोठा असल्याने लागवडीस अगर वहातुकीस त्यांच्या पाण्याचा काहीच उपयोग होत नाही. नैऋत्येहून येणाऱ्या पावसाळी वाऱ्यामुळें पश्चिम घाटावर पाऊस मुबलक

पडत असून त्या वाऱ्यांस पूर्वेकडे जाण्यास मात्र अडथळा झाल्यानें त्या बाजूस पाण्याचा पुरवठा मर्यादित होतो. दक्षिण देशच्या मध्यभागांतील व दक्षिणेकडील नद्या पूर्वेकडे वहात जात असता सभोंवतालच्या प्रदेशावर जमीन सुपीक करणारा गाळ पसरत जाऊन शेवटी त्या नद्या बंगालच्या उपसागरास मिळतात. त्यांपैकी कांही नद्यांच्या मार्गांत धरणें बांधून पाटानें पाणी लागवडीस देण्याची सोय झालेली आहे. गोदावरी, कृष्णा, कावेरी ह्या नद्यांच्या पाण्यावर वरील पद्धतीनेंच लाखों एकर जमीन वर्षानुवर्ष पिकें देत आहे. पश्चिमघाटात पाऊस विपुल असूनही प्रदेशाच्या डोंगराळपणामुळें शेतजमीनीचें क्षेत्रफळ व मगदूर मर्यादित आहे. ह्या भागातले लोक साधे, उद्योगी व कष्टाळू आणि कणखर असण्याचें कारण येथील स्वाभाविक परिस्थिति होय. पूर्वघाटांकडे मात्र जमिनीच्या सुपीकतेमुळें मोठमोठी राज्यें व साम्राज्यें पोसूं शकली. ब्रह्मदेश हा भौगोलिक दृष्ट्या हिंदुस्थानाचा एक स्वतंत्र भाग असून त्यातही डोंगर, नद्या व अरण्यें ह्यांची समृद्धि आहे. दक्षिण ब्रह्मदेश सुपीक व संपन्न असून उत्तरेकडील प्रदेश मात्र डोंगराळ व नापीक आहे. ब्रह्मदेशामधील अरण्यें व अनेक खनिजद्रव्यांच्या खाणी ही सर्व हिंदुस्थानाच्या दृष्टीनें महत्त्वाची आर्थिक साधनें आहेत, हे ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

**१ हवापाणी व पिकें**—हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागातील उत्पादक व्यवसाय, खाण्याच्या धान्याची मुख्य पिकें, घरें व वस्त्रें ह्यांची ठेवण आणि एकंदर राहणी वगैरे बाबतींत हवापाणी व भूमीविशेष ह्यासारख्या नैसर्गिक कारणाचा स्पष्ट ठसा उमटलेला दिसतो. उत्तरेकडील भागात थंडी व ऊन्ह ही दोन्ही कडक असून त्या मानानें दक्षिणेकडे हवामान कमी तीव्र व अधिक स्थिर असतें. वाऱ्याच्या हालचाली, हवेचें उष्णतामान आणि जमिनीची ऊंचसखल ठेवण ह्यांच्या फेरबदलानुसार पावसाचें मानही बदलतें. अरबी समुद्रातून दक्षिण द्वीपकल्पाच्या नैऋत्य भागावरून येणारे पावसाळी वारे पश्चिम घाटातच अडले जाऊन सिंध अगर राजपुताना यास त्यांचा अंशही मिळू शकत नाही. त्या मार्गानें येणाऱ्या वाऱ्यामुळें पडणारा पाऊस सामान्यतः जूनमध्ये सुरू होऊन सप्टेंबरमध्ये संपतो. पावसाळी वाऱ्याचा दुसरा ओघ बंगालच्या उपसागरातून आसाम, ब्रह्मदेश, बंगाल ह्या प्रांतावरून थेट उत्तरेपर्यंत जाऊन पोहोंचतो व त्यामुळे गंगायमुना नद्यांच्या कांठच्या सर्व प्रदेशात भरपूर पाऊस पडतो. मद्रास इलाख्यास मात्र साधारणपणे वर्षाच्या शेवटल्या भागात येणाऱ्या ईशान्य वायूवर अवलंबून रहावें लागतें व तेथें पावसाचें मानही एकंदरीनें कमीच असतें. हिंदुस्थानाच्या उत्तरेकडील व पश्चिमेकडील भागांत ह्याच वाऱ्यामुळें पाऊस पडत असून त्या पाण्यावर शेतकऱ्यास दुसरें पीक काढणे शक्य होतें. ह्यावरून सबंध हिंदुस्थानाविषयीं बोलताना पावसाचें एकच निश्चित प्रमाण सांगता येणार नाही हे उघड आहे. सर्व देशाचें वार्षिक सरासरीचें मान ४० इंच आहे. सिंध प्रांतात जवळजवळ मुळीच पाऊस पडत नाही, तर आसाममध्यें चेरापुंजी येथें वर्षांत ६०० इंचांवर पाऊस पडतो. पावसाची विभागणी केवळ स्थल

मानानें असमान आहे असें नव्हे तर कालमानानेंही ती विषमच आहे. वर्षांतील बहुतेक महिने पाऊस मुळीच पडत नसून लागोपाठ दोनचार महिन्यांत सर्व वर्षाचा पाऊस एकदम पडून जातो. कित्येक वेळां तर नेहमीच्या पावसाळ्यांतही कांही विवक्षित दिवसांतच सर्व पाऊस पडून गेल्यानें पिकें बुडतात व शेतकऱ्यांस व एकंदर समाजास जबर नुकसान सोसावें लागतें. पावसाचें एकंदर परिमाण व त्याची स्थलकालानुसार विभागणी ह्यांचे देशांतील संपत्तीचें उत्पादन, विनिमय, विभागणी व उपभोग ह्यांवर फार दूरवर परिणाम होतात. ह्यास्तव पडेल त्या पावसाचें पाणी सांठवून ठेवून जरूर त्या जागीं व लागेल त्या वेळेस तें उपलब्ध होण्याकरितां धरणें व पाटबंधारे बांधणें आवश्यक असतें. पंजाब, मुंबई व मद्रास ह्या इलाख्यांत मोठमोठे तलाव व कालवे शेतीस पाणी पुरविण्याकरितां बांधलेले आहेत हे सर्वश्रुतच आहे. हिंदुस्थानांत सामान्यतः वर्षांतून दोन पिकें काढण्याची वहिवाट असून त्यांतील पावसाळ्यांत निघणाऱ्यास खरीप व थंडींत निघणाऱ्यास रबी असें म्हणतात. हवापाणी, जमीन, पाऊस, कालवे इत्यादि बाबतींत निरनिराळ्या भागांत बराच फरक असल्यानें शेतीची पद्धति व पेरण्याची पिकें हींही निरनिराळ्या प्रांतांत भिन्न आहेत. गव्हाच्या लागवडीस थंड हवेची जरूर असल्यानें तो देशाच्या वायव्य भागांतच विशेष होतो; उलट तांदुळाच्या म्हणजे भाताच्या लागवडीस उष्ण हवा व ओलसर जमीन हीं आवश्यक असल्यानें बंगाल व दक्षिणहिंदुस्थान हे भाग त्या धान्याचें आगर बनले आहेत. बाकीच्या धान्याची पिकें साधारणतः सर्व ठिकाणीं सारखींच होऊं शकतात. ताग, कापूस, नीळ, चहा, ऊंस ह्या व्यापारी व औद्योगिक महत्त्वाच्या पिकांस हवापाण्याच्या विशिष्ट प्रकाराची जरूर असल्यानें तीं सामान्यतः ठराविक प्रांतांतच आढळतात. बंगाल, बिहार व ओरिसा, मद्रास आणि ब्रह्मदेश ह्या प्रांतांत तांदुळाचेंच पीक प्रमुख आहे. गहू पंजाब व संयुक्त प्रांत ह्यांखेरीज मध्यप्रांत व मुंबई ह्या इलाख्यांतूनही उत्पन्न केला जातो. ज्वारी व बाजरी ह्यांची लागवड मुख्यतः मुंबई व मद्रास ह्या इलाख्यांतच होते. मद्रास, संयुक्त प्रांत व मध्यप्रांत ह्यामध्ये गळिताची धान्य होतात. संयुक्त प्रांतांत उंसाची लागवड सर्वांत मोठ्या प्रमाणावर असून तेथें साखरेचे कारखानेही बरेच आहेत. इतर प्रांतांत साधारण तेथील लोकांस लागणारा गूळ पुरवितां येईल इतका ऊंस उत्पन्न होतो. मुंबई, वऱ्हाड, मद्रास आणि पंजाब हे कपाशी उत्पन्न करणारे प्रांत असून तागाची लागवड फक्त बंगाल्यांतच केली जाते. निळीची लागवड मद्रास व बिहार ह्या दोन प्रांतांत होते व रंगास लागणारे इतर पदार्थ मुंबई इलाख्यांत आणि इतरत्रहि थोडे फार निर्माण होतात. चहाची लागवड आसाम व बंगाल ह्या प्रांतांत होते; कॉफी मात्र फक्त कूर्ग ह्या लहानशा भागांतच होऊं शकते. पुढे दिलेल्या कोष्टकावरून निरनिराळीं पिकें निरनिराळ्या भागांत कोणत्या प्रमाणांत उत्पन्न होतात हें स्पष्टपणें दिसेल.

**निरनिराळीं पिकें पेरलेल्या जमीनीचें क्षेत्रफळ** ( आकडे लक्ष एकरांचे आहेत. )

| इलाख्याचें नाव. | तंबाखू. | इतर मादक पदार्थ | चाऱ्याची पिकें. | फळें, मुळें व भाजीपाला | इतर कांही पिकें | | पेरणी झालेल्या जमीनीचें क्षेत्रफळ | एकाहून अधिक वेळां पेरलेली जमीन वजा | पेरणी झालेल्या जमीनीचें निव्वळ क्षेत्रफळ. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | खाण्याची | इतर | | | |
| बंगाल | २ ९ | ४ | १·० | ६ ७ | २ ८ | १ २ | २८१ ६ | ४४ ६ | २३७·० |
| मद्रास | २ ० | १ ५ | ३ ० | ६ ५ | ४ | १·६ | ३७५·६ | ४५ २ | २३०·४ |
| मुंबई } इलाखा | १·० | ·२ | १९·१ | ५ ६ | ०७ | ०५ | २७५ ९ | ७·३ | २६८·६ |
| मुंबई } सिंध | ·१ | ·०१ | १ २ | ५ | | ३ | ४३·९ | ३·३ | ४०·३ |
| संयुक्तप्रांत } आग्रा | ·७ | ·०१ | १०·८ | ३·१ | १ | ·०६ | ३२१ ९ | ५५ ९ | २६६ ० |
| संयुक्तप्रांत } औध | ·१ | | १·७ | १ २ | ०६ | | ११८·९ | २६·८ | ९२·५ |
| बिहार ओरिसा | १·१ | | ३ | ७ २ | ५ ८ | ३ ७ | ३१५·९ | ६२ ६ | २५३·८ |
| पंजाब | ·९ | ·६ | ४ १ | २ ६ | १ ३ | ·०२ | ३१०·२ | ५०·२ | २५९·६ |
| ब्रह्मदेश | ·८ | ०२ | २·१ | १५·२ | ०२ | ·८ | १६६·१ | ६ ० | १६०·१ |
| मध्यप्रांत | ·१ | | ४·३ | १ ० | ·०१ | | १८६·९ | २०·० | १६६·९ |
| वऱ्हाड | ·१ | . | .. | | .. | . | ६९·३ | ·३ | ६८·९ |
| आसाम | १ | | ·९ | ४ ६ | | १ ३ | ६२ २ | ५·२ | ५७ ० |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | | . | .. | ·३ | ·४ | ·०१ | २८·७ | ४·५ | २४·१ |
| अजमीर मारवाड | . | .. | १ | ५ | ०५ | ·०४ | ३·५ | ·५ | २·९ |
| दिल्ली | . | .. | . | ५ | .. | . | ३·२ | १·० | २·२ |
| कूर्ग | .. | .. | ... | . | . | ... | १·४ | ·०३ | १·४ |
| माणपूर परगणा | | .. | .. | . | . | ... | ·४७ | ·०३ | ०६ |
| एकंदर. | १० | २·६ | ८६·० | ५५·३ | १२·४ | ९·७ | २५६५·८ | ३३३·९ | २२,३१·९ |

**जंगलें**— जंगलाचें आर्थिक महत्त्व अनेक बाबतींत दिसून येतें. एक तर विवक्षित प्रदेशांत पडणाऱ्या पावसाचें मान अंशतः आजूबाजूस असणाऱ्या जंगलावर अवलंबून असल्यानें तेथील लोकांचे शेती व इतर धंदे ह्याच्या भरभराटीवरही अप्रत्यक्ष-पणें जंगलांचा बरावाईट परिणाम होतो. दुसरें असें कीं जंगलांत सापडणाऱ्या अनेक उपयुक्त वस्तू विकून अगर खंडानें देऊन मालकास उत्पन्न मिळवितां येतें. जंगलें सरकारच्या मालकीचीं असल्यास हें उत्पन्न सरकारच्या वसूलखातीं जमा होतें हें निराळें सांगावयास नको. शिवाय जंगलांत सापडणारें लाकूड, गवत, बांबू वगैरे पदार्थ कांहीं धंद्यांत कच्चा माल म्हणून वापरले जात असल्यानें ते धंदेही जंगलावर अवलं-बून असतात, हें उघड आहे. जंगलाभोंवतीं असणाऱ्या खेड्यापाड्यांतील लोकांचा जंगलांशीं स्थलाच्या व राहणीच्या दृष्टीनें निकट संबंध असतो. जनावरांस खाण्यास व घरावर छप्पर करण्यास गवत, आणि घर बांधणीस व जळणास लाकूड किंवा बांबू इत्यादि साधनें त्यास फुकट अगर स्वस्त मिळाल्यास त्याची गरीबी तेवढीच कमी तीव्र होते. पावसावर अवलंबून असलेला शेतीचा धंदा करणारे शेतकरी, जंगली मालावर धंदा करणारे कारखानदार, स्वतःचें उत्पन्न वाढवूं इच्छिणारें सरकार व थोडक्यांत गवत, लांकूड वगैरे जिन्नस मिळवूं पाहणारे खेड्यांतील लोक ह्या सर्वांच्या दृष्टीनें जंगलाची सुस्थिति व वाढ ही हितावह आहेत. परंतु अलीकडे अनेक कारखानदारीच्या धंद्यांत जंगलांतील कित्येक पदार्थ वापरण्याचा प्रघात वाढत्या प्रमाणावर पडत असल्यानें व कांहीं पदार्थ विशिष्ट भागांतच सापडत असल्यानें औद्योगिक व आर्थिक दृष्ट्या जंगलांस राष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालें आहे. फार प्राचीन काळीं हिंदुस्थानांत सर्वत्र घनदाट झाडी असून पौराणिक काळांत व त्यानंतरही महाराष्ट्रदेश बराच जंगलमय होता हें विश्रुत आहे. कित्येक प्रदेशांतील दाट झाडी नाहींशी होऊन तेथील जमीन उजाड पडल्याची किंवा तेथें लागवडीची शेतें निर्माण झाल्याचीं अनेक उदाहरणें अलीकडील अनु-भवावरूनही सापडतील. मनुष्यसमाजाची सुधारणा होत जाऊन स्थायिक राहणीस आवश्यक असे अनेक पदार्थ जंगलांतून आणण्याचा प्रघात अव्याहत चालू झाल्यानें प्रचंड जंगलाचाही नायनाट होण्यास विशेष काळ लागत नाहीं. अलीकडे तर कागद, रग, रबर इत्यादि महत्त्वाच्या धंद्यास लाखों एकर जंगलेंही परत नाहींशीं झालीं आहेत. ह्यास्तव सरकारला जंगलें राखून त्याच्यांतील लहानमोठ्या महत्त्वाच्या अनेक पदार्थांचें योग्य-रीत्या संवर्धन करावें लागतें. आशिया, आफ्रिका व अमेरिका ह्या खंडांतील राकटी भागांत जंगलें फारच भव्य व अफाट आहेत. परंतु सुधारलेल्या कोणत्याही राष्ट्राच्या मानानें हिंदुस्थान देशांतील जंगलें विस्तार व समृद्धि ह्या बाबतींत आजही विशेष कमी आहेत असें नाहीं. बांधकामाचें व जळाऊ लाकूड, गवत व बांबू ह्याखेरीज तंतू, तेल गाळण्याचे पदार्थ, गळिताचीं धान्यें, कातडीं कमाविण्यास लागणारीं साधनें, रंग, डिंक, राळ, रबर, वेत, औषधें व कांहीं मसाले ह्या वस्तूही येथील अरण्यांत विपुल सापडतात. हिंदुस्थान

सरकारचें लक्ष गेल्या साठ वर्षांत जंगलांच्या औद्योगिक महत्त्वाकडे लागत असून महायुद्धापासून तर त्याचें महत्त्व विशेष वाढलें आहे. घरें, आगगाड्या, आगबोटी, जहाजें वगैरे बांधण्यास लागणारें निरनिराळ्या प्रकारचें लाकूड, कागदाच्या धंद्यांत लागणारा लाकडाचा किंवा बांबूचा गधा, आगकाड्यास लागणारें लाकूड, टर्पेंटाईन ह्या सर्व पदार्थांचें अर्वाचीन उत्पादन पद्धतीच्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. ह्या शिवाय आज माहित नसलेले कोणकोणते जिन्नस इकडील अरण्यांत सांपडतात व माहित असलेल्यांचे एकंदर गुणधर्म कोणते, ह्याबद्दल शोध करणेंही आवश्यक आहे. डेहराडून येथें हिंदुस्थानसरकारनें जंगलासंबंधीं शास्त्रीय शोधार्थ एक संस्था स्थापिली असून निरनिराळ्या प्रांतांतील जंगलखात्यांतही तज्ज्ञ गृहस्थांची शास्त्रीय शोधार्थ नेमणूक झालेली आहे. हिंदुस्थानांतील जंगलाचा विस्तार, त्यांत उपलब्ध असलेले सर्व पदार्थ व औद्योगिक महत्त्वाचे त्यांतील सर्व गुणधर्म हे करून देखील भांडवल, उत्साह अगर वहातुकीची साधनें ह्यांच्या अभावीं ही संपत्ति तशीच पडून रहावयाची भीति आहे.

हिंदुस्थानांतील जंगलाचा बराच भाग खाजगी व्यक्तींच्या ताब्यांत आहे. सरकारी जंगलांचे राखीव, संरक्षित व संकीर्ण असे तीन भाग केलेले असतात. राखीव जंगलें, त्यांच्यांतील औद्योगिक महत्त्वाच्या पदार्थांची विक्री करण्याकरितां किंवा जंगल काटलें जाऊन पाऊस कमी होऊं नये म्हणून सरकार खाजगी मालकीहक्कानें वापरतें. संरक्षित जंगल कधींकधीं लवकरच राखीव करण्यांत येतें, परंतु सामान्यत: तें तसेंच ठेवल्यास त्यांतील सोयींचा उपयोग करण्यास खाजगी व्यक्तींस कमी प्रतिबंध असतो. संकीर्ण जंगलें मात्र जवळ जवळ लोकांस पूर्णपणें मोकळीं असतात. हिंदुस्थानांत अडीच लाख चौरस मैल प्रदेश सरकारी जंगलांनीं व्यापिला आहे. ह्या क्षेत्रफळाची राखीव, संरक्षित व संकीर्ण ह्या वर्गांत विभागणी व निरनिराळ्या प्रांतांत ह्यापैकीं प्रत्येक प्रकारच्या व एकंदर जंगलाचें असलेलें प्रमाण हीं खालील कोष्टकावरून स्पष्ट होतील.

## जंगली प्रदेशाचें क्षेत्रफळ. ( चौरस मैल )

| इलाखा | एकंदर क्षेत्रफळ ( चौरस मैल. ) | गाबीत. | संरक्षित. | वर्गवारी न केलेले | जंगली प्रदेशाचे एकंदर प्रदेशाशीं प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| बंगाल | ७८,८३५ | ४८८८ | १७११ | ४०३० | १०.५ |
| मद्रास | १४२,२१८ | १८,७१२ | . . | ६८२ | १.३६ |
| मुंबई | १२३,१६४ | १२,१०० | ४९७ | | १०.२ |
| संयुक्तप्रांत | १०६,७२५ | ६,३११ | ११०१ | ६१ | ७ |
| बिहार व ओरिसा | ८२,४८४ | १,७४७ | १०८९ | .. | ३.४ |
| पंजाब | ९६,६५० | २,८०९ | ४१३९ | ७३७ | ७.३ |
| ब्रह्मदेश | २२६,९११ | २९,३३६ | ... ... | १,१६,८२९ | ६३.४ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ९९,४६८ | १९,६४५ | . | .. | १९.७ |
| आसाम | ४८,९५४ | ५,४९५ | . ... | १६,३०९ | ४०.५ |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | १३,१८४ | २३६ | .. . | .. | १.८ |
| अजमीर | २,७६७ | १४२ | .. .. | | ५.१ |
| बलुचीस्थान | ५४,२२८ | ३१३ | . | ४७२ | १.४ |
| कूर्ग | १५८२ | ५२० | . . | .. | ३२.९ |
| अंदमान | ३१४३ | ८० | . | २१२२ | ७०.२ |
| एकंदर. | १०८०,७९४ | १०१,६३९ | ८,५५७ | १,४१,२७२ | २३.३ |

कांहीं वर्षांपूर्वीपर्यंत आपल्या इकडे घरबांधणीस लागणारें व जळाऊ लांकूड, गुरांचा चारा व छपरांच्या उपयोगी पडणारें सामान ही पुरविणें एवढेंच जंगलांचें आर्थिक महत्त्व असे. परंतु अलीकडे अनेक धंद्यांत जंगलातील पदार्थ लागतात, असें वर सांगितलेंच आहे. वनस्पतींचा औषधांकरितां उपयोग करण्याचा प्रघात आपल्या देशांत पूर्वीपासूनच आहे. अर्वाचीन वैद्यकशास्त्रांतही अन्यमार्गानें वनस्पतींचा उपयोग केला जातोच. कित्येक झाडांच्या साली व हिरडे हे पदार्थ कातडी कमाविण्याच्या कारखान्यांत वापरतात. चंदन, राळ व लाख ह्या वस्तूंचा अनेक स्वरूपांत पुरवठा करण्याचे धंदे हेही जंगलाचा विस्तार व त्याच्यांतील झाडांची विविधता ह्यांवर अवलंबून आहेत हें सांगावयास नको. यूरोप व अमेरिका ह्या देशांत लाखेचा बराच उपयोग केला जात असून ज्या किड्यापासून तो पदार्थ मिळतो ते किडे हिंदी जंगलांतच प्रामुख्यानें आढळतात. छोटानागपूर, मध्यहिंदुस्थान, मध्यप्रांत, सिंध व ब्रह्मदेश ह्या भागांत लाखेची उत्पत्ति विशेष आहे. साहेब लोकांच्या टोप्या, ग्रामोफोनच्या प्लेटी, वार्निश, पॉलिश, लाकडावर रंग चढविणें, खेळणीं, साधी लाख, रेशमास द्यावयाचा रंग ह्या सर्व धंद्यांत लाखेचाच मुख्यतः उपयोग केलेला असतो. महायुद्धांत अनेक प्रकारचा माल हिंदुस्थानांतून पुरविणें आवश्यक झाल्यानें इकडील जंगलाची पाहणी विशेष काळजीपूर्वक झाली, व अनेक नवे धंदे स्थापिले गेले. अलीकडे कागद तयार करण्याचे कारखाने हिंदुस्थानांत वाढत्या प्रमाणावर निघत असून ब्रह्मदेश, बंगाल, मद्रास, ओरीसा ह्या प्रांतांतील जंगलांत सांपडणाऱ्या बांबूचा व सबई, बाभर ह्या गवतांचा रांधा करण्यास उपयोग होत आहे. हा एक धंदा येथें स्थापिला गेला, तरी लाखों रुपयांच्या परदेशी मालाची आयात थांबेल.

**५. खनिज पदार्थ**—अर्वाचीन औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें सामान्यतः खनिज पदार्थांस व त्यांतल्या त्यांत कोळसा, लोखंड व रॉकेल ह्यांस विशेष महत्त्व दिले पाहिजे. राष्ट्रीय महत्त्वाचे मोठमोठे धंदे व सामान्य माणसाचें जीवन ह्यांमध्यें वरील पदार्थांचा विशेष उपयोग होत असल्यानें खनिज पदार्थांच्या पुरवठ्याविषयीं मुत्सद्दी व लष्करी तज्ज्ञ ह्यांसही काळजीपूर्वक विचार करावा लागतो. दगडी कोळसा अगर रॉकेल ह्यांचा ज्या वेळेस विशेष उपयोग होत नसे व तांबें आणि लोखंड ह्याच धातू मुख्यतः व त्याही थोड्या प्रमाणांतच वापरल्या जात त्यावेळेस हिंदुस्थानास परदेशांतून धातूंची आयात करावी लागत नसे. उलट, परदेशास पाठविलेल्या अनेक प्रकारच्या मालाबद्दल सोनें-चांदी मात्र इकडे आणली जाई. परंतु अर्वाचीन काळीं यंत्रें व इतर अनेक प्रकारचे जिन्नस तयार करण्यास लोखंड, कोळसा, राकेल वगैरे खनिज पदार्थांचा फार मोठ्या प्रमाणांत पुरवठा करावा लागूं लागल्यापासून जुन्या हिंदी खाणीच्या धंद्यांस उतरती कळा लागलेली आहे. शास्त्रीय मार्गांचें अवलंबन, सुधारलेल्या यंत्रसामुग्रीचा उपयोग व धंद्याची किफायतशीर संघटना ह्यांच्या अभावीं कोळसा व लोखंड ह्यांचा धंदा चालत नाहींसा झाला आहे. आजकाल एकंदर जगांत कोळसा व लोखंड ह्यांचें उत्पादन

कल्पनातीत प्रमाणावर होत असल्यानें व त्यांच्या उत्पादनाबद्दल जगांतील सर्व देशांत तीव्र स्पर्धा असल्यानें भांडवल, पोटधंदे चालविण्याची शक्यता, कार्यक्षम यंत्रें, स्वस्ताईचा कच्चा माल, मोठा व जवळचा बाजार इत्यादि बाबतींत अनुकूल परिस्थिति असल्या शिवाय असला धंदा टिकण्याची आशा नसते. हिंदी खाणी एके काळीं प्रसिद्धीस आलेल्या असल्या तरी, त्या लहान व उत्पादक पद्धतींत मागासलेल्या असल्यानें त्यांस सध्यांच्या परिस्थितींत इतर देशांतील धंदेवाल्यांशीं टक्कर देता येणें अशक्यप्राय झालें आहे.

अर्वाचीन उद्योगधंद्यांस लागणारे खाणींतील पदार्थ हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणांत सांपडण्याचा संभव नाहीं असेंच सर्वांस, विशेषतः हिंदुस्थान सरकारास, पंचवीस एक वर्षांपूर्वी वाटत असे. परंतु काहीं आकस्मिक व कांहीं विशिष्ट कारणांनीं हा समज दूर झालेला असून आतां सर्व देशाची भूगर्भशास्त्राच्या दृष्टीनें मोजणी व पाहणीही झाली आहे. कोळसा, मॅंगनीज, लोखंड, रॉकेल, सोनें व चुन्याचा दगड ह्या वस्तूंच्या खाणीचे धंदे लहान मोठ्या प्रमाणांत अस्तित्वातही आले आहेत. दुकानदारांतील चढाओढीमुळें वस्तूंच्या किंमती सामान्यतः उत्पादनमूल्याच्या बरोबर असतात असें मागें सांगितलें आहे.[1] प्रत्येक उत्पादक आपला माल तयार करण्यापूर्वी विक्रीची किंमत व उत्पादनाचा खर्च ह्यांचा मेळ बसविण्याचा प्रयत्न करीत असतो तो ह्याच कारणामुळे होय. वस्तूंचें उत्पादन किंवा उत्पादनाची पद्धत ही विवक्षित बाजारभावाच्या मानानें जरी तोट्याची ठरली तरी किंमतींत काही कारणानें वाढ झाल्यास ती किफायतशीर ठरूं लागतात. ह्या सामान्य तत्वाचें एक विशिष्ट उदाहरण खाणीच्या धंद्यांत पाहावयास सांपडतें. एखाद्या विवक्षित ठिकाणी अमुक एका द्रव्याची खाण आहे असें एकदां आढळून आलें म्हणजे तेथें ती उकरून काढण्यास व तिच्यांतील माल तेथून विक्रीच्या ठिकाणी नेण्यास किती खर्च येईल ह्याचा सहज अजमास करतां येतो. मग निरनिराळ्या देशांतील पुरवठा व मागणी ह्यांच्या परस्पर प्रतिक्रियेनें जो बाजारभाव ठरतो किंवा ठरण्याची अपेक्षा असते त्याच्याहून वरील उत्पादनाचा खर्च अधिक नसेल, तरच ती खाण हाती घेणें फायदेशीर होतें. हिंदुस्थानांतील अनेक खनिज द्रव्यांच्या खाणीवाल्यांस हा अनुभव आला आहे. विशेषतः हिंदुस्थानाचा विस्तार फार मोठा असल्यानें व परदेशी माल बंदरांच्या जवळ स्वस्त मिळत असल्यानें बाजारभाव व उत्पादन ह्यांचा हिंदी खाणींच्या धंद्यांत फार निकट संबंध येतो. देशाच्या ईशान्य भागांत कोळसा व लोखंड ह्यांच्या खाणी एकमेकांशेजारी व ताग आणि कित्येक प्रकारचीं गवतें ह्याच्याजवळ वसलेल्या आहेत, ही एक विशेष अनुकूल गोष्ट होय. परंतु पश्चिम व दक्षिण ह्या दिशांकडील भागांतील कापूस आणि उत्तरेकडील व इतर भागांतलि कच्चा माल ह्यांपासून खाणींचा प्रदेश बराच लांब आहे, हा तेथील उद्योगधंद्यांच्या भरभराटीस मोठाच अडथळा आहे. गेल्या सुमारें तीस वर्षांत निरनिराळ्या प्रमुख खनिज द्रव्यांची हिंदुस्थानात किती उत्पत्ति झाली व त्या मालास किती किंमत आली, हें पुढील कोष्टकावरून दिसेल:—

[1] पानें २१–२३; व ५१–५३ पहा.

## खनिज द्रव्यांचें हिंदुस्थानांतील उत्पादन

| द्रव्याचें नांव. | | १८९५-१८९६ | १९०५-१९०६ | १९१४-१९१५ | १९२५ एक पौंड = १३·३ रुपये. | |
|---|---|---|---|---|---|---|
| मीठ | टन | ११, ६३,३८१ | १२ ११,१३७ | १३, ४८,२२५ | १२, १५,१४४ | |
| | रुपये | ६१, ५८,१८९ | ६६, २०,८८९ | ७२, ६४,३५० | ५७४,६२७ | पौंड |
| कोळसा | टन | ३५, ४०,०११ | ८४, १७,७३१ | १६४, ६४,२६३ | २०९, ६४,३७२ | |
| | रुपये | १२९, ३३,३०३ | २१२. ११,६४१ | ५८६, १०,६१५ | १,५०३,८८८ | पौंड |
| सोनें | औंस | २, ५८,१५८ | ६३०,८१६ | ६०७,३८८ | ३९३,८७५ | |
| | रुपये | १७२, ३२,८७६ | ३६२, ३४ ५७२ | ३५०, ७५,३३० | १६, ७३,५०१ | पौंड |
| पेट्रोल | गॅलन | १३,००३,७४८ | १४४,७९८,४४४ | २७, १३, ४२,७१० | २८,९५,००,००० | |
| | रुपये | १५ ३१,२३१ | १०, ६३,०५१ | १४३. ७८,४७० | ७७४०७३७ | पौंड |
| क्रोमाइट | टन | | २७०८ | ५८८८ | ३७,४५२ | |
| | रुपये | . | ५२२३० | ३० १६० | ४०,१७१ | पौंड |
| लोखंड | टन | ४६.६५३ | १०२.५२१ | ४. ४१.६७४ | १५, ४४,७७८ | |
| | रुपये | २७७.८८६ | २०७.३९१ | ६, १० ००१ | ३३६,७७५ | पौंड |
| मॅग्नेसाईट | टन | ... | २०६३ | १.६८० | २१.६२० | |
| | रुपये | . | ८२५२ | ३.४५३ | ३१,१७९ | पौंड |
| मॅंगनीज अशुद्ध | टन | १५,८१६ | २५३.८९६ | ६८२.८९८ | ८३९,४६१ | |
| | रुपये | १०७ ६३६ | ३२. ७१.५६५ | १३१ ५८,९६५ | २६११.२२० | पौंड |
| मायका | हंड्रेडवेट | १०.२३१ | ३१ ५५४ | ४०,५०६ | ४५,९९० | |
| | रुपये | १०, ७२,२१३ | २३. ९४ ४१३ | १३. २१ ३५१ | ८५३.८५१ | पौंड |
| सॉल्टपीटर | हंड्रेडवेट | ४२१,७८४ | ३३६,४६४ | ३१६.२११ | २०२,१८९ * | |
| | रुपये | ५३. ५९,५३४ | ३८. ५३.३४० | ४२, ०१.४७६ | ३३६५.३६३ * | |
| जस्त | हंड्रेडवेट | ४४० | १ ५२७ | ५,३९५ | ३७,४९४ * | |
| | रुपये | २३,४६४ | १४८.५७० | ३२९,२७६ | २३,०१.०४१ * | |
| चांदी | औंस | . | ... | २३६,४४६ | ४१, ४४ ३०४* | |
| | रुपये | ... | ... | ४०३,४४० | १०१ २८.७०४* | |

* हे आंकडे १९२२–२३ सालाचे आहेत.

खानिज पदार्थांत कोळसा, लोखंड व रॉकेल ह्यांचें महत्त्व विशेष असल्यानें त्यांच्या पैदाशीबद्दल थोडी तपशीलवार माहिती असणें इष्ट आहे. हिंदुस्थानांत दरवर्षी काढल्या जाणाऱ्या कोळशापैकी शेंकडा नव्वद एवढा भाग बंगाल, आणि बिहार व ओरिसा ह्या प्रांतांत सापडतो. हैद्राबाद संस्थान व मध्यप्रांत ह्यांत एकंदर पैदाशीपैकी शेंकडा पांच इतका कोळसा निघतो. कलकत्त्याच्या वायव्येस सुमारें दीडशें मैलांवर राणीगंज, झेरिया आणि बोकारो हीं ठिकाणें असून तेथील खाणी सर्वांत प्रसिद्ध आहेत व त्यांच्यातून निघणारा कोळसाही उत्तम प्रतीचा असतो. लोखंडाच्या धंद्यास विशेष उत्तम दर्जाचा कोळसा लागतो, त्यास ' कोकिंग कोल ' असें म्हणतात. ह्या कोळशाचा हिंदुस्थानांतील एकंदर सांठा शंभर ते दोनशेंचाळीस कोटी टन असावा आणि एकंदर कोळशाचा पुरवठा ५४० कोटी टन असावा असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. ओरीसा प्रांतांतील सिंहभूम, बोनाई, किओंझार व मयूरभंज ह्या संस्थानांत पहिल्या प्रतीच्या लोखंडाच्या खाणी सांपडल्या असून त्या कोळशाच्या खाणींच्या जवळच आहेत. मध्यप्रांत व म्हैसूर ह्या प्रांतांतही लोखंडाच्या कांहीं खाणी आहेत. पेट्रोलियम किंवा निरनिराळ्या स्वरूपांत सांपडणारें खनिज तेल मुख्यतः आसाम, ब्रह्मदेश, व आराकान जिल्ह्यांतील जीकच्या खडकांत सांपडतें; तसेंच पंजाब व बलुचीस्थान ह्या भागांतही रॉकेल तेलाच्या कांहीं खाणी आहेत. ब्रह्मदेशांतील खाणींतच एकंदर पुरवठ्यापैकीं शेंकडा ९५ इतकें तेल सांपडतें. हिंदुस्थानांत सोन्याच्या खाणी फक्त म्हैसूर संस्थानांत कोलार येथें आहेत. मद्रास इलाख्यांतील अनंतपूर येथून थोडासा पुरवठा होत असून निजामाच्या राज्यांतील हट्टी येथील खाणी आतां बंदच झाल्या आहेत. पहिल्याप्रथम विझगापट्टम जिल्ह्यांत व आतां मुख्यत्वेंकरून मध्यप्रांतांत मँगॅनीजच्या खाणी सांपडल्या असून तेथील पुरवठा भरपूर व उत्तम प्रतीचा आहे. लढाईचीं अनेक शस्त्रास्त्रें व इतर कठीण यंत्रें व हत्यारें तयार करण्यास लागणारे वूलफ्रम व टंग्स्टन हे पदार्थही आपल्या इकडे निघूं लागले आहेत. हिंदुस्थानांतील क्षारमय दगडाच्या खाणींतून लहान मोठे तुकडे उकरून काढून आणि खारीं सरोवरें, व समुद्र ह्यांच्यांतील पाण्याची सूर्याच्या किरणांनीं वाफ करून मिठाची उत्पत्ति केली जाते. तरी देशांत होणाऱ्या मिठाच्या खपापैकीं शेंकडा ४० एवढा भाग परदेशाहून आणला जातोच. सिमेंट तयार करण्यास लागणारे मुख्य पदार्थ चुनखडी व शाडू हे बहुतेक सर्व प्रांतांत सांपडत असल्यानें कोळसा मिळण्याची सोय व बाजाराचें सान्निध्य ह्यांच्या मानानें सिमेंटचे अनेक कारखाने निरनिराळ्या ठिकाणीं निघाले आहेत.

**६ यांत्रिक शक्तिः**—अर्वाचीन पद्धतीनें मोठ्या प्रमाणावर उत्पादन करावयाचें झाल्यास मोठमोठीं यंत्रें ठराविक वेगानें चालविण्याइतकी जोरदार व विश्वसनीय प्रेरक-शक्ति आवश्यक असते.[१] वाफेचीं यंत्रें चालविण्यास लागणारा कोळसा, व गॅस उत्पन्न

१ पान ३० पहा.

करण्यास लागणारें तेल ह्यांच्या पुरवठ्यास अगदीं श्रेष्ठ प्रतीचें औद्योगिक महत्त्व प्राप्त झालें आहे हें ह्याच कारणामुळें होय. जेथें वाफ अगर गॅस ह्यांच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करता येत नाही तेथें उंच ठिकाणीं पाण्याचा सांठा करून त्याच्या प्रवाहाच्या जोरावर यंत्रें चालवून त्यांतून वीज उत्पन्न करणें सोपें असतें. ह्या रीतीनें दऱ्याखो-ऱ्यांत वीज उत्पन्न करून ती शेंकडो मैल दूर असलेल्या कारखान्यांस, घरांस व आग-गाड्यांस पोहोंचवितां येते. कोळसा व तेल ह्यांचा पुरवठा मर्यादित होत असल्यानें अमेरिका, स्वित्सरलंड व नॉर्वे ह्या देशांत अलीकडे जलौघशक्तीचा वाढत्या प्रमाणावर उपयोग होत आहे.

कोळसा व तेल ह्यांचा पुरवठा हिंदुस्थानांत किती विपुल आहे हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. जलप्रवाहाच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करण्यास हिंदुस्थानांत विशेष सोयी आहेत हें सुदैव होय. ज्या प्रांतांतील उंच व डोंगराळ प्रदेशांत पुष्कळ पाऊस पडतो तेथें तो धरणानें अडवून उतारावर त्या पाण्याचा ओघ नियमितपणें सोडून दिला तर त्याच्या जोरावर पायथ्याशीं असलेलीं वीज उत्पन्न करणारीं यंत्रें चालतात. म्हैसूर संस्थानांत कावेरी नदीस बांधलेलीं धरणें व मुंबईइलाख्यांतील लोणावळें, आंध्रा खोरें व मुळशी येथील धरणें ह्याच कार्याकरितां बांधलेलीं आहेत. मुंबईतील कित्येक गिरण्या, कारखाने, ट्रॅमगाड्या व आगगाड्या ह्या त्या धरणांतील पाण्याच्या प्रवाहापासून उत्पन्न केलेल्या विजेच्या शक्तीवर चालतात. ह्या योजनास मूळ खर्च मनस्वी येतो हें खरें; तरी शेवटीं प्रेरक शक्ति, वाफ व गॅस ह्यांच्या मानानें स्वस्त पडून धूर व जळमटें ह्यांनीं होणारें आरोग्याचें व यंत्रसामुग्रीचें नुकसान टळतें. मुंबई इलाख्यांत कोळशाच्या खाणी नसल्यामुळें व कारखाने चालविण्यास प्रेरक शक्ति आवश्यक असल्यामुळें जलौघशक्ती उत्पन्न करण्यास टाटाबंधूंस प्रेरणा झाली ह्यांत शंका नाहीं. हिंदुस्थान सरकारानें सर्व देशाची पाहणी करून असलीं धरणें बांधण्यास कोणत्या जागा सोयीच्या आहेत हें नमूद करून ठेविलें आहे. परराष्ट्रीय कारखा-नदारांशीं हिंदी उत्पादकांस तीव्र स्पर्धा करावी लागते हें सर्वांस माहीत आहे. कमी खर्चानें वीज उत्पन्न करणारी जलशक्ति हिंदुस्थानास लाभली तर देशाच्या आर्थिक प्रगतीस उत्तेजन येईल हे उघड आहे. मात्र प्रत्येक योजना व्यवहारांत आणतांना इतर धंद्यांस अगर कायदेशीर हितसंबंधांस धक्का न पोहोंचेल अशी शक्य तितकी काळजी बाळगणें आवश्यक आहे. पाण्याचा, म्हणजे जलवाहिनी नद्यांचा, वहातुकीचें मार्ग व साधन ह्या नात्यानें उपयोग करणें हेंही सामान्यतः आर्थिकदृष्ट्या फायद्याचें असतें. उत्तर हिंदुस्थानांतील अनेक नद्या त्यांच्या मुखापासून कित्येक मैलवर जहाजें जाण्याइतक्या रुंद व खोल आहेत. दक्षिणेंतील नद्या मात्र पावसाळ्यांत खोल व रुंद असून इतर वेळेस अगदींच उथळ असतात. तरी कालव्यांच्या साहाय्यानें व नद्यांच्या सुधारणेनें जलमार्गांस कितपत उत्तेजन देतां येईल ह्या सर्व प्रश्नांचा पद्धतशीर

रातीनें अजून विचार झालेला नाहीं. वहातुकीचा खर्च आगगाड्यांपेक्षां आगबोटीस नेहमीं कमी येतो हें ध्यानांत ठेवल्यास वरील प्रकारची चौकशी लवकर होणें हितावह आहे हें कोणीही कबूल करील. त्याचप्रमाणें, हिंदुस्थानाचा समुद्रकिनारा लांबवर पसरलला असून अनेक ठिकाणीं लहान मोठीं बंदरें बांधण्यास सोयीचा आहे. अशा बंदरांची सुधारणा झाल्यास अंतर्गत व्यापार व दळणवळण वाढून लोकही कुशल व धाडसी ' दर्यावर्दी ' होण्यास मदत होईल.

**७ जमीन**—हिंदुस्थानाच्या आर्थिक घटनेंत शेतीच्या धंद्यास विशेष महत्व असल्यान लोकांमध्यें त्या धंद्याबद्दल व शेतजमिनीबद्दल विशेष प्रेमभाव वसत आहे ह्यांत आश्चर्य नाहीं. जमनिीचे मालक अगर वहिवाटदार ह्यांस आर्थिक दृष्ट्या विशिष्ट स्वरूपाचें स्वातंत्र्य प्राप्त होत असून वाढत्या मागणीमुळें त्यांचें उत्पन्नही सामान्यतः वाढत्या प्रमाणावर असतें. एकंदर लोकसंख्येपैकी जवळ जवळ शेंकडा बहात्तर लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर होत असून इतर धंदे बुडत चालल्यानें हें प्रमाण वाढू पहात आहे. शेतींत गुंतलेल्या लोकास माणशीं पुरा एक एकर जमीनही वांट्यास येत नाही व एकंदरीनें जमीनींतील उत्पादक शक्तीवर बराच ताण पडत आहे. शेतीचा धंदा प्रस्थापित झाल्यास हजारों वर्षें झाली असल्यानें व ब्रिटिशांच्या शांततामय अमदानीसही शें दीडशें वर्ष होऊन गेल्यानें बहुतेक लागवडीस लायक असलेल्या जमीनींचा उत्पादनास उपयोग केला गेला आहे. खालीं सन १९२१-२२ सालचे आकडे देऊन एकंदर क्षेत्रफळाचा शेतीच्या धंद्याच्या दृष्टीनें वर्गीकरण केलेलें आहे तें आजही जवळजवळ बिनचूक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## हिंदुस्थानाच्या एकंदर क्षेत्रफळाची वर्गवारी

| | एकर. |
|---|---|
| मोजणी खात्यानें अजमाविलेलें एकंदर क्षेत्रफळ | ६६६, ६१९, ००० |
| जंगल | ८८, ४१९, ००० |
| शेतीस उपलब्ध नसलेली जमीन | १५३, १७८, ००० |
| शेतीस योग्य अशी ओसाड जमीन | १५१, १७३, ००० |
| पेरणी न केलेली शेत जमीन | ५०, ५६४, ००० |
| कापणी झालेल्या पिकाखालील निव्वळ जमीन | २२३, १८४, ००० |
| कालवे, पाट इत्यादिकांचें पाणी मिळणारी जमीन | ४७, ७९०, ००० |

पीक निघणाऱ्या जमीनींचें एकंदर क्षेत्रफळाशीं प्रमाण व १०० एकर शेतजमीनींचें लोकसंख्येशीं असलेलें प्रमाण हीं खालील कोष्टकांत दिलीं आहेत.

| प्रांताचें नांव. | पेरणी केलेल्या जमीनीचें एकंदर क्षेत्रफळाशी प्रमाण. | शंभर एकर पिकविलेल्या जमीनीचें लोकसंख्येशी प्रमाण. |
|---|---|---|
| मुंबई | शेंकडा. ५५ | ७७ |
| दिल्ली | ,, ६० | २२२ |
| बिहार व ओरीसा | ,, ४८ | १३४ |
| संयुक्त प्रांत | ,, ५२ | १२७ |
| बंगाल | ,, ४७ | १३८ |
| पंजाब | ,, ४२ | ८० |
| मद्रास | ,, ३८ | १२५ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ,, ३७ | ५९ |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | ,, २९ | ९७ |
| माणपूर परगणा | ,, २३ | ७१ |
| अजमीर मारवाड | ,, १७ | १६७ |
| आसाम | ,, १८ | १३१ |
| कूर्ग | ,, १४ | १२५ |
| सिंध | ,, १३ | ८१ |
| ब्रह्मदेश | ,, १० | ८३ |

त्याच जमिनीतून एकाहून अधिक वेळ पीक काढल्यास तितक्या पटीनें जमिनीचें क्षेत्रफळ वाढलें असें मानलें तर इ. स. १९२१-२२ सालीं एकंदर २५६, ५८२, ००० एकर जमीनींत पीक निघालें, असें दिसेल. ह्या क्षेत्रफळाचें निरनिराळ्या पिकांवरून केलेलें वर्गीकरण खालीं दिलें आहे.

| पिकाचें नांव. | एकर. | एकंदर क्षेत्रफळाशीं शेंकडेवारी. |
|---|---|---|
| खाण्याचीं धान्यें | २०४, ७९१, ००० | ८० . ०० |
| मसाल्याचे पदार्थ | १, ४१२, ००० | ० . ५ |
| ऊंस | २, ५२२, ००० | १ . ० |
| फळें व भाजी | ५, ५३८, ००० | २ . १ |
| इतर खाण्याचीं पिकें | १, २४५, ००० | ० . ५ |
| सर्व खाण्याचीं पिकें | २१५, ५०८, ००० | ८४ . १ |
| गळिताचीं धान्यें | १४, १९७, ००० | ५ . ५ |
| धान्याचीं पिकें | १३, ८५४, ००० | ५ . ४ |
| औषधें | ८५४, ००० | ० . ३ |
| रंगाचे व अंमली पदार्थ | २, २४७, ००० | ० . ९ |
| चाऱ्याचीं पिकें | ८, ६०८, ००० | ३ . ४ |
| इतर पिकें | १, ११३, ००० | ० . ४ |
| खाण्याच्या पिकांखेरजि इतर सर्व पिकें | ४०, ७३१, ००० | १५ . ९. |

वरील आकडे कागदावर मोठे दिसले तरी मोठ्या व वाढत्या लोकसंख्येच्या मानानें येथील शेतजमीनीचें क्षेत्रफळ एकंदर कमीच आहे व तिच्यांतून निघणारे धान्य व इतर पदार्थ हे देशाच्या त्या त्या बाबतीतील गरजा भागविण्यास सामान्यतः अपुरे आहेत असें म्हटलें पाहिजे. लागवडीस योग्य अशी ओसाड जमीन ब्रिटिश हिंदुस्थानांत व संस्थानी मुलुखांत थोडीबहुत शिल्लक आहे हें खरें. परंतु ती सर्व जमेस धरूनही वाढत्या लोकसंख्येकडे पाहिलें म्हणजे शेतजमीनीचा पुरवठा अपुरा आहे हेंच मत कायम होतें. 'परदेशास पाठविले जाणाऱ्या धान्यास व इतर शेतीच्या उत्पन्नास लागणाऱ्या जमीनीचें क्षेत्रफळ वजा केलें तर राहिलेली जमीन माणशीं ⅔ एकर इतकीही पडत नाही. दोन-तृतीयांश एकर जमीनींत जें काय उगवेल त्यांतून एका हिंदी इसमास अन्नवस्त्र मिळावयाचें. दुसऱ्या कोणत्याही देशांतील जमीनीवर एवढा ताण पडत असेल असें संभवत नाहीं.' हें एका इंग्रज ग्रंथकाराचें मत इकडील सामान्य लोकमताला धरूनच आहे. शेतजमीनीचा विस्तार वाढविण्याची शक्यता विशेषशी नसल्यानें तेवढ्याच

जमीनींत सुधारलेल्या मार्गांनी, खतें व शक्य तेथें यंत्रें वापरून, उत्पन्न वाढविणें हाच सुधारणेचा मुख्य मार्ग आहे. इतर धंदे पाश्चात्य प्रतिस्पर्ध्यांशी टक्कर देण्यास असमर्थ होऊन डबघाईस येत असल्यानें त्याच्यांत गुंतलेले लोकही सर्वस्वी अगर अंशतः जमीनीवरच अवलंबून रहात आहेत. 'हिंदुस्थानांतील शेतीचें उत्पन्न स्वदेशी व परदेशी मागणी वाढत असल्यानें चढीचें आहे व म्हणून इतर धंदे किफायतशीर असूनही, शेतीचा धंदा जास्त किफायतशीर ठरतो, एवढ्याकरिता त्या धंद्यात अधिक लोक पडत आहेत,' असें कित्येक ग्रंथकाराचें मत आहे, परंतु तें बरोबर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. इतर लहान सहान धंद्यांत लोकांची उपजीविका होणें दुरापास्त झाल्यानें ते शेतीकडे वळतात, असाच सार्वत्रिक अनुभव आहे. कारागीर व धंदेवाले अंशतः शेतीवर अवलंबून आहेत व शेतकरी अंशतः मोलमजूरी अगर इतर बिनशेतकी धंदा करून येन केन प्रकारेण वर्षभर गुजारा करण्याचा प्रयत्न करीत आहेत ह्यावरून, शेतकीचा धंदा विशेष किफायतशीर असल्यानें आपापले इतर धंदे सोडून लोक त्यांत पडतात हें अनुमान चुकीचें ठरतें.

गहूं, कापूस, गळिताची धान्यें इत्यादि जमीनीच्या उत्पन्नास हिंदुस्थानांतील लोकांची व परदेशाची मागणी तीव्र असल्यानें त्या पदार्थांस सामान्यतः चांगले भाव येतात व ज्या प्रांतांत त्यांची लागवड मोठ्या प्रमाणावर केली जाते तेथील लोकांचा त्यांपासून फायदाही झालेला दिसतो. परंतु किमतींत वाढ झाल्यानें खपामध्यें तूट येण्याचा संभव असून जोपर्यंत उत्पादनाचें मूल्य कमी होत नाहीं तोपर्यंत परदेशांतील अगर स्वदेशांतील मागणीपासून पूर्ण फायदा करून घेणें शक्य नसतें. शिवाय, हिंदी शेतकरी हा पाश्चात्य देशांतील व्यापारी शेतकऱ्यासारखा नसतो हेंही ध्यानात ठेवलें पाहिजे. बाजाराची स्थिति अगर लागवडीच्या पद्धतीची सुधारणा ह्याबद्दल त्याचें सामान्यतः बरेंच अज्ञान असतें. नवीन लागवडींत धाडसानें पडून त्यांत स्वतःच्या व इतराच्या भांडवलाच्या साहाय्यानें फायदा मिळवावा, हें सामान्य हिंदी शेतकऱ्यांच्या मनांतही येत नाहीं; व मनांत आल्यास तें कृतींत उतरविण्याइतका उत्साह, भांडवल व कर्तृत्व फारच थोड्यात सांपडतें. हा धंदा किती किफायतशीर आहे, त्या धंद्यांत आपणांस किती फायदा पडेल ह्यासारखी चिकित्सा करून एक किंवा दुसरा धंदा स्वीकारण्याइतकी बुद्धि व चलनशीलता हिंदी कारागीर अगर शेतकरी ह्यांच्यांत म्हणण्यासारखी सापडत नाहीं. वंशपरंपरा चालत आलेला आपला धंदा करावा ह्या बुद्धीनें प्रत्येक जण आपापला उद्योग स्वीकारतो व त्यांत पोट भरत नाहीं असें दिसलें म्हणजे सहजगत्या दुसराही जोड धंदा थोडाफार करून चरितार्थ चालवितो. पेन्शनर व भांडवलवाले कांहीं थोडे लोक सोडून दिले तर शेतीचा धंदा कोणीही शेतकरी त्यापासून मिळणाऱ्या निव्वळ फायद्याच्या अपेक्षेनें करतो, सुधारतो अगर बदलतो असें फारसें होत नाहीं. बागाईत जमीनींत काढलेलें उत्पन्न व ऊंस, कापूस आणि गळि-

त्याचीं धान्यें ह्या सारखीं पिकें वगळली असतां, हिंदुस्थानांत शेती स्वतंत्र किफायतशीर धंदा म्हणून चालविली जात नाहीं असें सामान्यतः म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

धान्याच्या व कापसाच्या वाढत्या किंमतीमुळें शेतीचें निव्वळ उत्पन्न वाढलें असें म्हणणाऱ्यांसही लहान महान कारागीर व धंदेवाले हे बुडत चालले असून त्यांस अंशतः अगर पूर्णपणें शेतकरी बनणें किंवा मोल मजुरी करणें भाग पडत आहे ही गोष्ट कबूल आहे. खेड्यापाड्यांत व लहान वस्तीच्या ठिकाणीं असलेले लोहार, तेली, सुतार, चांभार वगैरे कारागिरांस आपला धंदा किफायतशीर होत नाहीं हे दिसून येत असून ते आपला कांहीं वेळ जमिनीच्या लागवडीस लावून किंवा शहरांतील कारखान्यांत मजुरीने काम करून आपलें पोट भरताना दिसतात. सन १९२१ सालच्या खानेसुमारीवरूनही असें दिसतें कीं, १९११ सालच्या आकड्याशीं तुलना केल्यास कोळी व पारधी ह्यांची संख्या थोडीशी कमी झाली असून शेतीच्या धंद्यावर अवलंबून असलेल्या लोकांची संख्या सामान्य लोकसंख्येंतील वाढीच्या दरापेक्षा अधिक झपाट्यानें वाढली आहे. हिंदुस्थानांतील शेत जमीन हजारों वर्षे नांगरटीत असल्यानें तिचें उत्पादक सामर्थ्य कमी होणें हें[1] उतरत्या पैदाशीच्या नियमानुसार अपरिहार्य आहे हे प्रास्ताविक भागांतील विवेचनावरून वाचकांच्या सहज ध्यानात येईल. जमीनीची उत्पादकता कमी झाली म्हणून व शेतकीवर अवलंबून असलेल्या लोकांची संख्या वाढली म्हणूनही एकंदरीनें शेतीचा धंदा कमी किफायतशीर होऊन, दर माणशीं धान्याचा व जमीनींतून निघणाऱ्या इतर मालाचा पुरवठा कमी होतो हे निर्विवाद आहे. जमीनींत अधिक भांडवल घालून व खतें, सुधारलेलीं आउतें व बी इत्यादि बाबतींत प्रगति करून जमीनीचें दर एकरी उत्पन्न वाढविलें तरच धान्याचा तुटवडा व शेतकऱ्यांची हलाखी हीं संकटें टाळता येतील.

**८ जमीनीची सुपीकता**—जमीन पूर्वी इतकी सुपीक राहिली नाहीं असा आपल्या इकडील सामान्य शेतकरी वर्गाचा समज आहे, तो केवळ त्याचें अज्ञान अगर जुनें तें चांगलें. हा सर्वत्र दिसून येणारा पूर्वग्रह ह्या कारणामुळें होय असें म्हणतां येत नाहीं. जमीनीची लागवड कांहीं वर्षें झाल्यावर तिच्यांतील उत्पादक सामर्थ्य कमी होत जातें व तें जमीन नापीक टाकून किंवा तिची खताच्या साहाय्यानें मशागत करून कायम ठेवणें व वाढविणें जरूर असतें, हा सार्वत्रिक नियम आहे. हिंदुस्थानातील शेतजमीनीला कित्येक पिढ्यांत विश्रांति मिळाली नसून गळितें, हाडें, इत्यादि ज्या पदार्थांपासून शेतकीस जरूर असलेलें खत मिळतें ते पदार्थही फार मोठ्या प्रमाणांत परदेशीं पाठविले जात आहेत, व येथें शिल्लक असलेल्या ह्या व दुसऱ्या पदार्थांचाही पद्धतशीरपणें उपयोग करण्याची शेतकरी वर्गात वहिवाट नाहीं. खतांस लागणारे पदार्थ परदेशीं पाठविण्यास बंदी करावी ह्या मताचा अर्वाचीन शेत-

१ ( फूटनोट ) मागें पान ३० पहा.

कींतील तज्ञ लोकही हल्लीं पुरस्कार करूं लागले आहेत लागवडीची जुनी पद्धत अनेक बाबतींत सदोष असून तिच्यांत नवीन ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा घेऊन योग्य सुधारणा घडवून आणणें इष्ट आहे. आगगाड्या व कालवे ह्यांच्या प्रसारामुळेंही कित्येक भागांत शेतीचें नुकसान झालें आहे, ह्याचें सकृद्दर्शनीं कित्येकांस आश्चर्य वाटेल. उदाहरणार्थ, बंगाल्यांतील कित्येक भागांत आगगाड्यांच्या रस्त्याकरितां जे बंधारे बांधले आहेत त्यामुळें जमीनीवरून पाणी वाहून जाण्याचे नैसर्गिक मार्ग बंद झाले, व शेतजमीनीत फार पाणी साचून आणि ती क्षारमय होऊन उत्पन्नांत खोट येऊं लागली. तसेंच, अनेक कालव्यांच्या कडेला असलेल्या जमीनी पाण्याच्या झिरपण्यानें लोणा येऊन लागवडीस नालायक झाल्या आहेत. कपास, ताग, इत्यादि विकाऊ पिकांस भाव येतांच धान्याची जमीन त्या पिकांस उपयोगांत आणल्यानेंही जमीनीच्या उत्पादकतेवर कित्येक ठिकाणीं अनिष्ट परिणाम झालेला आहे. जमीनीची सुपिकता राखून ती वाढवावयाची असल्यास ह्या सारख्या सामान्यतः लक्षांत न येणाऱ्या गोष्टींचाही अवश्य विचार केला पाहिजे.

जमीनीच्या नैसर्गिक गुणांवरून व मगदुरावरून पिकांचें स्वरूप व लोकांची राहणी हीं बहुंशी ठरतात हा सामान्य अनुभव आहे. कोंकणांतील शेतकऱ्यांस वर्षभर काबाड कष्ट करूनही आपल्या जमीनींतून पुरेसे भात काढतां येत नाहीं; तर खानदेशचा, सातारचा, व वऱ्हाडचा शेतकरी कापूस, ज्वार, बाजरी ह्यांची भरपूर पिकें पदरांत पाडून घेतो हा मुख्यतः जमीनीच्या सुपिकतेंतील फरकाचाच परिणाम होय. गंगा, यमुना ह्या नद्यांच्या कांठचा प्रदेश व सामान्यतः सर्व मोठमोठ्या नद्यांच्या खोऱ्यांतील जमीनी सुपीक असतात ह्याचेंही कारण उघड आहे. परंतु अशा जमीनीच्या विस्तारास व उत्पादकतेसही मर्यादा आहे व ती वाढत्या लोकसंख्येच्या मागणीमुळें हळूहळू अधिक संकुचित होत आहे हें विसरतां कामा नये. आगगाड्या व रस्ते ह्यांच्या साहाय्यानें देशांतील सर्व भाग उत्पादनाच्या बाबतीत एक जीव झालेले आहेत व एका भागांत उत्पन्न झालेला माल दुसऱ्या भागांत मिळूं शकतो हें खरें आहे. अलीकडे दुष्काळांत लोक अन्नावांचून मरण्याचें प्रमाण बरेंच कमी झालें आहे व कोणत्याही ठिकाणीं बहुतेक कोणताही जिन्नस मिळतो ह्याचें कारण वहातुकीच्या साधनांची सुलभता हेंच होय. परंतु सर्व देशाचा एकत्रितपणें विचार कर्तव्य असतां निव्वळ वहातुकीच्या साधनांनीं शेतीची उत्पादकता वाढली असें म्हणतां यावयाचें नाहीं. पाश्चात्य राष्ट्रांतील इंग्लंड सारखे कांहीं देश आपल्या उद्योगधंद्यांवर येवढा फायदा मिळवितात कीं त्याच्या मोबदला औद्योगिक बाबतीत मागासलेल्या राष्ट्रांकडून त्यांस धान्याची व शेतीपासून निघणाऱ्या इतर पदार्थांची किफायतशीर भावानें आयात करतां येते. हिंदुस्थानांतील कारखानदार अजून आपल्या पायावर नीटसे उभेही राहूं लागले नाहींत. शिवाय, पाश्चात्य राष्ट्रांची हिंदु-

स्थानांतील शेतीच्या उत्पन्नास जी तीव्र मागणी आहे तिचा देशास पूर्ण व खरा फायदा करून घ्यावयाचा असेल तर जमीनीचें उत्पादक सामर्थ्य वाढविणें आवश्यक आहे. पुरेसें भांडवल, लागवडीची सुधारलेली पद्धत, शक्य तेथें नवीन साधनांचा व यंत्रांचा उपयोग आणि शेतकीच्या धंद्याची पद्धतशीर संघटना ह्या मार्गानें जमीनीची सुपिकता वाढविण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे.

**९ जमीनीची किंमत—** जमीनीच्या सुपिकतेशिवाय, सामाजिक परिस्थितींत घडून येणारा विशिष्ट बदल, वहातुकीची साधनें व नवीन गिऱ्हाइकांची मागणी ह्या कारणांचाही जमीनीच्या किंमतीवर परिणाम होतो. ज्या जमीनी कांहीं वर्षांपूर्वी लागवडींतून जाण्याच्या बेतांत होत्या त्याच कापूस, भुइमूग, ऊंस, चहा इत्यादि पिकांस वाढता भाव आल्याबरोबर किफायतशीर ठरूं लागल्या. आगगाड्या व इतर वहातुकीच्या साधनांची विशेष सोय असून बाजारांत माल नेण्यास कमी खर्च येत असेल तर कमी प्रतीच्या जमीनींसही अधिक किंमत येते. साधारणपणें मोठमोठ्या शहराजवळच्या शेत जमीनी महाग असतात ह्याचें मुख्य कारण त्यांचें गिऱ्हाइकांशीं असलेलें सानिध्य हेंच होय. अशा जमीनींत अधिक भांडवल घालून अधिक पिक काढण्याचा प्रयत्न केला तर तो शहरांत येणाऱ्या चढीच्या भावामुळे फायदेशीर ठरतो. कित्येक वेळां सामाजिक कारणानेंही जमीनीची किंमत वाढते. व्यापार व उद्योग धंदे ह्यांच्या भरभराटीने व वहातुकीच्या साधनांच्या सोयीनें कित्येक भागांत जमीनीच्या किंमती विशेष वाढल्या आहेत. घरें बांधण्यास लागणाऱ्या जागेच्या किंमतींत जी वाढ झाली आहे ती तर अपूर्व समजली पाहिजे. ज्या जमीनी शेतकीच्या धंद्यास लावल्या असता त्यांत घातलेलें भांडवल व श्रम ह्यांच्या इतकें उत्पन्न तरी मिळेल की नाही ह्याची वानवा असावयाची त्यांस शहरांच्या निकट सान्निध्यानें घरें बांधण्याच्या जागा ह्या नात्याने महत्त्व येऊन कल्पनातीत किंमती येऊं लागल्या. त्या मानानें घरांच्या किंमती वाढून भाडीही अतोनात चढली. स्थानिक संस्थांस स्वस्त व सोयीचीं घरें बांधण्याची आवश्यकता भासू लागते ती ह्याच कारणामुळें होय.

जमीनीच्या सुपीकतेप्रमाणेंच काहीं अंशी खाणींच्या उत्पादकतेची गोष्ट आहे. परंतु खाणींतील माल एकदां निघाला म्हणजे त्या खाणीची उत्पादकता कायमची संपली. हिंदुस्थानांतील बहुतेक खाणी इंग्रज लोकांच्या मालकीच्या आहेत हें आर्थिक दृष्ट्या राष्ट्रावर मोठें संकटच आहे. कारण येथील जमीनीच्या पोटांत असलेली संपत्ति परदेशीं नेऊन अगर येथील लोकांसच महागाईनें विकून जो फायदा होईल तोही परराष्ट्रांत जावयाचा. इ. स. १८८२ मध्यें म्हैसूर संस्थानांत कोलार येथें सोन्याची खाण एका इंग्रजी कंपनीनें सुरू केली तेव्हांपासून सन १९२१ पर्यंत निव्वळ फायदा म्हणून तीस कोटी रुपये इंग्लंडला पाठविण्यांत आले व म्हैसूर दरबारास तीन कोटी रुपये एवढाच खंड मिळाला. ह्याशिवाय, केवळ हमाल या नात्यानें संस्थानांतील

लोकांस काय मजूरी मिळाली असेल ती निराळी. खाणीची दुर्मिळता, त्यांच्यांतील मालाचा मर्यादित पुरवठा व खनिज पदार्थांचें अर्वाचीन धंद्यांतील वाढतें महत्त्व ही सर्व कारणें ध्यानांत घेतां कित्येक प्रमुख हिंदी धंदेवाल्यास व मुत्सद्यांस जमीनीतली संपात्ति जमीनींत पडून राहिली तरी पुरवली परंतु परकी भांडवलवाल्यांकडून खाणी चालविणें नको असें वाटूं लागलें आहे. ह्या मतावर विश्वबंधुत्वाचे पुरस्कर्ते व पुराणमताभिमानी अर्थशास्त्रज्ञ संकुचित दृष्टीचा आरोप करण्यास चुकत नाहींत हें साहजिकच आहे. परंतु पाश्चात्य राष्ट्रांची आशिया, आफ्रिका व यूरोप ह्या खंडांतील राकेलच्या खाणी-बद्दल जी लट्टालट्टी सध्यां चालली आहे ती पाहिल्यास वरील धोरण समर्थनीयच ठरतें.

# प्रकरण ४ थें

## मनुष्यबळ

**१ श्रमाचें आर्थिक महत्त्वः**— निसर्गदत्त वस्तूंतील अनेक स्वाभाविक विशेषांचा मनुष्यांच्या सुखवर्धनार्थ उपयोग होण्यापूर्वी त्या वस्तू हस्तगत करून त्यांतील गुण उपयोगास लावण्याची खटपट करणें आवश्यक असतें व निसर्ग, श्रम आणि भांडवल ह्यांपैकी श्रम हाच एक कार्यकर्ता घटक आहे असें मागें[1] सांगितलेलें वाचकास आठवत असेलच. श्रम म्हणजेही केवळ ओझीं वाहण्याचें किंवा दगड घडण्याचें काम एवढेंच नसून स्वतःच्या अगर इतरांच्या गरजा भागविण्याकरितां मनुष्य जे जे कायिक, वाचिक अगर मानसिक प्रयत्न करतो त्यांस श्रम म्हणणें आवश्यक आहे हेंही तेथें सांगितलें आहे. विवक्षित देशाची आर्थिक परिस्थिति अजमावतांना पहिल्या प्रथम निसर्गानें त्या प्रदेशांत कोणत्या प्रकारची व किती सामुग्री उपलब्ध करून ठेवली आहे हें पाहणें आवश्यक असतें यांत शंका नाही. हिंदुस्थानांतील नैसर्गिक परिस्थितीचे आर्थिक विशेष मागील प्रकरणांत नमूद केले आहेत ते ह्याच धोरणानुसार होय. परंतु नैसर्गिक गुण उपभोक्त्याच्या पदरांत पडण्यापूर्वी शरीरानें व मनानें काम करणाऱ्या अनेक कामकऱ्यांच्या श्रमाची आवश्यकता असल्यानें ह्या मनुष्यबळाच्या बाबतीत येथील परिस्थिति कोणत्या प्रकारची आहे हें पाहणें जरूर आहे. मुंड, गोंड, भिल्ल इत्यादि कांहीं थोड्या रानटी जाती प्रायः जंगलांत राहून शिकार करून अगर गुरेंढोरें पाळून आपली उपजीविका चालवितांना दिसतात हें खरें आहे. परंतु त्यांची संख्या फारच थोडी असून ती दिवसानुदिवस कमीही होत आहे. देशांतील लोकांचा बहुतेक सर्व भाग आर्थिक दृष्ट्या पूर्णपणें सुधारलेला असून शेतकी, व कारागिरीचे धंदे चिकाटीनें व कुशलतेनें चालविण्याची त्यांस पिढीजाद संवय आहे. वेद, उपनिषदें, पुराणे व इतर प्रकारांच्या हिंदी वाङ्मयात आर्यलोक हिंदुस्थानांत आल्यापासून त्यांचे आर्थिक संक्रमण कसकसें झालें ह्याचें स्पष्ट चित्र दृष्टीस पडतें. जंगलें तोडून जमीन लागवडीस योग्य करणें, लहानसहान वसतिस्थानें बांधून शेतीचा धंदा चालवून तो सुधारणें, शेतीस परिपोषक व इतर गरजा भागविण्यास आवश्यक असा माल उत्पन्न करणाऱ्या इतर कला व धंदे ही स्थापणें, लहानमोठी शहरें अस्तित्वात येऊं लागल्यावर त्यांच्या घटनेची योग्य व्यवस्था करणें आणि शेती, उद्योगधंदे व व्यापार ह्यांबाबतीत देशांतील लोकांची समृद्धि होईल अशी कायमची व्यवस्था करणें ह्या सर्व बाबींचा सर्वांगपूर्ण विचार करून त्या त्या काळच्या परिस्थितीस अनुसरून निर्णय दिलेला वरील ग्रथांत आढळून येतो.

---

१ मागें पान ३२ पहा.

हिंदुस्थानातील निरनिराळ्या भागांत नैसर्गिक परिस्थिति भिन्न असल्यानें जमीनीच्या लागवडीचा अगर कारागिरीचा धंदा ह्यापासून स्वतःच्या गरजा भागविण्यास मनुष्यास करावे लागणारे श्रम निरनिराळ्या भागांत भिन्न स्वरूपाचे व कमीअधिक कष्टाचे असतात. श्रमाच्या संबधींतील हे फरक दीर्घकालपर्यंत चालत आल्यानें धैर्य, साहस, कष्टाळूपणा, चिकाटी इत्यादि उत्पादक गुणांच बाबतींत निरनिराळ्या भागांतील लोकांत बगाच फरक दिसून येतो. तरी चरितार्थ चालविण्यास श्रम करणे आवश्यक आहे ही कल्पना सर्वत्र मान्यता पावलेली असून, येथील पुरातन कालापासून प्रसिद्ध असलेले उद्योगधंदे व कलाहुन्नर ह्यांची उदाहरणे घेतली तर श्रमाच्या उत्पादकतेच्या बाबतींत येथील लोकांनीं चांगलेच यश मिळविले होतें हे उघड होईल. उत्पादक श्रमाच्या बाबतींत एकाच ठराविक मार्गानें, म्हणजे जातिभेदानुसार, प्रगति होत होती तरी उत्पादनास आवश्यक असणारे मनुष्यबळ व कौशल्य ही त्यावेळच्या गरजांच्या व उत्पादन पद्धतींच्या मानानें भरपूर सापडत. पाश्चात्य राष्ट्रांत अनेक शतके पूर्ण अगर अर्धवट गुलामगिरी अस्तित्वांत होती व शेतीसारख्या धंद्यांतील बहुतेक काम गुलामास करावें लागे. निदान अर्वाचीन आर्थिक घटना अस्तित्वांत येण्यापूर्वी तरी, हिंदुस्थानांतील जातिभेद ही पाश्चात्यांच्या गुलामगिरीपेक्षां उच्चदर्जाची समाजसंवर्धक संस्था होती असें सिद्ध करणें अशक्य नाहीं. ब्राह्मण व क्षत्रिय हे उच्च वर्ण समजले जात व वैश्य आणि शूद्र ह्या धनोत्पादक वर्गांत उत्पादनाचें संघटण, व्यापार व शारीरिक श्रमाचीं कामें हीं वाटून दिलेलीं असत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्यांपैकी प्रत्येक वर्णास विशिष्ट सामाजिक व आर्थिक कर्तव्यें वाटून दिलेलीं असून तीं करणें हा त्याचा धर्म समजला जाई.

आमच्या इकडील पूर्वीच्या समाजघटनेत व अलीकडील स्वतंत्र वातावरणांत स्वतःची उपजीविका चालविण्यास जे जे काम करणें मनुष्यास आवश्यक असतें त्या सर्वास श्रम असें मानण्याची वहिवाट आहे. परंतु निरनिराळ्या धंद्यांचा आर्थिक व सामाजिक महत्त्वाच्या दृष्टीनें विचार करीत असतां सामान्यतः जे लोक गरजा भागविण्यास योग्य अशा वस्तू उत्पन्न करण्यांत प्रत्यक्ष गुंतलेले असतात त्यांच्या व्यवसायासच श्रम म्हणण्याचा प्रचार पडलेला आहे. हिंदुस्थानाचे व्हाइसरॉय साहेब व मुंबईच्या गिरणींतील अगर आसामांतील मळ्यांतील एखादा मजूर हे दोघेही तात्त्विक दृष्ट्या, श्रम करणारे मजूर असले तरी सापेक्षिक परिस्थितीशीं कारखाने, शेतें, दुकानें इत्यादिकांत काम करणाऱ्याचाच प्रत्यक्ष संबंध येत असल्यानें त्यासच कामकरी असें म्हणणें व्यवहारयुक्त होय. नैसर्गिक परिस्थितीच्या साहाय्यानें अर्थोत्पादन घडवून आणण्यास देशांत पुरेसें मनुष्यबळ आहे किंवा नाहीं हे ठरवितांना शेतकरी, कारखान्यातील व मळ्यांतील मजूर, कारागीर, व्यापारांत गुंतलेले कमी प्रतीचे कामकरी ह्या वर्गांची संख्या व त्यांचे व्यक्तिशः उत्पादक सामर्थ्य ह्याचाच

प्रामुख्यानें विचार करावा लागतो. वेदकालीन आर्थिक परिस्थितीत धनधान्य समृद्धीची अत्यंत जरूर भासत होती व सर्व प्रकारच्या शारीरिक श्रमांस सामाजिक मान्यता दिली जात असे. शारीरिक श्रम करणाराची जात निराळी व निकृष्ट असावी हे मत बऱ्याच पढील काळांतलें असून त्याची पाळेंमुळे जातिभेदाच्या संस्थेंत रुजलेली आहेत. आर्य वसाहतवाले वर्णानें गोरे असून त्यांनी जेते ह्या नात्यानें येथील सुपीक जमीन आपल्या ताब्यात घेतली व एतद्देशीय काळ्या अनार्य लोकास अर्धवट गुलामगिरीत राबवून ते शेतकी करू लागले. प्राचीनकाळी व मध्ययुगांत युरोपमध्यें मोठमोठ्या जमीनदारांजवळ शेंकडो कुळे अर्धवट गुलामगिरीत बाळगून त्याजकडून जमीनीची मशागत करून घेण्याची पद्धति होती, तिच्याहून इकडील जातिभेदाची पद्धत मुळात भिन्न नव्हती. अनार्य व शूद्र हे शब्द मुळात समानार्थवाचक असून पुढें शूद्रांपैकी कित्येकांनी उद्योगधंदा, व्यापार इत्यादिकात आपला हळुहळू प्रवेश करून घेतला असला पाहिजे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या चार वर्णांचा उगम आर्य व अनार्य ह्या प्राथमिक वर्गीकरणात विद्याव्यासंग व राज्यकारभार, आणि शरीरकष्टाची चाकरी व स्वतंत्र उत्पादक धंदा अगर व्यापार ह्या व्यवसायभेदाची भर पडून झाला. पुढें आर्थिक व्यवसायातील निरनिराळ्या प्रकारांमुळें व कांही अंशी भौगोलिक फरकांमुळे प्रत्येक वर्णात अनेक जाती उत्पन्न होऊ लागल्या. तात्विकदृष्ट्या व पहिल्या प्रथम व्यवहारातही, जातिभेद जन्ममूलक समजला जात नसून व्यवसायाचा प्रकार हेंच जातीचें गमक मानले जाई. परंतु पुढे पुढे व्यक्तीचा आर्थिक व्यवसाय हेंही तिचे सामाजिक व धार्मिक कर्तव्य समजलें जाऊन इतर धार्मिक कर्तव्याप्रमाणे तेंही वंशपरंपरा चालू ठेवण्याची पद्धत पडली. एका बाजूनें व्यक्तिमात्रात स्वतःच्या घरांत चालत आलेला धंदा पुढें चालू ठेवण्याविषयी असलेली उत्सुकता व उलट बाजूस, उच्च वर्णातील व जातीतील लोकांचे इतरास आपल्या धंद्यांत न येऊ देण्याचे प्रयत्न ह्या कारणाचाही जातिभेदाच्या वाढीवर अनुकूल परिणाम झाला असला पाहिजे. विशिष्ट जातीत विवक्षित धंदे पिढ्यानुपिढ्या चालत राहिल्यानें धंद्यातील कसब व कार्यक्षमता ह्याची वाढ होऊन एकंदर समाजाचे उत्पादन सामर्थ्य वाढण्यास मदतच झाली. परंतु वैयक्तिक वैशिष्ट्य, कल्पकता, शोधक बुद्धि, व्यवसायस्वातंत्र्य इत्यादि आर्थिक व नैतिक प्रगतीस आवश्यक असलेल्या गुणाच्या वाढीस जातिभेदासारख्या बाधीव व निश्चल पद्धतीत वाव मिळण्यासारखा नव्हता. ब्राह्मण व क्षत्रिय ह्या द्विजवर्णांचा धनोत्पादक धंद्याशी प्रत्यक्ष संबंध येत नसल्यानें शेती, उद्योग धंदे, व्यापार इत्यादिकात करावे लागणारे श्रम सामाजिकदृष्ट्या 'हीन' दर्जाचे ठरले गेले. हीच पद्धति अनेक शतकें चालल्यामुळे जातिभेद ह्या संस्थेस समाजाच्या धारण–पोषणाच्या बाबतीत प्राथमिक महत्त्व प्राप्त झालें. वास्तविक जातिभेदाचा खऱ्या आर्यधर्माशी यत्किंचितही संबंध नसता मध्ययुगीन व अलीकडील कालात

चातुर्वर्ण्यास पराकाष्ठेचें महत्त्व प्राप्त आलें व उत्पादक श्रमाची सामाजिक संभावना कमी झाल्यामुळेंच होय. मनु, कौटिल्य यांच्यासारखे सर्व ग्रंथकार वर्णसंकर होऊं न देणें हें राजसत्तेचें आद्य कर्तव्य होय असें प्रतिपादीत त्याचें कारण हेंच होय. तरीही ह्या धार्मिक व तात्त्विक बंधनाचा कडकपणा व्यवहारांत नेहमीच टिकत असे असें नाहीं. ब्राह्मणास युक्त अशीं कामें क्षत्रियांनीं व क्षत्रियास योग्य अशीं कामें ब्राह्मणांनीं केल्याचीं हजारों उदाहरणें पुराणांत व इतिहासांत सांपडतात, एवढेंच नव्हे तर व्याजबट्ट्याचा धंदा ब्राह्मणांनीं व विद्यासंपादनाचें कार्य इतर वर्गांनीं केल्याचीं उदाहरणेंही अनेक सांपडतात. वर्णभेदाचें व विशेषतः जातिभेदाचें मूळ आर्थिक व्यवसायांतील फरकांवर अवलंबून असल्यानें समाजांतील निरनिराळ्या धंद्यांच्या उत्पादकतेशीं त्या पद्धतीचा अगदीं निकट संबंध येऊन पोहोंचतो हें उघड आहे. विशेषतः अर्वाचीन औद्योगिक घटनेच्या काळांत व्यक्तीच्या विशिष्ट कर्तबगारीची समाजास विशेष जरूर असल्यानें जातिभेदाची व वर्णभेदाची बंधनें जरूर तेवढी ढिलीं केल्याशिवाय कामकऱ्यांची कार्यक्षमता व राष्ट्राचें उत्पादक सामर्थ्य ह्यांत वाढ होणार नाहीं.

**१ हिंदी मजूरांची कार्यक्षमता**—सामान्यतः आपला असा समज असतो कीं ज्या मानानें एखाद्या कामास आवश्यक असलेलें मनुष्यबळ कमी मजूरीनें मिळेल त्या मानानें तें काम करण्यास खर्च कमी येईल. मजूरीचे दर कमी असणें हें उत्पादनाचें मूल्य कमी होण्याचें एक कारण आहे असेंच कोणासही वाटेल. परंतु एकंदर धंद्याच्या व समाजाच्या दृष्टीनें विचार करीत असतां मजूरीच्या दराबरोबरच मजूर वास्तविक काम किती करीत आहेत ह्याचाही विचार करावा लागतो. मजूरी व उत्पादकता ह्यांचा सापेक्षतेनें विचार करूनच मजुरांची कार्यक्षमता ठरवावी लागते. हिंदुस्थानांत निरनिराळ्या धंद्यांत प्रचलित असलेले मजूरीचे दर इंग्लंड, अमेरिका इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतील मजुरांच्या वेतनापेक्षा तिपटी चौपटीनें कमी आहेत हें खरें परंतु तेवढ्यावरून इकडील उत्पादकांचा मूळ खर्च त्यामानानें कमी असावा असा निष्कर्ष निघत नाहीं. कारण ज्यामानानें वेतन कमी तितक्याच किंवा अधिक प्रमाणांत उत्पादक सामर्थ्य कमी असल्यास मजूरीचे दर हलके असूनही एकंदर मनुष्यबळास द्यावें लागणारें वेतन अधिक असूं शकेल. हिंदी मजूरांविरुद्ध अनेक धंदेवाल्यांचा असा आक्षेप आहे कीं येथील मजुरांस पाश्चात्य मजूरांच्या $\frac{1}{4}$ वेतन दिलें तरी चालतें हें खरें, तरी त्यांची उत्पादकता तिकडील मजूरांच्या $\frac{1}{4}$ इतकीही नसून ती $\frac{1}{5}$ अगर त्याहूनही कमी असते. एकंदरीनें हिंदी मजूर कार्यक्षमतेंत कमी दर्जाचा असतो. म्हणजे हस्तकौशल्य, बुद्धीची कुशाग्रता, मनःस्थैर्य, सचोटी, विश्वासूपणा, शारीरिक बळ इत्यादि औद्योगिक दृष्ट्या महत्त्वाच्या गुणांचा इकडील मजूरांत पर्यायानें अभावच आहे. विशेषतः यंत्रांच्या साहाय्यानें चालणाऱ्या कारखान्यांतील मजूरांत वरील गुण आवश्यक असावे लागतात व हिंदी मजूरांत त्यांचा अभाव असल्यानें

मोठ्या प्रमाणावर चालणाऱ्या ह्या देशांतील अलीकडील उद्योगधंद्यांस पाश्चात्यें राष्ट्रांतील प्रतिस्पर्ध्यांशीं बरोबरी करतां येत नाही असा प्रवाद नेहमीं ऐकण्यांत येतो. कार्यक्षमतेंत ज्यांचा अंतर्भाव होतो असे जे गुण वर निर्दिष्ट केले त्यांपैकीं कित्येक राहणीच्या मानांत सुधारणा झाल्याखेरीज वृद्धिंगत होण्यासारखे नाहींत. कार्यक्षमता आणि वेतन ह्यांमधील कार्यकारण संबंध सूक्ष्म परंतु निश्चित स्वरूपाचा असून राहणीच्या मानांत सुधारणा झाल्यानें कार्यक्षमता वाढून संपत्तीचे उत्पादनात भर पडते आणि ह्या वाढाव्याचा अंश कामकरी वर्गाच्या पदरात पडण्यासारखा असतो. हिंदी मजूरांत जी अनेक आर्थिक व्यंगें आहेत त्यांपैकीं राहणीच्या मानांत सुधारणा झाल्यास नाहींशीं होण्यासारखीं अशी कोणती व प्रत्यक्ष शिक्षणद्वारा दूर करतां येण्यासारखीं कोणती ह्याचाही पूर्ण विचार व्हावयास पाहिजे. हिंदुस्थानांतील उष्ण व थकवा आणणारी हवा, आणि यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें काम करण्याची येथील लोकांत असलेली नावड किंवा अपात्रता ह्या कारणात कितपत तथ्य आहे हेंही पाहाणें जरूर आहे. ह्या सर्व कारणांचा नीट विचार केल्यास स्वभावतः हिंदी मजूर कार्यक्षमतेंत कमी दर्जाचे नसून निदान त्यांस मिळणाऱ्या वेतनाच्या मानानें तर त्यांची कार्यक्षमता विशेष हलक्या प्रतीची नाही असें दिसून येईल.

अर्थातच हिंदी मजूर विवक्षित धंद्यात कार्यक्षम आहेत किंवा नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर त्या धंद्यांच्या संपूर्ण माहीतीवरूनच दिलें पाहिजे. कोळशांच्या खाणींतील हिंदी मजूरांचें उदाहरण घेतल्यास आपणांस असें दिसून येईल की १९२३ साली दर हिंदी मजूरानें काढलेल्या कोळशाची सरासरी १६४ टन भरली. इंग्लंडांत ही सरासरी १९२६ साली २६८ टन व फ्रान्समध्यें १९१९ साली २०३ टन इतकी होती. असे असून कोळसा खणून खाणीच्या तोंडाशी आणण्याचा खर्च त्या त्या वर्षांत हिंदुस्थानांत ६½ रुपये, इंग्लंडांत १६⅔ रु. व फ्रान्सांत ९½ रु. इतका होता. प्रस्तुत उदाहरणावरून हिंदी मजूरांच्या स्वाभाविक अगर सद्यःकालीन कार्यक्षमतेविषयीं कोणताही निष्कर्ष काढतांना मालाचा उच्च-नीच प्रकार धंद्यांतील यंत्रसामुग्री वगैरे गोष्टी लक्षांत बाळगण्याची विशेष सावधगिरी बाळगिली पाहिजे हें उघड आहे. यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें व मोठ्या प्रमाणावर चालविलेले धंदे जसजसे इकडे अधिक अस्तित्वांत येतील तसतसा अर्वाचीन व विशिष्ट कौशल्याच्या उत्पादक पद्धतींशी इकडील लोकांचा परिचय वाढून त्यांची कार्यक्षमताही वृद्धिंगत होईल ह्यांत शंका नाहीं. कापूस, ताग, कागद, ह्या वस्तूंच्या गिरण्या, सिमेंट, काड्यांच्या पेट्या, व कांचेचें सामान इत्यादिकांचे कारखाने आणि कोळसा व लोखंड ह्याच्या खाणी ह्या धंद्यांत काम करीत असलेल्या हिंदी मजूरांनीं अल्प काळांत जें प्रावीण्य मिळविलें आहे तें अगदींच टाकाऊ आहे असें नाही. उलट, संताळ लोकांसारख्या रानटी जातीही मोठमाठ्या कारखान्यांतील अवघड व जोख-

मीची कामें करण्यास लायक आहेत असें सिद्ध झाले आहे. पाश्चात्य देशांतील कामकऱ्यांशीं तुलना केल्यास इकडील मजूरांत अनेक दोष आज मितीस दृष्टोत्पत्तीस येतात हें खरें आहे. अनेक धंद्यांत विशिष्ट प्रकारचें शिक्षण घेतलेले गोरे कामकरी भारी पगारावर आणणें हिंदी मालकांसही अपरिहार्य होतें ही गोष्ट विसरतां कामा नये. शिक्षणाचा प्रसार, अर्वाचीन उद्योगधंद्यांचा अनुभव, राहणींत सुधारणा इत्यादि कारणें अनुकूल झाल्यास येथील मजूरांची कार्यक्षमता वृद्धिंगत होऊन पाश्चात्य कामकऱ्यांच्यापुढें त्यांस खालीं मान घालावी लागणार नाही. स्वतःच्या हिंमतीवर आपापले पूर्वापार धंदे चालविणारे कारागीर आजही त्यांच्याचसारख्या पाश्चात्य कामकऱ्यांपेक्षां कमी कुशल नाहींत ह्या एकाच गोष्टीवरून शिक्षण, अनुभव व अनुकूल सवलती ह्यांची जोड मिळाल्यास हिंदी मजूर कार्यक्षमतेंत पाश्चात्यांशी स्पर्धा करूं शकतील असा विश्वास वाटतो.

**२ हिंदी लोकांचे धंदे**—मनुष्यांच्या वाढत्या गरजा यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें प्रचंड प्रमाणावर धंदे चालवून भागविण्याचा सध्यांचा मनु सुरू होण्यापूर्वी हरतऱ्हेच्या कला व हुन्नर, चिकाटीनें व चतुराईनें केली जाणारी शेतांची लागवड, कापूस व रेशीम ह्यांचें सूत काढून त्यांचीं तलम वस्त्र विणण्याचा धंदा, मोठमोठ्या शोभिवंत इमारती बांधण्याची कला, अनेक प्रकारच्या धातू, लाकूड, व कातडी ह्यांपासून उपयुक्त वस्तूंची पैदास, गालिचे, सुंदर आकाराचीं भांडी व नक्षीचें हरतऱ्हेचें काम इत्यादि नानाविध शरीरकष्टाचे व कुशलतेचे धंदे हिंदुस्थानांत भरभराटीस आलेले होते. पाश्चात्य देशांत स्वस्त व सुबक वस्तु प्रचंड प्रमाणावर उत्पन्न होऊं लागल्यामुळें, आधी ईस्टइंडिया कंपनी व नंतर इंग्रज सरकार ह्यांनी येथील उद्योगधंद्यांस हानिकारक असें आर्थिक धोरण स्वीकारल्यामुळे व यंत्रकला हस्तगत करून घेऊन त्यांत नवीन शोध लावण्याच्या बुद्धिप्रधान कार्यांत हिंदी लोकांनी उत्साह अगर महत्त्वाकांक्षा विशेष प्रकट न केल्यानें आज मितीस जुने धंदे बहुतेक बुडत चालले असून नव्या पद्धतीच्या गिरण्यांचा व कारखान्यांचा जम पूर्णपणे बसलेला नाही. शेतीच्या धंद्यावरच सर्वांशी अगर अंशतः अवलंबून राहण्याचा बहुजन समाजास प्रसंग आलेला आहे व लोकांच्या गरजा वाढत असल्यानें त्या, परराष्ट्रांहून तयार मालाची फार मोठ्या प्रमाणावर आयात करून भागविल्या जात आहेत. विशिष्ट प्रकारचें उंची कापड, गालिचे, नक्षीचीं भांडी व लांकूड काम इत्यादि स्वरूपांत अजूनही परराष्ट्रांस येथे तयार झालेला माल पाठविला जात आहे हें खरें. तरीही एकंदरीत ह्या व इतर धंद्यांत धडाडी व प्रगमनशीलता ह्यांचा अभाव दिसून येत असून सरकार व लोक ह्यांच्यांतील दोषांच्या एकत्रित परिणामानें देशाचें औद्योगिक जीवन अत्यंत कमकुवत व क्षीण झालेलें आहे. जुन्या व नव्या धंद्यांत निव्वळ शारीरिक काबाडकष्ट करणाऱ्यांची संख्याच फार मोठी आहे. १९२१ सालच्या खानेसुमारीवरून येथील लोकांच्या

उद्योगधंद्यांचे जे आंकडे पुढें दिले आहेत त्यांवरून सामान्यतः हिंदी लोक आपला चरितार्थ चालविण्यास कोणकोणते आर्थिक व्यवसाय कमकशा प्रमाणात करतात हें स्पष्ट दिसून येईल.

## हिंदी लोकांची धंदेवार वर्गवारी.

| धंदे. | उपजीविका करणाऱ्या लोकांची संख्या (आकडे लाखांचे आहेत) | प्रत्यक्ष काम करणाऱ्यांची संख्या (आकडे लाखांचे आहेत.) | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | एकंदर कामकरी. |
| अ. कच्च्या मालाचे उत्पादन | २३११.९ | ७२३.३ | ३३७.० | १०६०.३ |
| १ शेतकी, शिकार, व मासेमारी | २३०६.५ | ७२०.९ | ३३५.८ | १०५६.८ |
| १ चराई व शेती | २२९०.४ | ६८५.३ | ३३४.१ | १०१९.४ |
| क. धान्याची लागवड | २२१६.४ | ६८१.५ | ३२१.८ | १००३.३ |
| १ शेतजमीनीचा खड | ९९.८ | २६.९ | १०.३ | ३७.२ |
| २ सामान्य लागवड | १७२१.२ | ५३४.७ | २११.९ | ७४६.६ |
| ३ शेतीची व्यवस्था पाहणें | ६.१ | २.३ | .२ | २.६ |
| ४ शेतांत खपणारे मजूर | ३७९.२ | ११७.४ | ९९.३ | २१६.७ |
| ख. बागेमाख्खी विशिष्ट लागवड | २४.६ | ८.४ | ६.० | १४.४ |
| ग. जंगलांत खपणे | ४.८ | १.७ | .७ | २.४ |
| घ. शेतास लागणारी जनावरें पाळणें | ४४.२ | २३.५ | ५.४ | २८.९ |
| ङ. लहानसहान प्राणी पाळणें | .२ | .०७ | .०४ | .१ |
| २ शिकार व मासेमारी | १६.० | ५.७ | १.७ | ७.४ |
| २ खनिज पदार्थ पुरविण्याचा धंदा | ५.४ | २.३ | १.१ | ३.४ |
| ३ खाणी | ३.९ | १.७ | .८ | २.६ |
| ४ दगडाच्या व खडकाच्या खाणी | .७ | .३ | .१ | .४ |
| ५ मीठ वगैरे | .६ | .२ | .१ | .३ |
| आ. तयार मालाचे उत्पादन व पुरवठा. | ५५२.१ | १८०.२ | ७७.१ | २५७.४ |
| ३ उद्योगधंदे | ३३१.६ | १०६.३ | ५०.४ | १५७.२ |
| ६ विणकाम | ७८.४ | २४.५ | १५.७ | ४०.३ |
| ७ कातडीं वगैरे | ७.३ | २.५ | .५ | ३.१ |
| ८ लाकूड | ३६.१ | १२.३ | ३.४ | १५.८ |
| ९ धातू | १८.० | ६.३ | .८ | ७.२ |
| १० भांडीं तयार करणें | २२.१ | ७.४ | ३.४ | १०.८ |
| ११ रासायनिक पदार्थ वगैरे | ११.१ | ३.७ | २.० | ५.७ |
| १२ खाण्याचे पदार्थ | ३१.० | ७.३ | ९.२ | १६.५ |

| धंदे. | उपजीविका करणाऱ्या लोकांची संख्या (आंकडे लाखांचे आहेत) | प्रत्यक्ष काम करणाऱ्यांची संख्या (आकडे लाखांचे आहेत) | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | एकंदर कामकरी |
| १३ कपडेलत्ते | ७४.२ | २४.९ | ९.० | ३४.० |
| १४ टेबलें, खुर्च्या वगैरे सामान | .२ | .१ | .०१ | .१ |
| १५ बांधकाम | १७.५ | ६.० | २.० | ८.१ |
| १६ वहातुकीची साधनें तयार करणें | .५ | .२ | .०८ | .२ |
| १७ ऊष्णता, प्रकाश इत्यादि निसर्गप्रधान शक्ति तयार करणें | .२ | .०९ | .०१ | .१ |
| १८ इतर उद्योगधंदे | ३३.७ | ११.० | ३.९ | १५.० |
| ४ वहातुक | ४३.३ | १७.६ | २.० | १९.७ |
| १९ हवेंतून वहातुक | .०००६ | .०००३ | . | .०००३ |
| २० पाण्यांतून | ७.४ | ३.३ | .१ | ३.४ |
| २१ रस्त्यावरून | २१.४ | ८.५ | १.५ | १०.१ |
| २२ आगगाड्यांतून | १२.३ | ४.९ | .३ | ५.३ |
| २३ टपाल, तार व टेलीफोन | २.० | .७ | .०२ | .७ |
| ५ व्यापार | १८१.१ | ५५.७ | २४.७ | ८०.४ |
| २४ पेढ्या, बाजार व विमा | ९.९ | २.८ | .५ | ३.४ |
| २५ दलाली | २.४ | .८ | .०४ | .९ |
| २६ कापडाचा व्यापार | १२.८ | ४.८ | .८ | ४.९ |
| २७ कातड्यांचा ,, | २.३ | .१ | .१ | .८ |
| २८ लाकडाचा ,, | २.२ | .७ | .३ | १.० |
| २९ धातूचा ,, | .६ | .७ | .०४ | .२ |
| ३० विटा, मडकीं वगैरेचा व्यापार | ६ | .२ | .१ | .३ |
| ३१ रासायनिक वस्तूंचा ” | १.२ | .१ | .०९ | .५ |
| ३२ खाणावळी, हॉटेलें वगैरे | ७.६ | २.४ | १.२ | ३.४ |
| ३३ खाण्याच्या पदार्थांसंबंधी इतर व्यापार | ९२.८ | २७.२ | १४.६ | ४२.५ |
| ३४ कपडे वगैरे पदार्थांचा व्यापार | २.८ | १.० | .१ | १.१ |
| ३५ टेबलें, खुर्च्या वगैरे | १.७ | .५ | .१ | ७ |
| सामानाचा ,, | .७ | .२ | .१ | .३ |
| ३६ बांधणीस लागणाऱ्या ,, | ३.३ | १.२ | .१ | १.३ |
| ३७ वहातुकीच्या साधनांचा ,, | ५.१ | १.३ | १.७ | ३.० |
| ३८ जळणाचा ,, | ४.५ | १.४ | .७ | १.९ |
| ३९ चैनीच्या व कलाकुशलतेच्या पदार्थांचा ,, | ३०.४ | ९.६ | ३.१ | १३.४ |
| ४० इतर व्यापार | | | | |

| धंदे. | उपजीविका करणाऱ्या लोकांची संख्या (आंकडे हजारांवर आहेत.) | प्रत्यक्ष काम करणाऱ्यांची संख्या (आंकडे लाखांचे आहेत.) | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | एकंदर कामकरी. |
| इ. सार्वजनिक व्यवस्था, विद्या व कला | ९८·४३ | ३६·६ | ४·५ | ४१·१ |
| ६ सरकारी सैन्य | २१·८ | ९·९ | ·४ | १०·३ |
| ४१ लष्करी फौज | ७·५ | ४·३ | ·०३ | ४·४ |
| ४२ आरमार | ·००५ | ·००२ | ·०००३ | ·००२ |
| ४३ वैमानिक दळ | ·०१ | ·००८ | ... | ·००८ |
| ४४ पोलीस | १४·२ | ५·५ | ·४ | ५·९ |
| ७ ४५ सार्वजनिक व्यवस्था | २६·४ | ९·३ | ·७ | १०·० |
| ८ विद्या व कला | ५०·५ | १७·३ | ३·३ | २०·७ |
| ४६ धर्म | २४·५ | ८·९ | १·४ | १०·४ |
| ४७ कायदा | ३·३ | ·९ | ·०१ | ·९ |
| ४८ वैद्यकी | ६·५ | १·८ | ·७ | २·५ |
| ४९ शिक्षण | ८·० | ३·० | ·३ | ३·३ |
| ५० वाङ्मय, कला, व शास्त्रें | ७·६ | २·७ | ·६ | ३·३ |
| ई. संकीर्ण | १९४·० | ६५·८ | ३९·३ | १०५·१ |
| ९ ५१ सुखवस्तु | ४·७ | १·३ | ·५ | १·८ |
| १० ५२ घरगती नोकरी | ४५·७ | १७·१ | ८·२ | २५·३ |
| ११ ५३ इतर धंदे | ११०·९ | ३५·७ | २३·७ | ५९·४ |
| १२ अनुत्पादक धंदे | ३२·५ | ११·६ | ६·८ | १८·५ |
| ५४ तुरुंग व अनाथालयांतील लोक | १·४ | १·२ | ·०६ | १·२ |
| ५५ भिकारी, उडाणटप्पू व वेश्या | ३०·२ | १०·१ | ६·६ | १६·८ |
| ५६ इतर अनुत्पादक धंदे | ·८ | ·२ | ·१ | ·३ |
| एकंदर लोकसंख्या | ३१६०·५ | १००५·९ | ४५७·९ | १४६३·९ |

## महत्वाच्या धंद्यांत स्त्रियांचें प्रमाण.

| धंदा. | एक हजार पुरुष कामकऱ्यांशीं स्त्रियांचें प्रमाण | |
|---|---|---|
| | १९२१ | १९११ |
| सामान्य शेतकरी | ३९६ | ३६८ |
| शेतांत मोलमजूरी करणारे | ८४० | ९६७ |
| मळे | ८९८ | ८९४ |
| कोळशाच्या खाणी | ५२५ | ५४२ |
| विणकरी धंदे | ६४२ | ६५७ |
| खाण्याच्या पदार्थांचे धंदे | १२५९ | १२४७ |
| खाण्याच्या पदार्थांचा व्यापार | ६२७ | ५९४ |
| गवताचा व्यापार | १२६८ | १२६४ |
| जळणाचा व्यापार | १३२७ | १८०६ |
| सुइणी व दाया | २१४१ | २७९८ |
| इतर कामकरी | ७८९ | ७४० |

**४ मजूरांचे निरनिराळे वर्गः**—श्रमविभागाचें तत्त्व हिंदुस्थानांत विशेषसें अमलांत आलेलें नाहीं व एकच मनुष्य अनेक प्रकारचे व्यवसाय करून आपला चरितार्थ चालवितांना नेहमी दृष्टीस पडतो. शेती, व्यापार, वहातुक, सावकारी वगैरे धंदे एकाच वेळीं चालविणारे इसम सर्वत्र आढळतात. आर्थिक उत्क्रान्तीच्या प्राथमिक अवस्थांत श्रमविभाग व श्रमवैशिष्ट्य हीं नेहमीच अल्प प्रमाणांत सांपडतात. हिंदुस्थानांतही आर्थिक दृष्ट्या प्रगमनशील असलेल्या भागांत धंद्यांचें वर्गीकरण मागसलेल्या भागांपेक्षां अधिक स्पष्टपणें झालेलें दिसतें. तरीही निसर्ग, श्रम व भांडवल हे तिन्ही घटक कमी अधिक प्रमाणांत एकाच व्यक्तीच्या ताब्यांत असणें हाच सार्वत्रिक नियम असून ज्यांस निव्वळ मोलमजूरीनें पोट भरणारे कामकरी म्हणतां येईल असा वर्ग अजूनही लहान, अस्थिर व बहुंशीं विस्कळित आहे. चहाचे मळे, खाणी, कारखाने व गिरण्या ह्यांत काम करून स्वतःच्या कुटुंबाच्या उत्पन्नांत भर टाकणाऱ्या लाखों लोकांचा मजूर वर्ग आज निर्माण झालेला आहे तरी त्यांतील लोक मधून मधून घरच्या शेतीच्या कामास जात असल्यानें तो वर्ग म्हणण्यासारखा एकजीव झालेला नाहीं. विशेषतः आपल्या इकडील स्त्रीवर्गाचें प्रमुख काम घरगुती स्वरूपाचें असल्यानें लहानमोठ्या उद्योगधंद्यांत मजूर ह्या नात्यानें थोड्याच बायका काम करतात. शेतीच्या धंद्यास लागणारें मनुष्यबळ अनेक वेळां बाया कामास लावून मिळविलें जातें हें सर्वांस माहीतच आहे. अलीकडे कारखाने, गिरण्या व खाणी ह्यांमध्यें काम करून आपलें पोट स्वतंत्रपणें भरणाऱ्या स्त्रियांचा एक वर्ग निर्माण

होऊं लागला आहे तरीही अर्वाचीन पद्धतीचे महान भांडवलाच्या साहाय्यानें चाललेले कारखाने थोडेच असल्यानें केवळ मोलमजूरी करणारा मजूरवर्ग लहानच आहे. 'ज्या ठिकाणी दहा किंवा अधिक मनुष्यें मोलानें श्रम करून विकाऊ वस्तू तयार करण्याचें अगर वाहून नेण्याचे काम करतात तो कारखाना' अशी व्याख्या करून अशा 'कारखान्या'त काम करून जे आपले पोट भरतात त्यासच मजूर असे म्हटले तर हिंदुस्थानातील कारखाने व गिरण्या ह्यात पुढीलप्रमाणें मजूर काम करीत आहेत असे दिसते.

## कारखाने व गिरण्या ह्यांच्यांतील मजूरांची खानेसुमारी

| धंद्याचा प्रकार. | एकंदर संख्या (आंकडे हजाराचे आहेत.) | शेकडेवारी |
|---|---|---|
| सर्व उद्योगधंदे | २६,८१ | १०० |
| १ विशिष्ट पिकें काढणें | ८२१ | ३०.६ |
| २ खाणी | २६७ | १०.० |
| ३ कठिण खडकाच्या खाणी | २७ | १.० |
| ४ विणकाम व तत्सदृश धंदे | ७७३ | २८.८ |
| ५ कातड्याचे धंदे | १४ | .५ |
| ६ लाकूड कामाचे धंदे | ३३ | १.२ |
| ७ धातूंच्या ,, ,, | १७० | ६.३ |
| ८ कांचेचे व चिनीमातीचे कारखाने | ८२ | ३.१ |
| ९ रासायनिक पदार्थ | १०९ | ४.१ |
| १० खाण्याचे पदार्थ तयार करण्याचे धंदे | ११० | ४.१ |
| ११ कपडेलत्ते तयार करणें | १२ | .४ |
| १२ टेबलें, खुर्च्या वगैरे सामान तयार करणें | ७ | .३ |
| १३ बांधकामाचे धंदे | ३० | १.१ |
| १४ वहातुक व दळणवळण ह्यांची साधनं तयार करणें | १५५ | ५.८ |
| १५ नैसर्गिक शक्तीचें उत्पादन व ती कामास लावण्याचा धंदा | १५ | .६ |
| १६ चैनीच्या वस्तु तयार करण्याचे धंदे | ५६ | २.१ |

**५ शेतीच्या धंद्यांतील मजूर**—हिंदुस्थानाच्या एकंदर लोकसंख्येपैकी अजमासें शेंकडा नव्वद लोक खेड्यापाड्यांत राहणारे आहेत. शहरांची संख्या सर्व देशात पुरी अडीच हजारही नसून खेडीं मात्र जवळ जवळ सात लाख आहेत.

सात कोटी पुरुष व तीन सव्वातीन कोटी बायका शेतीचा धंदा प्रत्यक्षपणें करीत असून त्यांच्या श्रमावर इतर बारा कोटी लोकांचा चरितार्थही अवलंबून आहे. राष्ट्राच्या उपजीविकेच्या साधनांत लागवडीच्या श्रमास एवढें महत्त्वाचें स्थान आहे तरी शेतीचा धंदा अत्यंत विस्कळित असून डबघाईस आलेला आहे. ज्या जमिनीवर कष्ट करून हिंदुस्थानांतील शेंकडा ७२ लोक आपला उदरनिर्वाह करतात त्या जमिनीवर त्यांचा कायदेशीर हक्क कोणत्या स्वरूपाचा आहे व त्यांची आर्थिक परिस्थिति नक्की कशी आहे हे ठरविणें दुरापास्त आहे. स्वतःच्या मालकीच्या जमीनीची मशागत करणारे शेतकरी आणि अन्य स्वरूपानें जमीनीवर ताबा असलेले खंडकरी कष्टाळू व वाकबगार आहेत. जमिनीशी कायम संबंध कांहीच नसलेले जे लोक निव्वळ शेतांत अगर शेतीशीं संलग्न असलेल्या इतर धंद्यांत मोलमजूरी करून पोट भरण्याचा प्रयत्न करतात त्यांची कार्यक्षमता व वेतन ही दोन्ही असमाधानकारक आहेत. स्वतःची थोडी शेतजमीन असूनही इतरांच्या शेतावर मजूरी करून, गाड्या हांकून व अन्य मार्गांनीं आपली कमाई वाढविणाऱ्यांची संख्या फार मोठी आहे. बायका शेतात अनेक प्रकारचें काम करून शिवाय गोवऱ्या लावणें, दूध, गवत व लांकडाच्या मोळ्या विकणे वगैरे इतर धंदे करून स्वतःच्या व कुटुंबाच्या उत्पन्नांत भर टाकतात. ह्याशिवाय सूत कांतणे, कापड विणणें वगैरे लहानसहान धंदेही स्वतःच्या व शेजाऱ्यांच्या गरजा भागविण्यापुरते सर्व खेडेगांवांत चालू असतात. शेतीवर गुजारा करणारे मजूर पूर्वीपेक्षां कमी कार्यक्षम झाले असून देखील ते मजूरी मात्र अधिक मागतात अशी तक्रार जमीनीच्या अनेक मालकांकडून ऐकण्यात येते. शहरांत मजूरांस काम मिळण्याच्या झालेल्या सोयी, खेडेगावांतील अनेक लोक गांव सोडून गेल्यामुळे उत्पन्न झालेला मजूरांचा तुटवडा व छानछोकीच्या राहणीची वाढती आवड ह्या कारणांमुळें वरील प्रकारच्या तक्रारीस बरीच जागा मिळाली आहे ह्यात शंका नाही.

बरेंच मोठें भांडवल, शेतांचा विस्तृत आकार, आधुनिक पद्धतीचीं यंत्रें व आउतें, निरनिराळ्या प्रकारची उंची खतें इत्यादि अर्वाचीन व शास्त्रशुद्ध शेतकीस आवश्यक समजलीं जाणारीं अनेक साधनें हिंदी शेतकऱ्याजवळ सामान्यतः सांपडत नाहींत; एवढ्यावरून त्यास आळशी, अज्ञ व अनुत्साही ठरविणारे अनेक लोक पाश्चात्य देशांत व आपल्याइकडेही सांपडतात. परंतु आपल्या टीचभर शेताची लाकडीं अवजारांच्या व कृश दिसणाऱ्या जनावरांच्या साहाय्यानें लागवड करणाऱ्या हिंदी शेतकऱ्यांस स्वतःच्या धंद्यांतलि कसब पूर्णपणें अवगत असतें आणि पिढ्यानुपिढ्या चालत आलेल्या शेतीसंबंधाच्या प्रचारांत अनेक वेळां शेतकऱ्यास प्रत्यक्षपणें माहीत नसलेली शास्त्रीय तत्त्वें दडलेली असतात, हें मत प्रसिद्ध इंग्रज शेतीशास्त्रज्ञ जेम्स मॅकेना व डॉ. व्होल्कर ह्यांसही ग्राह्य आहे. रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र इत्यादि अर्वाचीन शास्त्रांतलि शोधांचा जमीनीच्या लागवडीशीं विशेष जवळचा संबंध असून

त्यांचा योग्य उपयोग केल्यास शेतीची उत्पादकता व एकंदर धंद्याचें उत्पन्न वाढ-विण्यास साहाय्यच होईल परंतु हिंदी शेतकरी म्हणजे अज्ञ, त्याची लागवडीची पद्धत म्हणजे कुचकामाची व त्याची हत्यारें ओबडधोबड व अनुत्पादक, असली अनुचित तिरस्कारबुद्धि बाळगून पाश्चात्यांची शास्त्रशुद्ध, मोठ्या प्रमाणावरील व यंत्रांच्या साहाय्यानें चालविलेली शेतकीची पद्धत इकडे सरर्हा चालू करण्याचा प्रयत्न करणें ही असमर्थनीय चूक आहे एवढेंच नसून अशा प्रयत्नास खऱ्या सामाजिक व आर्थिक हिताच्या दृष्टीनें अक्षम्य पापच समजलें पाहिजे. शास्त्रीय शोधांचा हिंदी शेतकऱ्यांस फायदा करून देण्याचे आजवर झालेले प्रयत्न प्रायः अयशस्वी झाले त्याचे कारण येथील शेतकऱ्यांच्या पिढिजाद पद्धतींचा व्यावहारिक पाया त्या प्रयत्नांस लाभला नाही हेच होय. धान्याची लागवड व विक्री करताना ज्या अनेक लहानसहान धंद्यांतील लोकांचा परस्पर संबंध येतो त्यांच्यांत पूर्ण संघटण करून, शेतकऱ्यास सामान्य शिक्षण व जरूर तितके शास्त्रीय ज्ञान देऊन, आणि खतें, सुधारलेले नांगर व आउतें इत्यादि साधनांचा आवश्यक तेवढा पुरवठा करून शेतीची सुधारणा करण्याचे प्रयत्न केल्यास ते यशस्वी ठरल्याशिवाय राहणार नाहींत.

**६ लहानसहान कारागिरीचे धंदे**—मोठमोठ्या कारखान्यांत यंत्रांच्या साहाय्यानें उत्पन्न होणारा स्वस्त व सुबक माल आगगाड्या व आगबोटी ह्या वहा-तुकीच्या साधनांतून सर्व देशभर पुरविला जाऊं लागण्यापूर्वी हिंदुस्थानच्या अनेक भागांत भरभराटीस आलेले कारागिरीचे धंदे अस्तित्वात होते हे आतां सर्वांस मान्य झालें आहे. परंतु अलीकडे मात्र निरनिराळ्या भागांची आर्थिक स्वायत्तता नाहीशी होत असून जुन्या पद्धतीनें व लहान प्रमाणावर धंदा चालविणाऱ्या जुन्या कारागि-रांची कुचंबणा होत आहे, व आपापले वंशपरंपरागत धंदे सोडून शेती, सरकारी अगर खाजगी नोकरी, घरबांधणी व वहातूक ह्या धंद्यांमध्ये जाणे त्यांस भाग पडत आहे. व्यापार अगर वकिली–वैद्यकी स. से प्रतिष्ठित धंदे ह्यांतही जुन्या कारागीर वर्गांतील कांही थोड्या लोकांस बुद्धीच्या सामर्थ्यानें आपला शिरकाव करून घेतां येतो. ब्राह्मण वर्गांतील अनेक लोकही व्यापार, शिवणकाम, यंत्राची दुरुस्ती, खिळे जुळण्याचें काम, छपाई, विणकाम, सुतारकाम, इंजिनें चालविण्याचें काम वगैरे जुन्या समजुतीप्रमाणें त्यांस अनुचित गणलेले धंदे करून आपलें पोट भरतांना दृष्टीस पडतात. देशाच्या ज्या भागात यंत्रनिर्मित माल स्वस्ताईनें मिळूं शकत नाहीं तेथें अजून देखील विणकर, कुंभार, लोहार, सुतार, तेली, चांभार इत्यादि कारागिरांचे धंदे टिकाव धरून आहेत. परंतु वहातुकीच्या साधनांची सुलभता वाढत असल्यानें ते फार दिवस तसेच टिकतील असें वाटत नाही. ज्या धंद्यांत हस्तकौशल्य अगर कल्पकता ह्यांचें विशेष महत्त्व असते आणि गिऱ्हाइकाची वैयक्तिक आवड पुरविण्याची आवश्य-कता भासते त्यांस यांत्रिक चढाओढीपासून अपाय होण्याची सहसा भीति नसते.

हरतऱ्हेचें जरीचें काम, तलम सूत व रेशीम ह्यांचें सुबक व नक्षीदार कापड, चांदी अगर पितळ ह्या धातूंची घाटदार व कोरीव नक्षीची भांडीं, सोनें, मोतीं व हिरे-माणकें ह्यांचे मूल्यवान व मनोहर दागिने, खेळणीं, बागड्या, गालिचे असे कित्येक पदार्थ देशाच्या निरनिराळ्या भागांत हिंदी कारागीर निर्माण करीत असून इतर कारागिरांच्या मानानें त्यांचे धंदे किफायतशीर आहेत असें म्हटलें पाहिजे. शेतीच्या धंद्याप्रमाणें सरकी काढणें, सूत कातणें, कापड विणणें ह्या धंद्यांतही बायकांच्या श्रमाचा अजून बराच उपयोग होतो. गावांतील कारागीर हा एक सार्वजनिक नोकर आहे व त्याच्या श्रमाबद्दल प्रत्येक गावकऱ्यानें आपल्या उत्पन्नांतून ठराविक भाग त्यास दिला पाहिजे ही जुनी कल्पना हळूहळू नामशेष होत असली तरी एकंदरीनें खेडेगांवांतील कारागीर शहरांतील भाडोत्री कामकऱ्यांपेक्षां अधिक स्वायत्त आहेत ह्यांत शंका नाहीं. खेडेगांवांतही अनेक धंद्यांत व विशेषतः शेतींत अर्धवट गुलामगिरींत असलेल्या मजूरांच्या श्रमाचा उपयोग करून घेण्याचा प्रघात कित्येक भागांत दृष्टीस पडतो. जुन्या हिंदुधर्मशास्त्रविषयक ग्रंथांत गुलामगिरीच्या संस्थेचा उल्लेख आढळतो व अलीकडेही सावकार आणि जमीनीचे मालक कधीकधीं गरीब कुळांस कर्जांत बांधून घेऊन त्यांस जवळ जवळ वंशपरंपरेनें आपल्या नोकरींत राबवून घेतात. मद्रास इलाख्यांतील 'पाडियाल' व मुंबईतील 'हाळी' हे वरील अर्धवट गुलामगिरीचेच अवशेष होत.

**७ संघटित धंदे**—स्वतंत्र व लहानसहान धंद्यांचा हळूहळू नाश होत जाऊन त्यांच्या जागीं सनस्वी भांडवलाच्या व भाडोत्री मजुरांच्या साहाय्यानें प्रचंड प्रमाणावर चालविलेल्या धंद्यांची उभारणी होत जाणें हा उत्पादनपद्धतीच्या उत्क्रान्तीचा अपरिहार्य ओघ होय असें कित्येक लोक मानतात व बहुशः हें मत यथार्थ आहे असें प्रास्ताविक विवेचनावरून वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. हिंदुस्थानांत अलीकडे यंत्रांच्या साहाय्यानें चालविलेले मोठमोठे धंदे अस्तित्वांत येत आहेत, त्यास आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें आपण विशेष महत्त्व देतो तें बहुशः वरील मताचा अंगीकार करूनच होय. परंतु अलीकडे औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या पाश्चात्य राष्ट्रांत वीज आणि गॅस ह्यांची प्रेरक शक्ति घरचसल्या मिळण्याची सोय झाल्यानें व लहानसहान यंत्रे व औद्योगिक शिक्षण ह्यांचाही बराच प्रसार झाल्यामुळें स्वतंत्र कारागिरांनीं चालविलेले लहान धंदे वर डोकें काढूं लागले आहेत. मोठमोठ्या कारखान्यांचा सर्वांत मोठा फायदा म्हणजे वाढत्या प्रमाणावर उत्पन्न होणाऱ्या वस्तूस कमीत कमी उत्पादनखर्च लागतो, हा होय. यंत्राच्या व प्रेरक शक्तीच्या साहाय्यानें घरोघर चालणाऱ्या धंद्यांत हा फायदा बहुशः मिळवितां येऊन शिवाय स्वातंत्र्य, मालकी व स्वार्थ या भावनांमुळें उत्पादनसामर्थ्यांत वाढही होऊं शकते. ह्याखेरीज, मोलमजुरीच्या पद्धतींत दिसून येणारे अनेक आर्थिक व सामाजिक दोष टाळतां येणे हाही स्वतंत्रतेनें चालविलेल्या लहान

यांत्रिक धंद्यांचा मोठाच गुण होय. हिंदुस्थानांत अर्वाचीन पद्धतीचे मोठमोठे कारखाने व गिरण्या ह्या मुंबई, अहमदाबाद, कानपूर, कलकत्ता वगैरे कांहीं विवक्षित भागांतच सांपडतात आणि त्यांमध्यें उत्पन्न केल्या जाणाऱ्या वस्तूंचें परिमाणही मर्यादित आहे. देशाच्या बहुतेक भागांत अनेक प्रकारचे धंदे करणारा कारागीर वर्ग लहानमोठ्या गांवांत पसरलेला आहे. संघटनेचा अभाव, सुधारलेल्या उत्पादक पद्धतीसंबंधानें अज्ञान आणि भांडवल, यंत्रसामुग्री व प्रेरकशक्ति ह्यांची दुर्मिळता ह्या कारणांनीं लहान व स्वतंत्र धंदे आजमितीस लुप्तप्राय होण्याच्या मार्गांत आहेत हें खरें; परंतु जुन्या कारागीर वर्गांत नव्या औद्योगिक ज्ञानाचा व यांत्रिक साधनांचा प्रसार केल्यास आणि माफक दरानें त्यांस भांडवल पुरविल्यास त्यांचे धंदे सांवरतील, एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानाचें परकी राष्ट्रावर असलेलें आर्थिक अवलंबन नाहींसें होऊन राष्ट्राच्या सांपत्तिक व सामाजिक प्रगतीचा मार्गही खुला होईल. मोठ्या प्रमाणावर चालविलेल्या अर्वाचीन हिंदी धंद्यांचा व त्यांत काम करून पोट भरणाऱ्या मजूरांचा विचार कर्तव्य असतां त्यांजकडे मोठमोठ्या पाश्चात्य कारखान्यांबद्दलच्या एकतर्फी दृष्टीनेंच पाहून चालणार नाहीं.

चहा, कॉफी इत्यादि विशिष्ट स्वरूपाचीं पिकें काढण्याचे मोठमोठे मळे सोडून दिल्यास अनेक खनिज द्रव्यांच्या खाणी व तयार मालाचे कांहीं कारखाने एवढेच धंदे संघटित स्वरूपांत असलेले दिसतात. ह्या सर्व धंद्यांत मिळून सन १९२१ सालीं एकंदर २६·८ लक्ष मजूर काम करीत होते; म्हणजे एक हजार हिंदी लोकांपैकीं मजूर ह्या नात्यानें केवळ ८ जणांचाच कारखाने व गिरण्या ह्यांच्याशीं संबंध येत होता. ह्या संख्येंत ६·८ लक्ष स्त्रियांचा अंतर्भाव होत असून त्यांपैकीं फक्त साडेसत्तावनहजार स्त्रिया कुशलतेचीं कामें करण्यांत गुंतलेल्या आहेत. पुरुष मजूरांत कुशल कामकऱ्यांची संख्या साडेसहा लाखांवर आहे. मळ्यांतील मजूर वर्गांत कुशल कामगारांची म्हणण्यासारखी जरूर नसते; उलट, विणण्याच्या व यंत्रांच्या कारखान्यांत जवळ जवळ निम्मे लोक ‘कुशल’ असावे लागतात. साध्या मजूरीच्या कामांत बायका व मुलें ह्यांचें पुरुषांशीं प्रमाण वाढतें असतें व मळ्यामध्यें तर जवळ जवळ पुरुषांइतक्याच स्त्रियाही कामावर असलेल्या आढळतात. मुलांचें प्रमाण मळ्यांतील कामकऱ्यांशीं शेंकडा वीस इतकें आहे.

आसामांतील चहाचे मळे, कलकत्त्यांतील तागाच्या गिरण्या, बंगाल व बहार प्रांतांतील कोळशाच्या खाणी, बहार व ओरिसा प्रांतांतले लोखंड व पोलाद ह्यांचे कारखाने आणि मुंबई व अहमदाबाद येथील सुताच्या व कापडाच्या गिरण्या ह्यांमध्यें काम करणारे मजूर दूरदूरच्या प्रांतांतून येऊन एकत्र होत असतात. त्यांपैकीं बराच मोठा भाग पावसाळ्यांत आपापल्या खेडेगांवीं जाऊन शेतकामांत गुंततो व पुन्हां हिंवाळ्याच्या तोंडीं कारखान्यांत रुजू होतो. ह्या मजूरांस शहरच्या राहणीचा

व कारखान्यांतील कामाचा मनापासून कंटाळा असूनही शेतीच्या धंद्यांत पूर्णपणें उदरनिर्वाह होत नसल्यानें त्यास वारवार थारेपालट व धंदेपालट हे करावे लागतात. हिंदी मजूरांची कार्यक्षमता कमी होण्याचीं जी अनेक कारणें आहेत त्यांत वरील गोष्टीचा अवश्य अंतर्भाव केला पाहिजे. शेतीचा धंदा अंग मोडून करणाऱ्या कामकऱ्यास पुरेसा रोजगार व पुरेशी पातळी मिळण्याइतका तो धंदा जोपर्यंत सुधारला नाही तोपर्यंत शेती व कारखाने ह्यामध्ये कामकरी लोंचकळत राहून दोन्ही धंद्यांची उत्पादकता कमी झाल्याखेरीज राहणार नाही.

वर नमूद केलेल्या संघटित धंद्यांपैकी काही प्रमुख धंद्यांबद्दल पुढें थोड्या विस्तारानें अधिक माहिती दिली आहे ती उपयुक्त ठरेल. चहाशिवाय कॉफी व रबर ह्यांचेही मोठमोठे मळे हिंदुस्थानांत अस्तित्वात आहेत. चहाचे मळे मुख्यतः आसाम व बंगाल ह्या प्रांतात असून त्यामध्ये ७,८१,६०० मजूर कामावर असतात. हे सर्व कामकरी कायम नोकर असून अदमासें ५८,००० इसमच हंगामी स्वरूपाचे आहेत. एकट्या आसाम प्रांतांत वरील संख्येपैकी ३/४ लोक कामावर असून ते लगतच्या प्रांतांतीलच आहेत. तेथील मळ्यांतील अनेक अवजड कामें डोंगरी मुलखांत राहणाऱ्या रानवट जातींतील लोकांकडून करविली जातात. एकंदर मजूरांच्या संख्येंत बायकांचें प्रमाण मोठें असून लहान मुलेंही पुष्कळ कामावर आहेत. हिंदुस्थानांतील कोळशाच्या खाणींच्या धंद्यांत सुमारें दोन लाख मजूर कामावर असून त्यांपैकी ५०,००० वर बायका व १४०० मुलें आहेत. एकंदर संख्येपैकी शेंकडा ६० एवढा भाग बहार व ओरिसा ह्या प्रांतांतील खाणीत कामावर आहे व ते मजूर मुख्यतः त्याच व शेजारच्या प्रांताचे रहिवासी आहेत. कोळशाच्या खाणींतील पुष्कळ मजूर पावसाळ्यात शेतीच्या कामात गुंतलेले असतात. खाणीतून कोळसा खणून काढण्याच्या कामांत संताळ लोक विशेष प्रवीण असून त्या जातीचे पुष्कळ लोक खाणीत कामावर आहेत. मजूर कायम कामास रहावे अशी इच्छा असल्यास त्यांस शेतीकरतां जवळपास जमीन देणे आवश्यक आहे असा खाणीच्या चालकांचा अनुभव आहे. ज्या खाणीदारास असें करता येत नाही त्याच्या मजूरांपैकीं फार मोठा भाग हंगामी स्वरूपाचा असतो. जमशेदपूर येथील पोलादाच्या कारखान्यांत सामान्य प्रतीचें काम करण्यास आजूबाजूचे व मध्यप्रांतातले लोक मिळतात; परंतु उच्च प्रतीचे कामकरी ( खलाशी ) ओरिसा प्रांत व विझगापट्टम्‌कडील भागांतून येतात. हो, संताळ व भूमीज ह्या रानटी जातींतील लोकही अनेक कष्टाची व कुशलतेची कामें करण्यास उपयोगी पडतात. कापसाचे सूत कातण्याचे व कापड विणण्याचे सुमारें १५०० लहान मोठे कारखाने असून त्यांमध्यें साडेचार लाख मजूर कामावर आहेत. ह्यांपैकी निम्म्याच्यावर भाग मुंबई इलाख्यांतच आहे. मुंबईतील कापसाच्या गिरण्यांतील कामकरी कलकत्त्याच्या कामकऱ्यांहून अधिक

कार्यक्षम असतात. कोंकण व देश येथील मराठे व मुसलमान ह्या जातींतूनच मुख्यतः मुंबईतील मजूरांचा भरणा होत असतो. खानदेश, वऱ्हाड, मध्यप्रांत, मध्य-हिंदुस्थान ह्या भागांत सरकी काढण्याचे व कापसाचे गठ्ठे बांधण्याचे जे हंगामी कार-खाने आहेत त्यांतील कामकरी अगदींच अडाणी असतात व त्यांचा आजूबाजूच्या भागांतूनच पुरवठा होतो. मुंबई, मद्रास, पंजाब, संयुक्तप्रांत ह्या भागांतील अशा तऱ्हेच्या कारखान्यांत लागणाऱ्या फिटर, इंजिनीयर वगैरे अर्धवट सुशिक्षित धंदे-वाल्यांचा पुरवठाही मुबलक आहे.

**८ धंदेशिक्षण व यांत्रिक शिक्षण—** हिंदुस्थानांतील जुने कारागिरीचे धंदे व कलाहुन्नर ह्यांचें पुनरुज्जीवन होऊन ते भरभराटीस आणावयाचे असतील तर त्यांच्यांत गुंतलेल्या कामकऱ्यास अर्वाचीन पद्धतीतील महत्त्वाच्या विशेषांचें ज्ञान होणें आवश्यक आहे. उद्योगधंदे व कला ह्यांमध्यें यांत्रिक सुधारणामुळें क्रान्ति घडून येण्यापूर्वी यांत्रिक शिक्षणास महत्व असणें शक्य नव्हतें. त्या वेळीं, विवक्षित धंद्यांतील जुने कारागिर स्वतःच्या मुलाबाळांस अगर इतर शिकाऊ इसमांस आपापलें कसब हळूहळू शिकवीत. एकंदरीनें उत्पादक कलांत विशेष बदल होत नसल्यानें व विवक्षित जातींत विशिष्ट धंदे वांटून दिले असल्यानें ही धंदेशिक्षणाची पद्धत समाधानकारक ठरत असे. परंतु उत्पादक कलांत यांत्रिक शोधांच्या साहाय्यानें सारखी सुधारणा व क्रान्ति होऊं लागल्यापासूनच्या अलीकडील स्पर्धात्मक काळांत प्रत्येकास हवा तो धंदा करण्याची मुभा असते व त्यास सामान्य यांत्रिक शिक्षण अगर विशिष्ट धंदे शिक्षण दिल्याखेरीज तो कार्यक्षम होऊं शकत नाहीं. धंदे-विषयक ज्ञानांत वाढ न झाल्यास एकेकाळीं भरभराटींत असलेल्या धंद्याच्या कार्यक्षमतेस व किफायतशीरपणास कशी ओहोटी लागते हें हिंदी विणकरांच्या उदाहरणावरून स्पष्ट होईल. यंत्रांच्या साहाय्यानें व प्रचंड प्रमाणावर चालणाऱ्या अलीकडील उद्योग-धंद्यांत तर एका धंद्यातील शेंकडों पोटधंद्यांचें व प्रत्येक पोटधंद्यांतील अनेक भागांचें विशिष्ट ज्ञान कामकऱ्यास नसेल तर धंद्यांची अगर कामकऱ्याची सुस्थिति राहण्याची आशाच नको. हिंदुस्थानांतील जुना कारागीर वर्ग नामशेष होत आहे ही अत्यंत दुर्दैवाची व करुणाजनक गोष्ट होय हें खरें, परंतु ह्या आपत्तीतून निसटण्याचा मार्ग जुन्या पद्धतीचें सरग्हा पुनरुज्जीवन करणें हा नव्हे आणि नव्या पद्धतीचें कारागीरांस शिक्षण देऊन आणि नवीन साधनाचा त्यांस पुरवठा करून त्यांच्या धंद्यांचें पुनरुज्जीवन करणें आवश्यक आहे हें विसरतां कामा नये. धंदेशिक्षणाच्या व यांत्रिक शिक्ष-णाच्या शाळा स्थापून तेथें सर्व वर्गांच्या तरुणांस सर्व धंद्याचें संपूर्ण व प्रगतिपर ज्ञान मिळण्याची व्यवस्था झाल्यास येथील उद्योगधंद्यांची उत्पादकता सुधारूं लागेल. यांत्रिक व उत्पादक सुधारणांपैकीं कित्येकांचा पूर्ण उपयोग करून घेण्यास त्यांचें फार मोठ्या प्रमाणावर अवलंबन करावें लागतें असें मागें म्हटलेंच आहे.

औद्योगिक व यांत्रिक शाळांतील पुष्कळ विद्यार्थ्यांस मोठमोठ्या कारखान्यांत पगारी नोकर ह्या नात्याने काम करावें लागते ते ह्याच कारणामुळे होय. परंतु स्वतंत्र धंद्याच्या भावनेस बळी पडून स्वतःची व राष्ट्राची आर्थिक अवनति हात जोडून पहाण्यापेक्षां अर्वाचीन धंद्यातील कसबांत तरबेज होऊन आपली व देशाची सांपत्तिक परिस्थिति सुधारावी हाच मार्ग श्रेयस्कर होय.

सूत व कापड ह्यांच्या गिरण्या, खाणी, कारखाने, आगगाड्या बांधण्याचे व दुरुस्त करण्याचे धंदे वगैरे अलीकडील सर्व धंद्यांत निरनिराळ्या प्रकारचे ज्ञान व कौशल्य लागत असून ते सर्व जातींतील तरतरित व बुद्धिमान इसमास शिक्षण दिल्यानेंच संपादतां येईल. हिंदुस्थानातील बुद्धिप्रधान वर्गांत केवळ वाङ्मयविषयक ज्ञानाचा प्रसार होत असून त्याच्यापैकीं शिक्षित तरुणास पुरेसा वावही मिळत नाहीसा झाला आहे. इतर वर्गांस उच्च प्रतीचें धंदेशिक्षण घेण्याची पात्रता अगर संधी म्हणण्यासारखी मिळत नाहीं. जे थोडे बुद्धिवान लोक अर्वाचीन धंदेशिक्षण संपादन करण्याचा प्रयत्न करतात त्यांचे ज्ञान बहुशी पुस्तकी स्वरूपाचें असल्यानें येथील उद्योगधंद्यांत त्यांसही नोकरी मिळणें दुरापास्त होते. ‘सुशिक्षित’ वर्गांत बेसुमार बेकारी असावी आणि धंदे व कारखाने ह्यांच्या मालकास परराष्ट्राहून ‘सुशिक्षित’ कारागीर भारी पगारावर आणण्याची अगर येथील कमी प्रतीच्या कामगारांवर वेळ मारून नेण्याची आवश्यकता भासावी ह्या अनुभवावरून हिंदी शिक्षणपद्धति अत्यंत सदोष आहे हें पूर्णपणें सिद्ध होतें. आपल्या इकडे वरिष्ठ समजल्या जाणाऱ्या वर्गांची उद्योगधंद्यांसंबंधाची तुच्छतेची भावना नाहींशी झाल्याशिवाय आणि सर्व वर्गांतील व जातींतील लायख इसमांस योग्य वयात योग्य प्रकारचें धंदेशिक्षण देण्याची व्यवस्था झाल्याशिवाय सुशिक्षित कारागिरांचा पुरवठा प्रमाणशीर होणार नाहीं हे उघड आहे. जर्मनी, जपान, इग्लंड, अमेरिका वगैरे पाश्चात्य राष्ट्रांत शिक्षणपद्धति व उद्योगधंद्यांची परिस्थिति ह्यांचे व्यवस्थित नियमन करण्याचे कार्य सरकार, धंद्याचे मालक व शिक्षणविषयक तज्ज्ञ ह्यांच्या सहकार्यानें घडून येतें. हिंदुस्थान सरकार व बहुतेक सर्व प्रांतिक सरकारें धंदेशिक्षणाकरिता शिष्यवृत्त्या देण्याचें धोरण अंगिकारीत आहेत. इकडील धंदेवाल्यांचें लक्षही नवीन पिढीस धंदेशिक्षण देण्याकडे वाढत्या प्रमाणात जाणें आवश्यक आहे. नवीन पिढीस अर्वाचीन ज्ञान संपादन करण्यास मदत करणें हे ज्यांचें कार्य त्या शिक्षणविषयक तज्ज्ञांनीही ह्याच मार्गानें शिक्षणपद्धतींत सुधारणा घडवून आणली तर राष्ट्रीय प्रगतीस पुष्कळच मदत होईल.

सुशिक्षित कारागिराचा हिंदुस्थानांत पुरेसा पुरवठा होत नाहीं अशी धंदेवाल्यांची सामान्य तक्रार असते. त्यांचा व इतर काही लोकांचा असा एक कोटिक्रम असतो की हिंदी उद्योगधंद्यांचें क्षेत्र मर्यादित असल्यानें, औद्योगिक शिक्षणाच्या संस्था मोठ्या प्रमाणावर अस्तित्वांत आल्यास त्यांच्यातून

बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांस पुरेशा नोकऱ्या मिळणार नाहींत. ह्या आक्षेपांत आमच्या मतें फारच थोडें तथ्य आहे. हिंदी उद्योगधंद्यांची आजची व पुढील कांही वर्षांची स्थिति सूक्ष्मपणें अजमावून येथील औद्योगिक संस्थांत जरूर त्या प्रकारचें व दर्जाचें तात्त्विक व व्यावहारिक शिक्षण देण्याची व्यवस्था करणें अशक्य नाही. परंतु वरील प्रकारचा कोटिक्रम करणाऱ्या कित्येक धंदेवाल्यास मनांतून यांत्रिक शिक्षण घेतलेल्या तरुणांसंबंधी जो प्रतिकूल पूर्वग्रह असतो तो मात्र सर्वथैव त्यांच्या अदूरदृष्टीचें द्योतक होय. कमी पगारावर कमी कार्यक्षमतेचे नोकर ठेवण्यापेक्षां वाढत्या पगारावर वाढत्या कर्तबगारीचे नोकर ठेवणें व्यक्तिशः नोकरांच्या, एकंदर राष्ट्राच्या व परिणामी स्वतः धंदेवाल्यांच्याही हिताचें असतें ही गोष्ट प्रगमनशील राष्ट्रांतील अनुभवावरून सहज सिद्ध होणारी आहे. औद्योगिक संस्थांतून शिक्षण घेऊन बाहेर पडणाऱ्या काही तरुणांत दिसून येणारा शरीरकष्टाच्या कामाबद्दलचा तिटकारा व कारागीर वर्गांतील ज्या थोड्यांस आधुनिक शिक्षणाचा लाभ झाला आहे त्यांची कारकुनी पेशाची कामें पतकरण्याची प्रवृत्ति ह्या दोन्ही गोष्टी आपमतलबी धंदेवाल्यांच्या धंदेशिक्षणास होणाऱ्या विरोधाइतक्याच शोचनीय व त्याज्य होत. कारखान्यांत काम करणाऱ्या लोकांत प्रत्यक्ष कामें करणारे व काम करून घेणारे असे दोन वर्ग सहाजिकपणेंच पडतात. सर्वच सुशिक्षित कामकऱ्यांनीं एकदम वरीलपैकी दुसऱ्या वर्गांत दाखल होण्याचा हव्यास धरला तर त्याची निराशा झाल्याशिवाय राहणार नाही. आगगाड्या, खाणी, गिरण्या, कारखाने इत्यादि आज चालू असलेल्या यांत्रिक धंद्यांच्या मालकांनी धंदेशिक्षणास मनापासून मदत करण्याचें व सुशिक्षित कामगारांस शक्य ती नोकरी देण्याचें धोरण स्वीकारल्यास सुशिक्षित मजूरांच्या बेकारीबद्दल वाटणारी बरीच भीति कमी होईल. विशेषतः ज्या कारागीर वर्गास कलाहुन्नर व कसबी धंदे ह्यांचें वंशपरंपरा बाळकडू मिळत असतें त्यांस नव्या शिक्षणानें कार्यक्षम करण्याचें धोरण स्वीकारल्यास तें धंदेवाल्यास व देशास फायदेशीर ठरेल.

हिंदी उद्योगधंदे कुशल कारागिरांच्या बाबतींत परराष्ट्रांवर अवलंबून राहतील तर ती त्यांची अक्षम्य चूक समजली पाहिजे. चांदोसी येथें आगगाड्यांच्या धंद्यांतील अनेक भागांचे व्यावहारिक शिक्षण देण्यासाठी जी नवीन संस्था सरकारनें काढलेली आहे ती केवळ प्रारंभ ह्या दृष्टीनें अभिनंदनीय असून ह्याच मार्गानें इतर मोठमोठ्या धंदेवाल्यांनी सहकार्यानें उपक्रम केल्यास तो यशस्वी ठरल्याशिवाय राहणार नाहीं. सर्व जातींच्या व वर्गांच्या लोकांत साक्षरतेचा प्रसार करणें हा औद्योगिक व यांत्रिक शिक्षणाचाही पाया आहे हें आतां सर्वमान्य झालें आहे. परंतु प्राथमिक शिक्षणक्रम संपल्यानंतर व्यावहारिक कलांचें ज्ञान मिळविण्यास किंवा साधारण दुय्यम प्रतीचा इंग्रजी शिक्षणक्रम झाल्यानंतर सामान्य प्रतीचें यांत्रिक

शिक्षण व जरूर तेवढा व्यावहारिक अनुभव मिळविण्यास पुरेशा सोयी उपलब्ध करून देणें आवश्यक आहे. मुंबईची 'व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिटयूट,' कापसाच्या धंद्यासंबंधी माहिती देण्यासाठीं काढलेलें 'कॉटन इन्स्टिटयूट' आणि खाणींच्या धंद्यासंबंधी शिक्षण देणारें 'माइनिंग स्कूल' इत्यादि संस्थांसारख्या अनेक संस्था निरनिराळ्या धंद्यांत व प्रांतांत स्थापन होणें इष्ट आहे. धंद्यांत भासणारी शिक्षित कामकऱ्यांची वाण व योग्य शिक्षणाच्या सोयी ह्यांची तोंड-मिळवणी सरकार व धंदेवाले ह्यांच्या संघटित प्रयत्नानें करणें शक्य व जरूर आहे. शेतीच्या धंद्यांतही केवळ कष्टाळूपणावर व देवावर हवाला न ठेवतां नवीं पिकें, नवी आउतें व सुधारलेली लागवडीची पद्धत ह्यांचा अंगीकार करून शेतीचें उत्पन्न वाढविण्याचे प्रयत्न होणें आवश्यक आहे. ह्या बाबतीतही तात्त्विक व व्यावहारिक शिक्षणाची जरूर तेवढी व योग्य प्रकारची सोय झाल्यास शेतीच्या धंद्याची स्थिति सुधारल्याशिवाय राहणार नाही.

**९ मजुरांचा पुरवठाः—** जरूर त्या प्रकारचे मजूर पुरेसे मिळत नाहीत अशी इकडील कारखानदारांची एक सामान्य तक्रार असते तिचा वर उल्लेख केलेला आहे. संसर्गजन्य व इतर रोगांच्या साथी हिंदुस्थानांत नेहमीं उद्भवत असल्यानें आहे तो पुरवठाही कमी कमी होत जातो. १९१८–१९ सालीं इन्फ्लुएंझाची जी भयंकर सांथ येऊन गेली तिला एकंदर एक कोट लोक बळी पडले असा अंदाज असून त्यांपैकीं बराच मोठा भाग गरीब कामकरी वर्गांपैकीं असला पाहिजे ह्यांत शंका नाही. शिवाय हिंवतापासारखे दिसण्यांत किरकोळ परंतु परिणामीं अत्यंत हानिकारक रोग हिंदी समाजांत कायमचें ठाणें देऊन बसल्यानें निव्वळ मजुरांचीच नव्हे तर एकंदर लोकसमाजाचीही शक्ति व कार्यक्षमता ओहोटीस लागली आहे. तरीही येथील नव्या व जुन्या धंद्यास लागणाऱ्या मनुष्यबळाच्या मानानें हिंदी मजुरांचा पुरवठा अपुरा आहे असे म्हणतां येणार नाही. कारखानदार, धंदेवाले, अगर जमीनींचे मालक ह्यांस जुन्या व कमी मजुरीच्या दरानें पुरेसे कामकरी न मिळाले तर त्यांत आश्चर्य नाही, परंतु तेवढ्यावरून हिंदुस्थानांत मजुरांचा, विशेषतः सामान्य प्रतीच्या मजुरांचा तुटवडा आहे हे विधान खरें मानतां येणार नाहीं मायभूमींत पोट भरत नाहीं म्हणून परदेशीं जाणाऱ्या हिंदी मजुरांचा ओघ आणि बेकारी व उपासमार ह्यांबद्दल सर्वत्र ऐकूं येणारी हकारी ह्यांकडे लक्ष्य दिल्यास मजुरांच्या तुटवड्यासंबंधींची ओरड बहुंशी निष्कारण आहे असें आपणांस दिसून येईल. आपला मूळ गांव अगर प्रांत सोडून न जाण्याचा दुराग्रह हळुहळु नाहींसा होत असून पोट भरण्याकरितां स्वदेशाच्या निरनिराळ्या भागांत व परराष्ट्रांत जाण्यास सर्व दर्जाचे हिंदी लोक अधिकाधिक उद्युक्त होत आहेत. मुंबई व बंगाल ह्यांसारख्या औद्योगिक महत्त्वाच्या प्रांतांत आणि जमशेदपूरसारख्या कारखान्यांच्या शहरांत हिंदुस्थानाच्या बहुतेक सर्व

भागाचे प्रतिनिधी एकत्र रहात असलेले दिसतात. राजकारणांतील अनेक उलाढालीमुळें एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेस उत्तेजन मिळत असता निव्वळ आर्थिक परिस्थितीच्या ओघामुळे सर्व प्रांतांतील लोकांचा घडून येणारा सहवास विशेष महत्त्वाचा नाही असें कोण म्हणेल ? हिंदी लोकांची आर्थिक चलनशीलता वाढत असल्याचा पुरावा भरपूर दिसत असूनही येथील मजुरांच्या प्रतिवर्षी खेडेगावास निघून जाण्याच्या सवयीमुळें स्थायिक व धंदेवाईक मजुरांचा पुरवठा एकदरीनें मर्यादितच भासतो.

स्वतःच्या मालकीची अगर खंडानें घेतलेली जमीन कसून आपला उदरनिर्वाह करणारे लोक खेडेगांवांत बरेच आहेत. परंतु त्या मुख्य धंद्यांत पुरी कमाई न मिळाल्यानें पोटधंदे व मोलमजुरीची कामें करणे त्याच्यापैकी कित्येकांस भाग पडतें. स्वतःच्या जबाबदारीवर शेती करणाऱ्या ह्या वर्गाखेरीज केवळ रोजदारीने मजूरी करणारे अनेक लोक खेडोपाडी दृष्टीस पडतात. त्यांची स्थिति अत्यंत हलाखीची असून त्याचा उद्योगधंद्यात मजूर म्हणून उपयोग होण्यासारखा आहे. ह्याशिवाय, अस्पृश्य समजले जाणारे हीन वर्ग, आणि उडाणटप्पूपणा, गुन्हेगारी व भिक्षा ह्या मार्गांनी उदरंभरण करणाऱ्या असंख्य जाती ह्याच्यांतील लोकसंख्येतूनही मजुरांचा बराच पुरवठा होण्यासारखा आहे. आमच्या सामाजिक व धार्मिक भावनांमुळे, कोट्यवधि कष्टाळू लोकांची उपासमार व दुर्दशा होत असता लाखो आळशी व मिजासखोर भिक्षेकरी पोसले जात आहेत. आपले धर्मबांधव व राष्ट्रबंधु ह्यांच्या निष्कारण तुच्छतेस पात्र झालेले अनेक अस्पृश्य लोक प्रतिवर्षी देशांतर व धर्मांतर करीत आहेत ही गोष्ट सर्व राष्ट्रास, विशेषतः हिंदुधर्मीयास, लाजिरवाणी व हानिकारक आहे. सिलोन, ब्रह्मदेश, मलायाद्वीपकल्पातील बेटे इत्यादि परराष्ट्रांत जाणारा अस्पृश्यांचा ओघ बंद करावयाचा असेल तर जातिभेदासंबंधीच्या आमच्या संकुचित कल्पना सोडणें व देशाभिमान, माणुसकी व आर्थिक हिततत्परता ह्या गुणांस जागून अस्पृश्यतेचे निर्मूलन करणे आवश्यक आहे. बुद्धि, चिकाटी व प्रामाणिकपणा इत्यादि गुणांत अस्पृश्य जातींतील लोक सवर्णी हीन दर्जाचे नसून घरगुती कामें व कारखान्यांतील श्रम करण्यास ते सर्वस्वी लायख असतात असा अनुभव आहे. अस्पृश्यांची हलक्या प्रतीची राहणी, त्यांच्या घाणेरड्या सवयी आणि त्यांच्या भोवती असलेले प्रतिकूल वातावरण इत्यादि दोष सामाजिक, शैक्षणिक आणि आर्थिक सुधारणांनी नाहीसे होण्यासारखे असून त्यांच्यांतील अनेक शारीरिक व मानसिक गुणांचा त्यांच्या व देशाच्या प्रगतीच्या दृष्टीने उपयोग होण्यासारखा आहे. आजच्या बहिष्कृत परिस्थितीतही जमीनीची लागवड करणे, दोर, टोपल्या वगैरे परविणें, कातडी कादणें व रंगविणे, झाडझूड करणे इत्यादि कष्टाची व काही कौशल्याची कामें अस्पृश्य जाती करीत आहेत. ज्याने त्याने आपापल्या सगदरास व

कर्तृत्वास योग्य दिसेल तो धंदा स्वतंत्रपणें करावा हा आर्वाचीन औद्योगिक प्रगतीचा प्रमुख नियम आहे. वरिष्ठ वर्णांतील जातिभेदाचे आर्थिक कारणानीं जसें उच्चाटण होऊं लागलें आहे तसेंच तें अस्पृश्य व इतर समाज ह्यांच्यांतील प्रतिबंधाच्या बाबतींत घडून येणें सांपत्तिक प्रगतीस सर्वथैव आवश्यक आहे. प्रत्येक सुहृदय व प्रामाणिक मनुष्याच्या सदसद्विवेक बुद्धीस अस्पृश्यता हा समाजाच्या सध्याच्या परिस्थितींत महत्तम सामाजिक व नैतिक अन्याय आहे हे कबूल करणें भाग आहे त्यांतही आर्थिक व राजकीयदृष्ट्या अस्पृश्यतानिवारणाचें महत्त्व प्रतिदिनीं वाढत असल्यानें हिंदुस्थानच्या सामाजिक जीवनक्रमावरील हा डाग जितक्या लवकर नष्ट होईल तितका बरा असें म्हटलें पाहिजे. अस्पृश्यांच्या लोकसंख्येबद्दलची पुढील माहिती हिंदुस्थानांतील मनुष्यबळाची मोजदाद करतांना महत्त्वाची ठरेल.

## अस्पृश्यांची प्रांतवार विभागणी

( आकडे हजाराचे आहेत )

| | | | |
|---|---|---|---|
| आसाम | २००० | बडोदे | १०७ |
| बंगाल | ९००० | मध्य हिंदुस्थान | ११४० |
| बिहार ओरिसा | ८००० | ग्वाल्हेर | ५०० |
| मुंबई | १८०० | हैद्राबाद | २२३९ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ३३०० | म्हैसूर | १३२ |
| मद्रास | ६३७२ | राजपुताना | २२६७ |
| पंजाब | २८१३ | त्रावणकोर | १२६० |
| संयुक्तप्रांत | ९००० | | |
| | | एकंदर | ५,२६,८०९ |

योग्य प्रकारचें शिक्षण व उत्तेजन देऊन अस्पृश्य वर्गांतील लोकांस त्यांच्या मर्जीनुसार वाटेल त्या धंद्यांत जाण्याची मोकळीक ठेवली तर शेतकी, उद्योगधंदे, घरकाम इत्यादि अनेक मार्गांनी त्यांची स्वतःची व समाजाची सांपत्तिक परिस्थिति सुधारण्यास मदत होईल. अस्पृश्य मनुष्य हिंदु धर्मांतून ख्रिश्चन अगर मुसलमान धर्मांत गेला म्हणजे सर्व धंद्यांचीं द्वारें त्यास उघडलीं जातात एवढेंच नव्हे तर कित्येक धंद्यांत त्याच्या नव्या धर्मामुळें त्यास विशेष महत्त्व प्राप्त होतें. ह्यावरून हिंदु समाजास स्वतःच्या आर्थिक प्रगतीची चाड असल्यास अस्पृश्यता निवारण करणें किती अगत्याचें आहे हें उघड होईल. जंगलांत व डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या रानटी व गुन्हेगार समजल्या जाणाऱ्या जातींतूनही मजूरांचा बराच पुरवठा होण्यासारखा आहे. ह्या जातींची एकंदर लोकसंख्या एक कोटी साठ लक्ष असून त्यांपैकीं ६० लक्ष लोक आपणांस हिंदु धर्माचे अनुयायी म्हणवितात. शिक्षण व स्थायिक धंदा हीं सुधारणेचीं साधनें त्यांस उपलब्ध करून दिल्यास त्यांच्या दुष्ट संवयी नाहींशा

होऊन ते समाजाचे उत्पादक घटक बनणें अशक्य नाहीं. सरकार व मिशनरी लोक यांचा सदरहू दृष्टीनें प्रयत्न चालू असून त्यास बरेंच यशही प्राप्त झालें आहे. छपरबंद, हरणशिकारी, घाटीचोर इत्यादि पिढीजाद गुन्हेगारांच्या जातीसही सरकार आणि समाजांतील प्रतिष्ठित लोक ह्यांच्या सहकार्यानें शेतकरी, पाथरवट, आणि सामान्य मजूर बनविणें शक्य आहे हें विजापूर व इतर जिल्ह्यांतील अनुभवावरून सिद्ध होतें सोलापूर येथें सुमारें साडेतीन हजार गुन्हेगार जातींतील लोकांची वसाहत असून त्यांतील १५०० इसम गिरणींतील मजुरांचें काम करीत आहेत भामटे, भाट वगैरे इतर गुन्हेगार वर्गांत सुधारणा घडवून आणण्याचे प्रयत्नही यशस्वी होत असून ह्याच मार्गानें सर्व गुन्हेगार जातींची सुधारणा केल्यास सुमारें ४० लक्ष लोकसंख्येस शांततामय राहणीच्या व प्रामाणिक अर्थार्जनाच्या कक्षेत आणल्यासारखें होईल गुन्हेगार जातींतील लोकसंख्येपैकीं शेंकडा अर्धा व जंगली जातींपैकीं शेंकडा दीड इतकेच लोक शाळांत शिकत आहेत ह्यावरून त्या वर्गांत शिक्षणप्रसारास अजून पुष्कळच वाव आहे हें सिद्ध होतें.

हिंदुस्थानाच्या प्रचंड लोकसंख्येपैकी ज्या वर्गांचा धनोत्पादनास कांहीएक उपयोग न होता उलट इतरांनी उत्पन्न केलेल्या संपत्तीवर चरितार्थ चालतो त्यामध्ये भिक्षेकरी, साधू म्हणून मिरविणारे लबाड व नादान लोक आणि काही कर्तव्य-शून्य पुजारी व संन्यासी ह्यांचा अंतर्भाव केला पाहिजे. हिंदी लोकांत दानवृत्ति प्रबल आहे, व बेकारी आणि दारिद्र्य ह्या सामाजिक संकटांचें निवारण करण्यास दातृत्वाचा बराच उपयोग होतो हें खरें. तरी पुष्कळ बाबतींत दान करतांना याचकाच्या स्थितीबद्दल व पात्रतेबद्दल योग्य विचार न होतां अंध धार्मिक भावनेसच प्रामुख्य दिलेलें आढळतें. धर्माच्या अगर स्वतःवर मुद्दाम ओढवून घेतलेल्या विरक्तावस्थेच्या नावावर जे आळशी लोक भिक्षा मागत फिरतात त्यास भिक्षावृत्तीपासून परावृत्त करून कामावर लावल्यास राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीचें पाऊल पुढें पडल्याशिवाय राहणार नाही. हिंदुसभेसारख्या ज्या कित्येक धार्मिक व सामाजिक संस्था आहेत त्यांनी ह्या बाबीकडे आपल्या चळवळीचा ओघ फिरविल्यास बरेंच हित साधेल. निरनिराळ्या धंद्यांची जसजशी कमी अधिक भरभराट होईल त्या मानानें त्यांच्यात काम करणाऱ्या मजुरांचा पुरवठा मर्यादित अगर विपुल होणें आवश्यक असतें. जातिभेदाचीं बंधनें ढिलीं झाल्याशिवाय हिंदुस्थानांतील मनुष्यबळाची प्रमाणशीर विभागणी होणें अशक्य आहे. आपल्या इकडील मध्यम व उच्च वर्गांतील स्त्रिया व मुलें घरकामाखेरीज इतर मार्गांनी अर्थोत्पादनास प्रत्यक्ष मदत सहसा करीत नाहींत हें सर्वश्रुत आहे. पाश्चात्य राष्ट्रांत स्त्रिया व मुलें ह्यांस स्वतंत्रपणें मोलमजूरी करावी लागल्यानें जे कित्येक सामाजिक व आर्थिक अनर्थ होत आहेत त्यांचा इकडे शिरकाव व्हावा अशी कोणाचीच इच्छा नाहीं. परंतु नियमित मर्यादेपर्यंत व

विशिष्ट प्रकारच्या धंद्यांत इकडील स्त्रीवर्गास सध्यांहून अधिक प्रमाणांत भाग घेणें शक्य व हितावह आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं.

आहे तें मनुष्यबळ अधिकांत अधिक उत्पादक मार्गानें उपयोगी आणण्याचें अर्वाचीन काळचें प्रमुख साधन म्हणजे यंत्रे व सुधारलेली हत्यारें ही होत. विवक्षित श्रमाच्या साहाय्यानें अधिक उपयुक्त वस्तु उत्पन्न करणें हें यांत्रिक सुधारणाचें मुख्य कार्य होय, असें मागें सांगितलें आहे. तेलाचे घाणे, पिठाच्या गिरण्या, विहीरीस लावलेले पंप, शिवण्याचीं, सडण्याचीं, मोलण्याचीं, रस काढण्याचीं वगैरे यंत्रें, यांत्रिक शक्तीनें चालणारे माग इत्यादि अनेक बाबतांत पूर्वीपेक्षां कमी श्रमानें तितकेंच काम होत असलेलें किंवा तितक्याच श्रमानें पूर्वीपेक्षां अधिक काम होत असलेलें आपण प्रत्यक्ष डोळ्यानीं पाहतों. यांत्रिक सुधारणांनीं श्रमाची जरूरी कमी भासल्यानें विवक्षित धंद्यांत बेकारी उत्पन्न होण्याची भीति असतें हें खरें; तरी सर्व धंद्यांचा एकत्रिक विचार केल्यास यंत्राच्या साहाय्यानें समाजाची उत्पादकता वाढून औद्योगिक प्रगतीमुळें अधिक कामकऱ्यास काम मिळून प्रत्येक व्यक्तीचें उत्पन्न वृद्धिंगत होण्यासारखें असतें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. तसेंच, श्रमविभागाच्या तत्त्वाचें अधिकाधिक अवलंबन केल्यास श्रमाचें उत्पादक सामर्थ्य वाढतें हेही विसरतां कामा नये. हिंदुस्थानांतील लोकांचा प्रमुख धंदा शेतकी हा आहे व त्या धंद्यांत श्रमविभागास विशेष अनुकूल परिस्थिति नसते. इतर धंद्यांतही उत्पादनाचें प्रमाण फार लहान असल्यानें एकाच धंद्यांतील लहानसहान भाग स्वतंत्र कारागिराकडून तयार करून घेणें अवघड असतें. तरीही धंद्यांची संघटना अधिक कार्यक्षम करून व कारागिरांचें सहकार्य घडवून आणून अल्प प्रमाणावरील उत्पादनांतही श्रमविभागापासून होणारे फायदे मिळविणें अशक्य नाहीं. जर्मनीमध्यें खेळणीं तयार करण्याचा धंदा सुसंघटित झालेला असून एका खेड्यांतील सर्व लोक एक विशिष्ट खेळणें किंवा त्याचा एकच भाग करतांना दृष्टीस पडतात. ह्याच प्रकारानें हिंदुस्थानांतील अनेक लहानसहान धंद्यांची जुळणी केल्यास कामकऱ्याचें व गिऱ्हाइकाचें हित होण्याचा बराच संभव आहे. संघटण व शिक्षण ह्यांच्या जोरावर इकडील अमर्याद मनुष्यबळाची कार्यक्षमता वाढवून राष्ट्राचें आर्थिक जीवन सध्याहून अनेक पटींनी जोमदार करणें शक्य व इष्ट आहे. इकडील बहुतेक कामकरी वर्गाचा जमीनीशीं असलेला लागाबांधा एका दृष्टीनें हितावह असला तरी धंदेवाईक आणि कायमची नोकरी करणारा औद्योगिक मजूरांचा वर्ग इकडे निर्माण झाल्याखेरीज अर्वाचीन पद्धतीचे कारखाने चालणें अशक्य आहे ह्या गोष्टीकडे डोळेझांक करणें योग्य नाहीं. शिवाय, स्वतःची कार्यक्षमता वाढवून आपल्या उत्पन्नांत भर टाकण्याची उमेद व महत्त्वाकांक्षा ह्या गुणांचा हिंदी लोकांत अजून बराच प्रसार व्हावयास पाहिजे. शिक्षण, यांत्रिकसामुग्री, भांडवल इत्यादि सर्व साधनें उपलब्ध असूनही राष्ट्रांतील नागरिकांत श्रमाची हौस, उद्योगप्रियता, चिकाटी, महत्त्वाकांक्षा

इत्यादि गुणांचा परिपोष झालेला नसेल तर आर्थिक प्रगति होणें अशक्य आहे. हिंदी लोकांत उद्योगप्रियतेचा पूर्ण अभाव असल्यानें हिंदुस्थानातील उद्योगधंदे भरभराटीस येऊन पाश्चात्य राष्ट्रांतील धंद्यांशीं टक्कर देतील अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं, असें कित्येक पाश्चात्य तज्ज्ञांचें मत आहे तें ह्या राष्ट्राच्या स्वाभिमानास खपणारें नसलें तरी तें अंशतः यथार्थ आहे असें म्हटलें पाहिजे. समाजाची व व्यक्तीची सांपत्तिक प्रगति घडवून आणण्याकरितां जे जे मार्ग अवलंबिले जातील त्या सर्वांस लोकांच्या उद्योगप्रियतेची व महत्त्वाकांक्षेची जोड नसेल तर ते शेवटीं निष्फळ ठरल्याशिवाय राहणार नाहीत.

# प्रकरण पांचवें

## भांडवल

**१ भांडवलाचा पुरवठा**—अर्थोत्पादनाच्या अर्वाचीन पद्धतीत भांडवलाचें महत्त्व कोणत्या स्वरूपाचें आहे ह्याबद्दल मागें विवेचन केलें आहे.[१] निव्वळ तात्विक दृष्ट्या बोलावयाचें झाल्यास, मनुष्यानें आपल्या श्रमाच्या साहाय्यानें निसर्गदत्त पदार्थांपासून उत्पन्न केलेली जी वस्तु त्याचे स्वतःचे श्रम अधिक उत्पादक होण्यास मदत करते ती म्हणजे भांडवल असें म्हटलें पाहिजे. ह्या अर्थानें हिंदुस्थानांतील भांडवलविषयक परिस्थितीचें निरीक्षण करावयाचें झाल्यास सर्व प्रकारच्या हिंदी उद्योगधंद्यांत वापरलीं जाणारीं हत्यारें, यंत्रें व इतर उत्पादक साधनें कोणत्या प्रकारचीं आहेत व त्यांचा पुरवठा किती प्रमाणांत होत आहे हे पाहणें आवश्यक आहे. परंतु अलीकडे श्रमविभागाचें तत्त्व उत्पादक धंद्यांत वाढत्या प्रमाणावर प्रस्थापित होत असल्यामुळें जवळजवळ सर्व धंदेवाल्यांस आपलीं हत्यारें, अवजारें अगर यंत्रें इतर उत्पादकांपासूनच मिळवावीं लागतात व भाडें अगर किंमत ह्या नात्यानें त्यांस कांहीं मोबदला द्यावा लागतो. उत्पादनाचे कामीं भांडवलाचा उपयोग व्हावयाचा तो पैशाचा नसून कच्चा माल, यंत्रें, हत्यारें इत्यादि साधनांचा होय. तरी ही साधनें विनिमयप्रधान अशा सध्यांच्या काळांत पैसे देऊन मिळत असल्यानें व्यावहारिक दृष्ट्या धंदेवाल्याजवळचें भांडवल म्हणजे त्यास उपलब्ध असलेला पैसा असें म्हटल्यास चालण्यासारखें आहे. शेतकी, उद्योगधंदे, व्यापार, कलाहुन्नर इत्यादि अनेक मार्गांनीं अर्थोत्पादन करीत असलेल्या लोकांस त्यांच्या विवक्षित धंद्यांतील आवश्यक साधनें अगर तीं मिळविण्यास जरूर असलेलें द्रव्यबल हीं जरूर तेवढ्या प्रमाणांत उपलब्ध आहेत किंवा नाहीं हे ठरविल्याशिवाय देशांतील आर्थिक परिस्थितीचें यथार्थ स्वरूप ध्यानांत येणार नाहीं. मजुरास खाण्यापिण्यास आवश्यक असलेले पदार्थ व उद्योगधंद्यांत वापरला जाणारा कच्चा माल ह्यांची निष्पत्ति मुख्यतः जमीनीच्या लागवडीपासून होत असल्यामुळें शेतकीच्या धंद्यास सर्वत्र विशेष महत्त्व असतें हें साहजिक आहे. हिंदुस्थानांत लोकसंख्येचा जवळ जवळ तीन चतुर्थांश भाग शेतकीच्या धंद्यावर उपजीविका करणारा असल्यानें येथील उत्पादक धंद्यांत त्यास सहजच अग्रपूजेचा मान मिळतो. असें असूनही येथील शेतजमीनींत निघणाऱ्या पिकांची प्रत व एकरी प्रमाण ही

---

१ पान २८, २९, ३४, ३५, ३६ पहा.

पाहिली तर इतर राष्ट्रांच्या मानानें तीं अत्यंत असमाधानकारक असलेलीं आढळतात. जमीनीचा विस्तार अगर तिच्यांतील नैसर्गिक गुण ह्या बाबतींत हिंदुस्थानांत विशेष वैगुण्य आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. मनुष्यबळ व खनिज पदार्थांचा पुरवठा ह्या बाबतींत आपल्या देशांत जी परिस्थिति आहे तिचें मागील प्रकरणात सविस्तर वर्णन केलें आहे, त्यावरून आपल्या आर्थिक अवनतीचें प्रमुख कारण नैसर्गिक अगर 'मनुष्यबळविषयक' नाहीं हेंही वाचकांच्या ध्यानात आलें असेलच. जमीनीचा मोठा विस्तार, अनेक शतकें गाजत असलेली तिची उत्पादकता, विविध प्रकारच्या खनिज पदार्थांची विपुलता, अनेक उत्पादक गुणांत प्रवीण असलेले कोट्यवधि लोक असलीं साधनें उपलब्ध असूनही हिंदुस्थान देश दरिद्री कसा राहिला आहे हें अनेक पाश्चात्य ग्रंथकारांस एक मोठें कोडें पडतें. भांडवलाचा तुटवडा हेंच त्या कोड्याचे खरें उत्तर असावें असें मानल्यास तें बहुंशीं यथार्थच ठरेल. औद्योगिक दृष्ट्या प्रगमनशील असलेल्या राष्ट्रांत साधारणतः स्वराष्ट्राच्या गरजा योग्य प्रमाणात भागवून इतर राष्ट्रात पाठविण्यासही भांडवल शिल्लक उरतें. हिंदुस्थानास मात्र अनेक मोठमोठ्या धंद्यांस लागणाऱ्या भांडवलाच्या बाबतींत परकी भांडवलवाल्यावर विसंबून रहावें लागत असून त्यापासून मिळणाऱ्या भांडवलाचा पुरवठाही मुबलक अगर स्वस्त नसतो. नव्या पद्धतीवर चालणारे कांही हिंदी धंदे बहुंशी हिंदी भांडवलावर उभारलेले आहेत हें खरें तरीही बहुतेक मोठे धंदे, सर्व लहान धंदे आणि शेतकी ह्यास भांडवलाचा पुरवठा जरूर तेवढ्या प्रमाणांत आणि अनुकूल तऱ्हेनें होत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

**१ शेतकरी व भांडवलः**---स्वतः जातीनें किंवा आपल्या कुळामार्फत जमीनीची लागवड करून तिच्या उत्पन्नावर उदरनिर्वाह करणारा मनुष्य म्हणजे शेतकरी असें म्हणावयास हरकत नाही. भांडवलास असलेली मागणी व भांडवलाचा पुरवठा ह्यांविषयी विचार कर्तव्य असतां शेतकऱ्याच्या सांपत्तिक स्थितीचा व त्याच्या विशिष्ट गरजांचा प्रामुख्यानें विचार करावा लागतो. ह्या दृष्टीने पाहता शेतकऱ्यांचे व त्यांच्या गरजांचे पुढील प्रकार दिसून येतात. बऱ्याच मोठ्या जमीनीचा सुसंपन्न मालक, दुसऱ्याची पुष्कळ जमीन खंडानें घेऊन आपल्या योजकतेनें तिची लागवड करणारा सुस्थितींतील खंडकरी, मालकांकडून लहान सहान जमीनीचे तुकडे भाड्यानें घेऊन त्यावर खंड भरणारीं लहान कुळें आणि स्वतःच्या मालकीची जमीन जातीनें कसणारे मिरासदार, असे शेतकऱ्यांचे चार वर्ग पडतात. ह्यांपैकी प्रत्येकास लागणारें भांडवल भिन्नभिन्न गरजा भागविण्याकरितां उपयोगात आणावयाचें असतें. उदाहरणार्थ, जुनें कर्ज फेडणें, भारी खर्चाच्या परंतु कालांतरानें किफायतशीर होणाऱ्या सुधारणा घडवून आणणें आणि तात्कालिक गरजा भागविण्यास आवश्यक असलेली साधनसामुग्री उभारणें ह्या कार्यांस लागणाऱ्या भांडवलाची रक्कम आणि तें

मिळविण्याच्या मार्गांतील अडचणी ह्या भिन्न स्वरूपाच्या असतात. साधारणतः ज्यांस जमीनदार ह्या मोठ्या नांवानें संबोधिलें जातें अशा वर्गांतील लोकांस लागणारें भांडवल त्यांचें स्वतःचेंच असतें आणि प्रसंग पडल्यास त्यांस तें कर्जाऊ मिळण्याची सोय असते. आतां ह्यांपैकी कांहीं लोक उधळेपणानें कर्जबाजारी होऊन स्वतःच्या अनुकूल परिस्थितीचा योग्य फायदा करून घेत नाहीत ही गोष्ट निराळी. परंतु एक मोठ्या जमीनदारांचा वर्ग वगळला तर आपणांस असें दिसून येईल कीं मिरासदार व कुळें ह्या दोन्हीं नात्यानें जमीनीची लागवड करणाऱ्या शेतकऱ्यांस उत्पादक साधनें मिळविण्यास अगर किफायतशीर सुधारणा घडवून आणण्यास आवश्यक असलेलें भांडवल योग्य व जरूर त्या प्रमाणांत मिळत नाहीं. शेताला भरपूर पाणी मिळण्याची सोय करणें, ताली बांधणें, भारी किंमतीचीं खतें व आउतें वापरणें किंवा नांगरटीस व मशागतीस इतर मार्गांनीं सुधारलेल्या साधनांचा उपयोग करून घेणें वगैरे विशेष खर्चाच्या बाबी बहुतेक शेतकऱ्यांस न झेपणाऱ्या अतएव अशक्य वाटतात ह्यांत आश्चर्य नाहीं. परंतु लांकडी नांगर, आउतें, गाडी, जनावरें इत्यादि आवश्यक साधनेंही कित्येक शेतकऱ्यास भाड्यानें अगर कर्ज काढून मिळवावीं लागतात, हें सर्वांस माहीत आहे. कालवे आणि पाटबंधारे ह्यांच्या साहाय्यानें मिळणाऱ्या पाण्याचा पुरवठा जेथें मुबलक असतो आणि जेथें कापूस, ऊंस इत्यादि व्यापारी महत्त्वाची व किफायतशीर पिकें निघतात त्या भागांतील शेतकऱ्यांस माफक दरानें भांडवल मिळविण्याची कांहीं तरी सोय असते. परंतु इतर भागांत मात्र भांडवल नाहीं म्हणून उत्पन्न नाहीं व उत्पन्न नाहीं म्हणून सोयीस्कर रीतीनें भांडवल मिळत नाहीं असाच अनुभव येतो. शेतकरी वर्ग भारी व्याजाच्या दरानें काढलेल्या डोईजड कर्जाच्या भाराखालीं दडपून गेला असून सरकार व लोक ह्यांचे शेतकऱ्यांच्या ऋणविमोचनार्थ चाललेले प्रयत्न बहुंशीं निष्फळ ठरले आहेत. सहकारी चळवळीचें मुख्य ध्येय हिंदी शेतकऱ्यांस जरूर तेवढें भांडवल माफक दरानें उपलब्ध करून देणें हें असून आणि आज पंचवीस वर्षें सरकारचें सहकारी खातें अस्तित्वांत असूनही शेतकऱ्यांपैकी शेंकडा तीनहून अधिक लोक सहकारी मंडळ्यांचे सभासद नाहीत आणि अशा मंडळ्यांच्या सभासदांस मिळणारें कर्जही सरासरीनें माणशीं ५३ रुपयांहून अधिक नाहीं हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी पुणें, नगर वगैरे भागांत झालेल्या शेतकऱ्यांच्या दंग्याची चौकशी करण्याकरितां सरकारनें जें कमिशन नेमलें होतें त्यास सामान्य कुणबी रयताजवळचें त्याच्या जमीनीखेरीज इतर सर्व भांडवल दोनशें रुपयांपेक्षां फारसें अधिक किंमतीचें नसतें असें आढळून आलें. पुढें अनेक दुष्काळांची माहिती मिळवून प्रतिबंधक व निवारक उपाययोजना करण्याकरितां नेमलेल्या कमिशनाचा अभिप्रायही शेतकऱ्यांची स्थिति हलाखीची असून त्यांस योग्य दरानें भांडवल मिळत नाहीं, त्यांचीं उत्पादक साधनें तुटपुंजी असतात व ते कमालीचे कर्जबाजारी आहेत असाच पडला. शेत-

कऱ्यांस माफक दरानें कर्ज मिळून ते आपापल्या शेतांची लागवड कशी सुधारतील आणि जमीनीच्या वाढत्या उत्पन्नांतून कर्ज फेडून आपली आर्थिक उन्नति करून घेण्यास कसे समर्थ होतील हा बिकट व भेसूर प्रश्न आजही राष्ट्रापुढें तसाच उभा आहे.

**३ शेतीचीं साधनें व सरकारः**—नांगर, आउतें, बैल व इतर जनावरें, खतें, बीं, पाणिपुरवठा इत्यादि शेतीच्या साधनांस व शेतांत खपणाऱ्या कामकऱ्यांच्या उदरनिर्वाहास लागणाऱ्या अन्नसामुग्रीस शेतकीचें भांडवल असें म्हणणें योग्य होय. जमीनींतून चांगलीं पिकें निघण्यास पेरलेलें बीं उत्तम प्रकारचें असणें आवश्यक असतें हें उघड आहे; व सामान्यतः प्रत्येक शेतकरी आपल्या जमीनीचा मगदूर ध्यानांत घेऊन शक्य तितक्या चागल्या प्रकारचें बी मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. परंतु अनेक प्रसंगी पेरणीच्या दिवसापूर्वीच जवळचें सर्व धान्य संपल्यामुळें आगोठीस मिळेल तें बीं कर्जाऊ आणण्याची पाळी येते व मुळांत बीच हलक्या प्रतीचें पेरलें गेल्यानें उत्पन्नही असमाधानकारक निघतें. अलीकडे शेतकरी वर्गाचें लक्ष चांगल्या बियांच्या महत्त्वाकडे वळत असून सरकारच्या शेतकी खात्याची बियाचा पुरवठा करण्याची कामगिरी वाखाणण्यासारखी आहे. जमीनीचें उत्पन्न वाढण्यास चांगल्या खताचीही आवश्यकता असते व ज्या ज्या देशांत जमीनीच्या मर्यादित पुरवठ्यामुळें लागवडीचें एकरी उत्पन्न वाढवून लोकांचा गुजारा करावा लागतो तेथें अनेक रासायनिक खतांच्या साहाय्यानें पिकांची उत्पत्ति वाढवावी लागते. हिंदुस्थानांतील लोकसंख्येच्या मानानें येथील जमीन मर्यादित आहे व इतर धंदे मोडकळीस आल्यानें जमीनीच्या उत्पाद-कतेवर फार मोठा ताण पडत आहे हें सर्वश्रुत आहे तरीही हलगर्जीपणामुळें व अज्ञानामुळें आणि विशिष्ट स्वरूपाच्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळें इकडील लागवडींत खताचा जेवढा उपयोग करून घेणें शक्य आहे तेवढाही तो होत नाहीं. रासायनिक खतें साधारणपणें महाग असून त्याचा उपयोग विवेचकबुद्धीनें आणि सामा-न्यतः मोठ्या प्रमाणावर करणें आवश्यक असतें हें खरें. तरी मोठमोठ्या मळ्यांवर आणि कापूस, ऊंस इत्यादि व्यापारी महत्वाच्या पिकाकरितां अशा खतांचा सध्यांहून अधिक प्रसार होणें इष्ट आहे. सामान्य शेतकऱ्यास उपलब्ध असलेलें शेणखतही हल्ली बरेंच वायां जात असून त्याचा योग्य उपयोग केल्यास शेतीचें उत्पन्न वाढल्याशिवाय राहणार नाहीं. भुइमूग, तीळ, जवस इत्यादि गळितांच्या धान्यापासून निघणारी पेंड खताला चांगली उपयोगी पडते, परंतु ह्या पिकांस परराष्ट्रांची जोरदार मागणी असल्या-मुळें प्रतिवर्षी लाखों मण पेंडीच्या खतास हिंदुस्थानदेश पारखा होत आहे. गळिताच्या धान्याची निर्यात नियमित केल्यास अगर तेल काढण्याच्या धंद्यास हिंदुस्थानांतच उत्तेजन दिल्यास सुधारलेल्या शेतीचें आवश्यक साधन असणाऱ्या खताचा येथें अधिक पुरवठा होईल ह्यांत शंका नाहीं. शेतीचा धंदा अधिक किफायतशीर

होण्यास जमीनीचें ठोकळ उत्पन्न वाढणें हाच एक मार्ग नसून लागवडीचा अगर कापणीचा आणि गिऱ्हाइकांच्या गरजा भागविण्यास पीक योग्य होईपर्यंत त्याची रूपांतरें करावयास लागणारा खर्च कमी झाल्यासही शेतीचें व त्यावर अवलंबून असणाऱ्या धंद्यांचें निव्वळ उत्पन्न वाढूं शकतें. लोखंडी नांगर, मोटा, चरक, आउतें, सरकी काढण्याची अगर शेंगा सोलण्याचीं यंत्रें इत्यादि साधनांचा उपयोग केल्यानें शेतांतील पिकाचें परिमाण न वाढले तरी लागवडीचा खर्च कमी झाल्यानें शेतीचा धंदा एकंदरीनें अधिक किफायतशीर होतो ह्यांत शंका नाही. परंतु ह्या साधनांचा उपयोग करावयाचा तर, शेतकऱ्याजवळ पुरेसें भांडवल असणें जितकें आवश्यक असतें, तितकीच पाणिपुरवठा व गिऱ्हाइकांची मागणी ह्यांची स्थिरताहि इष्ट असते. सहकारी मंडळ्यातून शेतकऱ्यांस कर्ज देऊन, अगर लोखंडी चरकांसारखीं यंत्रें हप्त्यानें अगर भाड्यानें मिळण्याची व्यवस्था करून आणि पाण्याचा पुरवठा करणारी साधनें सुधारून वरील यांत्रिक आणि अर्वाचीन सामुग्रीचा शेतकऱ्यांस फायदा मिळवून देणें आवश्यक आहे. ह्या बाबतींत अनेक सरकारी व खाजगी संस्थांचे प्रयत्न चालू असून त्यांचा इष्ट परिणाम होत असल्याची चिन्हें दिसत आहेत. शेतकरी वर्गांत सामान्य शिक्षणाचा व विशेषतः त्यांच्या विशिष्ट धंद्याच्या नवीन परिस्थितिविषयक ज्ञानाचा प्रसार झाल्याखेरीज वरील सामुग्रीचें पूर्ण चीज होणार नाही, हें उघड आहे. प्राथमिक आणि शेतकी शिक्षणाचा प्रसार करण्याचे सरकारी व निमसरकारी प्रयत्न अप्रत्यक्षपणें शेतकीच्या धंद्याची सुधारणा करण्यास आवश्यक आहेत. शेतीच्या साधनामध्यें पाणिपुरवठ्यास अर्थातच विशेष महत्त्व दिलें पाहिजे. इतर सुधारणा नियमित आणि भरपूर पाण्याच्या अभावीं निरुपयोगीच ठरावयाच्या. विहिरी, तळीं, पाटबंधारे, इत्यादि मार्गांनीं शेतजमीनीस पाणी पुरविणें इष्ट असतें व ह्या कार्यास लागणारा खर्च सामान्यतः शेतकऱ्याच्या आंवाक्याबाहेर असतो. ह्यास्तव सरकारनें पाणी पुरवण्याची जबाबदारी सर्वस्वी अगर बहुंशीं आपल्या अंगावर घेतल्याखेरीज शेतीच्या धंद्यास शाश्वति येणार नाहीं.

**४ पाणीपुरवठाः**—भरपूर व नियमितपणें मिळणाऱ्या पाण्याची जमीनीच्या लागवडीस किती आवश्यकता आहे हें सर्वांस माहीतच आहे. सामान्यतः योग्य काळीं पडणाऱ्या पावसानें शेतीस आवश्यक असलेलें पाणी शेतकऱ्यांस मिळत असतें व आपल्या इकडील जुनी शेतकीची पद्धत पाहिली तर आपणांस असें दिसून येईल कीं, पावसाचें परिमाण व कालमान ह्यांस अनुसरून निरनिराळ्या भागांतील पिकांचे प्रकार व लागवडीची पद्धत हीही भिन्न असतात. परंतु स्वावलंबन व नैसर्गिक शक्तींचें आक्रमण हे गुण मनुष्य स्वभावांत उपजत असल्यामुळें वर्षांतून थोडा वेळ पडणाऱ्या पावसाचें पाणी सर्व वर्षभर कसें पुरेल आणि ज्या भागांत अधिक पाऊस पडतो, तेथील पाण्याचा पुरवठा निर्जल प्रदेशाच्या लागवडीस कसा उपलब्ध होईल,

ह्या प्रश्नांस विहिरी, तळी, तलाव, पाट, कालवे इत्यादिकांच्या रूपानें निरनिराळ्या काळचे लोक समर्पक उत्तर देत आले आहेत. शेतीचा धंदा यदृच्छेनें पडणाऱ्या पावसावर अवलंबून असावा हा निसर्गनियम बहुंशी बदलून बी, नांगर, बैल इत्यादि इतर साधनांप्रमाणे पाणीपुरवठा हाही जरूर तेवढें भांडवल खर्च केल्यास आजमितीस बहुतेक सर्व प्रांतांत मिळण्यासारखा आहे. हिंदुस्थानात कृत्रिम साधनांनी पाण्याचा पुरवठा करण्याचा प्रघात फार प्राचीन काळापासून अस्तित्वात असून जुने हिंदु व मुसलमान राजे आपापल्या राज्यांत तळीं व विहिरीं खणणें, कालवे बाधणें वगैरे अर्थोत्पादक कामगिऱ्यांस विशेष महत्व देत असत, हें प्रसिद्ध आहे. इंग्रजी अमलातही शेतकऱ्यास पाण्याचा पुरवठा करून शेतकीचें उत्पन्न वाढविणें व दुष्काळप्रतिबंध करणें हें सरकारचें एक महत्त्वाचें काम समजलें जातें.

हिंदुस्थानांतील एकंदर शेत–जमीन २५ कोटि एकर आहे, असें धरल्यास तिच्यापैकीं जवळ जवळ ५ कोटि एकर जमीनीस विहिरी, कालवे इत्यादि कृत्रिम साधनांपासून पाण्याचा पुरवठा होत आहे असें आपणास दिसेल. ह्या पांच कोट एकरांपैकी दोन कोट एकर जमीनीस सरकारी कालव्यांतून, २५ लाख एकरास खाजगी कालव्यांतून, सत्तर लाख एकरास तळ्यांतून, एक कोटि वीस लक्ष एकर जमीनीस विहिरींतून आणि सुमारें ६० लक्ष एकर क्षेत्रफळास इतर साधनापासून पाणी मिळत असतें. ब्रह्मदेशाचा दक्षिण भाग, आसाम, पूर्वबंगाल, मलबार किनारा वगैरे ज्या भागांत पाऊसपाणी विपुल आहे तेथें कालवे व विहिरी ह्यांचें विशेष महत्त्व नसतें. उलट, सिंध, पंजाब, संयुक्तप्रांत, मद्रास, बहार व ओरिसा ह्या प्रांतात शेतकीच्या गरजाच्या मानानें पावसाचें मान व विभागणी असमाधानकारक असल्यानें नद्या व धरणे ह्यांच्या साहाय्यानें लागवड करणे भाग पडतें. मुंबई इलाख्याचा मध्यभाग म्हणजे साधारणतः दक्षिण महाराष्ट्र. ह्या भागांत पावसापासून मिळणाऱ्या पाण्याचें प्रमाण कमी असूनही नद्यांचे मार्ग व भूरचना ही कालवे वगैरे काढण्यास इतकी प्रतिकूल आहेत कीं, शेतकऱ्यांच्या गरजाच्या मानानें कालवे, तळी व विहिरी ह्यांचा तेथें जेवढा प्रसार होणें आवश्यक आहे तेवढा अजून झालेला नाही. निरनिराळ्या प्रांतांत एकंदर शेतजमीनींतील कालव्यानें अगर विहिरींनी भिजविलेल्या जमीनींची शेकडेवारी किती आहे ह्याबद्दल पुढें जें कोष्टक दिलें आहे, तें वाचकांस उपयुक्त वाटेल.

**पिकें काढलेल्या एकंदर क्षेत्रफळाशीं बागाईत ( विहिरी व कालवे ह्या खालच्या ) जमीनीची शेंकडेवारी. ( १९२६-२७ )**

| प्रांत | शेंकडा प्रमाण | प्रांत | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| सिंध | ८८.५ | बिहार व ओरिसा | ३.९ |
| पंजाब | ४०.२ | ब्रह्मदेश | १२.२ |
| वायव्य सरहद्दीवरील प्रांत | १४.३ | बंगाल | .४ |
| संयुक्तप्रांत | ८.७ | राजपुताना | ९.० |
| मद्रास | १८.८ | मुंबई ( महाराष्ट्र ) | १.३ |
| बलुचीस्थान | ७.३ | वऱ्हाड व मध्यप्रांत | २.२ |
| | | एकूण | १२.८ |

वरील कोष्टकावरून कालवे बांधण्याची अजून किती जरूर आहे हें स्पष्टपणे दिसेल. कित्येक भागांत भूपृष्ठाची रचनाच अशी असते कीं त्यांमधून कालवे काढून नेणें दुर्घट असतें किंवा कालवे खणूनही जमीनीच्या विशिष्ट गुणांमुळें तिच्यांत अधिक लागवड होऊं शकत नाहीं. परंतु अशा भागांचा विस्तार एकंदरीनें कमी असून बहुतेक सर्व प्रांतांत अधिक कालवे व विहिरी बांधणें जरूर व इष्ट आहे. सामान्य शेतकऱ्याचें ज्ञान, उत्साह व आर्थिक बळ हीं सर्वच मर्यादित असल्यामुळें लागवडीचें आवश्यक साधन उपलब्ध करून देण्याचें हें काम करण्याची जबाबदारी सरकारावरच पडणें साहजिक आहे. गेल्या शतकाच्या शेवटीं शेवटीं हिंदुस्थानांत जे अनेक भयंकर दुष्काळ पडले त्यांनी जागें होऊन हिंदुस्थान सरकार पहिल्याप्रथम कालवे व विहिरी ह्याकडे लक्ष्य देण्यास प्रवृत्त झालें. गेल्या पंचवीस तीस वर्षांत कालव्यांचा व पाटबंधाऱ्यांचा सर्व देशभर जारीनें प्रसार होत आहे व त्यांमधून मिळणाऱ्या पाण्याच्या साहाय्यानें शेत जमीनीचें एकंदर उत्पन्न वाढलें आहे हें नाकबूल करतां येणार नाही. १९२१ सालापासून शेतकी व पाणीपुरवठा हीं दोन्ही खातीं प्रांतिक सरकारांच्या हुकुमतीखालीं आलीं असून त्या बाबतींतील सरकारी धोरणावर लोकमताची छाप वाढत्या प्रमाणावर पडत आहे. आजपर्यंत कोट्यवधि रुपये कालवे व विहिरी ह्यांजवर खर्च झाले असून हल्लींही भारी खर्चाच्या अनेक योजना निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं आपल्या अंगावर घेतल्या आहेत. सतलज नदीच्या खोऱ्यांत कालव्यानें पाणी पुरविण्याचें जें काम पंजाबांत नुकतेंच पूर्ण होत आलें आहे, त्यास शेवटीं सुमारें पंधरा कोटी रुपये खर्च येणार असून त्या पाण्यावर ५० लाख एकर जमीनीची लागवड व्हावयाची आहे. तसेंच संयुक्तप्रांतांतील सरकार साडेसात कोटी रुपये खर्च करून 'शारदा' नांवाचा कालवा बांधीत असून १३-१४ एकर लाख जमीनीस त्याचें

पाणी पुरेल असा अंदाज आहे. सिंध प्रांतांत सक्कर येथें सिंधू नदीस प्रचंड धरण बांधण्याची जी योजना हल्लीं अंमलांत येत आहे, तिचा खर्च वीस कोटी रुपयांपर्यंत जाणार असून साठ लक्ष एकर जमीनीस भरपूर पाण्याचा पुरवठा करण्याचें श्रेय तिच्यामुळें मुंबई सरकारास मिळणार आहे. असल्या कमी अधिक महत्त्वाच्या अनेक योजना सर्व प्रांतिक सरकारांपुढें आहेत व त्यास जसजसें मूर्त स्वरूप प्राप्त होईल तसतसा शेतीचा विस्तार, पिकांची विविधता, धान्याची व इतर उद्भिज पदार्थांची समृद्धि ह्यांत समाधानकारक वाढ होईल ह्यांत शंका नाही. निदान पाण्याच्या पुरवठ्याबद्दल हिंदी शेतकऱ्यांस शाश्वति लाभली तरीही हिंदुस्थानांतील सांपत्तिक परिस्थिति पुष्कळच सुधारण्यासारखी आहे.

**५ शेतीचीं जनावरें:—** नांगरटीपासून तों धान्याच्या मळणीपर्यंत लागवडीच्या सर्व कार्यांत आणि वहातुक, चरक, घाणे इत्यादि शेतीस आनुषंगिक असलेल्या धंद्यांत बैल, रेडे, इत्यादि जनावरांच्या शक्तीचें साहाय्य घेण्याचा प्रघात हिंदुस्थानांत फार पुरातन काळापासून अस्तित्वांत आहे. ज्या राष्ट्रांत शेतीचा धंदा अल्प प्रमाणावर करण्याची पद्धत कायम असते, तेथें सामान्यतः यांत्रिक शक्तीचा शेतकऱ्यांस म्हणण्यासारखा उपयोग करून घेतां येत नाही. त्यातल्यात्यांत हिंदुस्थानामध्यें सर्वच औद्योगिक घटना आणि सांपत्तिक परिस्थिति एकंदरीनें संकुचित व अप्रगमनशील असल्यामुळें शेतकऱ्यांस स्वतःचा मुख्य व आनुषंगिक व्यवसाय पार पाडण्यास मनुष्यबळ व जनावरांची शक्ति ह्यांवरच अवलंबून रहावें लागतें. उंसाचे चरक, तेलाचे घाणे, लोखंडी नांगर, शेंगा सोलण्याचीं यंत्रें, इत्यादि सुधारलेलीं यांत्रिक साधनें वापरणाऱ्यांसही मुख्यतः जनावरांचीच शक्ति उपयोगांत आणणें भाग पडतें, हें ध्यानांत घेतल्यास शेतीच्या व त्यावर अवलंबून असलेल्या सर्व धंद्यांत सुदृढ व सकस जनावरांचे किती महत्त्व आहे हें उघड होईल. जुन्या वर्णव्यवस्थेंत वैश्यांस अभियुक्त मानलेल्या धंद्याचें व कर्तव्याचे जनावरांची, म्हणजे मुख्यतः गाई, म्हशी, बैल, रेडे ह्या कृषिकारोपयोगी गुराची जोपासना करून त्यांचा पुरवठा करणें हें प्रमुख अंग मानलें जाई. गाईस सर्व हिंदू लोक पूज्य मानतात, ह्याचें मूळ कारण आर्यांच्या हिंदुस्थानांतील वसतिस्थानांत कृषिकर्माचें व त्यास आवश्यक असलेल्या जनावरांचे समाजधारणेच्या दृष्टीनें विशेष महत्व होतें, हेंच होय. गोपूजेप्रमाणेंच इकडील सर्वसंमत अहिंसेच्या तत्त्वामुळेंही सामान्यतः जनावरांचा पुरवठा मुबलक राहण्यासच मदत होई. पाश्चात्य राष्ट्रांत आणि नव्या वसाहतीत जनावरांची पैदास करणें हाही एक स्वतंत्र धंदा झाला असून मांसाशन करणाऱ्या लक्षावधि लोकांचें अन्न ह्या दृष्टीनेंच तेथील लोकांस जनावरांचें विशेष महत्त्व वाटतें. दूध, लोणी इत्यादि सामान्य खाद्य पदार्थ मिळविण्याच्या हेतूनेंही त्या राष्ट्रांत दुभतीं जनावरें स्वतंत्रपणें बाळगिलीं जातात हें खरें आणि एकंदरीनें अशा अर्वाचीन ‘ गौळी

चाऱ्यांत ' जनावरांचें फारच काळजीपूर्वक संवर्धन केलें जातें ह्यांतही शंका नाहीं. परंतु जनावरांस लागणाऱ्या खर्चाच्या मानानें त्यांच्या दुधातुपापासून अगर शेतीच्या कामापासून पुरेसा फायदा होत नाहीं, असें दिसूं लागतांच तीं ' खाद्य पदार्थ ' बनविण्यास पाश्चात्यांस मुळींच दिक्कत वाटत नाहीं. जनावरांच्या पुरवठ्याच्या प्रश्नाकडे निव्वळ आर्थिक दृष्ट्या पाहिल्यास पाश्चात्य राष्ट्रांच्या परिस्थितींत हें त्यांचें धोरण समर्थनीय ठरण्यासारखें आहे. परंतु येथील धार्मिक, नैतिक अगर लौकिक दृष्टीनें गाई, बैल इत्यादि उपयुक्त जनावरांचा स्वतःचें पोषण करण्यास निर्दयतेनें सररहा संहार करणें ही गोष्ट त्याज्य ठरते. हिंदुस्थानांत जनावरांचा शेतींत व इतर धंद्यांत फार मोठ्या प्रमाणावर उपयोग केला जात असल्यामुळें त्यांस खाद्य पदार्थ समजून त्याचा सर्वस्वी संहार करणें हें आर्थिक दृष्ट्याही समर्थनीय ठरण्यासारखें नाहीं. शेतीच्या व त्यावर अवलंबून असलेल्या धंद्यांस आवश्यक असलेली प्रेरक शक्ति पुरविण्याचें साधन आणि दूध, जळण, खत हे पदार्थ मुबलक व स्वस्त मिळण्याचा मार्ग ह्या अनेकविध बाजूंनीं जनावरांचा म्हणजे विशेषतः गाई, म्हशी, बैल व रेडे ह्यांचा उपयोग होत असल्यानें त्याचा पुरवठा वाढवून तो सुदृढ राहतील अशी व्यवस्था करणें अत्यंत अगत्याचें आहे.

शेतीस उपयुक्त असलेल्या जनावरांचा सध्या हिंदुस्थानांत कितपत पुरवठा होत आहे, हें पुढील माहितीवरून वाचकांच्या ध्यानांत येईल. गुरांची खानेसुमारी अजून विशेष समाधानकारक रीतीनें होऊं लागली नाहीं, हें ध्यानांत ठेवूनच खालीं दिलेले आंकडे वाचणें जरूर आहे. एकंदर ब्रिटिश हिंदुस्थानांत गाई, म्हशी, बैल व रेडे ह्यांची संख्या अदमासें साडे चवदा कोटि आहे. ह्या संख्येचें लागवडीच्या क्षेत्रफळाशीं १०० एकरास ६५ आणि लोकसंख्येशीं शंभर माणसास ६० गुरें असें प्रमाण पडतें. निरनिराळ्या प्रांतांत हीं दोन्ही प्रमाणें अर्थातच भिन्न असतात.

| प्रांत | लागवडीच्या १०० एकरांशीं शेतीच्या जनावरांचें प्रमाण | लोकसंख्येच्या १०० माणसांशीं शेतीच्या जनावरांचें प्रमाण | प्रांत | लागवडीच्या १०० एकरांशीं शेतीच्या जनावरांचें प्रमाण | लोकसंख्येच्या १०० माणसांशीं शेतीच्या जनावरांचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| बंगाल | १०४ | ५५ | मध्यप्रांत व वऱ्हाड | ४६ | ७९ |
| मद्रास | ६७ | ५४ | आसाम | ९६ | ७३ |
| मुंबई | ३० | ५५ | वायव्यसरहद्दीवरील प्रांत | ४७ | ४८ |
| सिंध | ४५ | ५५ | | | |
| संयुक्तप्रांत | ८३ | ६६ | अजमीर | ११३ | ६८ |
| बिहार-ओरिसा | ७८ | ५८ | दिल्ली | ६२ | २८ |
| पंजाब | ५६ | ७० | कूर्ग | १०४ | ८३ |
| ब्रह्मदेश | ५६ | ४४ | माणदूर | ८६ | १२० |

ब्रिटिश हिंदुस्थानांतील शेतीच्या जनावरांची संख्या वर्गवारीनें पुढें दिली आहे.

| वर्ग | १९०९-१० मधील संख्या | १९२१-२२ मधील संख्या |
| --- | --- | --- |
| बैल | ४०, ५३०, ००० | ४८, ९७५, १२३ |
| गाई | ३१, ५३५, ००० | ३७, ०००, २९१ |
| वासरें ( गायांची ) | ३०, ३६०, ००० | ३०, ६८९, ९५१ |
| रेडे | ४, ७२६, ००० | ५, ४११, ०८९ |
| म्हशी | १२, २२०, ००० | १३, ३०९, ४६५ |
| वासरें ( म्हशीची ) | ——— | ९, ६१४, ३४५ |

वरील दोन्ही कोष्टकावरून जनावरांच्या बाबतींत एकंदर हिंदुस्थानांतील आणि विवक्षित प्रांतांतील स्थिति किती असमाधानकारक आहे हें दिसून येईल. पांच एकर शेतजमीनीची मशागत करण्यास एक बैल जोडी पाहिजे असें गृहीत धरलें तरी एकंदर शेतजमीनीच्या मानानें जनावरांचा तुटवडा पडत आहे असेंच दिसेल. विशेषतः मुंबई इलाख्यांत तर सर्वच शेतीच्या जनावरांचें शेतजमीनीशीं फार कमी प्रमाण असलेलें दिसतें. जनावरांच्या संख्येचा विचार त्यांच्या शक्तीच्या व उपयुक्ततेच्या प्रमाणाशीं मेळ घालूनच करावयास पाहिजे, आणि त्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील बहुतेक भागांतील गुरें एकंदरीनें कमी दर्जाची आहेत असें म्हटलें पाहिजे. देशाच्या कित्येक भागांतील जनावरें शक्ति, चापल्य, कस इत्यादि गुणांत आज शेंकडों वर्षे नाणावलेलीं आहेत हें खरें. तरी कांहीं अंशीं त्यांचा चारा, पेंड इत्यादि खुराक मर्यादित झाल्यामुळें आणि कांहीं अंशीं कसाईखान्यांच्या वाढत्या मागणीमुळे चांगल्या गुरांची संख्या एकंदरीनें घटत चालली आहे असेंच म्हटलें पाहिजे. भूतदयेनें प्रेरित झालेले व धार्मिक भावनेचे लोक, शेतकीचा धंदा अधिक उत्पादक करण्याची खटपट करणारी मंडळी आणि स्वतःस रयतेचे मायबाप म्हणविणारें सरकार ह्या सर्वांचें प्रस्तुत प्रश्नाबद्दल एकमत होण्यासारखें आहे. गोरक्षणाच्या चळवळीतील एकांतिक धार्मिक भावना बाजूस ठेवली व निव्वळ जनावरांची निपज वाढविण्याचा व सुधारण्याचा एक प्रयत्न ह्या स्वरूपानें ती चालविली तरीही हिंदी शेतकऱ्यांच्या सांपत्तिक परिस्थितीत व एकंदर समाजाच्या आरोग्यांत बरीच सुधारणा घडून येईल ह्यांत शंका नाहीं. आधुनिक पद्धतीवर चालविलेले खिल्लारखाने व गौळवाडे ह्यांकडे सरकार व लोक ह्याचें अधिक लक्ष्य जाणें आवश्यक आहे. गुरांचे रोग नाहींसे करण्याचे उपाय योजणे, गुरांचे बाजार व प्रदर्शनें भरवून उत्तम गुरांची पैदास करणारांस उत्तेजन देणें, सर्व काळीं उत्तम चारा भरपूर प्रमाणांत व माफक दरानें मिळेल अशी व्यवस्था करणें इत्यादि मार्गांनीं पद्धतशीर व जोरदार प्रयत्न केल्यास शेतीचें व शेतकऱ्यांचें हितच होईल. गोरक्षणासारख्या चळवळींत एकांतिक स्वरूपाच्या आर्थिक व धार्मिक कल्पनांचा काहींसा विरोध येतो हे खरे मानले तरी निव्वळ आर्थिक

दृष्ट्याही दुभत्या जनावरांचा आणि शेतीच्या गुरांचा पुरवठा सुधारण्याचा निकराचा प्रयत्न करणें आवश्यक आहे हें विसरतां कामा नये. ह्या बाबतीत 'अज्ञ' लोकांच्या धार्मिक व भूतदयाप्रेरित भावनाचा फायदा घेऊनच सुशिक्षित लोक आणि सरकार ह्यांनी आर्थिक सुधारणा घडवून आणणें अशक्य नाहीं.

**६ लहान धंदे व भांडवलः—** खेडेगांवांतील आणि शहरांतील स्वतंत्रपणें धंदा करणाऱ्या कारागिरांचा वर्ग सामाजिक व आर्थिक दृष्ट्या विशेष महत्त्वाचा समजला जातो. अलीकडील यांत्रिक युगात लहान सहान धंदेवाल्याचा मोठमोठ्या प्रतिस्पर्ध्यांपुढें टिकाव लागणें अशक्य झालें आहे, तरीही धंदेशिक्षण, प्रेरकशक्ति व इतर स्वल्प खर्चानें मिळणारी यांत्रिक साधनें कारागिर वर्गास पुरविली तर त्यांचें स्वतंत्र अस्तित्व टिकणें अशक्य नाही, ह्याबद्दल मागें प्रास्ताविक भागांत आलेलें विवेचन वाचकांस आठवत असेलच.[1] परंतु शिक्षण, शक्ति अगर साधनें ह्यांपैकी कोणतीही गोष्ट मिळवावयाची म्हणजे कांहीं पूर्वकालीन संपत्ति अथवा भांडवल खर्च करणे आवश्यक आहे. मध्यम प्रतीच्या उत्पादकांचे संवर्धन करणें सर्वच राष्ट्रात इष्ट मानलें जातें हे खरें; तरी हिंदुस्थानांतील लोकांच्या परिस्थितीच्या व विचाराच्या दृष्टीनें शक्य तितक्या धद्यांत कारागिर वर्गाचें स्वातंत्र्य अबाधित राखणें विशेष आवश्यक भासल्यास आश्चर्य नाहीं. कच्चा माल, हत्यारें व वरखर्च ह्यांप्रीत्यर्थ आवश्यक असलेलें द्रव्यबळ होतकरू उत्पादकास उपलब्ध होण्याच्या सोयी किती प्रमाणांत अस्तित्वात आहेत ह्या प्रश्नाच्या उत्तरावरूनच देशाची सांपत्तिक परिस्थिति एकंदरीनें प्रगमनात्मक अगर असमाधानकारक आहे हें ठरवावयाचें असतें. खेडेगांवांतील लहान सहान शेतकऱ्यांप्रमाणें लहान सहान कारागिर व धंदेवाले हेही बऱ्याच प्रमाणात कर्जबाजारी असतात असा सर्वत्र अनुभव आहे. कच्चा माल, हत्यारें, स्वतःच्या तात्पुरत्या गरजा भागविण्यास लागणारें सामान इत्यादि आवश्यक बाबतीत भारी व्याजाच्या सावकारी कर्जावर अवलंबून रहावें लागल्यानें शहरातील व परदेशांतील स्वस्त मालाशी टक्कर देण्यास आधींच असमर्थ असलेले आमचे खेडेगांवी धंदेवाले आता जवळ जवळ नामशेष होण्याची वेळ आली आहे. खेडेगावातही ज्या लोकांजवळ स्वतःचें भांडवल भरपूर आहे अगर ज्याची पत मोठी असून ज्यास माफक व्याजाच्या दरानें कर्ज मिळण्याच्या सोयी आहेत अशांस अनेक लहान मोठे धंदे चालवून ते किफायतशीरही करतां येतात. स्वतःचे भांडवल अगर पत ह्या बाबतींत कमकुवत असलेल्या धंदेवाल्यांस मदत करण्याचे दोन मार्ग असतात. पहिला मार्ग म्हणजे उद्योगधद्यांस उत्तेजन देण्याच्या हेतूनें अस्तित्वात आलेल्या सहकारी किंवा इतर पेढ्याकडून कमी व्याजानें भांडवल पुरवणें हा होय. पुढें हिंदुस्थानांतील समाईक भांडवलाच्या,

---

१ पान ४६ पहा.

सहकारी व इतर पेढ्यांबद्दल विवेचन केलेलें आहे त्यावरून लहानमहान कारागिरांस आपला धंदा स्वतंत्रपणें चालविण्यास पुरेसें भांडवल माफक व्याजानें मिळविणें किती दुष्कर आहे हें दिसून येईलच. सामान्य कारागिराची भांडवलविषयक परिस्थिति सुधारण्याचा दुसरा मार्ग म्हटला म्हणजे कच्चा माल अगर आवश्यक यांत्रिक साधनें त्याचा त्यास माफक दरानें पुरवठा करणें हा होय. उदाहरणार्थ, एखाद्या विणकरास अगर तेल्यास स्वतःच्या मालकीचा लोखंडी माग अगर घाणा विकत घेण्याची ऐपत नसली तर एखाद्या मध्यवर्ती संस्थेकडून त्या वस्तू त्यास भाड्यानें देण्याची व्यवस्था करतां येण्यासारखी आहे. ह्या दोन मार्गांपैकीं कोणत्याही एका मार्गानें पुरेशी मदत झाल्यास अनेक लहान सहान कारागिरास स्वतंत्रपणें आपलें पोट भरतां येईल एवढेंच नव्हे, तर सर्व देशभर मध्यम प्रमाणावर चालविलेल्या अनेक उत्पादक धंद्यांचें जाळें पसरलें जाऊन व्यक्तिशः उत्पादक व एकंदर हिंदुस्थानदेश ह्यांच्या आर्थिक परिस्थितींत अनुकूल फरक घडून येईल.

ॲल्युमिनम धातूचीं भांडीं तयार करणें, लोखंड व पितळ ह्यांचे ओतीव जिन्नस बनवणें, चाकू, कात्र्या किंवा खिळे ह्यांचा पुरवठा करणें, धान्य सडण्याच्या व दळण्याच्या गिरण्या काढणें, पाव, बिस्कुटें, गूळ, साखर, साबण, विड्या इत्यादि नित्योपयोगाचे जिन्नस तयार करणें, जाळीदार कापड विणणें, छापणें, पुस्तकें बांधणें, रेशमी कपडा बनवणें, सरकी काढून कापसाचे गठ्ठे बांधणें, विटा, कौलें वगैरे मातीचे जिन्नस पाडणें व भाजणें, चुन्याच्या भट्ट्या चालविणें, दोर वळणें, बुरणुस तयार करणें, पितळेची व चांदीसोन्याची भांडीं आणि खेळणी बनविणें, बांगड्या व कांचेचे इतर लहान सहान जिन्नस ओतणें, अनेक प्रकारच्या शाया तयार करणें, हे व दुसरे अनेक धंदे योग्य प्रमाणांत भांडवलाचा पुरवठा झाल्यास देशाच्या बहुतेक सर्व भागांत चालण्यासारखे आहेत. वर निर्दिष्ट केलेल्या वस्तूंपैकीं अनेकांचा हल्लीं परराष्ट्रांतून हिंदुस्थानास पुरवठा होत आहे आणि त्यांप्रीत्यर्थ कोट्यवधि रुपये देशांतून बाहेर जात आहेत. औद्योगिक शिक्षण आणि भांडवलाचा पुरवठा व किफायतशीर संघटना ह्यां बाबतींत सुधारणा घडवून आणल्यास अनेक लहान सहान व मध्यम प्रमाणावर चालविलेले धंदे यशस्वी होतील. सहकारी चळवळीच्या प्रसारामुळें भांडवल मिळण्याच्या सोयी हल्लीं थोड्या प्रमाणांत वाढल्या आहेत. सामान्य लोक, शैक्षणिक संस्था आणि सरकार ह्यांचेंही धंदेशिक्षण व धंद्यांची वाढ ह्यांकडे अधिकाधिक लक्ष्य लागत आहे. पायगाड्या, मोटारी, शिवण्याचीं यंत्रें, स्टोव्ह, इत्यादि नित्योपयोगी यांत्रिक वस्तूंशीं सर्व वर्गांतील लोकांचा परिचय वाढत असल्यानें त्या व त्यांसारख्या इतर वस्तू पुरविण्याचे आणि त्यांची दुरुस्ती करण्याचे कांहीं कांहीं कारखाने निघूं लागले आहेत. तरी शिक्षण, यांत्रिक ज्ञान, भांडवल इत्यादि साधनांचा पूर्ण व योग्य उपयोग न झाल्यामुळें अनेक नवे धंदे व कारखाने बुडाल्या-

चीही उदाहरणें पुष्कळच आहेत. सरकार व लोक ह्यांच्या पूर्ण सहकार्यानें आणि पैसा, यंत्रें व शिक्षण ह्यांच्या पुरेशा साहाय्यानें नवीन धंदे काढण्याचा आणि जुने बळकट करण्याचा मनापासून प्रयत्न होणें आवश्यक आहे.

**७ मोठमोठ्या धंद्यांची भांडवलविषयक परिस्थिति—** शेतकी व लहानसहान उद्योगधंदे एकंदरीनें कमी कमी उत्पादक होत असल्यानें त्यांत घालण्यास फारसें भांडवल उपलब्ध नसतें आणि ज्या कोणाजवळ कांहीं भांडवल असतें तेंही शेतीच्या सुधारणेकडे अगर लहान धंदे स्थापण्याकडे त्याचा उपयोग सहसा करीत नाहीत. सामान्य लोकांची स्थिति गरिबीची असल्यामुळें त्यांजवळ भांडवलाचा पुरवठा नाहीं आणि ज्या थोड्या लोकांजवळ त्यांच्या नेहमींच्या गरजा भागवून उरण्याइतकी संपत्ति आहे ते उत्पादक धंद्यांत आपला पैसा गुंतविण्यास तयार नाहींत असाच ह्या बाबतींत परवापरवांपर्यंत अनुभव होता. परंतु अलीकडे हिंदुस्थानच्या सर्व भागांत अर्वाचीन पद्धतीनें आणि मोठ्या प्रमाणावर चालणारे अनेक धंदे प्रस्थापित होत असून त्यांमध्यें गुंतविलेल्या भांडवलाचें परिमाणही मोठें आहे. खाणी, आगगाड्या, ट्रॅमगाड्या, गॅस कंपन्या, चहा, कॉफी, ऊंस ह्यांचे मळे, कातडीं रंगवून त्यांपासून अनेक उपयुक्त वस्तु तयार करण्याचे कारखाने, लोंकरीचें व कापसाचें कापड ह्यांच्या गिरण्या, सिमेंट, कागद व पोलाद इत्यादि अनेक अर्वाचिन महत्त्वाच्या वस्तू उत्पन्न करण्याचे धंदे इत्यादि मोठया प्रमाणावर अर्थोत्पादन करण्याचे हिंदुस्थानांतील उपक्रम महत्त्वाचे आहेत. परंतु मुंबईंतील कापसाच्या गिरण्यांचें उदाहरण वगळल्यास बाकीचे सर्व मोठमोठे धंदे सामान्यतः परदेशी भांडवलावर उभारलेले आहेत असें आपणांस दिसून येईल. गेल्या महायुद्धाच्या वेळी व्यापारी महत्त्वाच्या सर्व जिनसांचे भाव अतोनात वाढून त्यांच्या किंमतींत फारच तीव्र फेरफार झाले. ह्या अनिश्चित पण अनुकूल परिस्थितीचा फायदा घेऊन आपल्या इकडील अनेक व्यापाऱ्यांनी बरेच पैसे कमावले. त्यांत ल्यात्यांत परदेशी व्यापाराशी अगर सट्टेबाजीशी ज्यांचा विशेष संबंध आला अशांनीं तर फारच नफा मिळविला. ह्या अनपेक्षित रीत्या मिळालेल्या फायद्यापैकीं कांहीं भाग नवे उद्योगधंदे उभारण्यास भांडवल म्हणून उपयोगी पडला. तरी व्यापाऱ्यांची नेहमींची पद्धत व्यापारांतच पैसे गुंतविण्याची असल्यामुळें आणि त्याच वेळीं सरकारचे युद्धाप्रीत्यर्थ काढलेले व भारी व्याजाचे कर्जरोखे बाजारांत येत असल्यामुळें नव्या उत्पादक धंद्यांस जेवढें हिंदी भांडवल मिळावें तेवढें मिळालें नाहीं. हिंदुस्थानांतील संपन्न वर्ग म्हणजे जमीनदार, सावकार व व्यापारी हेच होत. ह्यांपैकीं सर्वजण नवीन धंदा काढण्यात असलेल्या धोक्यास बुजणारे असल्यामुळें देशांत जी उपलब्ध संपत्ति आहे तिचाही भांडवल म्हणून सामान्यतः नव्या धंद्यांस पुरेसा उपयोग होत नाही. युद्धाच्या काळांत किंमती व फायदा ह्यांचें प्रमाण वाढल्यानें

अनेक व्यापाऱ्यांचें व इतर श्रीमान वर्गांचें संकुचित धोरण बदलण्यास मदत झाली. पुढें लढाईनंतर किंमती हळुहळु कमी होत जाऊन बऱ्याच नव्या व जुन्या धंद्यांस अपयश येऊं लागलें, तेव्हांपासून हिंदी धनिकांच्या मनांत पुन्हां चलबिचल होऊं लागली आहे.

हिंदुस्थानांतील कापसाच्या गिरण्यांत सुमारें चाळीस कोट रुपये भांडवल गुंतलेलें असून तें बहुतेक हिंदुस्थानांतील लोकांच्या मालकीचेंच आहे. चहाच्या मळ्यांत जवळ जवळ तेवढीच रक्कम गुरलेली असून ती सर्व इंग्लिश सावकारांकडून मिळविलेली आहे. तागाच्या धंद्यांतील आणि कोळशाच्या खाणींतील सर्व भांडवल म्हणजे अनुक्रमें पंचवीस व पंधरा कोट रुपये हेंही युरोपियन लोकांचेंच आहे. सोन्याच्या व तेलाच्या खाणींस बहुंशी परदेशी भांडवलवाल्यांचाच आधार असून आगगाड्या, विमाकंपन्या, अंतर्राष्ट्रीय व अंतर्गत व्यवहाराच्या मोठमोठ्या पेढ्या आणि प्रचंड यांत्रिक कारखाने हीही हिंदुस्थानाबाहेरील लोकांच्या पैशावर चाललेलीं आहेत. हिंदुस्थान सरकारास उत्पादक भांडवलाकरितां प्रतिवर्षी जें कर्ज लागतें तेंही परवापर्यंत इंग्लंडमध्येंच उभारलें जाई. लोंकर, कांतडी, रेशीम, साखर, कागद, कांच, कौलें, सिमेंट, तेल, साबण वगैरे पदार्थांचे अर्वाचीन पद्धतीवर चालविलेले कारखाने नुकतेच अस्तित्वांत येऊं लागले आहेत. विशेषतः मुंबई इलाख्यांत अशा धंद्यांची संख्या अधिक असून त्यांच्यांतील भांडवलही बहुंशी हिंदी लोकांचें आहे. तरी एकंदर देशाविषयीं बोलावयाचें झाल्यास नवे व मोठ्या प्रमाणावर चालणारे उद्योगधंदे स्थापण्यास व ते यशस्वी करण्यास आवश्यक असलेलें धाडस, आत्मविश्वास, विशिष्ट ज्ञान व अनुभव आणि संघटनाविषयक कार्यक्षमता हे गुण आणि भांडवलविषयक साधनें ह्यांचा सारखाच तुटवडा आहे असें म्हटलें पाहिजे.

धंद्यांची वाढ, त्यांस लागणारें भांडवल आणि त्यांचा किफायतशीरपणा ह्यांचा अन्योन्य संबंध ध्यानांत घेऊन हिंदी भांडवलाच्या गेल्या पंधरा वर्षांतील स्थित्यंतरांचें निरीक्षण केल्यास ते बोधप्रद ठरेल. इ. स. १९१२ साली हिंदुस्थानांत समाईक भांडवलाच्या अडीच हजार मंडळ्या होत्या आणि त्यांच्या भागीदारांनी आपापल्या भागांची भरलेली रक्कम ७२ कोटी रुपये होती. स. १९२८ मध्यें हेच आंकडे अनुक्रमें २८०० व १०७ कोटी असे होते. महायुद्धाच्या वेळीं शक्य तितका पैसा लढाईच्या कामीं लागावा ह्या हेतूनें सरकारनें खासगी मंडळ्या स्थापण्याच्या मार्गांत अनेक प्रतिबंध घातले होते. ते युद्धानंतर दूर करण्यांत आले. १९२१-२२ सालीं समाईक मंडळ्यांची संख्या ५१९० व त्यांचें भरलेलें भांडवल २३० कोटी रुपये होतें. ह्यावरून युद्धकाळीं हिंदुस्थानांत सांठलेल्या संपत्तीचा वाचकांस कांहींसा अदमास येईल. एका १९१९-२० ह्याच वर्षांत नव्या ९४८ मंडळ्या नोंदल्या

गेल्या आणि त्यांच्या अधिकृत भांडवलाची रक्कम २८१ कोटी रुपये होती. पुढील वर्षाचे आंकडे १०३९ नव्या मंडळ्या आणि १४८ कोटी रुपये अधिकृत भांडवल असे आहेत. युद्धकाली सांठविलेलें भांडवल धंद्यांत गुंतून एका बाजूनें कमी होत असतां उलट बाजनें वस्तूंस असलेली मागणी मर्यादित होऊन किंमती व नफा ह्यांतही उतार पडल्यानें नव्या मंडळ्या निघणें अगर त्यांस भांडवल उपलब्ध होणें अधिक दुर्घट होऊं लागलें. १९२१-२२ सालापासून तीन वर्षें अनुक्रमें ८०, ३४ व २६ कोट रुपये एकंदर अधिकृत भांडवलाच्याच नव्या मंडळ्या निघूं शकल्या. त्याच्या पुढील तीन वर्षांचे हेच आंकडे २१, ३० व १९ कोटी रुपये असे आहेत. धंद्यास भांडवल मिळविण्याचे भागीदारांकडून घेतलेल्या अगर घ्यावयाच्या पैशांखेरिज जे दुसरे मार्ग आहेत त्यांचा येथें उल्लेख केलेला नाहीं. पुढें पेढ्यांच्या व्यवहाराबद्दल स्वतंत्रपणें केलेल्या विवेचनांत भांडवलाच्या पुरवठ्याच्या ह्या व इतर अंगांचा योग्य विचार केलेला आढळून येईल. परंतु भांडवल मिळविण्याचे इतर मार्गही हल्लीं अधिक समाधानकारक होऊं लागले आहेत हें पुढें दिलेल्या ठोकळ आकड्यांवरून वाचकांच्या लक्षांत येण्यासारखें आहे. इंपीरिअल बँक, अंतर्राष्ट्रीय देवघेवीच्या पेढ्या आणि प्रमुख समाईक भांडवलांच्या पेढ्या ह्यांजजवळील ठेवीदारांची अनामत रक्कम २२० कोटी रुपयांवर आहे. ह्याशिवाय पोस्टल सेव्हिंग बँकेंत २५ कोट रुपये आणि सहकारी पेढ्यांत २५ कोट रुपये रकमेच्या ठेवी आहेत. सराफांकडूनही कांहीं धंदेवाले व व्यापारी कर्ज घेत असतात. सराफांचे दर एकंदरीनें भारी असून त्यांच्या जवळच्या ठेवींची अगर त्यांनी दिलेल्या कर्जाची विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. तरी हिंदुस्थानांत अर्वाचीन पद्धतीचे धंदे चालविण्यास उपलब्ध असलेलें भांडवल अजूनही कितो मर्यादित आहे व किंमती आणि फायदा ह्यांच्या चढउतारांचा भांडवलाच्या पुरवठ्यावर तात्काल परिणाम कसा होतो हें वर दिलेल्या आंकड्यांवरून स्पष्टपणें दिसेल.

टाटाचा प्रसिद्ध पोलादाच्या कारखाना आणि दुसऱ्या अनेक धंदेवाल्या मंडळ्या ह्यांचा गेल्या कांहीं वर्षांतील अनुभव विशेष बोधप्रद आहे. इंग्लिश भांडवलवाल्यांजवळ भांडवलाचा पुरवठा भरपूर असून थोड्या व्याजानें नव्या धंद्यांस व परदेशी ऋणकोंसही कर्ज देण्यास ते तयार असतात. हिंदुस्थानांत अजून अशी स्थिति प्राप्त झालेली नाही. तरी एखाद्या धंद्यांत नुकसान येण्याचा फारसा धोका नसून फायदाही बराच होण्याचा संभव आहे असें दिसल्यास हिंदी लोकांकडूनच पुष्कळ भांडवल मिळणें शक्य होतें. परंतु हिंदी भांडवलाचा पुरवठा मुळांतच मर्यादित असल्यानें एखाद्या मंडळीस एकदम जास्त भांडवलाची जरूर भासल्यास तें परदेशांतूनच मिळवावें लागतें. हिंदी मंडळ्या व हिंदुस्थानसरकार ह्यांनीं आपलें कर्ज शक्य तितकें हिंदुस्थानांतच काढण्याची खटपट केल्यास हिंदी भांडवलाचा पुरवठा निय-

मितपणें वाढत राहील ह्यांत शंका नाहीं. आपल्या चालू उत्पन्नांतून कांहीं भाग बाजूस काढून तो व्याजीं लावण्याची अगर धंद्यांत गुंतविण्याची संवय आपल्याकडे फारशी दिसून येत नाहीं. हिंदी लोकांची गरीबी व पेढ्यांची मर्यादित संख्या ह्या कारणांमुळें भांडवलाचा पुरवठा अधिकच मर्यादित होतो. मुंबईसारख्या मोठमोठ्या शहरांत पेढ्यांचा विस्तार बराच झाला असल्यानें तेथील धंदेवाल्यांस त्या मानानें सहज भांडवल मिळूं शकतें. परंतु तेथेंही लहान व मध्यम प्रतीच्या उत्पादकांची कुचंबणा होत असून देशाच्या इतर भागांत तर धंदेवाल्यांस भांडवल मिळण्यास अधिकच अडचणी असतात. सर्वसाधारण पेढ्या आणि विशिष्ट प्रकारच्या औद्योगिक पेढ्या अस्तित्वांत आल्यास भांडवलाचा पुरवठा वाढण्यास व त्याचा विनियोग अधिक समाधानकारक रीतीनें होण्यास मदत होईल. सरकारनें शक्य तोंवर हिंदी भांडवलास उत्तेजन देऊन, लहान व नव्या धंदेवाल्यांस प्रत्यक्ष कर्ज देऊन आणि त्यांच्या कर्जास कांहीं अटीवर जामीन राहून भांडवलाच्या पुरवठयाचा प्रश्न हातीं घेणें आवश्यक आहे.

**८ संपत्तीचा अनुत्पादक उपयोग**—संपत्ति म्हणजे गरजा भागविण्याचें साधन होय. म्हणून जवळ संपत्ति असून तिचा तात्कालिक गरजा भागविण्यास अगर अधिक संपत्ति मिळविण्यास उपयोग न करणें हें वरवर पहाणारासही अनुत्पादकच नव्हे तर व्यवहारशून्यतेचें भासतें. आपापल्या उत्पन्नांतून शक्य तितकी बचत करून पैशाचा दीड पैसा करण्याची संवय ज्यांच्या हाडींमाशीं खिळली आहे त्या पाश्चात्यांस हिंदी स्त्रीपुरुषांच्या व देवादिकांच्या अंगावरील दागदागिने पाहून व इकडील राजेरजवाडे, सरदार, इनामदार आणि शेटसावकार ह्यांच्या जामदारखान्यांतील संपत्तीच्या भरमसाट गोष्टी ऐकून हिंदुस्थानांतील सोनें, रुपें व जडजवाहीर जवळ बाळगणाऱ्या व जमीनींत पुरून ठेवणाऱ्या लोकाची कींव वाटते. देशांत नैसर्गिक परिस्थिति अर्थोत्पादनास सर्वथैव अनुकूल आहे; अपरंपार मनुष्यबळ आणि भांडवल हींही उपलब्ध आहेत; परंतु आर्थिक ज्ञान व संघटनाचातुर्य ह्यांच्या अभावीं संपत्तीचें उत्पादन न झाल्यानें लोक एकंदरीनें दारिद्र्यावस्थेंत आहेत; असा हिंदुस्थानाच्या दारिद्र्याबद्दल त्यांचा सिद्धांत असतो. आपल्या इकडील कांहीं परप्रत्ययनेय व अदूरदृष्टि लोकास पाश्चात्य ग्रंथकारांची ही टीका यथार्थ आहे असें वाटतें. परंतु दिगंत जिचा डांगोरा पिटला गेला आहे ती हिंदुस्थानची गुप्त संपत्ति आहे तरी किती ह्याचा अंदाज करूं गेल्यास ती ५०० कोटी रुपये असावी, निदान ८०० कोटी रुपयांच्यावर तरी ती नाहीं असें सांगण्यांत येतें. निव्वळ कल्पनेच्या पायावर उभारलेले हे आंकडे अर्थातच अतिशयोक्तीच्या स्वरूपाचे असणार. परंतु ते अगदीं बिनचूक आहेत असें घटकाभर मानलें तरी हिंदुस्थानांतिल अनुत्पादक संपत्ति माणशी २५ रुपयांहून, म्हणजे फार तर प्रत्येक माण-

साच्या सरासरीं चार सहा महिन्यांच्या उत्पन्नाहून अधिक भरत नाही. ह्या आठशें कोटी रुपयांतच राजेरजवाडे, सरदार, सावकार इत्यादिकांच्या दागदागिन्यांचा व जडजवाहिराचा समावेश होतो हें ध्यानांत घेतल्यास सामान्य इसमाचा वरील गुप्त संपत्तींतील भाग शून्याच्या बराच जवळ आल्याशिवाय राहणार नाही. हिंदुस्थानांतील लोक आधीच गरीब असल्यानें मितव्यय करून चार पैसे गाठी बांधण्यास त्यांस फारशी सवड नसते आणि त्यांतूनही जी कांहीं थोडीबहुत साठविलेली पुंजी असेल तिचाही अज्ञानामुळें किंवा निव्वळ छानछोकीच्या हौसेमुळें ते अनुत्पादक मार्गानें विनियोग करण्यास प्रवृत्त होतात, हे बहुशी खरें आहे. परंतु बचत करून पुढील गरजा भागविण्यास बाजूस काढलेली संपत्ति धामधुमीच्या अगर अस्थिरतेच्या काळात व्यापारधंद्यांत गुंतविणें केव्हांही आर्थिक अगर व्यावहारिक शहाणपणाचें ठरलें नसतें. तसेंच हिंदी लोकांच्या अलंकारप्रियतेस नाकें मुरडणाऱ्या पाश्चात्यांनीं गौर स्त्रियांच्या वाढत्या भूषणलालसेकडे किंवा घरात लाखों रुपयांचें सोनेरी, रुपेरी व रत्नखचित सामान वापरण्याच्या अर्वाचीन पाश्चात्य प्रघाताकडे योग्य लक्ष्य दिल्यास गरीब बिचाऱ्या हिंदी स्त्रियाचें किडुक मिडुक प्रतिक्षणीं चव्हाठ्यावर आणण्याचा त्यास मोह पडणार नाहीं. हिंदु धर्मपद्धतीतील वारशाच्या नियमाप्रमाणें स्त्रियांस घरांतील स्थावर जंगम मालमत्तेवर स्वतंत्र असा कांहींच अधिकार नसल्यानें स्त्रीधनाच्या स्वरूपानें त्यांच्या पोटापाण्याची वेळप्रसंगी उपयोगी पडणारी स्वतंत्र व्यवस्था करणें इष्ट असे, हेंही लक्ष्यात ठेविलें पाहिजे राजेरजवाडे, सरदार, सावकार इत्यादि मूठभर लोकांजवळ काहीं थोडी संपत्ति संचित असली तरी, अर्वाचिन राहणीमुळें तिचेंही मान कमी कमी होत असून त्या वर्गांतील लोकांचें संपत्तीचा किफायतशीर मार्गानें उपयोग करण्याकडेही अधिक लक्ष्य जात आहे.

बचत ह्या शब्दांत वास्तविक दोन भिन्न आर्थिक कल्पना गोंवल्या गेल्या आहेत असें मागेंच सांगितलें आहे.[1] विवक्षित इसमानें आपल्या तात्कालिक गरजांप्रीत्यर्थ होणारा खर्च शक्य तोंवर कमी करणें ही एक कल्पना अगर क्रिया; व असा मितव्यय करून राहिलेली संपत्ति व्याजी लावणें अगर फायदा मिळण्याच्या आशेनें धंद्यांत गुंतविणें ही दुसरी क्रिया होय. जे लोक हिंदुस्थानांत बरीच सांठविलेली संपत्ति आहे असें म्हणतात त्यांस हिंदी लोक मितव्ययी खरे, परंतु सांठविलेली संपत्ति किफायतशिर मार्गांनीं खर्चण्याची त्यांस अक्कल नाहीं, असें ध्वनित करावयाचें असतें. पाश्चात्य राष्ट्रांत आधुनिक औद्योगिक मनु सुरू होण्यापूर्वी त्यांची सरासरी संपत्ति किंवा भांडवलविषयक सामुग्री ज्याप्रमाणें तुटपुंजी होती त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही एकंदर ऐतिहासिक कालांत सामान्य माणसांची केव्हांच फारशी सुस्थिति नव्हती, निदान त्यांच्या तात्कालिक गरजा भागून पुरून उरण्याइतकी तरी त्यांची संपत्ति कधी विपुल

[1] पान १८२ पहा.

नव्हती, ह्यांत आश्चर्य नाहीं. त्यांतही, पूर्वीच्या राज्यांतील सार्वत्रिक अशांतता आणि वित्त व जीवित ह्यांची अशाश्वति ह्यांची भर घातल्यास संपत्तीचा अनुत्पादक मार्गानें विनियोग करण्याची हिंदी लोकांस विशेष खोड आहे हा आक्षेप सर्वस्वी निर्मूल ठरतो. आमच्या मतें हिंदी लोकांची गरीबी व जुन्या राज्यांतील अशांतता हींच अनुत्पादक विनियोगाचीं प्रमुख कारणे होत. अलीकडे सर्वत्र शांतता स्थापन झाली असली तरी लोकांची सांपत्तिक स्थिति हलाखीची असल्यामुळें त्यांस त्यांच्या तात्कालिक गरजाही भागविणें दुर्घट झालें आहे. शिवाय स्वतःच्या व मुलाबाळांच्या पोटाचे हाल करून जर कांहीं शिल्लक टाकली असेल व लहान सहान दागिन्यांत तिचें रूपांतर झालें असेल तर अडीअडचणीस तोच नग मोडून गरज भागवावी लागते हें विसरता कामा नये. सामान्य हिंदु कुटुंबांत दागिन्यांवर जो भर दिला जातो तोही दूरदर्शीपणानें कांहीं भांडवल बाजूस काढून ठेवावें ह्याच उद्देशाचें मूर्त फळ होय. लग्नकार्यांत किंवा और्ध्वदेहिकात हिंदी लोक पुष्कळवेळा अवास्तव खर्च करतात हे खरें व त्या बाबतींत सुधारणा घडून येणें अत्यंत आवश्यक आहे; तरी असा खर्च बहुंशी कर्जाऊ काढलेल्या पैशांतूनच केला जात असून शिक्षणप्रसारामुळें व कर्ज मिळणें कठीण झाल्यानें तो हल्ली कमी प्रमाणावर होत आहे.

हिंदी लोक ' तात्पुरत्या गरजाकरितां तरतूद करतात परंतु दूरवर विचार करून भविष्यकालीन गरजा भागविण्याची सिद्धता करणें त्यांस आवडत नाहीं; आपल्या सद्यःकालीन गरजा पूर्णपणें भागविणाऱ्या कमी वैराग्यशील अशा इंग्रज लोकानी सांठविलेल्या पैशांतूनच हिंदुस्थानात अनेक किफायतशीर व खर्चाची सार्वजनिक कामें करण्यांत आली आहेत ' असा प्रसिद्ध इंग्रज अर्थशास्त्रज्ञ मार्शल ह्यानें हिंदुस्थानांतील रहिवाशास टोमणा दिला आहे.[१] हिंदुस्थानासबंधीं खऱ्या माहितीचा पाश्चात्य राष्ट्रांत अभाव असल्यानें आणि पौरस्त्य देशाच्या मागासलेल्या परिस्थितीविषयीं तिकडे बरेच गैरसमज दृढमूल झाले असल्यानें निःपक्षपाती म्हणविणाऱ्या विद्वान इंग्रजी ग्रंथकारांनीही हिंदी लोकाबद्दल वरीलप्रमाणें भ्रामक विधानें केलेली आढळतात. परतु इंग्रजांचें हिंदुस्थानांत राज्य स्थापन होण्यापूर्वी नदीचे घाट, मोठमोठ्या सडका, प्रचंड धरणें व कालवे इत्यादि कोट्यवधि रुपये खर्च करून बांधलेली सार्वजनिक ठिकाणें त्या वेळच्या हिंदी लोकांच्या व राज्यकर्त्यांच्या आत्मत्यागाची व दूरदृष्टीची साक्ष देण्यास समर्थ आहेत. प्रत्यक्ष इंग्लंडचीही भांडवलविषयक परिस्थिति सोळाव्या व सतराव्या शतकांत किती असमाधानकारक होती व औद्योगिक क्रान्तीमुळें देशाची आर्थिक प्रगति झाल्यामुळें इंग्लंडचें आर्थिक सामर्थ्य एकदम कसे वाढलें ह्याची माहिती असणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांनी हिंदू लोकावर

---

१. डॉ. मार्शल ह्यांच्या Economics of Industry ह्या पुस्तकातुन वरील वाक्य घेतलें आहे.

अदूर दृष्टीचा व उधळेपणाचा आरोप करणें ऐतिहासिक व शास्त्रीय सत्यास किती सोडून आहे हें सांगावयास नको.

**९ परराष्ट्रीय भांडवल**— अर्वाचीन आर्थिक घटनेंत भांडवलास अत्युच्च महत्त्व प्राप्त झालें असल्यानें ज्यांची भांडवलाच्या पुरवठ्यावर हुकुमत असते त्यांची समाजाच्या सर्व जीवनक्रमावर बरीच सत्ता चालूं शकते. भांडवलवाला मनुष्य ज्या लोकांस त्यानें भांडवल दिलें असेल त्यांच्याच समाजाचा घटक असला तर धनको व ऋणको, भांडवलवाले व मजूर ह्याचे हितसंबंध अनेक बाबतींत एकरूप असण्याचा संभव असतो आणि भांडवलवाल्यांची आर्थिक व सामाजिक सत्ता एकंदरीनें सर्व राष्ट्राच्या हितास विरोध न येईल अशाच मार्गानें उपयोगांत आणली जाते. निदान-पक्षीं भांडवलाचे मालक आपल्या विशिष्ट परिस्थितीचा देशहितविघातक मार्गानें उपयोग करून घेत आहेत असें दिसून आल्यास राष्ट्रीय सरकाराकडून त्यांच्या अनियंत्रित प्राबल्यावर आवश्यक तेवढी बंधनें घालतां येतात. मोठमोठे जमीन-दार आणि व्याजबट्टा करणारे सावकार हे भांडवलवाल्यांच्या वर्गांतच मोडतात व शेतकरी, कारागीर आणि लहान सहान धंदेवाले ह्यांच्या असाहाय्य परिस्थितीचा त्यांस अनेक मार्गांनीं फायदा करून घेतां येतो. परंतु कुळांचे हक्क अबाधित रहावे व सावकारांनीं कर्जदारांस अवास्तव रीत्या नाडवूं नये ह्या इष्ट गोष्टी सरकारी कायद्यांनी घडवून आणतां येतात व हिंदुस्थानसरकारनें कुळांबद्दलचे व व्याजबट्ट्याबद्दलचे कायदे करून हे उद्दिष्ट गाठण्याचा प्रयत्नही केलेला आहे. उलटपक्षी, कित्येक अर्धवट माहिती असलेले लोक हिंदी सावकार व मारवाडी हे निर्घृणतेच्या बाबतींत प्रति शायलॉक शोभण्यासारखे आहेत असा आक्षेप करतात तो यथार्थ आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. देशांतील धंद्याची अनुत्पादक स्थिति, स्वतःचे कायदेशीर हक्क राजसत्तेक-डून बजाविले जाण्याची अनिश्चितता व ऋणकोजवळ तारणाचा अभाव इत्यादि कारणांनीं हिंदी सावकारास आपले दर व इतर अटी ह्या बऱ्हेशीं कडक ठेवाव्या लागत हें खरें. परंतु राजकीय, सामाजिक, व आर्थिक बाबतींत प्रगति घडून येण्यापूर्वी सर्वच राष्ट्रांत अशी स्थिति असते हें विसरतां कामा नये. हिंदी सावकाराचे अनेक दोष असले तरी त्यांच्या मदतीशिवाय शेतकरी व कारागीर हे दुष्काळासारख्या आपत्तींतून धडपणे बचावणेंही शक्य नव्हते व अनेक लहानसहान धंदेवाल्यांस सावकारांच्या सहाय्यानेंच आपलें अस्तित्व टिकवितां आलें आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. अर्वाचीन आर्थिक घटनेचा हिंदुस्थानांत जसजसा प्रसार होत आहे तसतसा सावकाराचा एकतंत्री व्यवहार अशक्य होऊं लागला आहे. उलट, कांहीं कांहीं ठिकाणीं कुळें व कर्जदार हेच अनेक मार्गांनी आपापल्या जमीन-दारांचे आणि सावकारांचे कायदेशीर हक्क बुडविण्यास प्रवृत्त होऊं लागले आहेत. आर्थिक स्वरूपाचे परस्पर संबंध स्वतंत्र करारमदार करून ठरावे ह्या हितावह तत्त्वाचे

हळुहळु सर्वत्र अनुकरण होत आहे व प्रायः याचाच पुरस्कार करून सरकार भांडवल-वाल्यांची सत्ता अनियंत्रित अगर राष्ट्रहित-विघातक होऊ नये अशी खटपट करीत असतें. परंतु भांडवलाचे मालक परराष्ट्राचे नागरिक असले तर त्यांच्या हातांतील आर्थिक सत्ता निरंकुश होण्याचा फार संभव असतो. परदेशी भांडवलाचा उपयोग हा हिंदुस्थानांत आर्थिक व राजकीयदृष्ट्या फारच महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे.

भांडवलाचें आर्थिक स्वरूप उत्पादनसाधनात्मक[1] आहे हें ध्यानांत घेतल्यास कच्चा माल, यंत्रें, कारागीर इत्यादि प्रत्यक्ष साधनांच्या बाबतींत जें परराष्ट्रीय धोरण ठेवण्यांत येतें तेंच पैशाच्या स्वरूपाचें भांडवल परदेशांतून आणतांना ठेवणें योग्य आहे हें उघड होईल. भांडवलाच्या साहाय्यानें देशांतील नैसर्गिक साधनें व मनुष्यांचे श्रम हीं अधिक उत्पादक होत असल्यामुळें परदेशी भांडवल म्हणजे एक संजीवनीच आहे असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. जगांतील इतर सुधारलेल्या राष्ट्रांचें परदेशांतून कर्जाऊ भांडवल आणण्यास सर्वस्वी अनुकूल असेंच धोरण असतें व अनेक राष्ट्रांची अंतर्राष्ट्रीय भांडवलाचा ओघ आपल्याकडे वळविण्याची आपापसांत स्पर्धा चाललेली असते. ह्यावरून निव्वळ उत्पादनाचें साधन ह्या नात्यानें हिंदी धंदेवाले अगर हिंदुस्थानसरकार ह्यांनीं परदेशी भांडवलाचें साहाय्य घेतल्यास त्यांत आर्थिकदृष्ट्या कोणताही दोष नाही. उलट, माफक व्याजाच्या दरानें परदेशी कर्ज मिळालें तर त्यांत एकंदर देशाचा फायदाच आहे. परंतु परदेशी भांडवलाचा उपयोग सर्वांशीं हितावह होण्यास हिंदुस्थानांत अनेक आर्थिक व राजकीय अडचणी आहेत. युद्धकालापर्यंत हिंदुस्थानसरकार आपलें सर्व कर्ज विलायतेंत काढीत असे. त्याचप्रमाणें इतरही मोठमोठ्या संस्था व मंडळ्या ह्यांस हिंदुस्थानाबाहेर गेल्याशिवाय आपणांस पुरेसें भांडवल मिळणार नाहीं असें वाटत असे. परंतु अलीकडे हिंदी भांडवलाचा पुरवठा वाढत असून त्याचा शक्य तितका उपयोग केल्यानंतरच परदेशी भांडवलवाल्यांजवळ कर्ज मागणें रास्त आहे अशा मताचा प्रसार होत आहे. परदेशी भांडवल ठराविक व्याजाच्या कर्जरोख्याच्या स्वरूपानें न काढतां समाईक भांडवलाच्या मंडळ्यांचे भाग विकून काढलें तर परराष्ट्रीय भांडवलवाल्यांस पुरेसें व्याज मिळून शिवाय मंडळीच्या नफ्यांतून भाग मिळतो. शिवाय, सर्वस्वी अगर बहुंशीं परदेशी भागिदारांच्या भांडवलावर उभारलेल्या मंडळ्यांत सर्व सत्ताही परकीयांचीच असते म्हणजे महत्त्वाच्या सर्व जागांवर परकी लोक नेमले जाऊन एकंदर धोरणही हिंदीलोकांच्या हितसंबंधांस विरोधक असेंच ठेवण्यांत येतें आणि अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय महत्त्वाच्या राजकीय प्रश्नांसंबंधीं हिंदुस्थानांत हितसंबंध असलेल्या परकीभांडवलवाल्यांचें धोरण सामान्यतः लोकहितास व हिंदी लोकांच्या न्याय्य आकांक्षांस प्रतिकूल असतें. अलीकडे हिंदी उद्योगधंद्यांस सरकारी मदत देण्याचा उपक्रम सुरू झाल्या-

---

[1] पान ३४ पहा.

मुळें येथील परकी मंडळ्या व सरकार ह्यांच्या परस्परपरिपोषक धोरणामुळें हिंदी धंदे-वाले व सामान्य लोक ह्यांचें नुकसान होण्याचाही बराच संभव आहे. ह्यास्तव परदेशांतून भांडवल आणण्यापूर्वी येथील पुरवठ्याचा पूर्ण उपयोग करून घेणें, परकी भांडवल शक्य तोंवर ठराविक व्याजाच्या दरानें आणणें, प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या सार्वजनिक मदत मिळत असलेल्या परकी भांडवलवाल्यांच्या धंद्यांत हिंदी हितसंबंधांस अनुकूल अशा अटी घालणें व शक्य तोंवर सरकारसच परदेशांतून कर्ज काढण्यास सांगून त्यांजकडून तें येथील धंदेवाल्यांस देवविणें, ह्या बाबतींत विशेष दक्षता बाळगिली पाहिजे. परदेशी भांडवलवाल्यांची सत्ता हिंदुस्थानांत चालूं न देतां बाजारभावानें जरूर तेव्हां त्यांजकडून उत्पादक कारणाकरितां कर्ज काढणें हें आर्थिकदृष्ट्या हिताचेंच ठरेल.



# प्रकरण सहावें

## संघटन

**१ घरगुती व लहान धंदे**—विस्तृत प्रमाणावर होणारा विनिमय, श्रमविभागाच्या तत्त्वाचें सार्वत्रिक अवलंबन व विशिष्ट आणि संकलित उत्पादन इत्यादि अर्वाचीन आर्थिक घटनेच्या प्रमुख विशेषांचा मागें विचार केलेला असून विनिमयप्रधान आणि मोठ्या प्रमाणावर चालणाऱ्या उत्पादनपद्धतींत निरनिराळ्या आर्थिक घटकांचें संघटन करणें ही किती महत्त्वाची कामगिरी आहे हें त्यावरून वाचकांस कळलेंच असेल.[1] धंद्याचें परिमाण ज्या मानानें मोठें व उत्पादक आणि उपभोक्ते ह्यांमधील अंतर जों जों जास्त तों तो संघटनात्मक कौशल्याची आवश्यकता व महत्त्व विशेष असतें. हिंदुस्थानांत शेतीचा धंदा तर मुख्यतः लहान लहान शेतकऱ्यांच्याच हातांत आहे; परंतु कच्च्या मालापासून अनेक उपभोग्य वस्तू तयार करण्याचे धंदेही येथें अजून लहान प्रमाणांतच चालविले जातात असें म्हटल्यास त्यास फारच थोडे अपवाद सांपडतील. मोठमोठे कारखाने व आगगाड्यांसारखे वहातुकीचे धंदे ह्यांच्या बाबतीत हिंदुस्थानांतील परिस्थिति सामान्यतः इतर औद्योगिक राष्ट्रांसारखीच असून संघटनाचतुर योजकांच्या श्रमाशिवाय प्रचंड प्रमाणावरील धंदे येथें यशस्वी होणें शक्य नाही. परंतु अर्वाचीन पद्धतीवर चालणाऱ्या धंद्यांची संख्या अजून मर्यादित असल्यानें त्यांच्यामध्यें संघटनविषयक सुधारणा घडवून आणण्याच्या प्रश्नाकडे अद्यापि योग्य लक्ष्य दिलें जात नाहीं. अलीकडे असल्या अनेक धंद्यांस इतर प्रगमनशील राष्ट्रांतलि धंदेवाल्यांची स्पर्धा जाणवूं लागली आहे व सरकार आणि जनता ह्यांच्या स्वार्थत्यागपूर्ण साहाय्याची त्यांस आवश्यकता वाटत आहे. बाह्य साधनांची मदत मागण्यापूर्वी व मिळण्यापूर्वी अंतर्गत व्यवस्थेंत अधिकांत अधिक सुधारणा घडवून आणणें आवश्यक असल्यानें ‘ इकडील मोठमोठ्या धंद्यांची घटना व व्यवस्था कार्यक्षम आहेत किंवा नाहींत ’ ह्या प्रश्नाचा काळजीपूर्वक विचार करण्याची वेळ येऊन ठेपलेली आहे. परंतु आकारानें मोठ्या व संख्येनें लहान अशा धंद्यांच्या संघटनेविषयीं विचार करण्यापूर्वी सर्व देशभर पसरलेल्या असंख्य लहानसहान धंद्यांचें अवलोकन करणें इष्ट होय.

सूत कातणें, कापड विणणें, मातीचीं भांडीं तयार करणें, लोहारी काम करणें, चांदी सोन्याचे दागिने व भांडीं घडणें, तेल गाळणें, कातडीं कमावून त्यांपासून

---

[1] पानें २८–२९; व ३६–३८ पहा.

उपयुक्त जिन्नस तयार करणें, कापड रंगवणें, कपडे शिवणें इत्यादि सामान्य कामें हिंदुस्थानांत अजूनही लहान धंदेवाल्यांकडूनच केली जातात. बहुतकरून एकच व्यक्ति धंदेवाला आणि कारागीर ह्या नात्यानें काम करीत असते, व कच्चा माल व हत्यारें मिळविण्याचीं साधनें, तसेंच तयार माल विकत घेणारीं गिऱ्हाइकें, हीं धंदेवाल्याच्या आसपासच आढळतात. विनिमयाचें क्षेत्र, उत्पादनाचें परिमाण व श्रमविभागाचा विस्तार हीं सर्वच मर्यादित असल्यानें संघटनाही विस्कळित व अनुत्पादक असते. उत्पादकांपैकी प्रत्येकानें स्वतंत्रपणें कच्च्या मालाची व हत्यारांची खरेदी करावी, स्वतःच्या अगर स्वतःच्या देखरेखीखाली असलेल्या मजुरांच्या श्रमाच्या साहाय्यानें जिन्नस तयार करावे आणि आपल्याच माहितीवर व हिंमतीवर विसंबून त्यांची विक्री करावी, अशीच इकडील बहुतेक जुन्या धंद्यांची रीत आहे. दोन अगर त्याहून थोड्या अधिक व्यक्तींनी भागीदारीनें धंदा चालविण्याची पद्धत फार पुरातन काळापासून अस्तित्वांत आहे हें खरें, तरी भागीदारीच्या पद्धतीचें अवलंबन उत्पादक धंद्यांपेक्षां व्यापारांतच अधिक केलें जाई असें दिसतें. उत्पादन अल्पप्रमाणावर होत असल्यानें आवश्यक भांडवलाचें परिमाणही कमीच असे व अनेक भांडवलवाल्यांच्या सहकार्यानें मोठी रक्कम उभारण्याची जरूर भासत नसे. काही विवक्षित वस्तूंस विशेष विस्तृत मागणी असल्यास त्या उत्पन्न करण्याच्या धंद्यांत मात्र भांडवलाचें व विशेषतः संघटनेचें महत्त्व कांहींसें अधिक समजलें जाई. तरीही अशा धंद्यांत तीव्र स्पर्धेचा पूर्ण अभाव असल्यानें धंद्याची घटना सुधारणें हे तो किफायतशीर होण्यास विशेषसें आवश्यक नसे. काशीक्षेत्रांत उत्तम रेशमी वस्त्रें तयार करण्याचा धंदा फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे. परंतु हिंदी व परदेशी मालाच्या स्पर्धेची भीति उत्पन्न होण्यापूर्वी त्या धंद्यांत संघटनेचा पूर्ण अभाव होता असेंच म्हटलें असता चालेल. प्रत्येक कारागिरानें आपापल्या भांडवलाच्या व श्रमाच्या साहाय्यानें स्वतःच्या घरीं माल तयार करावा व तो अगदीं शेजारी पाजारीं असणाऱ्या गिऱ्हाइकांस अगर व्यापाऱ्यांस विकावा असाच मुख्यतः प्रघात होता. लहान लहान उत्पादकांकडून विकत घेतलेला माल एकत्र करून तो परगांवीं अगर परदेशीं पाठविण्याचें काम व्यापारीवर्ग करीत असे.

हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांचें परस्पर दळणवळण सुकर झाल्यापासून अनेक वस्तूंच्या विनिमयाचें क्षेत्र विस्तृत होत असून त्यांपैकीं कित्येक वस्तु तर परदेशांतही पाठविल्या जातात. विशेषतः, तांब्यापितळेची व चांदीची भांडी, हस्तऱ्हेचीं खेळणी, कमी अधिक प्रतीचीं धोतरें, साड्या व लुगडी, फेटे, रुमाल व पागोटी, निरनिराळ्या प्रकारची पायतणें, घोंगड्या व ब्लँकेटें, ठरीव घाटाचे दागिने, विड्या, आडकित्ते इत्यादि हरघडी उपयोगी पडणाऱ्या व मोठ्या प्रमाणावर खपणाऱ्या जिनसांच्या धंद्यांची संघटना करणें विशेष अगत्याचें व सोयीचें झालेलें आहे. कारागिरांस कच्चा माल व जरूर तर

हत्यारेंपात्यारें पुरवून, त्यांस अगाऊ रकमा देऊन आणि त्यांनीं घरोघर तयार केलेले जिन्नस स्वस्त दरानें एकत्र करून त्यांची घाऊक व किरकोळ विक्री करण्याची पद्धत बऱ्याच वाढत्या प्रमाणावर अस्तित्वांत येत आहे. शिवाय वरीलपैकी कित्येक जिनसांच्या धंद्यांत तर हळुहळु कारागिरांस विवक्षित ठिकाणीं एकत्र आणून त्यांजकडून रोजंदारीच्या अगर ठराविक कामाच्या दरानें उत्पादन करविण्याचा उपक्रमही होऊं लागला आहे. अशा स्वरूपाच्या धंद्यांत व अलीकडील कारखान्यांत तात्त्विक फरक फारच थोडा असतो. कामकऱ्यांची संख्या, यांत्रिक साधनांची विपुलता व कृत्रिम प्रेरकशक्ति ह्या बाबतींत कापसाच्या कापडाची गिरणी व एखादा लहानसा हातमागांचा कारखाना ह्यांत जरी महदंतर असलें तरी भांडवलवाले व मजूर ह्यांची त्या दोहोंतही पूर्ण फारकत झालेली असते. वहातुकीचीं व विनिमयाचीं साधनें सुधारल्यामुळें अशा प्रकारचे अनेक लहान सहान कारखाने सर्वत्र निघत आहेत व त्यांपैकी कित्येक कर्तबगार लोकांच्या हातीं असून यशस्वी झाले आहेत. किफायतशीर उत्पादन व संतुष्ट व सुस्थित मजूर वर्ग ह्या दोहोंचें अशा लहान कारखान्यांत साहचर्य घडून येणें शक्य असल्यानें त्यांचा विस्तार होणें आर्थिक व सामाजिक दृष्ट्या इष्टच मानलें पाहिजे. तरीही मोठ्या प्रमाणावर चाललेल्या धंद्यांशीं टक्कर देण्यास लहान व स्वतंत्र धंदेवाले समर्थ होण्यास त्यांनीं आपल्या उत्पादन पद्धतींत अनेक सुधारणा करणें आवश्यक आहे, हें विसरतां कामा नये. गिऱ्हाइकांच्या मागणीचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांस आवडतील व घ्याव्याशा वाटतील अशा हरतऱ्हेच्या जिनसा पुरविणें, आणि आपल्या उत्पादनाच्या व विक्रीच्या पद्धतींत शक्य तितकी काटकसर करून स्वस्त भावानें अधिक माल विकण्यास समर्थ होणें हाच एक अलीकडील स्पर्धात्मक युगांत धंदा किफायतशीर करण्याचा राजमार्ग आहे. परंतु आपल्या इकडील बहुतेक धंदेवाले गिऱ्हाइकांची सोय व आवडानिवड ह्यांचा योग्य विचार करीत नाहींत एवढेंच नव्हे, तर तसें करण्यांत आणि उत्पादक साधनें व संघटना हीं शक्य तितकीं सुधारण्यांत स्वतःचाच शेवटीं फायदा होईल ही गोष्टही त्यांस सहसा पटत नाहीं.

हातमागाच्या धंद्याचें एकच उदाहरण पाहिल्यास आपणांस असें दिसून येईल की ठराविक वाणाचें कापड ठराविक पद्धतीनें तयार करण्याचा प्रघात बहुतेक विणकरी जवळ जवळ अंधपणानें तसाच चालू ठेवतात. गिऱ्हाइकाची सोय अगर हौस ह्यांमध्यें होणाऱ्या फेरबदलांकडे किंवा विणण्याच्या धंद्यांत ज्या अनेक यांत्रिक सुधारणा होत आहेत त्यांकडे त्यांचें म्हणण्यासारखें लक्ष्य नसतें. पाश्चात्य राष्ट्रांची आपापसांत आर्थिक स्पर्धा चालू असल्यानें त्यांच्यांतलि अनेक कल्पक व उद्योगप्रिय नागरिक प्रत्येक धंद्यांत अधिक अधिक सुधारणा करण्याचा व इतर धंदेवाल्यांहून अगर देशांहून जास्त सुबक व स्वस्त माल तयार करण्याचा प्रयत्न करीत असतात.

स्वतंत्ररीत्या आर्थिक व औद्योगिक महत्त्वाचे असे शोध लावण्याचा हिंदुस्थानांत फारसा उपक्रम झालेला नाहीं आणि निदान इतर राष्ट्रांत झालेल्या नवानेव सुधारणांचें शक्य तितक्या लवकर अवलंबन करण्याची प्रगमनशीलताही येथील धंदेवाले क्वचितच प्रगट करतात. हातमागावर विणलेल्या कापडास सर्व भागांत तीव्र मागणी असून व तो धंदा अनेक शतकें अस्तित्वांत असून मालाची विविधता व उत्पादन-पद्धतीची सुधारणा ह्या बाबतीत अगदीं परवांपरवांपर्यंत धंदेवाल्यांकडून म्हणण्यासारखी खटपट केली जात नसे. इकडील विणकर वर्गाचें सर्वव्यापी अज्ञान हेंच त्यांच्या आर्थिक अवनतीचें प्रमुख कारण आहे असें म्हटल्यास वावगें होणार नाही. हिंदी कारागीर व धंदेवाले ह्यांजमध्यें आर्थिकदृष्ट्या विशेष हानिकारक असलेले जे दोन प्रमुख दोष दिसून येतात ते अज्ञान व निरुत्साह हे होत. कांहीं अंशीं देशाच्या सध्यांच्या राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळें हे दोष उद्भवले असून समाजाच्या इतर वर्गांतही ते कमीअधिक प्रमाणांत दिसून येतात हे खरें. तथापि स्वतंत्र कारागीर आणि लहान धंदेवाले ह्यांची कार्यक्षमता वाढल्याशिवाय त्यांची व राष्ट्राची आर्थिक प्रगति होणें दुरापास्त असल्यानें सरकार आणि औद्योगिक ज्ञान व अनुभव मिळविलेले लोक ह्यांनीं धंदेवाल्या वर्गांत औद्योगिक माहितीचा प्रसार करणें व त्यांस सक्रिय उत्तेजन देणें आवश्यक आहे.

**२ मोठ्या प्रमाणावर चालणारे धंदे**:— विपुल भांडवलाच्या साहाय्यानें संकलित व प्रचंड प्रमाणावर उत्पादन केल्यास वस्तू कमी खर्चानें उत्पन्न करणें, त्यांचा खप वाढविणें आणि धंदा अधिक किफायतशीर करणें कसें शक्य असतें हें मागें सांगितलें आहे.[1] विशेषतः अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय विनिमयाच्या क्षेत्रांत स्पर्धेची तीव्रता दिवसानुदिवस वाढत असल्यानें उत्पादनाचें प्रमाण जास्तीत जास्त वाढवून खर्चांत काटकसर करणें हाच एक प्रमुख मार्ग धंदेवाल्यास शिल्लक उरतो. स्पर्धा व प्रचंड प्रमाणावर उत्पादन ह्यांचा सर्वत्र अन्योन्याश्रय दिसून यावा असा नैसर्गिक नियमच आहे असें वरवर पहाणारास भासलें तरीही त्यांत आश्चर्य नाहीं. संघटना व उत्पादक साधनें ह्यांत सुधारणा केल्यास स्वतंत्र व लहान धंदे टिकाव धरूं शकतील हें प्रायः खरें असलें तरी उत्पादन व विनिमय ह्या दोन्ही बाबतीत त्यांचें कार्य मर्यादितच राहणार. विशेषतः जवळ जवळ अमर्यादित मागणी भागविण्याकरितां उत्पन्न केल्या जाणाऱ्या एकाच ठराविक घाटाच्या वस्तूंच्या धंद्यांत मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें हें व्यक्तिशः उत्पादक व एकंदर समाज ह्यांस श्रेयस्कर असतें. मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याची इष्टता ज्यांस नाकारतां येत नाहीं व भांडवलवाले व मजूर ह्यांच्यांतील बखेडे ज्यांस अनर्थावह वाटतात असे कांहीं लोक कारागिरांनीं आपल्या सहकारी संस्था स्थापून मोठ्या प्रमाणावर धंदा चालवावा असें

१ पानें ४२–४६ पहा.

सुचवितात. परंतु भांडवलाचा पुरवठा व नियमनाचा एकतंत्रीपणा ह्या बाबतींत सहकारी उत्पादकांस स्वतंत्र किंवा समाईक भांडवलाच्या मंडळ्यांपुढें हातच टेकावे लागतात. शेतीच्या धंद्यांत सहकारी उत्पादनास विशेष वाव असूनही हिंदुस्थानांत व इतरत्र त्यांचा फारसा प्रसार होत नाही. शेती किंवा दुसरा धंदा भागीदारीनें करण्याच्या पद्धतींतही भांडवलाच्या पुरवठ्याच्या बाबतींत वैगुण्य असल्यानें भागीदारीचें मोठ्या प्रमाणावर चाललेले धंदे क्वचितच आढळतात. फार मोठ्या भांडवलाच्या साहाय्यानें प्रचंड प्रमाणावर धंदा चालविण्यानें उत्पादन खर्चाच्या बाबतींत काटकसर होत असली तरी भांडवलाचें सर्वगामी वर्चस्व आणि कारखानदारीच्या पद्धतीचे अनिष्ट सामाजिक परिणाम पदरांत बाधून घेण्यापेक्षां कमी कार्यक्षमतेचे सहकारी अगर भागीदारीचे धंदे अस्तित्वांत आणणें व वाढविणें विवक्षित मर्यादेपर्यंत इष्ट ठरतें. ह्या बाबतींत हिंदुस्थानांत आजपर्यंत जे उपक्रम झाले आहेत ते सर्वस्वी समाधानकारक अगर उत्तेजक नसले तरी सहकारी संस्थांत योग्य सुधारणा घडून आल्यास त्यांचा विस्तार होणें शक्य व इष्टही आहे हें नाकबूल करतां यावयाचें नाहीं. परंतु वाढती मागणी, पुढारलेल्या देशांतील धंदेवाल्यांची स्पर्धा आणि आवश्यक भांडवलाचें प्रचंड परिमाण ह्या कारणांमुळें समाईक भांडवलाच्या साहाय्यानें चालविलेले धंदे स्थापले जाणें अपरिहार्य आहे.

मोठ्या प्रमाणावरील धंदा सामान्यतः समाईक भांडवलाच्या मंडळीसच चालविणें शक्य असतें. अशा मंडळ्यांच्या घटनेचे प्रमुख विशेष मागें सांगितले आहेत.[1] समाईक भांडवलाच्या मंडळ्यांच्या व्यवस्थेसंबंधी हिंदुस्थान व इतर देश ह्यांमध्यें एक महत्त्वाचा फरक दिसून येतो. मंडळीच्या भागीदारांनी आपणांमधून कांही व्यवस्थापक निवडावे व व्यवस्थापकांच्या मंडळानें आपला एक प्रमुख व्यवस्थापक निवडून त्याच्या हातांत धंद्यांचीं सर्व सूत्रें रहावीं अशी सामान्यतः पाश्चात्य राष्ट्रांत पद्धत आहे. हा प्रमुख व्यवस्थापक साधारणपणें अनुभवी व विवक्षित धंद्याविषयीं संपूर्ण ज्ञान संपादन केलेला असतो. धंद्याची संघटना व उत्पादनपद्धति सुधारून धंदा अधिकांत अधिक किफायतशीर कसा करावा इकडेच त्याचें लक्ष्य असतें. ह्या पद्धतीच्या अवलंबनामुळें पाश्चात्य धंद्यांची कार्यक्षमता वाढण्यास विशेष मदत झाली आहे; परंतु हिंदुस्थानांत मात्र भागीदारांतून प्रमुख व्यवस्थापक नेमून त्याच्यावर धंद्याची जबाबदारी टाकण्याची पद्धत फारशी अस्तित्वांत नाही. भागीदारांनी आपले व्यवस्थापक निवडावे व व्यवस्थापक मंडळानें आपला अध्यक्ष निवडावा अशी व्यवस्था इकडेही केलेली असते; परंतु धंदा चालविण्याची प्रत्यक्ष जबाबदारी व्यवस्थापक मंडळाकडे नसून त्याकरता मुनीम किंवा अडत्या ह्या नात्यानें काम करणारी स्वतंत्र व्यक्ति अगर मंडळी नेमण्यांत येते. मुनीमाचें काम करणाऱ्या

---

१ मागें पान ४५-४७ पहा.

व्यापारी मंडळ्या बहुधा अनुभवी व वजनदार लोकांनीं चालविलेल्या असून मुख्य मंडळीच्या नफ्यांतून त्यांस ठराविक भाग मिळावयाचा असतो. मोठ्या प्रमाणावर, यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें व स्पर्धात्मक वातावरणांत धंदा चालविण्याची माहिती असलेले लोक हिंदुस्थानांत फारच थोडे असल्यानें व्यवस्था करण्याचें काम स्वतंत्र मंडळ्यांस देण्याच्या पद्धतीमुळें पुष्कळ मंडळ्या एकाच कार्यकुशल व वजनदार इसमास अप्रत्यक्षपणें चालवितां येतात हें खरें. शिवाय नवीन धंद्यांस आवश्यक असलेलें भांडवल मिळविण्यासही एखाद्या प्रतिष्ठित व संपन्न माणसानें चालविलेल्या मंडळीकडे व्यवस्थेचें काम दिल्याने विशेष मदत होते. परंतु कापसाच्या गिरण्यांच्या धंद्यांतील अलीकडील अनुभवावरून स्वतंत्र मंडळ्यांस व्यवस्थेचें काम देणें हें भागीदारांच्या व धंद्याच्या हितास बहुंशीं अपायकारक आहे असें दिसून येत आहे. धंदा यशस्वी करण्याची जबाबदारी कोणा एका विवक्षित व्यक्तीवर न लादतां अनेक धंदे चालवून आपला फायदा मिळविणाऱ्या स्वतंत्र मंडळ्यांस व्यवस्था पहावयास सांगितल्यानें धंद्याची प्रगति खुंटून तो लवकरच अनुत्पादक होण्याच्या मार्गास लागतो. कापसाच्या गिरण्यांच्या धंद्याची चौकशी करून त्यांस कांहीं मदत करणें इष्ट आहे किंवा काय ह्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें नुकीच एक कमिटी नेमली होती. धंद्याची व्यवस्था स्वतंत्र मंडळ्यांच्या ताब्यांत असणें इष्ट नाहीं, निदान त्या मंडळ्यांतील एखादा गृहस्थ तरी धंद्याची प्रत्यक्ष व विशिष्ट माहिती मिळविलेला असावा असा त्या कमिटीचा अभिप्राय आहे. जी स्थिति कापसाच्या गिरण्यांची तीच कमी अधिक प्रमाणांत इतर मोठमोठ्या धंद्याची आहे. अलीकडे धंदे चालविण्याची पूर्ण माहिती व अनुभव असलेले अनेक गृहस्थ पुढें येऊं लागले आहेत व त्यांनीं आपला सर्व वेळ, उत्साह व शक्ति हीं विवक्षित धंद्यांस अर्पण केल्याशिवाय ह्या स्पर्धात्मक युगांत ते धंदे यशस्वी होण्याची आशा नाही.

**३ समाईक भांडवलाच्या मंडळ्याः—** मोठ्या प्रमाणावर अर्थोत्पादन करण्याच्या पद्धतीचा हिंदुस्थानात कितपत प्रसार झाला आहे हें समाईक भांडवलाच्या मंडळ्यांच्या आंकडेवार इतिहासावरून स्पष्टपणें दिसण्यासारखें आहे. कारण बहुतेक समाईक मंडळ्या मोठ्या प्रमाणावर धंदा करणाऱ्या असून निव्वळ खाजगी व्यक्तींच्या मालकीचे व मोठ्या प्रमाणांवर चालविलेले असे फारच थोडे धंदे हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहेत. मागील प्रकरणांत युद्धकालीं व युद्धोत्तर कालांत येथें पुष्कळच मंडळ्या स्थापन होऊन पुढें मंदीच्या दिवसांत त्यापैकीं बऱ्याच मोडल्या गेल्या असें सांगितलें आहे. १९२१–२२ सालाच्या सुरुवातीपर्यंत एकंदर १०,७८३ मंडळ्या स्थापल्या गेल्या असून त्यांतल्या ५१८९ च त्या वर्षाच्या शेवटीं चालू होत्या; ह्यावरून महायुद्धामुळें अस्थिर झालेल्या परिस्थितीचा इकडील उद्योगधंद्यांवर किती तीव्र परिणाम झाला हें दिसून येईल. हिंदुस्थान सरकारनें समाईक मंडळ्या नोंदविण्याकरितां एक

स्वतंत्र कायदा केलेला असून नोंदविलेल्या मंडळ्यांस त्या कायद्यान्वयें विशिष्ट अधिकार, हक्क व जबाबदाऱ्या प्राप्त होतात. वरील कायद्यान्वयें नोंदलेल्या सर्व मंडळ्यांचें भांडवल हिंदी चलनांत म्हणजे रुपयांत नमूद करावें लागतें. १८६९ साली कलकत्ता येथे नोंदली गेलेली 'हाँगकाँग अँन्ड शांघाय बँकिंग कॉर्पोरेशन' ही एकच जुनी व मोठी पेढी वरील कायद्यास अपवादात्मक असून तिचें मूळ भांडवल हाँगकाँग येथील अमुक इतके डॉलर असें नमूद झालेलें आहे; व त्या रकमेचे हिंदी रुपये अमुक होतात अशीही नोंद आहे. १९१५–१६ हें युद्धाच्या प्रारंभीचें वर्ष, १९२०–२१ हें नुकेंच युद्ध संपलें असतांचें वर्ष आणि १९२४–२५ हें युद्धकालीन असाधारण परिस्थिति बरीच निवळल्यानंतरचें वर्ष असें मानल्यास ह्या तीन वर्षांत समाईक मंडळ्या व त्यांचें भांडवल ह्यांची जी परिस्थिति होती तिचें पुढील आंकडेमय दिग्दर्शन उद्बोधक ठरेल.

| | १९१५–१६ | १९२०–२१ | १९२४–२५ |
|---|---|---|---|
| मंडळ्यांची संख्या | २,४७६ | ४,७०८ | ५,२०४ |
| अधिकृत भांडवल ( हजार रुपये ) | १,८४,२०,९० | ६,९७,८५,७४ | ६,६५,९६,६४ |
| भरणा झालेलें भांडवल ( हजार रुपये ) | ८५,०२,४५ | १,६४,४६,२५ | २,७५,५२,८४ |

नोंदलेल्या मंडळ्यांची संख्या व त्यांचें भरणा झालेलें भांडवल ह्यांच्या बाबतीत निरनिराळ्या प्रांतांची तुलना केल्यास असें दिसतें की मुंबईपेक्षां बंगालमध्यें मंडळ्यांची संख्या अधिक परंतु भरलेल्या भांडवलाची सरासरी रक्कम कमी असते. ब्रह्मदेश, पंजाब, दिल्ली, मद्रास ह्या भागांतही मंडळ्यांची संख्या बंगालपेक्षां पुष्कळच कमी असूनही भरलेल्या भांडवलाची सरासरी रक्कम मात्र त्या प्रांतापेक्षां अधिक आहे. भरलेल्या भांडवलाचा एक चतुर्थांशापेक्षां अधिक भाग सरकी काढणें, पिंजणें, गठ्ठे बांधणें, सूत कातणें, व विणणें ह्या धंद्यांत गुंतविलेला आहे. त्यांतही बराच मोठा भाग मुंबई इलाख्यांतील कापसाच्या गिरण्यांचा आहे. समाईक मंडळ्या करीत असलेला धंदा व त्यांस उपलब्ध असलेलें त्यांचें स्वतःचें भांडवल ह्यांबद्दल वर्गवारीनें पुढें माहिती दिली आहे.

| मंडळ्या करीत असलेला धंदा. | संख्या. | भरणा झालेलें भांडवल ( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. ) |
|---|---|---|
| १ पेढ्यांचे, सावकारीचे, व विमा उतरण्याचे व्यवहार | १००२ | २०,४८ |
| २ माल व उतारू ह्यांची वहातुक | २१७ | २२,३४ |
| ३ व्यापार व लोखंड, पोलाद, जहाजें कातडीं, काच, तंबाकू ह्यांचे कारखाने | २०७२ | ८७,५९ |
| ४ कापूस, ताग, पीठ, तेल, लाकूड, तांदूळ, वगैरेंच्या गिरण्या | ७३९ | ७४,३२ |
| ५ चहाचे व इतर मळे | ५०० | १०,८२ |
| ६ खाणी | ३५८ | ४१,५६ |
| ७ घरें बांधणें व जमीनजुमल्याचा व्यवहार करणें | १०३ | ६,१५ |
| ८ दारू गाळणे | १२ | ३६,२ |
| ९ गूळ व साखर | ४६ | १,९२ |
| १० खाणावळी व इतर धंदे | १५५ | १०,०२ |

वर दिलेल्या भांडवलाच्या आंकड्यांत हिंदी समाईक मंडळ्यांनीं काढलेल्या डिबेंचर्सची रक्कम व परदेशांत व ह्या देशांत शाखा असलेल्या मंडळ्यांच्या भांडवलापैकीं हिंदुस्थानांत गुंतलेला भाग ह्यांचा अंतर्भाव केलेला नाहीं. सन १९२२ मध्यें समाईक मंडळ्यांच्या डिबेंचर्सची रक्कम १४ कोटी रुपये होती. हिंदुस्थानांत धंदा करणाऱ्या परदेशी मंडळ्यांच्या अनेक देशांत शाखा असल्यानें त्यांच्या भांडवलापैकीं किती रकमेचा हिंदी उद्योगधंद्यांस व व्यापारास आधार मिळतो हें निश्चयानें सांगणें कठीण आहे. तरी १९२४–२५ साली ७८९ परदेशी मंडळ्या हिंदुस्थानांत व्यापारधंदा करीत असून त्यांच्या भांडवलाचे आंकडे ६१ कोटी पौंड भरलेलें भांडवल व १५॥ कोटी पौंड डिबेंचर्सचें भांडवल असे होते. हिंदी आगगाड्या व ट्रॅमगाड्या ह्यांच्या धंद्यांत २॥ कोटी पौंड, बांधकामाच्या आणि रासायनिक द्रव्यांच्या कारखान्यांत साडेतीन कोटी पौंड, लोखंड, पोलाद व जहाजें ह्यांच्या धंद्यांत २। कोटी पौंड, चहाच्या मळ्यांत २। कोटी पौंड, व तेलाच्या खाणीत ८० लक्ष पौंड, असें परदेशी भांडवल महत्त्वाच्या उद्योगधंद्यांत गुंतलेलें आहे. ह्या सर्वांची बेरीज केल्यास ती २९ कोटी पौंड भरते. म्हणजे सर्व हिंदी समाईक मंडळ्यांच्या भरलेल्या भांडवलाची बेरीज केल्यास जवळ जवळ त्याच्या दुपटीइतकी रक्कम परदेशी भांडवलवाल्यांनीं हिंदुस्थानांत गुंतविलेली आहे असें म्हटलें पाहिजे. भांडवलाबरोबर

बहुतेक धंद्यांत हुकमतही परकीयांचीच आहे; ह्यावरून मोठ्या प्रमाणावर चालणाऱ्या हिंदुस्थानांतील धंद्यांत भांडवल व संघटना ह्या दोन्ही बाबतीत हिंदी लोकांचा किती थोडा भाग आहे व ह्या दोन्ही दिशांनीं किती प्रगति होणें आवश्यक आहे हें दिसून येईल.

**४ संघटना-कौशल्यः**– मोठ्या प्रमाणावर व कारखानदारीच्या पद्धतीनें उत्पादन करण्याचा येथील उपक्रम बहुंशीं युरोपीयन धंदेवाल्यांच्या कर्तबगारीचें व व्यापारी धाडसाचें फळ होय असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति नाहीं. हिंदुस्थानांतील इंग्रजी अंमलाच्या अलीकडील काळांत ब्रिटिश धंदेवाल्यांस भांडवल, औद्योगिक ज्ञान व अनुभव आणि सरकारची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मदत इत्यादि बाबतीत विशेष अनुकूल परिस्थिति असल्यानें त्यांनी मळे, खाणी, गिरण्या, बांधकाम वगैरे अनेक भारी भांडवलाचे व किफायतशीर धंदे येथें स्थापन केले. परकी भांडवलवाल्यांच्या वाढत्या वर्चस्वामुळें इकडील उत्पादकांचें नुकसान होत असतां हिंदुस्थान सरकार मात्र आर्थिक तटस्थतेच्या धोरणाचें पांघरूण घेऊन बसले होते. हिंदी शेतकरी व कारागीर वर्गास भांडवल, धंदेशिक्षण वगैरे बाबतीत मदत करण्याचें मनां-तही न आणतां अप्रत्यक्षपणें इंग्रजी भांडवलवाल्यांस मात्र सरकार पूर्ण मदत करीत असे. हिंदी लोकात पाश्चात्य शिक्षणाचा प्रसार होऊं लागल्यापासून देशाची आर्थिक व सामाजिक परिस्थिति सुधारण्याकडे त्यांचे लक्ष्य जाऊं लागले. तरी बरेच दिवस सुशिक्षित हिंदी लोक सामान्यतः सरकारी नोकरी अगर पांढरपेशाचे धंदे ह्यांचा आश्रय करीत असल्यानें औद्योगिक सुधारणांप्रीत्यर्थ त्यांच्या हातून प्रत्यक्षपणें कांहीही घडत नसे. अशा वेळी पार्शी, खोजे, भाटीये, मारवाडी वगैरे इकडील व्यापारी व धंदेवाल्या वर्गांचे इग्रजी धंदेवाल्याशी वाढतें वळण असल्यानें त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून हिंदी व्यापारीही मोठ्या प्रमाणावर धंदा करण्यास हळुहळु शिकूं लागले. विशेषतः मुंबई, कलकत्ता, मद्रास वगैरे प्रांतिक राजधान्यांत युरोपीयन धंदेवाले व हिंदी व्यापारी ह्यांची परस्पर देवघेव फार मोठ्या प्रमाणांत होत असे व परदेशी व्यापारावर मिळविलेला हिंदी धंदेवाल्यांचा नफाही नव्या धंद्यांस भांडवल म्हणून वापरतां येई. तरी प्रत्येक धंद्याचें विशिष्ट ज्ञान व अनुभव ह्याच्या बाबतीत हिंदी धंदेवाल्यांस बहुंशी युरोपियन लोकांवर अवलंबून रहावें लागत असून अजूनही अनेक मोठमोठ्या धंद्यांत महत्त्वाच्या जागांवर गोरे लोक कामावर आहेत. मोठ्या प्रमाणावर धंदे चालून ते यशस्वी होण्यास भांडवलाची वाढ होणें हें जितकें जरूर आहे तितकीच किंबहुना त्याहूनही जास्त धाडसी व कार्यकुशल योजकांच्या श्रमाची आवश्यकता आहे. परंपरागत पद्धतीनें धंदे चालविण्याची हिंदी कारागिरांची आग्रह-बुद्धि जसजशी कमी होईल व धंदेशिक्षणाचा सर्व वर्गांत जसजसा अधिक प्रसार होत जाईल तसतसा लायख व कर्तबगार हिंदी योजक निर्माण होण्याचा अधिक संभव आहे. ज्या वर्गास पाश्चात्य ज्ञान व अनुभव संपादन करून घेण्याऱ्या सोयी आहेत

त्या मध्यम व पांढरपेशा वर्गाची इकडील विशिष्ट परंपरा आणि जातिभेदाची पद्धत, ह्यांमुळें त्यांची उत्पादक व व्यापारी धंद्यांपासून बहुतेक फारकत झालेली असते ही फारच मोठी उणीव होय. तरी निरनिराळ्या वर्गांतील आर्थिक भेद युरोपांतही वाटतात त्याहून बरेच भक्कम व तीव्र असतात हें ध्यानांत घेतल्यास त्या बाबतीत इकडील परिस्थिति अगदींच निराशाजनक आहे असें म्हणण्याचें कारण नाही. व्यावहारिक धूर्ततेमुळें व औद्योगिक कर्तबगारीनें जे इसम व्यापार–धंद्यांत यशस्वी होतात त्यांस आपल्या मुलाबाळांनीं व सग्यासोयऱ्यांनीही त्याच धंद्यांत प्रथम पासून पडावें, वृथा पुस्तकी शिक्षणाच्या मार्गे लागूं नये, असें वाटतें. हिंदी धंदेवाल्यांत हा पूर्वग्रह विशेष बळकट असतो. पारशी समाजाचें एक ठळक उदाहरण सोडून दिल्यास मारवाडी, बनिया, चेटी, खोजे इत्यादि व्यापारधंद्यांत यशस्वी ठरलेल्या इतर जातींत सामान्य व विशिष्ट शिक्षणाचा फारसा प्रसार झालेला नाही. कोणत्याही मोठ्या धंद्याचें धोरण ठरवितांना आजकाल स्वतःच्या व इतर देशांतील इतक्या विविध व सूक्ष्म गोष्टी ध्यानांत घ्याव्या लागतात की निव्वळ ठोकळ मानानें अगर व्यवहारचातुर्यानें त्यांचा अंदाज लागणें शक्य नसतें. ह्यास्तव व्यापारी व धंदेवाल्या वर्गांत सर्व प्रकारच्या शिक्षणाचा प्रसार होणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणे इतर वर्गांतील लोकांनीं योग्य शिक्षण घेऊन आपली कार्यक्षमता वाढविली तर त्यासही व्यापारधंद्यांत पडण्यास पूर्ण संधि मिळाली पाहिजे. मध्यम वर्गांतील धंदेशिक्षण घेतलेल्या अनेक लोकांस प्रमुख धंदेवाले झिडकारून टाकतात. परंतु हें धोरण अत्यंत संकुचित व अदूरदृष्टीचें असून व्यक्तिशः सुशिक्षित व धंदेवाले लोक, आणि एकंदर समाज ह्यांच्या आर्थिक प्रगतीस सर्व वर्गांतील कार्यक्षम लोकांच्या श्रमाची जरूर आहे. मोठमोठे धंदे चालविण्याला लायख अशा इसमाची हिंदुस्थानांत फार कमी संख्या असल्याने आपणांस परकीयांवर अनेक आर्थिक बाबतीत विसंबून रहावें लागत आहे. ही स्थिति सुधारणें आवश्यक असून सर्वसाधारण व विशिष्ट धंदेशिक्षणाच्या सोयी वाढविल्याखेरीज व सर्व वर्गांतील होतकरू तरुणांस धंद्यांत पडण्याची सवलत ठेवल्याखेरीज वरील सुधारणा घडून येणार नाहीं.

**५ धंदे चालविण्याचें ज्ञान व अनुभव**— हिंदी धंदेवाले व मोठमोठ्या कारखान्यांतील हिंदी चालक ह्यांची यूरोपियन चालकाशी तुलना केल्यास अनुभव, शास्त्रीय व व्यापारी ज्ञान, शिस्त इत्यादि बाबतींत सामान्य हिंदी चालक सामान्य यूरोपीयन चालकाहून कमी प्रतीचा असतो असें दिसून येतें. यूरोपीयन धंदेवाल्यांस पाश्चात्य राष्ट्रांतील ज्ञानवृद्धि व औद्योगिक अनुभव ह्यांचा सहजासहजीं लाभ मिळतो हें खरें असलें तरी जो धंदा आपण स्वीकारला त्याबद्दल सर्व शास्त्रीय व व्यावहारिक माहिती मिळविण्याची ते मनापासून व कष्ट सोसून खटपट करतात, हा त्यांचा विशेष गुण होय. हिंदी धंदेवाल्यांतही हे गुण अगदींच नाहीत असें नाहीं; त्यांच्यापैकी कित्येकजण कार्यक्षमतेंत यूरोपीयनांसही मागें सारतील असे आहेत. परंतु त्यांची संख्या फारच थोडी असून हिंदुस्थानांत मोठमोठे कारखाने यशस्वी होण्यास

अशा शेंकडों लोकांची जरूर आहे. यूरोप, अमेरिका इत्यादि देशांतील शैक्षणिक व औद्योगिक संस्थांत इकडील होतकरू लोकांस पाठविणें व हिंदुस्थानांत वरिष्ठ व विशिष्ट धंदेशिक्षणाच्या सोयी करणें ह्या बाबतींतही सरकार व धंदेवाले ह्यांस बरीच सुधारणा करणें शक्य व इष्ट आहे. नाही तर निव्वळ शिस्त व हिशेबी चोखपणा राखण्याकरितांही यूरोपीयन व्यवस्थापक नेमणें आवश्यक होऊन बसते. मुंबईच्या कापसाच्या गिरण्यांमध्यें दोन तृतीयांशावर व्यवस्थापक हिंदी आहेत, तर बंगाल, बिहार व इतरत्र सर्व मोठमोठे धंदे यूरोपियन चालकाकडून व व्यवस्थापकांकडून चालविणें हिंदी मंडळयासही आवश्यक वाटतें. जमशेदपूर येथील टाटांच्या पोलादाच्या कारखान्यांत बहुतेक व्यवस्थापक, इंजिनियर व फोरमेन यूरोपीयनच आहेत. ब्रह्मदेशांतलि तेलाच्या खाणीवर तर जवळ जवळ सर्वच अधिकारी गोरे आहेत. मुंबईच्या कापसाच्या गिरण्यांत यूरोपीयन नोकराचें प्रमाण हजारी एक असें पडतें; बंगाल्यातलि तागाच्या धंद्यांत हेच प्रमाण दर तीनशें हिंदी कामकऱ्यांस एक यूरोपीयन असें आहे. कोळशाच्या खाणी व लोखंडाचे कारखाने ह्यांत तर हें प्रमाण अधिकच आहे. कोणत्याही उद्योन्मुख राष्ट्रास पहिल्याप्रथम विशिष्ट ज्ञान व अनुभव असलेले लोक परदेशाहून आणावे लागणें सहाजिक आहे. यंत्रें, भांडवल, कामकरी ही अर्थोत्पादनाचीं केवळ साधनें असून तीं स्वदेशात उपलब्ध नसल्यास परदेशांहून योग्य किंमत देऊन आणण्यांत कोणताच कमीपणा नसून उलट नवे धंदे अस्तित्वात येण्यास तसें करणें आवश्यकही आहे. यांत्रिक व औद्योगिक सुधारणेच्या अग्रभागीं असलेल्या अमेरिकेसही पहिल्याप्रथम युरोपियन कारागिरांवरच अवलंबून रहावें लागत असे. परंतु उत्पादनाच्या सर्व साधनांच्या बाबतींत प्रत्येक राष्ट्रानें स्वायत्त होणे इष्ट आहे व हिंदुस्थानासारख्या आधीच अनेक बाबतींत परावलंबी झालेल्या देशांत कर्तबगार, अनुभवी व तज्ज्ञ चालक तयार करण्याची तर विशेष आवश्यकता आहे. सर्वच हिंदी धंद्यात काबाडकष्टाची व कमी कुशलतेची कामें हिंदी लोकांकडून करून घेण्याची व वरिष्ठ दर्जाची व विशेष कुशलतेची कामें भारी पगारवाल्या यूरोपीयन कामकऱ्यांस देण्याची आज किती आवश्यकता वाटत आहे हें १९२१ सालच्या खानेसुमारीतलि पुढील आकड्यांवरून दिसून येईल.

| कामकऱ्यांचा वर्ग. | यूरोपीयन व अँग्लोइंडियन कामकऱ्यांची संख्या. | हिंदी कामकऱ्यांची संख्या. |
|---|---|---|
| व्यवस्थापक | ३,४९८ | ११,३६५ |
| देखरेख करणारे व विशिष्ट यांत्रिक ज्ञान असलेले कामकरी | ९,१४७ | ३७,५५३ |
| कारकुनी पेशाचे लोक | २,०२६ | ५९,६५५ |
| कुशल व कसबी कारागीर | ४,४२७ | ७,७९,५५३ |

**६ घरगुती धंद्यांचें संवर्धन**—सद्यःकालीन आर्थिक प्रगतीचा ओघ एकंदरीनें मोठ्या प्रमाणावरील उत्पादन वाढविण्याकडे वहात असला तरी भांडवल, प्रेरकशक्ति, लहान सहान यांत्रिक साधनें, विशिष्ट ज्ञान इत्यादि बाबतींत अनुकूल परिस्थिति निर्माण झाल्यास घरगुती धंदे अजूनही ऊर्जितावस्थेस येणें शक्य आहे हें मागें एक दोन ठिकाणीं सांगितलेंच आहे. उत्पादनाच्या सर्व घटकांची किफायतशीर संघटना करणें व उपभोक्त्यांच्या गरजांचे प्रकार व परिमाण ह्यांस अनुसरून उत्पादनाचें नियमन करणें ह्या बाबतींत लहान धंद्यांत जी सुधारणा हिंदुस्थानांत घडून येणें आवश्यक आहे तिचा येथें थोडासा विचार करणें इष्ट होय. गिऱ्हाइकांचें सान्निध्य व त्यांच्या बहुतेक गरजांचा साधेपणा ह्यांचा फायदा लहान सहान धंद्यास आपोआपच मिळण्यासारखा असतो; परंतु उपभोक्त्याच्या आवडीनिवडीचें वैशिष्ट्य ध्यानांत घेऊन मालांत थोडा फार आकर्षकपणा आणला तर मोठमोठ्या कारखान्यांच्या स्पर्धेस भिण्याचेंही त्यास कारण राहणार नाही. लहान प्रमाणावरील धंदे देशाच्या सर्व भागांत पसरले तर त्यांना प्रेरक शक्तीचा पुरवठा कसा करावा हा बिकट प्रश्न असतो. परंतु सुदैवानें हिंदुस्थानांत पाण्याच्या ओघाच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करण्यास अनुकूल परिस्थिति असल्यानें नद्या नाल्यास धरणें व बांध बांधून विजेची शक्ति कमी किंमतीस दूरदूर अंतरांवर पुरविणें शक्य आहे. शिवाय पाण्याच्या प्रवाहानें यंत्रें चालू झाल्यानंतर तें पाणी फुकट न दवडतां त्याचा शेतीस उपयोग केला तर अधिकच फायदा होण्यासारखा आहे. आजपर्यंत हिंदुस्थानांत जलौघाच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करण्याचे जे कारखाने निघाले आहेत त्यांच्यांत उत्पन्न होणारी बहुतेक सर्व शक्ति मोठमोठ्या शहरांतील वहातुकीच्या, रोषणाईच्या किंवा उत्पादकतेच्या धंद्यांस दिली जात आहे. परंतु वीज उत्पन्न करण्याचे असे अधिक कारखाने निघतील व शहरांपासून दूर असणाऱ्या लहान धंदेवाल्यांस माफक दरानें प्रेरकशक्ति पुरविण्याचें धोरण अंमलांत येईल तर लहान उत्पादकांस आपलें स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवतां येऊन मोठमोठ्या शहरांतून अनेक प्रचंड कारखान्यांची गर्दी झाल्यानें जे आर्थिक व सामाजिक दोष उद्भवतात त्याचाही प्रतिबंध करतां येईल. विद्युत्शक्ति निर्माण करण्यास अमर्याद वाव असूनही अजून फारच थोड्या धंद्यांत विजेचा उपयोग केला जातो हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| प्रेरक शक्तीचा प्रकार. | शक्ति वापरणाऱ्या कारखान्यांची संख्या. |
|---|---|
| वाफ | ५,२९३ |
| तेल | १,३३५ |
| पाणी | ८५ |
| गॅस | १६५ |
| वीज | |
| ( १ ) कारखान्यांत उत्पन्न झालेली | ४२० |
| ( २ ) बाहेरून आणलेली | ७१७ |
| प्रेरकशक्ति वापरणाऱ्या कारखान्यांची एकंदर संख्या. | ८,०१५ |

विजेशिवाय गॅसचीं इंजिनेंही अलीकडे लहान लहान आकाराचीं व स्वस्त मिळूं लागलीं आहेत, व त्यांचा प्रसारही झपाट्यानें होत आहे. परंतु प्रेरक शक्तीखेरीज इतरही अनेक बाबतींत यांत्रिक सुधारणांचा घरगुती व लहान धंदेवाल्यांनीं उपयोग करून घेणें आवश्यक आहे. कांहीं वर्षांपूर्वीं पाटणा येथें अखिल भारतीय खादी प्रदर्शन भरलें होतें त्यांत दाखविलेल्या मालावरून अनेक तज्ज्ञांची अशी खात्री पटली कीं सूत कातण्याचा व कापड विणण्याचा धंदा देशाच्या अनेक भागांत जागृत असून इकडील विणकरांच्या पद्धतींस कांहीं यांत्रिक सुधारणांची जोड दिल्यास तो खात्रीनें भरभराटीस येईल. धांवता धोटा (फ्लाय शट्ल्), नक्षीचा पिंजरा (डॉबी), नक्षीची जाळी (जॅकार्ड) वगैरे सुधारलेली साधनें वापरून व खरेदी–विक्रीकरितां किंवा धंदा चालविण्याकरितां सहकारी संस्था स्थापून कापूस, लोंकर, रेशिम इत्यादि-कांचे धागे काढण्याच्या व विणण्याच्या धंद्यांची पुनर्घटना केल्यास ते धंदे किफाय-शीर होऊन हिंदी लोकांसही कापडाच्या बाबतींत स्वायत्त होणें शक्य होईल. हल्ली खादीप्रसारार्थ लोकांमध्यें जी चळवळ चालली आहे व हिंदी उद्योगधंद्यांस सक्रिय उत्ते-जन देण्याचें जें धोरण हळुहळु सरकार अंगिकारीत आहे त्यांचा पूर्ण फायदा घेऊन विणकराचे व इतर धंदे ऊर्जितावस्थेस आणणें शक्य व इष्ट आहे. भांडवल, प्रेरक-शक्ति, यांत्रिक साधनें, विशिष्ट धंदेशिक्षण ह्यांसारखीं आर्थिक साधनें योग्य प्रमाणांत उपलब्ध झालीं तरच देशाभिमानयुक्त लोकाश्रयाचा चिरकाल लाभ होणें शक्य व हितकारक असतें हें विसरतां कामा नये. उदाहरणार्थ, सुरत शहरांत जुने माग, नव्या पद्धतीनें परंतु प्रेरक शक्तीशिवाय चालविलेले माग, आणि प्रेरक शक्तीच्या साहाय्यानें चालविलेले सुधारलेले माग ह्यांच्या साहाय्यानें व साधारण मोठ्या प्रमा-णांत हरतऱ्हेचें कापड विणण्याचा धंदा विशेष सुस्थितींत असलेला दिसतो. यांत्रिक सुधारणा, भांडवल व संघटना ह्यांच्या साहाय्यानें लहान व मध्यम धंदे कसे किफाय-शिर होऊं शकतात ह्यांचें सुरतेंतील विणकरांचा धंदा हें अत्युत्तम उदाहरण होय. ह्याच प्रगमनशलि धोरणाच्या अवलंबनानें देशाच्या बहुतेक सर्व भागांत निदान एखादा तरी उत्पादक धंदा चालणें अशक्य आहे असें नाहीं.

**७ औद्योगिक विकासः**—हिंदुस्थानाच्या आर्थिक इतिहासांतील सध्यांचें युग संक्रमणाचें आहे हें अनेक गोष्टींवरून सहज दिसून येण्यासारखें आहे. स्वतंत्र घरगुती धंदे, लहान व मध्यम प्रमाणावर चालविलेले अर्धवट भांडवलशाहीचे धंदे व प्रचंड कारखाने आणि उद्योग ही सर्व आज आपल्या देशांत एकसमयावच्छेदेंकरून अस्तित्वांत आहेत. हिंदी लोकांच्या गरजांमध्यें जो हळुहळु फरक होत आहे त्याचेंही धंद्यांच्या संघटनेंतील विविधता हें एक प्रत्यंतर होय. टोप्या, बाजाच्या पेट्या, सुऱ्या, कात्र्या, बूट, जोडे, नव्या पद्धतीचे कपडे, इत्यादि वस्तूंस असलेली मागणी वाढत असून घरगुती धंद्यांसच थोडेंसें भांडवली स्वरूप देऊन त्या उत्पन्न कराव्या लागतात.

कागद, कांचेचें सामान, साबण, भांडीं, दिवे, कापड, ब्लँकेटं वगैरे वस्तूंचा पुरवठा मोठमोठ्या कारखान्यांतून व्हावयास लागला आहे, त्याचें कारण हे जिन्नस सुबक व स्वस्त रीतीनें तयार होण्यास मोठ्या प्रमाणावर व यंत्रांच्या साहाय्यानें त्यांचें उत्पादन करणें जरूर असतें हें होय. एका बाजूनें उपभोक्त्यांच्या मागणीची विविधता व परिमाण ही वाढत असून दुसऱ्या बाजूनें परदेशी उत्पादकांची आपापसांत व हिंदी धंदेवाल्यांशी तीव्र स्पर्धा चालू झाली आहे. अशा परिस्थितीत जुन्यापुराण्या व अनुत्पादक पद्धतीनें चालविलेले लहान धंदे बुडूं लागले, व त्यांच्या आश्रयानें राहणारे लोक शहरांमध्यें जाऊन कारखान्यांत व इतरत्र मोलमजुरी करूं लागले तर त्यांत आश्चर्य नाही. कारखानदारीच्या पद्धतीचे मागें जे अनेक सामाजिक व नैतिक दोष दाखविले आहेत तेही हलुहलु येथें प्रगट होऊं लागले आहेत. 'विलायती प्रतिस्पर्ध्यांपुढें हिंदी उत्पादकांस जय मिळण्याची फारशी आशा नाही; उलट, जुनी आर्थिक व सामाजिक घटना मोडून नव्या दारिद्र्यप्रधान, रोगकारक व अनीतिमय समाजव्यवस्थेचा डोळे मिटून स्वीकार केल्यास लवकरच सर्व हिंदुस्थान देश यूरोप व अमेरिका ह्या राष्ट्रांच्या मानानें मोलमजूरी करणाऱ्या असंख्य दरिद्री, रोगी व दुर्वृत्त लोकांनी गजबजलेली एक पेठ होऊन बसेल;' अशी कित्येक विचारी हिंदी गृहस्थांसही भीति वाटूं लागली आहे. समाजाचे उत्पादक सामर्थ्य वाढविणाऱ्या यांत्रिक सुधारणांचा सर्वस्वी त्याग न करतां लहान लहान धंदे अंशतः जातिविशिष्ट पायावर चालविले तर सामाजिक स्वास्थ्य व प्रगति ह्याचा लाभ करून घेतां येईल. ज्या कारखानदारीच्या व संकलित उत्पादनाच्या पद्धतीमुळे पाश्चात्य राष्ट्रांत सामाजिक अशांतता व तटे ही सुरू झालीं आहेत, त्या पद्धतीचें हिंदुस्थानात वेळीच नियमन केलें व येथील जुन्या समाजघटनेचें स्वरूप कांहींसें बदलून व कारागिरांची साधनें सुधारून घरगुती व लहान धंद्यांचें संवर्धन केलें तर ते अधिक हितप्रद होईल, असें कित्येकांस वाटतें. आर्थिक विकसनाच्या सध्याच्या अवस्थेत जुन्या व नव्या पद्धतींचा एकत्र सहवास घडत असून आर्थिक धोरणाविषयींही नवमतप्रवर्तक व पुराणमताभिमानी असे दोन पक्ष दिसून येतात.

विशिष्ट गरजा भागविण्यास आवश्यक असलेल्या विवक्षित प्रकारच्या वस्तु निर्माण करण्याचे धंदे पूर्वकालींही ठराविक ठिकाणींच चालविले जात. उदाहरणार्थ, डाक्का, काशी, दिल्ली, अमृतसर, श्रीनगर, मुर्शिदाबाद, अहमदाबाद, मच्छलीपट्टण, मदुरा इत्यादि ठिकाणीं सूत, रेशीम व लोंकर ह्यांचें कापड, भांडीं, शाली, गालिचे, इत्यादि जिन्नसांची पुष्कळ पैदास होत असे व त्यांची विक्रीही हिंदुस्थानाच्या सर्व भागांत व कधीं कधीं परदेशांतही केली जाई. नैसर्गिक परिस्थितीची अनुकूलता, विशिष्ट जातीच्या लोकांचें परंपरागत कौशल्य, राजसत्तेचें उत्तेजन इत्यादि कारणांनी वरीलप्रमाणें देशाच्या निरनिराळ्या भागांचा आपापसांत

श्रमविभाग घडून येत असे. त्याचप्रमाणें प्रत्येक प्रांतांत विवक्षित ठिकाणीं विशिष्ट प्रकारचा माल तयार होऊन सर्व प्रांतांत त्याचा खप होत असे. परंतु अशा भूगोलिक श्रमविभागाचा एकंदर विस्तार मर्यादितच होता व प्रत्येक गांव अगर प्रांत बहुतेक स्वावलंबी असून ठिकठिकाणी विशिष्ट जातीच्या लोकांनी विवक्षित प्रकारचा माल पुरवावा असाच रिवाज असे. अलीकडे गिऱ्हाइकांच्या मागणींत फरक व वाढ होऊं लागल्यापासून आणि वहातुकीच्या साधनांत कल्पनातीत सुधारणा घडून आल्यापासून जातिनिविष्ट श्रमविभागाची व स्थानिक स्वायत्ततेची पद्धत मागें पडत असून सर्व जगांतील आर्थिक परिस्थितीच्या मानानें भूगोलिक श्रमविभागांत हिंदुस्थानास व त्याच्या निरनिराळ्या भागांस जो धंदा विशेष अनुकूल ठरेल तो अंगिकारावा लागत आहे; आणि यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें प्रत्येक धंद्यांत श्रमविभागाचें तत्त्वही फार मोठ्या प्रमाणावर अवलंबिलें जात आहे. अंतर्राष्ट्रीय व्यापाराचा अंतर्गत औद्योगिक घटनेवर होणारा परिणाम, उत्पादन मोठ्या प्रमाणावर करण्याचा प्रघात, भांडवलाचें वाढतें वर्चस्व, यांत्रिक साधनांची विपुलता, धंदेवाईक मजूर वर्गाचा उद्भव, मोठमोठ्या शहरांत सहस्त्रावधि लोकांची दाटीनें व रोगकारक वातावरणांत वसति इत्यादि अर्वाचीन आर्थिक घटनेचे बरे वाईट विशेष दिवसानुदिवस अधिक प्रामुख्यानें दिसूं लागत आहेत. इंग्लंडमध्यें अठराव्या शतकाच्या अखेर अखेर व यूरोपच्या इतर भागांत आणि अमेरिकेंत एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या पन्नास पाऊणशें वर्षांत ज्या प्रकारची सर्वव्यापी व दीर्घपरिणामी क्रान्ति घडून आली तशीच ती गेल्या तीस चाळीस वर्षांत हिंदुस्थानांत होत आहे हें स्पष्ट दिसत आहे. जुन्या कारागीर वर्गाची हलाखी, लहान व मध्यम प्रमाणावरील धंद्यांचा ऱ्हास, शहरांतील मजूरवर्गाचे हाल इत्यादि औद्योगिक क्रान्तीच्या अनिष्ट परंतु परिहार्य परिणामांचें निवारण व निरसन येथें कोणत्या मार्गांनी करतां येईल हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. जातिभेदाच्या पद्धतिवर उभारलेल्या श्रमविभागाच्या तत्त्वास औद्योगिक क्रान्तीच्या ह्या कालांत वाव आहे किंवा काय हेंही ठरविणे येथें आवश्यक आहे.

**८ जात**—कोणत्या एका विशिष्ट कारणानें अगर प्रकारानें जातिभेदाची उत्पत्ति झाली हें सांगणें कठीण असलें तरी पहिल्यापासून जातीच्या धार्मिक व नैतिक स्वरूपाप्रमाणें त्यांच्या औद्योगिक व आर्थिक कामगिरीसही महत्त्व दिलें जाई ह्यांत शंका नाहीं. कांही कांही जातींत धार्मिक बाबींचें नियमन करण्यास जात पंचायत, व औद्योगिक गोष्टींचें नियंत्रण करण्यास गण किंवा श्रेणी अशा दोन भिन्न संस्था असत. परंतु सामान्यत: विशिष्ट धंदा विवक्षित जातीतील इसमांनीच करावयाचा असा निर्बंध असल्यानें धंदेवाल्यांचे अगर कारागिरांचे गण हे मुख्यतः एकाच जातींतील बहुतेक सर्व लोकांचे बनलेले असत. ज्या धंद्यांमध्ये स्वतंत्र औद्योगिक अगर व्यापारी संघ नसत त्यांच्यांतलि जातिपंचायतीच धंद्याच्या सर्व अंगांचे नियमन

करीत. पंचायत किंवा गण ह्यांजकडे मालाचा प्रकार, उत्पादनाची पद्धत, विक्रीची किमत, वगैरे याची ठरविण्याचें काम असे व ह्या बाबतीत त्यानी केलेल्या नियमांचें एखाद्या कारागिरानें अगर धंदेवाल्यानें उल्लंघन केल्यास त्यास शासन करण्याचा अधिकार पंचायत व गण ह्यांस असे. परंतु पिढ्यानुपिढ्या चालत आलेले धंद्याचे विशिष्ट मार्ग आणि जाति-संस्थेनें घालून दिलेले सर्वमान्य व ठोकळ नियम ह्यांखेरीज कारागिरावर कोणतेंच बंधन नसे. आपले नोकर व शिकाऊ विद्यार्थी ह्यांच्या साहाय्यानें वाटेल तितका माल तयार करून स्वतःच्या हिंमतीवर त्याची विक्री करण्याची त्यांस पूर्ण मुभा असे. उद्योगधंद्यांची जातवार विभागणी करण्याच्या व पंचायत अगर गण ह्यांच्या मार्फत धंद्यांचें नियमन करण्याच्या पद्धतीत गुणदोषांचें बरेंच मिश्रण आहे हें सांगावयास नको. तरी पूर्वीच्या अशांततेच्या व आर्थिक असंघटनेच्या काळांत जाति व गण ह्यांची औद्योगिक व व्यापारविषयक प्रगति घडवून आणण्यास व समाजाचें आर्थिक जीवन कमी कष्टमय होण्यास मदत झाली हे निर्विवाद आहे. मोठ्या प्रमाणावर व यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें अर्थोत्पादन करण्याची हल्लींची पद्धत व मजूर आणि भांडवल ह्यांची आपसांतील वाढती स्पर्धा व चलनशीलता ह्यांमुळे स्थानिक व जातिप्रधान नियमनाची इष्टता व आवश्यकता नाहींशी झाली आहे. नव्या पद्धतीचे मजूर संघ व कारखानदारांच्या संस्था अलीकडे अस्तित्वांत येत आहेत. निरनिराळ्या जातींतील व धर्मांतील लोक आपल्या आर्थिक हित-संरक्षणार्थ एकत्र काम करीत आहेत. पोस्ट किंवा रेलवे खात्यांतील मजुरांचे संघ व मुंबई येथील गिरणीवाल्यांच्या व बंगाल्यांतील खाणीवाल्यांच्या संस्था ह्यांचीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे अलीकडील धंदेविषयक नियमनाच्या संस्था मध्ययुगीन व प्राचीन संस्थाहून किती भिन्न स्वरूपाच्या आहेत हें सहज दिसून येईल. जात पंचायत आणि विशिष्ट धंदा करणाऱ्या लोकांचे गण ह्याखेरीज गांव पंचायत हीही एक सामाजिक व आर्थिक महत्त्वाची संस्था असे. गांवांतील सर्व सार्वजनिक कारभार गांव पंचायतीमार्फतच होत असल्यानें धार्मिक, आर्थिक, सामाजिक वगैरे सर्व बाबतींत ही संस्था महत्त्वाची कामगिरी करीत असे. अनेक ठिकाणी सांपडलेले शिलालेख व अजूनही गांव पंचायतींच्या शुद्ध स्वरूपाचे दिसून येणारे अवशेष ह्यांवरून मध्ययुगांत युरोप खंडामध्यें 'व्यापारीसंघ' ह्या नांवानें प्रसिद्धीस आलेल्या संस्थांचें जें महत्त्व होतें त्याच प्रकारचें इकडील गांव पचायतीस महत्त्व होतें असें सिद्ध होतें.

**९ औद्योगिक संघ व जाती**—आपापल्या धंद्याच्या हितसंरक्षणार्थ गट स्थापन करण्याचा प्रघात हिंदुस्थानांतील कारागीर व व्यापारी वर्गांत फार प्राचीन काळापासून अस्तित्वांत आहे असें वेद, धर्मशास्त्रें, बुद्धधर्मीय वाङ्मय आणि सामाजिक आणि कलाविषयक ग्रंथ ह्यांमधील पुराव्यावरून सिद्ध होतें. ह्या औद्योगिक व व्यापारी संघास श्रेणी संघ किंवा गण अशी संज्ञा असून त्यांची संघटना वाखाणण्यासारखी असे. अनेक,

सामाजिक महत्त्वाच्या बाबतींत ह्या संस्था उपयुक्त कामगिरी करीत व त्यांच्या प्रमुख सभासदांस, म्हणजे श्रेष्ठींस, लोकांत व राजदरबारी विशेष मान्यता असे. विशिष्ट धंदे विवक्षित लोकांस वंशपरंपरेनें करावयास लागल्यानें हळूहळू जातिभेद निर्माण झाले आणि पुढे पुढें विशिष्ट धंद्यांतील संघांत विवक्षित जातीच्या लोकांसच घेण्याचा आपोआप प्रघात पडला. बुद्धधर्मीय जातकांच्या काळी हे जाति-निर्बंध पूर्ण अंमलांत होते असें दिसतें. कौटिल्याचें अर्थशास्त्र व मनु, गौतम, नारद इत्यादि स्मृतिकाराची धर्मशास्त्रें ह्यांमध्ये औद्योगिक संघांच्या घटनेंविषयी व कारागिरांविषयी पुष्कळ चर्चा केलेली आढळते. शेतकरी, व्यापारी, गुराखी, सावकार, कारागीर इत्यादि निरनिराळ्या वर्गांतील धंदेवाल्यास आपापली संघटना करण्यास राजाकडून अधिकार मिळत असे, व एखाद्या संघांतील सभासदांचा अगर अनेक संघांचा किंवा एखादा औद्योगिक संघ व समाजांतील इतर व्यक्ति व संस्था ह्यांचा कांहीं तंटाबखेडा झाल्यास राजानें त्याचा रूढी व संघांचे नियम ह्यांच्या साहाय्यानें निकाल लावावा अशी शास्त्राज्ञा असे. मनुस्मृतींत[1] जातिधर्म, ग्रामधर्म व श्रेणीधर्म ह्यांचा स्पष्ट उल्लेख असून त्यावरून जातपंचायत आणि औद्योगिक संघ ह्यांची त्याकाळीं फारकत झालेली दिसून येते. आर्थिक श्रमविभाग व वर्णविषयक तुटकपणा ह्यांच्या पायावर जातिभेदाची उभारणी झालेली होती, तरी जातिघटनेंतील औद्योगिक महत्त्वाचें अंग कधीं कधीं विशिष्ट संघांनी उचलल्यामुळें त्या जातीस निव्वळ वर्णविषयक व सामाजिक महत्त्व उरत असे. औद्योगिक संघांस राजसत्तेची व सामाजिक लोकमताची मान्यता असल्यानें अर्थोत्पादन व विनिमय ह्या बाबतींत ते महत्त्वाची कामगिरी करीत एवढेंच नव्हे, तर त्यांस स्वतंत्र कायदेशीर हक्क असून सामुदायिक तत्त्वावर मालमत्ता मिळविणें व तिचा कारभार पाहणें अशा स्वरूपाचे अधिकारही त्यांस उपभोगता येत. अनेक संघांचे नियम आज उपलब्ध असून त्यांवरून औद्योगिक संघाचा सभासद होण्यास विशिष्ट जातींत जन्मास येणें आवश्यक आहे असें मानण्याचा प्रघात सार्वत्रिक नव्हता असें दिसतें. परंतु कालांतरानें जातिभेदाची बंधनें अधिकाधिक बळकट होत जाऊन जात व धंदा ह्या गोष्टी समानार्थक ठरल्या.

आपल्या इकडील जातिभेदाची पद्धत व औद्योगिक संघटना ह्यांविषयीं अनेक पाश्चात्य ग्रंथकारास व निव्वळ पाश्चात्य ग्रंथांचा अभ्यास केलेल्या इकडील कांहीं लेखकांस विस्मय वाटतो व सामाजिक आणि आर्थिकदृष्ट्या त्याचें स्वरूप कसें होतें हें त्यांस समजत नाहीं. सर्व यूरोपखंडांत व विशेषतः इंग्लंडमध्यें मध्ययुगांत भरभराटीस आलेल्या व्यापारी व कारागीर ह्यांच्या संघांशी इकडील तशाच स्वरूपाच्या

१ जातिजानपदान्धर्माञ्छ्रेणी धर्मांश्च धर्मवित् ।
समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत् ॥ मनु.

संस्थांची तुलना केल्यास जाती व औद्योगिक संघ ह्यांचा हिंदुस्थानांत परस्पर संबंध कोणता होता हें स्पष्ट होईल. सभासद करून घेण्याच्या नियमांचा कडकपणा, उत्पादन व विनिमय ह्यांचें नियमन करण्याची पद्धति, होतकरू कारागीर कामावर ठेवण्याबद्दलची शिस्त ह्या बाबतीत यूरोपांतील व हिंदुस्थानांतील औद्योगिक संस्थांत पुष्कळच साम्य आहे. त्याचप्रमाणें औद्योगिक संस्थाचा धार्मिक कामगिरीकरितां उपयोग करून घेण्याची पद्धतही दोन्ही ठिकाणी सारखीच दिसून येते. परंतु वंशपरंपरेनें तोच धंदा करण्याचें धार्मिक बंधन असणें व ह्या बंधनास अनुसरून धंद्यांची व औद्योगिक संस्थांची संघटना होणें हें हिंदुस्थानाच्या आर्थिक इतिहासाचें वैशिष्ट्य होय. धंद्यांच्या एकीकरणापासून जातींचें एकीकरण व नव्या धंद्यांच्या संघटनेमुळे नवीन जातींचा उद्भव असले अनेक प्रकार हिंदुस्थानांत होत, त्यांवरून जात, धंदे व औद्योगिक संघ ह्यांचा संबंध अगदीं अचल नसला तरी तो निकट होता हें दिसून येईल. हिंदी संस्कृतीस आधारभूत असलेला वर्णभेद हा पहिल्या प्रथम सर्वस्वी गुणकर्मांवर अवलंबून होता. परंतु वर्णांचें रूपांतर जातींत व जातींचें पोटजातींत होण्यास तत्कालीन आर्थिक व सामाजिक कल्पनाच कारणीभूत होत. विशिष्ट जातीनें अगर पोटजातीनें विशिष्ट धंदा करावा ह्या सामान्य नियमांस सर्वकाळी अनेक अपवाद असत व त्यावरूनही जाती व धंदे ह्यांविषयींचे निर्बंध लौकिक स्वरूपाचे व अनिश्चित होते असें सिद्ध होतें. गुजराथ व काठेवाड ह्या भागांत अजूनही जुन्या स्वरूपाच्या औद्योगिक संघाचे अवशेष सांपडतात. तेथें व्यापारी, सावकार, आडत्ये ह्यांच्या संघांस महाजन व कारागिरांच्या संघांस पंच असें म्हणतात. इतर भागांतील संस्थाप्रमाणें हे संघही हळूहळू नाश पावत आहेत. अलीकडील स्पर्धात्मक काळांत जात व धर्म ह्यांवर अवलंबून असलेली सर्व आर्थिक बंधनें नष्टप्राय झालेली आहेत. तरीही आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें समाजाचे जे निरनिराळे वर्ग पडतात ते कायमच असून प्रमुख धंद्यांच्या मर्यादा सामान्यतः अनुल्लंघनीय असतात ह्या मिलच्या वचनाची प्रतीति येथील अनुभवावरून येत आहे. व्यापार, उदीम व कारागिरीचे धंदे वास्तविक वैश्य वर्णांतील जातीसच युक्त असून ब्राह्मण व क्षत्रिय हेही त्या धंद्यांवर आपली उपजीविका करतांना दिसतात. उलट क्षत्रिय, वैश्य व क्वचित्प्रसंगीं शूद्र व अस्पृश्य ह्या वर्णांतील कांहीं लोक ब्राह्मणांस विहित असलेलीं बुद्धिप्रधान व ज्ञान साधनाचीं कामें करीत असतात. अलीकडे तर आधुनिक स्वरूपाचें पुस्तकी शिक्षण नसलेल्या सर्व जाती मागासलेल्या समजल्या जात असून त्यांच्यांतील लोकांस आपण बौद्धिक शिक्षण घेऊन कारकुनी, वकीली अगर अध्यापन अशा प्रकारचे व्यवसाय करण्यास लागावें अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न होत आहे.

समाजांतील सर्व वर्गांतील लोकांनी आपापल्या गुणकर्मानुसार व इच्छेनुरूप आपला व्यवसाय ठरवावा हें तत्त्व सर्वस्वी समर्थनीय व हितकारक आहे व त्या

तत्त्वाचा हिंदुस्थानांत झपाट्यानें प्रसार होत आहे ही आनंदाची गोष्ट होय. परंतु मागासलेल्या समजल्या जाणाऱ्या वर्गांतील व्यक्ति व एकंदर समाज ह्या दोहोंच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें एका मुद्याचा प्रामुख्यानें उल्लेख करणें आवश्यक आहे. कारकुनी अगर निव्वळ बुद्धिप्रधान धंद्यांप्रमाणें, व्यापार व यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें अर्थोत्पादन करण्याचे मार्ग ह्यांकडेही वरील वर्गांतील महत्त्वाकांक्षी लोकांनी अधिक लक्ष्य देणें इष्ट आहे. धंद्यांच्या उच्चनीचपणाच्या आर्थिक व सामाजिक कल्पना अलीकडे बदलत असून ज्यांचा कल स्वभावतः उत्पादक धंद्यांकडे आहे त्यांनी केवळ सामाजिक उच्चनीचपणाच्या भावनांस बळी पडून 'पांढरपेशा' व्यवसायाच्या मार्गें लागणें इष्ट नाहीं. पुढारलेल्या जातींतील ज्या लोकांची बुद्धि अगर मनोरचना वाङमयप्रधान शिक्षणास अगर 'पांढरपेशी' धंद्यांस अनुकूल नाहींत अशानीं गतानुगतिकत्वामुळें पुस्तकी शिक्षणाच्या मार्गें लागणें हेंही आर्थिक व सामाजिक दृष्ट्या अनिष्ट होय. कारकुनी, राज्यकारभार, वकीली, वैद्यकी, शिक्षण इत्यादि धंद्यांकडे ज्यांचा स्वभावतःच कल आहे व त्या त्या धंद्यांत कार्यक्षम होण्यास आवश्यक असलेले पुस्तकी व व्यावहारिक शिक्षण घेण्याची ज्यांची पात्रता आहे अशाच व्यक्तींनी सामान्य स्वरूपाच्या वरिष्ठ शिक्षणाचा अवलंब करावा. सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांनी आपापल्या बौद्धिक सामर्थ्यास व मानसिक आवडीनिवडीस अनुसरून आपला धंदा व त्या धंद्यास आवश्यक असलेला शिक्षणक्रम स्वीकारला तर उत्पादक व पांढरपेशी ह्या दोन्ही प्रकारच्या धंद्यास जास्तीत जास्त लायक माणसें मिळतील. 'पुढारलेल्या' जातींतील लोकांनी उत्पादक धंदे चालवून ते यशस्वी केले व 'मागासलेल्या' वर्गांतील काही गृहस्थांनी बुद्धिप्रधान कामें चोखपणे करून स्वतःच्या व राष्ट्राच्या कार्यक्षमतेंत भर टाकली तर खरें राष्ट्रहित साधेल ह्यांत शंका नाहीं. वाङ्मयप्रधान व कारकुनी धंदे, उत्पादक धंदे व व्यापार ह्याहून सामाजिक अगर आर्थिक दृष्ट्या उच्च दर्जाचे आहेत ही भ्रामक कल्पना 'पुढारलेल्या' व 'मागासलेल्या' दोन्ही वर्गांतून नाहींशी होणें आवश्यक आहे. स्वतःची बुद्धि व श्रम आणि परंपरागत अनुभव व सामाजिक अनुकूलता ह्यांच्या अनुरोधानें प्रत्येक व्यक्तीनें आपापला उद्दिष्ट धंदा व आवश्यक शिक्षणक्रम ठरविला पाहिजे. सामान्य व विशिष्ट धंदेशिक्षण हा ज्ञानार्जनाचाच एक सन्मान्य मार्ग असून राष्ट्राचा व स्वतःचा फायदा करून घेण्यास ते एक प्रमुख साधन आहे. मुसलमान समाजांतही एकांगी शिक्षणाची व व्यवसायाची प्रवृत्ति बळावत असून त्यांच्यांतील समंजस पुढाऱ्यांनी धंदेशिक्षण व औद्योगिक संघटना ह्या आत्मोन्नतीच्या मार्गांकडे योग्य लक्ष्य देणें आवश्यक आहे. राष्ट्राच्या सर्वांगीण व चिरस्थायी प्रगतीस निव्वळ कारकुनी धंद्यांपेक्षां कारागिरीचे व उत्पादक धंदे अधिक उपयोगी पडतात ही गोष्ट हिंदी लोकांस पूर्णपणें पटल्याशिवाय देशांतील कार्यक्षम लोक उत्पादक धंद्यांत पडणार नाहीत. त्याच

प्रमाणें प्रत्येक धंदा सामान्यतः स्वतंत्र कारागिरांकडून चालविला जाणें हेंही समाज-हिताच्या दृष्टीनें इष्ट होय. लहान सहान व मध्यम प्रमाणावरील धंदे टिकविण्याचे जे अनेक मार्ग आहेत त्यांपैकी धंदेशिक्षण, भांडवलाचा व प्रेरक शक्तीचा पुरवठा इत्यादिकांचा वर उल्लेख केलेला आहे. पूर्वकालच्या श्रेणीप्रमाणे किंवा पचांप्रमाणें अलीकडील लहान धंदेवाल्यांनीही नव्या तऱ्हेनें आपली संघटना करणें इष्ट व आवश्यक आहे. पाश्चात्य भांडवलशाहीचे व संकलित उत्पादन पद्धतीचे प्रमुख दोष टाळून यांत्रिक साधनें व शास्त्रीय ज्ञान ह्यांचा हिंदुस्थानास पूर्ण फायदा करून घ्यावयाच्या अनेक मार्गांपैकी एक प्रमुख मार्ग इकडील स्थानिक व औद्योगिक संस्थाचें नव्या स्वरूपांत पुनरुज्जीवन करणे हा होय.

**१० जमीनीची लागवड**—हिंदुस्थानांतील इतर धंद्यांप्रमाणे शेतकीचा धंदाही सामान्यतः लहान लहान शेतकऱ्यांच्याच हातांत आहे. मद्रास इलाख्यातील रयतवारी जमीनीवर सामान्य शेतकऱ्याच्या एकंदर जमीनीचा सरासरी आकार आठ एकरांपर्यंत आहे, तर बिहार प्रांतातील जमीनदारी भागांत अर्ध्या एकरापेक्षांही कमी आकाराचें सामान्य शेत असतें बंगाल इलाखा हा मोठमोठ्या जमीनदारांचें आगर समजला जातो; परंतु त्या प्रांतातील एकंदर दोन कोटी पंचेचाळीस लक्ष एकर जमीन सुमारे एक कोटी दहा लक्ष कुळांत लागवडीकरिता विभागिली आहे, म्हणजे सामान्य शेतकऱ्याच्या जमीनीचें एकंदर क्षेत्रफळ सव्वादोन एकर इतकेंच असतें, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. जमीनीच्या आकाराप्रमाणेंच शेतकऱ्याच्या मालकी हक्काचाही लागवडीच्या धंद्याच्या संघटनेशी फार निकट संबंध आहे. जमीनदारी पद्धतीत जमीनीची प्रत्यक्ष लागवड करणारा इसम हा निव्वळ खंडकरी असतो. जमीनीबद्दल आपलेपणाची भावना किंवा धंद्याबद्दल शाश्वती ह्या दोन्ही बाबतीत खंडकऱ्यांची स्थिति प्रतिकूल असते. शिवाय भांडवलाकरिताही त्यांस अनेक वेळा जमीनदारांवर अवलंबून राहणे भाग पडते. आर्थिक उत्पादकतेच्या दृष्टीनें रयतवारी किंवा मिरासदारीची पद्धत अधिक श्रेयस्कर मानली जाते व सामाजिक शांतता व समृद्धि ह्यांचा लाभ होण्यासही तीच पद्धत विशेष अनुकूल असल्यानें सुशिक्षित लोकमत सामान्यतः जमीनदारीस प्रतिकूल असतें. परंतु यांत्रिक व शास्त्रीय साधनाच्या साहाय्यानें जमीनीचें उत्पन्न वाढविण्यास जमीनीचें क्षेत्रफळ, भांडवलाचा पुरवठा इत्यादि बाबतीत अनुकूल परिस्थिति असणें जरूर असल्याने शेतीच्या उत्पादकतेच्या दृष्टीने जमीनदारीपद्धतीत पुष्कळच वाव असतो व जे समंजस आणि प्रगमनशील जमीनदार आपल्या जमीनीची सुधारलेल्या पद्धतीनें लागवड करतात त्यांचा धंदा किफायतशीरही होतो. सहकार्याच्या तत्त्वानुसार धंदा चालविला तर लहान शेतकऱ्यांसही भांडवल, बी, खतें, सुधारलेली आउतें इत्यादिकांचा फायदा मिळणें शक्य आहे. सहकारी शेतकी मंडळें व शेतकी खात्याच्या शाखा

ह्यांच्या परस्पर सहकार्यानें रयतांचें उत्पन्न वाढण्यास मदतच होईल. जमीनीची लागवड करणें हा इतर धंद्याप्रमाणेंच एक धंदा आहे व त्यास लागणाऱ्या भांडवल व श्रम ह्यांच्या खर्चाच्या मानानें उत्पन्न निघणें आवश्यक आहे. परंतु हिंदुस्थानाच्या कित्येक भागांत शेतकी किफायतशीर होत नाहीं अशी तक्रार आहे. शेतीच्या धंद्याच्या हलाखीचीं जी अनेक कारणें आहेत त्यांतच विवक्षित शेताचा व एका शेतकऱ्यास लागवडीस उपलब्ध असलेल्या एकंदर जमीनीचा आकार फार कमी असणें हें एक कारण आहे. तसेच, जमीनीचे मालक स्वत: मशागत करणार नसल्यानें खंडकरी व कुळें ह्यांच्या साहाय्यानें लागवड करावी लागते, आणि त्यामुळें धंद्याची उत्पादकता कमी होऊन उत्पन्नातून मालकांस व एखाद्या मध्यस्थास खंड भरून राहिल तेंच उत्पन्न शेतकऱ्यांस मिळतें. भांडवल, पाणी, बी, खतें, शास्त्रीय व व्यावहारिक ज्ञान इत्यादि आवश्यक साधनें मिळण्याच्या सोयी सध्यांपेक्षां बऱ्याच पटींनीं सुधारल्या तरच शेताचें क्षेत्रफळ वाढविल्याचा किंवा शेतकऱ्यांस अधिक मालकी हक्क मिळवून दिल्याचा खरा फायदा होईल.

जमिनदारी व रयतवारी ह्या दोन्ही पद्धतींच्या अंमलाखाली असलेल्या शेतजमीनी सामान्यतः गैरफायदेशीर असण्याचें प्रमुख कारण म्हणजे त्यांचें सरासरी क्षेत्रफळ फार कमी असतें हें होय असें कित्येक तज्ञ व विचारी लोकांचें मत आहे. संपत्तीच्या उत्पादनासंबंधी व विशेषत: जमीनीच्या लागवडीविषयी प्रास्ताविक भागांत जें विवेचन केलें आहे त्यावरून श्रम व भांडवल ह्यांच्या उत्पादकतेस विशिष्ट मर्यादेपर्यंत वाढत्या व पुढें उतरत्या पैदाशीचा नियम[1] लागू असतो हें कळून येईल. एखाद्या विवक्षित शेताच अगर एका शेतकऱ्यास आपलें भांडवल व श्रम ह्यांचा उत्पादनार्थ उपयोग करण्यास उपलब्ध असलेल्या एकंदर जमीनीचें क्षेत्रफळ फार कमी असेल तर त्याच्या श्रमास व भांडवलास मिळणारा मोबदला अधिकांत अधिक किफायतशीर होणार नाहीं. त्याचप्रमाणें लागवड करणाऱ्या इसमाजवळ असलेल्य श्रम व भांडवल ह्यांच्या सामग्रीच्या मानानें शेताचा अगर उपलब्ध जमीनीचा आकार फार मोठा असेल तरीही जमीन, श्रम व भांडवल ह्यांचा किफायतशीर रीत्या विनियोग व्हावयाचा नाहीं. लागवडीची पद्धत व शेतकऱ्यास उपलब्ध असलेली भांडवल व श्रम ह्यांची सामुग्री ह्यांच्या मानानें जमीनीच्या ज्या क्षेत्रफळांत व ज्या आकाराच्या शेतात किफायतशीर लागवड करतां येते त्या शेतास व जमीनीस किफायतशीर आकाराचें शेत अगर जमीन असें म्हणतात. मुंबईसरकारच्या शेतकीखात्याचे एक माजी प्रमुख अधिकारी कीटिंगसाहेब ह्यांच्या मतें दक्षिण महाराष्ट्रांत किफायतशीर आकाराची जमीन पुढील तपशिलाची असणें आवश्यक आहे. चाळीस ते पन्नास एकर सलग व चांगली जमीन, पुरेसें पाणी असलेली

---

[1] पानें ३०-३१ पहा.

एक विहीर, व शेतावरच असलेलें राहण्याचें घर. कीटिंगसाहेबांच्या किफायतशीर क्षेत्रफळाच्या ह्या कल्पनेस अनुसरून महाराष्ट्रांतील अगर हिंदुस्थानाच्या इतर कोणत्याही भागांतील शेतजमीनीच्या आकाराची पाहणी केली तर ती अत्यंत निराशाजनक ठरेल. स्वतंत्र शेताचा व एका शेतकऱ्याच्या एकंदर जमीनीचा आकार सामान्यतः लहान असतो एवढेंच नव्हे तर अनेक लहान लहान तुकडे एकमेकांपासून दूर दूर असल्यानें शेतकरी, मजूर व जनावरें ह्यांच्या श्रमाचा पुष्कळच अपव्यय होतो. महाराष्ट्रांतील ह्याबद्दलची परिस्थिति किती असमाधानकारक आहे, हें सुप्रसिद्ध आहे परंतु पंजाब प्रांतांतही शेतकरी कशीत असलेल्या जमीनीच्या सरासरी आकारासंबंधी तीच रड आहे हे पुढील उदाहरणावरून दिसेल. पंजाबांतील एका खेडेगांवांत एकंदर ५८४ जमीनीचे मालक असून तेथील शेतजमीन २३५३ एकर आहे; व ती जमीन १६,३११ शेतांमध्ये विभागली गेली आहे. म्हणजे त्या खेड्यांतील शेताचा आकार सरासरीनें १/७ एकर इतका पडला! जलदर जिल्ह्यांत तर जमीनीप्रमाणें विहीरींच्याही वाटण्या होत असून कधी कधी एकाच शेतकऱ्यास एका विहीरीचा १/१६ हिस्सा, दुसरीचा १/८ हिस्सा ह्याप्रमाणें वाटलेला असतो.

हिंदुस्थानांतील सामान्य शेतकऱ्यास उपलब्ध असलेल्या एकंदर जमीनीचें व त्याच्या निरनिराळ्या शेतांचें क्षेत्रफळ फारच लहान असून लागवडीचा धंदा एकंदरीनें आंतबट्ट्याचा व्यवहार होण्याचें तें एक महत्त्वाचें कारण आहे ह्याबद्दल फारसें दुमत नाही. त्याचप्रमाणें आपल्या इकडील समान विभागणीच्या वारसपद्धतीमुळें शेतांच्या तुकड्यांची संख्या वाढण्यास व त्याचें क्षेत्रफळ संकुचित होण्यास मदत होत आली आहे हेंही सार्वत्रिक अनुभवावरून सिद्ध होण्यासारखें आहे. संस्थानी मुलुख व ब्रिटिश हिंदुस्थान ह्यांची ह्या बाबतींत सारखीच स्थिति आहे. गेल्या पन्नासपाऊणशें वर्षांत लोकसंख्येची जी वाढ झालेली आहे तिचा व कारागिरीचे, शिपाईगिरीचे आणि राज्यव्यवस्थेचे अनेक व्यवसाय ब्रिटिश अमदानींत नष्ट झाले ह्याचा शेतीच्या उत्पादकतेवर व शेतांच्या सरासरी क्षेत्रफळावर अनिष्ट परिणाम झालेला आहे हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे. जमीनदारांच्या कुळांचे जमीनींतील हितसंबंध सुरक्षित रहावे ह्या स्तुत्य उद्देशानें ब्रिटिश सरकारानें जे अनेक कायदे केले तेही कुळांची संख्या वाढण्यास आणि त्यांच्या जमीनींचे क्षेत्र संकुचित होण्यास अंशतः कारणीभूत झाले हा दैवदुर्विलास होय. शिक्षणाचा प्रसार, जमीनीबद्दलच्या अवास्तव मानमान्यतेंत फरक, वारसदारांच्या कायद्यांत इष्ट सुधारणा इत्यादि उपायांनीं जमीनीच्या विभागणीस व एकसारख्या संकोच पावणाऱ्या सरासरी क्षेत्रफळास आळा बसण्यासारखा आहे हें खरें, परंतु शेतकीखेरीज इतर धंद्यांची वाढ होईपर्यंत आणि शेतकऱ्यांस नवीन माहिती व आवश्यक साधनें ह्यांचा अधिक प्रमाणांत व सोयीवार पुरवठा होईपर्यंत जमीनविभागणीस कायमचा प्रतिबंध होणार नाहीं व निव्वळ शेताचा आकार वाढला तरी त्याची उत्पादकताही म्हणण्यासारखी वृद्धिंगत होणार नाही.

कायद्याच्या साहाय्यानें जमीनविभागणीस प्रतिबंध करणें किंवा हल्लीं अस्तित्वांत असलेल्या लहान लहान शेतांची अलग लागवड करण्यास कायद्यानें सक्ति करणें ह्या गोष्टी शेतकऱ्यांच्या व सामान्य लोकांच्या भावनांस आणि रूढ कल्पनांस धक्का देणाऱ्या आहेत. आज पिढ्यानुपिढ्या चालत आलेले हक्क व प्रचार बदलण्यास, शेतकऱ्यांची व एकंदर समाजाची आर्थिक प्रगति तसें करण्यानें घडून येईल अशी पूर्ण खात्री असणें आवश्यक आहे. परंतु केवळ जमीनीचें क्षेत्रफळ वाढलें तरी तेवढ्यानें शेतीची स्थिति सुधारेल अशी जोपर्यंत खात्री वाटत नाहीं आणि भांडवल, बीं, खतें, पाणी, आउतें, शेतकीशिक्षण इत्यादि सोयींचा प्रसार व सहकार्यानें लागवड करण्याच्या पद्धतीचें अवलंबन ह्या विधायक उपायांचा जरूर व शक्य तेवढा उपयोग झालेला नाहीं तोंपर्यंत जमीनविभागणीस कायदेशीर सक्तीनें प्रतिबंध करणें गैरमुत्सद्दे-गिरीचें व हानिकारकच ठरण्याचा अधिक संभव आहे.

**११ शेतकी कमिशनः**—शेतकीचा धंदा व खेड्यापाड्यांत राहणाऱ्या लोकांची एकंदर आर्थिक परिस्थिति ह्यांविषयीं पूर्ण चौकशी करण्याकरितां १९२६ सालीं एक कमिशन नेमण्यांत आलें होतें. ह्या कमिशनचा रिपोर्ट १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला, त्यांत शेतीच्या लागवडीचा धंदा अधिक किफायतशीर होण्यास व शेतजमीनीची उत्पादकता वृद्धिंगत होण्यास कोणते उपाय योजणें आवश्यक आहे, ह्याबद्दल कमिशननें आपली मतें नमूद केलेलीं आहेत. शेती, शेतकरी आणि खेडेगांवांतील एकंदर औद्योगिक संघटना ह्यांविषयीं विचार करीत असतां वरील मतांकडे विशेष लक्ष्य पुरविणें आवश्यक आहे. खेडेगांवांत राहून मुख्यतः शेतीच्या धंद्यावर आपला उदरनिर्वाह करणाऱ्या लोकांसंबंधींच्या सर्व आर्थिक प्रश्नांचा एकोप्यानें विचार करून परस्पर परिपोषक उपाययोजना सुचविणें आवश्यक आहे, हें कमिशनचें म्हणणें बोधप्रद असून सध्यां खेडेगांवांतील लोकांची स्थिति सुधारण्याकरितां जे अनेक लोक प्रयत्न करीत आहेत त्यांनी ते ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. शेतकऱ्याभोंवतालचें सामाजिक व शैक्षणिक वातावरण त्याच्या महत्त्वाकांक्षेस, बुद्धिस्वातंत्र्यास व आत्मोन्नतिप्रियतेस अनुकूल नसेल तर केवळ विवक्षित अडचणीस विशिष्ट उपाय योजून त्यापासून शेतकऱ्याचें चिरकालिक हित साधणार नाहीं ही गोष्ट अलीकडे सहकारी चळवळीसारख्या अनेक प्रयत्नांच्या इतिहासावरून दृष्टोत्पत्तीस येत आहे व ती खरी असल्याचें शेतकी-कमिशनास मान्य आहे. शेतकरी वर्गाच्या मनोरचनेंत व सामाजिक संघटनेंत जोमदार जीवन उत्पन्न केल्याशिवाय शेतीविषयक सुधारणांचा प्रसार होणें अगर त्यांपासून शेतकऱ्यांचा फायदा होणें अशक्य आहे असें कमिशनचें म्हणणें आहे. ह्या व इतर बाबतींत सुधारणा घडवून आणण्यास कोणते उपाय योजणें आवश्यक आहे ह्याबद्दल सविस्तर विवेचन करणें अगर प्रत्यक्षपणें सूचना करणें हें काम अर्थातच कमिशनच्या कार्यक्षेत्राबाहेरचें होतें. परंतु शेतकऱ्यांच्या वैयक्तिक व सामाजिक जीवनांत

सर्व बाजूंनीं प्रगति घडून येणें आवश्यक असून सरकारनें ह्या बाबतींत सक्रिय पुढाकार घेणेंही इष्ट आहे असें कमिशननें स्पष्ट म्हटलें आहे. कमिशनच्या शेतकी-विषयक शिफारशींचा खालीं संक्षेपानें उल्लेख केलेला आहे त्यावरून शेतीच्या धंद्याच्या संघटनेविषयीं नेहमी उपस्थित होणाऱ्या अनेक प्रश्नांचा अधिक उलगडा होईल.

हिंदुस्थानसरकार व प्रांतिकसरकारें ह्यांमध्यें शेतकीविषयक शोध व सुधारणा करण्याच्या प्रयत्नाबद्दल सहकार्य व एकवाक्यता नाहीं एवढेंच नव्हे तर प्रांतिक सरकारेंही ह्या बाबतींत परस्पर सहकार्य करीत नाहींत ह्याबद्दल कमिशननें त्यास दोष दिला असून ही स्थिति सुधारण्याकरितां कांहीं महत्त्वाच्या सूचना केल्या आहेत. प्रांतिक सरकारची शेतकीविषयक खातीं व शेतीच्या धंद्यात प्रत्यक्ष संबंध असलेले खाजगी गृहस्थ ह्यांच्या प्रतिनिधींचें एक मध्यवर्ती मंडळ स्थापलें जावें, व शेतकी आणि पशुवैद्यक ह्याविषयी शोध लावण्याचें कार्य त्या मंडळावर सोंपविलें जावें असें कमिशननें सुचविलें. ह्या मंडळाचे अध्यक्ष व दोन अधिकारी हे कायमचे सरकारी नोकर असावे व हिंदुस्थानांतील परिस्थितीच्या अभ्यासाबरोबरच परराष्ट्रें आणि साम्राज्याचे हिंदुस्थानाखेरीज इतर भाग ह्या देशाच्या शेतकीविषयक ज्ञानाचा व अनुभवाचाही अभ्यास करून हिंदुस्थानातील अडचणी दूर करण्याचे उपाय त्या अधिकाऱ्यांनी मंडळामार्फत सुचवावे असें कमिशनचें म्हणणें होतें. वरील तीन सभासदांखेरीज ह्या मंडळात ( इंपीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च ) आणखी ३६ सभासद असावे व त्यांपैकी ८ मध्यवर्ती सरकारनें, १८ निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं, ३ हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयांनी, एक मळेवाल्यांनीं, एक मध्यवर्ती कपास कमिटीनें व पांच सरकारच्या परवानगीनें मंडळानेंच नेमलेले असावे असेंही सुचविण्यांत आलें होतें. ह्या मंडळानें उत्पन्न, खर्च वगैरे पैशासंबंधीचे व्यवहार चालविण्यास एक कायम ( स्टँडिंग ) पोटकमिटी व विवक्षित कामें करण्यास इतर पोटकमिट्या नेमाव्या व त्यांचें काम महत्त्वाच्या प्रांतांतील प्रांतिक कमिट्यांशीं सहकार्य होऊन चालावें अशीही कमिशननें शिफारस केली होती. ह्या मध्यवर्ती शेतकीमंडळाच्या खर्चाकरतां सरकारनें सुरुवातीस व पुढें प्रतिवर्षीं आपल्या सांपत्तिक परिस्थितीस अनुसरून द्रव्यसाहाय्य करावें; परंतु मंडळाच्या ज्या कार्यानें विवक्षित व्यापाऱ्यांचा व उत्पादकांचा विशेष फायदा होण्यासारखा आहे त्या कार्यास लागणारा पैसा शक्य तोंवर त्यांच्या व्यवहारावर कर बसवून उभारावा ही कमिशनची सूचना ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

' हिंदुस्थानांतील शेतजमीनीची उत्पादकता कमी होत आहे असा एक प्रवाद नेहमी ऐकण्यांत येतो; परंतु आधींच जमीनीची सुपीकता एवढी कमी आहे की ती सध्यांच्या लागवडीच्या पद्धतीनें तरी आणखी कमी होणें शक्य दिसत नाहीं. जमीनीची उत्पादकता वाढविण्यास खतांचा उपयोग करणें इष्ट आहे. गोवऱ्यांचा जळण म्हणून सध्यां

मोठ्या प्रमाणावर उपयोग होत असल्यानें शेणखताचा जमीनीच्या लागवडीस मिळ-णारा पुरवठा मर्यादित आहे; परंतु खेडेगांवांतील लोकांस स्वस्ताईचें इतर जळण मिळण्याची व्यवस्था केल्याखेरीज या बाबतींत फारशी सुधारणा होण्याची अपेक्षा नाहीं. गळिताची धान्यें परदेशांत पाठविली गेल्यानें पेंडीचें खतही येथील शेतक-ऱ्यांस दुर्लभ होतें हें खरें, तरी त्याचा पुरवठा वाढविण्यास गळिताच्या धान्यांची निर्यात नियमित करणें हा योग्य उपाय नसून तेलें काढण्याचा धंदा येथें स्थापन केल्यास उत्पादकाचें नुकसान न होतां पेंडीचा पुरवठा वाढेल. शेतकऱ्यांनी आपा-पल्या जमीनीत मुख्य पिकामागून इतर विशिष्ट पिकें पेरून तिची सुपीकता वाढविण्याचा प्रयत्न करणें इष्ट आहे. शेतकरीवर्गांत उत्तम बियांचा प्रसार करण्याकरितां प्रांतिक-सरकारांनी एक अधिकारी नेमावा व त्यानें सहकारी संस्थांमार्फत व शक्य तर खाजगी बियांच्या व्यापाऱ्यांमार्फत शेतकऱ्यांस माफक दरानें उत्तम बीं पुरवावें. बीं उत्तमो-त्तम मिळत गेल्यास पिकांची प्रत चढत जाऊन जमीनीची निव्वळ उत्पादकताही वाढेल. नांगर, औतें वगैरे साधनांत साध्या व अल्प खर्चानें होणाऱ्या सुधारणा घडवून आणण्याकरितां सरकारी संघटना सध्यांहून अधिक कार्यक्षम असावी. पिकांवर पडणारे रोग व त्यांवर टपून बसलेलीं श्वापदें यांचा प्रतिबंध करण्याचे सरकारी उपाय वाढत्या प्रमाणावर व अधिक पद्धतशीरपणें योजले जावे. आपल्या पिकांचें वन्य पशूंपासून संरक्षण करण्यास शेतकरी वर्गास बंदुकीचे परवाने वाढत्या प्रमाणावर दिले जावे. वारसाहक्कासंबंधीं सध्याचे जे कायदे आहेत त्यांत पुष्कळ ढवळाढवळ केल्या-शिवाय जमीनीचे लहान लहान तुकडे होऊं न देण्याची अगर झालेल्यांचें एकीकरण करण्याची कायदेशीर सक्तीची योजना करणें अशक्य आहे. परंतु लहान शेतांची अनुत्पादकता शेतकऱ्यांस पटविण्याकरितां सरकारनें आपल्या पैशानें व आपल्या अधिकाऱ्यांमार्फत शेतकरी वर्गांत चळवळ करावी. सहकारी संस्थाचाही ह्या बाबतींत पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. लागवडीसंबंधींच्या नव्या उत्पादक सुधारणांचे प्रत्यक्ष प्रयोग करावयाचे ते शक्य तितके शेतकऱ्यांच्या स्वतःच्या जमीनींवरच केले जावे. खास सरकारी शेतांवरील प्रयोग, शेतकी प्रदर्शनें, आणि सिनेमा व आग-गाड्या ह्यांच्या द्वारें दाखविले जाणारे प्रयोग ह्यांच्या साहाय्यानें लोकशिक्षणाचें व शेतकीसुधारणांच्या प्रसाराचें पुष्कळ काम होईल. चाऱ्याचें गवत सध्यां ज्या जमीनींतून निघतें त्यांची उत्पादकता वाढविणें व चाऱ्याचा पुरवठा जतन करण्याचे मार्ग सुधारणें शक्य व आवश्यकही आहे; परंतु एकंदर गरजांच्या मानानें चाऱ्याचा पुरवठा फारच मर्यादित असल्यानें शेतकऱ्यांनी आपापल्या जमीनींवरच चाऱ्याचीं निराळीं पिकें काढल्याखेरीज गत्यंतर नाही. ह्या पिकांस सरकारनें सवलतीच्या दरानें पाणीपुरवठा करून व इतर शक्य त्या मार्गांनीं उत्तेजन द्यावें. शेतीच्या जनावरांची उत्तम निपज करण्याच्या प्रयत्नांस सरकारनें विशेष मदत करावी व

मध्यवर्ती शेतकीमंडळाच्या एका कायम व भरपगारी सभासदानें ह्या गोष्टीकडे विशेष लक्ष्य पुरवावें. गुरांचे रोग बरे करण्यास व त्यांचा प्रतिबंध करण्यास सध्यांची सरकारी संघटना अपुरी आहे ती सुधारावी; गुरांस रोगप्रतिबंधक लस टोंचण्याचें काम सरकारनें फुकट करावें. फार महत्त्वाच्या ठिकाणी गुरांची इस्पितळें व कमी महत्त्वाच्या ठिकाणी गुरांचे दवाखाने काढावे आणि इतर ठिकाणीं फिरते पशुवैद्य नेमावे.'

'पाणीपुरवठ्यासंबंधींचें कार्य शक्य तेथें पंचायतीमार्फत केलें जावें. यांत्रिक साधनांनीं खोल विहिरी खणणें जेथें आवश्यक असेल तेथें सरकारनें विशेष सहाय्य करावें. शेतकीखातें व पाटबंधाऱ्यांचें खातें ह्यांमध्यें सध्यांहून अधिक सहकार्य असावें, पाणीपुरवठ्याच्या सर्व प्रश्नांसंबंधी माहिती देण्यास हिंदुस्थानसरकारनें एक मध्यवर्ती संस्था काढावी व त्या कामांतील प्रांतिक तज्ञांच्या वारंवार परिषदा भरवाव्या. खेड्यांतील शेतकऱ्यांचें मोठमोठ्या बाजारांशीं दळणवळण वाढावें ह्यास्तव रस्त्यांची सुधारणा व प्रसार हीं होणें आवश्यक आहे व हें काम करण्यास निरनिराळ्या भागांत स्वतंत्र 'रोडबोर्डें' स्थापिलीं जावीं. दुय्यम रस्ते करण्याचें काम खेडेगांवांतील लोकांवरच मुख्यतः सोंपविलें जावें. मोटारी व आगगाड्या ह्यांमध्यें अनिष्ट स्पर्धा होऊं न देतां परस्पर-परिपोषक रीतीनें दोहोंतूनही वहातुक व्हावी. बाजारांचें नियमन व वजनें आणि मापें ह्यांची एकवाक्यता ह्या बाबतींत सरकारनें कसोशीनें प्रयत्न करावे. सभासदांच्या मालाची विक्री करण्याकरितां सहकारी संस्था स्थापण्यास उत्तेजन दिलें जावें. इंग्लंडमध्यें हिंदी व्यापाऱ्याच्या मालाचा प्रसार होण्यास साहाय्य करणारा एक ट्रेड कमिशनर हल्लीं आहे, त्याचप्रमाणें इतर प्रमुख राष्ट्रांतही व्यापारी अधिकारी नेमले जावे. शेतजमीन तारें गहाण टाकण्यास अशी अट घातली जावी की त्या जमीनीच्या उत्पन्नातून वीस वर्षांच्या आंत आपोआप मूळ रक्कम व व्याज ह्यांची फेड होण्याची सावकारानें हमी घ्यावी. शेतकरीवर्गाच्या हातांतून शेतजमीन पांढरपेशा वर्गाच्या हातांत न जाऊं देण्यासंबंधानें कांहीं नियंत्रणें घालण्यांत यावी. शेतकऱ्यांस कायदेशीर नादारीचे फायदे मिळण्याकरितां साधे कायदे केले जावे. कर्जाबाबत दाव्यांची चौकशी करून तडजोडीनें निकाल करण्याकरितां मंडळें स्थापावी. जमीनीच्या गहाणावर सवलतीच्या दरानें व लांब मुदतीनें कर्ज देणाऱ्या पेढ्या काढणें इष्ट आहे. शेतकरीवर्गाचें आरोग्य सुधारण्यास व अस्पृश्य वर्गाची उन्नति घडवून आणण्यास सरकारनें खासगी लोकांच्या साहाय्यानें आपले प्रयत्न चालू ठेवावे. निरनिराळ्या भागांची औद्योगिक व आर्थिक चौकशी करण्याचें काम सरकारी अधिकारी व विश्वविद्यालयांतील विद्वान् गृहस्थ ह्यांच्या सहकार्यानें चालू ठेवावें. सामान्य प्रकारच्या शाळांत शेतकी हा ऐच्छिक विषय घेतां येण्याची शक्य तेथें व्यवस्था केली जावी. शेतकऱ्यांचा पुष्कळसा काळ सध्यां

फुकट जातो तो किफायतशीर मार्गांनीं कामीं लागणें आवश्यक आहे. कापसाची सरकी काढून गठ्ठे दाबण्याचे कारखाने, तांदूळ सडण्याच्या गिरण्या, गुळीसाखर तयार करण्याचे कारखाने व कोंबड्या पाळणें ह्याप्रमाणें इतर धंदे खेडेगांवांलगत निघणें इष्ट आहे. परंतु ह्या दिशेनें विशेष प्रगति होणें दुरापास्त असून शेतकऱ्यांनीं आपल्या धंद्यातच सध्यांहून अधिक उत्पादकपणें आपला वेळ घालविण्याची खटपट करणें जरूर आहे. मोठमोठे धंदे देशात स्थापन होऊन लोकसंख्येचा जमीनीवर सध्यां पडत असलेला ताण नाहींसा होणेंही अगत्याचें आहे. सरकारचें औद्योगिक धोरण सर्व धंद्यांच्या वाढीस अनुकूल असणें आवश्यक असून लहान लहान धंद्यां-बद्दल तर सरकारावर विशेष जबाबदारी आहे. फळाची व भाजीपाल्याची लागवड करून आपल्या उत्पन्नात भर टाकण्याची संधि ज्या शेतकऱ्यांस असते त्यांस तसें करण्यास उत्तेजन दिलें जावें. भांडवलाचा पुरवठा, बाजाराच्या सवलती, वहातुकीच्या साधनांची अनुकूलता इत्यादि बाबतींत सुधारणा झाल्यास कांहीं ठिकाणच्या शेत-कऱ्यांचें उत्पन्न वाढेल. शेती आणि शेतकरी ह्यांविषयी सर्व महत्वाची माहिती आंकड्यांसहित गोळा करण्याचें काम एका स्वतंत्र खात्यामार्फत केलें जावें, व व्यापारी आणि शास्त्रज्ञ ह्यांच्या सहकार्यानें त्या खात्याचें काम चालावें. हिंदुस्थाना-तील शेतकी सुधारण्यासंबंधीं जे जे प्रयत्न होतील त्या सर्वांत शक्य तितकें, हिंदी संस्थानाचेंही सहकार्य असावें. '

शेतीच्या धंद्याची आर्थिक परिस्थिति व शेतकऱ्यांचें जीवन ह्यांविषयी शेतकी कमिशननें वर जीं मतें प्रतिपादिलीं आहेत व ज्या प्रत्यक्ष सूचना केल्या आहेत त्यांत नवीन असें फारच थोडें आहे. परंतु हिंदुस्थानातील प्रमुख धंद्याच्या म्हणजे शेतकीच्या संघटनेविषयीं विचार करीत असतां त्यांचा उल्लेख करणें इष्ट होय. ह्या शिफारशी सामान्यपणें हिंदुस्थानसरकार व प्रांतिकसरकारें ह्यास मान्य झाल्या असून मध्यवर्ती शेतकी मंडळही नुकतेंच अस्तित्वांत आलें आहे.

**१२ शेतकीच्या धंद्याचें भवितव्यः—** हिंदुस्थानांतील लोकसंख्येच्या मानानें येथील शेतजमीन मर्यादित आहे. इंग्लंड व वेल्स ह्या देशांत शेतकींत गुंतलेल्या दर माणसागणिक २१ एकर जमीन लागवडीत असते; तर बंगाल इला-ख्यांत हेंच प्रमाण २१ च्या एक दशांशाहून फारसें अधिक नाहीं. जमीनीचें क्षेत्र जों जों मर्यादित होत जातें तों तों भांडवलाचा अधिक उपयोग करून कमी क्षेत्र-फळांतून जास्त धान्य उत्पन्न होण्याचे अधिक उत्पादक मार्ग स्वीकारावे लागतात. डेन्मार्क व हॉलंड ह्या पाश्चात्य राष्ट्रांच्या व चीनजपानसारख्या पौरस्त्य राष्ट्रांच्या उदाहरणावरून शेतीचा धंदा अधिक किफायतशीर करण्यास किंवा मर्यादित शेत-जमीनींतून वाढतें उत्पन्न काढण्यास भांडवलाचा म्हणजे चांगलें बीं, खतें, आउतें, पाण्याच्या सोयी, इत्यादिकांचा उपयोग करणें किती आवश्यक असतें हें दिसून

येईल. हिंदुस्थानांत मात्र आज शेंमवार्शे वर्षे जमीनिच्या उत्पादकतेवर वाढता ताण पडत असूनही लागवडीच्या पद्धतीत म्हणण्यासारख्या सुधारणा झाल्या नाहीत ही आश्चर्याची व दुर्दैवाची गोष्ट होय. जमीनीच्या मशागतीस शक्य तितके अधिक भांडवल लावण्याची पद्धत इकडे अस्तित्वांत नाही व शेतकीवर आपली उपजीविका करणाऱ्या लोकांचे श्रमही पूर्णपणें उपयोगांत आणले जात नाहींत. सामान्यतः वर्षांतून सहा महिन्यांहून अधिक काळ शेतकरी व त्याचे साहाय्यक कामाशिवाय काढतात किंवा शेतीखेरीज इतर उद्योग करण्यात घालवितात असें म्हटलें पाहिजे. शेतकी हा हिंदवासीयांचा मुख्य धंदा असें आपण म्हणतों; परंतु आठ नऊ महिने शहरांत मोलमजूरी करून पावसाळ्याच्या तीन चार महिने शेतावर जाणारे हजारो मजूर पाहिले म्हणजे देशाच्या अनेक भागात शेतकी हा केवळ दुय्यम महत्त्वाचा धंदा झालेला आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाही. शेतकीत गुंतलेले जे लोक शहरांत कामाला येत नाहीत ते आपापल्या खेड्यांत अनेक लहान सहान उद्योग करून रिकाम्या वेळाचा उपयोग करण्याचा व आपली हलाखीची स्थिति कांही अंशी सुधारण्याचा प्रयत्न करीत असतात.

हिंदुस्थानांतील नैसर्गिक साधनें व येथील लोकांचे गुणविशेष हे शेतीच्या धंद्यास विशेष अनुकूल असून मोठमोठे कारखाने चालविण्याच्या धंद्यांस हिंदुस्थानांत फारसा वाव नाही, असें कित्येक पाश्चात्य ग्रंथकाराचें मत असतें त्याचा येथें उल्लेख करणें आवश्यक आहे. वरवर पहाणारास वरील मत सामान्य व यथार्थ वाटल्यास आश्चर्य नाही. कारण आज कैक शतकें शेतकी हाच एक धंदा येथे विस्तृत प्रमाणावर चालविला जात असून नव्या स्वरूपाचे व प्रचंड प्रमाणावर चालविलेले धंदे येथें कधी काळी भरभराटीस येतील हे आज सांगतां येणें शक्य नाही; व असे शेकडों कारखाने हिंदुस्थानात निघाले तरी येथील लोकसंख्या व देशाचें क्षेत्रफळ ह्यांच्या मानानें शेतकीचा धंदाच प्रमुख ठरणार. तरी हिंदुस्थानात शेतकीशिवाय दुसरा धंदा चालणारच नाही, तो चालविण्यास आवश्यक असलेली नैसर्गिक, मानवी, व भांडवलविषयक साधनें येथे उपलब्ध होणे शक्य नाही अशा अर्थानें वरील मत प्रतिपादणारास मागील अनेक प्रकरणांत नैसर्गिक परिस्थिति, मनुष्यबल व भांडवल ह्यांविषयी जें विवेचन केलें आहे त्यावरून आणि हिंदी उद्योगधंद्यांच्या प्राचीन व सद्यःकालीन इतिहासावरून चोख उत्तर मिळण्यासारखे आहे. शेतकीचा धंदा सर्वत्र पुरातन काळापासून उच्च दर्जाचा मानला गेला आहे व प्रत्येक राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीस त्याच धंद्याचा मूळ व खंबीर आधार असावा लागतो. हिंदी राष्ट्रास आपली आर्थिक प्रगति घडवून आणावयाची असेल तर लागवडीच्या पद्धतींत व शेतकीच्या संघटनेंत अनेक इष्ट सुधारणा घडवून आणणें आवश्यक आहे. परंतु तयार मालाचे कारखाने काढणें, खाणींचे व वहातुकीचे धंदे चालविणें हेंही शक्य व सर्वथैव इष्ट

असून शेता व उद्योगधंदे ह्यांच्या प्रमाणशीर संवर्धनानेंच देशाची चिरस्थायी आर्थिक प्रगति घडून येईल सरकारचें शेतकी खातें, शास्त्रीय शोध लावणाऱ्या संस्था, सहकारी पेढ्या व मंडळ्या ह्यांच्या साहाय्यानें शेती सुधारणेप्रीत्यर्थ खटपट अलीकडे चाललेली असून शेतकी कमीशनच्या शिफारसींमुळें ह्या खटपटी अधिक विस्तृत, जोमदार व यशस्वी होतील ह्यांत शंका नाही. परंतु आर्थिक व नैतिकदृष्ट्या शेतीला परिपोषक म्हणून उद्योगधंद्यांची वाढ घडवून आणणेंही सर्वथैव शक्य व आवश्यक आहे.

हिंदुस्थानांत पूर्वीच्या काळी मोठ्या प्रमाणावर चालविलेले कारखाने नव्हते एवढ्या-वरूनच ते ह्यापुढेंही येथें निघू शकणार नाहीत असें म्हणणें शुद्ध असमंजसपणाचे आहे. आज औद्योगिक प्रगतीप्रत पोहोंचलेल्या सर्व राष्ट्रांबद्दल शें पन्नास वर्षांपूर्वी असेंच मत ठोकून देतां आलें असतें, व जपानला आज जें औद्योगिक महत्व प्राप्त झालें आहे त्याचा एक शतांश भागाचाही पंचवीस वर्षांपूर्वी अंदाज करतां आला नसता. औद्योगिक क्रान्ति घडून येण्यापूर्वी इंग्लंडमध्ये शेतकी व उद्योगधंदे ह्यांचें परस्पर प्रमाण त्या धंद्यांच्या आजच्या हिंदुस्थानांतील प्रमाणाहून फारसें भिन्न नव्हतें. उलट, सर्व राष्ट्रांची औद्योगिक क्रान्तीपूर्वी जी परिस्थिति होती त्यांची तुलना केल्यास हिंदुस्थानदेश व हिंदी लोक ह्यांसच पूर्वकाली शेतकी, व्यापार व उद्योगधंदे ह्यांच्या प्रमाणशीर संवर्धनाची कला विशेष अवगत होती असे दिसून येईल. विणकामाचे, रंगाचे, भांडीं व भूषणें तयार करण्याचे, गलबतें बांधण्याचे वगैरे हरहुन्नरी व मोठमोठे धंदे प्राचीन काळापासून भरभराटीस आलेले होते, ह्या एकाच ऐतिहासिक पुराव्यावरून नैसर्गिक रीत्या हिंदुस्थान देश उत्पादक धंद्यांच्या भरभराटीस नालायख नाही हे सिद्ध होतें. औद्योगिक क्रान्तीनंतर यांत्रिक सुधारणा, भांडवलाचें वाढतें महत्त्व, मोठ्या प्रमाणावर उत्पादन करण्याची शक्यता इत्यादि बाबतींत जे फेरबदल घडून आले आहेत त्याच्या अनुरोधानें इकडील औद्योगिक परिस्थितीत पूर्ण बदल अजून व्हावयाचा आहे. मध्ययुगीन आर्थिक घटनेचें अलीकडील औद्योगिक पद्धतीत रूपांतर व्हावयाची संक्रमणावस्था सर्वच राष्ट्रांत विशेष अस्थिर व कष्टमय असते. परंतु हिंदुस्थानांत राजसत्ता परकीयांच्या हातीं असल्यामुळें व इंग्लंडच्या धंदेवाल्यां-शीच येथील धंदेवाल्यांचा आजपर्यंत मुख्य विरोध असल्यानें सरकारी धोरण व त्याचें समर्थन करण्याकरितां पुढें आणले जाणारे विचार हे खऱ्या हिंदी हितसंबंधास विरोधक, निदान पूर्वग्रहदूषित, असणार हें स्पष्ट आहे. नाही तर प्राचीन व ऐति-हासिक कालांतील हिंदी उद्योगधंद्यांची भरभराट विसरून जाण्यास व इंग्रजी प्रति-स्पर्ध्यांकडून येथील कारागिरांची होत असलेली अवनति निमूटपणें पहाण्यास इंग्रज ग्रंथकार व हिंदुस्थान सरकार ही प्रवृत्त झाली नसती. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या धंद्यांच्या वाढीविषयीं आपलें धोरण ठरवितांना आपण आपल्या देशाच्या व आज औद्योगिक महत्वास चढलेल्या राष्ट्राच्या आर्थिक इतिहासाची शिकवण विसरतां

कामा नये. कच्चा माल, प्रेरक शक्ति, खनिज द्रव्यें, मनुष्यबळ इत्यादि साधनांचा दूर दृष्टीनें उपयोग केल्यास कोणताही महत्त्वाचा धंदा हिंदुस्थानांत यशस्वी रीतीनें चालणें सामान्यतः अशक्य नाहीं. मात्र शेतीच्या धंद्याची सुधारणा व उद्योगधंद्यांची वाढ ह्यांमध्यें वितुष्ट नसून ते व्यवसाय परस्परपरिपोषकच आहेत आणि गिऱ्हाइकांच्या मागणीचें स्वरूप व परिमाण ह्यांच्यांतील फेरबदलास अनुसरून सर्वच धंद्याच्या घटनेंत इष्ट सुधारणा करणें आवश्यक आहे हें विसरतां कामा नये.

**१३ चरका व खादी**— शेतकऱ्यांची हलाखी, कारागिरांच्या धंद्यांचा होणारा ऱ्हास, बेकारी, पाश्चात्य राष्ट्रांचा हिंदुस्थानाच्या आर्थिक जीवनावर बसत असलेला पगडा, प्रचंड प्रमाणावर मालाचें उत्पादन करण्याच्या पद्धतीचा प्रसार आणि भांडवल-वाले व मजूर ह्यांच्यातील भांडणामुळें उत्पन्न होणारी सामाजिक अशांतता इत्यादि आर्थिक घटनेसंबंधीचे दुष्परिणाम अनेक हिंदवासियांस अलीकडे दुःसह वाटूं लागले आहेत. कारखानदारीची पद्धत ह्या देशांत वाढूं देऊं नये, उद्योगधंद्यांचे शेतकीशीं असलेलें साहचर्य कायम राखावें आणि एकंदरीनें संपत्तीच्या अवास्तव लालसेनें व्यक्ति व समाज ह्यांच्यांत जे असमाधान माजतें ते टाळावें अशा ध्येयांचा एक नवीन वर्ग येथें निर्माण झाला आहे. ह्या प्रकारच्या लोकांच्या व्यावहारिक सूचनांच्या मूळाशीं जे सर्वसाधारण तत्वज्ञान असतें त्याचा मागें 'हिंदी संस्कृति' ह्या प्रकरणांत विचार केलेलाच आहे. परंतु अशा लोकांकडून सुचविल्या जाणाऱ्या विशिष्ट सुधारणांचा औद्योगिक संघटनेशीं निकट संबंध येत असल्यानें त्याच्या कार्यक्रमांतील खादीच्या व चरक्याच्या चळवळीचा येथें निव्वळ आर्थिक दृष्ट्या थोडासा उहापोह करणें आव-श्यक आहे. चरख्याचा सर्वत्र प्रसार झाल्यास कारागिराचें स्वातंत्र्य कायम राहून त्याच्या धंद्यांस उत्तेजन येईल व एकंदरीनें लोकांचें, व विशेषतः शेतकऱ्यांचे आर्थिक व सामाजिक जीवन शुद्ध व सुखमय होईल असें सांगण्यांत येतें. पाश्चात्य पद्धतीची भांडवलशाही व कारखानदारी हिंदुस्थानांतून नाहींशी करून पूर्वकालीन साधी राहणी व स्वतंत्र उत्पादनाची पद्धति पुन्हां अस्तित्वांत आणावी ह्या हेतूनें अंगिकारिलेली चरक्या-ची चळवळ ही जुन्या आर्थिक घटनेच्या संरक्षणार्थ नवीन औद्योगिक रचनेविरुद्ध पुकारलेल्या युद्धाची तयारीच होय व ह्या दृष्टीनेंही त्या चळवळीचा प्रस्तुत ठिकाणी विचार कर्तव्य आहे. परंतु खादी व चरका ह्यांचा प्रसार करण्याचें कार्य कॉंग्रेस-सारख्या राजकीय संस्थेनें आपल्या हातीं घेतल्यामुळें आणि त्या चळवळीच्या पुर-स्कर्त्यांत भिन्न मताचे व कमी–अधिक श्रद्धेचे लोक असल्यानें कॉंग्रेसमधील स्थानिक परिस्थितीस अनुसरून चरका व खादी ह्यांच्या प्रसारासंबंधीही निरनिराळीं व विसंगत मतें प्रसिद्ध केलीं जातात; कलकत्ता येथील कॉंग्रेसनें चरका फिरविणें व खादी वापरणें ह्या गोष्टी प्रत्येक लहान, थोर व स्त्रीपुरुष नागरिकांत शिस्त व स्वार्थत्याग हे गुण बाणण्यास आवश्यक आहेत असें प्रतिपादिलें. नागपूर येथें राष्ट्रीय सभा भरली असतां

खादीची चळवळ ही हिंदुस्थानाला आर्थिक स्वायत्तता मिळवून देण्याचें एक साधन आहे व परकी राष्ट्रांशीं असलेले सर्व आर्थिक संबंध तोडून स्वदेशी धंद्यांस उत्तेजन देणें आवश्यक आहे असा ठराव पास झाला. प्रत्येक खेडेगाव होतां होईल तों आर्थिक दृष्ट्या स्वायत्त करावें व हिंदुस्थानाला औद्योगिक स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय राजकीय स्वराज्य मिळावयाचें नाहीं असाही एक मुद्दा नागपूरच्या सभेंत प्रामुख्यानें पुढें आला होता. बेळगांवच्या काँग्रेसनें तर स्वतःच्या हातानें सूत काढणें व खादीचें कापड वापरणें ह्या गोष्टींची राष्ट्रीय सभेच्या सभासदांवर सक्ती केली. चरका व खादी ह्याची चळवळ सुरू झाल्यापासून अनेक कमी–अधिक महत्वाचे, आर्थिक, सामाजिक व राजकीय स्वरूपाचे युक्तिवाद चळवळीच्या शत्रु–मित्रांकडून केले जात आहेत. कित्येकांस फावल्या वेळीं शेतकरी व इतर लोकास वेळ घालविण्याचें व दोन पैसे मिळविण्याचें एक साधन एवढीच चरक्याची मातब्बरी वाटते. कारखानदारीची पद्धत नाहीशी करून तिच्या ऐवजीं स्वतंत्र कारागिरीची पद्धत स्थापन करण्याच्या व शेतकरी वर्गास जोड धंदा उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीनें चरक्यास व खादीप्रसारास कितपत महत्व देता येईल हाच त्या चळवळीबद्दल आर्थिक महत्वाचा प्रश्न आहे.

सर्व देशांत व विशेषतः हिंदुस्थानांत सूत कांतण्याचा धंदा फार प्राचीन काळापासून घरगुती रीतीनें चालविला जात असे. घरांतील स्त्रियांनीं घरकाम संभाळून सूत कांतावें व तें शेजारच्या विणकरास विकावें किंवा क्वचित्प्रसंगीं आपल्या घरीच त्याचें कापड, घोंगड्या वगैरे विणाव्या असा प्रघात असे. आजही देशाच्या ज्या भागांत परदेशी अगर हिंदी गिरण्यांचें सूत व कापड पोहोंचण्याच्या सोयी नाहींत तेथें हीच पद्धत अस्तित्वात आहे. परंतु यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें व मोठ्या प्रमाणावर सूत कांतण्याचे कारखाने निघाल्यापासून हातानें कांतलेल्या सुतास स्वस्ताई व सफाई ह्या दोन्ही बाबतींत खाली पाहण्याची वेळ आली. हिंदुस्थानात खपत असलेल्या विविध मालाच्या दृष्टीनें विणकामामध्यें यांत्रिक सुधारणा तेवढ्या प्रमाणांत झाल्या नसल्यानें व परदेशी आणि स्वदेशी गिरण्यांच्या पुरवठ्यापेक्षांही हिंदी लोकांची कापडास असलेली मागणी वाढत असल्यानें सामान्य कार्यक्षमतेचा विणकराचा धंदा अजून सुस्थितीत आहे. विणण्याच्या पद्धतींत, विणलेल्या मालांत व विणकराच्या संघटनेंत जरूर त्या सुधारणा केल्या तर तो धंदा अधिक ऊर्जितावस्थेस येईल हेंही मागील विवेचनावरून ध्यानांत येण्यासारखें आहे. सरकी काढणें, गठ्ठे बांधणें, सूत कातणें ह्या बाबतींत एवढ्या मोठ्या यांत्रिक सुधारणा घडून आल्या आहेत कीं त्या झुगारून देऊन ती कामें परिस्थितीचा विचार न करता हातानें करीत बसणें विक्षिप्तपणाचें व गैरफायद्याचें ठरल्याशिवाय राहणार नाहीं. पातळ, सुबक व स्वस्त कापडापेक्षां जाडें भरडें व महाग कापड घेणें अधिक श्रेयस्कर आहे असें सामान्य माणसास वाटूं लागावें एवढा त्यांच्या मनोरचनेंत व आवडीनिवडींत

फरक घडवून आणला तरच हातानें सूत कांतण्याच्या धंद्यास पुन्हां कायमची ऊर्जितावस्था येईल. मानसिक व नैतिकदृष्ट्या ही गोष्ट करणें शक्य आहे किंवा नाहीं ह्याचा तज्ज्ञांनी विचार करावा; निव्वळ आर्थिकदृष्ट्या ती अशक्यप्राय आहे ह्यांत शंका नाही.

कांतणें किंवा विणणें ह्या एकाच धंद्यांत यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें व मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केलेल्या वस्तूंनी जुन्या पद्धतीनें तयार होणाऱ्या मालास मागें टाकलें आहे असें नाही. बोरूच्या लेखण्या जाऊन शिसपेन्सिली, टाक व फाऊंटनपेनें आली; हस्तलिखितांच्या ऐवजीं छापील ग्रंथ निघाले; घरगुती जातीं गेली व पिठाच्या गिरण्या आल्या; बैलगाड्या जाऊन मोटारी व आगगाड्या धावूं लागल्या; ह्या व ह्यांसारख्याच इतर शेंकडों बाबतींत घडून आलेल्या चमत्कारिक विकासास अनुसरूनच हातानें सूत कांतण्याच्या धंद्याचा ऱ्हास झालेला आहे. मनुष्याच्या मानसिक विकासाबरोबर त्याच्या गरजा वाढाव्या, आणि त्या वाढत्या गरजा भागविण्यास अधिक प्रकारचे व अधिक परिमाणाचे जिन्नस लागावे हें साहजिकच आहे. लहान व स्वतंत्र उत्पादकांस हे जिन्नस सुबकतेनें व स्वस्ताईनें तयार करतां येतील तरच त्यांचें अस्तित्व टिकेल हें निर्विवाद आहे. शेतकरी लोकांस व खेड्यांतील इतर रहिवाशांस चरक्याच्या साहाय्यानें पोटधंदा मिळेल असें म्हणणाऱ्यांनीं जंगली मजूरांसही आजमितीस कारखान्यांत आठ–बारा आणे रोज मिळतो हे ध्यानांत घेतल्यास आपल्या म्हणण्यांतील तथ्य किती मर्यादित आहे हे त्यांस दिसून येईल. चरख्यामध्ये जरूर त्या सुधारणा केल्यास ज्या ठिकाणीं गिरणींतील सूत अगर सुताचें कापड सहसा पोहोंचू शकत नाहीं त्या भागांत व इतरत्र ज्या लोकांस दुसरा अगदींच कांहीं धंदा मिळत नाही त्यांस चरख्याचा थोडा–फार उपयोग होईल ह्यांत शंका नाही. हातानें कातलेलें सूत किती सफाईदार व स्वस्त निघेल ह्यावरच चरख्याचा जोडधंदा म्हणून होणारा उपयोग बहुशी अवलंबून राहील. चरख्याच्याच उदाहरणावरून एक गोष्ट स्पष्टपणें दिसून येईल ती ही कीं कोणताही धंदा चिरकाल किफायतशीरपणें चालण्यास गिऱ्हाइकांची मागणी योग्यपणें भागविणें हें एकच साधन आहे. खादीचे जे विशिष्ट गुण आहेत त्यामुळें तशा कापडाला जी मागणी असते ती भागविण्याइतकाच खादीचा कायमचा उपयोग होईल. ह्यापेक्षां अधिक माल उत्पन्न केल्यास सुबक व स्वस्त कापडाची स्पर्धा त्यास सहन करावी लागणें अपरिहार्य आहे. शिवाय, केवळ वादविवादाकरितां म्हणून सर्व परदेशी व स्वदेशी गिरण्यांचें कापड बाजारांत येण्याचें बंद झालें असें मानिलें व सध्यां हिंदुस्थानांत जेवढें कापड खपत आहे तेवढें सगळें हातचाकावर कातलेल्या सुतापासून हातमागांवर विणलेलें आहे असें धरलें तरी देशाचा एकंदर फायदा साठ सत्तर कोटींपेक्षां अधिक व्हावयाचा नाही. म्हणजे लोकांच्या आवडीनिवडीस आळा घालून, त्यांची स्वार्थत्यागबुद्धि कसास

लावून व अंतर्राष्ट्रीय विनिमयावर बेसुमार नियंत्रणें घालून माणशीं दोन रुपये सालीना उत्पन्न वाढविल्याचें श्रेय पदरांत पडणार. लोकांची कपड्यास असलेली मागणी वाढत असल्यानें व गिरणीचा माल स्वस्त व मुबक मिळत असल्यानें सामान्य परिस्थितीत हातरहाटावरील सुतास मुळीच वाव नाही असें म्हटलें असतां चालेल. शेतकी व इतर लहान मोठे धंदे ह्यांच्या किफायतशीरपणाविषयी व उत्पादकतेविषयी विचार करतांना गिऱ्हाइकांच्या मागणीचें स्वरूप व परिमाण आणि तिची तीव्रता हीं अवश्य ध्यानांत बाळगावी लागतात. शेतकीचा मुख्य धंदा करणाऱ्या लोकांस साहाय्यक होतील असे जुने घरगुती धंदे ऊर्जितावस्थेस आणावे व नवीनांची स्थापना करावी आणि इकडील लहानसहान कारागिरांचें व उत्पादकांचें स्वतंत्र अस्तित्व टिकविण्याकरितां शक्य व योग्य ते प्रयत्न करावे. ह्या धोरणाचें एक व्यावहारिक उदाहरण ह्या दृष्टीनें चरख्याच्या व खादीच्या चळवळीकडे पाहिल्यास ती उत्तेजनार्ह ठरते. परतु एक चरका म्हटला की तो सर्व वर्गांतील सर्व दर्जाच्या स्त्रीपुरुषांनी अंगिकारिलाच पाहिजे व खादी वापरण्यानें हिंदुस्थानाचे आर्थिकच नव्हे तर सामाजिक, नैतिक व राजकीय ध्येय खात्रीनें साधेल असें प्रतिपादणें इतिहास, शास्त्र व अनुभव ह्यांच्या शिकवणुकीस सोडून आहे. खादीच्या चळवळीमुळे लोकांची त्या प्रकारच्या जाड्याभरड्या कापडाला असलेली मागणी तात्काल वाढली ह्याचा फायदा घेऊन गिरणीवाल्यांनीं कमी खर्चाचें व जाड सुताचें कापड काढून तें 'खादी' म्हणून विकण्यास सुरुवात केली. हातमागावरील खादीपेक्षां 'गिरणीची खादी' आणा–अर्धा आण्यानें स्वस्त म्हणून लोक तीच घेऊं लागले. चळवळीचा आर्थिक, सामाजिक, नैतिक अगर राजकीय कोणताच फायदा पदरांत न पडतां गिरणीवाल्याची मात्र पोळी पिकली. ह्या व अशाच स्वरूपाच्या इतर कटु अनुभवावरून सामान्य लोकांस एक गोष्ट स्पष्टपणें दिसून येईल, ती ही की गिऱ्हाइकाच्या मागणीस अनुसरून कमीत कमी खर्चाचे उत्पादक मार्ग स्वीकारणे हेच एक कोणताहि धंदा यशस्वी करण्याचें खरें साधन आहे. कमी कार्यक्षमतेचे धंदे निव्वळ राजकीय किंवा परोपकारबुद्धिप्रेरित चळवळीनें कायम राखावयाचा प्रयत्न करणे सामान्यतः अशक्य व अनिष्ट असतें.



# प्रकरण ७ वें

## लोकसंख्या आणि संपत्ति

**१ लोकसंख्येची वाढ**– मागें 'संपत्तीचा उपभोग' ह्या प्रकरणांत लोकसंख्येच्या वाढीविषयी माल्थस ह्या प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकाराच्या सिद्धांताचें दिग्दर्शन केलें आहे.[1] अलीकडील सुशिक्षित वर्गांत लोकसंख्येसंबंधानें दोन परस्पर विरोधी भावना दिसून येतात. कांहीं लोकांचा औद्योगिक प्रगतीवर एवढा विश्वास असतो कीं लोकसंख्या कितीही वाढली तरी तिचें पोषण करण्यास, व राहणीचें मान सुधारण्यास, पुरेशी संपत्ति सहज उत्पन्न होईल असा त्यांस भरंवसा वाटतो. ज्या देशांत भांडवल अगर मनुष्यबळ ह्यांच्या भरपूर पुरवठ्याच्या अभावीं नैसर्गिक उत्पादक साधनांचा पूर्णपणें उपयोग झालेला नसतो व जेथें आर्थिक संघटना कार्यक्षम असते तेथें लोकसंख्येच्या वाढीमुळें अधिक मनुष्यबळ उपलब्ध होऊन संपत्तीतही भर पडते; परंतु ज्याठिकाणीं उत्पादक सामर्थ्य वृद्धिंगत होण्यास विशेष वाव नाहीं तेथें केवळ लोकसंख्या वाढल्यानें उपजीविकेचीं साधनें वाढण्याचा संभव नसून उलट संपत्तीतील वाढ प्रमाणाहून कमी झाल्यानें सरासरीची माणशीं संपत्ति कमी होऊन राहणीचें मान मात्र उतरतें. औद्योगिक प्रगतीवर श्रद्धा असल्यानें लोकसंख्येच्या वाढीबद्दल निर्धास्त असणाऱ्या लोकांचा वर्ग एका टोंकास आढळतो; तर जन्ममरण ह्या गोष्टी सर्वस्वी ईश्वराधीन निदान स्वाभाविक होत असें समजणारे लोक दुसऱ्या टोंकास आढळतात. हिंदुस्थानांत ह्या दुसऱ्या प्रकारच्या म्हणजे लोकवृद्धि दैवाधीन समजून तिच्याबद्दल उदासीन असणाऱ्या लोकांचा भरणा अधिक आहे. पाश्चात्य राष्ट्रांत अलीकडे स्वतःची सांपत्तिक स्थिति सुधारण्याच्या महत्त्वाकांक्षेनें अगर निव्वळ सुखलालसा व बेजबाबदारपणा ह्या अवगुणांच्या प्रसारामुळें जननसंख्येस कृत्रिम रीत्या प्रतिबंध करणाऱ्या लोकांची संख्या वाढत आहे. हिंदुस्थानांतही ह्या मताचा प्रादुर्भाव व्हावयास लागला असून जनननियंत्रण हा सार्वजनिक वादविवादाचा एक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. संतति–नियमनास साधकबाधक अनेक प्रमाणें पुढें आणतां येण्यासारखीं आहेत· त्यांपैकीं कांहींचा मागें विचार केलेला असून हिंदुस्थानांतील परिस्थितीस 'संततिनियमनाचें' तत्त्व कितपत हितावह आहे ह्याचें स्थूल विवेचन प्रस्तुत प्रकरणांत करावें लागेल. परंतु लोकसंख्येची वाढ व उत्पादक सामर्थ्याची वृद्धि ह्यांचा परस्पर संबंध कोणता आहे ह्या प्रश्नाचें हिंदुस्थानाच्या दृष्टीनें योग्य उत्तर ठरविल्याखेरीज वाढती जनन-

---

१ मागें पानें १८९–१९४ पहा.

संख्या इष्ट कीं अनिष्ट हें ठरविणें अशक्य आहे. समाजाची सुरक्षितता व सांपत्तिक सुस्थिति मनुष्यबळावर अवलंबून आहेत व मनुष्यबळांत वाढ झाल्यास राष्ट्र बलवान होऊन तेथील जमीनीच्या लागवडीस किंवा उद्योगधंद्यांतील कामास अधिक लोकांचे श्रम उपलब्ध होतील हें उघड आहे. फ्रान्स व जर्मनी ह्या देशांत राष्ट्रीय सुरक्षिततेचें एक साधन म्हणून लोकसंख्येच्या वाढीस महत्त्व दिलें जातें व नव्या वसाहतींत जुन्या देशांतून मजूरांचा पुरवठा करण्याचे प्रयत्न आवश्यक समजले जातात ह्या अनुभवावरून लोकसंख्येची वाढ ही लष्करी अगर राजकीय व आर्थिक अगर औद्योगिक इष्टतेची बाब आहे, ह्या मतांत कांहीं तरी तथ्यांश आहे हें दिसून येईल. परंतु शास्त्रीय शोध व यांत्रिक सुधारणा ह्यांचा मनुष्यबळाची बचत करण्याच्या स्वरूपाचा जो परिणाम उद्योगधंद्यांत स्पष्टपणें दिसून येतो तो लष्करी संघटनेंतही अनुभवास येऊं लागला आहे. लोकसंख्येनें कमी असलेल्या देशास सुधारलेल्या व अधिक परिणामकारक लष्करी साधनांनीं मोठ्या राष्ट्राशीं टक्कर देणें शक्य आहे हें जुनें ऐतिहासिक सत्य नव्या स्वरूपांत प्रत्यंतरास येत आहे. तरी औद्योगिक सुधारणेप्रमाणें लष्करी सुधारणा ह्याही अलीकडे कोणा एका राष्ट्राची कायमची मिरास होऊं शकत नाहीत व शेवटीं प्रजाजनांची संख्या व त्यांचें कर्तृत्व ह्यांच्यावर विसंबून राष्ट्रास आपल्या राजकीय व आर्थिक प्रगतीचा मार्ग आंखावा लागतो. लोकसंख्येचें औद्योगिक महत्त्व लष्करी उपयुक्ततेहून अर्थातच अधिक मानलें पाहिजे. कारण सैन्यांतील शिपायांस पोसणें ज्याप्रमाणें आवश्यक त्याचप्रमाणें राष्ट्रांतील नागरिकांची योग्य रीतीनें उपजीविका चालणें हें त्यास लष्करी कार्यक्षमता आणून देण्यास जरूर आहे. संपत्तीच्या उत्पादनाचे जमीन, श्रम व भांडवल हे जे तीन घटक आहेत त्यांपैकी मधला एकच कार्यकर्ता आहे हें खरें. तरी नैसर्गिक व उत्पादक साधनांचा जरूर तेवढा पुरवठा असल्याखेरीज मनुष्याचें जीवन व त्याचे व्यवसाय अशक्यकोटींतीलच समजले पाहिजेत. जमीनीची व खाणी, अरण्यें इत्यादि इतर नैसर्गिक साधनांची समृद्धि असेल व जरूर तेवढें संघटनचातुर्य उपलब्ध असेल तर लोकसंख्येची वाढ होणें ही इष्ट गोष्ट ठरेल. परंतु लोकसंख्येच्या मानानें शेतजमीन वगैरे नैसर्गिक संपत्ती मर्यादित असल्यास अगर त्यांचा अधिकांत अधिक उत्पादक मार्गानें विनियोग करण्यास आवश्यक असलेल्या भांडवल, संघटनाचातुर्य, शास्त्रीय ज्ञान इत्यादि साधनांचा तुटवडा असल्यास लोकसंख्येंत वाढ होणें हें सामाजिक व आर्थिक अरिष्ट समजलें पाहिजे. जन्मसंख्या व मृत्युसंख्या ह्यांच्यांतील फरकाच्या आंकड्यांची औद्योगिक प्रगतीच्या साधनांच्या आंकड्यांशीं तुलना करूनच लोकसंख्येची वाढ इष्ट व हितावह स्वरूपाची आहे किंवा ती अनावश्यक अतएव हानिकारक आहे हें ठरविलें पाहिजे. हिंदुस्थानांतील लोकसंख्येचे, जननमरणाचे, व शेती आणि इतर

धंदे ह्यांच्या उत्पन्नाचे पुढें आंकडे दिलेले आहेत, त्यांच्या आधारानें येथील लोकसंख्येची वाढ प्रगतीस आणि स्वास्थ्यास परिपोषक आहे किंवा काय ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे.

**२ हिंदुस्थानची लोकसंख्या**—लोकसंख्येच्या परिमाणावरून राष्ट्रांचा दर्जा ठरवावयाचा असें म्हटलें तर हिंदुस्थान देश जगांतील सर्व देशांत दुसरें स्थान पटकावील. चीनची लोकसंख्या ३५–४० कोटी असल्यानें खानेसुमारीत त्या राष्ट्राचा अर्थातच पहिला दर्जा आहे. हिंदुस्थानाच्या बत्तीस कोटी लोकसंख्येत जगाच्या पाठीवरील सर्व मानव समाजाच्या सुमारें $\frac{1}{6}$ भागाचा अंतर्भाव होतो हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. परंतु निव्वळ लोकांच्या संख्येकडे पाहून त्यांच्या स्थितीविषयीं अंदाज करणें अशक्य असतें, कारण व्यक्तिशः नागरिकाचें शारीरिक व मानसिक सामर्थ्य निरनिराळ्या राष्ट्रांत कमीअधिक असतें एवढेंच नव्हे, तर उपलब्ध मनुष्यबळाचा पूर्ण उपयोग होण्यास आवश्यक असलेली साधनसामग्रीही बहुतेक राष्ट्रांत मर्यादितच असते. ह्यास्तव हिंदुस्थानाच्या लोकसंख्येविषयी सांगोपांग विचार करावयाचा तर वेळोवेळी नमूद केलेले खानेसुमारीचे आंकडे, शहरें व खेडीपाडीं ह्यांच्यांतील रहिवाशांच्या आरोग्याबद्दल माहिती आणि उत्पादक साधनांशीं व राष्ट्राच्या एकंदर वार्षिक उत्पन्नाशीं लोकसंख्येचें गुणोत्तर ह्यांचें क्रमशः अवलोकन केलें पाहिजे. हिंदुस्थानांतील अगदीं अलीकडील खानेसुमारी म्हणजे १९२१ सालची होय. त्यावर्षी एकंदर हिंदुस्थानाची लोकसंख्या अदमासें ३१ कोटी ८९ लक्ष होती, म्हणजे १९११ च्या लोकसंख्येंत दहा वर्षांत शेकडा १·२ ची भर पडली. १९१८–१९ मध्यें आलेल्या इन्फ्ल्युएंझाच्या भयंकर साथीस सव्वा कोट हिंदी लोक बळी पडले हें ध्यानांत घेतल्यास वाढीचा आंकडा इतका कमी असण्याचें कोडें सहज उकलेल. सन १८७१ मध्यें पहिली व्यवस्थित खानेसुमारी झाली. त्यानंतर दर दहा वर्षांनीं होणाऱ्या खानेसुमारीचे आंकडे, लोकसंख्येची नैसर्गिक वाढ, ब्रिटिश सरकारच्या वर्चस्वाखालीं असलेल्या मुलखाचा वाढता विस्तार व नोंद करण्याच्या पद्धतीची सुधारणा ह्या कारणामुळें सारखे फुगत चालले. वरीलपैकीं शेवटल्या दोन कारणांनीं घडून आलेल्या वाढीचा भाग बाजूस काढून १८७१ पासून १९२१ पर्यंत च्या ५० वर्षांत हिंदी लोकसंख्येंत नैसर्गिक वाढ किती झाली ह्या प्रश्नाचें उत्तर शोधूं गेल्यास तें शेंकडा २०·१ च्या आसपास सांपडेल. निरनिराळ्या प्रांतांतील जन्ममरणाचे आंकडे अंशतः भिन्न असतात; त्यांतल्या त्यात १९११–२१ ह्या दशवार्षिक काळांत इन्फ्ल्युएंझाची भयंकर साथ व देशाच्या बऱ्याच मोठ्या भागांतील एक दुष्काळ ह्यांची भर पडल्यानें खानेसुमारींत सर्व देशाचे म्हणून दिलेले जन्ममरणाचे आंकडे सर्वस्वी ग्राह्य समजतां येणार नाहीत. तरी सामान्यतः हिंदुस्थानांत दर एकहजार लोकसंख्येमागें प्रतिवर्षी ३९ जन्म व ३० मृत्यू होतात, आणि निव्वळ वाढीचा दर

हजारीं ९ पडतो असें म्हणतां येईल. अनेक पाश्चात्य राष्ट्रांत वाढीचें प्रमाण एवढेंच असून कित्येकांत तर ते याहूनही कमी असतें. परंतु जीवितसंवर्धनास आवश्यक असलेल्या वस्तूंचा पुरवठा व त्यांस असलेली मागणी ह्यांची तिकडे अधिक समाधान-कारक रीतीनें तोंडमिळवणी होत असल्यानें व आरोग्यसंवर्धक सुधारणांची त्या राष्ट्रांत विशेष प्रगति झाली असल्यानें जन्ममरणाचें प्रमाण तिकडे बरेंच कमी असतें. म्हणजे अनेक रोग्यांच्या जन्ममरणापासून समाजास व नागरिकांस जें नुकसान सोसावें लागतें तें कमी होऊन वाढीचा ऐन दर मात्र कायम राहतो. लोकसंख्येच्या वाढीच्या बाबतींत हिंदुस्थानाची इतर राष्ट्रांशी तुलना खालीं दिल्याप्रमाणें आहेः—

## कांहीं प्रमुख राष्ट्रांच्या लोकसंख्येच्या वाढीच्या दरांची तुलना

| | देश | वर्ष | जन्मसंख्येचें हजारी प्रमाण | मृत्युसंख्येचें हजारी प्रमाण | लोकसंख्येच्या निव्वळ वाढीचें हजारी प्रमाण. |
|---|---|---|---|---|---|
| १ | इंग्लंड | १९२१ | २२.४ | १२.१ | १०.३ |
| २ | फ्रान्स | १९२२ | २०.१ | १७.८ | २.३ |
| ३ | जर्मनी | १९२३ | २१.२ | १४.३ | ६.९ |
| ४ | अमेरिका | १९२४ | २२.६ | ११.८ | १०.८ |
| ५ | इटली | १९२२ | २९.१ | १७.१ | १२.० |
| ६ | जपान | १९२२ | ३३.१ | २१.६ | ११.५ |
| ७ | **हिंदुस्थान** | **१९२३** | **३५.०** | **२५.०** | **१०.०** |

लोकसंख्येची वाढ व उपजीविकेची साधनें ह्यांचा जितका निकट संबंध आहे त्याहीपेक्षां उत्पादनाच्या नैसर्गिक साधनांची उपलब्धता व लोकवस्तीची विभागणी ह्यांचा अधिक निकट संबंध आहे. इंग्लंड देशाचा दक्षिण व पूर्वभाग औद्योगिक क्रान्तीपूर्वी दाट वसलेला होता ह्याचें कारण त्या भागांतील जमीनीची सुपीकता हें होय; व औद्योगिक क्रान्तीनंतर पश्चिम व उत्तर ह्या दिशांकडील परगण्यांत उत्पादनास व वहातुकीस विशेष सवलत सांपडल्यानें त्या भागांत माणसांची गर्दी झाली तीही उत्पादकता व वस्तीचें क्षेत्रफळाशीं प्रमाण ह्यांच्यांतील कार्यकारणभावास धरूनच होय. बंगाल, संयुक्तप्रांत व मद्रास ह्या प्रांतांतील जमीनीच्या क्षेत्रफळाची एकंदर देशाच्या क्षेत्रफळाशीं अनुक्रमें ७, ६ व ८ इतकी शेंकडेवारी आहे; असें असून ह्या प्रांतांतील लोकसंख्येची एकंदर हिंदी जनतेच्या खानेसुमारीशीं अनुक्रमें १५, १५ व १३ अशी शेंकडेवारी पडते. उलट, मुंबई इलाख्यांत एकंदर हिंदी क्षेत्रफळाच्या एकदशांश भागाचा अंतर्भाव होत असूनही येथील लोक-संख्या मात्र अदमासें $\frac{1}{12}$ आहे. सिंधप्रांत, राजपुताना, मध्यहिंदुस्थान इत्यादि नापीक व रुक्ष प्रांतांत क्षेत्रफळ व लोकसंख्या ह्यांचें प्रमाण अधिकच व्यस्त अस-

त्यास नवल नाहीं. हिंदुस्थानाच्या एकंदर क्षेत्रफळाचें एकंदर लोकसंख्येशीं असलेलें प्रमाण सरासरीनें १७७ आहे; त्यांतही निव्वळ ब्रिटिश हिंदुस्थानांत तें २२७ असून संस्थानी मुलखांत तें १०१ आहे. परंतु विवक्षित प्रांतात व प्रत्येक प्रांताच्या विशिष्ट भागांत हें प्रमाण सर्व देशाच्या सरासरीहून फारच भिन्न असलेलें आढळतें. बंगाल्यांत कित्येक भाग असे आहेत की त्यांत दर चौरस मैलांत एक हजार लोक राहतात, तर सिंध व रजपुताना ह्यांमधील कित्येक भागांत मनुष्यवसति अशक्य होते. जमीनीची सुपीकता, पाणीपुरवठा, शेतकी खेरीज इतर धंद्यांत रोजगार मिळण्याच्या सोयी इत्यादि कारणांस अनुसरून प्रत्येक प्रांतांत लोकसंख्येच्या क्षेत्रफळाशीं असलेल्या प्रमाणाची सरासरी ठरते. सबंध गुजराथेत ही सरासरी दर चौरस मैलास २९२ आहे, तर एकट्या खेडा जिल्ह्यापुरती ती ४४५ आहे. कर्नाटक, दक्षिण महाराष्ट्र व सिंध ह्या प्रांतांत सरासरीनें प्रत्येक चौरस मैलांत अनुक्रमें १८७, १५८ व ९१ लोक राहतात. हिंदी द्वीपकल्पाच्या पश्चिम व पूर्व किनाऱ्यावरील सुपीक जिल्ह्यांत हे प्रमाण सुमारें ५७५ आहे. निरनिराळ्या देशांच्या एकंदर क्षेत्रफळाशीं एकंदर लोकसंख्येचें प्रमाण सरासरीनें किती पडतें हें पुढील आंकड्यांवरून दिसून येईल.

## दर चौरस मैलाशीं लोकसंख्येचें सरासरी प्रमाण

| | | | |
|---|---|---|---|
| बेल्जम | ६५४ | ऑस्ट्रिया | १९९ |
| इंग्लंड व वेल्स | ६४९ | स्पेन | १०७ |
| फ्रान्स | १८४ | जपान | २७५ |
| जर्मनी | ३३२ | अमेरिका | ३२ |
| नेदरलँडस | ५४४ | न्यूझीलंड | ११.८ |
| | | **हिंदुस्थान** | १७७ |

अमेरिका व न्यूझीलंड ह्या 'नव्या' म्हणजे अजून पूर्णपणें वसति न झालेल्या राष्ट्रांत क्षेत्रफळाशी लोकसंख्येचें प्रमाण फार कमी आहे ह्याचें कोणासही आश्चर्य वाटणार नाहीं. परंतु इतर राष्ट्रांसंबंधी वर जे आंकडे दिले आहेत त्यांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास आपणांस असें दिसून येईल की, इंग्लंड, नेदरलँडस व बेल्जम ह्या सारख्या ज्या राष्ट्रांत उद्योगधंद्यांच्या वाढीची पराकाष्ठा झालेली आहे तेथें लोकसंख्येचें एकंदर क्षेत्रफळाशीं असलेलें प्रमाण भारी असून, फ्रान्स, स्पेन व ऑस्ट्रिया ह्यांसारख्या कृषिप्रधान राष्ट्रांतील सरासरीचा आंकडा फारच लहान आहे. जर्मनी व जपान ह्यांसारख्या शेतकी व उद्योगधंदे ह्या दोहोंचीही प्रमाणशीर वाढ झालेल्या राष्ट्रांत दर चौरस मैलास लोकसंख्येच्या असलेल्या प्रमाणाचे आंकडेही मध्यमच आहेत. उत्पन्नाच्या मानानें उत्पादक व्यवसायास लागणाऱ्या जागेचें क्षेत्रफळ शेतकीत कारखान्याहून पुष्कळच

अधिक असतें, ह्या गोष्टीचें वरील आंकड्यांत स्पष्ट प्रत्यंतर दिसेल. ह्याशिवाय, जमीनीची सुपीकता, शेतकीच्या पद्धतीची सुधारणा, नागरिकांची कार्यक्षमता, उत्पादक धंद्यांचें व पेढ्यांचें प्रगमनशील धोरण, परराष्ट्रीय व्यापार, जहाजाच्या वहातुकीचा धंदा इत्यादि बाबतीत ज्या मानानें अनुकूल परिस्थिति असेल त्यामानानें कमी क्षेत्रफळावर अधिक लोकांची वसति होणें शक्य असते. हिंदुस्थानात डोंगराळ व लागवडीस नालायक असलेल्या क्षेत्रफळाचें परिमाण फार मोठें आहे. त्यांतच जमीनीची उतरती पैदास, शेतकी विषयक सुधारणांचा अभाव, उद्योगधंद्यांची अवनत स्थिति, लोकांचें शरीरदौर्बल्य व निरुत्साह इत्यादि कारणांची भर पडून लोकसंख्येचें सरासरी प्रमाण फारच उतरतें, एवढेंच नव्हे तर लोकांच्या राहणीच्या मानांत व्हावी तशी सुधारणा न झाल्यानें, किंबहुना अनेक वर्गांची राहणी निकृष्ट स्वरूपाची होऊनच, दर चौरस मैलास सरासरीनें १७७ इतके तरी लोक राहूं शकतात असें म्हणणें प्राप्त होतें. हिंदुस्थानांतच मुंबईसारख्या शहरांत लक्षावधि लोक गिरण्या, आगगाड्या, व्यापार, पेढ्या, यांत्रिक कारखाने इत्यादि व्यवसायावर आपली उपजीविका करतात व त्याच्यांत राहणीचें मानही त्याच वर्गातील मुंबईच्या बाहेरील लोकांपेक्षां उच्च प्रतीचें असतें हे ध्यानांत घेतल्यास ज्या राष्ट्रांतील लोकांचा उद्योगविषयक व व्यपारविषयक व्यवसाय वाढत्या प्रमाणावर असतो त्यांस कमी क्षेत्रफळ व वाढती लोकसंख्या ह्यांची तोंडमिळवणी करणें कसें शक्य होतें ह्याचा सहज उलगडा होईल. संपत्तीचें उत्पादन म्हणजे निव्वळ शेतांतून अगर खाणींतून उपयुक्त पदार्थ काढणें किंवा कच्चा माल घेऊन त्याचें रूप बदलून तो अधिक उपयुक्त करणे एवढेंच नसून मनुष्याच्या ज्या ज्या गरजा असतील त्या त्या व्यवस्थितपणे भागविणें हें होय. ह्यावरून वस्तूंशी निगडीत न झालेल्या कामगिऱ्या करण्याच्या सोयी अगर कमी कच्चा माल व जमीन ह्याच्या साहाय्यानें अधिक मूल्यवान जिनसा तयार करण्याचे धंदे शहरांतून अस्तित्वांत आल्यानें सहाजिकच तेथें क्षेत्रफळाच्या मानानें लोकसंख्या अधिक असते. उपयुक्तता किंवा मूल्य उपलब्ध करणें म्हणजे उत्पादन होय आणि शहरातील उत्पादक धंद्यात जमीनीचें किंबहुना सर्वच वस्तुमय पदार्थांचें प्रत्यक्ष उत्पादक-कार्य नाहींसे झाल्यानें निव्वळ क्षेत्रफळास आर्थिक महत्त्व फारसें उरत नाहीं. सर्व हिंदुस्थानाचा एकत्रित विचार केल्यास उद्योगधंदे व व्यापार ह्यांचें क्षेत्र अत्यंत मर्यादित असून जवळ जवळ तीनचतुर्थांश लोक मुख्यत: शेतजमीनीचें क्षेत्रफळ व तिची उत्पादकता ह्यांस अनुसरून निरनिराळ्या भागांत विभागलेले आहेत असें दिसतें; व ज्या भागांत शेतजमीनीचा विस्तार व सुपिकता कांहीं अंशी समाधानकारक आहे तेथें हजारापर्यंत लोक एका चौरस मैलावर पोसणें भाग पडतें. ह्यावरून अधिक जमीनीची लागवड करणें, सध्यां लागवडीत असलेल्या जमीनीचें उत्पन्न वाढविणें, इतर उत्पादक धंदे चालू करणें इत्यादि बाबतीत प्रगति घडून

आल्याशिवाय सध्यांहून अधिक संख्येचें हल्लीच्या राहणीच्या मानानें पोषण होणें किंवा लोकसंख्येंत प्रमाणशीर वाढ व रहाणीत सुधारणा ह्या गोष्टी घडून येणें शक्य नाही असें सहजच अनुमान निघतें. लागवडीस योग्य परंतु अजून शेतकीच्या उपयोगास न लावलेली जमीन फार थोडी शिल्लक आहे एवढेच नव्हे, तर आजही नांगरटींत असलेली पुष्कळ जमीन निकस व अनुत्पादक आहे. बहुतेक भागांतील शेतकीची व शेतकऱ्याची हलाखीची व असाहाय्य स्थिति पाहिली म्हणजे उद्योगधंदे व व्यापार ह्यांच्या अभावी येथील जमीनीवर वाढत्या लोकसंख्येचा कसा ताण पडत आहे व त्यामुळें एकंदर समाजाची राहाणी किती निकृष्ट प्रतीची होत आहे हें स्पष्ट दिसेल.

**३ खाण्याच्या पदार्थांचा पुरवठा व चढीच्या किंमती**-- विवक्षित वस्तूस असलेल्या मागणींत वाढ होऊन त्यामानानें तिचा पुरवठा कायम राहिल्यास तिची किंमत वाढते हें सामान्य तत्त्व प्रास्ताविक विवेचनांत स्पष्ट केलेंच आहे.[1] लोकसंख्या व उपजीविकेचीं साधनें ह्यांचें गुणोत्तर समाधानकारक आहे किंवा नाही ह्या प्रश्नाचें योग्य उत्तर मिळण्यास शेतकी व इतर धंदे ह्यांच्या एकंदर उत्पन्ना-विषयींची माहिती मिळविणें आवश्यक आहे परंतु हिंदुस्थानांतील बहुतेक लोकांस देशांत उत्पन्न केलेल्या धान्यावरच आपली गरज भागवावी लागत असल्यानें धान्याचा बाजारभाव व दर माणशीं उत्पन्न ह्या दोन बाबींसंबंधी आंकडे पुढील कोष्टकांत दिले आहेत त्यावरूनच उपयुक्त अनुमानें काढतां येतील. अपवादा-त्मक स्वरूपाचीं कांही वर्षे सोडून दिलीं तर आपणांस असें दिसून येते की, गेली २५-३० वर्षें खाण्याच्या धान्याचे भाव एकंदरीनें चढीचे आहेत. हिंदु-स्थानांतील व परदेशांतील गिऱ्हाइकांची वाढती मागणी, धान्याचा मर्यादित पुरवठा, उत्पादनाचा वाढता खर्च, चलनाच्या पुरवठ्यांत बेसुमार वाढ या सर्व कार-णाचा परिणाम होऊनच किंमतींचा चढउतार होतो हें खरें. तरी पंचवीसतीस वर्षे धान्याच्या बाजारभावांत एकसारखी वाढ होत राहणें ही गोष्ट देशांतील फार मोठ्या वर्गास एवढी जाचक व कष्टप्रद होते की सरकारासही तिचे अनिष्ट परिणाम भोगावे लागतात. कर्झन साहेबाच्या कारकीर्दींत खाण्याच्या धान्याच्या वाढत्या बाजारभावांची चौकशी करण्याकरितां मि. दत्त ह्या नांवाच्या एका उच्च अधि-काऱ्याची नेमणूक झाली होती. त्यांनीं आपल्या चौकशीवरून एक अनुमान असें काढलें की, येथील खाण्याच्या धान्याच्या पुरवठ्यांत होणाऱ्या वाढीचा दर लोक-संख्येच्या वाढीच्या दराहून कमी आहे; म्हणजे वाढत्या लोकसंख्येची आणि पाश्चात्य राष्ट्रांची येथील धान्यास असलेली मागणी तीव्रतर होत चालल्यानें व त्या मानानें येथील शेत जमीनीच्या विस्तारांत अगर एकंदर उत्पादकतेंत भर न पडल्या-

---

१ पानें २५-२८ पहा.

मुळें धान्याच्या उपलब्ध पुरवठ्याची सीमागत उपयुक्तता वाढून परराष्ट्रीय व अंतर्गत दोन्ही बाजारभाव चढीचे झाले. १८९४ पासून १९१२ पर्यंत लोकसंख्येचें शेतजमीनीशी व धान्याच्या पुरवठ्याशीं जें गुणोत्तर पडलें त्याविषयीं दत्त ह्यांनीं एकत्र केलेले पुढील आंकडे बोधप्रद आहेतः—

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|---|
| | १८९० ते १८९५ सालांची सरासरी. | १८९५ ते १९०० सालांची (१) शी शेंकडेवारी. | १९०० ते १९०५ सालांची (१) शी शेंकडेवारी. | १९०५ ते १९१० सालांची (१) शी शेंकडेवारी. | १९१०-११ ची (१) शी शेंकडेवारी. | १९११–१२ ची (१) शी शेंकडेवारी. |
| लोकसंख्या. | १०० | १०१·६ | १०३·७ | १०५·६ | १०७·८ | १०८·४ |
| लागवडीस आलेली जमीन | १०० | ९८· | १०३· | १०५ | १०८· | १०६· |
| खाण्याचें धान्य पेरलेली जमीन | १०० | ९६ | १०१ | १०२ | १०६ | १०२ |
| खाण्याच्या धान्याचें उत्पन्न | १०० | ९८ | १०५ | ९९ | ११३ | १०९· |

वरील आंकड्यांवरून असें स्पष्ट दिसून येईल कीं लोकसंख्येच्या वाढीमुळें खाण्याच्या धान्यास जी अधिक मागणी यावयाची तीही पूर्णपणें भागविण्याकरितां योग्य पुरवठा उपलब्ध होण्याची येथें मारामार आहे. त्यातच परदेशच्या मागणीची भर घातल्यास एकंदरीनें लोकसंख्येच्या वाढीच्या मानानें उपलब्ध असलेला धान्याचा पुरवठा फारच मर्यादित स्वरूपाचा आहे असें सहज अनुमान निघतें. वरील आंकडे विश्वसनीय नाहीत ह्या सबबीवर हिंदुस्थान सरकारनें हे अनुमान त्याज्य ठरविलें व एकंदरीनें लोकसंख्या आणि धान्याचा पुरवठा ही सारख्याच प्रमाणांत वाढत आहेत असा निष्कर्ष काढला. परंतु सरकारचें हें मत ग्राह्य मानलें तरीही सर्व लोकांच्या उपजीविकेस आवश्यक असलेल्या धान्यांचा पुरवठा विपुल व स्वस्त करण्याच्या बाबतीत येथें कांहीच सुधारणा झाली नाही ही गोष्ट निर्विवाद ठरते. देशांतील वहातुकीचीं साधनें सुधारल्यामुळें धान्याच्या पुरवठ्याच्या विभागणीत बदल घडून आला तरी एकंदर पुरवठा वृद्धिंगत होण्यास वहातुकीच्या साधनांचा प्रत्यक्षपणें कांहींच उपयोग झाला नाहीं; उलट, ज्यांच्या जवळ वाटेल तें धान्य भारी किंमतीस विकत घेण्याचें आर्थिक सामर्थ्य असतें अशा लोकांची मागणी अधिक परिणामकारक होऊं लागल्यानें धान्याच्या किंमती वाढल्या व कमी आर्थिक सामर्थ्य असलेल्या **गरीब वर्गास स्वस्ताईनें धान्य मिळेनासें झालें.** खाण्याचे व इतर पदार्थ तयार कर-

ण्यास हिंदी धान्यास परदेशाची मागणी फार जोरदार असल्यानें व ती मागणी खाण्याच्या धान्यापेक्षा इतर धान्याच्या व कापूस, ताग इत्यादि व्यापारी पिकांच्या बाबतींत विशेष तीव्र असल्यानें खाण्याच्या धान्याची लागवड मर्यादित होत जाऊन सर्व शेतकी जिनसांचे व विशेषतः खाण्याच्या धान्याचे भाव चढीचे राहतात. जमीनीतील पिकांची किंमत वाढल्यानें शेतकऱ्याची आर्थिक स्थिति सुधारते व थोडें धान्य विकून अधिक उपयुक्त वस्तू विकत घेणें त्यांस शक्य होतें, असा एक युक्तिवाद कधीं कधीं ऐकूं येतो परंतु एकंदर राष्ट्राच्या व विशेषतः देशांतील गरीब व बहुसंख्याक वर्गाच्या दृष्टीनें ही विचारसरणी फोल आहे असें म्हटलें पाहिजे. ज्यास खाण्याचें धान्य स्वतःच्या जमीनींतून मिळतें असे लोक बहुसंख्याक नाहींत. पुष्कळांस मोलमजूरी अगर रोजगार धंदा करून मिळणाऱ्या पैशांत उपजीविका करावयाची असल्यानें धान्याचे व इतर शेतकी पदार्थांचे भाव वाढल्यानें त्यांची कुचंबणा होऊन त्यांची राहणी खालावत जाते. जमीनीच्या मालकांसही चढीच्या किंमतींचा फायदा नेहमीच मिळतो असें नाहीं. व्यापारी, अडत्ये, दलाल इत्यादि मध्यस्थाचीच वाढत्या बाजारभावानें अधिक पोळी पिकते. जी गोष्ट व्यक्तिशः नागरिकाची तीच गोष्ट एकंदर हिंदुस्थानाची होय. येथील धान्य, ताग, कापूस इत्यादि पदार्थांस परकी राष्ट्रांची जोराची मागणी असल्यानें त्यांच्या किंमती भारी असतात व त्या वस्तू उत्पन्न करणारांस वाढती कमाई झाल्यानें एकंदर राष्ट्राचें परकी राष्ट्राकडून माल विकत घेण्याचें सामर्थ्य वाढतें; आणि परकी मालाचे भाव मध्यंतरी न वाढल्यास ह्या वाढाव्याच्या उत्पन्नाचा त्यांजकडून अधिक माल विकत घेण्यास उपयोग करून घेता येतो, हे स्थूलमानानें खरें आहे. परंतु परकी व्यापाराचें खाण्याच्या धान्याची लागवड मर्यादित होण्यांत व येथील कारागिरीचे धंदे बुडण्यांत पर्यवसान झाल्यानें एकंदर समाजाची आर्थिक स्थिति एवढी खालावलेली आहे कीं, खाण्याचे पदार्थ मिळविण्यास पुरेसे त्राणही त्याच्याजवळ नाहीं; मग परदेशी वस्तु विकत घेण्याची गोष्टच नको! हिंदुस्थानांत प्रतिवर्षी सरासरीनें संपत्तीचें उत्पादन किती होतें, त्यांत शेतकी पदार्थांचा व खाण्याच्या धान्याचा भाग किती असतो व दर माणशीं सालीना निव्वळ उत्पन्न किती पडतें, ह्याविषयीं आंकड्यांच्या साहाय्यानें पुढें सविस्तर विवेचन केलें आहे, त्यावरून हिंदुस्थानांत लोकसंख्येच्या वाढीच्या मानानें संपत्तीचें उत्पादन असमाधानकारक आहे हीच गोष्ट स्पष्ट होईल. दरवर्षी हिंदुस्थानांतून क्रोडो रुपये किंमतीचें धान्य परदेशी पाठविलें जात असतां हिंदुस्थानांतील लक्षावधि लोकांस पुरेसें अन्न मिळूं नये ह्याचें अनेकांस सखेदाश्चर्य वाटतें; उलट, दुसरे कित्येक लोक परदेशी पाठविलें जाणारें धान्य हा येथील लोकांच्या गरजा पूर्णपणे भागल्याचें चिन्हच आहे असें समजतात. परंतु ज्याप्रमाणें स्वतःच्या शेतांतील धान्य कर, मजूरी वगैरे देण्याकरितां किंवा इतर आवश्यक व उपयुक्त जिन्नस विकत

घेण्याकरितां विकावें लागून वर्षांतून अनेक महिने उपासमार सोसणाऱ्या शेतकऱ्याची धान्यविक्री म्हणजे त्याच्या गरजा भागविल्याचें अचूक गमक समजतां येणार नाही, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील कांही उत्पादक व व्यापारी परदेशच्या गिऱ्हाइकांस भारी किंमतीनें धान्य विकतात एवढ्यावरून सर्व हिंदी लोकांच्या खाण्याच्या धान्याविषयीच्या गरजा भागल्या असें अनुमान काढतां येणार नाही. उलट, धान्याचा एकंदर व अंतर्गत बाजारांतील पुरवठा मागणीच्या मानानें मर्यादित झाल्यानें किंमती एवढ्या वाढतात की सामान्य हिंदी माणसास पुरेसें धान्य विकत घेणें अशक्य होऊन जातें. लोकसंख्या व संपत्ति ह्यांच्यांतील गुणोत्तर समाधानकारक आहे किंवा नाहीं हे ठरविण्यास दर माणशी सरासरी उत्पन्न किती व आवश्यक वस्तूंचे बाजारभाव काय ह्यांची माहिती जरूर करून घेतली पाहिजे.

**४ लोकसंख्या व उपजीविकेचीं साधनें**—देशांतील सर्व लोकांची मिळून एकंदर संपत्ति अगर त्यांचें वार्षिक उत्पन्न ह्यांबद्दलचे आंकडे जमा करून त्याचें निश्चित परिमाण ठरविणें सर्व राष्ट्रांत कठीण असतें. त्यांतल्या त्यांत हिंदुस्थानांतील मुख्य धंदा शेतकीचा असल्यानें व ह्या आणि इतर धंद्यांबद्दल विश्वसनीय आकडे मिळणें दुर्घट असल्यानें हिंदी लोकांच्या एकंदर उत्पन्नाबद्दल निश्चित अनुमान काढणें दुरापास्त झालें आहे. पूर्वी कर्झन साहेबांच्या कारकीर्दींत येथें वारंवार पडणाऱ्या दुष्काळांची व एकंदर राष्ट्राच्या दारिद्र्याची जबाबदारी सरकारवर आहे असा आरोप केला जात असल्यामुळें व अलीकडे करांचें उत्पन्न वाढविण्याच्या सरकारी धोरणामुळें हिंदुस्थानचें वार्षिक उत्पन्न किती आहे व समाजाच्या निरनिराळ्या वर्गांचें आर्थिक सामर्थ्य कितपत आहे हे प्रश्न सरकारीरीत्या सोडविण्याचे कांहीं प्रयत्न झालेले आहेत. कित्येक अर्थशास्त्रज्ञांनींही अलीकडे निरनिराळ्या मार्गांनीं खेडीं, जिल्हे व एकंदर देश ह्यांच्या वार्षिक उत्पन्नाचे आंकडे काढण्याचा प्रयत्न केलेला आहे. हिंदुस्थान सरकारचे शेतकी सल्लागार मि. मॅकेना ह्यांनीं येथील शेतीचें वार्षिक उत्पन्न दीड हजार कोट (१५०० कोट) रुपये आहे असा अंदाज केला होता. ह्या अंदाजाप्रमाणें निव्वळ शेतीचें दर माणशीं वार्षिक उत्पन्न ४५ रुपये पडतें आणि ह्या आंकड्यांत शेतीखेरीज इतर धंद्यांच्या मिळकतीची भर टाकल्यास प्रतिवर्षी दर माणशीं उत्पन्न सुमारें ७० रुपये भरतें. दादाभाई नौरोजी ह्यांच्या मतें त्यांच्या वेळीं म्हणजे सुमारें चाळीस वर्षांपूर्वी येथील लोकांचें वार्षिक उत्पन्न माणशीं वीस रुपये इतकें होतें, तर प्रत्यक्ष लॉर्ड कर्झन ह्यांचें मत हा आंकडा ३० रुपये असावा असें होतें. गेल्या पंचवीस वर्षांत युद्ध, दुष्काळ, चलनविषयक घडामोडी इत्यादि कारणांनीं किंमतींची जी बेसुमार वाढ झाली आहे ती ध्यानांत ठेवूनच वरील आंकडे वाचले पाहिजेत. म्हणजे किंमतींत अडीच पट वाढ झाली असल्यास ते आंकडे तितक्या प्रमाणांत वाढवूनच त्यांची अलीकडील अनुमानांशीं तुलना

केली पाहिजे. १८८० व १८९८ ह्या सालांतलि दुष्काळकमिशनांनीं लोकसंख्या खाण्याच्या धान्याची पेरणी केलेल्या जमीनीचें क्षेत्रफळ, तिच्यांत उत्पन्न होणाऱ्या धान्याचे परिमाण व हिंदी लोकांस स्वतःच्या गरजा भागविण्यास लागणारें धान्य, ह्यासंबंधी आकडेवार माहिती मिळवून असा निष्कर्ष काढला की, '१८८० मध्यें धान्याचें एकंदर उत्पन्न व हिंदुस्थानांतलि खप ह्यांमध्यें जेवढा फरक होता त्यापेक्षा तो १८९८ मध्यें अधिक नव्हता हे निर्विवाद आहे, परंतु एकंदर उत्पन्न येथील खपाहून काहीं तरी जास्त आहे ह्यांत मात्र मुळींच शंका नाही.' ह्याच आंकड्यांचा आधार घेऊन सन १९०१ मध्यें लॉर्ड कर्झनसाहेबांनी हिंदवासीयांच्या सरासरी वार्षिक उत्पन्नाबद्दल पुढील अनुमान बांधलें. '१८८० सालीं हिंदुस्थानांत १९ कोटी ४० लक्ष एकर जमीन लागवडीस होती ती १८९८ साली २१ कोटी ७० लक्ष एकर इतकी वाढली, म्हणजे इतक्या काळांत लोकसंख्येची जी वाढ झाली त्याच प्रमाणात लागवडीस असलेली जमीनही वाढली. परंतु १८८० सालीं दर एकरी उत्पन्नाचें सरासरी प्रमाण ७३० रत्तल धान्य इतकें होते ते शेती सुधारल्यामुळें व पाणीपुरवठा वाढल्यामुळें १८९८ साली ८४० रत्तल झालें. म्हणून १८८० साली दर माणशी शेतीचें उत्पन्न १८ रुपये होतें ते १८९८ मध्यें २० रु. झाले. शेतीखेरिज इतर धंद्यांच्या उत्पन्नांतही स्थूल मानानें एवढीच वाढ झाली असें धरलें तर १८८० मध्यें एकंदर उत्पन्नाची सरासरी २७ रुपये होती ती १८९७ मध्यें तीस रुपये झाली.' म्हणजे सुमार वीस वर्षांत हिंदी राष्ट्राचें दर माणशीं वार्षिक उत्पन्न चांगलें तीन रुपयांनी वाढलें!

सरकारी कमिशननें व स्वतः व्हाइसरॉय ह्यांनी निर्दिष्ट केलेली ही परिस्थिति विशेष आशाजनक होती असें नाही. परंतु आशेचा एवढासा किरणही त्या वेळच्या माहितींतून काढण्यास दर एकरी उत्पन्नाची सरासरी अवास्तव धरण्याचा त्यांजवर प्रसंग आला आहे. गेल्या चाळीस वर्षांतील पेरलेल्या खाण्याच्या धान्याचे सरासरीचे आंकडे घेऊन त्यांची एकंदर लोकसंख्येच्या व एकदर उत्पन्नाच्या आंकड्याशी पुढील कोष्टकांत तुलना केली आहे. पाऊसपाणी, जमीनीची सुपीकता, आकडे मिळविण्याच्या पद्धतीतील फेरफार इत्यादि कारणांमुळें निरनिराळ्या वेळचे आकडे एकत्र करून त्यांची तुलना करणे व त्यावरून विश्वसनीय अनुमानें काढण्याचा प्रयत्न करणें हें कठिण असतें हें खरें. तरी शक्य तितक्या कसोशीनें तयार केलेल्या पुढील आंकड्यांवरून लोकसंख्या व खाण्याचीं धान्यें ह्यांच्या परस्पर प्रमाणाचें स्थूल पण यथार्थ स्वरूप वाचकांच्या ध्यानांत येईल.

## ब्रिटिश हिंदुस्थानांतील खाण्याच्या पिकांचें उत्पन्न.

| वर्ष | खाण्याचीं पिकें पेरलेल्या जमीनीचें क्षेत्रफळ (लक्ष एकर) | एकंदर उत्पन्न लक्ष टन | दर एकरी उत्पन्न (रत्तल) | दर माणशीं उत्पन्न (रत्तल) | एकंदर लोकसंख्या (लक्ष) |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| १८७८ | १६६२ | ५१५ | ६८८ | ६३४ | १८१० |
| १८९८ | १८०४ | ५६० } * ६८० } | ६९७ } * ८३६ } | ५१४ } * ७०८ } | २१५० |
| १९०२–३ | १९२५ | ६०० | ७०० | ५८० | २३२० |
| १९०८–९ | २०६४ | ५५५ | ७१५ | ६१६ | २४०० |
| १९१२–१३ ते १९१६–१७ चीं सरासरी | २१३० | ७१३ | ७५० | ६४२ | २४९० |
| १९१७–१८ ते १९२१–२२ चे सरासरी आंकडे | २०६० | ७३५ | ८०० | ६६७ | २४७० |
| १९२१--२२ ते १९२५–२६ चे सरासरी आंकडे | २१२० | ७६० | ८०० | ६८४ | २४८० |

हिंदुस्थानांतल्या शेतजमीनीच्या एकंदर उत्पन्नाबद्दल तयार केलेल वरील कोष्टकांतील आंकडे एकदरींनें वाढत्या प्रमाणावर धरले असल्याकारणानें येथील लोकांच्य सरासरी उत्पन्नाबद्दल त्यांजवरून निघणारें अनुमान वाजवीपेक्षां अधिक प्रतिकूल असणार नाही असें म्हणण्यास हरकत नाही. पेरलेल्या जमीनींतून एकंदर उत्पन्न किती निघालें हें ठरविण्याचे दोन मुख्य मार्ग असतात. पहिला मार्ग म्हणजे प्रत्येक शेतजमीनीची स्वतंत्र माहिती मिळवून ती एकत्र करणें हा होय. परंतु हा मार्ग सर्वच देशांत विशेष त्रासाचा असतो आणि हिंदुस्थानासारख्या मोठ्या, लहान शेतकऱ्यांच्या आणि घरगुती लागवडीच्या देशांत तर तो अशक्यप्रायच समजला पाहिजे. निरनिराळ्या प्रकारच्या जमीनींचे व पिकांचे नमुने घेऊन त्यांचें दर एकरीं काय प्रमाण पडतें हे सरासरीनें ठरवून नंतर प्रत्येक प्रकारच्या शेतजमीनीच्या एकंदर क्षेत्रफळास त्याच्या एकरीप्रमाणानें गुणणें हा एकंदर शेतीचें उत्पन्न मोजण्याचा दुसरा मार्ग होय. हिंदुस्थानांत सहाजिकच ह्या दुसऱ्या मार्गाचें अवलंबन केलें जातें. तरी एकरी प्रमाण

* हे आंकडे १८९८ सालच्या दुष्काळकमिशनच्या रिपोर्टावरून घेतले आहेत. जास्त मोठे आंकडे कमिशनला स्वतःस मान्य होते, तरी त्यांच्या बिनचुकपणाबद्दल त्यांसच खात्री नव्हती. वरील तिन्ही रकान्यांतील त्या वर्षाचे कमी आंकडे दुसऱ्या तज्ज्ञांनीं तयार केलेले असून ते सर्वस्वी चूक आहेत असें कमिशनला साधार म्हणतां येत नव्हते.

ठरविण्याच्या पद्धतींत दोष असल्यानें आणि पाऊस, पाणीपुरवठा, जमिनीचा कस, बी व आउतें मिळण्याच्या सोयी इत्यादि बाबतींत निरनिराळ्या ठिकाणांची व काळांची परिस्थिति पुष्कळच भिन्न असल्यानें मुद्दाम प्रयोगादाखल लागवड करून सरासरीनें ठरविलेलें प्रमाण जवळ जवळ नेहमींच वाजवीपेक्षां फार अधिक ठरतें. उदाहरणार्थ, मुंबई इलाख्यांतील १९१८ ते १९२१ ह्या तीन सालांत शेतजमीन व शेतीचें उत्पन्न ह्यांच्यांतील प्रतिवार्षिक फेरबदलांत जी असमानता दिसून येते ती पहा.

**मुंबई इलाख्यांतील खाण्याचीं धान्यें पेरलेली जमीन व तिच्यांतील एकंदर उत्पन्न ह्यांबद्दलचे आंकडे.**

| वर्ष | क्षेत्रफळ ( एकर ) | उत्पन्न ( टन ) |
|---|---|---|
| १९१८–१९ | १,८०,५०,४८५ | २६,७०,७३५ |
| १९१९–२० | २,३२,५०,११८ | ५८,७४,७४२ |
| १९२०–२१ | २,०८,५२,६८७ | ३७,३५,९५४ |
| वार्षिक सरासरी | २,०७ लक्ष एकर | ४० लक्ष टन. |

त्याचप्रमाणें १९२४–२५ व १९२५–२६ ह्या सालांतील आंकड्यांची तुलना केल्यास असें दिसून येतें कीं, १९२५–२६ सालीं खाण्याचें धान्य पेरलेली जमीन १९२४–२५ सालापेक्षां शेंकडा ३.४ नी कमी होती तरी उत्पन्नांत मात्र शेंकडा १७.१ एवढी तूट आली. ह्यावरून लागवड केलेल्या भागांतही एकंदर उत्पन्न सरासरीपेक्षां कमी निघालें हें सिद्ध होतें.

**५ धान्याचा अपुरा पुरवठा**—ज्या भागांत शेतकऱ्यांस कालव्याचें पाणी मिळण्याची सोय असते त्यांस पाण्याचा पुरवठा कमजास्त झाल्यानें अगर पाऊस हंगामशीर न पडल्यानें होणाऱ्या गैरसोयी विशेषशा सोसाव्या लागत नाहींत. परंतु पाणीपुरवठ्याच्या कृत्रिम व विश्वसनीय सोयी असलेल्या शेतजमीनींचें एकंदर लागवड केलेल्या क्षेत्रफळाशी फार तर शेंकडा २५ एवढेंच प्रमाण असून उरलेल्या तीन चतुर्थांश शेतजमीनींचें उत्पन्न पावसाचें मान व हंगाम ह्यांवरच अवलंबून असतें आणि म्हणून सरासरीचा कोणताही आंकडा धरला तरी खरें दर एकरीं उत्पन्न त्याहून कमी ठरण्याचीच अधिक भीति असते. शिवाय लोकसंख्येचें जमीनीच्या उत्पन्नाशीं काय प्रमाण पडतें हें ठरवितांना सरासरीनें प्रत्येक माणसास खाण्याचें धान्य किती वांट्यास येतें हें पहावयाचें असल्यानें जमीनींतील एकंदर उत्पन्नांतून बियांकरितां काढून ठेवलेलें, येथून परदेशांत पाठविलें जाणारें, व पाळीव आणि इतर पशुपक्ष्यांच्या

भक्ष्यस्थानीं पडणारें धान्य वजा करूनच तें ठरविलें पाहिजे. दरवर्षी हिंदुस्थानांतून ४० लक्ष टन धान्य बाहेर देशीं जात असतें व निदान तेवढ्याच धान्याचा खर्च बिंयाकरितां होत असतो. गुरें-ढोरें, पशु-पक्षी व किडामुंगी ह्यांच्या नांवें एकंदर उत्पन्नाचा एक दशांशभाग लिहिण्यास मुळींच हरकत नाहीं. तसेंच, साधारण पांच वर्षांतून एकदां तरी प्रत्येक जिराइती भागांत पूर्ण दुष्काळ पडतो त्याबद्दलही शेंकडा दहा इतकी जळ खर्चीं घातली पाहिजे. उलटपक्षीं, परदेशांतून कांहीं धान्य हिंदुस्थानांत आणलें जात असल्यास तेंही सरासरी काढतांना जमेस धरलें पाहिजे. परंतु खाण्याच्या धान्याची आयात हिंदुस्थानांत फारच अल्प प्रमाणांत व क्वचित होत असल्यानें ह्या आंकड्यास व्यावहारिक महत्त्व विशेषसें नाहीं. वरीलप्रमाणें सर्व जरूर तेवढे आंकडे वजा घालून शिल्लक राहिलेल्या पुरवठ्यास ( ४१ लाख टनांस ) एकंदर लोकसंख्येनें भागल्यास दर माणशीं खाण्यास सालीना ३७२ रत्तल धान्य उरतें. लहान मोठ्या माणसास सरासरीनें दररोज १⅞ रत्तल धान्य लागतें असें धरल्यास एकंदर देशाला निदान ५० लाख टन धान्याची जरूर आहे; म्हणजे सामान्य प्रतीनें सर्व लोकांचा उदरनिर्वाह होण्यास देखील सुमारें नऊलाख टन अधिक धान्याची आवश्यकता आहे असें सिद्ध होतें. ह्या तुटवड्याचा खरा ताण गोरगरिबांवर पडून त्यांची अर्धवट उपासमार होते असें म्हणणें वरील आंकड्यांस धरून होईल. सन १८८१ पासून १९११ पर्यंत येथील लोकसंख्या पांच कोटींनीं वाढली. जपानची एकंदर लोकसंख्या पांच कोटी आहे. म्हणजे जपानच्या एकंदर आर्थिक सामर्थ्याइतकी वरील तीस वर्षांत हिंदुस्थानाच्या उत्पादकतेंत भर पडली असती तरीही लोकांची सरासरी संपत्ति फारशी वाढली असती असें नाहीं. येथील एकंदर संपत्तींत अगर खाण्याच्या धान्याच्या पुरवठ्यांत त्यामानानें फारच कमी भर पडत आहे हें उघड असून सरासरी संपत्तीही समाधानकारक नाहीं.

**६ एकंदर उत्पादन**—शेतीच्या धंद्यापासून केवळ खाण्याचें धान्यच निघत नसून इतर धान्यें व कापूस, ताग इत्यादि उपयुक्त जिन्नस पैदा होतात. शिवाय, जमीनीची लागवड करणें हा देशांतील एकच धंदा नसून उद्योगधंदे, व्यापार व इतरही उत्पादक व्यवसाय ह्यांच्या साहाय्यानें अनेक लोक संपत्तीचें, म्हणजे गरजा भागविण्याच्या साधनांचें, उत्पादन करीत असतात. देशाच्या एकंदर संपत्तीची मोजदाद करतांना ह्या सर्व धंद्यांच्या उत्पादनाचे आंकडे एकत्र केले पाहिजेत. बाजारभाव, पाऊसपाणी, आंकडे गोळा करण्याच्या पद्धतीतील दोष वगैरे सर्व गोष्टींबद्दल योग्य ते फेरफार करूनच पुढील आंकडे वाचले पाहिजेत हें उघड आहे.

## ब्रिटिश हिंदुस्थानांतील शेतीचें उत्पन्न.

( १९२१–२२ )

### ( १ ) खाण्याचीं धान्यें.

| पिकाचें नांव. | जमीनीचें क्षेत्र-फळ लक्ष एकर | पिकाचें परि-माण लक्ष टन | किमत कोट रुपये |
|---|---|---|---|
| तांदूळ | ८०० | ३२० | ३६० |
| गहूं | २२० | ८० | १४८ |
| सातू | ७५ | ३० | ३८ |
| ज्वारी | २४० | ८० | १०२ |
| बाजरी | १५० | ३० | ४७ |
| रागी | ४० | १७ | २४ |
| मेझ ( मका ) | ६० | २७ | ३८ |
| हरबरा | १५० | ४० | ६३ |
| खाण्याचीं इतर धान्यें व डाळी | ३०० | १०० | ११२ |
| खाण्याची एकंदर धान्यें | २०३५ | ७२४ | ९३२ |
| ऊंस | २७ | ३० | ८० |
| खाण्याची इतर पिकें | ८० | २५ | ४० |
| खाण्याचीं धान्यें व इतर पिकें मिळून एकंदर | २१४२ | ७८० | १०५२ |

### ( २ ) खाण्याच्या धान्याखेरीज इतर पिकें.

| पिकाचें नांव | लागवडीचें क्षेत्रफळ लक्ष एकर | पिकाचें परिमाण लक्ष टन | पिकाची किंमत कोट रुपये |
|---|---|---|---|
| गळिताचीं धान्यें | १४० | २० | ७० |
| कापूस | १४० | ८ | ८० |
| ताग | २५ | ७ | २६ |
| इतर पिकें | १२० | ४० | ६० |
| एकूण बेरीज | २५६० | ८९० | १२८८ |

पाऊसपाणी, आंकडे गोळा करण्याच्या पद्धतीचे दोष वगैरेबद्दल वरील आंकड्यांत जरूर तो फरक केल्यास शेतीचें एकंदर उत्पन्न ७०० लक्ष टन व त्याची किंमत १००० कोट रुपये आहे असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाही. दूध,

गुरें, गवत, लोंकर, कांतडी वगैरे जे पदार्थ प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे जमीनीपासून मिळतात त्यांची अधिकांत अधिक किंमत म्हणून ४०० कोटी रुपये धरल्यास जमीनीच्या उत्पन्नाची एकंदर बेरीज १४०० कोट रुपये होईल. ह्या रकमेस एकंदर लोकसंख्येनें म्हणजे २५ कोटींनी भागले तर दर माणशीं प्रतिवर्षी ५६ रुपये एवढे उत्पन्न जमीनीपासून मिळतें असा निष्कर्ष निघतो. शेतीखेरीज इतर धंद्यापासून शेतीच्या उत्पन्नाच्या निम्यानें एकंदर उत्पन्न झालें असें धरलें तर देशाच्या एकंदर उत्पन्नाचा आंकडा २१०० कोट रुपये व दर माणशी सरासरी ८४ रुपये निघेल. रुपयांचें उपयुक्त वस्तूंत रूपांतर करतांना बाजारभाव ध्यानांत घेणें आवश्यक आहे. १९२१–२२ सालचे बाजारभाव १९१३-१४ च्या मानानें शेंकडा १७६ होते ते १९२८ सालीं शेंकडा १४८ झाले. म्हणजे त्या प्रमाणात १९२१–२२ चे रुपयाचे आंकडे बदलूनच हल्लींची परिस्थिती अजमावली पाहिजे.

**७ एकंदर उत्पन्नाबद्दल इतर कांहीं अनुमानें**––सरासरी उत्पन्नाबद्दल वर जें अनुमान काढण्यांत आलें आहे ते सरकारच्या मुलकी अधिकाऱ्यांच्या अहवालांवरून व प्रत्यक्ष अनुभवावरून सिद्ध होण्यासारखें आहे. परंतु इतर तज्ज्ञांनीं केलेल्या अजमासाशी तुलना करूनही वरील आंकडे प्रायः बरोबर असल्याचें दाखवितां येईल. कर्झन साहेबांनी त्यांच्या वेळीं शेतीचें दर माणशी उत्पन्न २० रुपये आहे असें ठरविलें होतें. १९२१ सालचे बाजारभाव १९०३ च्या भावापेक्षां जवळ जवळ अडीच पटींनीं जास्त होते हें पाहिल्यास वर काढलेले ५६ रुपये हे अनुमान वाजवी असलेलें दिसेल. दक्षिण महाराष्ट्रांतलि जिराइती गांवांत एकरी उत्पादन ३५ रुपयांच्या वर नाहीं हें डॉक्टर मॅन ह्यांचें मतही प्रस्तुत स्थळी ग्राह्य मानलेल्या सरासरीस धरूनच आहे. बंगाल्यांतील फरीदपूर जिल्ह्याची पाहणी करून मि. जॅक ह्यानी तेथील लोकांचें सरासरी उत्पन्न ५२ रुपये आहे असें ठरविलें व डॉ. स्लेटर ह्यानी मद्रास इलाख्यांतील लोकांचें वार्षिक उत्पन्न सरासरीनें ७८ रुपये आहे असा अजमास केला आहे. मद्रास सरकारच्या शेतकीखात्यानें नुसत्या शेती उत्पन्नाची सरासरी ७३ रुपये आहे असें अनुमान काढलें आहे, परंतु एकरी उत्पन्न व बाजारभाव ह्या दोन्हीचे आंकडे सढळ घेतल्यानेंच हा आंकडा एवढा फुगला आहे असें दिसतें. शेतीच्या एकंदर उत्पन्नाचें परिमाण ८९० लक्ष टन आहे व त्याची एकंदर किंमत १२८८ कोटी रुपये आहे असें प्रस्तुतस्थळीं मान्य करण्यांत आलें आहे. मि. डुबे ह्याच्या मतें उत्पन्नाचा आंकडा सुमारें ६९० लक्ष टन असावा, व डॉ. बाळकृष्ण ह्यांचें १९११ सालच्या आंकड्यावरून काढलेलें एकंदर उत्पन्नाच्या किंमतीचें अनुमान १०७७ कोटी रुपये आहे. प्रो. फिन्डले शिरास ह्यांचें मत असें आहे कीं, १९२०–२१ सालीं शेती उत्पन्नाची एकंदर किंमत १७१५ कोटी रुपये होती व १९२१–२२ मध्ये ती १९८३ कोटी झाली, म्हणजे निव्वळ शेती उत्पन्नाची वार्षिक सरासरी पहिल्या वर्षी माणशी

८४ रुपये व दुसऱ्या वर्षी ९७ रुपये होती. शेतीखेरीज इतर धंद्यांचें एकंदर उत्पन्न दोन्ही वर्षी ८८३ कोट रुपये धरण्यात आलें आहे. म्हणजे शिरास ह्यांच्या मतें एकंदर उत्पन्नाची दर माणशी १९२१ सालीं १२७ रुपये व १९२२ सालीं १३४ रुपये सरासरी होती. निरनिराळ्या भागांत उत्पादनाची परिस्थिती किती भिन्न असते ह्याची जाणीव वरील आंकड्यांत दिसून येत नाहीं. तसेंच, एका वर्षाच्या अवधीत उत्पन्नाचा आंकडा सुमारें पावणे तीनशें कोटींनी बदलला ह्यावरून प्रि शिरास ह्यांच्या आंकड्यांत किती बदल करणें जरूर आहे हे दिसून येईल. असें केल्यास त्यांचा सरासरीचा आंकडा व प्रस्तुतस्थळीं ग्राह्य धरलेलें अनुमान ह्यांच्यामध्यें फारशी तफावत पडणार नाहीं. बंगाल इलाख्यांतील लोकांचें निव्वळ शेतीचें उत्पन्न माणशीं ५७ रुपये आहे हे प्रो. चौधरी ह्यांचें व राजशाही जिल्ह्यांत हा आंकडा ६० रुपये आहे हे मि. नेल्सन ह्यांचें मत येथें ग्राह्य मानलेल्या ५६ रुपये ह्या आंकड्याशी जुळतें आहे. कर्झनसाहेबाच्या कारकीर्दीपासून आजपर्यंत बाजारभावांत जी वाढ झाली आहे ती ध्यानांत घेतल्यास आपणांस असें दिसेल कीं, गेल्या पंचवीस वर्षांत लोकसंख्येची जेवढी वाढ झाली त्याच प्रमाणांत खाण्याचीं धान्यें व एकंदर संपत्ति ह्यामध्यें भर पडत चालली. म्हणजे राहणीचें मान एकदरीनें कायमच राहिलें, त्यांत कांहीं सुधारणा झाली नाहीं. विवक्षित धंदा अगर वर्ग ह्यांच्या उत्पन्नांत अगर राहणींत वाढ झाली असल्यास इतर धंदे व वर्ग ह्यांची स्थिति खालावली आणि एकंदर राष्ट्राचें सरासरीचें उत्पन्न व राहणीचें मान मात्र होतें तेंच राहिलें.

**८ दुष्काळ**—खाण्याच्या धान्याच्या पुरवठ्यासंबंधीं विचार करतांच देशाच्या निरनिराळ्या भागांत वारंवार पडणाऱ्या दुष्काळाचें भेसूर चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. विवक्षित भागांत खाण्याच्या धान्याचा पुरवठा व त्यास असलेली मागणी ह्यांची जी घडी बसलेली असते ती एकदम बिघडून मागणीच्या मानानें पुरवठा विशेष मर्यादित होणें हें दुष्काळाचें प्रमुख स्वरूप होय. हिंदुस्थान देश एवढा मोठा आहे कीं, त्याच्या सर्वच भागांत एकदम असा दुष्काळ फारच क्वचित पडतो. परंतु वहातुकीचीं साधनें उपलब्ध नसल्यास किंवा दुष्काळग्रस्त लोकांजवळ धान्य विकत घेण्याचें आर्थिक सामर्थ्य नसल्यास इतर भागांतील धान्याच्या पुरवठ्याचा दुष्काळनिवारणास उपयोग होणें कठीण असतें. अलीकडे आगगाड्या, रस्ते वगैरे साधनें बरींच सुधारलीं असल्यानें दुष्काळांची तीव्रता कमी झाली आहे. परंतु शेतकीच्या धंद्याच्या अनुत्पादकतेमुळें व इतर धंद्यांच्या मर्यादित क्षेत्रामुळें शेतकरी व सामान्य लोक हे दुष्काळाचा प्रतिबंध व निवारण स्वावलंबनानें करण्यास सारखेच असमर्थ असतात. सर्व देशांत किंवा देशाच्या फार मोठ्या भागांत पिकें बुडालीं तर परदेशीं जाणाऱ्या धान्यास ओहोटी लागून उलट धान्याची आयात होण्यास प्रारंभ होतो असा अलीकडील अनुभव आहे, त्यावरूनही शेतीची सुधारणा व इतर धंद्यांचें संवर्धन ह्यांच्या

साहाय्यानें येथील लोकांचें क्रयसामर्थ्य वाढविल्यास दुष्काळ समूळ नाहींसे झाले नाहींत तरी त्याची भीषणता नाहींशी होईल हे दिसून येईल. योग्य प्रमाणांत व योग्य वेळीं पाऊस पडणें न पडणें ही मानवी सामर्थ्याच्या कक्षेपलीकडील गोष्ट आहे असेंच धरून चाललें पाहिजे व जेथें अशी नैसर्गिक असहकारिता होईल तेथें शेतीच्या उत्पन्नांत थोडी फार तूट येणारच. परंतु कालवे व पाटबंधारे बांधून अगर जेथें महापूर येण्याचा संभव असतो तेथें पाणीवाहून जाण्याचे मार्ग करून देऊन पर्जन्याच्या लहरीपणापासून उद्भवणारे बरेच अनर्थ टाळतां येतील. हिंदुस्थानातील सरकाराचे ह्या दृष्टीनें अनेक प्रयत्न चालले असून त्यांचा इष्ट परिणामही दिसून येत आहे. परंतु दुष्काळप्रतिबंधाचा दुसरा एक महत्त्वाचा मार्ग आहे त्याकडे मात्र अजून द्यावें तितकें लक्ष्य दिलें जात नाही.

पाऊसपाण्यावर अवलंबून असलेल्या शेतकीच्या धंद्यावर हिंदुस्थानांतील जवळ जवळ तीन चतुर्थांश लोकांची उपजीविका चालत आहे आणि म्हणूनच दुष्काळ पडल्याबरोबर सर्व लोकांची आर्थिक स्थिति हलाखीची होऊन जाते. ज्या धंद्यांस पाऊसपाण्याच्या तुटवड्याची प्रत्यक्षपणें बाधा होत नाही ते उत्पादक व व्यापारी धंदे येथे ज्या प्रमाणात अधिकाधिक निघूं लागतलि त्या मानानें दुष्काळानें ग्रस्त होणाऱ्या लोकांची संख्या कमी होत जाऊन एकंदर लोकांचें आर्थिक सामर्थ्य वाढेल. मग दुष्काळ पडल्यास इतर धंद्यांत हंगामी काम मिळण्याच्या व धान्याचा नियमित पुरवठा होण्याच्या सोयी उपलब्ध झाल्यानें राष्ट्राच्या औद्योगिक घटनेस दुष्काळामुळें सोसावे लागणारे नुकसान व धक्के कमी होतील. आजही दुष्काळ पडल्यास शहरगांवीं जाऊन अनेक शेतकरी आपला कसा तरी गुजारा करतात ह्यावरून वरील उपायाची यथार्थता दिसून येईल. येथील शेती जिन्नसास परदेशची मागणी वाढती असल्यानें त्यांचे भाव वाढून शेतकऱ्यांची आर्थिक स्थिति कांहींशीं सुधारली आहे व त्यामुळे दुष्काळास तोंड देण्याचें त्यांस अधिक सामर्थ्य प्राप्त होत आहे हे अल्पांशी खरें आहे. परंतु परदेशच्या ह्या व्यापाराचा शेतकऱ्यांस फारच थोडा फायदा मिळत असून ही पिकेंही काहीं थोडेच शेतकरीच काढतात. शिवाय, दुष्काळी वर्षांत त्याचें उत्पन्नही बुडण्याची भीति असतेच. त्यापेक्षां हे कच्चे जिन्नस येथेंच उपयोगास आणून त्याचे तयार जिन्नस करून विकण्याचे धंदे वाढून ते भरभराटीस आल्यास जमीनीवरील एकांगी अवलंबन कमी होऊन एकंदरीनें राष्ट्राचें खरें आर्थिक सामर्थ्य वाढेल. कालव्यांनीं जसा पाणीपुरवठा तसेंच जरूर तेथें सहकारी पतपेढ्यांच्या द्वारा द्रव्यसाहाय्य करणेंही आवश्यक आहे. विशेषतः सुबत्तेच्या वर्षांतील धान्य दुष्काळाप्रीत्यर्थ राखून ठेवण्याची पद्धत मोडल्यामुळे तसे निधी पुन्हां सुरू करण्याचे किंवा धान्य विकत घेण्यास द्रव्यबळ उपलब्ध करण्याचे नव्या दिशेनें प्रयत्न होणें जरूर आहे. १८८० सालच्या दुष्काळकमिशनानें

स्पष्टपणें दाखविलेलें सरकारचें ह्या बाबतींतील कर्तव्य अजूनही पार पाडण्याचा मनापासून प्रयत्न होत नाही. शेतीखेरीज इतर सर्व धंद्यांची प्रत्यक्ष उत्तेजन व मदत देऊन प्रगति घडवून आणणें हें शेतीची स्थिति सुधारण्यास व दुष्काळ निवारणास सर्वथैव आवश्यक आहे हें सत्य सर्वमान्य झालें असूनही गेल्या ४० वर्षांत ह्या बाबतींत सरकारकडून म्हणण्यासारखी कामगिरी झालेली नाही. गुरांच्या चाऱ्याचा पुरवठा राखून ठेवण्याचे प्रयत्न अलीकडे कांही प्रांतिक सरकारांनीं केले आहेत हें खरें. परंतु हेच प्रयत्न अधिक संघटित व जोमदार स्वरूपांत होण्याची आवश्यकता असून धान्याचा पुरवठा होण्याच्या सोयी वाढविणें, शेतकऱ्यास करतां येण्याजोग्या लहान सहान व घरगुती धंद्यांस उत्तेजन देणें व एकंदर राष्ट्राच्या सर्वांगीण औद्योगिक प्रगतीस सक्रिय मदत करणें ह्या गोष्टींची अधिक आवश्यकता आहे.

**९ लोकसंख्या**—संपत्तीचें उत्पादन व तिचा उपभोग घेणाऱ्या लोकांची संख्या ह्या दोन गोष्टींत अधिक महत्त्व उत्पादकतेस आहे ह्यांत शंका नाही. औद्योगिक व्यवसायांची विविधता, उत्पादकांच्या कार्यक्षमतेंत वाढ, घरगुती व लहान धंद्यांचें पुनरुज्जीवन आणि शेतीचा धंदा अधिक किफायतशीर करण्याची आवश्यकता इत्यादि बाबतींत सरकार व खाजगी व्यक्ति ह्यांचे आटोकाट प्रयत्न होणें आवश्यक आहे हें वर निदर्शित केलेंच आहे. परंतु सध्यांची परिस्थिति अशी आहे की संपत्तीच्या मानानें लोकसंख्या फाजील मोठी आहे आणि एकंदरीनें राहणीचें मानही असमाधानकारक आहे. संपत्तींत पुष्कळ भर पडून सरासरीच्या उत्पन्नांत तादृश वाढ होण्यास बराच अवधी लागतो. ह्यास्तव उत्पादनांत इष्ट प्रगति घडवून आणण्याचे प्रयत्न होत असतांच लोकसंख्येची वाढ मर्यादित करण्याचे उपायही अमलांत आणल्यास सरासरीचें उत्पन्न वाढण्यास मदत होऊन फाजील लोकसंख्येमुळें उत्पन्न होणारे अनेक आर्थिक, सामाजिक व आरोग्यविषयक दोष दूर होतील असें कित्येक लोकांचें म्हणणें आहे. मागें जन्ममृत्यूसंबंधाचे निरनिराळ्या देशांतील आंकडे दिले आहेत त्यावरून हिंदुस्थानांतील लोकसंख्येच्या निव्वळ वाढीचा आंकडा इतर अनेक प्रगमनशील राष्ट्रांच्या इतकाच असला तरी जनन व मरण ह्या दोहोंचे हजारीं प्रमाण येथें फार मोठें आहे हें दिसून येईल. लोकसंख्येच्या फाजील वाढीच्या सामाजिक व आरोग्यविषयक परिणामांचेही त्याच गोष्टीवरून अनुमान करतां येण्यासारखें आहे. विशेषतः येथील मृत्युसंख्येचें प्रमाण आणि त्यांतल्यात्यांत लहान मुलांच्या मृत्यूंचें प्रमाण हीं दारिद्र्य व रोगराई ह्यांच्या प्रसाराचीं लक्षणें होत. रोगनिवारणार्थ व विशेषतः लहान मुलांच्या संगोपनाप्रीत्यर्थ होणाऱ्या प्रयत्नांनीं मृत्युसंख्येचें प्रमाण कमी झाल्यास ती गोष्ट सर्वथैव इष्टच होईल हें खरें. परंतु मृत्युसंख्या कमी होऊन जननसंख्या कायम राहिल्यास निव्वळ वाढ अधिक होईल व संपत्ति आणि लोकसंख्या ह्यांचें परस्पर प्रमाण जास्त असमाधानकारक होईल हें विसरतां कामा नये. आरोग्य-

विषयक सुधारणांबरोबरच सांपत्तिक परिस्थितींत सुधारणा होणें आवश्यक असून ती योग्य प्रमाणांत होत नसल्यास संततिनियमन हाच एक राष्ट्राचें मान कायम राखण्यास व सुधारण्यास मार्ग आहे असें कित्येकाचें मत आहे. पाश्चात्य राष्ट्रांत ह्या मताचा प्रसार मुख्यतः व्यक्तिविषयक महत्त्वाकांक्षा व बेजबाबदारपणा ह्यांमुळें होत असून संततिप्रतिबंधक साधनांवर अनेक कायदेशीर नियंत्रणें घालून व अविवाहित लोकांवर करांचा बोजा वाढवून आणि कुटुंबवत्सलास प्रत्यक्ष मदत देऊनही लोकसंख्या वाढविण्याचे तिकडे प्रयत्न होत आहेत. हिंदुस्थानांत दारिद्र्यामुळें मुलांचे होणारे हाल आणि नागरिकांच्या स्वतंत्र व जोमदार व्यवसायांस येणारे अडथळे दूर करण्यास संततिनियमनाचा बराच उपयोग होईल ह्यांत शंका नाही. परंतु हिंदुस्थानांतील अनारोग्य व दारिद्र्य ह्यांचें प्रमुख कारण लोकसंख्येची अवास्तव वाढ हें नसून उत्पादक साधनांचा तुटवडा व लोकांचें सामान्य अज्ञान ही येथील लोकांच्या दुरवस्थेचीं खरी कारणें होत, हें ध्यानांत घेतल्यास संततिनियमनाचें निव्वळ आर्थिकदृष्ट्या किती कमी महत्त्व आहे हें दिसून येईल. संततिनियमनाचें तत्त्व मनांत पटून आचारांत उतरण्यास जी शैक्षणिक व मानसिक तयारी लागते ती समाजांतील फारच थोड्या लोकांत आढळते. आपल्याइकडे अलीकडे मध्यम व पांढरपेशा वर्गांत विवाहकालाची मर्यादा पुढें सरकली आहे व ह्या आणि दारिद्र्यासारख्या इतर कांही आर्थिक आणि सामाजिक कारणांमुळे एकंदर संततीचें मानही त्यांच्यांत कमी आहे. परंतु ह्यावरून त्या वर्गांत व विशेषतः बहुसंख्याक गरीब आणि अज्ञ वर्गांत संततिनियमनाच्या तत्त्वाचा प्रसार होईल किंवा तसा प्रसार झाल्यास त्यांचें आर्थिक हित खात्रीनें साधेल असे म्हणतां यावयाचें नाही.

**१० संततिनियमन**—विवाह ही समाजधारणा व समाजस्वास्थ्य ह्यांस आवश्यक असलेली एक संस्था आहे आणि संतति होणें हाही पितृऋण म्हणजे पर्यायानें समाजऋण फेडण्याचाच एक मार्ग होय अशी इकडील प्राचीन हिंदू ग्रंथकारांची समजूत होती. आश्रम धर्मास अनुसरून योग्य कालीं म्हणजे प्रौढपणा प्राप्त झाल्यानंतर विवाह करणें योग्य व आवश्यक समजलें जाई. विशेषतः ज्याकाळीं हिंदूंचे प्रमुख धार्मिक ग्रंथ लिहिले गेले त्याकाळीं जमीनीची लागवड करण्यास, इतर आवश्यक धंदे चालविण्यास आणि शत्रूपासून समाजाचे रक्षण करण्यास मनुष्यबळाची विशेष मानच्चरी होती. ह्यास्तव सशक्त व कार्यक्षम संतति होणें हा सामाजिक व वैयक्तिक लाभ समजला जाई व त्या प्रीत्यर्थ देवादिकांस सतत प्रार्थना केल्या जात. पाश्चात्य राष्ट्रांपैकी आज कित्येकांत लोकसंख्या वाढविण्याचे जे संघटित व नेटाचे प्रयत्न केले जात आहेत त्यांवरून विवक्षित परिस्थितींत आर्थिक अगर राजकीय प्रगति घडवून आणण्यास लोकसंख्येची वाढ होण्यास मुद्दाम उत्तेजन देणें किती आवश्यक असतें हें दिसून येईल. ज्यावेळी विवक्षित धार्मिक वचनें लिहिलीं गेलीं

त्यावेळीं समाजाची स्थिति कशी होती याकडे दुर्लक्ष करून हिंदू अगर मुसलमानी धर्मांतच संततीच्या अवास्तव वाढीस अनुमति अगर उत्तेजन ही दिलेलीं आहेत असें भरमसाट विधान करणें अयोग्य आहे. आमच्या इकडील वानप्रस्थ व संन्यास ह्या आश्रमांची योजना जशी व्यक्तीच्या तशीच समाजाच्याही अंतिम हितास अनुसरूनच केली होती. खिश्चन धर्मांत उपाध्याय वर्ग व विरक्त संन्यासी ह्यांनीं ब्रह्मचर्याचें कडक आचरण करावें असा निर्बंध असल्यानें ख्रिश्चन राष्ट्रांत एकंदरीनें जननसंख्येचें प्रमाण कमी आहे असें कित्येक ग्रंथकार मानतात. परंतु ज्या ख्रिश्चन राष्ट्रांत औद्योगिक, शैक्षणिक, आरोग्यविषयक व सामाजिक सुधारणा घडून आल्या नाहीत तेथें अजूनही जन्मसंख्या मोठी आहे हें ध्यानांत घेतल्यास निव्वळ धार्मिक कारणांचा संततीच्या वाढीशी अगर नियमनाशी विशेषसा संबंध जोडतां येणार नाहीं हें उघड होईल. उलट, संततिनियमनाच्या व काडीमोड अधिक सुलभ करण्याच्या सूचनेस सर्वच धर्मांचा विरोध असतो हे ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. संभोगेच्छा ही प्रत्येक मनुष्यांत थोड्या फार प्रमाणांत अस्तित्वात असली तरी विवाहपद्धति आणि संततीची वाढ ह्या गोष्टी मुख्यतः सामाजिक व आर्थिक परिस्थितीस अनुसरून बदलतात असें म्हटलें पाहिजे. मुलें होण्याची इच्छा, त्यांतल्या त्यांत मुलगा झाल्यास वाटणारा आनंद इत्यादि वरवर भावनात्मक वाटणाऱ्या गोष्टीही आर्थिक व राष्ट्रीय महत्त्वाच्या असतात हे थोड्याशा विचारांतीं सहज दिसून येईल. मुलींचें लग्न होण्यास असणाऱ्या अडचणी, वे कुटुंबाचे, समाजाचे आणि राष्ट्राचे संरक्षण व पोषण करण्यास होणारा मुलग्यांचा उपयोग ह्याच गोष्टी प्रायः पुत्रप्राप्तीच्या आनंदाच्या मुळाशी आहेत.

येथील सामान्य लोकांची आर्थिक परिस्थिति बदलत चालल्यामुळें विवाह व संतति ह्यांविषयींच्या पूर्वापार चालत आलेल्या कल्पनाही हळूहळू बदलत आहेत. तरीही लवकर लग्न होणें ही गोष्ट धार्मिक दृष्ट्या आवश्यक व सामाजिक दृष्ट्या स्पृहणीय आहे असा समज बहुजनसमाजांत अजूनही दृढमूल आहे. एकीकडे दारिद्र्य वाढत असून विवाह मात्र शक्य तितक्या लवकर करण्याची प्रवृत्ति असल्यानें हिंदवासीयांची सामान्य आयुर्मर्यादा व त्यांचें आरोग्य ह्याजवर बराच अनिष्ट परिणाम होत आलेला आहे. इतर पुढारलेल्या राष्ट्रांतील लोकांच्या मानानें येथील लोक एकंदरीनें कमी कार्यक्षम असण्याचे एक कारण म्हणजे त्यांचे वैवाहिक व संततिविषयक परंपरागत विचार आणि बदलणारी एकंदर परिस्थिति ह्यांचा मेळ बसलेला नाही हें होय. परंतु ह्या विचारास धर्मशास्त्रातील[1] तत्त्वज्ञानाचा किती आधार आहे ह्याची चौकशी होणें जरूर आहे.

१ ज्येष्ठेन जातमात्रेण पुत्रीभवति मानवः । पितॄणामनृणश्चैव स तस्मात्सर्वमर्हति ।।
यस्मिन्नृणं संनयति येनचानन्त्यमश्नुते । स एव धर्मजः पुत्रः कामजानितरान्विदुः ।।
—मनु, ९, १०६–१०७.

विवाह व संतति ह्यांस अनुकूल धर्मवचनाची योग्य मर्यादा मनुस्मृतींतील वरील उताऱ्यांवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

माल्थसनें लोकसंख्येच्या वाढीसंबंधीं आपला निबंध लिहिला त्यावेळी त्यास मनूच्या ह्या विषयावरील वचनांची पूर्ण माहिती असून हिंदुस्थानांत लोकसंख्येस आळा घालणारे कांहीं प्रचार अस्तित्वांत आहेत हें त्यानें कबूल केलें होतें. ज्या वेळी जी परिस्थिति असेल त्यास अनुसरून धार्मिक व सामाजिक इष्टानिष्टतेच्या कल्पना बदलणें आवश्यक आहे असें इकडील प्राचीन समाजधुरणांचें मत होतें ह्याबद्दल प्रस्तुत भागाच्या दुसऱ्या प्रकरणांत उल्लेख केलेलाच आहे. आजच्या परिस्थितीत आरोग्य वाढविण्यास किंवा आर्थिक अवनतीचा ओघ थोपविण्यास संतति मर्यादित होण्यानें मदत होईल असें मानण्यास जागा आहे. परंतु ह्या मताचें विवक्षित व्यक्ति अगर वर्ग ह्यांजकडून अवलंबन होण्यापूर्वी त्यांच्या परिस्थितीत तें तत्त्व आवश्यक व हितावह आहे अशी खात्री झाली पाहिजे. त्याचप्रमाणें लोकसंख्या मर्यादित करणें हा सामाजिक व आर्थिक सुधारणेचा खरा मार्ग नसून संपत्तीच्या उत्पादनाची विविधता व परिमाण ही वृद्धिंगत करणें हाच बेसुमार लोकसंख्या व वाढतें दारिद्र्य ही दूर करण्याचा टिकाऊ उपाय आहे हें दृष्टीआड करता कामा नये.

**११ हिंदुस्थानची लोकसंख्या बेसुमार वाढत आहे काय ?**–संततीचें नियमन करण्याचे जे प्रतिबंधक उपाय आहेत त्यांची उपयुक्तता विवक्षित व्यक्तीस अगर वर्गास मान्य होण्यास शिक्षण, महत्त्वाकांक्षा व आर्थिक साधनें ह्यांचें निदान कांहीं प्रमाणांत तरी त्यांजजवळ अस्तित्व असावें लागतें; परंतु अशा व्यक्तीस व वर्गास त्या मानानें संतति-नियामक उपायांची म्हणण्यासारखी जरूरी नसते, हा लोकसंख्येच्या वाढीस आळा घालण्याचें साधन ह्या नात्यानें संतति नियमनाचे योजनेंत मोठाच कमीपणा आहे. ज्या वर्गांचें आर्थिक सामर्थ्य व शैक्षणिक आणि नैतिक प्रगति ही मर्यादित असतात त्यांच्यात प्रतिबंधक उपायांचा प्रसार सहसा होत नाहीं. हिंदुस्थानांतील जंगली व पहाडी लोकांत जन्मसंख्येचें प्रमाण सर्वांत अधिक आहे, मुसलमानांत तें हिंदूंपेक्षा अधिक आहे; आणि एकंदरीनें गरीबी व अज्ञान आणि वाढती संतति ह्यांचें सहचर्य सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतें, ह्या सर्व अनुभवांवरूनही किमान मर्यादेपर्यंत आर्थिक व शैक्षणिक प्रगति झाल्याखेरीज संततिनियमनाचें अवलंबन होऊं शकत नाहीं हें सिद्ध होईल. पांच वर्षांखालील मुलांची संख्या बाजूस काढल्यास दर हजारांत ८२ इसमांसच लिहितां वाचतां येतें आणि त्यातही हें प्रमाण पुरुषात हजारीं १३९ तर बायकांत हजारीं २१ इतकें भिन्न आहे, ह्या गोष्टीवरून येथें शैक्षणिक प्रगति कितपत झालेली आहे तें दिसून येईल. सामान्य जनतेच्या आर्थिक स्थितीसंबंधानें तर बोलावयासच नको ! एकंदर उत्पन्नाची दर माणशीं सरासरी सालीना ७८ रुपये धरली तर समाजांतील गरीब समजल्या जाणाऱ्या वर्गांचें उत्पन्न त्याच्या निम्म्यानें तरी भरेल किंवा नाहीं ह्याची वानवाच आहे. शेंकडा ९२ लोक निरक्षर व निकृष्ट वर्गांचें उत्पन्न सरासरी ४० रुपये अशी स्थिति असतांना संततिनियम-

माच्या उपायांस येथें सध्यां विशेष धाव आहे असें म्हणतां येणार नाहीं. ज्या मध्यम व पांढरपेशा वर्गांत उच्च राहणी व कमी उत्पन्न ह्यांची तोंडमिळवणी करण्याची आपत्ति उद्भवते त्यांनी संततिनियमनाचें व विशेषतः नैतिक बंधनांचें अवश्य अवलंबन करावें, परंतु त्यामुळें हिंदुस्थानाच्या वाढत्या लोकसंख्येच्या मानानें उत्पादनाचा जो तुटवडा पडतो तो फारसा दूर होण्यास मदत होणार नाही.

एकंदर देशाची लोकसंख्या उपयुक्त वस्तूंच्या पुरवठ्याच्या मानानें वाढती आहे अशी सार्वत्रिक तक्रार ऐकूं येत असतांच मुसलमान व ख्रिश्चन ह्यांच्या संख्येंतील वाढीच्या मानानें हिंदूंची संख्या मर्यादित होत आहे अशी हिंदूंच्या बाजूनें विशिष्ट तक्रार केली जाते. ह्या म्हणण्यांत कितपत तथ्य आहे हें निरनिराळ्या प्रांतांत हिंदु व मुसलमान ह्यांच्या वाढीसंबंधीं काय प्रमाण पडते ह्याविषयी पुढें दिलेल्या आंकड्यांवरून सहज ध्यानांत येईल.

| प्रांताचें नांव | शेंकडा वाढीचें प्रमाण | | | |
|---|---|---|---|---|
| | १९११ पासून | | १८८१ पासून | |
| | हिंदू | मुसलमान | हिंदू | मुसलमान |
| आसाम | +१३·६ | +१६·७ | +३४·१ | +६७·१ |
| बंगाल | − ·६ | + ५·१ | +१७·६ | +४१·१ |
| बिहार व ओरीसा | − ·४ | + ·६ | +१३·८ | + १·८ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | + २·५ | − ·५ | +१७ ० | +२१·५ |
| मद्रास | + १·८ | + ३·६ | +१८·१ | +३१·५ |
| पंजाब | + ४·५ | + ४·७ | + ·१ | +२८·७ |
| संयुक्तप्रांत | − २·० | − २·६ | + २·४ | + ९·१ |

मुसलमानाच्या संख्येंत जी वाढ दिसून येते तिच्यातील कांही भाग धर्मांतराचें दृश्य फळ होय ह्यांत शंका नाही. तरीही एकंदरीनें मुसलमान समाजांत जन्माचें प्रमाण अधिक व मृत्यूचें कमी आहे व हिंदूंमधील बालविवाह, विधवाविवाहाचा मर्यादित प्रसार इत्यादि सामाजिक कारणांमुळें त्यांची लोकसंख्या पर्यायानें मर्यादित होत आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं.

हिंदुस्थानाची लोकसंख्या वाजवीपेक्षां जास्त आहे किंवा काय ह्या प्रश्नाचें उत्तर प्रस्तुत प्रकरणांत विस्तरशः दिलेलें असून त्यावरून येथील नैसर्गिक व इतर उत्पादक साधनांच्या सध्यांच्या परिस्थितीत उत्पन्नाच्या मानानें लोकांची संख्या अधिक आहे व एकंदरीनें राहणीचें मान निखालस अधोगतीस लागलें नसलें तरी त्यांत सुधारणाही म्हणण्यासारखी नाही हें दिसून येईल. त्याचप्रमाणें शेतीची उत्पादकता वाढविल्यास व शेतकऱ्यांस किफायतशीर पोटधंद्यांची जोड करून दिल्यास आणि राष्ट्रामध्यें कारखाने, पेढ्या, खाणी, वहातुकीचे व विम्याचे धंदे इत्यादि अनेक धंद्यांच-

वाढ झाल्यास हल्लींच्या लोकसंख्येचें राहणीचें मान सुधारून अधिक लोकांसही सुस्थितींत राहतां येईल हें विसरतां कामां नये. दोन तीन पिढ्यांपूर्वी येथें एकंदरीनें सुबत्ता होती असा सामान्य समज आहे व तो कांहीं अंशीं खराही आहे. कारण एक तर त्यावेळीं लोकसंख्या खरोखरच कमी असून शिवाय युद्ध, दुष्काळ, रोगराई ह्यांमुळें ती अधून मधून पुष्कळच घटत जाई. उलटपक्षीं, जमीनीचा कस सध्यां इतका उतरलेला नसल्यानें व इतर लहान सहान धंदे अगदींच नाश न पावल्यानें लोकसंख्येच्या मानानें संपत्तीचें उत्पादनही अधिक समाधानकारक होतें. वरील सर्व बाबतींत हल्लींची स्थिति एकंदरीनें लोकसंख्या वाढण्यास व उत्पादकता कमी होण्यास अनुकूल आहे. देशांतल्या देशांत उपजीविका चालविण्याच्या उद्देशानें लोक आपापले प्रांत सोडून दूरवर जात आहेत व प्रतिवर्षी कित्येक लोक परदेशांस जाऊन पोट भरण्याची खटपट करीत आहेत. परंतु परकी राष्ट्रांत व ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींत हिंदी लोकांस योग्य रीतीनें वागविलें जात नसल्यानें परदेशीं जाऊन स्वाभिमानवृत्तीनें पोट भरण्याची फारशी सोय राहिलेली नाहीं. देशांतील स्थानांतरासही निव्वळ शेतीच्या धंद्याच्या दृष्टीनें विशेष वाव नाहीं. ह्यावरून आपणांस असा निष्कर्ष काढला पाहिजे कीं, उत्पादक साधनांच्या मानानें सध्यांची लोकसंख्या अवास्तव आहे; व लोकसंख्येचा हा भार दूर करावयाचा असेल तर धंद्यांची विविधता व उत्पादकता हीं वाढविली पाहिजेत. निरनिराळ्या धंद्यांची सध्यां कशी परिस्थिति आहे व ती सुधारण्यास लोक व सरकार ह्यांचे कोणते प्रयत्न आवश्यक आहेत ह्यासंबंधीं पुढें योग्य स्थळीं विवेचन येईल; त्यावरूनही येथील लोकसंख्येच्या व राहणीच्या मानाच्या वाढीस किती वाव आहे हे अधिक स्पष्टपणें दिसेल.

**१२ कांहीं आंकडे**—प्रस्तुत प्रकरणांत लोकसंख्येच्या वाढीचे आंकडे व शैक्षणिक आणि आरोग्यविषयक सुधारणा ह्यासंबंधीं जें विवेचन केलेलें आहे त्यास अनुसरून पुढें कांहीं अधिक सविस्तर माहिती दिली आहे.

### कांहीं प्रमुख शहरांची मृत्युसंख्या.

| शहराचें नांव | १९२४ हजारीं मृत्यूचें प्रमाण. |
|---|---|
| मद्रास | ४१·९ |
| मुंबई | ३३·४ |
| पुणें शहर | ३९·८ |
| ,, लष्कर | १७·७ |
| अहमदाबाद शहर | ३९·८ |
| ,, लष्कर | २०·३ |
| कलकत्ता | २९·६ |
| काशी शहर | ५२·१ |
| ,, लष्कर | १०·७ |
| आग्रा शहर | ४१·९ |
| ,, लष्कर | २२·२ |
| लाहोर | ४५·६ |
| नागपूर | ४३·६ |

## प्रमुख प्रांतांतील लोकसंख्येची पुरुष व स्त्रिया आणि विवाहित, अविवाहित, व विधुर ह्या वर्गांत विभागणी

| प्रांताचें नांव | पुरुष अगर स्त्री | विवाहित, अविवाहित अगर विधुर | | | एकंदर संख्या। |
|---|---|---|---|---|---|
| | | अविवाहित आकडे लक्षाचे | विवाहित आंकडे लक्षाचे | विधुर आंकडे लक्षांचे | आंकडे लक्षांचे |
| मद्रास | पुरुष | ११०.८ | ९८.६ | ९.१ | २०८.७ |
| | स्त्रिया | ७९.९ | ६४.० | ४०.४ | २१४.८ |
| मुंबई | पुरुष | ४८.९ | ४५.९ | ६.९ | १०१.७ |
| | स्त्रिया | ३०.५ | ४४.३ | १६.८ | ९१.७ |
| बंगाल | पुरुष | १२५.१ | १०७.३ | ९.० | २४१.५ |
| | स्त्रिया | ७७.२ | १०३.७ | ४४.४ | २२५.४ |
| संयुक्तप्रांत | पुरुष | १०७.६ | १०८.५ | २१.७ | २३७.८ |
| | स्त्रिया | ६८.६ | १०९.८ | ४७.४ | २१५.८ |
| पंजाब | पुरुष | ६१.१ | ४२.१ | ६.७ | ११३.० |
| | स्त्रिया | ३८.४ | ४३.० | १२.३ | ९३.७ |
| ब्रह्मदेश | पुरुष | ३७.६ | २६.२ | ३.४ | ६७.५ |
| | स्त्रिया | ३२.७ | २४.२ | ७.३ | ६४.५ |
| बिहार व ओरीसा | पुरुष | ७४.८ | ८२.७ | १०.५ | १६७.६ |
| | स्त्रिया | ५४.६ | ८५.६ | ३२.१ | १२.६ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | पुरुष | ३०.९ | ३४.२ | ४.१ | ६९.५ |
| | स्त्रिया | २३.० | ३४.९ | ११.५ | ६९.६ |
| आसाम | पुरुष | २२.० | १५.५ | २.७ | ३९.६ |
| | स्त्रिया | १५.५ | १५.१ | ५.७ | ३६.४ |
| वायव्यसरहद्दी-वरील प्रांत | पुरुष | ७.६ | ४.६ | .६ | १२.२ |
| | स्त्रिया | ४.४ | ४.५ | १.१ | १०.२ |
| ब्रिटिश हिंदुस्थानाची एकूण बेरीज | पुरुष | ६२३.३ | ५६७.२ | ७८.२ | १२६८.७ |
| | स्त्रिया | ४२९.५ | ५६१.५ | २१०.३ | १२०१.३ |

## निरनिराळ्या इलाख्यांतील लोकसंख्येची शिक्षण-विषयक प्रगतीवरून विभागणी.

( ब्रिटिश हिंदुस्थान. )

| प्रांताचें नांव. | पुरुष. | | | |
|---|---|---|---|---|
| | एकंदर संख्या. | निरक्षर. | साक्षर. | इंग्रजी जाणणारे. |
| मद्रास | २०,८७०,७४९ | १७,७०२,६७६ | ३,१५८,०७३ | ३५४,५९४ |
| मुंबई | १०,१७६,९६९ | ८,७४६,४०२ | १,४३०,५६७ | २३९,७७७ |
| बंगाल | २४,१५१,२२२ | २०,३००,५७१ | ३,८५०,६५१ | ७२८,४४१ |
| संयुक्तप्रांत | -३,७८७,७४५ | २२,२३१,११९ | १,५५६,६२६ | १५६,९०० |
| पंजाब | ११,३०६,२६५ | १०,५५०,९२१ | ७५५,३४४ | १२८,२४२ |
| ब्रह्मदेश | ६,७५६,९६९ | ३,७०९,१७९ | ३,०२६,३३७ | ९२,२०७ |
| बिहार व ओरीसा | १६,७६३,८६६ | १५,२८१,३१५ | १,४८२,५५१ | १२३,९१५ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ६,९५१,३९९ | ६,३६७,७७१ | ५८३,६२८ | ५६,६१२ |
| आसाम | ३,९६१,१०९ | ३,५२३,७ ५ | ४३७,३९४ | ६७,२५३ |
| सरहद्दीवरील प्रांत | १,२२९,३१६ | १,१५१,२३२ | ७८,०८४ | १५,८५७ |
| बलुचिस्थान | २५५,०१४ | २२७,१८१ | २७,८३३ | ८,३३० |
| अजमीर मारवाड | २६९,५६९ | २२४,९०८ | ४४,६५८ | ८,७९२ |
| कूर्ग | ८९,५०१ | ७२,५४२ | १६,९५९ | २,३८९ |
| दिल्ली | २८१,६३३ | २३६,२४४ | ४५,३८९ | १४,२७१ |
| अंदमान व निकोबार | २०,७९३ | १५,६८७ | ४,६०६ | ६१३ |
| एकूण | १२६,[illegible]७२,११६ | ११०,३४१,४३३ | १६,५०८,७००० | १,९९८,[illegible]३ |

## निरनिराळ्या इलाख्यांतील लोकसंख्येची शिक्षण-विषयक प्रगतीवरून विभागणी.

( ब्रिटिश हिंदुस्थान )

| प्रांताचें नांव | स्त्रिया | | | |
|---|---|---|---|---|
| | एकंदर संख्या | निरक्षर | साक्षर | इंग्रजी जाणणाऱ्या. |
| मद्रास | २४,४४८,२३६ | २०,९९४,४०१ | ४५३,८३५ | ४४,२८९ |
| मुंबई | ९,१७१,२५० | ८,९४५,७३७ | २२५,५१३ | ३९,७३७ |
| बंगाल | २२,५४४,३१४ | २२,१४०,३६४ | ४०३,९५० | ४४,७२० |
| संयुक्तप्रांत | २१,५८८,०४२ | २१,४५५,७९६ | १३२,२४६ | १८,३३९ |
| पंजाब | ९,३७९,७५९ | ९,३००,६११ | ७८,१४८ | ११,२९३ |
| ब्रह्मदेश | ६,४५५,२२३ | ५,८०७,८७७ | ६२५,७०६ | २१,२०६ |
| बिहार व ओरीसा | १७,२३८,३२३ | १७,१३४,६१७ | १०३,७०६ | ८,१४७ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ६,९६१,३६१ | ६,९११,६९६ | ४९,६६५ | ६,१२४ |
| आसाम | ३,६४५,१२१ | ३,५९९,५१० | ४७,७११ | ३,५५६ |
| सरहद्दीवरील प्रांत | १,०२२,०२४ | १,०१३,०५५ | ८,९६९ | १,३०१ |
| बलुचिस्थान | १६५,६३४ | १६३,२२० | २,४१४ | ८३६ |
| अजमीर मारवाड | २२५,७०५ | २२०,६०१ | ५,१०४ | १,११३ |
| कूर्ग | ७४,३३७ | ७०,६५३ | ३,६८४ | ४१७ |
| दिल्ली | २०६,५५५ | १९९,४८६ | ७,०६९ | १,८१६ |
| अंदमान व निकोबार | ६,२९३ | ५,६५७ | १८४ | ५७ |
| एकूण | १२०,१३१,१७७ | ११७,९६३,१८१ | २,१४५,९०४ | २०२,५५१ |

# प्रकरण आठवें

## आर्थिक क्रान्ति

**१ हिंदी बाजार—** अर्वाचीन औद्योगिक घटना हिंदुस्थानात स्थापन होऊं लागल्यापासून येथील संपत्तीच्या उत्पादनाचें व विनिमयाचें परिमाण वाढत आहे. परंतु पूर्वीच्या काळीं सर्वत्र व अजूनही कित्येक भागांत उत्पादनाचें व विनिमयाचें क्षेत्र फार संकुचित असल्याचें आढळतें. विशेषतः येथलि लोकसंख्येपैकीं जवळ जवळ तीन चतुर्थांश भागाची वसती खेडेगावांत असल्यानें व आवश्यक वस्तूंचें उत्पादन आणि त्याचा विनिमय ह्या बाबतीत बहुतेक खेडेगावें स्वायत्त असल्यानें विस्तृत प्रमाणावर देवघेव होण्याचें कारण पडत नाही. सामान्यतः प्रत्येक खेडेगावांत नेहमीं लागणाऱ्या वस्तू ठराविक दरानें पुरविणारे पिढीजाद कारागीर असतात व त्यांस त्यांच्या कामगिरीबद्दल धान्य व इतर वस्तू ह्यांच्या रूपानें व कधी कधी पैशाच्या स्वरूपांतही मोबदला मिळतो. आवश्यक वस्तूंपैकीं ज्या कांही त्यांच्या गांवांत उत्पन्न होत नाहीत त्या आजूबाजूच्या गांवांतून तेथील लोकांस मिळवाव्या लागतात. ह्या अधिक गरजा भागविण्याचा मार्ग म्हणजे पूर्वापार चालत आलेले आठवड्याचे बाजार व देवादिकांच्या नांवानें भरणाऱ्या जत्रा हे होत. ह्या प्रसंगीं आजूबाजूच्या व दूरदूरच्या प्रदेशांतून येणाऱ्या जिनसांची बरीच देवघेव होते. आठवड्याच्या बाजारात मुख्यतः दैनिक गरजा भागविण्यास आवश्यक असलेल्या धान्य, कापड, भाजीपाला इत्यादि वस्तूंची विक्री होते व जत्रामध्यें खेडेगांवच्या रहिवाशांच्या आयुष्यक्रमात ज्यांस 'चैनीच्या' पदार्थांचें स्थान मिळूं शकेल अशा जिनसा खपतात. कित्येक ठिकाणी बाजार आठवड्यांतून एकाहून अधिकवेळां भरतात व जत्राचे दिवसही गिऱ्हाइकाच्या सोयीस अनुसरून विशिष्ट सणांस अगर धार्मिक उत्सवास जोडून घेतले जातात. जत्रा व बाजार ह्या दोन्हीं ठिकाणी कधी कधी धात्वात्मक अगर कागदी चलनाच्या मदतीखेरीज, म्हणजे ऐनजिनसी, विनिमय घडून येतो. विशिष्ट ठिकाणचे बाजार व जत्रा विशिष्ट वस्तूंकरितां प्रसिद्ध असल्यानें गिऱ्हाइकांस आपल्या गरजांप्रमाणें योग्य ठिकाणी खरेदी करण्यास सांपडते. खेडेगांवची वसति लहान असून तेथील लोकांच्या गरजा थोड्या असतात व त्यांच्यापैकी बहुतेक गावांतल्या उत्पादकांकडूनच भागतात; त्यामुळें बहुतेक खेडेगांवांत व्यापारी पेशाचा स्वतंत्र धंदेवाला असा नसतोच. ज्या गांवांत एखाद दुसरा दुकानदार असतो त्यासही आपला चरितार्थ चालविण्यास अनेक भिन्न प्रकारचे जिन्नस जवळ बाळगावे लागतात. लहान शहरात किंवा तालुक्याच्या मुख्य ठिकाणीं मात्र दुकानांची संख्या व विविधता ह्यांत वाढ होतांना दिसते. रस्त्यांची सुधारणा व

आगगाड्या आणि मोटारी इत्यादि वहातुकींच्या साधनांची वाढ ह्यांमुळें अलीकडे हिंदुस्थानांतील खेडेगांवांची आर्थिक स्वायत्तता कमी कमी होत आहे. गहूं, कापूस, नाग, तांदूळ, तीळ, कानडी इत्यादि खेडेगावांत पैदा होणाऱ्या जिनसांची विक्री दूरदूरच्या राष्ट्रांत होऊं लागली आहे व अनेक प्रकारच्या परदेशी वस्तू खेडेगावांतील दुकानांत व बाजारांत मिळूं लागल्या आहेत. देशांतल्या देशातही विनिमयाचें क्षेत्र वाढत असून हळुहळु जत्रा व आठवड्याचे बाजार ह्या नैमित्तिक व प्रासंगिक विनिमयस्थानाचें महत्त्व कमी होत आहे. परदेशीं पाठविल्या जाणाऱ्या अगर हिंदुस्थानाच्याच दूरच्या भागांत विकल्या जाणाऱ्या मालाचे आडत्ये व विलायती आणि देशी तयार वस्तूंचे फेरीवाले आणि गुमास्ते ह्यांनी दूरदूरच्या खेडेगांवांतही आपली छाप बसविण्यास प्रारंभ केला आहे. उत्पादन व विनिमय ह्या दोन आर्थिक क्रियांची भिन्नता अधिकाधिक स्पष्ट होत असून जगांतील सर्व राष्ट्रांचे विनिमयाच्या बाबतींत जें एकीकरण होत आहे त्यामुळे येथील खेडेगावाची आर्थिक स्वयंपूर्णता नष्टप्राय होऊं पहात आहे. हिंदुस्थानाच्या एकंदर लोकसंख्येपैकीं सुमारें १,८१,१५,००० इतके लोक व्यापारावर आपला उदरनिर्वाह करीत आहेत, ह्यावरून येथील आर्थिक घटनेंत व्यापाराचें महत्त्व बरेंच आहे असें अनुमान निघतें. पारशी, मारवाडी, वानिये, बोहरी ह्या जातींतील बहुतेक लोक कोणत्याना कोणत्या तरी व्यापारांत पडून आपला उदरनिर्वाह करतात. हिंदु वर्णव्यवस्थेप्रमाणें वैश्य वर्णांतील लोकांसच व्यापार उद्दीम उचित मानले जात असूनही अलीकडे सर्व वर्णांतील लोक व्यापार करून आपलें पोट भरतांना दिसतात. अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय दळणवळणाचीं साधनें सुधारल्यामुळें संपत्तीच्या उत्पादनाचें परिमाण व विनिमयाचें क्षेत्र ह्यांत पुष्कळच वाढ झालेली आहे, आणि ह्या स्थित्यंतराचा परिणाम कृषिप्रधान खेडेगावांतही दिसून येत आहे.

**२ हिंदुस्थानाचा प्राचीन व्यापार**—अलीकडे हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासाबद्दल जे बहुविध शोध लागलेले आहेत त्यांवरून आतां असें पूर्णपणें सिद्ध झालें आहे की ख्रिस्ती शकाच्या पूर्वीपासून शेंकडों वर्षें हिंदुस्थानाचा जगांतील सर्व प्रमुख राष्ट्रांशीं व्यापार चालत असे. वेद, बौद्ध वाङ्मय व कौटिल्याच्या अर्थशास्त्रासारखे ख्रिस्त शकाच्या सुरुवातीच्या सुमाराचे ग्रंथ ह्यामध्यें येथील लोकांचा पूर्वेकडील व पश्चिमेकडील सर्व देशांशीं व्यापार व संस्कृति ह्यांच्या बाबतींत अत्यंत निकट संबंध होता हे दाखविणारे अनेक दाखले आहेत. ग्रीस, रोम, मिसर इत्यादि पाश्चात्य राष्ट्रें, मध्य एशियातील व वायव्य सरहद्दीकडील देश, आणि चीन, तिबेट, सयाम, व पूर्वेकडील अनेक बेटें ह्यांच्याशी हिंदुस्थानाचा फार मोठ्या प्रमाणावर व्यापार चालत असे. व्यापारी संबंधामुळें ह्यांपैकीं अनेक भागांत हिंदी लोकांनीं आपल्या वसाहती केल्या होत्या व तद्देशीय लोकांवर आपल्या संस्कृतीचा पगडाही कमी-जास्त प्रमाणांत बसविला होता. कापूस, रेशीम व लोंकर ह्यांची उंची वस्त्रें, अनेक मसाल्याचे पदार्थ, काही मूल्यवान लांकडें, हिरे, मोती, माणकें व हस्तिदंत, नक्षीची,

रंगाची व कलाबतूचीं कामें इत्यादि वस्तू परदेशास पाठविल्या जात. ह्या मालाची वहातुक करण्याचें काम जहाजांतून व खुष्कीनें होत असे. दक्षिण हिंदुस्थानांत जहाजें बांधण्याचा धंदा पूर्वी अत्यंत ऊर्जितावस्थेंत होता व दर्यावर्दीपणातही येथील लोक अत्यंत प्रवीण होते हे आता निर्विवादपणें सिद्ध झालें आहे. खुष्कीच्या मार्गानेंही भारी किंमतीचे व नाजूक आणि अवजड जिन्नस दूरदूरच्या देशीं न्यावे लागत असल्यानें खुष्कीच्या वहातुकीचा धंदा सुसंघटित व फायदेशीर होता. परदेशांतून मात्र हिंदुस्थानांत तयार माल फारसा येत नसे व बहुतेक हिंदी मालाचा मोबदला म्हणून सोनें व चांदी ह्यांची आयात होत असे. देशातील लोकांचा मुख्य धंदा शेतकी हाच होता तरी इतर उत्पादक व कलाकुसरीचे धंदेही विस्तृत प्रमाणावर व संघटित पद्धतीनें चालविले जात. त्या काळची आर्थिक घटना प्रमाणशीर, प्रगमनशील आणि जोमदार होती ह्यांत शंका नाही. पुढील म्हणजे मध्ययुगीन काळांत येथलि हिंदू व मुसलमान राजांचे परस्पर तंटे चालत असल्यानें उद्योगधंद्यांस व विशेषतः परराष्ट्रीय व्यापारास जेवढें उत्तेजन मिळावें तेवढें मिळत नाहींसें झालें. अंतर्गत अशांततेचा परकी व्यापाऱ्यांनी आपलें येथील ठाणें स्थिर करण्यास चांगलाच फायदा करून घेतला, आणि आपल्या वाढत्या सत्तेचें व्यापारवृद्धीस साहाय्य मिळविलें. मुसलमानी व मराठी अंमलाखालीं हिंदुस्थानचा परराष्ट्रांशीं, विशेषतः पाश्चात्य राष्ट्रांशी, चालत असलेला व्यापार जवळजवळ नाहींसा झाला होता; तो ईस्ट इंडिया कंपनीच्या धोरणामुळें भिन्न स्वरूपांत पुन्हा वाढत्या प्रमाणावर सुरू झाला असें म्हटलें पाहिजे.

**३ ब्रिटिश अंमल व हिंदी व्यापारउदीम**–एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानाच्या बहुतेक भागांत आपला अंमल बसविला ह्या गोष्टीचें प्रत्यंतर परराष्ट्रीय व्यापारांत तात्काल दिसूं लागलें. अठराव्या शतकाच्या प्रारंभकाळीं हिंदुस्थानांतून परदेशी पाठविल्या जाणाऱ्या मालाची किंमत जेमतेम दीड कोटी रुपये भरली असती; तीच १८३४ सालीं बारा कोटी रुपये भरली. येथून परदेशी जाणाऱ्या मालाचें परिमाण व एकंदर किंमत ही तेव्हांपासून आजतागाईत एकंदरीनें सारखी वाढत्या प्रमाणावर आहेत. तसेंच, ब्रिटिश अंमलाचा येथील औद्योगिक परिस्थितीवर पूर्ण पगडा बसण्यापूर्वी तयार माल आणि धान्य व कच्चा माल ह्यांचें परराष्ट्रीय व्यापारांत जें परस्पर प्रमाण होतें तें पूर्णपणें बदलण्यास एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीपासूनच प्रारंभ झाला. उदाहरणार्थ, १८१३ सालीं कलकत्त्याहून तीन कोटी रुपये किंमतीचें कापड लंडन येथें पाठविण्यात आलें होतें, त्याच्या उलट, १८३० सालीं इंग्लंडहून तेवढ्याच किंमतीचें कापड कलकत्त्यास आणलें गेलें. इंग्लिश सूत हिंदुस्थानांत येण्यास १८२३ मध्यें सुरुवात झाली. १८२४ सालीं १,२१,००० पौंड वजनाचें सूत येथें आणलें गेलें. चारच वर्षांत सुताची आयात एवढी बेसुमार वाढली की, १८२८ सालीं ४०,००,००० पौंड सूत येथें आलें. अनेक यांत्रिक सुधारणांच्या साहाय्यानें स्वस्त, सुबक व सुचलक उत्पादनाच्या सोयी इंग्लंडमध्यें

वाढत्या प्रमाणावर उपलब्ध होत असतां व तेथील सरकार आपल्या उत्पादकांस व व्यापाऱ्यांस अनेक मार्गांनी मदत करीत असतां हिंदुस्थानांत मात्र परकी मालाच्या अप्रतिहत ओघापुढें लहानसहान उद्योगधंदे नष्ट होत चालले. शेतकी हा धंदा सर्व धंद्यांत बूड येऊन हताश झालेल्या कारागिरांचें आश्रयस्थान बनत जाऊन मनुष्यबळाच्या मानानें त्या धंद्याची उत्पादकताही कमी होत चालली. येथून परदेशांत पाठविल्या जाणाऱ्या तयार मालाचें परिमाण कमी कमी होत जाऊन परदेशी तयार मालाची आयात कसकशी वाढत गेली ह्याबद्दल कापसाच्या कापडाच्या व्यापाराचे पुढील आंकडे उद्बोधक आहेत.

| सन. | इंग्लंडांत हिंदी कापडाची आयात (ठाणांची संख्या) | हिंदुस्थानांत इंग्लिश कापडाची आयात (यार्डांचे आंकडे) |
|---|---|---|
| १८१४ | १२,६६,६०८ | ८,१८,२०८ |
| १८२१ | ५,३४,४९५ | १,९१,३८,७२६ |
| १८२८ | ४,२२,५०४ | ४,२८,२२,०७७ |
| १८३४ | ३,०६,०८६ | .. ... ... |
| १८३५ | .. ... | ५,१७,७७,२७७ |

वरील काळांत परदेशी कापड हिंदुस्थानांत आल्यास त्यावर शेंकडा साडेतीन टक्के जकात होती तर हिंदी कापडाच्या ग्रेटब्रिटनमधील आयातीवर शेंकडा दहा टक्के जकात होती. आगगाड्या, मोठमोठे वहातुकीचे रस्ते, मोटारी इत्यादि साधनांचा त्याकाळीं प्रायः अभाव असूनही परराष्ट्रीय व्यापार एवढ्या झपाट्यानें वाढत होता हें आश्चर्य होय. परंतु येथील कच्च्या मालाची निर्गत व परदेशी तयार मालाची येथें आयात ह्याहीपेक्षां अधिक मोठ्या प्रमाणावर व्हावी ह्यास्तव आगगाड्यांचे व इतर रस्ते वाढविण्याचें धोरण ईस्ट इंडिया कंपनीनें स्वीकारलें. लष्करी, राजकीय व व्यापारी अशा तिहेरी हेतूंचें एकत्रित कार्य म्हणजे कंपनी सरकारचें येथील वहातुकीच्या साधनांच्या सुधारणेसंबंधीचें धोरण हें होय. लॉर्ड डलहौसी साहेबांच्या कारकीर्दीपासून तों विसाव्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत आगगाड्यांच्या धंद्याची येथें जी एकसारखी वाढ चालू होती ती राजकीय व व्यापारी दृष्ट्या येथील स्वायत्ततेची केंद्रें नाहीशी करून त्यांच्या ऐवजी ब्रिटिश वर्चस्व पूर्णपणें स्थापावें, ह्याच धोरणास अनुसरून होती. ह्या शतकाच्या प्रारंभकाळीं जे अनेक दुष्काळ पडले त्यांनी सरकारची दृष्टि निवळेपर्यंत पाटबंधारे बांधून व इतर मार्गांनी शेतीची सुधारणा करण्याकडे, कालव्यांचा अंतर्गत वहातुकीस उपयोग करून घेण्याकडे व येथील उद्योगधंद्यांच्या सुस्थितीबद्दल काळजी वाहण्याकडे सरकारचे लक्ष्य मुळीच वेधलें नव्हतें. महायुद्धांतील अनुभवांमुळें आणि येथील राज्यघटनेंत हिंदी लोकांचें मत अधिकाधिक प्रभावी होऊं लागल्यामुळें सरकारच्या औद्योगिक धोरणांत अलीकडे कांहीं इष्ट बदल झालेला आहे हें खरें असलें तरी, अजूनही हिंदी लोकांची आर्थिक प्रगति

सर्व शक्य व जरूर त्या मार्गांनीं घडवून आणणें हें आपलें एक प्रमुख कर्तव्य आहे असें हिंदुस्थान सरकार समजत नाहीं. आगगाड्यांची वाढ झाल्यानें परकी मालास उपलब्ध असलेल्या गिऱ्हाइकीचें प्रमाण मात्र वाढलें, परंतु येथील बुडणाऱ्या धंद्यांस किंवा शेतकीस कोणत्याच प्रकारची विधायक मदत न झाल्यानें सर्वत्र दैन्यावस्था पसरूं लागली. आर्थिक बाबतींत सरकारनें ढवळाढवळ करूं नये ह्या अर्थशास्त्रज्ञाच्या मतानुसार आपलें धोरण ठरविणाऱ्या सरकारनें परकी कंपन्यांस येथें येऊन आगगाड्या व इतर धंदे स्थापन करण्यास हिंदी तिजोरींतूनच प्रत्यक्ष मदत केली. हिंदुस्थानांतील लोकांच्या आर्थिक परिस्थितीबद्दल आपणांवर कांहीं जबाबदारी आहे, अशी थोडीशी शंकाही 'हिंदुस्थान' सरकारास अनेक दुष्काळांनी कोट्यवधि लोक मरेपर्यंत आली नाहीं.

हिंदुस्थानचा जलमार्गानें परदेशांशी जो व्यापार चालतो त्याची गेल्या ९३ वर्षांत कसकशी वाढ होत आली आहे ह्याचे पुढील आंकड्यांवरून स्थूल अनुमान काढतां येईल.

## हिंदुस्थानचा पराराष्ट्रीय व्यापार.

| वर्षांची सरासरी. | आयात मालाची किंमत ( सोनें व चांदी धरून ) | निर्यात मालाची किंमत. |
|---|---|---|
| | कोट रुपये. | कोट रुपये |
| १८३४–४४ | ८.९ | १२.७८ |
| १८४४–५४ | १४.०३ | १८.५० |
| १८५४–६४ | ३४.०० | ३४.५१ |
| १८६४–७४ | ४५.३० | ५७.७५ |
| १८७४–८४ | ५५.०१ | ७१.७७ |
| १८८४–९४ | ८१.९१ | ९९.४७ |
| १८९४–१९०४ | ९९.६४ | १२४.७६ |
| १९०४–१९१४ | १७७.४३ | २०४.०० |
| १९१४–१९१९ | १९८.३२ | २३३.१३ |
| १९१९–१९२४ | ३१९.२६ | ३१९.४९ |
| १९२४–२५ | ३५२.५७ | ४६५.४१ |
| १९२५–२६ | २९१.४९ | ३९०.६६ |
| १९२६–२७ | २७०.०० | ३०९.०० |
| १९२७–२८ | २८२.०० | ३२९.०० |

परराष्ट्रीय व्यापाराचें एकंदर परिमाण ९० वर्षांत २० कोटींवरून सुमार ६०० कोटींवर गेलें ह्याचें मुख्य कारण वहातुकीच्या साधनांतील सुधारणा हेंच होय. जहाजें व आगगाड्या ह्यांच्या धंद्यांत गेल्या शेंपाऊणशें वर्षांत जी क्रांति घडून आली तिच्यामुळें परकी राष्ट्रांची हिंदुस्थानांतील खाण्याच्या पदार्थांस व कच्च्या मालास असलेली मागणी वृद्धिंगत होऊन परिणामकारक होण्यास मदतच झाली. ह्याच कालांत परराष्ट्रीय व्यापारांत जे दुसरे अनेक फेरबदल झाले आहेत तेही ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. पूर्वी मसाल्याचे जिन्नस, उंची कापड, कलाकुसरीचा माल

ह्यांची निर्यात होऊन सोनें-चांदीचा आयात होत असे. हळूहळू ही परिस्थिति बद-लत जाऊन हल्ली खाण्याची व गळिताची धान्यें, कातडी, कापूस व ताग इत्यादि कच्चा माल ह्यांचीच निर्यात होत असून अनेक प्रकारचा तयार व कलाकुसरीचा माल देशांत येत आहे. तसेंच, अलीकडे सामान्यतः निर्यात मालाची किंमत आया-तीहून बरीच अधिक असते. ह्या वाढाव्याचा बराचसा भाग हिंदुस्थानसरकारचा विलायतेंतील खर्च, हिंदुस्थानांत धंदा करणारे परकी व्यापारी, पेढीवाल, वहातुकीचें काम करणारे इत्यादिकांचा नफा व येथील परकी नोकरवर्गाचा घरपोच पगार हीं देण्यास खर्ची पडतो. राहिलेला वाढावा मात्र प्रतिवर्षी सोनें-चांदीच्या रूपानें देशांत आणला जातो. सोन्याचांदीची एकंदर आयात वाढत्या प्रमाणावर आहे तरी येथील लोकसंख्या व देशाचा विस्तार ही ध्यानांत घेतल्यास ती अवास्तव आहे असें म्हणतां येणार नाहीं. लोकांच्या दागदागिन्यांबद्दल व टिकाऊ संपत्तीबद्दल जुन्या कल्पना, त्यांच्या जीवनक्रमास लागणाऱ्या वस्तूंत परदेशाहून येणाऱ्या मालाचें अत्यल्प प्रमाण आणि पेढ्यांच्या गैरसोयी इत्यादि कारणांनी, तसेंच, येथील सरकारच्या विशिष्ट चलनविषयक धोरणामुळें परदेशांतून अधिक सोनें-चांदी इकडे ओढली जाते हें स्थूल मानानें खरें आहे. हिंदुस्थानाच्या आयात व्यापारापैकीं निम्याहून अधिक व्यापार इंग्लंडशी चालत असून तो देश हिंदी निर्यात मालाचा सुमारें एक चतुर्थांश भागच विकत घेतो. परंतु बहुतेक परराष्ट्रीय व्यापार युरोपीयन व्यापारी, दलाल, पेढीवाले, विमाएजंट, आगबोटीचे मालक ह्यांच्या साहाय्यानें होत असल्यानें नफ्याचा बहुतेक भाग ह्या परकी मध्यस्थांच्या खिशांतच उतरतो. येथील वहातुकीचीं साधनें सुधारून परदेशी व्यापार वाढत चालल्यानें सर्व देशभर साधारणपणें किंमतीचें मान एकसारखें होत आहे व लोकांच्या राहणीतही पुष्कळ फेरबदल घडून येत आहे. आयात-निर्यात मिळून एकंदर सुमारें ६०० कोटींचा परदेशी व्यापार धरला तरी तोही ३१ कोटी लोकसंख्येच्या मानानें अगदीं अल्प आहे असेंच म्हटलें पाहिजे येथील लोकांचें सध्याचें उत्पादन सामर्थ्य व त्यांचें राहणीचें मान ही किती कमी प्रतीची आहेत ह्याचें प्रत्यंतर दरमाणशीं परदेशी व्यापाराच्या आंकड्यांत पूर्णपणें सांपडेल.

महायुद्धामुळें हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापारांत जे फेरफार झाले ते पुढील आंकड्यांवरून स्पष्ट होतील. युद्ध सुरू होतांच परकी मालाची हिंदुस्थानांत आयात कमी होत चालली व हिंदी मालाला परराष्ट्रांत नेहमीच्या उत्पादक उपयोगाकरितां जी मागणी असावयाची तीही मर्यादित झाली. परंतु साम्राज्य सरकार व दोस्तराष्ट्रें ह्यांस युद्धसाधनें पुरविण्याचें काम ह्या देशावर पडल्यानें आणि पदार्थांचे भाव अनेक पटींनी वाढल्यानें एकंदर परदेशी देवघेवीचें परिमाण व मूल्य ह्यांत भरच पडली. निर्यात मालाची एकंदर किंमत आयातीहून पुष्कळच अधिक होऊन ती रक्कम सोनें-चांदीच्या रूपानें इकडे येणें अशक्य झालें. युद्धानंतर कांहीं वर्षें आयातीचें मान वाढत्या प्रमाणावर होतें, व निर्यात व्यापार मात्र बराच मर्यादित झाला होता. त्या-मुळें आयातीची किंमत निर्यातीहून अधिक होऊन परराष्ट्रांचें कर्ज वारण्यास सोन्याची निर्यात करणें भाग पडलें. हुंडणावळीचे दर पहिल्याप्रथम एकसारखे वाढत जाऊन पुढें एकदम उतरडीस लागले. युद्धकालीन कारणांचाच दुसरा एक परिणाम असा झाला कीं, हिंदुस्थानाच्या परदेशी व्यापारांत ग्रेटब्रिटनचें महत्त्व कमी होत जाऊन अमेरिका व जपान ह्यांचा भाग वाढला.

## महायुद्धाचा हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापारावर झालेला परिणाम दाखविणारें कोष्टक.

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| वर्ष. | १<br>आयात माल | २<br>निर्यात माल | ३<br>१ व २ एकंदर | ४<br>सोने-चांदीची आयात | ५<br>सोने-चांदीची निर्यात | ६<br>सोने-चांदीची निव्वळ आयात | ७<br>एकूण बेरीज | ८<br>सोन्याची निव्वळ आयात |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १९०९–१० ते १९१३–१४ सरासरी | १५१.६७ | २२४.२३ | ३७५.९० | ४७.२० | ८.३२ | ३८.८८ | ४३१.४२ | २८.१५ |
| १९१४–१५ ते १९१८–१९ सरासरी | १५९.२५ | २२५.८३ | ३८५.०८ | ३६.०७ | ७.३० | ३१.७७ | ४३१.४५ | ७.८८ |
| १९१९–२० | २२१.७० | ३३६.०३ | ५५७.७३ | ७८.२४ | १३.६८ | ६४.५६ | ६४९.६५ | ३५.३३ |
| १९२०–२१ | ३४७.५८ | २६७.७६ | ६१५.३४ | ३४.७६ | २६.१७ | ८.५० | ६७६.२७ | २.११ |
| १९२१–२२ | २८२.५ | २४८.६ | ५३१.२ | ३१.३ | १९.० | १२.२ | ५८१.६ | २.८ |
| १९२२–२३ | २४६.१ | ३१६.० | ५६२.२ | ६२.५ | ३.० | ६०.५ | ६२८.८ | ४१.१ |
| १९२३–२४ | २३७.१ | ३६८.३ | ६००.५ | ५३.२ | ०.६ | ४९.५ | ६५७.४ | २९.१ |
| १९२४–२५ | २५३.३ | ४००.७ | ६५३.० | ९९.२ | ५.१ | ९४.० | ७५७.९ | ७३.९ |
| १९२५–२६ | २३६.० | ३३६.८ | ६२२.८ | ५५.४ | ३.६ | ५१.१ | ६८२.१ | ३४.८ |

**४ औद्योगिक क्रान्ति**–परराष्ट्रीय व्यापारासंबंधानें वर दिलेल्या आंकड्यांवरून हिंदुस्थानांतील औद्योगिक फेरबदलांचा सहज उलगडा होईल. पूर्वी ह्या देशाचा इतर देशांशी असलेला व्यापार सध्यांहून कमी होता हें खरें आहे. परंतु हिंदवासी-यांच्या सर्व गरजा स्थानिक कारागिर व उत्पादक हे भागवीत असल्यानें औद्योगिक घटनेंत जोम व प्रमाणबद्धता ही दिसून येत असत. शिवाय, जो कांहीं व्यापार परदेशाशी चालत होता तो येथल्या तयार व दुर्मिळ मालास परदेशांतील लोकांची मागणी असल्यामुळेंच चालत असे. म्हणजे एकंदरीनें आर्थिक घटना सध्यापेक्षा निश्चल असूनही औद्योगिक बाबतींत स्वायत्तता व योग्य वाढ ह्यांचा राष्ट्रास लाभ मिळे. पुढें परकी व्यापाराचें प्रमाण वाढलें, परंतु देश मात्र परकीयांच्या तयार मालास मोठा बाजार व त्यांस कच्चा माल पुरविणारा मळा बनला. आर्थिक स्वायत्तता नाहीशी होऊन औद्योगिक जीवनही एकांगी व लुलें झालें. सरकारचें बेपर्वाईचें व विघातक आर्थिक धोरण आणि सामान्य लोकांचें चालू घडामोडींबद्दल अज्ञान ह्यांमुळें राष्ट्राचें आर्थिक नुकसान पुष्कळ होऊन संक्रमणा-वस्थेंतील दुःस्थिति अधिकच कष्टप्रद झाली. उत्पादनाच्या व विनिमयविषयक जुन्या पद्धती नाहीशा होऊन त्यांच्या जागी अधिक कार्यक्षम पद्धति याव्या ह्यांत राष्ट्राचें अंतिम हितच साधतें, हें खरें. तसेंच, परराष्ट्रांशी व्यापारी दळणवळण ठेवल्यानें एकंदर संपत्तीत भर पडून लोकांचे आचारविचारही अधिक सुसंस्कृत होतात. परंतु असले दीर्घपरिणामी फरक घडून येत असतां समाजसंस्थेंचे व्यक्तीस व वर्गास जें सहानुभूतीपूर्ण साहाय्य पाहिजे व होत असलेल्या फरकाबद्दल निदान समाजधुरी-णांस तरी जें यथार्थ ज्ञान पाहिजे त्यांचा येथें अगदींच अभाव होता. लहान धंदेवाल्यांच्या जागीं मोठमोठे कारखानदार येणें व स्वतंत्र कारागिरांचें मजूरांत परिवर्तन होणें हें आर्थिक दृष्ट्या योग्य व हितावह आहे असें धरलें तरी हिंदुस्थानांत लहान धंदे बुडून मोठे कारखाने स्थापन न होणें आणि स्वतंत्र कारागीर कायमचे बेकार होणें ह्या गोष्टी अपरिहार्य ठरत नाहींत. हिंदुस्थान सरकारनें इंग्रजी धंदे-वाल्यांच्या हितास परिपोषक असें खुल्या व्यापाराचें धोरण स्वीकारलें ह्यास निदान त्या वेळच्या इंग्रजी अर्थशास्त्रीय मतांचा तरी पाठिंबा होता. परंतु आगगाड्या व आगबोटी ह्यांच्या साहाय्यानें वहातुक करणाऱ्या परकी मंडळ्यांस प्रत्यक्षपणें व अप्रत्यक्षपणे उत्तेजन व सहाय्य देऊन हिंदवासीयांस त्यांच्या संकटकालीं त्यांचें शेतकी व इतर धंदे सुधारण्यास मदत न करणे ही गोष्ट अर्थशास्त्रास, राजनीतीस अगर नीतिमत्तेस धरून झाली असें म्हणतां येत नाहीं. औद्योगिक क्रान्तीच्या संक्रमणावस्थेंतील अनिष्ट परिणामांकडे 'समाजाचें हित तें शेवटीं व्यक्तींचें हित,' ह्या वचनावर विश्वास ठेवून कानाडोळा करावा लागतो. परंतु जेथें क्रान्तीचा सर्व फायदा परक्यास मिळाव-याचा व जेथें सरकारच परकी तेथें दारिद्र्य, दुष्काळ, रोगराई, बेकारी ह्यांच्या द्वारा नव्या औद्योगिक मनूची लोकांस ओळख पटावी ह्यांत आश्चर्य नाहीं. निव्वळ परकी व्यापाराच्या आंकड्यांकडे बोट दाखवून किंवा लोकांस चार छानछोकीच्या विलायती वस्तू वापरण्याची संवय झाल्यास तिची साक्ष देऊन येथील औद्योगिक परिस्थिति सुधारली असें म्हणणें चूक आहे. व्यापारवृद्धीचें श्रेय इंग्रजी राज्यास आणि शेतकी व उद्योगधंदे बुडाल्याचें पाप सामाजिक रीतिभाती व दैवी प्रकोप ह्यांच्या माथ्यावर, ही विभागणी अर्थशास्त्रास, राजनीतीस अगर न्यायास विसंगत

अशी समजली पाहिजे. अनेक प्रकारच्या तयार वस्तू परदेशांतून फार मोठ्या प्रमाणात येऊं लागल्या व येथील धान्य व कच्चा माल परदेशच्या बाजारांत विकूं लागला तर तेवढ्यावरून येथील शेतीची स्थिति सुधारून लोकांचे वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य वाढलें असें अनुमान काढणें किती भ्रामक आहे हें मागें अंतर्राष्ट्रीय व्यापाराचें सामान्य विवेचन केलेलें आहे त्यावरून सहज दिसून येईल. धान्य व कच्चा माल ह्यांच्या निर्यातीवरून शेतकीचा धंदा ऊर्जितावस्थेस येत चालला असें अनुमान काढण्या ऐवजी, 'राजकीय व औद्योगिक बाबतीत परराष्ट्रांवर आमचें जें अवलंबन सुरूं झालें त्याचें मूल्य म्हणून आम्हांस प्रतिवर्षी वाढतें माप त्यांच्या पदरांत टाकणें आवश्यक आहे,' असें म्हटलें तर त्यात निव्वळ राजकीय दुराग्रह न सांपडता खरा आर्थिक अनुभवच आढळेल. स्वस्त, चकाकदार परदेशी वस्तूंच्या जोरदार ओघांत येथील धंदेवाले वाहून गेले आणि जमिनीच्या उत्पादकतेवर त्यांच्या चरितार्थाचा ताण पडला ह्यापेक्षांही उत्तेजक असा पुरावा काहीच सांपडणार नाही. हिंदुस्थानाच्या परदेशी व्यापारावरून एकंदर देशाच्या आर्थिक स्थितीविषयी विश्वसनीय अनुमान काढण्यापूर्वी त्या व्यापाराचें थोडेसें पृथक्करण करणें जरूर आहे.

## हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापाराबद्दल आंकडे.
## प्रमुख जिनसांची व्यापाराच्या एकंदर परिमाणाशीं शेंकडेवारी.

### आयात माल.

| जिन्नस | १९०९–१४ सरासरी | १९१४–१९ सरासरी | १९२०–२१ | १९२३–२४ | १९२५–२६ | १९२७–२८ |
|---|---|---|---|---|---|---|
| तयार सुती कापड | ३५ | ३६ | २१ | २९ | [illegible] | २४ |
| लोखंड व पोलाद | ७ | ६ | ८ | ८ | ८ | ११ |
| यंत्रें | ४ | ४ | १३ | ८ | ७ | ६ |
| साखर | ९ | १० | १० | ७ | ७ | ६ |
| आगगाड्यांचें सामान | ४ | ५ | ६ | ५ | २ | २ |
| चाकू, कात्र्या, चिनी भांडीं वगैरे | २ | २ | २ | २ | २ | २ |
| जमीनींतील तेलें | ३ | ३ | ३ | ४ | ४ | ४ |
| रेशीम | २ | २ | २ | १ | १ | २ |
| इतर जिन्नस | ३३ | ३३ | ३४ | ३२ | ४० | ३८ |

### निर्यात व्यापार.

| जिन्नस | १९०९–१४ सरासरी | १९१४–१९ सरासरी | १९२०–२१ | १९२३–२४ | १९२५–२६ | १९२७–२८ |
|---|---|---|---|---|---|---|
| ताग ( कच्चा व तयार माल ) | १९ | २५ | २४ | १८ | २६ | १९ |
| कापूस ( ,, ,, ) | १५ | १६ | १९ | ३१ | २८ | १७ |
| खाण्याचीं धान्यें | २१ | १७ | ५ | १५ | १३ | १३ |
| गळिताचीं धान्यें | ११ | ६ | ८ | ९ | ८ | ८ |
| चहा | ६ | ८ | ७ | ९ | ७ | १० |
| कातडीं | ७ | ८ | १२ | २ | २ | ३ |
| इतर जिन्नस | २१ | २० | २५ | १६ | १६ | २० |

## ज्या देशांशीं व्यापार चालतो त्यांची एकंदर व्यापारांत शेंकडेवारी.

### आयात माल.

| देश. | १९०९–१४ सरासरी | १९१४–१९ सरासरी | १९२१–२२ | १९२३–२४ | १९२५–२६ | १९२६–२७ |
|---|---|---|---|---|---|---|
| इंग्लंड | ६३ | ३६ | ५७ | ५५ | ५१ | ४८ |
| ब्रिटिश साम्राज्याचे इतर भाग | ७ | ९ | १० | ७ | ८ | ७ |
| अमेरिका | ३ | ७ | ८ | ६ | ७ | ८ |
| जपान | २ | १० | ५ | ६ | ८ | ७ |
| जावा | ६ | ८ | ९ | ६ | ६ | ६ |
| जर्मनी | ६ | १ | ३ | ५ | ६ | ७ |
| इतर देश | १३ | ९ | ८ | १२ | १४ | १६ |

### निर्यात व्यापार.

| देश. | १९०९–१४ सरासरी | १९१४–१९ सरासरी | १९२१–२२ | १९२३–२४ | १९२५–२६ | १९२६–२७ |
|---|---|---|---|---|---|---|
| इंग्लंड | २५ | ३१ | २० | २५ | २१ | २१ |
| ब्रिटिश साम्राज्याचे इतर भाग | १७ | २१ | २१ | १४ | १४ | १७ |
| अमेरिका | ७ | १२ | १० | ९ | १० | ११ |
| जपान | ७ | ११ | ६ | १४ | १५ | १३ |
| फ्रान्स | ७ | ४ | ४ | ५ | ६ | ५ |
| जर्मनी | १० | १ | ७ | ७ | ७ | ७ |
| इतर देश | २७ | २० | २२ | २६ | २७ | २६ |

## हिंदुस्थानांतून परदेशीं पाठविलया जाणाऱ्या कांहीं जिनसांचें त्यांच्या येथील एकंदर उत्पन्नाशीं शेंकडा प्रमाण.

| जिन्नस | महायुद्धा-पूर्वीची सरासरी | युद्धकालीन सरासरी | युद्धोत्तर कालीन सरासरी | १९२४–२५ | १९२५–२६ |
|---|---|---|---|---|---|
| तांदूळ | ९ | ५ | ५ | ७ | ८ |
| गहू | १४ | ९ | ३ | १८ | ३ |
| चहा | ९६ | ८९ | ९५ | ९१ | ९० |
| नीळ | ४० | ४४ | २७ | १६ | ७ |
| खसखस व मोहरी | २३ | ८ | १९ | २३ | १३ |
| जवस | ७३ | ६३ | ५९ | ६९ | ७७ |
| तीळ | २५ | ८ | १६ | ६ | १० |
| भुइमूग | ३५ | १२ | ९ | २७ | २४ |
| कापूस | ५६ | ५१ | ६१ | ५५ | ६९ |
| ताग | ५१ | ३१ | ४८ | ४८ | ४६ |

## एकंदर आयात व निर्यात मालांतील कांही प्रमुख जिनसांची वर्गवारी.

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| | आयात | निर्यात | आयात | निर्यात | आयात | निर्यात | आयात | निर्यात | आयात | निर्यात |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ खाण्यापिण्याचे पदार्थ व तंबाकू | २१·८ | ६२·९ | २३·३ | ५९·५ | ३७·८ | ५९·६ | ३६·४ | १०५·४ | ३२·९ | ८२·२ |
| २ कच्चा व अर्धवट तयार माल | १०·० | १०४·३ | ९·८ | ८३·४ | १९·० | १४५·९ | २१·० | १९२·० | २६·९ | १९९·९ |
| ३ तयार माल | १११·७ | ५०·३ | १०८·२ | ६८·४ | १९२·५ | ७७·९ | १८५·५ | ८४·२ | १६८·३ | ८९·५ |
| ४ जिवंत प्राणी | ·४ | ·३ | ·५ | ·२ | ·२ | ·३ | ·३ | ·३ | ·३ | ·३ |
| ५ डाकेनें पाठविलेले जिन्नस | १·४ | ·९ | १२·४ | १·३ | २·५ | २·५ | २·४ | २·६ | २·० | २·७ |
| एकंदर | १४५·८ | २१९·४ | १४७·८ | २१५·९ | २५४·० | २८६·३ | २४०·६ | ३८४·६ | २२६·१ | ३७४·८ |

## आयात व निर्गत व्यापारांतील प्रमुख जिनसांची एकंदर किंमत.

### आयात ( आंकडे कोट रुपयांचे आहेत )

| जिन्नस | महायुद्धापूर्वीची सरासरी | युद्धकालीन सरासरी | युद्धोत्तरकालीन सरासरी | १९२४–२५ | १९२७–२८ |
|---|---|---|---|---|---|
| कापूस कच्चा | १·० | ·४ | २·१ | ४·२ | ७२·० |
| सूत व सुती कापड | ५२·२१ | ५२·३८ | ७१·१ | ८२·३ | |
| लोखंडी व पोलादी सामान | ११·१ | ९·६ | २१·० | १८·९ | २८·४ |
| साखर | १३·१७ | १४·७० | १९·९ | २०·९ | १४·९ |
| यंत्रें | ५·६ | ५·११ | २७·६ | १४·१ | १५·९ |
| तेलें | ३·९४ | ४·२८ | ८·२ | ९·६ | ११·१ |
| आगगाड्यांचें सामान | ६·११ | ३·४ | १०·९ | ६·०७ | ८·८ |
| चाकू, कात्र्या, चिनीची भांडी वगैरे | ३·१ | २·७९ | ५·७ | ४·९ | ५·२८ |
| गाड्या ( वाहनें ) | १·७४ | १·६२ | ६·२ | ४·४१ | ७·७ |
| कागद वगैरे | १·८२ | २·०२ | ३·४ | ३·० | ३·० |
| साबण | ·६ | ·९ | १·७ | १·३ | १·६१ |

## निर्यात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कच्चा व निकामी कापूस | ३३·२७ | ३३·६८ | ६४·७३ | ९२·२ | ४८·१५ |
| कच्चा ताग | २२·२० | १२·८० | १९·५ | २९·० | ३०·६ |
| कापसाचे सूत व कापड | ११·४० | ११·७२ | १७·७ | ११·२८ | ८·६७ |
| ताग | २०·२४ | ४०·१९ | ४३·१६ | ५१·७६ | ५३·६ |
| धान्यें, डाळी व पीठ | ४५·८१ | ३७·४१ | ३२·८२ | ६५·० | ४३·० |
| चहा | १३·०६ | १७·५४ | २०·९२ | ३३·३९ | ३२·५ |
| गळिताचे पदार्थ | २४·३६ | १२·१७ | २३·५३ | ३३·१६ | २६·६९ |
| कातडीं, बिन रंगवलेलीं | १०·३१ | ९·८८ | ९·४५ | ६·७७ | ८·८० |
| कातडीं, रंगविलेलीं | ४·२९ | ७·१९ | ६·२४ | ७·२८ | ९·७ |

**५ व्यापाराचा आढावा**— वरील माहितीवरून प्रतिवर्षी हिंदुस्थानांतून परदेशी पाठविल्या जाणाऱ्या मालाची एकंदर किंमत परदेशांहून येथें येणाऱ्या मालाच्या एकंदर किंमतीहून पुष्कळच अधिक असते हें दिसून येईल. निर्यात व आयात मालाच्या किंमतीतील ह्या फरकास हिंदुस्थानास अनुकूल असलेला व्यापारी आढावा असे म्हणतात. मागें[1] परराष्ट्रीय देवघेवीबद्दल जें विवेचन केलेलें आहे त्यावरून निर्यात व आयात व्यापारांतील फरक हा राष्ट्राच्या आर्थिक स्थितीचा पूर्णपणें निदर्शक मानतां येत नाहीं, हें वाचकांस दिसून आलें असेलच. येथील सरकारी व परकी नोकर आणि परकी धंदेवाले ह्यांच्या कमाईप्रीत्यर्थ त्यांच्या राष्ट्रास पाठवाव्या लागणाऱ्या संपत्तीनें वरील 'अनुकूल' शिलकेचा बराच मोठा भाग व्यापलेला असतो हें ध्यानांत घेणें आवश्यक आहे. महायुद्धापूर्वीचीं पांच वर्षे व महायुद्धाची पांच वर्षे ह्या कालांत सरासरीनें प्रतिवर्षी आयातीहून निर्यात सुमारें ५० कोटींनी अधिक असे. लढाईनंतर दोन तीन वर्षे येथील निर्यातीस आळा बसल्याने आणि आधींच मागवून ठेवलेला परदेशी माल भराभर देशांत येऊं

१ मागें पानें ८१–८६ पहा.

लागल्यानें निर्यातीहून आयातच अधिक किंमतीची झाली. ही 'प्रतिकूल' शिल्लक १९२०-२१ साली सुमारें ८० कोट रुपये व १९२१-२२ सालीं ३४ कोट रुपये होती. १९२२-२३ सालापासून मात्र पुन्हां निर्यात व आयात ह्यांच्यांतील परस्पर प्रमाण नित्यपदावर येत आहे. फक्त वस्तूंच्या देवघेवीबद्दलचे आंकडे जमवून तयार केलेलें पुढील कोष्टक ह्या बाबतीत उपयुक्त होईल.

### परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा.

( + ) निव्वळ निर्यात ( — ) निव्वळ आयात.

( आंकडे कोट रुपयाचे आहेत. )

| | १९२२-२३ | १९२३-२४ | १९२५-२६ | १९२६-२७ |
|---|---|---|---|---|
| हिंदी मालाची निर्यात ( बिन सरकारी ) | +२९९.१ | +३४८.५ | +३७४.८ | +३०१.५ |
| परदेशी माल हिंदुस्थानांत उतरून त्याची परत निर्यात ( खाजगी ) | +१५.१ | +१३.३ | +१०.४ | +८.१० |
| परदेशी मालाची आयात ( खाजगी ) | −२२४.३ | −२१७.३ | −२२४.२ | −२३०.०० |
| खासगी व्यापाराची शिल्लक | +९०.० | +१४४.८ | +१६१.१ | +७९.५ |
| सोनें ( खाजगी ) | −४१.८ | −२९.१ | −३४.५ | −१९.५ |
| चांदी ( खाजगी ) | −१८.१ | −१८.३ | −१७.१ | −२०.० |
| चलनी नोटा (खाजगी) | − .९ | −१.० | +१ | − .१४ |
| सोनें, चांदी व चलन ह्यांच्या देवघेवीची शिल्लक | −६०.२ | −४८.६ | −५१.८ | −३९.५० |
| परदेशी व्यापाराची एकंदर शिल्लक | +२९.७० | +९६.२ | +१०९.२ | +३८.५० |

**६ हिंदुस्थानांत सोन्याचांदीची आयात**-हिंदुस्थानास 'अनुकूल' समजल्या जाणाऱ्या व्यापारी शिलकेचा पुष्कळसा भाग परकीयांच्या कामगिऱ्याप्रीत्यर्थ वेतन म्हणून खर्ची पडतो व कांहीं अदृश्य मार्गानें हिंदुस्थानाच्या खाती जमा होतो. राहिलेली शिल्लक मात्र सोन्याचांदीच्या रूपानें हिंदुस्थानांत आणली जाते. युद्धकाली कोणतेंच राष्ट्र आपल्या देशांतून सोनें-चांदी, व विशेषतः सोनें, बाहेर जाऊं देत नसल्यानें त्या वेळी 'अनुकूल' व्यापारी शिल्लक पुष्कळ असूनही सोन्याचांदीची आयात मर्यादित झाली. सरकारास मात्र येथील चलनविषयक गरजा भागवि-

ण्यास चांदी आणावी लागे. सोन्याचांदीच्या आयातीचें परिमाण पुढील आंकड्यां-वरून दिसून येईल.

## सोन्याचांदीचा व्यापार.

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| वर्ष | सोनें | | | | चांदी | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | आयात | | निर्यात | | आयात | | निर्यात | |
| | खाजगी | सरकारी | खाजगी | सरकारी | खाजगी | सरकारी | खाजगी | सरकारी |
| महायुद्धाच्या पूर्वीची सरासरी | ३२·७ | ·००२ | ३·९ | ·७ | १०·८ | ३·५ | ३·६ | ·०१ |
| महायुद्धकालीन सरासरी | १०·५ | १·५ | २·९ | १·२ | १·६ | २२·३ | १·७ | १·२ |
| १९२०·२१ | १२·५ | ११·० | २१·३ | ·०६ | १०·९ | ·२ | १·४ | ·२ |
| १९२१·२२ | १३·८ | ... | १६·६ | ·०७ | १७·३ | ·१ | २·३ | ·००२ |
| १९२२·२३ | ४१·३ | ·०१ | ·१ | ... | २०·७ | ·२ | २·५ | ·५ |
| १९२३·२४ | २९·२ | ... | ·०६ | ... | २१·७ | ·२ | ३·३ | ·००५ |

महायुद्धापूर्वीच्या काळापासून आजतागाईत प्रतिवर्षी सोन्याचांदीची निव्वळ आयात किती झाली हें ध्यानात येण्यास पुढील कोष्टक उपयोगी पडेल.

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| वर्ष | सोनें | | चांदी | | एकंदर निव्वळ आयात |
|---|---|---|---|---|---|
| | आयात | निर्यात | आयात | निर्यात | |
| युद्धाच्या पूर्वीच्या काळची सरासरी | ३२·७ | ३·९ | १०·८ | ३·६ | ३६·० |
| महायुद्धकालीन सरासरी | १०·६ | २·९ | ४·५ | १·७ | १०·४ |
| युद्धोत्तर पांच वर्षांची सरासरी | २१·५ | ९·० | १४·१ | २·६ | २४·० |
| १९२४–२५ | ७४·२ | ·३ | २४·२ | ४·२ | ९३·९ |
| १९२५–२६ | ३५·२ | ·३ | १९·८ | २·७ | ५२·० |

हिंदुस्थानासारख्या दरिद्री देशांत दरवर्षी एवढ्या किंमतीची सोनें-चांदी आणली जाते ह्याचें सकृद्दर्शनीं अनेकांस आश्चर्य वाटेल. परंतु देशाचा विस्तार व लोकसंख्या ह्यांच्या मानानें वरील आयात म्हणण्यासारखी अवास्तव नाही, हे अमेरिकेसारख्या औद्योगिक दृष्ट्या अत्यंत पुढारलेल्या राष्ट्रांतील सोन्याचांदीच्या परिमाणावरून सहज दिसून येईल. इतर पाश्चात्य व पुढारलेल्या देशांस त्यांच्या चलनविषयक गरजा भागविण्यास पुरेसें सोनें-चांदी, विशेषतः सोनें, न मिळाल्यानें तेथील लोक ' हिंदुस्थान म्हणजे चांदी कायमची मुरण्याची एक खांच आहे, ' ' हिंदुस्थानाची सुवर्णविषयक भूक अधाशीपणाची आहे ' असा कांगावा करीत असतात. सर्व जगाच्या विनिमयाचा एकत्रपणें विचार केल्यास सोनें व चांदी ह्यांचा विनिमयसाधन म्हणून शक्य तितका मितव्यय करणे जरूर व हितावह आहे हे प्रास्ताविक भागातील चलनविषयक सामान्य [1]विवेचनावरून दिसून येईल. परंतु सोन्या-चांदीच्या पुरवठ्याचा निव्वळ हिंदुस्थानाच्या दृष्टीनें अगर इतर राष्ट्रांच्या ह्या बाबतीतील धोरणाशीं सापेक्षतेनें विचार करता परदेशांहून येथें येणाऱ्या सोन्यास प्रतिबंध करणें न्याय्य व इष्ट ठरणार नाही. हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांतच एकंदर उपलब्ध पुरवठ्याचा सध्यांहून अधिक उत्पादक मार्गानें उपयोग होणें इष्ट आहे हें मात्र कबूल केलें पाहिजे. धंदेविषयक प्रगति, पेढ्यांच्या सोयीचा विस्तार आणि चलनपद्धतीचें वैशिष्ट्य ह्याच्यावर सोन्याचांदीचा उत्पादक मार्गांनी विनियोग होण्याची आशा बहुंशी अवलंबून आहे. लोकांच्या सामाजिक रीतिभाती व त्यांची शैक्षणिक प्रगति ह्यास अनुसरूनही प्रस्तुत दिशेने बरीच सुधारणा होत आहे.

**७ व्यापारविषयक संघटनाः**— जगाच्या निरनिराळ्या भागांतील लोकांत अनियंत्रित देवघेव सुरू झाल्यास प्रत्येक इसमास सर्वांत उत्पादक मार्गानें आपल्या श्रमाचा व भांडवलाचा विनियोग करणे शक्य होईल आणि उत्पादनाची कार्यक्षमता अधिकांत अधिक झाल्याने उपभोक्ते ह्या नात्यानें कमी किंमतीचा सर्वांस लाभ होईल, ही खुल्या व्यापाराच्या पुरस्कर्त्यांची विचारसरणी मागें नमूद केलेली [2]आहे. ह्या तत्त्वास अनुसरून हिंदुस्थानाचें व्यापारी धोरण ठरविल्यानें आजवर राष्ट्राचें किती नुकसान झालेलें आहे व हेंच धोरण चालू राहिल्यास पुढें होण्याची खात्री आहे ह्याबद्दल स्थूल निर्देश मागील कांहीं प्रकरणांत ओघानें केलेला आहे व पुढील प्रकरणांत ह्याच प्रश्नाचा प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे. परंतु परराष्ट्रीय व्यापार अंतर्गत व्यापाराप्रमाणेंच अनियंत्रित असावा असें धरून चालले तरी परराष्ट्रांशीं देवघेव होऊन येथील उत्पादकांच्या व उपभोक्त्यांच्या पदरांत जो लाभ पडावयाचा तो असंख्य मध्यस्थांनीं, व बहुतांशी परक्या मध्यस्थांनी, गिळंकृत करावा ही स्थिति हितावह अगर अपरिहार्य आहे असें म्हणतां येणार नाही. अंतर्गत

---

१ मागें पानें ६४-६७ पहा. २ मागें पानें ८६-८९ पहा.

व्यापारांतही उत्पादक व उपभोक्ते ह्यांचा परस्पर संयोग शक्य तितक्या प्रत्यक्षपणें झाल्यास त्यांत दोघांचाही अधिक फायदा होतो असा अनुभव आहे. अजून तरी हिंदी उत्पादक व हिंदी उपभोक्ते ह्यांच्यांतील अंतर परकी उत्पादक आणि उपभोक्ते व अनुक्रमें हिंदी उपभोक्ते आणि उत्पादक ह्यांच्यांतील अंतराहून पुष्कळच कमी आहे. शिवाय अंतर्गत व्यापारांतील मध्यस्थ हिंदुस्थानचेच कायमचे रहिवाशी असल्यानें त्यांच्या नफ्यामुळें 'राष्ट्रा' चें नुकसान होतें असे म्हणतां येत नाही. व्यक्तिशः उत्पादक आणि उपभोक्ते व एकंदर हिंदी राष्ट्र ह्या दोहोंच्या दृष्टीनें परराष्ट्रीय व्यापाराच्या संघटनेंत अनेक परकी मध्यस्थांचें जें वर्चस्व आहे तें अनिष्ट व नुकसानकारक समजलें जातें.

कापूस, गहूं, गळिताचीं धान्यें, कातडी, ताग इत्यादि निर्गत व्यापारांतील प्रमुख वस्तूंचे उदाहरण घेतल्यास आपणांस असें दिसून येईल की, हिंदी उत्पादक आणि परकी उपभोक्ता ह्यांच्या दरम्यान अनेक प्रकारचे मध्यस्थ असून त्यांपैकी बहुतेक परकीच आहेत, आणि सहाजीकच त्यांच्या कमाईचा बहुतेक भाग देशांतून बाहेर जातो. कच्च्या तागाच्या व्यापाराचे उदाहरण घेतल्यास आपणांस मध्यस्थांच्या अनेक प्रकाराची व दर्जाची माहिती होईल. तागाची लागवड करणारा शेतकरी आपला माल स्वतःच्या अगर शेजारच्या गांवातील एखाद्या बेपाऱ्यास विकतो. हा बेपारीही एखाद्या महाजनाशी अगर दलालाशी धंदा करीत असतो. स्थानिक दलाल व महाजन आपल्या हातांतील माल एखाद्या तागाच्या परराष्ट्रीय व्यापार करणाऱ्या मंडळीच्या फिरत्या अगर स्थायिक गुमास्त्यास विकून टाकतात. तागाची निर्यात करणाऱ्या मंडळ्या बहुतेक परकी असून, त्या तागाची वहातुकही परकी मंडळीच्या आगबोटींतून केली जाते. ह्या मालाचा विमा उतरणें अगर त्या तारणावर हुंडी काढून ती पटविणें वगैरे आनुषंगिक व्यवहारही बहुतेक परकी विमा व पेढीवाल्या मंडळ्यांकडूनच होतात. निर्यात व्यापाराच्या इतर प्रमुख जिनसांच्या देवघेवीच्या बाबतीत वरीलप्रमाणेच विकत घेणारे व विकणारे ह्यांची कमी अधिक लांब सांखळी असून तिनें हिंदी उत्पादक व परकी उपभोक्ते हे जोडले जातात. आयात व्यापाराचीही रचना ह्याच स्वरूपाची असते. कलकत्ता, मद्रास, मुंबई, कराची, रंगून इत्यादि मोठ्या बंदरांच्या ठिकाणीं आयात मालाचे घाऊक व्यापारी असतात. देशाच्या इतर लहान मोठ्या भागात असलेले घाऊक व किरकोळ दुकानदार ह्याच मोठ्या व्यापाऱ्यांकडून खरेदी करून आपापल्या गिऱ्हाइकांस नफ्यानें विक्री करतात. आयात व्यापाराच्या संघटनेंतील बहुतेक मध्यस्थ हिंदी असतात व आयात माल सामान्यतः समाजाच्या वरच्या वर्गांतील लोकांत अधिक खपतो; ह्यामुळें त्या मध्यस्थांची संख्या कमी करण्याच्या प्रश्नास एकंदर राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें विशेष महत्त्व दिलें जात नाहीं. परंतु परदेशीं पाठवि-

त्या जाणाऱ्या व्यापारांत बहुतेक सर्व मध्यस्थ परकी असल्यानें आणि त्यांच्याच खिशांत त्या व्यापाराचा बहुतेक नफा पडत असल्यानें हिंदी उत्पादकांस परकी गिऱ्हाइकानें दिलेल्या किंमतीचा शक्य तेवढा मोठा भाग कसा मिळेल व हिंदी व्यापाराची कमाई परराष्ट्रांत शक्य तेवढी कमी कशी जाईल ह्या प्रश्नांचा निकडीनें विचार करणें जरूर पडतें.

उत्पादकांच्या सहकारी मंडळ्या स्थापून विक्रीचें काम त्यांजवर सोपविल्यास मध्यस्थांच्या कमाईस कांट बसून तिच्यापैकीं बराचसा भाग उत्पादकांस मिळेल. तारायंत्र, टपाल व बिनतारी संदेश ह्यांच्या साहाय्यानें सर्व जगांतील बाजारभावांची बातमी ताबडतोब मिळविणें शक्य झालें आहे. पंजाब, वऱ्हाड, कर्नाटक इत्यादि भागांत मालाची विक्री करण्याकरितां सहकारी मंडळ्या स्थापन झाल्या असून त्यांच्या साहाय्यानें शेतकऱ्यांस आपल्या मालाची निव्वळ किंमत थोडीफार वाढवितां आली आहे. परंतु प्रत्यक्ष परकी गिऱ्हाइकाशीं संबंध ठेवणाऱ्या आणि मोठमोठ्या बंदरांतून निर्यात व्यापाराचें नियमन करणाऱ्या सहकारी संस्था अजून अस्तित्वांत आल्या नाहींत. आयात व निर्गत ह्या दोन्ही व्यापारांतील मध्यवर्ती बाजार आधुनिक पाश्चात्य पद्धतीबरहुकूम चालविले जातात. कापूस, ताग, धान्य, कापड ह्यांचे मुंबई, कलकत्ता वगैरे ठिकाणांचे घाऊक बाजार सुसंघटित आहेत. अलीकडे देशाच्या आतल्या भागांतील देवघेवीही संघटित स्वरूपानें करण्याचा प्रयत्न पडत आहे. श्रमविभागाच्या तत्त्वावर उभारलेल्या अलीकडील आर्थिक घटनेंत व्यापाऱ्याचें, दलालाचें व इतर मध्यस्थाचें महत्व विशेष आहे हें प्रास्ताविक विवेचनांत स्पष्ट केलेंच आहे. परंतु वाजवीपेक्षा अधिक मध्यस्थ व व्यापारी असल्यास उत्पादक व उपभोक्ते ह्या दोहोंचें नुकसान होतें, एवढेंच नव्हे तर खरी मागणी व पुरवठा ह्यांचा मेळ न घालतां आल्यामुळें नुकसान होऊन त्याचे अनिष्ट परिणाम समाजांतील सर्व वर्गांस भोगावे लागतात. ह्यास्तव जरूर तेवढेच मध्यस्थ ठेवून व त्यांचीही संघटना करून विनिमय पार पाडला पाहिजे. परकी मध्यस्थांच्या जागा हिंदी व्यापाऱ्यांनीं व दलालांनीं स्वतःच्या कार्यक्षमतेनें व लोकांच्या सहानुभूतीनें पटकाविणें आणि शक्य तितका कार्यभाग उत्पादकांच्या सहकारी मंडळ्यांमार्फत उरकणें ह्या दोन सुधारणा घडून आल्यास शेतकरी वर्ग व एकंदर राष्ट्र ह्यांच्या संपत्तींत भर पडल्याशिवाय राहणार नाहीं. माल विक्रीकरतां तयार करणें, तो इष्ट स्थळीं पाठविणें, वजनें-मापें सुधारणें, आपल्या मालाची गिऱ्हाइकांस माहिती करून देणें, शक्य त्या नवीन गरजा शोधून काढून त्या भागविणें, देवघेवीच्या ओघानें करावे लागणारे अनेक व्यवहार चोखपणें करणें इत्यादि बाबतींतही एकसारखी सुधारणा घडवून आणण्याकडे उत्पादकांचा कटाक्ष पाहिजे. सध्यांच्या स्पर्धात्मक काळांत सर्व प्रकारचा माल गिऱ्हाइकांच्या हातांत कमीत कमी किंमतीस कसा देतां येईल ह्याची प्रत्येक उत्पादकास नेहमीं काळजी वहावी

लागते. उत्पादनमूल्य कमी करण्याचे दोन मार्ग म्हणजे प्रत्यक्ष उत्पादनाच्या स्थळी, शेतांत अगर कारखान्यांत, भांडवल व श्रम ह्यांचा अधिकांत अधिक कार्यक्षम रीतीनें उपयोग करणें व उत्पादनक्षेत्रापासून गिऱ्हाइकांपर्यंत माल जाऊन पडण्यांत होणारा अधिक खर्च शक्य तितका कमी करणें, हे होत. व्यापारी संघटना प्रगमनशील व कार्यक्षम ठेवल्यानें उत्पादक व उपभोक्ते ह्या दोन्ही नात्यानें येथील जनतेचा फायदाच होईल.

**८ दळणवळणाचीं व वहातुकीचीं साधनें:**— विनिमयाचें क्षेत्र व उत्पादनाचे परिमाण वाढविण्यास वहातुकीच्या व दळणवळणाच्या साधनात सुधारणा घडून येणं किती आवश्यक आहे ह्याबद्दल सामान्य विवेचन मागें प्रास्ताविक भागांत आलेलेंच आहे. हिंदुस्थानांतील मोठमोठे पर्वत, रुंद व खोल नद्या व दाट जंगलें ह्यांच्यामुळें निरनिराळ्या भागांतील लोकांचे परस्पर आर्थिक संबंध निकट न होतां प्रत्येक भाग कित्येक शतकें सामान्यतः तुटक व स्वायत्तच राहिला. वहातुकीची साधनें असमाधानकारक व धोक्याची असल्यानें देवघेवीत किंवा लोकांच्या गरजांत विशेष वाढ झाली नाही. साहजीकपणें उत्पादनही लहान प्रमाणावर आणि श्रमविभागाच्या पूर्ण साहाय्याखेरिज केलें जाई. परराष्ट्राशीं हिंदुस्थानाचा व्यापार त्या मानानें पुष्कळच मोठ्या प्रमाणावर चाले, आणि जहाजे बाधणें व चालविणें ह्या धंद्यांत वाकबगारी मिळविल्यानें हिंदी नाविकांस व हिंदी धंदेवाल्यास भरपूर वेतन मिळे. ईस्ट इंडिया कंपनीनें आपल्या वाढत्या अंमलाचा व्यापारी फायद्यास उपयोग करण्याचें ठरवून आगगाड्या व रस्ते ह्यांची बरीच सुधारणा केली. पूर्वीच्या अमदानीतही रस्त्याच्या सुधारणेस प्रजाहितदक्ष राजे पुष्कळ महत्त्व देत. परंतु त्यावेळीं फारतर विशेष मोठ्या शहरांच्या दरम्यानच चागले रस्ते असत आणि त्या रस्त्यांवरही धोका पुष्कळ असे. आगगाड्या, मोटारी ह्या तर अर्थात त्यावेळी नव्हत्याच, आणि सामान्यतः सर्व खेडी आर्थिक दृष्ट्या स्वायत्तच असत. १८६९ साली सुएझचा कालवा बांधला गेल्यानें औद्योगिक दृष्ट्या, म्हणजे यांत्रिक साधनाच्या साहाय्याने व मोठ्या प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन करण्याच्या मानानें, पुढारलेल्या अनेक पाश्चात्य राष्ट्रांस हिंदुस्थानांतील कोट्यवधि गिऱ्हाइकें जवळ झाली. त्यांतही वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या लोखंडी जहाजातून अगदी स्वस्त दराने मालाची वहातुक करणें शक्य झाल्यानें इंग्लंड व काहीं इतर पाश्चात्य राष्ट्रें ह्यांचा माल हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर स्वस्त व मुबलकपणें येऊन पडूं लागला. त्याची देशाच्या सर्व भागांत जारीनें विक्री व्हावी व त्या त्या भागांतील धान्य व कच्चा माल स्वस्त भावानें व अगदी कमी वहातुकीच्या खर्चानें परदेशांत नेतां यावा ह्या धोरणानें आगगाड्या व व्यापारी रस्ते ह्यांच्या परिमाणांत व स्थितींत इंग्रज सरकारने पुष्कळच सुधारणा घडवून आणली. ह्याचा परिणाम येथील लोकांचे शेतकी खेरीज इतर धंदे बुड-

ण्यांत कसा झाला हें पुन्हां निराळें सांगण्यास नको. सामाजिक रीतिभाती, शिक्षणविषयक प्रगति, विनिमयविषयक स्वायत्तता ह्या बाबतीतही वहातुकीची साधनें वाढल्यानें क्रांति घडून आलेली आहे, हें स्पष्ट दिसत आहे.

जहाजांतून मालाची ने-आण करण्यास आगगाड्यांतून वहातुक करण्यापेक्षा कमी खर्च येतो व परकी जहाजवाल्या मंडळ्यांस आपल्या एकंदर व्यवहारावर नफा काढून वैयक्तिक सफरी व जिन्नस ह्यांची वहातुक करण्याचे दर कमी-अधिक करता येतात. ह्या आर्थिक व व्यापारी सत्याचा अनुभव जुन्या व नव्या अनेक हिंदी धंदेवाल्यांस आलेला आहे. इंग्लंडहून मुंबई अगर कलकत्ता येथें माल आणण्यास जेवढा खर्च येतो त्याहून हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानात माल आगगाडीनें हलविण्यास अनेक वेळा जास्त खर्च येतो. उदाहरणार्थ, बेल्जमहून मुंबईस पोलादी माल आणण्यास जो खर्च येतो तो मुंबईहून सुमारें अडीचशें मैल दूर असलेल्या महाराष्ट्रातील एका कारखान्यातून मुंबईस माल नेण्यास लागणाऱ्या खर्चाहून कमी असतो. निर्गत मालावर कमी दर व आयात मालावर अधिक दर असे सामान्यतः हिंदी आगगाड्यांचे धोरण असतें. एकंदर धंदा किफायतशीरपणे चालविणें आणि प्रत्येक जिन्नस व वहातुक ह्यास झेपेल तितका अधिक बोजा त्यावर टाकणें ह्या वहातुकीचे दर ठरविण्याच्या सामान्य तत्त्वास अनुसरूनच पुष्कळ प्रसंगी वरील 'पक्षपाती' धोरण ठरविले जाते हे खरें आहे. तसेच माल एकदा बंदरात उतरला की तेथून तो आतल्या बाजारात नेण्यास परकी व्यापाऱ्यास देखील जहाजाच्या दराच्या मानानें अधिक दर द्यावे लागतात. परंतु समुद्रावरील आणि खुष्कीच्या वहातुकीच्या दरातील फरक आणि आयात व निर्यात व्यापारास द्यावे लागणारें कमी-अधिक हंशील ह्यामुळें पाश्चात्य पद्धतीनें धंदे चालविणाऱ्या हिंदी लोकास आपल्या परकी प्रतिस्पर्ध्यांशी टक्कर देणें अशक्यप्राय होते. निदान, आयात मालाच्या बंदरांची ठिकाणें आणि त्याच्या आसपासचा भाग ह्यांत तरी हिंदी उत्पादकास परकीयाची बरोबरी करता येत नाही. लोखंडी व पोलादी वस्तू, सिमेंट, कागद, साखर, काच, काड्याच्या पेट्या वगैरे अनेक आधुनिक हिंदी धंद्याचा अनुभव वरीलप्रमाणेंच आहे. एकंदर देशाच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करून हिंदी धंदेवाल्यांच्या वाटेतील ह्या व इतर अडचणी कशा दूर करता येतील हा महत्त्वाचा प्रश्न असून त्याचा पुढील प्रकरणात विस्तरशः विचार केलेला आहे.

**९ रस्ते व आगगाड्या**—यांत्रिक शक्तीनें चालणाऱ्या वाहनांपैकी हिंदुस्थानात आगगाड्या ह्या पहिल्या प्रथम अस्तित्वात आल्या. मोटारी, आगबोटी व विमानें ही साधनें आगगाड्यांशी कमी अधिक प्रमाणांत आजकाल स्पर्धा करूं लागली आहेत. विशेषतः हिंदुस्थानासारख्या खंडप्राय व दूरदूरच्या वस्तीच्या देशांत निव्वळ आगगाड्यांनी मालाची व उतारूंची वहातुक करावयाची म्हटली तर त्यास विशेषच खर्च येतो. गेल्या दहा वर्षांपूर्वी देशाचे कित्येक भाग आगगाड्यांच्या ठिकाणांपासून शंभर शंभर

मैल दूरवर तुटक पडलेले असत. परंतु स्वस्त किमतींत मिळणाऱ्या व थोड्या खर्चात चालणाऱ्या मोटारी मिळावयास लागल्यापासून वहातुकीच्या सोयी पुष्कळच वाढल्या. येथील खडीच्या रस्त्यांची सुधारणा व वृद्धि करण्याच्या प्रश्नास मोटारीमुळें नवें आर्थिक महत्त्व प्राप्त झालें आहे व त्याचा पूर्ण विचार करण्यास हिंदुस्थान सरकारनें १९२७ साली एक कमिटीही नेमली होती. ह्या कमिटीनें पुढील महत्त्वाच्या शिफारसी केल्या आहेत:—"शेतीच्या उत्पन्नाची विक्री अधिक समाधानकारकपणें होण्यास व खेडेगावांतील जनतेची सामाजिक व राजकीय प्रगति होण्यास रस्त्यांची वाढ करणें आवश्यक आहे. ही कामगिरी राष्ट्रीय महत्त्वाची असून तिच्या प्रीत्यर्थ होणारा खर्च प्रांतिक अगर स्थानिक सरकारांच्या आंवाक्याबाहेरचा आहे. ह्यास्तव पेट्रोल व मोटारी ह्यावर कर बसवून मध्यवर्ती सरकारनें एक स्वतंत्र रस्तेफंड काढावा. मध्यवर्ती कायदेमंडळ ठरवील त्या धोरणाप्रमाणें कायदेमंडळाच्या एका खास कायम कमिटीनें ह्या फंडाचा विनियोग करावा. ह्या कमिटीनें प्रांतिक कमिट्यास फंडांतील रक्कम विशिष्ट प्रमाणात वाटून द्यावी व प्रांतिक सरकारांनी वहानावर कर बसवून अधिक पैसा उभारावा. लोकल बोर्डासारख्या स्थानिक संस्थांनी आपला पैसा खेडेगांवातील रस्ते सुधारण्याकडे खर्च करावा. रस्त्याच्या सुधारणेशी संबध असणाऱ्या प्रमुख स्थानिक, प्रांतिक व मध्यवर्ती अधिकाऱ्यांची ठराविक मुदतीनें परिषद् भरविली जावी. आगगाड्या व लष्करी खाते ह्याच्या खर्चातून रस्ते सुधारण्याच्या फंडास योग्य ती रक्कम मिळण्याची व्यवस्था व्हावी" सध्यां हिंदुस्थानांतील सार्वजनिक रस्त्याची लांबी सुमारे दोन सव्वादोन लाख मैल आहे, ती देशाच्या विस्ताराच्या, लोकसंख्येच्या अगर औद्योगिक प्रगतीच्या मानानें पुरेशी आहे असें मुळीच म्हणता येणार नाही. रस्त्याची वाढ व सुधारणा, आणि देशातल्या देशातील वहातुक शक्य तितकी जलमार्गानें करण्याची सोय ह्या दोन्ही प्रश्नांचा एकत्रित रीत्या विचार होणें आवश्यक आहे. विमानाच्या व्यापारी उपयोगास अजून पुष्कळ अडचणी असून त्यांचे तादृश महत्व सध्या तरी फारसें नाही. अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय व्यापारांतील प्रमुख वहातुकीचें साधन म्हणजे आगगाड्या ह्याच होत, व म्हणून त्यांच्या विस्ताराविषयी व सुधारणेविषयी स्वतंत्र विचार करणें आवश्यक आहे.

हिंदुस्थानाचा परराष्ट्रीय व्यापार वाढवून त्यापासून इंग्लंडचा फायदा करून घेण्याचें धोरण ईस्ट इंडिया कंपनीनें कसें अवलंबिलें हें मागें सांगितलेंच आहे. हा व्यापार वाढण्यास येथें आगगाड्यांचे रस्ते तयार होणें जरूर होतें. परंतु स्वतः सरकारनें निव्वळ लष्करी गरजांखेरीज इतर गरजा भागविण्यास आगगाड्यांचा रस्ता तयार करणें व चालवणें हें त्या काळच्या इंग्रजी आर्थिक धोरणाच्या विरुद्ध होतें. इंग्रज भांडवलवाल्यांस अनेक प्रकारच्या सवलती देऊन व त्यांच्या भांडवलावर प्रतिवर्षी त्यांस ठराविक किमान व्याज तरी मिळेल अशी हमी घेऊन सरकारनें येथील

बहुतेक आगगाड्यांचे रस्ते बांधविले आहेत. आगगाड्यांचा विस्तार ह्याप्रमाणें सरकारी जोखमीवर झाल्यानें अनेक वर्षें आगगाड्यांच्या मंडळ्यांस त्यांचें किमान व्याज सुटण्यास सरकारच्या तिजोरींतून भर घालावी लागत असे. मध्यें दहा एक वर्षें हिंदुस्थानसरकारनें स्वतःच आगगाड्यांचे रस्ते बांधून त्या चालविण्याचा प्रयत्न केला, परतु प्रतिकूल सांपत्तिक स्थितीमुळें तो सोडून द्यावा लागला. पुढें पुष्कळ वर्षें पुन्हा सरकारी जामीनदारीवर खाजगी मंडळ्यांनी आगगाड्या चालविण्याचीच पद्धत सुरू होती. ह्या पद्धतीविरुद्ध हिंदी लोकमताची बरीच वर्षें जोराची चळवळ चालू होती. खाजगी विलायती मंडळ्यांस सरकारची जामीनदारी असल्यानें आपला धंदा किफायतशीर करण्याचा त्या प्रयत्न करीत नाहीत व आपल्या जातभाईंस अनुकूल व हिंदी लोकांस प्रतिकूल असें धोरण त्या स्वीकारतात, हे खाजगी मंडळ्याविरुद्ध मुख्य आक्षेप होते. बहुतेक मंडळ्या सरकारी भांडवलानें उभारलेल्या असल्यानें, जसजसे त्यांचे भाडेपट्टे संपत आले तसतसे ठराविक अटीनुरूप ते रद्द करून आगगाड्यांची मालकी सरकारनें आपल्याकडे घेतली. १९२१ सालीं आपल्या मालकीचे आगगाडीचे फाटे सरकारनें स्वतः चालवावे की खाजगी मंडळ्यास फायद्याचा कांहीं भाग देऊन त्यास चालविण्यास सांगावे ह्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. ह्या कमिटीच्या सूचनांस अनुसरून सरकारी आगगाड्या सरकारतर्फे चालविण्याचें धोरण अंमलांत आणलें गेलें. सरकार झालें तरी त्यास आगगाड्या ह्या धंदा म्हणूनच चालविणे भाग असल्यानें त्यांची व्यवस्था व त्यांचा जमाखर्च हा हिंदुस्थान सरकारच्या सर्वसामान्य संघटनेहून अलग ठेवण्यांत आली. आगगाड्यांच्या फाट्यांचे प्रकार, त्यांचा विस्तार व वहातुक ह्याबद्दलचे पुढील आंकडे विनिमयक्षेत्रांत आगगाड्यांनी केवढी क्रांति घडवून आणली आहे हें दाखविण्यास उपयोगी पडतील.

आंकडे १९२७-२८ सालचे आहेत.

| तपशील | आंकडे | |
|---|---|---|
| १ आगगाड्यांच्या रस्त्याची एकंदर लांबी. | ३९७१२ | मैल |
| २ आगगाड्यांच्या धंद्यांत गुंतलेलें भांडवल | ८,२२,८६,२५,००० | रुपये |
| ३ एकंदर कमाई | १,१८,२२,१७,००० | ,, |
| ४ एकंदर खर्च | ७२,३०,७६,००० | ,, |
| ५ निव्वळ कमाई | ४५,९१,४१,००० | ,, |
| ६ निव्वळ कमाईची गुंतलेल्या भांडवलाशी शेंकडेवारी | ५·५८ | |
| ७ उतारूंची संख्या | ६२३,११४,८०० | |
| ८ सरासरी प्रवास | ३४·८ | मैल |
| ९ तिकीट विक्रीचें उत्पन्न | ४५,६७,३९,००० | रुपये |
| १० ने-आण केलेल्या मालाचें वजन | ८९,७९१,००० | टन |
| ११ मालाच्या वहातुकीचें उत्पन्न | ६९,३९,९९,००० | रुपये |
| १२ नोकरांची संख्या | ८००,१०७ | |

बहुतेक सर्व महत्त्वाचे फांटे मोठमोठ्या बंदराच्या ठिकाणांस जोडलेले आहेत आणि व्यापाराच्या व उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें हिंदुस्थानाचे जे प्रमुख भाग होतात त्यापैकी प्रत्येकांत निदान एक तरी निराळा फांटा आहे. उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः पंजाबच्या बाजूस दोन तीन फांटे असल्यानें ते चालविणाऱ्या मंडळ्यांची आपापसांत चढाओढ चाले व तोच माल नेण्यास वाजवीपेक्षां अधिक श्रम व भांडवल खर्ची पडल्याने एकंदर देशाचें नुकसान होई. परंतु आतां सर्व फाट्यांवर सरकारची प्रत्यक्ष हुकमत बसत असल्यानें निरनिराळ्या फांट्यास स्वतंत्र कार्यक्षेत्रें वांटून घेणें शक्य होत आहे.

**१० बंदरांचा व्यापार**—रेलवेचा फाटा ज्या आर्थिक विभागात असेल त्यामानानें त्याचे विशिष्ट बंदर व त्यावरून नेला जाणारा मुख्य माल हीही भिन्न असतात. तरी मुंबई, कलकत्ता व कराची ही तीन बंदरें निर्यात व्यापारांत प्रमुख असल्यानें बहुतेक सर्व फांटे त्या त्या बंदरांकडे आपापल्या भागांतला माल वाहून आणीत असतात व तेथून आयात माल परत आपापल्या भागांत घेऊन जातात. पूर्व किनाऱ्यावरील विजगापट्टम ह्या नव्या बंदराचें महत्त्वही वाढत आहे. मद्रास इलाखा, मध्यप्रांत व बहार-ओरिसा ह्यांच्यांतील आणि निजामच्या राज्यातील बऱ्याच भागांशी आयात व निर्यात व्यापारानें ह्या बंदराचा निकट संबंध जडेल अशी अपेक्षा आहे. कलकत्ता व रंगून ह्या बंदरातून अनुक्रमें ताग व तांदूळ ह्यांची विशेष निर्यात होत असल्यानें त्या बंदराकडे आगगाड्यांतून ते जिन्नस मुख्यतः वाहिले जातात. मद्रास बंदरांतूनही बराच आयात व्यापार चालत असल्यानें आगगाड्यांचे तेथील फाटे विलायती माल देशाच्या आंतील भागात पसरविण्याचें काम मोठ्या प्रमाणावर करीत असतात. हिंदुस्थानाचा बहुतेक सर्व परराष्ट्रीय व्यापार वर नमूद केलेल्या पांच सहा बंदरांतून चालतो आणि म्हणूनच पेढ्या, विमाकंपन्या, व्यापारी मंडळ्या इत्यादि आधुनिक संस्था त्या ठिकाणीं पुष्कळ प्रगल्भावस्थेप्रत पोहोंचल्या आहेत. कोचीन, तुतिकोरीन व चित्तगांव ही बंदरेंही हळूहळू सुधारत असून त्यांच्यांतून मालाची नेआण अधिक प्रमाणांत झाल्यास मुंबई व कलकत्ता ह्यासारख्या बंदरात सध्या मालाची जी खेच होते ती पुष्कळ कमी होईल, आणि वहातुक जवळ झाल्याने उपभोक्ते व उत्पादक ह्या दोहोंचाही फायदा होईल. वरील बंदरांखेरीज हिंदुस्थानाच्या दक्षिण किनाऱ्यावर नागापट्टम, कालीकत, कोकोनाडा, मच्छलीपट्टण, मंगळूर वगैरे इतर लहान मोठी बंदरें असून किनाऱ्यालगतचा व्यापार व हिंदुस्थानाच्या पूर्वकिनाऱ्याजवळच्या देशांशी देवघेव ही त्या बंदरांतून मोठ्या प्रमाणावर केली जातात. पश्चिम किनाऱ्यावरही कांही लहान सहान बंदरें आहेत व कच्च्या मालाची निर्यात व तयार मालाची आयात ह्या स्वरूपाचा कांही थोडा व्यापार तेथें चालतो. परंतु अलीकडील प्रचंड जहाजांस आवश्यक असलेली यांत्रिक व नैसर्गिक सामुग्री पुरविणें फारच थोड्या ठिकाणीं

शक्य व किफायतशीर होतें; ह्यामुळें लहान बंदराची सुधारणा करून वहातुकीच्या खर्चांत बचत करणे नेहमीच शक्य असतें असें नाहीं. कोचीन ह्या बंदराची सुधारणा करण्याचें काम हल्लीं जोरानें चालू आहे. काठेवाडांतील कांहीं संस्थानें व बडोदें ह्या संस्थानी मुलखांतही कांहीं बंदरें आहेत. संस्थानी बंदरांत जकाती व बंदरबाबी पुष्कळच कमी असल्यानें तेथें माल उतरवून तो ब्रिटिश मुलखांत आणून विकणें कित्येक वेळां फायदेशीर होतें. ह्यामुळें ब्रिटिश बंदरें व संस्थानी बंदरें ह्यांच्यांत चढाओढ लागून ब्रिटिश हिंदुस्थानातील बंदराचा व्यापार घटत जातो, असा अनुभव आहे. ज्या संस्थानांत परदेशी माल इतर हिंदी बंदरांपेक्षां कमी खर्चानें उतरविण्याची व्यवस्था आहे त्यांच्यांतून तो माल ब्रिटिश हद्दीत येत असतां त्यावर पूर्ण जकात घ्यावी असा नुकताच हिंदुस्थान सरकारनें हुकूम काढला आहे. ह्या हुकुमाचा अंमल सुरू झाल्यापासून संस्थानी बंदरांचा व्यापार मंदावत चालल्यानें त्यांचे अधिपति ब्रिटिश सरकाराविरुद्ध तक्रार करूं लागले. हा प्रश्न सध्या वादग्रस्त स्थितीत असून हिंदी हिंदुस्थान व ब्रिटिश हिंदुस्थान ह्यांचा आर्थिक संघटनेच्या बाबतीत एकजीव झाला नाहीं तोपर्यंत तो तसाच राहणार हे उघड आहे.

**११ अंतर्गत व किनाऱ्यालगतचा व्यापार**—हिंदुस्थानाचा विस्तार पुष्कळ मोठा असल्यानें निरनिराळ्या भागांत उत्पन्न होणारा माल एकत्र जमवून तो दुसऱ्या भागांत अगर परदेशांस पाठविण्याचें आणि दुसऱ्या भागातून व परदेशांहून येणारा माल अंतर्गत भागांत पसरविण्याचें काम करणारी अनेक मध्यवर्ती गावें प्रसिद्ध आहेत. सामान्यतः प्रत्येक प्रांताची राजधानी ही त्या भागापुरतें निर्गत माल एकत्र करण्याचें व आयात माल पसरविण्याचें केंद्र असतें. हेंच काम कमी अधिक प्रमाणांत हिंदी संस्थानांच्या, जिल्ह्यांच्या व तालुक्यांच्या मुख्य ठिकाणीं केलें जातें. शिवाय औद्योगिक, आणि राजकीय महत्त्वाचीं दुसरीं कांहीं ठिकाणें असल्यास तेथेंही बऱ्याच मोठ्या प्रमाणात व्यापार चालतो. उदाहरणार्थ, कानपूर हे शहर सुती व लोकरीचें कापड, कातड्याचे जिन्नस, साखर वगैरे तयार माल उत्पन्न करण्याकरितां प्रसिद्ध आहे. तसेंच, तें कलकत्ता व मुंबई ह्या दोन्ही बंदरांपासून साधारण सारखेंच दूर असल्यानें अनेक प्रकारचा विलायती माल प्रथम तेथें नेला जातो व नंतर तो आजूबाजूच्या भागात घाऊक व किरकोळ विक्रीनें पसरतो. अलीकडे मोटारींनी वहातुक करण्याच्या सोयी वाढत असल्यानें देशाच्या ज्या भागांतून पूर्वी बाहेर माल पाठविला जात नसे व जेथें बाहेरील माल येत नसे असे अनेक भाग अर्वाचीन विनिमयक्षेत्रात येत आहेत. सर्व देशाचा एक बाजार बनल्यानें एका ठिकाणी उत्पन्न झालेले जिन्नस इतरत्र पुरविणें आणि निरनिराळ्या वस्तूंस असलेल्या मागणीतील चढउतारांचा उत्पादकांस इशारा देणें ही कामें व्यापाऱ्यांस करावी लागतात. हिंदुस्थानांतच निरनिराळ्या भागांत उपयुक्त वस्तूंच्या

उत्पादनात एवढी भिन्नता आहे की येथील अंतर्गत व्यापार हाही जवळ जवळ पर-राष्ट्रीय व्यापाराइतकाच मोठा व दुर्घट झाला आहे. निरनिराळ्या भागांत श्रम-विभागाच्या तत्त्वानुसार परस्पर अवलंबनाचा संबंध जोडला जात आहे. बंगाल्यांतील कोळशानें मुंबईच्या गिरण्या चालून त्या गिरण्यांतील धोतरें बंगाल्यांत खपतात. तेच जिन्नस अनेक भागांत उत्पन्न केले जात असूनही त्यांच्यांतील भिन्न प्रकारांमुळे व त्यांच्या कमी-अधिक किमतीमुळें त्यांची आपापसांत देवघेव होते.

अंतर्गत व्यापाराचेंच एक अंग म्हणजे हिंदुस्थानाच्या एका भागांतून दुसऱ्या भागांस जलमार्गानें माल नेणें हे होय. देशाचे कित्येक भाग खुष्कीनें दुष्प्राप्य असतात व त्यांच्याशी मालाची देवघेव करावयाची झाली तर ती जलमार्गानें करणेंच सोपे व स्वस्त असतें. शिवाय, परदेशचा माल हिंदुस्थानांत येतो तो मोठमोठ्या आगबोटींतून पांचसहा ठराविक बंदरांतच उतरतो. तेथून तो हिंदुस्थानाच्या व देशाच्या लगतच्या भागांत नेण्याचें काम लहान महान आगबोटींस व जहाजांस करावें लागतें. किनाऱ्यावरील हा व्यापार सकृद्दर्शनीं वाटतो त्यापेक्षां पुष्कळच अधिक असतो. १९१३–१४ साली ह्या व्यापाराचें एकंदर मूल्य १३४ कोटी रुपये व १९२४–२५ मध्यें २११ कोटी होतें. हिंदुस्थानाशेजारी जे दुसरे देश आहेत त्यांच्यांशी खुष्कीनेंही हिंदुस्थानाचा कांहीं व्यापार चालतो, परंतु तो ३०–४० कोटींहून अधिक नाहीं. हिंदी व परदेशी उत्पादकांनीं तयार केलेला माल इराण, अफगाणिस्थान, मध्य एशिया, नेपाळ, तिबेट, सिकीम, भूतान, चीनचा पश्चिमेकडील भाग इत्यादि ठिकाणीं पाठविला जाऊन त्यांच्या मोबदला लोंकर, कातडीं, लाकूड व इतर कच्चा माल आणला जातो. १९२४–२५ सालीं ह्या एकंदर व्यापाराचें मूल्य सुमारें ४० कोट रुपये होतें. तारायंत्रें, बिनतारी संदेश, मोटारी, आगगाड्या व आगबोटी ह्या अधुनिक दळणवळणाच्या आणि वहातुकीच्या साधनांनी हिंदुस्थानाच्या आर्थिक जीवनक्रमांत जी क्रान्ति घडवून आणली आहे ती परराष्ट्रीय, अंतर्गत, किनाऱ्यावरील आणि सरहद्दीवरील व्यापारांत स्पष्टपणें दृष्टिगोचर होण्यासारखी आहे.

**१२ आगबोटींचा धंदा व सरकार**—हिंदुस्थानाच्या आधुनिक आर्थिक जीवनाच्या अनेक दोषास्पद व प्रतिकूल अंगांपैकीं हिंदी आगबोटींच्या धंद्यांचा जवळ जवळ पूर्ण अभाव हे एक होय. जलमार्गानें चालणारा हिंदुस्थानचा परराष्ट्रीय व्यापार आज सुमारें ६०० कोटी रुपये किंमतीचा आहे. असें असून त्यापैकीं एक पैचा मालही हिंदी कंपन्यांच्या व हिंदी नाविकांच्या हुकुमतीखालीं चालणाऱ्या जहाजांतून आणला नेला जात नाहीं असें म्हटलें असतां विशेष अतिशयोक्ति होणार नाहीं. उलट, दरसाल सुमारें ५० कोटी रुपये परकी आगबोटवाल्या मंडळ्यांस वहातुकीचें वेतन म्हणून द्यावे लागत आहेत. प्रत्येक राष्ट्रास स्वतःच्या मालकीच्या

आगबोटीचा ताफा असलाच पाहिजे असा कांही निसर्गनियम नाही व औद्योगिक दृष्ट्या भरभराटीस आलेल्या कित्येक पाश्चात्य राष्ट्रांचा परराष्ट्रीय व्यापार परकी आगबोटवाल्या मंडळ्या चालवितात ह्या गोष्टी खोट्या नाहीत. परंतु हिंदुस्थानाचा विस्तृत समुद्रकिनारा, अलीकडल्या पद्धतीनेंही जहाजें बांधण्यास आवश्यक असलेल्या बहुतेक सर्व नैसर्गिक सामुग्रीची मुबत्ता, जहाज बांधण्याच्या व चालविण्याच्या धंद्यांत पिढ्यानुपिढ्या मुरलेल्या व पूर्वकाळीं आपली कीर्ती दिगंत गाजविलेल्या हिंदी नाविक वर्गाची उपलब्धता आणि नुकत्या म्हणजे सुमारें दीड दोनशें वर्षांपूर्वी हजारों वर्षे भरभराटीनें चालत असलेल्या हिंदी नौकानयनाचा ऐतिहासिक पुरावा—ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतां विवक्षित मर्यादेपर्यंत हिंदुस्थानाला स्वतःच्या मालकीच्या आगबोटी असणें शक्य व इष्ट आहे असें सहज अनुमान निघतें. ऐतिहासिक पुरावा व सद्यःकालीन साधनांची उपलब्धता ह्या दोहोंच्या आधारें आपणांस असें म्हणतां येईल की, जरूर तशी सरकारी मदत मिळाल्यास हिंदी आगबोटी हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व किनाऱ्यालगतच्या व्यापाराचा बराचसा भाग वाहण्यास समर्थ होतील. राष्ट्राच्या सांपत्तिक व संस्कृतीविषयक प्रगतीस जोमदार सागरपर्यटनाचें साहाय्य आवश्यक आहे. नैसर्गिक परिस्थितीच्या अनुकूलतेनें आणि आमच्या पूर्वजांच्या पराक्रमानें तें साधन यांत्रिक युगाच्या अवतरणापूर्वी आम्ही हस्तगत केलें होतें हें सर्वविश्रुत आहे. विशिष्ट प्रकारच्या पोलादाची उपलब्धता, अनेक अजस्र, अवजड व अतोनात खर्चाच्या यांत्रिक साधनांचा पुरवठा आणि आधुनिक नाविककलेचें विशिष्ट शास्त्रीय ज्ञान देण्याच्या सोयी, ह्या बाबतींत हिंदुस्थानांतील परिस्थिति सध्यां अनुकूल आहे, असें म्हणतां यावयाचें नाही. परंतु व्यक्तिशः नागरिक व सामुदायिक जीवनाचें कार्यकारी अंग सरकार ह्यांजकडून विधायक व प्रतिबंधक स्वरूपाचें योग्य साहाय्य मिळाल्यास जहाजें व लहानमोठ्या अनेक प्रकारच्या आगबोटी बांधण्याचा व त्या यशस्वी रीतीनें दूरदूरच्या सागरांतही चालविण्याचा धंदा येथें आवश्यक तेवढ्या प्रमाणावर स्थापन करतां येईल ह्यांत शंका नाहीं.

हिंदुस्थानांतील बंदरांत येणाऱ्या जहाजांतून व आगबोटींतून माल आणण्याच्या कामांत निरनिराळ्या देशांची १९२५–२६ सालीं पुढीलप्रमाणें शेकडेवारी होती—

| देशाचें नांव. | वहातुकीच्या कामांत शेकडेवारी. |
|---|---|
| ग्रेटब्रिटन ... ... | ६९·८ |
| हिंदुस्थान ... ... | ७·१ |
| जपान ... ... | ७·६ |
| इतर ... ... | १५·५ |

वरील आंकड्यांवरून हिंदुस्थानाच्या परदेशी व्यापाराची वहातुक जवळ जवळ संपूर्ण-पणें इंग्लडच्या हातांत आहे हें दिसून येईल. किनाऱ्यावरील व्यापारांत ब्रिटिश आग-बोटवाल्यांची अशीच मक्तेदारी आहे. हिंदी आगबोटवाल्यांचा त्या वहातुकींत शेंकडा १५ एवढा भाग असून ग्रेटब्रिटनचा मात्र शेंकडा ७५ एवढा आहे. हिंदुस्थानाला स्वतःची आर्थिक प्रगति करून घ्यावयाची असल्यास अनेक धंद्यांतून ब्रिटिशांच्या ठिकाणीं हिंदी भांडवलवाल्यांची व नोकरांची स्थापना करणें आवश्यक आहे; त्यांपैकींच हा आगबोटीचा धंदा प्रमुख आहे. ग्रेटब्रिटनचा स्वतःचा आर्थिक इति-हास पाहिला तर आपणांस असें दिसून येईल कीं इंग्रजी जहाजांच्या धंद्यास ऊर्जि-तावस्था यावी ह्याकरितां ब्रिटिश सरकारनें अटोकाट प्रयत्न केले; नागरिकांवर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष बंधनें आणि कर ही लादलीं; परदेशांशीं वैर संपादून लढायाही केल्या. उदारमतवाल्या अर्थशास्त्रज्ञांचा महागुरु ॲडम स्मिथ ह्यानेंही इंग्रजसर-कारच्या वरील धोरणास पूर्णपणे मान्यता दर्शविली. अलीकडील काळांत फ्रान्स, अमेरिका, जपान, ऑस्ट्रेलिया इत्यादि राष्ट्रांनी आपापले स्वतंत्र आगबोटींचे धंदे स्थापण्याचे अटोकाट प्रयत्न केले आहेत. अवास्तव खर्चामुळें व गैरव्यवस्थेमुळें त्यांपैकीं कांहींचे प्रयत्न शेवटीं अयशस्वी ठरले; ह्यावरून हिंदी राष्ट्रास योग्य तो बोध घेतला पाहिजे. पोलादाचे मोठमोठे कारखाने, अजस्त्र व नाजूक ह्या दोन्हीं प्रकारची यंत्रसामुग्री तयार करण्याच्या सोयी, इत्यादि अर्वाचीन आर्थिक घटनेच्या सर्व अंगोपांगांची प्रमाणशीर वाढ झाल्याखेरीज कोणत्याहि एका धंद्याची पूर्णपणें भरभराट होणार नाहीं, हे खरें आहे; तरी अमुक एक धंदा पूर्णावस्थेस जाण्यासारखा नसल्यास तो वाढविण्याचें मनात आणूं नये .असें म्हणणे आर्थिक व ऐतिहासिक शिकवणीस विरोधक होय.

नैसर्गिक परिस्थितीची हिंदुस्थानांत आगबोटीचा धंदा चालण्यास पुष्कळशी अनुकूलता आहे. पूर्वकालीन इतिहासांत हिंदी लोकांनीं जहाजें बांधण्याच्या व चालविण्याच्या धंद्यात सर्व जगाचे अग्रेसरत्व पटकाविलेलें होतें अशाविषयी पुरावा आहे आणि आधुनिक कालांत हिंदुस्थानाचा परराष्ट्रीय व्यापार परकी आगबोटी मंडळ्यांवर सर्वस्वी अवलंबून असणें आर्थिक व लष्करी दृष्ट्या अनिष्ट आहे, ह्या आधीच उघड असलेल्या गोष्टी महायुद्धाच्या कटु अनुभवामुळें येथील लोक व सर-कार ह्यांस विशेष स्पष्ट दिसूं लागल्या. इंग्लंडचें सरकार व ईस्ट इंडिया कंपनी ह्यांच्या परस्पर परिपोषक धोरणानें नाश पावलेल्या हिंदी जहाजांच्या धंद्यास पुनर्जन्म कसा प्राप्त करून देतां येईल ह्याचा विचार करण्याकरितां १९२३ मध्यें एक सरकारी कमिटी नेमली गेली. ‘जहाजें बांधणें व हिंदी जहाजांतून मालाची ने—आण करणें ह्या धंद्यांस प्रत्यक्ष आर्थिक मदत देऊन व जपानप्रमाणें इतर उपाय योजून त्यांची पुनः स्थापना कशी करावी’ हा प्रश्न त्या कमिटीपुढें ठेवण्यांत आला होता.

हिंदी नाविक अधिकारी व यंत्रशास्त्रज्ञ तयार करणें; यांत्रिक शक्तीनें चालणाऱ्या आगबोटी बांधण्याच्या धंद्यास प्रत्यक्ष मदत देणें; समुद्रावरील व्यापार शक्य तितका हिंदी आगबोटींतून वाहिला जाईल अशी व्यवस्था करणें; ही तीन उद्दिष्टें मान्य करून वरील कमिटीनें आपल्या सूचना केल्या होत्या. परंतु महायुद्ध संपल्या-बरोबर ब्रिटिश सरकार व हिंदुस्थानसरकार ह्यांचा हिंदी आकांक्षाबद्दल दृष्टिकोण बदलून त्या कमिटीच्या सूचना धूळ खात पडल्या. हिंदुस्थानच्या किनाऱ्या-लगतचा व्यापार बहुंशी हिंदी लोकांच्या ताब्यांत असलेल्या मंडळ्यांच्या जहाजांतूनच चालावा अशा आशयाचा एक कायदा पास करण्याविषयीं हिंदी लोकांची हिंदुस्थान सरकारजवळ अनेक वर्षांची मागणी आहे व उपरिनिर्दिष्ट कमिटीचाही त्या मागणीस पूर्ण पाठिंबा आहे. असें असून सरकारनें तो कायदा आपण होऊन पास करण्याची तयारी तर दाखविली नाहीच, परंतु एका खाजगी सूचने-वरून तसा कायदा पास होण्याची मध्यवर्ती कायदेमंडळांत सध्या जी खटपट चालली आहे तिला जोराचा विरोध मात्र केला. हिंदुस्थानाच्या आर्थिक प्रग-तीच्या मार्गांत नैसर्गिक व कृत्रिम अशा अनेक अडचणी आहेत. परंतु त्या सर्वांत मुख्य अडचण म्हणजे हिंदी उद्योगधंदेवाल्यांचे प्रमुख प्रतिस्पर्धी जे इंग्रज लोक त्यांच्या हातांतील बाहुलें बनलेल्या हिंदुस्थान सरकारकडून हिंदी उद्योगधंद्यास मदत मिळविण्याची दुर्घट खटपट करावी लागते ही होय. राजकीय व आर्थिक प्रगतीचें परस्परांवर असलेलें अवलंबन ह्याहून अधिक विशदपणें दृष्टोत्पत्तीस येणें कठिण आहे.



# प्रकरण नववें

## उद्योगधंदे व व्यापार

**१ औद्योगिक व व्यापारी धोरणः**—अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय व्यापाराचें तात्त्विक स्वरूप व त्यापासून होणारे व्यावहारिक परिणाम ह्यांविषयीं प्रास्ताविक भागांत अनेक ठिकाणीं विवेचन केलेलें आहे.[1] विशेषतः परराष्ट्रीय व्यापारासंबंधानें प्रत्येक राष्ट्रानें कोणतें धोरण स्वीकारावें ह्याबद्दल अर्थशास्त्रज्ञांत मतभेद असल्याचें त्यावरून दिसून येईल. सरकार ही तत्त्वतः राजकीय संस्था असल्यानें उद्योगधंदे व व्यापार ह्यांसारख्या आर्थिक व्यवसायांत सरकारचा कोणत्याच प्रकारचा संबंध असूं नये, हें एकांतिक मत हल्लीं कोणी विशेष आग्रहानें प्रतिपादीत नाही, हें खरें. तरी राष्ट्रिय हितसंवर्धनाचें ध्येय पुढें ठेवून सरकारनें प्रतिबंधक व विधायक मार्गांनीं उद्योगधंद्याचें व व्यापाराचें नियमन करावें किंवा व्यक्तिशः नागरिकांस आपापल्या इच्छेप्रमाणें व हितसंबंधास अनुसरून उपभोक्ते व उत्पादक ह्या नात्यानें बहुंशीं स्वतंत्र ठेवावें ह्याबद्दल प्रमुख राष्ट्रांच्या व्यावहारिक धोरणांत बराच फरक दिसून येतो. व्यापार व उद्योगधंदे अप्रतिबंधपणें चालूं दिल्यास उपभोक्ते ह्या नात्यानें नागरिकांचें हित साधेल हें खरें असलें तरी उत्पादकांमधील तीव्र स्पर्धेमुळें अनेक धंदे बुडण्याचा व राजकीय आणि आर्थिक दृष्ट्या राष्ट्राचें जीवन कमजोर होण्याचा संभव असतो, हें मत कमीअधिक प्रमाणांत सर्व देशांत मान्य झालेलें दिसतें. इंग्लंडमधील अर्थशास्त्रज्ञ व तेथील सरकार ह्यांच्या औद्योगिक व व्यापारी मतांचा हिंदुस्थानाच्या आर्थिक जीवनावर पुष्कळच अनिष्ट परिणाम झालेला आहे. अठराव्या शतकांत हिंदुस्थान बहुतेक स्वतंत्र होतें व परदेशी व्यापाराबद्दल जरूर तें धोरण स्वीकारण्याची त्या वेळच्या राज्यांत शक्यता होती. परंतु ह्याच काळांत इंग्लंडमध्यें 'व्यापारी[2]' अर्थशास्त्रज्ञांच्या नियामक अगर संरक्षक पद्धतीचा पूर्ण अंमल बसलेला होता. हिंदुस्थानांतून इंग्लंडमध्यें जाणाऱ्या तयार मालावर जबर जकाती बसवून अगर त्या मालाची आयात पूर्णपणें बंद करून इंग्लिश कारखानदार व व्यापारी ह्यास उत्तेजन देण्याचें धोरण इंग्रजसरकारनें अवलंबिलेलें असे. उलट, हिंदुस्थानच्या ज्या भागांत ईस्ट इंडिया कंपनीचा प्रत्यक्ष किंवा अ-प्रत्यक्ष अंमल चालू होता तेथें एतद्देशीय कारागिरीचे धंदे बुडवून इंग्लंडहून येणाऱ्या तयार मालाचा खप वाढविण्याचें धोरण सरहा लोकावर लादलें जाई. ज्या भागांत

१ पानें ४६–४७; ४९–५१; ७८–८३; ८६–८९, पहा. २ पान ११ पहा.

इंग्रजांची सत्ता प्रस्थापित झालेली नव्हती तेथील राज्यकर्त्यांस स्पर्धात्मक वातावरणांतील औद्योगिक व व्यापारी घडामोडींचें यथार्थ आकलन करता आलें नाही; व त्यांचें राजकीय स्वातंत्र्यही पहिल्या प्रथम अस्थिर व पुढें लुप्तप्राय होऊन कंपनी सरकारचें व्यापारी धोरण सर्व हिंदुस्थान देशभर चालू झालें. संरक्षकपद्धतीचा पूर्ण फायदा मिळाल्यानें व यांत्रिक सुधारणा घडून आल्याने इंग्लिश धंदेवाल्यांस परराष्ट्रीय बाजारांत आपला माल स्वस्त दरानें विकणें शक्य झालें. उलट, संरक्षक पद्धतीच्या अवलंबनानें इंग्लंडमध्ये धान्याची व राहणीची महागाई होऊन कारखानदारांच्या उत्पादनाच्या किंमती वाढूं लागल्या. औद्योगिक परिस्थितीत घडून आलेल्या ह्या फेरबदलामुळें व्यापारी धोरणाविषयीच्या मतातही बदल होऊं लागला. त्या वेळच्या निसर्गसत्तावादी व उदार मतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या मतांचा कल संरक्षक पद्धतीस प्रतिकूल असल्यानें खुल्या व्यापाराचें व तटस्थपणाचें धोरण सहजच मान्यता पावलें. इंग्लंडमध्यें व्यापारी धोरणांत परिवर्तन होत असतां हिंदुस्थानाच्या राजकीय इतिहासांतही झपाट्यानें परिवर्तन होत होतें. अल्प काळांतच सर्व हिंदुस्थान देश इंग्रजांच्या अंमलाखाली येऊन खुल्या व्यापाराचें धोरण हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारनें उघडपणें स्वीकारलें. इंग्लिश कारखानदारांच्या उत्पादक कार्यक्षमतेंत त्यावेळी एवढी प्रगति झालेली होती व ईस्ट इंडिया कंपनीच्या धंदेबुडव्या धोरणानें हिंदी उत्पादक एवढे कमकुवत झालेले होते की, खुल्या व्यापाराचें पर्यवसान हिंदी कारागिरांच्या धंद्याचा जो अवशेष उरलेला होता तोही शेवटीं नाहीसा होऊन हिंदी लोकांस शेतीच्या धंद्यावर अर्धवट पोट भरण्यास भाग पाडण्यांत झालें. आगगाड्या व दळणवळणाचीं इतर साधनें सुधारण्याचा नव्या हिंदुस्थानसरकारकडून जो प्रयत्न झाला त्याचाही परिणाम हिंदी उद्योगधंद्यांना असाच घातुक झाला. खुल्या व्यापाराचें तत्व ब्रिटिश सरकारनें मान्य केलें म्हणून हिंदुस्थानांतही त्याचा अंमल सुरू झाला असें म्हणावें तर १८७९ पर्यंत हिंदुस्थानांत येणाऱ्या इंग्लंडखेरीज इतर देशांतील मालावर इंग्लिश मालापेक्षा दुप्पट जकात बसविली जात असे. इंग्लंडमध्यें संरक्षक पद्धति अंमलांत होती तेव्हां आणि त्याचप्रमाणें पुढें खुल्या व्यापाराचें तत्त्व तेथील सरकारानें मान्य केलें तेव्हा दोन्ही प्रकारच्या परिस्थितीत हिंदुस्थानांतील ब्रिटिश सरकारचें धोरण मात्र हिंदी उद्योगधंद्यांना सारखेंच प्रतिकूल झालें. शक्य त्या मार्गांनी इंग्लिश मालाचा खप वाढवावा, हिंदी लोकांस धान्य व कच्चा माल उत्पन्न करण्यास भाग पाडावें व इंग्लंडखेरीज इतर परकी राष्ट्रांस हिंदी बाजारांत स्पर्धा करितां येऊं नये अशा धोरणानेंच हिंदुस्थानसरकार वागत असे. नैसर्गिक, ऐतिहासिक व कांही आकस्मिक कारणांनीं उत्पादनाच्या कार्यक्षमतेंत इंग्रज लोकांची जी प्रगति झाली तिचा हिंदुस्थाना-

---

१ पानें ११–१२ पहा.

सारखाच फ्रान्स, अमेरिका, जर्मनी, जपान इत्यादि राष्ट्रांवरही पहिल्या प्रथम अनिष्ट परिणाम झाला. परंतु हीं राष्ट्रे राजकीय दृष्ट्या स्वतंत्र असल्यानें तेथील सरकारांनीं खुल्या व्यापाराचें पुस्तकी तत्त्व व्यवहारांत झुगारून देऊन क्रमशः संरक्षक पद्धतीचा अंगीकार केला. स्वतंत्र राष्ट्रांतील स्वतंत्र बुद्धीच्या आर्थिक ग्रंथकारांनींही इंग्रज अर्थशास्त्रज्ञाच्या मताचा पोंचटपणा विशद करून दाखविला. हिंदुस्थानांतील सुशिक्षितांच्या पहिल्या पिढीचे अर्थशास्त्रीय गुरु ॲडॅम स्मिथ, रिकॅर्डो, मिल, कॉबडेन, ब्राईट, ह्यासारखे इंग्रज असल्यानें राष्ट्रीय धंदे 'खुल्या' व्यापाराच्या धोरणानें बुडत असलेले डोळ्यांपुढें दिसत असतानाही उदार धोरणाचें गुणवर्णन करण्यापलीकडे त्यांच्या विचारांची मजल जाऊं शकली नाही. परंतु हिंदुस्थानांतील अनिष्ट परिस्थिति जसजशी त्यांस कळूं लागली व इतर पाश्चात्य आणि पौरस्त्य राष्ट्रांचा अनुभव जसजसा दृष्टिगोचर होऊं लागला तसतसें हिंदुस्थानांत संरक्षक पद्धतीचा अंगीकार करणें इष्ट आहे, निदान खुल्या व्यापारास येथें पुष्कळच अपवाद कबूल केले पाहिजेत, ह्या मताचा त्यांच्या विचारावर पगडा बसूं लागला. संरक्षणाच्या धोरणास अनुकूल असलेल्या मताचा हिंदुस्थानात आज जो एवढा प्रसार झालेला आहे तो ह्याच कटु अनुभवाचें फळ होय. संरक्षक पद्धतीच्या येथील प्रसाराबद्दल साधक बाधक गोष्टींचा विचार करण्यापूर्वी ब्रिटिश अमदानींत परराष्ट्रीय व्यापारावर बसविलेल्या जकातींत कसकसा फेरबदल होत गेला ह्याचें स्थूल दिग्दर्शन करणें आवश्यक आहे.

**२ हिंदुस्थानांतील जकातींचा इतिहास**—अर्वाचीन काळांत ब्रिटिश अंमलापूर्वी सबंध हिंदुस्थान देश एकाच राजसत्तेखालीं केव्हांच नसल्यानें देशाच्या सरहद्दीवर आयात व निर्यात व्यापारावर एका राष्ट्रीय सरकारच्या अशा जकाती असणें शक्य नव्हतें. परंतु अर्वाचीन व प्राचीन काळांत अस्तित्वात असलेल्या सर्व लहानमोठ्या राज्यांत वस्तूंच्या वहातुकीवर व व्यापारावर जकाती बसविण्याचा प्रघात सररहा दिसून येतो. ह्या जकाती केवळ सरकारी खजिना भरण्याच्या हेतूनें लादल्या जात असेंही नाही. जुने स्मृतिग्रंथ व चाणक्याचें अर्थशास्त्र ह्या ग्रंथांतील पुराव्यावरून असें स्पष्ट दिसून येतें की, त्या त्या काळीं अस्तित्वात असलेल्या हिंदू राज्यांत खजिना भरण्याकरिता, अंतर्गत धंद्यास मदत देण्याकरितां व सामाजिक अगर धार्मिक सुधारणा घडवून आणण्याकरितां व्यापारावर जकातीची नियंत्रणें घालणें इष्ट व आवश्यक समजलें जाई. त्या वेळच्या व्यापारी आणि आर्थिक धोरणाचे अनेक विशेष असे आहेत की, त्यांवरून त्या धोरणाचे वर्णन संरक्षक किंवा समाजहितवर्धक ह्या नांवानें केलें तर तें यथार्थ ठरेल. ईस्ट इंडिया कंपनीचा अंमल येथील निरनिराळ्या प्रांतांत बसल्यावर निरनिराळ्या भागांत अनेक प्रकारच्या जकाती अस्तित्वांत असलेल्या त्यांस आढळल्या. अंतर्गत व्यापारावरील ह्या जकातींचा व्यापाऱ्यांस अर्थातच पुष्कळ त्रास होऊं लागला. कंपनी सरकारनें प्रांताप्रांतांतील जकाती उठविल्या व ब्रिटिश मुलखाच्या सरहद्दीवर तेवढ्या अगदीं कमी दराच्या आयात व निर्यात

जकाती कायम ठेवल्या. सत्तावन सालच्या बंडामुळें झालेला फार मोठा खर्च भरून काढणें भाग पडल्यामुळें सर्वसाधारण आयात जकाती शेंकडा पांच पासून शेंकडा दहा इतक्या वाढविल्या गेल्या, परंतु हिंदुस्थान सरकारची सांपत्तिक स्थिती सुधारूं लागली तसतसें आयात जकातीचें मान उतरविलें जाऊन १८७५ मध्यें सर्व साधारण आयात जकातीचें मान पुन्हां शेंकडा पाच टक्क्यावर आलें. बहुतेक निर्गत जकाती ह्याच वेळीं काढून टाकण्यात आल्या. मँचेस्टरहून येणाऱ्या कापडावरही सर्व सामान्य पाच टक्के जकात त्या वेळी पडत असे. परंतु स्वार्थी इंग्रज व्यापाऱ्यांस एवढेही नियंत्रण असह्य वाटून त्यानी इंग्लिश सरकारामार्फत हिंदुस्थान सरकारास आयात जकाती पूर्णपणें काढून टाकण्यास भाग पाडलें. अशा तऱ्हेनें १८८२ सालीं हिंदुस्थानचा बाजार आयात व्यापारास सर्वस्वी 'खुला' करण्यांत आला. १८८३ ते १८९४ ह्या दरम्यानच्या काळांत निर्गत जकाती पैकी तांदुळावरील जकात, आणि आयात व्यापारापैकी हत्यारें व दारूगोळा, मद्यें, मीठ, अफू आणि पेट्रोल ह्या जिनसांवरील अगदी अल्प जकाती एवढ्याच काय त्या शिल्लक होत्या. ह्या काळात सरकारच्या खर्चाचें मान मात्र वाढत होतें आणि विशेषतः चांदीचा भाव उतरल्यानें विलायतेंत खर्चासाठी पाठवावयाची रक्कम एक-सारखी फुगत होती. अशा वेळी जकाती साफ नाहीशा करणें म्हणजे हिंदुस्थान सरकारवर दिवाळखोरीचा प्रसंग आणणें होय हें कळून आल्यावर १८९४ साली सर्व साधारण पांच टक्के आयात जकात पुन्हां बसविण्यास हिंदुस्थान सरकारास परवानगी मिळाली. पोलाद, यंत्रसामुग्री इत्यादि जिनसांवर शेंकडा पाचहून कमी व मद्यें, तंबाकू वगैरे चैनीच्या पदार्थांवर पाचहून अधिक असे मान ठेवलें गेलें. आपल्या मालावर शेंकडा ५ टक्के आयात जकात बसली हीही जबर आहे व त्या मानानें हिंदी गिरणीवाल्यास संरक्षण मिळून खुल्या व्यापाराच्या तत्त्वाची पायमल्ली होत आहे अशी मँचेस्टरच्या गिरणीवाल्यानी ओरड सुरू केली. तिचा व्हावयाचा तो परिणाम होऊन १८९६ मध्यें सुती कापडावरील आयात जकात शेंकडा ३½ करण्यांत येऊन हिंदुस्थानातील गिरण्यांत तयार होणाऱ्या कापडावरही शेंकडा साडेतीनप्रमाणें पट्टी घेण्यास सुरवात झाली. हिंदी कापडावरील ह्या जकातीचा प्रश्न महत्त्वाचा असून त्याचा पुढें विचार केलेला आहे. सर्व सामान्य आयात जकाती-पेक्षां विलायती कापडावर जकात कमी करून परकी कारखानदारांचें एक प्रकारें संरक्षण करणें व उलट स्वदेशी कारखानदारास किंचित् उत्तेजन स्वाभाविक-पणें मिळत होतें तेंही खुल्या व्यापाराच्या नांवावर काढून घेणें हा शुद्ध अन्याय व जुलूम आहे, असें हिंदी लोक व हिंदुस्थान सरकार ह्या दोघांचेंही मत असतां तें मँचेस्टरच्या गिरणीवाल्यांच्या चिथावणीवरून ब्रिटिश सरकारनें मान्य केलें नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

इ. स १९१४ मध्यें महायुद्ध सुरू होऊन एक दोन वर्षांत हिंदुस्थान सरकारास पैशाची टंचाई पडूं लागली. उत्पन्न वाढविण्याचे इतर मार्ग मर्यादित असल्यानें जकातीचें मान वाढविण्याखेरीज गत्यंतर नव्हतें व युद्धासारख्या बिकट प्रसंगी ब्रिटिश सरकार अगर मँचेस्टरचे गिरणीवाले ह्यांसही हिंदी लोकांच्या आर्थिक हितास व त्यांच्या राजकीय मनोभावनांस विरोधी धोरण अंगिकारणें शक्य नव्हतें. महायुद्धाच्या ह्या आकस्मिक कारणानें जकातीचे दर जे एकदां वाढले ते पुढेंही कांहीं अंशीं सरकारचा वाढता खर्च भागविण्याचें साधन म्हणून व कांहीं अंशी हिंदी धंदेवाल्यांस प्रत्यक्षपणें मदत म्हणून चढत्या प्रमाणावरच राहिले. १९१३–१४ साली जकातीचें उत्पन्न ९॥ कोटी रुपये होतें तेच आज जवळ जवळ ५० कोटी रुपये आहे. १९१६ साली सर्वसामान्य जकातींचें मान शेंकडा पांचवरून साडेसातवर नेण्यांत आलें; जकात माफ असलेल्या जिनसांची यादी मर्यादित केली गेली व यंत्रसामुग्री, आगगाड्यांचें सामान, लोखंड व पोलाद ह्या जिनसावरही शेंकडा २½ टक्के जकात बसली. १९१७ साली परदेशी कापडावरील जकातही सर्व साधारण जकातीइतकी म्हणजे शेंकडा ७½ टक्के इतकी वाढविली जाऊन हिंदी गिरण्यांतील कापडावरील कर मात्र पहिल्या इतकाच म्हणजे शेंकडा ३॥ इतका कायम राहिला. अशा तऱ्हेने हिंदी गिरणीवाल्यांस परदेशी व्यापाऱ्यांहून शेंकडा चार टक्के सवलत पहिल्या प्रथमच मिळाली बाजारभाव व सरकारच्या खर्चाचें मान हीं सारखीं वाढत गेल्यानें व सरकारास उत्पन्नांत तूट येऊं लागल्यानें १९२१ साली सर्वसाधारण जकात शेंकडा ११ व लगेच १९२२ मध्यें शेंकडा १५ इतकी वाढविली गेली. सुती कापडावर अयात जकात व अंतर्गत कर हे मात्र अनुक्रमें ११ व ३॥ असेच कायम राहिले. मोटारी, घड्याळें वगैरे चैनीच्या वस्तूंवरील जकात १९२१ साली शेंकडा वीस व १९२२ साली शेकडा ३० अशी चढविण्यांत आली. साखर, आगकाड्याच्या पेट्या, मद्यें इत्यादि वस्तूंवरील जकातीतही युद्धकाळी व युद्धोत्तर काळात पुष्कळच वाढ झाली. लोखंड व पोलाद ह्यांवरील जकात १९२२ मध्यें शेंकडा १० झाली. निर्गत व्यापारांतही ताग, तागाचें कापड, आणि चहा यांवर हलु हलु कर बसले. बिन कमावलेली कातडी परराष्ट्रांत पाठविली जात त्यावर निर्यात जकात बसविल्यानें कातडी कमावण्याच्या व त्यापासून उपयुक्त जिन्नस तयार करण्याच्या धंद्यास अप्रत्यक्षपणें उत्तेजन मिळालें. ही निर्यात जकात शेंकडा १५ टक्के इतकी असून ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागास कातडी पाठविली जात असल्यास वरील जकातीच्या ⅔ इतकी सूट दिली जाई. जकातीचें मान ठरवितांना ब्रिटिश साम्राज्यांतलि देशांनीं परकी राष्ट्रापेक्षां साम्राज्यातर्गत देशास अधिक सवलत द्यावी ह्या तत्त्वाच्या अवलंबनाचें हिंदुस्थानांत हें पहिलेंच उदाहरण होय; ह्याबद्दलही पुढें विचार केलेला आहे. महायुद्धापूर्वीची सर्वसाधारण शेंकडा पांच जकात जाऊन हळुहळू शेंकडा १५ वर सामान्य जकाती व शेंकडा तीसवर विशिष्ट जकाती ह्यांची

मजल येऊन ठेपली, तरी हिंदुस्थानचें व्यापारी व औद्योगिक धोरण खुल्या व्यापाराचें व तटस्थपणाचेंच होतें. परंतु एवढ्या भारी जकाती बसविल्यानें आपोआपच स्थानिक उत्पादकांस उत्तेजन मिळत होतें व त्यामानानें उपभोक्त्यांवरचा बोजा वाढत होता. उत्तेजनाचें तत्त्व अप्रत्यक्षपणें परंतु ठळक स्वरूपात अंमलांत आल्यानें अनेक उद्योगधंद्यांकडून प्रत्यक्षपणें संरक्षणात्मक जकातीची मागणी होऊं लागली. हिंदुस्थानसरकारचें जकातीसंबंधी धोरण काय असावें हे नक्की ठरविल्याखेरीज ह्या मागण्या विचारांत घेणें शक्य नव्हतें. म्हणून सन १९२१--२२ मध्ये ह्या प्रश्नाची एका स्वतंत्र कमिशनकडून चौकशी होऊन, त्याच्या शिफारसीवरूनच टॅरिफ बोर्ड ही संरक्षक जकातीबद्दलच्या मागण्यांचा साधक बाधक दृष्ट्या विचार करून सरकारास सल्ला देणारी संस्था नेमली गेली. ह्याच संस्थेच्या शिफारशीनुसार १९२४ सालच्या जुलै महिन्यात पोलादाचा धंदा हिंदुस्थानांत यशस्वीपणानें स्थापन होऊन ऊर्जितावस्थेस यावा ह्या उद्देशानें जरूर तेवढ्या जकाती बसविणारा स्वतंत्र कायदा पास झाला. हिंदुस्थानात संरक्षक धोरणाच्या कायदेशीर अवलंबनाचा हाच प्रारंभ होय. तेव्हापासून आतांपर्यंत औद्योगिक उत्तेजनाचें धोरण दुसऱ्याही काही धंद्यांत अंमलांत आलेले आहे. परंतु सरकारच्या हल्लीच्या व्यापारी धोरणाचा विचार करण्यापूर्वी हिंदुस्थानांत खुल्या व्यापारास व सरकारच्या तटस्थवृत्तीस प्रतिकूल आणि उत्तेजनाच्या व संरक्षणाच्या धोरणास अनुकूल लोकमत कसकसें बनत गेलें ह्याचा त्रोटक वृत्तांत देणें आवश्यक आहे.

**३ हिंदी लोकमताचा संरक्षणास पाठिंबाः**—हिंदुस्थानासारखा अर्वाचीन औद्योगिक सुधारणेच्या दृष्टीनें मागासलेला व राजकीय दृष्ट्या स्वतःच्याच आर्थिक प्रतिस्पर्ध्यांपैकी एकाच्या अंमलाखालीं असलेला देश आणि यांत्रिक सुधारणाच्या साहाय्यानें मालाची मोठ्या प्रमाणावर व स्वस्ताईनें पैदास करणारे स्वतंत्र पुढारलेले देश ह्यामध्यें खुला व्यापार चालूं देणें म्हणजे येथील सर्व उद्योगधंदे जाणून बुजून बुडविणें होय व हिंदुस्थानाच्या विशिष्ट परिस्थितीत सरकारनें संरक्षणाचें व प्रत्यक्ष उत्तेजनाचें धोरण अवलंबिणेंच इष्ट आहे असें दादाभाई नौरोजी, रानडे, दत्त इत्यादि सुशिक्षित व अनुभवी हिंदी मुत्सद्यांचें मत बनलें होतें. ब्रिटिश कारखानदार व ब्रिटिश सरकार ह्यांच्या तंत्रानें वागणारें हिंदुस्थान सरकार अर्थातच हे धोरण तत्त्वतः मान्य करण्यास अगर व्यवहारात आचरण्यास तयार नव्हतें. उलट, ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या हितास बाध आणणारी एखादी जकात अगर हिंदुस्थान सरकारनें चुकून माकून हिंदी उद्योगधंद्यांस दाखविलेली सहानुभूति ह्यास तावडतोब स्टेट सेक्रेटरीचा विरोध येई. सरकारच्या ह्या सहानुभूतिशून्य धोरणास सक्रिय विरोध करण्याचें सामर्थ्य अगर तसे करण्याची कायदेशीर संधी ही त्या वेळच्या पुढाऱ्यांस उपलब्ध नव्हतीं. म्हणूनच सरकारचा निषेध व हिंदी उद्योगधंद्यांस स्वार्थत्यागपूर्वक मदत ह्या दोन्ही गोष्टी एकदम साधण्यास ‘ स्वदेशी ’ चळवळीचा हिंदुस्थानांत अव-

तार झाला, व सर्व पक्षांच्या प्रमुख लोकांचा ह्या चळवळीस लवकरच पाठिंबा मिळाला. सन १९०७ मध्यें ना. गोखले ह्यानीं लखनौ येथें स्वदेशी चळवळ ह्या विषयावर एक व्याख्यान दिलें होतें. स्वदेशी चळवळ ही निव्वळ आर्थिक महत्त्वाचीच नसून राजकीय, सामाजिक व नैतिक दृष्ट्याही ती सर्वथैव हितावह आहे, आणि आर्थिक दृष्ट्याही उद्योगधंद्यास भांडवल पुरविणें, धंदेशिक्षण घेण्याच्या सोयी वाढविणें, नवे कारखाने काढणें हेही स्वदेशी चळवळीच्या पुरस्काराचेच मार्ग आहेत, असें सागून कमी प्रतीचे देशी जिन्नस अधिक किंमतीनें घेण्याच्या उपदेशाबद्दल त्यांनी पुढील प्रमाणें आपलें मत दिलें आहे. 'संरक्षणाचें धोरण ज्या राष्ट्रांत अंमलात असतें तेथील सरकारें आपापल्या उद्योगधंद्यांस ज्या प्रकारची मदत करतात तशी मदत हिंदी लोकांस बाल्यावस्थेंतील हिंदी धंद्यांस करावयाची असेल तर कमी प्रतीचा व महागाईचा स्वदेशी माल घेण्यास आपण तयार झालें पाहिजे.' स्वदेशी चळवळीस राजकिय कारणांनी बहिष्काराची जोड मिळाल्यानें ही चळवळ पुष्कळच अव्याहत-पणे चालूं राहिली आहे. सन १९२१ मध्ये असहकारितेच्या चळवळीस जोडून खादीची व विलायती मालावरील बहिष्काराची चळवळ पुन्हां प्रामुख्यानें पुढें आली. ह्या चळवळीचे निव्वळ आर्थिकदृष्ट्या समालोचन केल्यास ती सर्वस्वी निर्दोष ठरेल असे नाही. परंतु तिच्या प्रसारामुळें परकी धंदेवाल्यास विरोधक व सापेक्षतः हिंदी उद्योगधंद्यास परिपोषक लोकमत उत्पन्न झालें हे नाकबूल करता येणार नाही.

अर्थशास्त्राची माहिती असणारे लोक औद्योगिक दृष्ट्या, राजकीय चळवळीचे पुढारी ब्रिटिश सरकारास विरोधी हिंदी लोकमताची धग पोहोंचावी ह्या हेतूनें, गरीब हिंदी लोकाची स्थिती सुधारण्याची खटपट करणारे पुढारी त्यास धंदा मिळावा म्हणून व कित्येक लोक निव्वळ भावनावश होऊन, ह्याप्रमाणें निरनिराळ्या हेतूंनीं प्रेरित होऊन निरनिराळ्या लोकांनी हिंदुस्थानात जरूर त्या धंद्याची स्थापना व वाढ करून राष्ट्रास स्वायत्त करण्याच्या धोरणास पूर्ण पाठिंबा दिला आहे. उत्तेजनाच्या व संरक्षणाच्या धोरणाचा अंमल प्रत्यक्ष व्यवहारांत कोणत्या पद्धतीनें व्हावा ह्याबद्दल अर्थातच पुष्कळ दिवस वादविवाद होत होता. सरकारच्या धोरणावर लोकमताची हुकमत अजूनही चालत नाही, असेच म्हटलें पाहिजे, आणि जोंपर्यंत कायदे मंडळें व इतर सरकारी संस्था यांच्या साहाय्यानें विशिष्ट धंद्यास विशिष्ट स्वरूपात मदत करणें शक्य नसतें तोंपर्यंत परदेशी व्यापार व त्या व्यापारावर गबर होणाऱ्या परदेशी मंडळ्या ह्यांबद्दल एकंदरीनें प्रतिकूल लोकमत असणें साहजिक आहे. ह्याच स्वाभाविक विरोधामुळें स्वदेशी चळवळीस किंवा विस्तृत संरक्षणास सर्वस्वी अनुकूल असें लोकमत बनलें आहे. सध्यांच्या राज्यघटनेमध्यें हिंदी उत्पादक व उपभोक्ते ह्यांच्या विशिष्ट हितसंबंधांचा योग्य विचार होऊन सर्व राष्ट्राच्या अंतिम प्रगतीस परिपोषक असें संरक्षणाचें धोरण अंमलांत येणें कठीण आहे, ह्यांत तर शंकाच नाहीं. परंतु ह्याहीपेक्षां अधिक मोठें

किट असें आहे की, नांवाला संरक्षणाचें धोरण मान्य होऊन त्याचा फायदा मात्र हिंदुस्थानांत धंदे स्थापणाऱ्या परकी भांडवलवाल्यांस व्हावयाचा. स्वदेशांतील परदेशांतील योग्य प्रकारें धंद्याचें संवर्धन करावयाचें तर सरकारी मदतीचा फायदा घेऊन मोठमोठे कारखानदार व मंडळ्या उपभोक्त्यास आणि कर भरणाऱ्या नागरिकांस गैरवाजवीपणें नागविणार नाहींत अशी काळजी घेणें आवश्यक आहे, असा ना. गोखले ह्यांनी पहिल्यापासूनच इषारा देऊन ठेविला होता. हिंदुस्थानाच्या सध्यांच्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीत एकंदरीनें संरक्षणाचे धोरण इष्ट असलें तरी सध्याची राज्यघटना व संरक्षणाचे दीर्घ व सूक्ष्म परिणाम हें ध्यानात घेतल्यास संरक्षणाचा प्रत्यक्ष व्यवहारात उपयोग कोणत्या प्रकारें व किती मर्यादेपर्यंत करून घ्यावा ह्याचा काळजीपूर्वक विचार करावयास पाहिजे.

**४ हिंदी संरक्षणाचे विशेषः—** १९२४ सालीं पोलादाच्या धंद्याचें प्रत्यक्षपणे संरक्षण करण्याचा प्रयत्न झाला तोंपर्यंत हिंदुस्थान सरकारचें व्यापारविषयक व औद्योगिक धोरण सर्वस्वी तटस्थपणाचें होतें हें वर सांगितलेंच आहे. खुल्या व्यापाराचें धोरण अर्थशास्त्राच्या तत्त्वास अनुसरून आहे; हिंदी धंद्याचें संरक्षण केल्यास ब्रिटिश कारखानदारास धक्का पोहोंचेल; हिंदी लोकांच्या दारिद्र्याचें निवारण होऊन त्यांच्या राहणीत सुधारणा होण्यास अनेक उपयुक्त वस्तू त्यास स्वस्ताईनें मिळणें व त्यांच्या मालाची, म्हणजे मुख्यतः धान्यें व कच्चा माल ह्याची जास्तीत जास्त भावानें विक्री होणें आवश्यक आहे; हिंदी उद्योगधंद्याचें संरक्षण करण्यास सुरवात केली तर विशिष्ट वर्गाचा व प्रांताचा तेवढा फायदा होऊन इतरास नुकसान सोसावें लागेल, इत्यादि समर्थनीय व असमर्थनीय कोटिक्रमांचें खुल्या व्यापाराच्या धोरणास पाठबळ मिळे. ह्या मुद्याचा पोकळपणा स्पष्टपणें दाखवून संरक्षणाच्या धोरणाची इष्टता ऐतिहासिक व शास्त्रीय दृष्ट्या स्थापित करणें आवश्यक होतें. परदेशी उत्पादकांस यांत्रिक साधनें, विस्तृत व कार्यक्षम संघटना आणि राष्ट्रीय सरकारची सहानुभूतिपूर्वक मदत ह्याचें साहाय्य असल्यानें हिंदी उद्योगधंद्यांचा राष्ट्रीय संरक्षणाखेरीज टिकाव लागणें शक्यच नव्हतें. खुल्या व्यापारानें एक एक धंदा बुडत जाऊन शेवटीं एका बाजूस नैसर्गिक साधनांची विपुलता व मोठी लोकसंख्या आणि उलट बाजूस समाजाचें अठरा विश्वे दारिद्र्य असा देखावा दृष्टीस पडूं लागला. सर्व धंदे जाऊन शेतीचा धंदा उरला, तोही आंतबट्ट्याचा होऊं लागला, इतकी हलाखीची स्थिति झाल्यावर व्यक्तिशः नागरिकांत स्वतः आर्थिक उद्धार करून घेण्याचें त्राण राहणें शक्य नव्हतें. ह्यास्तव सामुदायिक रीत्या आणि सरकारद्वारा कसून प्रयत्न केल्याखेरीज राष्ट्राची आर्थिक व सामाजिक परिस्थिति सुधारावयाची नाहीं हें स्पष्ट होतें. शिवाय, सरकार म्हणजे निव्वळ राजकीय संस्था, तिनें आर्थिक व्यवहारांत हात घालूं नये, हें मत तत्त्वतः चूक असून व्यवहारांत तर त्याचें अवलंबन करणें अशक्य व अनिष्ट आहे, असें अनेक देशांच्या औद्योगिक इतिहासावरून पूर्णपणें

सिद्ध होतें. प्रत्यक्ष इंग्लंडमध्येंही पुरातन काळापासून संरक्षणाचें व सामाजिक हित संवर्धनाचें तत्त्वच अंमलांत असून एकोणिसाव्या शतकांत इंग्लंडनें परराष्ट्रीय व्यापारांत अनियंत्रित देवघेवीचें धोरण मान्य केलें तेंही त्यावेळच्या औद्योगिक परिस्थितीत तो मार्ग इंग्लिश कारखानदारांस व मजूरांस अधिक हितावह होता म्हणूनच होय. एक जकातींचा प्रश्न सोडून दिला तरी इतर मार्गांनीं आपल्या धंदे-वाल्यास आणि व्यापाऱ्यांस मदत करणें इंग्रज सरकारनें सोडलें नव्हतें. फ्रान्स, जर्मनी, अमेरिका इत्यादि राष्ट्रांनी सररहा मोठमोठ्या जकाती बसवून अनेक धंदे ऊर्जिता-वस्थेस आणले व त्यांच्या ह्या धोरणाचा एकंदरीनें राष्ट्रांवर हितावहच परिणाम झाला. हिंदुस्थानातील परिस्थिति सर्वस्वी ह्या देशांसारखी नाही व त्याचें धोरणही तंतोतंत इकडे उपयुक्त ठरेल असेंही म्हणता येणार नाही. तरी ब्रिटिश हितसंबंधास अनुकूल असलेलें तटस्थपणाचें धोरण व हिंदी उद्योगधंद्यांस परिपोषक असें संरक्षणाचें धोरण ह्यापैकी पहिल्याचा त्याग करून दुसऱ्याचा सावधगिरीनें परंतु बिनदिक्कत आश्रय करण्यास वरील राष्ट्रांचे उदाहरण साहाय्यभूत आहे हें नाकबूल करतां येत नाही.

संरक्षणाचें धोरण विचारपूर्वक अंमलात आणलें पाहिजे हें हिंदी लोकांसही मान्य आहे. एका धंद्याचें संरक्षण करावें तर दुसऱ्या धंद्यांची अचानक हानि होते; उत्पादकाचें हित साधावें तर गिऱ्हाईक अगर नागरिक ह्यांवर बोजा पडतो; उत्पादक एका प्रांतांत व उपभोक्ते इतर भागांत अशी स्थिति असल्यास संरक्षणानें प्रांतिक हितविरोध व तेढ ही वाढतात; इत्यादि अनेक लहान-थोर अडचणींची योग्य चौकशी करून सर्व राष्ट्राच्या कायम प्रगतीस ज्या संरक्षणानें खरें साहाय्य होईल अशी खात्रीलायक अपेक्षा वाटेल तितकेंच व त्याच स्वरूपाचें संरक्षण व्यवहारांत मान्य करणें इष्ट होय. वास्तविकपणें धंदे, वर्ग व प्रांत ह्यांच्यांतील तात्कालिक हितविरोध स्वदेशी व बहिष्कार ह्या चळवळींतही दिसून येतो. परंतु विवक्षित आर्थिक अगर राजकीय ध्येय गांठण्यास सर्वांनी सामुदायिक रीत्या प्रयत्न करण्याचें एक साधन ह्या नात्यानें वरील चळवळी समर्थनीय मानल्या जातात. त्याचप्रमाणें सर्व राष्ट्राचें मिळून आर्थिक बल वाढावे आणि राष्ट्राच्या औद्यो-गिक जीवनांत प्रमाणबद्धता व स्वावलंबन ह्यांचा प्रादुर्भाव व्हावा ह्या हेतूनें वरील अडचणींस व तात्कालिक हितविरोधांस न जुमानतां संरक्षणाच्या धोरणाचा स्वीकार करणें इष्ट होय. जकाती बसविणें, उत्पादकांस प्रत्यक्षपणें आर्थिक मदत देणें, किंवा किंचित् भारी दरानें स्वदेशी माल सरकारी व सार्वजनिक खात्यांकरितां विकत घेणें एवढ्याच साधनांनी राष्ट्राच्या आर्थिक बलांत विशेष वाढ होईल असें नाही. मजूर वर्ग, कारागीर, व्यवस्थापक इत्यादि मानवी साधनांच्या कार्यक्षमतेंत वाढ घडवून आणणें, औद्योगिक व व्यापारी संघटना अधिकांत अधिक उत्पादक करणें व परकी अगर देशी धंदेवाले संरक्षणाचा अयोग्य फायदा घेऊन गिऱ्हाइकांस व सरकारास

लुबाडणार नाहीत अशी काळजी घेणें ह्या बाबतीतही सरकार व कायदे मंडळें ह्यांनी जागरूकता बाळगिली पाहिजे. सामान्य व धंदेशिक्षणाचा प्रसार, विशिष्ट शिक्षण व अनुभव जरूर तेथें परदेशांत जाऊन संपादन करण्यास पुरेशा शिष्यवृत्त्या, औद्योगिक महत्त्वाचें शास्त्रीय संशोधन करण्याच्या सोयी, नमुनेदार व प्रयोगादाखल नवे धंदे चालवून दाखविण्याची तयारी, भांडवलाची व इतर प्रत्यक्ष आर्थिक मदत इत्यादि विधायक मार्गांनी सर्व प्रांतिक सरकारांनी आणि हिंदुस्थान सरकारनें प्रयत्न केल्यास संरक्षणाच्या धोरणाचा चिरकालिक सुपरिणाम झाल्यावांचून राहणार नाही. हिंदी लोकांच्या आर्थिक हितवर्धनास मदत करण्याच्या बाबतीत तटस्थपणाचा आश्रय करणारें हिंदुस्थानसरकार अनेक औद्योगिक बाबीत इतर राष्ट्रांपेक्षां अनेक पटींनी समाजसत्तावादी आहे, हें सामान्य मनुष्याच्या ध्यानांत येत नाही. हिंदुस्थानातील प्रायः सर्व आगगाड्या सरकारी मालकीच्या आहेत, कालवे व पाटबधारे बांधून लोकांस पाणीपुरवठा करण्याचें कामही बऱ्याच मोठ्या प्रमाणात सरकार आपल्या जबाबदारीवर करीत आहे, व्यापाऱ्यास व शेतकऱ्यांस कर्ज देण्याची सावकारी कामगिरीही सरकार नित्य चालवितें, शिवाय, कुळावर जमिनीच्या मालकांनी जुलूम करू नये, कर्जदारांस सावकारांनीं लुबाडूं नये, शेतजमिनीची मालकी बिनशेतकरी वर्गाच्या हातांत जाऊं नये इत्यादि आर्थिक हेतु साध्य होण्याकरितां सरकारनें अनेक कायदे केलेले आहेत. हिंदुस्थानातील सर्व जमीन ऐतिहासिक व तात्विक दृष्ट्या आपल्याच मालकीची आहे, असेंही सरकारचें म्हणणें आहे. एवढ्या मोठ्या प्रमाणावर आर्थिक बाबतीत प्रामुख्यानें वावरणाऱ्या हिंदुस्थान सरकारनें तटस्थपणाच्या धोरणाचें समर्थन करण्यास धजावें हें आश्चर्य होय. सरकारी धोरण सध्या कोणत्याही स्वरूपाचें असलें तरी सुशिक्षित लोकमतानें संरक्षणाच्या धोरणाचा सामान्यपणें अवलंब करून ते धोरण सरकाराकडून अंमलात आणलें जाण्याची व त्यामुळे सामान्य नागरिकावर पडणारा तात्कालिक बोजा कमीत कमी करण्याची आणि त्यांची कार्यक्षमता आणि मिळकत वाढविण्याची योग्य ती खटपट केली पाहिजे.

**५ ब्रिटिश साम्राज्य व हिंदुस्थानचें आर्थिक हित**—हिंदुस्थान सरकारास राजकीय व आर्थिक बाबतीत सर्वस्वी ब्रिटिश सरकारच्या तंत्रानें वागावें लागतें हें सर्वश्रुतच आहे. ह्या बाबतीत कॅनडा, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया ह्या वसाहतीस पूर्ण स्वातंत्र्य आहे. म्हणजे वसाहतीच्या आर्थिक हितास्तव इंग्लंड व साम्राज्यांतील इतर प्रदेश ह्यांच्यांतून येणाऱ्या मालास अटकाव करण्याचा अगर त्यावर वाटेल तेवढी जकात बसविण्याचा स्वायत्त वसाहतीच्या सरकारास पूर्ण अधिकार आहे; व ह्या अधिकाराचा उपयोगही त्यांनीं अनेक प्रसंगीं केलेला आहे. ह्या बाबतीतील स्वतःच्या अधिकारशून्यतेची हिंदुस्थानसरकारासही जाणीव असून 'साम्राज्यसरकारचें ह्या बाबतींत जें धोरण असेल तेंच आमचें धोरण असणार' अशी निराशाजन्य कबूलीही हिंदुस्थानसरकारच्या अधिकाऱ्यांनी दिलेली आहे. १९२१

साली सुधारणांचा कायदा अंमलांत आल्यापासून हिंदी लोक व हिंदुस्थानसरकार ह्यांचें आर्थिक धोरणाबद्दल एक मत असलें म्हणजे तरी स्टेट सेक्रेटरींनी त्यास विरोध करूं नये असा कायदेशीर निर्बंध किंवा प्रघात पडेल अशी बहुतेकांस आशा होती. परंतु हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या हितसंबंधांत विरोध आला तर अजूनही साम्राज्यसरकार हिंदुस्थानसरकारच्या तोंडांतील आपला लगाम ढिला करण्यास तयार नसतें, असें गेल्या सात आठ वर्षांतील कित्येक उदाहरणांवरून दिसून येईल. राजकीय व आर्थिक प्रश्नांबद्दल भिन्न मतें प्रतिपादणाऱ्या परस्पर विरोधी इंग्लिश राजकीय पक्षांत हिंदुस्थान व इंग्लंड ह्यांच्यांत हितविरोध आल्यास इंग्लंडच्या हितास अनुकूल धोरण स्वीकारण्याच्या बाबतीत एकमतच दिसून येतें. सर्वत्र खुला व्यापार असावा असें म्हणणारा उदारमतवादी पक्ष, निखालस खुला व्यापार बंद करून साम्राज्यांतील निरनिराळ्या भागांत तेवढी अप्रतिबंध देवघेव व्हावी असें प्रतिपादणारा पुराणमताभिमानी हुजूर पक्ष, आणि सामान्यतः खुल्या व्यापाराचें समर्थन करणारा परंतु हिंदी बाजारात ब्रिटिश मालाचा खप मर्यादित झाल्यास ब्रिटिश कामकऱ्यांचा रोजगार बुडेल अशी भीति बाळगणारा मजूर पक्ष, ह्या सर्वांचा हिंदुस्थानच्या संरक्षणाबद्दलच्या मागणीस कमीअधिक प्रमाणांत विरोधच आहे. विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासूनच खुल्या व्यापाराच्या तत्त्वाबद्दल कांहीं प्रमुख इंग्रज मुत्सद्यांस साशंकता वाटूं लागली होती. खुला व्यापार असणें हें, कच्चा माल व धान्य वसाहतींतून व हिंदुस्थानातून इंग्लडमध्यें स्वस्ताईनें येऊन पडण्यास व इंग्लंडखेरीज साम्राज्याच्या इतर भागांत इंग्लिश मालाचा खप वाढण्यास आवश्यक होतें. ह्यास्तव साम्राज्यांतील सर्व भागांनी आपापसात खुल्या व्यापाराचें तत्त्व मानावें, परंतु परकी राष्ट्रांच्या आयातीवर जरूर तेवढ्या जकाती बसवाव्या ह्या मताचा प्रादुर्भाव झाला व वसाहती या आपल्या सांपत्तिक प्रगतीचें केवळ साधन आहेत, असें मानणाऱ्या इंग्रज लोकांत तें मत हळुहळु लोकप्रियही होऊं लागलें. परंतु राजकीय दृष्ट्या स्वायत्त झालेल्या व औद्योगिक बाबतीत प्रौढावस्थेस पोहोंचलेल्या वसाहतीस इग्लंडनें कारखानदारी करावी व वसाहतवाल्यांनी शेतें कसावीं हा श्रमविभाग मान्य होण्यासारखा नव्हता. साम्राज्यातील खुल्या व्यापारास वसाहतींचा तीव्र विरोध असल्यानें लवकरच खुल्या व्यापाराऐवजीं सवलतीच्या व्यापाराचें तत्त्व पुढें माडलें गेलें. म्हणजे प्रत्येक स्वायत्त वसाहतीस स्वतःचे उद्योगधंदे वाढविण्यास जरूर ते उपाय योजण्याची व तसें करताना इंग्लंड व साम्राज्यांतील इतर भाग ह्यांच्या मालावर प्रतिबंधक जकाती बसविण्याची मुभा असावी; मात्र साम्राज्याबाहेरच्या परकी राष्ट्रांतील उत्पादकांवर जेवढी बंधनें टाकलेली असतील त्यांपेक्षा साम्राज्यांतील इतर देशांच्या उत्पादकांवर कमी बंधनें टाकावी अशी सुधारणा सुचविली गेली. ह्याच सुधारणेस साम्राज्यांतर्गत सवलतीचा व्यापार असें म्हणण्याचा प्रघात पडला व आपापल्या परिस्थितीस अनुसरून स्वायत्त वसाहतींनीं कमी अधिक प्रमाणांत तिचें अवलंबनही केलें.

हिंदुस्थानसरकार म्हणजे बोलूनचालून ब्रिटिश सरकारच्या हातांतील बाहुलें. इंग्लंडमध्यें ज्या मताचें प्राबल्य असेल त्या मतास परिपोषक असें धोरण हिंदुस्थानांत बिनहरकत सुरू व्हावयाचें; परंतु सवलतीच्या व्यापाराच्या योजनेची इंग्लंड व स्वायत्त वसाहती ह्यांत वाटाघाट होत असतां हिंदुस्थानसारख्या स्वायत्त नसलेल्या परंतु मोठ्या देशाच्या सरकारचें म्हणणें काय आहे, हें विचारणें साहजिक होतें. त्यावेळचे व्हाईसरॉय लॉर्ड कर्झन हे स्वतः खुल्या व्यापाराच्या तत्त्वास मुळींच अनुकूल नसत, परंतु हिंदुस्थानच्या हितसंबंधाच्या दृष्टीनें सवलतीच्या व्यापाराचें तत्त्व कितपत हितावह आहे ह्याचा पूर्ण विचार करण्याकरितां त्यांनी आपल्याच हाताखालच्या अधिकाऱ्यांची एक कमिटी नेमली. ह्या कमिटीच्या निकालांचा विचार करून हिंदुस्थानसरकारचें म्हणून साम्राज्यांतील सवलतीच्या योजनेवरील मत प्रसिद्ध करण्यांत आलें; त्यांतील मुख्य आशय पुढीलप्रमाणें होता. '( १ ) आयात व निर्यात व्यापार अप्रतिबंध असण्यानें जे फायदे व्हावयाचे ते सवलतीची योजना अंमलात न आणतां हिंदुस्थानास फार मोठ्या प्रमाणांत मिळत आहेत. ( २ ) निव्वळ हिंदुस्थानच्या आर्थिक हिताच्या दृष्टीनें विचार केला तर सवलतीच्या योजनेपासून ह्या देशाचा फायदा म्हणण्यासारखा होण्याचा मुळींच संभव नसून उलट पुष्कळ नुकसान येण्याची मात्र धास्ती आहे; ( ३ ) निव्वळ जकातीच्या दृष्टीनें पाहिलें तरी परकी देशांनी हिंदी मालावर विशेष अधिक जकाती लादून सवलतीच्या योजनेचा प्रतिकार करण्याचें ठरविलें तर हिंदुस्थानाचें नुकसानच होईल. हिंदुस्थानसरकारास सवलतीच्या धोरणापासून देशाचा फायदा होईल अशी अधिक खात्री वाटेपर्यंत तें धोरण हिंदुस्थानास अनर्थावहच समजलें जाईल. महायुद्धाच्या काळांत ब्रिटिश साम्राज्यांतील निरनिराळ्या भागांचें आपापसांतील सहकार्य पुष्कळच वाढलें. त्याचप्रमाणे ब्रिटिश साम्राज्य व दोस्त राष्ट्रें ह्यांच्या लष्करी धोरणांत एकसूत्रीपणा व पूर्ण सहकार्य ह्यांचीही अवश्यकता भासू लागली. सर्व दोस्तांनी मिळून जर्मनी व इतर शत्रुराष्ट्रें यांचा पाडाव करण्यास आपलें लष्करी व सांपत्तिक बल एकवटलें पाहिजे ही कल्पना बळावत गेली. महायुद्ध संपल्यानंतर देखील ब्रिटिश साम्राज्य हा राजकीय दृष्ट्या एकजीव असलेला घटक आर्थिक दृष्ट्याही स्वयंपूर्ण असावा आणि साम्राज्याच्या महत्त्वाच्या गरजा भागविण्याच्या बाबतीत पुन्हां कोणा शत्रूच्या हातांत सत्ता जाऊं नये ह्या भावनेचा कांही वर्षे बराच बोलबाला होत होता. परंतु युद्धकालीन परिस्थितीत वाढीस लागलेली राजकीय ऐक्याची भावना शांततेच्या काळीं टिकणें अशक्य होतें. विशेषतः प्रत्येक वसाहत स्वतःच्या अतिम हिताच्या दृष्टीनें आपलें आर्थिक धोरण आंखूं लागतांच, साम्राज्यांतील निरनिराळ्या भागांचा परस्पर हितविरोध आणि इंग्लंडचे धंदे भरभराटीस आणण्याची खटपट करण्यात परकी राष्ट्रांकडून प्रतिकारस्वरूप बंधनें पडल्यानें अधिक नुकसान सोसावें लागण्याची भीति हीं स्पष्टपणें दिसूं लागली. इंग्लंड हा सर्व वसाहतींचा माय-

देश, इंग्लंडचें आर्थिक सामर्थ्य हें साम्राज्यघटनेस शरीरघटनेंतील हृदयसामर्थ्या-प्रमाणें आवश्यक इत्यादि अलंकारिक भाषेस आर्थिक व राजकीय हितसंबंधाच्या मानानें मुळीच महत्त्व उरलें नाहीं. कर्झनसाहेबांच्या कारकीर्दीत ज्या आर्थिक कारणांमुळें सवलतीची योजना ह्या देशासंबंधानें अमान्य झालेली होती ती कारणें महायुद्धानंतरही बहुंशी तितकींच सबल होती. शिवाय, राजकीय बाबतींत ह्याच वेळी हिंदुस्थानांत ज्या कांहीं सुधारणा झाल्या त्या अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असें बऱ्याच मोठ्या लोकमताचें म्हणणें असल्यानें साम्राज्यवादी भावनेवर अवलंबून असलेल्या सवलतीच्या योजनेस हिंदी लोकमत अनुकूल होणें शक्य नव्हतें. राजकीय सुधारणा ज्यांस समाधानकारक वाटत होत्या त्यांसही हिंदुस्थानास पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज परदेशी व्यापाराबद्दलचें कोणतेंही धोरण निश्चितपणें स्वीकारणें शक्य नाही हें पूर्णपणें माहीत होतें. शिवाय, इंग्लिश कारखानदार हेच हिंदुस्थानचे मुख्य प्रतिस्पर्धी असल्यानें त्यांस सवलती देऊन हिंदी लोकांवरील एकंदर बोजा वाढविण्यास कोणीही तयार नव्हतें. खुला व्यापार हिंदुस्थानावर लादण्याची झालेली सक्ती, देशी गिरण्यांत तयार झालेल्या कापडावर बसविलेला अंतर्गत कर, अफूच्या निर्यातीला बंदी झाल्यानें सरकारी उत्पन्नांत आलेली तूट इत्यादि अनुभवांवरून हिंदुस्थानसरकारचें स्वतःचें मतही सवलतीच्या योजनेस फारसें अनुकूल असण्याचा संभव नव्हता. परंतु जोंपर्यंत हिंदुस्थानसरकार सर्वस्वी ब्रिटिश सरकारच्या हुकुमतीखालीं चाललेलें आहे तोंपर्यंत सवलतीच्या प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार होणेंही अशक्य होतें.

**६ सवलतीच्या योजनेचें तत्त्वः**—सर्वसाधारण व साम्राज्यांतर्गत खुल्या व्यापाराशीं तुलना केल्यास सवलतीच्या व्यापाराचा विशेष म्हणून असा सांगण्यांत येतो कीं ह्या योजनेनुसार प्रत्येक वसाहतीस स्वतःच्या उद्योगधंद्याच्या वाढीस आवश्यक असलेलें धोरण स्वीकारण्यास पूर्ण स्वातंत्र्य आहे; व हें धोरण प्रत्यक्ष इंग्लंडासही प्रतिकूल असलें तरी ब्रिटिश सरकार त्यांत हात घालणार नाही. हिंदुस्थानसरकार हें वसाहतींतील सरकारांप्रमाणें स्वायत्त नसल्यानें व त्या सरकारची शारीरिक अगर मानसिक रचनाही हिंदी नसल्यानें सवलतीच्या धोरणाचा मुख्य विशेष, म्हणजे आपखुषीनें साम्राज्याकरितां घस सोसण्याची तयारी, हा येथें संभवतच नाही. राजकीय सत्तेच्या बाबतींत हिंदुस्थानास स्वायत्त वसाहतींचा दर्जा मिळाल्याखेरीज सवलतीच्या अगर दुसऱ्या कसल्याही योजनेचा समतेनें व न्यायानें अंमल होण्याची आशा नाही. साम्राज्य परिषदांत अगर अंतर्राष्ट्रीय सभांत निव्वळ दिखाऊ समता लाभल्यानें आर्थिक अगर राजकीय हितास जपण्याच्या स्वायत्ततेच्या बाबतींत खरी समता उत्पन्न होऊं शकणार नाहीं. ब्रिटिश साम्राज्याबद्दल आपलेपणाची भावना व त्या साम्राज्याचे अवयव असण्यानें उपलब्ध होणाऱ्या राजकीय सामर्थ्याची जाणीव ह्यांवर विसंबून सवलतीच्या धोरणाचा विचार व्हावयास

पाहिजे हें खरें. परंतु हिंदुस्थानाची सध्यांची राज्यघटना कायम आहे तोंपर्यंत हिंदी लोकास साम्राज्याबद्दल अभिमान वाटावा किंवा साम्राज्यांत राहिल्यानें देशाचा राजकीय फायदा आहे अशी त्याची कल्पना व्हावी, हें अस्वाभाविक होय.

साम्राज्याच्या निरनिराळ्या भागानीं आपापसांत सवलतीनें व्यापार करून ब्रिटिश साम्राज्यास राजकीय व आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण करावें ह्या योजनेमुळें इंग्लंड व साम्राज्यांतील इतर भाग ह्यांचें आर्थिक हित खात्रीनें साधेल असें मानलें जातें तेंही सर्वस्वी खरें नाहीं. इंग्लंडचें औद्योगिक वर्चस्व इंग्लिश मालाचा परकी बाजारांत खप होण्यामुळेंच स्थापित झालेलें आहे. हा खप फक्त साम्राज्यांतील देशांत होतो असें नसून इतर देशांतही तो मोठ्या प्रमाणावर चालतो. सवलतीचें तत्त्व मान्य केल्यास इंग्लंडला परराष्ट्रीय मालावर संरक्षक जकाती बसविणें भाग आहे; व इंग्लंडनें आपल्या मालावर जकाती बसविल्या म्हणून इतर राष्ट्रांनीही इंग्लिश मालावरील जकाती वाढविल्या तर इंग्लंडचा निर्यात व्यापार मर्यादित झाल्यावाचून राहणार नाहीं. शिवाय, सवलतीच्या योजनेंत साम्राज्याच्या प्रत्येक भागास स्वतःपुरतें संरक्षक धोरण अवलंबिण्याची मुभा ठेवलेली असल्यानें वसाहतींतून कच्चा माल इंग्लंडला जाण्यास व इंग्लिश मालाची वसाहतींत आयात होण्यासही अडथळा होणार. धान्य व कच्चा माल ह्यांची स्वस्ताईनें आयात करून उत्पादकांच्या कार्यक्षमतेच्या जोरावर त्यांपासून मुबलक जिन्नस कमी खर्चानें तयार करावयाचे व त्याची परदेशांत जास्तीत जास्त प्रमाणात विक्री करावयाची असाच क्रम ठेवल्याखेरीज इंग्लंडची औद्योगिक भरभराट टिकणें शक्य नाहीं. सवलतीचें धोरण स्वीकारल्यास कच्च्या मालाची किंमत वाढून तयार मालाचा बाजार मात्र मर्यादित होणार! सर्व राष्ट्रांत संरक्षक पद्धतीचा प्रसार होत असल्यानें व कार्यक्षमतेच्या बाबतींतही कांहीं राष्ट्रें इंग्लंडच्या पुढें गेल्यानें इंग्लिश कारखानदार व व्यापारी ह्यांच्या धंद्यास उतरती कळा लागत आहे अशा वेळीं सवलतीच्या योजनेचा आश्रय केला तर इंग्लंडची औद्योगिक स्थिति अधिकच कष्टप्रद होईल. अनेक पिढ्या खुल्या व्यापाराच्या तत्त्वानें चालून संपन्न झालेल्या ब्रिटिश मुत्सद्यास हें दिसत आहे आणि म्हणूनच उघडपणें खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा सर्वस्वी त्याग करण्याची त्यांची तयारी नसून परिस्थितीच्या ओघानें जेथें संरक्षण अपरिहार्य वाटेल तेथेंच त्याचा ते आश्रय करीत आहेत. इंग्लंड, वसाहती व हिंदुस्थान ह्या सर्वांतच खुला व्यापार मागें पडून संरक्षणाच्या योजना पुढें येत आहेत. अशा वेळीं सवलतीच्या व्यापारापासून कोणाचाही खरा फायदा होण्याची आशा नाहीं. हिंदुस्थान व ब्रिटिश साम्राज्याचे इतर भाग ह्यांच्या परस्पर आर्थिक संबंधाच्या दृष्टीनें पाहिलें तरीही सवलतीचें धोरण योग्य प्रकारें अंमलांत आणल्यास इंग्लंडचा फायदा होईल असें वाटत नाहीं. हिंदुस्थानाच्या आयात व्यापारापैकीं आजच जवळ जवळ शेंकडा ७० टक्के व्यापार साम्राज्यांतील देशांशीं चालत असून त्यांत एकट्या इंग्लंडचाच भाग शेंकडा ६०-६२ आहे. सवलतीच्या योगानें हा भाग वाढण्याची फारशी आशा

नाहीं. उलट हिंदुस्थानांतून बाहेर जाणाऱ्या मालापैकीं फक्त शेंकडा ३७·८ टक्के माल सम्राज्याच्या इतर भागांत, व त्यापैकीं शेंकडा २३·७ एवढा भाग इंग्लंडला जात असल्यानें हिंदुस्थानास परराष्ट्रांच्या प्रतिकाररूप जकातींस बरेंच भिऊन असलें पाहिजे. शिवाय, येथील निर्यात व्यापार धान्य व कच्चा माल ह्याचाच असल्यानें, व असला माल सर्वच राष्ट्रांत कमी जकातीनें घेतला जात असल्यानें 'सवलती'पासून हिंदुस्थानास म्हणण्यासारखा फायदा होणार नाही. येथून जाणाऱ्या कच्च्या मालावर निर्यात जकाती बसवाव्या व साम्राज्यांत जाणाऱ्या मालावर निर्यात जकात माफ अगर कमी करावी अशी कोणी सूचना केल्यास ती हिंदुस्थानाच्या निर्यात व्यापारास अनर्थावहच ठरेल. १९१९ साली हिंदुस्थानातून बाहेर जाणाऱ्या कातड्यांवर शेंकडा पंधरा टक्के जकात बसवून साम्राज्यांतल्या इतर भागांत जाणाऱ्या कातड्यांवर ती शेंकडा पाच टक्के इतकी उतरविण्यांत आली होती हें वर सांगितलें आहे. परंतु ह्या सवलतीचाही दुरुपयोग होत आहे असें दिसल्यावरून १९२३ साली कातड्यांच्या सर्वच निर्यातीवर सरसहा शेंकडा पाच टक्के जकात करण्यांत आली.

१९२०–२१ साली पहिल्या प्रथम ब्रिटिश सरकारनें इंग्लंडांत येणाऱ्या चहा, कॉफी, तंबाखू व साखर ह्या जिनसांवरील त्यावेळच्या जकाती साम्राज्यातून येणाऱ्या मालाच्या बाबतीत कांहींशा कमी केल्या; त्यावेळेपासून सवलतीच्या व्यापाराचें तत्त्व अनेक प्रसंगीं हिंदी कायदे मंडळापुढें आलेलें आहे. कर्झनसाहेबांनी आपले कार्यकारी मंत्री सर एडवर्ड लॉ ह्यांच्या नेतृत्वाखाली कमिटी नेमून ज्याप्रमाणें ह्या प्रश्नाचा विचार केला, त्याचप्रमाणें १९२० सालीही बदललेल्या परिस्थितींत कर्झन-साहेबांच्या वेळचें सवलतीच्या योजनेस प्रतिकूल असलेलें मत कितपत समर्थनीय आहे ह्याचा विचार करण्यास एक कमिटी नेमली गेली. परंतु ह्या कमिटीस सवल-तीच्या व्यापारापासून हिंदुस्थानाचा नफा होईल किंवा तोटा होईल हें निश्चितपणें सांगतां येईना व दुसऱ्या एखाद्या मोठ्या कमिटीनें ह्या सर्व प्रश्नाची चौकशी करावी अशी तिनें शिफारस केली. तरी, हिंदुस्थानांतून परदेशांत जाणाऱ्या मालावर तेथें आयात जकाती वाढविल्या जाऊन निर्यात व्यापार मर्यादित होण्याची भीति नाहीं, परदेशी मालावर आयात जकात वाढविल्यास हिंदी गिऱ्हाइकांवर फार बोजा पडेल व साम्राज्याच्या इतर भागात हिंदुस्थानाचा निर्यात व्यापार वाढण्याची अपेक्षा नाही असें आपलें मत असल्याचें त्या कमिटीनें नमूद केलें. नवीन राजकीय सुधार-णांचा एक आवश्यक भाग म्हणून हिंदुस्थानास कायदेशीर रीतीनें पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य दिलें जावें अशी हिंदी लोकाची मागणी होती. परंतु हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति क्रमाक्रमानें व पार्लमेंटाच्या मर्जीनुसार अंमलात यावयाची असल्यानें आणि इतर राज्यघटनांतहि अशी व्यवस्था नसल्यानें कायद्यात कलम घालून हिंदी सरकारास पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य देणें शक्य नाहीं, असें सुधारणांचा कायदा तयार करणाऱ्यांचें मत पडलें. परंतु जें कायद्यानें होणें

अशक्य ते तसा प्रघात पाडून मिळवावें आणि हिंदुस्थान सरकार व हिंदी कायदे-मंडळ ह्यांचे एकमत असल्यास आर्थिक धोरणांत स्टेट सेक्रेटरीने हात घालूं नये अशी त्यांची शिफारस होती. ब्रिटिश सरकारने साम्राज्यांतील सर्व भागांस लागू असलेली परराष्ट्रांशी होणाऱ्या तहा अन्वये एखादी जकातीसंबंधींची योजना आखल्यास ती हिंदुस्थानात अंमलांत आणण्याच्या हेतूनें स्टेट सेक्रेटरीस हिंदुस्थानच्या आर्थिक धोरणावर हुकमत चालविता यावी. असा एक अपवाद वरील रूढी-वरही लादला होता. त्याचा फायदा घेतला जाऊन सवलतीचे धोरण हिंदु-स्थानावर इंग्लंडकडून लादलें जाईल अशी हिंदी लोकांस भीति वाटत होती, आणि जकातीच्या बाबतीत जें काही स्वातंत्र्य मिळालें असेल त्याचा पूर्ण उपयोग करून हिंदी उद्योगधंद्यास परिपोषक असें नवें व्यापारी धोरण हिंदुस्थानसरकारने स्वीका-रावें अशी लोकांची व कायदे मंडळाची जोरानें मागणी सुरू झाली. महायुद्धाच्या वेळी ध्यानांत आलेले येथील औद्योगिक परिस्थितीचे दोष नाहीसे करून सरकारच्या सहानुभूतीनें व साहाय्यानें हिंदी धंदे कसे सुधारावे ह्याचा विचार करण्यास १९१६ मध्येंच एक कमिशन नेमलेलें होतें. परंतु जकातीचा प्रश्न त्या कमिशनच्या कक्षेबाहेर ठेवण्यांत आला होता. १९२१ मध्यें जकातीच्या प्रश्नाचा सांगोपांग विचार करून हिंदुस्थानाचें व्यापारी धोरण ठरविण्यास दुसरें एक कमिशन नेमलें गेलें. ह्या दोन कमिशनांची नेमणूक व त्यांच्या शिफारशी ह्यास हिंदुस्थानच्या औद्योगिक व व्यापारविषयक प्रगतीच्या दृष्टीनें विशेष महत्त्व दिलें पाहिजे.

**७ औद्योगिक प्रगति**—सुधारलेल्या यांत्रिक साधनांचा उपयोग, पद्धतशीर संघटना, बाजाराची पूर्ण माहिती इत्यादिकांचा अंगीकार करून धंदा यशस्वी करून दाखविण्यास आवश्यक असलेलें ज्ञान, हिंमत, व भांडवल ही सामान्य हिंदी उत्पादकाजवळ जरूर तेवढ्या प्रमाणात सापडत नसल्यानें हिंदी धंदे आत-बट्ट्याचे होतात व परकी प्रतिस्पर्ध्यांस ह्या गोष्टी अधिक प्रमाणात उपलब्ध असल्यानें त्यांचा टिकाव लागू शकतो. एखाद्या विवक्षित पद्धतीनें व पुरेशा भांडवलाच्या साहाय्यानें विशिष्ट धंदा केल्यास तो खात्रीनें किफायतशीर होतो असें दिसून आल्यास मात्र भांडवलवाले व योजक उत्पादन कार्यास प्रवृत्त होतात. अर्वाचीन साधनांच्या बाबतीत मागासलेल्या व परकी प्रतिस्पर्ध्यांच्या पुढें आपला टिकाव लागणार नाही अशी अनेक वर्षे समजूत होऊन बसलेल्या हिंदी उत्पादकास अशा आश्वासनाची फार जरूर असते. नमुनेदार अगर प्रयोगाखातर म्हणून चालविलेल्या अशा धंद्यात जो खर्च व धोका असतो तो सरकारखेरीज इतर कोणीही घेण्यास तयार होणार नाही; म्हणून हिंदुस्थानसरकारनें हिंदुस्थानाची औद्योगिक व आर्थिक दृष्टीनें पूर्ण पाहणी करून येथें किफायतशीर होतील असे धंदे चालवून दाखविणें व नंतर योग्य ती मदत देऊन ते खाजगी उत्पादकांच्या हवाली करणें इष्ट आहे, असें अनेक हिंदी पुढाऱ्यांचे पुष्कळ वर्षे मागणें आहे. परंतु हिंदी उद्योगधंद्यांस मदत करण्याचें नाव

नियमाच कानावर हात ठेवून तटस्थपणा स्वीकारणाऱ्या हिंदुस्थानसरकारनें ह्या बाबतीत किंचितही सहानुभूति दाखविली नाही. मद्रास इलाख्यासारख्या कांही प्रांतिक सरकारांनी आपापल्या प्रांतांपुरतें औद्योगिक संवर्धनाचें धोरण स्वीकारून कांहीं विशिष्ट धंदे नमुनेदारपणें चालवून दाखवितांच युरोपीयन व्यापारी वर्गाचें पित्त खवळून त्यांनी स्टेट सेक्रेटरीच्या द्वारा मद्राससरकारच्या प्रगमनशील औद्योगिक धारणास पायबंद घातला. १९१० साली लॉर्ड मोर्ले हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असताना त्यांनी ह्या बाबतीत आपलें म्हणून पुढील धोरण आंखून दिलें:—'अर्वाचीन शास्त्रें व युरोपियन देशांतील पद्धति यांवरून सुचणाऱ्या उत्पादक पद्धतींतील सुधारणाशी हिंदी लोकाचा परिचय व्हावा एवढ्याकरितां सरकारी पैसा खर्च करण्यास हरकत नाही, सरकारनें त्यापेक्षा अधिक कांही करता कामा नये; ह्या सुधारणाचें अवलंबन करून फायदा मिळवितां येतो हें निदर्शनास आणण्याचें काम खाजगी लोकाचें आहे.'

हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकारें ह्यांस हिंदी उद्योगधद्याच्या वाढीबद्दल जी थोडी जबाबदारी वाटत होती ती मोर्ले साहेबांच्या वरील हुकमानें पार नाहीशी आली. दोन वर्षांनी लॉर्ड क्रयू हे स्टेट सेक्रेटरी असताना त्यांनी मोर्ले ह्यांच्या हुकुमात शाब्दिक बदल न करता त्याच्याच अंमलाखाली सरकारास प्रत्यक्ष कामगिरी करण्यास पुष्कळ वाव आहे असा श्लेष काढला. परंतु ही मर्यादित कामगिरी करण्यासही आपणाजवळ जरुर ती संघटना व साधनें उपलब्ध नाहीत ह्या सबबीवर हिंदुस्थान सरकार स्वस्थ बसलें. परंतु लोकाची मागणी अधिक जोरदारपणें सरकारपुढें मांडली जाऊं लागली आणि महायुद्ध सुरू होताच हिंदुस्थानाच्या औद्योगिक परिस्थितीचे दोष व ते सरकारी मदतीनेंही दूर करण्याची शक्यता स्पष्टपणें दिसूं लागली. १९१५ सालच्या नोव्हेंबरमध्यें लॉर्ड हार्डिंज व त्याचें मंत्रिमंडळ ह्यांनी स्टेट सेक्रेटरीस एक खलिता पाठविला होता, त्यात पुढील महत्त्वाचे उद्गार आढळतात:—"युद्ध संपल्यानंतर हिंदुस्थानाचें औद्योगिक सामर्थ्य वाढविण्यास योग्य असें निश्चित व स्वयंपूर्ण धोरण अंगीकारलें पाहिजे हें दिवसानुदिवस अधिक स्पष्ट होत आहे. असें न केलें तर राजकीय वर्चस्वाचें साधन म्हणून परदेशी व्यापार काबीज करूं पाहणाऱ्या परराष्ट्रीय कारखानदारांस आपला माल कमी किंमतीस विकण्याचें हिंदुस्थान देश हें एक सुगम स्थान होऊन बसेल. परिस्थितीस अनुसरून कारखानदारीत शक्य तितकी प्रगति घडवून आणण्यास सरकारनें शिकस्तीची मदत करणें हें सरकारचें कर्तव्यच आहे असें युद्ध संपल्यावर हिंदी लोक मानतील." लष्कर, आगगाड्या व सरकारची इतर खातीं ह्यांमध्यें लागणाऱ्या मालापैकी कोट्यवधि रुपयाचा माल दरवर्षी परदेशांतून आणला जातो. कित्येक जिन्नस हिंदुस्थानात मिळत असूनही परदेशी, विशेषतः इंग्लिश, माल आणला जातो. कित्येक प्रकारचा माल सरकारी मदतीनें येथें तयार होणें शक्य असतें. सरकार दरवर्षी जें पंधरा एक कोटी रुपयाचें सामान विलायतेंतून आणवितें तें विकत घेण्याच्या वेळी सरकारनें हिंदी उत्पादकास योग्य संधी देऊन

शक्य तेवढें उत्तेजन दिलें तरीही येथील औद्योगिक परिस्थिति पुष्कळच सुधारण्यासारखी आहे. सुमारें चाळीस वर्षांपूर्वीच सरकारनें आपलें ह्या बाबतींतील धोरण म्हणून असें जाहीर केलें होतें कीं, हिंदुस्थान सरकारच्या निरनिराळ्या खात्यांस लागणारा सर्व माल शक्य तोंवर हिंदी बाजारांतच खरेदी केला जाईल. अशा धोरणानें स्वदेशी व विलायती मालाच्या येथील व्यापाऱ्यास सरकारास माल पुरविण्याची सारखीच संधी मिळाली असती. परंतु हा नियम अनेक सबबींवर व्यवहारांत धाब्यावर बसविण्यांत येई. सरकारास लागणारा माल उत्तम प्रकारचा आहे व मोठ्या प्रमाणावर त्याचा एकसारखा पुरवठा होण्याची खात्री आहे ह्याबद्दल पूर्णपणें समाधानकारक व्यवस्था करावयाची तर इंग्लंडातच इंग्लिश कारखानदार अगर व्यापारी ह्यांच्याशी करार करणें आवश्यक आहे असें सांगण्यांत येई. हिंदुस्थानांत पुष्कळ प्रकारचा माल उत्पन्न होत असतां व सर्व मालाचे विश्वसनीय व प्रतिष्ठित व्यापारी येथें धंदा करण्यास तयार असतां विलायतेंतील व्यापाऱ्यांशी अगर उत्पादकांशी प्रत्यक्षपणें करार करून विश्वसनीयता, सोय, इत्यादिकांच्या नांवावर अधिक खर्च करणें सरकारच्या अगर लोकांच्या हिताचें नाहीं, असा आक्षेप येथील हिंदी व युरोपियन व्यापाऱ्यांनीं औद्योगिक कमिशनपुढें मांडला होता. कमिशननें सरकारच्या माल खरेदी करण्याच्या पद्धतींत सुधारणा होणें आवश्यक आहे असें आपलें मत दिलें.

ही सुधारणा अमलांत आणण्यास सरकारी खात्यांत स्वतंत्र घटना कशी करावी ह्याचा विचार करण्यास दुसरी एक कमिटी नेमली गेली. तिच्या शिफारशीवरून हिंदुस्थान सरकारनें माल विकत घेण्याचें एक स्वतंत्र खातें उघडलें. ह्या खात्यामार्फत हिंदुस्थानांतील व परदेशांतील व्यापाऱ्यांकडून जरूर तो माल खरेदी केला जातो. १९२१ सालापासून लंडन येथें हिंदी हाय कमिशनर म्हणून एक उच्च दर्जाचा सरकारी अधिकारी असून निव्वळ राज्यकारभाराखेरीज हिंदुस्थान सरकारच्या वतीनें इंग्लंडमध्यें व्हावयाचे सर्व व्यवहार त्यांच्यामार्फत केले जातात. सरकार हिंदी उत्पादक व व्यापारी ह्यांस विशेष मदत तर करीत नाहींच, परंतु त्यांस योग्य संधीही देत नाहीं व हिंदी नागरिकांचा पैसा इतर परदेशी मालापेक्षांही महाग पडणाऱ्या ब्रिटिश मालाच्या खरेदींत खर्च करतें असले आक्षेप अजूनही वारंवार पुढें येतात. गेल्या पांच वर्षें सरकार आगगाड्यांवर दर वर्षी तीस कोटी रुपये भांडवल खर्च करीत असल्यानें अशा टीकेस विशेष महत्त्व प्राप्त झालें. सरकारनेंही अशा टीकेस उत्तर म्हणून आपल्या माल खरेदी करण्याच्या नियमांत वारंवार सुधारणा केली आहे. नुकताच म्हणजे १९२८ सालीं ह्या नियमांत बदल झाला आहे. ज्या कामाकरितां माल घ्यावयाचा त्या कामास तो सर्वांशी उपयुक्त असल्याखेरीज तो घेऊं नये व जेथें स्वस्त माल मिळेल तेथें तो घ्यावा ह्या सर्वसामान्य नियमांखेरीज विशेषतः हिंदी व्यापारी व उत्पादक यांस सवलत मिळावी म्हणून पुढीलप्रमाणें नियम करण्यांत आले आहेत:—" सरकारी अधिकाऱ्यांस तसें करणें

योग्य वाटल्यास त्यांनी हिंदुस्थानांत तयार झालेला माल थोडी जास्त किंमत देऊनही घ्यावा. सर्वस्वी हिंदुस्थानात तयार झालेला माल, परदेशी मालाहून किंवा परदेशी कच्च्या मालापासून हिंदुस्थानांत तयार केलेल्या मालाहून अधिक पसंत केला जावा. विलायती माल घ्यावयाचा तोही परदेशांतून मुद्दाम आणविण्याऐवजी हिंदुस्थानांतील व्यापाऱ्याकडूनच घ्यावा." नियम कोणतेही असले तरी त्याचा वास्तविक परिणाम माल वापरणारे व विकत घेणारे जे सरकारी नोकर असतात त्यांच्या कळकळीवर अवलंबून राहणार हें उघड आहे. युद्धकालीन अनुभव व नव्या राजकीय सुधारणांमुळें सरकारी मनोरचनेंत घडून आलेला अल्पसा फरक ह्यांचा परिणाम हिंदी धंद्यास सरकारी मदत मिळण्याच्या धोरणास अनुकूल असाच आहे. सरकारी मदतीचें तत्त्व मान्य झाल्यानें विशिष्ट नियम कोणत्या प्रकारें अंमलांत आणले जातात व त्याच्या अमलामुळें हिंदी अगर युरोपियन उत्पादकांस सरकारी उत्पन्नांतून वाजवीपेक्षा अधिक भाग मिळतो किंवा काय हे नेहमीं लक्ष्यपूर्वक पाहिलें पाहिजे.

**८ जकातींच्या धोरणांत फरकः**—'हिंदुस्थानास आर्थिक स्थैर्य प्राप्त करून देण्यासाठीं एवढेंच नव्हे, तर आपला देश सुप्रतिष्ठित व प्रगमनशील आहे असें एकंदर जगानें मान्य करावें अशी आकांक्षा असलेल्या हिंदी लोकांचें समाधान व्हावें म्हणूनही औद्योगिक प्रगतींत धडाडीचें धोरण स्वीकारणें तात्कालिक आवश्यकतेचें झालें आहे.'[१] 'औद्योगिक घटनेची वाढ विषमतेनें व पुष्कळ बाबतींत अपुरी झालेली आहे. कांहीं ध्यानांत ठेवण्याजोगे अपवाद सोडले तर एतद्देशीय भांडवलवाल्यांनीं देशांतील बहुमोल कच्चा माल तसाच पडू दिला आहे अगर त्यापासून उपयुक्त जिन्नस तयार करून फायदा मिळविण्याचें काम परदेशावर सोंपविलें आहे असें दिसतें. हिंदुस्थानाची आर्थिक वाढ प्रगतीच्या मार्गानें सुरू करण्यास जोरदार व सुव्यवस्थित प्रेरणा होणें आवश्यक आहे. विशिष्ट ज्ञान, भांडवल व संघटना ह्या बाबतींत पद्धतशीरपणें मदत झाल्यानेंच अशी प्रेरणा उपलब्ध होईल.'[२] हिंदी उद्योगधंद्याच्या वाढीस जकातीच्या व इतर मार्गांनीं सरकारनें प्रत्यक्षपणें मदत करणें आवश्यक आहे हे मत सरकारनें मान्य केल्याचें वरील उताऱ्यांवरून स्पष्टपणें दिसेल. १९२१ सालीं नव्या राज्यघटनेनुसार अस्तित्वांत आलेल्या मध्यवर्ती कायदेमंडळानें सरकारनें आपल्या बदललेल्या धोरणास मूर्त स्वरूप द्यावें व तसें करण्याचे योग्य मार्ग शोधून काढण्यास एक स्वतंत्र कमिशन नेमावें अशी मागणी केली. त्या मागणीप्रमाणें जकातीच्या व सवलतीच्या व्यापाराच्या प्रश्नाचा सर्व बाजूनें विचार करून शिफारशी करण्याकरिता १९२१ चें जकातीचें कमिशन नेमण्यांत आलें. ह्या कमिशनपुढें ज्याच्या साक्षी झाल्या त्यांपैकीं बहुतेक सर्व हिंदी साक्षीदारांनीं व कांहीं युरोपियनांनींही संरक्षणाच्या धोरणास आपला पूर्ण पाठिंबा दिला. तरी हिंदुस्था-

---

१ मॉंटेग्यु-चेम्सफर्ड रिपोर्ट. २ औद्योगिक कमिशनचा रिपोर्ट.

नातलि युरोपियनांचे मत एकंदरीनें संरक्षणास प्रतिकूल असेंच पडलें. साम्राज्यांतील सवलतीच्या व्यापाराबद्दल तर त्यांत पुष्कळच मतभेद होऊन सर्व हिंदी लोकमत त्या योजनेस प्रतिकूल असलेले दिसून आलें.

नैसर्गिक साधनें, भांडवल व मजूर ह्यांचा पुरवठा, विक्री करण्याचे मार्ग इत्यादि बाबतींत हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीची पाहणी करून कमिशननें असा निष्कर्ष काढला की, हिंदी लोकांची प्रगति होऊन त्यांची भरभराट व्हावी ह्यास्तव उद्योगधंद्यांची वाढ होणें आवश्यक आहे. खुला व्यापार व संरक्षण ह्यांचें विवेचन करून हिंदुस्थानास एकंदरीनें संरक्षणाचें धोरणच हितावह आहे असा कमिशननें निकाल दिला. तरीही समाजावरील अपरिहार्य ओझें त्यातल्या त्यात कमी व्हावें व उद्योगधंदे आणि व्यापार ह्यांच्या परिस्थितीत तीव्र अगर तात्कालिक फरक होऊं नयेत ह्यास्तव संरक्षणाचें व्यावहारिक रूपांतर करतांना फार सावधगिरी बाळगली पाहिजे असा कमिशनचा इशारा होता. विशेषतः एखाद्या वस्तूच्या उत्पादकास मदत करण्याकरितां उपभोक्त्यांवर अगर कर देणाऱ्या नागरिकांवर संरक्षणाचें ओझें टाकण्यापूर्वी पुढील गोष्टींची पूर्ण चोकशी व्हावी असें त्यांचें म्हणणें होतें:—( १ ) ज्या धंद्याचें संरक्षण करावयाचें त्या धंद्यास हिंदुस्थानात काही तरी विशेष नैसर्गिक अनुकूलता असावी, ( २ ) त्या धंद्यात तयार होणाऱ्या वस्तूंना हिंदुस्थानांतच पुरेसे गिऱ्हाईक मिळण्याची खात्री असावी; आणि ( ३ ) विशिष्ट कालपर्यंत संरक्षण मिळालें म्हणजे सरकारी मदतीखेरीज धंदा फायदेशीरपणें चालण्याची अपेक्षा असावी. ह्या तिन्ही अटी पाळून जें संरक्षण द्यावयाचें त्यास 'विवेकनिष्ठ संरक्षण' असें नाव देऊन हिंदुस्थानानें तें धोरण पाळावें असा कमिशननें सामान्य निकाल दिला। हिंदी गिरण्यांतील कापडावर जी शेंकडा साडेतीन टक्के पट्टी बसलेली होती ती आर्थिक दृष्ट्या हानिकारक आहे असें कबूल न करतां त्या पट्टीमुळें हिंदी लोकांच्या राजकीय भावना दुखावऱ्या आहेत त्या मुद्यावर ती नाहीशी करावी व हिंदुस्थान सरकार व हिंदी लोकमत ह्यांची एकवाक्यता झाल्यास जरूर तर ती पुन्हा बसवावी असें कमिशननें सुचविलें. सवलतीच्या योजनेसंबंधानें कमिशननें असें मत दिलें की ब्रिटिश व्यापाऱ्यांचें हिंदुस्थानच्या आयात व्यापारात आधीच एवढें वर्चस्व आहे की सवलतीच्या धोरणास अनुसरून हिंदुस्थानानें इंग्लंडला अधिक काही देणें अगर इंग्लंडकडून अधिक फायदा मिळविणें अशक्यप्राय आहे. तरीही ब्रिटिश साम्राज्याशी असलेली आपली मित्रत्वाची भावना व्यक्त करण्याकरितां हिंदुस्थानानें वरील योजनेस आपला पाठिंबा द्यावा व शक्य तोंवर तिचें व्यवहारात अवलंबनही करावें, असा उपदेश कमिशननें केला होता.

हिंदी जकातीच्या धोरणाविषयी कमिशनची म्हणून वर जी मतें सांगितली ती वास्तविकपणें कमिशनच्या सभासदांपैकी बहुमताची निदर्शक होत. कमिशनचे

अध्यक्ष व इतर चार हिंदी सभासद ह्यांनीं प्रमुख मुद्द्यांवरील कमिशनच्या मताशी असलेला स्वतःचा मतभेद एका स्वतंत्र पत्रिकेंत नमूद केलेला आहे. कमिशननें संरक्षणाच्या धोरणास आपला पाठिंबा दिला खरा; परंतु त्यास अनेक मर्यादा घालून व व्यावहारिक दृष्टीनें पाहिले असतां हिंदुस्थानास कित्येक वर्षे लहानमहान धंद्यांच्या वाढीवरच संतुष्ट राहणें प्राप्त आहे असें ध्वनित करून एकंदरीनें संरक्षणाच्या धोरणास दिलेली आपली संमती त्यांनीं बरीच ढिली केली असें अल्पमतवाल्यांचें म्हणणें होतें. संरक्षक जकाती बसविणें व उद्योगधंद्यास मदत करणें हे आपले निश्चित धोरण आहे असें सरकारनें ठासून जाहीर करावें व सर्व लायख धंद्यांस संरक्षण देऊन हिंदुस्थानच काय परंतु इतर देशांचाही बाजार काबीज करण्यास त्यांस मदत करावी असें उलट मत म्हणून त्यानी प्रतिपादिलें. हिंदी गिरण्यातील कापडावरील पट्टी ताबडतोब नाहींशी करून ती पुन्हां केव्हांही बसवूं नये, असा ह्या प्रश्नावर अल्पमतवाल्यांचा निकाल होता. सवलतीच्या योजनेचा हिंदुस्थानाने सहानुभूतिपूर्वक विचार करण्यापूर्वी हिंदुस्थानास आर्थिक बाबतीत इतर वसाहतीप्रमाणें पूर्ण स्वायत्तता प्राप्त झाली पाहिजे व सवलत द्यावयाची तीही हिंदी कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासदांच्या मतानुसारच द्यावी असा त्याचा आग्रह होता. शिवाय, ज्या वसाहतीत हिंदी लोकांस विषमतेनें वागविण्यांत येतें त्यांस तर हिंदुस्थानाचा आर्थिक फायदा होत असला तरीही सवलती देऊं नयेत असें त्याचें ठाम मत होतें. संरक्षणाच्या धोरणाचा परकी भांडवलवाल्यानी दुरुपयोग करू नये ह्यास्तव संरक्षण केलेल्या सर्व धंद्यात भांडवल, व्यवस्था, हुकुमत इत्यादि बाबतीत हिंदी लोकाचें वर्चस्व राहील अशी खात्री करून घ्यावी असा त्यांनी इषारा दिला. विशिष्ट धंद्याची संरक्षणाप्रीत्यर्थ होणारी मागणी विचारात घेण्याकरिता टॅरिफ बोर्ड नावाची जी संस्था स्थापावयाची, ती सर्वस्वी सरकारने न नेमतां तिच्यात दोन सभासद कायदेमंडळानें निवडलेले असावे व तिचा अध्यक्ष एखादा अनुभवी कायदेपंडित असावा असें प्रतिपादून मूळ कमिशनच्या शिफारशीशी अल्पमतवाल्यानी आपला मतभेद दाखविला होता. अल्पमतवाले व बहुमतवाले ह्या दोघासही संरक्षणाचें धोरण मान्य होतें. परंतु त्या धोरणानुसार जी औद्योगिक प्रगति गाठावयाची तिचें स्वरूप कोणतें असावें, संरक्षणाचा व्यवहारात उपयोग करून घेताना कोणत्या मर्यादा घालाव्या व हिंदुस्थान सरकारच्या प्रामाणिक सहानुभूतीवर आणि साम्राज्याच्या इतर भागांच्या मित्रत्वावर कितपत विश्वास ठेवावा ह्यांबद्दल त्या दोघात बराच मतभेद असलेला दिसला.

कमिशनचा रिपोर्ट व अल्पमतनिदर्शक भिन्नपत्रिका ह्यांमध्ये जकातीच्या व औद्योगिक प्रगतीसंबंधीच्या अनेक इतर बाबींचाही उल्लेख केलेला आहे. हिंदुस्थानाची औद्योगिक प्रगति होणें अनेक दृष्टींनी इष्ट असून संरक्षक जकातीच्या साहाय्याखेरीज ती घडून येणें अशक्य आहे हे तर दोन्ही भागाचें मूळ सूत्रच होतें. शिवाय, सरकारच्या वाढत्या खर्चास पुरेसें उत्पन्न उभें करण्यास अप्रत्यक्ष करांची

वाढ होणें अपरिहार्य आहे हें जाणून जकातीच्या वाढीचा प्रश्न पूर्वीपेक्षा कांहीसा निराळ्या दृष्टीनें ध्यानांत घेतला पाहिजे हें कमिशननें मान्य केलें होतें. संरक्षण म्हणून जकातीची वाढ न केली तरी उत्पन्न वाढविण्याकरितां जर ती करावी लागली तर तिचा संरक्षक परिणाम झाल्याशिवाय रहात नाही. गिऱ्हाईक व नागरिक ह्यांजवर पडणारा बोजा हा संरक्षणाचा तात्कालिक दृष्ट्या एक अनिष्ट परिणाम असतो हें स्पष्ट आहे. परंतु राजकीय पक्षांत लाचलुचपतीचे प्रकार व उत्पादकांत परस्पर करार करून मक्तेदारी करण्याचा उपक्रम हेही दोष संरक्षक पद्धतीच्या अवलंबनानें उद्भूत होण्याचा संभव आहे व संरक्षण देण्यापूर्वी कसून स्वतंत्र चौकशी होणार असल्यामुळे आणि कायदेमंडळांत निरनिराळ्या हितसंबंधांचे प्रतिनिधि असल्यामुळे हे दोष नाहीसे होण्यासारखे आहेत असें रिपोर्टांत म्हटलें आहे. तसेच, निव्वळ सरकारी उत्पन्न वाढविण्याकरितां म्हणून जकातींत विशेष वाढ केल्यास तिचा व्यापारावर होणारा प्रतिबंधक परिणाम दूर करण्याकरितां अंतर्गत उत्पादकांवरही तितकी पट्टी बसवावी असेंही कमिशननें सांगितलें आहे. परदेशी उत्पादक मूळ किंमतीहून कमी दरानें आपला माल हिंदुस्थानांत विकतात असें दिसून आल्यास टॅरिफ बोर्डाकडून अशा प्रकारांची पूर्ण चौकशी करवून योग्य ते प्रतिबंधक उपाय सरकारनें योजण्यास कमिशनचा पाठिंबा आहे. निर्यात जकातीचा संरक्षणार्थ कधीच उपयोग करू नये, व सरकारास पैसा मिळण्याकरितांही त्याचा क्वचितच उपयोग करावा असें कमिशनचें मत होतें. निर्यात जकात लादून अगर प्रत्यक्षपणें धान्याच्या निर्यातीस प्रतिबंध करून हिंदी बाजारांतील धान्याचा पुरवठा कृत्रिमपणें वाढविला तर किंमत उतरून शेतीचें उत्पन्न कमी होइल व एकंदरीनें राष्ट्राचें नुकसानच होइल असा ह्या बाबतींत कमिशनचा निष्कर्ष होता. हिंदुस्थानांत परकी भांडवलवाल्यांनी सरकारची प्रत्यक्ष मदत न घेतां धंदा चालविला तर त्यावर विशेष नियंत्रण घालण्याचें कारण नाही, परंतु एखाद्या धंद्यास सरकारकडून प्रत्यक्ष आर्थिक मदत मिळत असेल तर मात्र भांडवल, व्यवस्थापक, हिंदी लोकांस विशिष्ट ज्ञान व अनुभव मिळण्याच्या सोयी इत्यादि बाबतींत योग्य वाटतील तीं नियंत्रणें सरकारनें घालावीं, असें कमिशनचें म्हणणें होतें. ह्या बाबतींत अल्पमतवाल्यांचें मत असें होतें कीं, नागरिकांकडून घेतलेल्या कराच्या उत्पन्नांतून प्रत्यक्षपणें धंदेवाल्यास आर्थिक मदत करणें व आयात मालावर जकात लादून उत्पादकांस आपल्या मालाची भारी भावानें विक्री करण्याची संधि देणें ह्यांत तात्विक फरक कांहीच नाही; प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें कसलीही सार्वजनिक मदत परदेशी भांडवलवाल्यांस मिळत असेल तर त्यांजवर वरील-प्रमाणे नियंत्रणें घालावीं. अर्थशास्त्राच्या सिद्धांताच्या दृष्टीनें व देशाच्या व्यावहारिक हिताच्या दृष्टीनें पाहतां ह्या बाबतींत अल्पमतवाल्यांचें म्हणणेंच बरोबर असल्याचें वाचकांस दिसून येईल.

**१ संरक्षणाचें अवलंबन**—जकातीच्या कमिशननें सुचविलेलें विवेक-निष्ठ संरक्षणाचें धोरण आपण मान्य केलें आहे असें सरकारतर्फे १९२३ च्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या बैठकीत जाहीर करण्यात आलें, व लगेच जुलै महिन्यांत टॅरिफ बोर्ड नेमलें जाऊन पोलादाच्या धंद्याची आयात मालावर संरक्षक जकाती बसविण्याची मागणी त्याकडे चौकशीला दिली गेली. संरक्षणाचें धोरण मान्य करतांना, बहुसंख्याक शेतकरी व उपभोक्ते ह्यांचे कायदेमंडळांत पुरेसे प्रतिनिधि असते तर तें धोरण अंमलांत आणणें अशक्य झालें असतें, असेंही सरकारतर्फे सांगण्यांत आलें. टॅरिफ बोर्डानें पोलादाच्या धंद्याची चौकशी करण्यास सुरुवात केली तेव्हां 'टाटा आयर्न अँड स्टील कंपनी' ही एकच मंडळी हिंदुस्थानांत पोलाद तयार करीत असे. ह्या मंडळीनें पोलादी मालाची उत्पत्ति करण्यास १९१२ मध्यें सुरुवात केली व महायुद्धाच्या वेळीं आगगाड्यांचे रूळ वगैरे पुरवून तिनें साम्राज्य हिताची बरीच महत्त्वाची कामगिरीही केली होती, आणि त्यावेळीं तिला फायदाही पुष्कळ झाला. युद्ध संपल्यावर मात्र पोलादाचा भाव उतरून व परकी उत्पादकाची स्पर्धा तीव्र होऊन धंदा बुडण्याच्या बेतांत आला. ह्याच वेळीं एकंदर २१ कोट रुपयांपर्यंत भांडवल वाढवून कारखाने व खाती वाढविण्याचें काम मंडळीनें हातीं घेतलें होतें. सर्व कारखाने पूर्णपणें चालू झाले म्हणजे एकंदर उत्पादनाच्या मानानें खर्च बेताचा येऊन किफायतशीर विक्री करणें शक्य होईल असें मंडळीस वाटत होतें. परंतु पूर्ण उत्पादन हातीं येण्यापूर्वी मात्र सर्वसामान्य खर्चाचा थोड्या मालावर बोजा पडून स्वस्ताईनें माल विकणाऱ्या परकी प्रतिस्पर्ध्यांशीं टक्कर देणें अशक्य होतें. इंग्लंड व बेल्जम ह्या देशांतून हिंदुस्थानांत पोलाद आणलें जाई. युद्धोत्तर काळांत त्यासही मंदीचे दिवस आले होते हें खरें. तरी बेल्जममध्यें हुंडणावळीचे दर फारच अनुकूल असल्यानें त्याच्या निर्गत व्यापारास आपोआपच उत्तेजन मिळत होतें. ह्या मंडळीचें व पोलादाचें संरक्षण केल्यास ज्यांच्या हितसंबंधावर बरावाईट परिणाम होण्यासारखा होता त्या लोकांचें म्हणणें आणि इतर सर्व बाबी ह्यांचा विचार करून टॅरिफ बोर्डानें असें ठरविलें कीं, पोलादाचा धंदा राष्ट्रीय स्वसंरक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्यानें व जकातीच्या कमिशननें संरक्षणेच्छु धंद्यावर लादलेल्या सर्व अटी ह्या धंद्यांत भागत असल्यानें पोलादाच्या उत्पादनास सरकारनें मदत करणें आवश्यक आहे. हिंदी उत्पादकांस मूळ खर्च भागून वाजवी नफा राहण्यास त्यांच्या मालास किती किंमत आली पाहिजे व परदेशी उत्पादक हिंदुस्थानांत कोणत्या भावानें आपला माल विकूं शकतील ह्याचा हिशेब करून त्या दोहोंतील फरकाइतकी सरकारी मदत पोलादाच्या धंदेवाल्यास मिळावी असें बोर्डानें ठरविलें. ज्या प्रकारचें पोलाद हिंदुस्थानांत तयार होण्याची अपेक्षा नव्हती त्यावरील जकात होती तेवढीच म्हणजे शेंकडा १० टक्के कायम ठेवावी व इतर प्रकारच्या पोलादावर विशिष्ट प्रकारास अनुसरून दर टनास शेंकडा तीस ते चाळीस रुपये

१ मागें पानें ८४–८६ पहा.

आयात जकात घेतली जावी असें सुचविण्यात आलें. आगगाड्यांच्या धंद्यांत लागणाऱ्या पोलादी मालावर जकाती बसून त्यांच्या किंमती वाढल्यास वहातुकीचे दरही वाढवावे लागतील हें ध्यानांत घेऊन रूळ, फिश प्लेट वगैरे मालास सरकारी मदत प्रत्यक्षपणें द्यावी असें ठरलें. हें संरक्षण पहिल्याप्रथम तीनच वर्षे चालावयाचें असल्यानें ही मदतही त्या तीन वर्षांत प्रतिवर्षी उतरत जावी असें सुचविलें गेलें पहिल्या वर्षी टनास ३० रुपये, दुसऱ्या वर्षी २६ रुपये व तिसऱ्या वर्षी २० रुपये असें कोष्टक तयार करून दिलें गेलें. संरक्षण द्यावयाचें ते पर्णपणें परिणामकारक न झालें तर गिऱ्हाईक व नागरिक ह्यांचा स्वार्थत्याग वाया जाणार हें जाणून परकी व्यापाऱ्यांस आपला माल अपेक्षित किंमतीपेक्षाही स्वस्त विकता येऊं लागला तर हिंदी उत्पादकांस जरूर तेवढी अधिक मदत करण्यास सरकारनें तयार व्हावें अशीही टॅरिफ बोर्डानें अगाऊ सूचना करून ठेविली होती.

जकातीच्या सहाय्यानें देशी धंद्यास सरकारनें मदत करण्याचें ठरविलें म्हणजे एक एक नवी अडचण उत्पन्न होत जाते व संरक्षण देण्यापूर्वीच त्या सर्वांचा विचार केलेला नसेल तर संरक्षणापासून राष्ट्राची औद्योगिक प्रगति होण्याऐवजी नुकसान होण्याचीच अधिक भीति असते. उदाहरणार्थ, जकाती वाढवून विशिष्ट मालाच्या उत्पादनास उत्तेजन दिलें तर त्या मालाचा बाजारभाव वाढतो व ज्या धंद्यांत तो माल उत्पादनाचें साधन म्हणून वापरला जात असेल त्या धंद्यातील खर्च वाढून विक्री व नफा दोन्हीही मर्यादित होतात. संरक्षक जकातीचा बोजा शेवटीं गिऱ्हाइकावर पडावयाचा तो अशा अनेक अप्रत्यक्ष मार्गानें पडत असल्यानें एका धंद्यास उत्तेजन देतांच दुसरे कित्येक धंदे डबघाईस येण्याची भीति असते. मग एका मुख्य धंद्यास मदत केली म्हणून त्यावर अवलंबून असलेल्या इतर सर्व महत्त्वाच्या धंद्यासही पुरेशी मदत करावी लागते. मोठमोठे पूल, हौद, इमारती वगैरे बांधण्यास जें पोलादी सामान लागतें त्याच्या किंमतींत पोलादाची किंमत चढल्यानें आपोआप वाढ होते व पक्का परदेशी माल पहिल्याइतक्या जकाती देऊनच येत असेल तर बांधकामाचें पोलादी सामान तयार करण्याचा धंदा बुडणें अपरिहार्य आहे, म्हणून हिंदुस्थानांत येणाऱ्या पोलादावर जकात बसवितांच बांधकामाच्या पोलादी सामानावरही ती बसविणे प्राप्त झालें. तसेंच, पोलादी पत्र्याचे मालगाडीचे डबे तयार करण्याच्या धंद्यास रूळ तयार करण्याच्या धंद्याप्रमाणेंच, प्रत्यक्ष आर्थिक मदत करावी लागली पोलादी तार व तारेचे खिळे ह्यांच्या आयातीवर वाढत्या जकाती बसविल्या त्याही वरील कारणामुळेंच होत. कुदळी, खोरीं, फावडीं वगैरेसारख्या शेतकीच्या आउतावरील जकाती वाढवाव्या अशीही टॅरिफ बोर्डाची सूचना होती व ती योग्यही होती परंतु कायदेमंडळानें ती मान्य केली नाहीं. १९२४ च्या जून महिन्यांत मध्यवर्ती कायदे मंडळाची खास बैठक होऊन त्यांत वरील शिफारशी अंमलांत

---

१ मागें पानें १५६–१५८ पहा.

आणणारा कायदा पास झाला होता. लवकरच टाटा कंपनीकडून सरकारकडे असा अर्ज करण्यांत आला की, परदेशी मालाच्या किंमती टॅरिफ बोर्डाच्या अपेक्षेपेक्षांही कमी झाल्या आहेत, त्यास्तव जकातींत व सरकारी मदतीत त्या प्रमाणानें वाढ केली जावी. ह्या अर्जाचाही टॅरिफ बोर्डानें अनुकूल निकाल लावून सरकारनें जकातीत वाढ करावी असें सुचविलें; परंतु जकातीत आणखी वाढ करण्याऐवजी प्रत्यक्ष-पणेंच आर्थिक मदत द्यावी हें सरकारास बरें वाटून त्याप्रमाणें कायद्यांत बदलही करण्यांत आला. परंतु ती मदत तात्पुरती असून ती वर्षांत ५० लाखावर जावयाची नव्हती. म्हणून टॅरिफ बोर्डानें सरकारी धोरणाचा पुन्हां विचार करून ५० लाखांची मर्यादा ९० लाखांवर नेऊन १९२६–२७ साल संपण्यापूर्वी ह्या प्रश्नाचा पुन्हा विचार करावा असें ठरविलें.

ह्याच वेळेस हुंडणावळीचा दर वाढता होता व परकी देशांत किंमतीचें मानही उतरतें होतें. शिवाय, हिंदुस्थानच्या जकातीचें सर्वसाधारण प्रमाण शेंकडा १५ टक्के झाल्यानें अनेक धंद्यांत कच्च्या मालाची किंमत वाढून उलट परदेशी व्यापाऱ्यांची स्पर्धा मात्र वाढत्या हुंडणावळीमुळें तीव्रतर होत चालली. गंधकाच्या आयातीवरील जकात दूर करावी असा टॅरिफ बोर्डानें सल्ला दिला व तो हिंदुस्थानसरकारनें अंम-लांत आणला; ह्याचें कारण येथील रासायनिक द्रव्यें उत्पन्न करण्याच्या धंद्यास त्या जकातीमुळें अडथळा होत होता हें होय. कागद, सिमेंट, छापखान्याची शाई, मॅग्नी-शियम क्लोराइड ह्या धंद्याच्या मागणीचाही टॅरिफ बोर्डानें १९२४ सालीं विचार केला. सिमेंटच्या कारखान्याची उत्पादक शक्ति येथील मागणीच्या मानानें पुष्कळच अधिक होती व एतद्देशीय कारखानदारांतील स्पर्धेमुळें भावही फार कमी होते. छापण्याची शाई तयार करण्यास जी द्रव्यें लागतात त्यांच्या आयातीवर शेंकडा पंधरा टक्के जकात होती तर छापण्याच्या शाईवर ती शेंकडा अडीच एवढीच होती. गवतापासून तयार होणाऱ्या कागदास हिंदुस्थानांत फारसे गिऱ्हाइक नाहीं व कच्चा माल कारखान्यांत वाहून नेण्यास खर्चही फार येतो. परंतु बांबूच्या गंध्यापासून तयार केलेल्या कागदास खपही येथें पुष्कळ असून कच्च्या मालास नजीक व प्रेरक शक्तीच्या दृष्टीनें सोयीच्या जागीं कारखाने काढल्यास ते यशस्वी होण्याची आशा आहे. मॅग्नेशियम क्लोराइड हें जर्मनींत नैसर्गिक स्वरूपांत फार मोठ्या प्रमाणांत उपलब्ध होत असल्यानें त्या देशास ह्या बाबतींत जवळ जवळ मक्तेदारी लाभली आहे व सर्व देशांत जर्मन व्यापारी ह्या पदार्थांची कमी किंमतीस विक्रीही करूं शकतात. ह्या कारणास्तव टॅरिफ बोर्डानें मॅग्नेशियम क्लोराइडच्या उत्पादकांची मागणी फेटाळून लावली. काड्यांच्या पेट्यांच्या धंद्याची चौकशी करून टॅरिफ बोर्डानें असें ठरविलें की हा धंदा संरक्षणार्ह आहे व सध्यां सरकारी उत्पन्नाकरितां काड्यांच्या पेट्यांच्या आया-तीवर जी जकात बसविलेली आहे ती संरक्षणास पुरेशी आहे. मात्र ती संरक्षणार्थ

लादलेली आहे असें समजून त्याप्रमाणें त्या जकातींत फेरबदल व्हावे. त्याचप्रमाणें इतरही अनेक धंद्यांची चौकशी होत असून त्यांच्या परिस्थितीस अनुसरून बोर्डानें सूचनाही केल्या आहेत. परंतु वरील उदाहरणावरून संरक्षणाचे व्यवहारांत अवलंबन करतांना निरनिराळ्या गोष्टींचा कसकसा विचार करावा लागतो हें स्पष्ट होईल. सामान्यतः कोणत्याही वस्तूंच्या आयातीवर पुरेशी जकात बसविली तर अंतर्गत उत्पादकाचा धंदा किफायतशीर होऊं शकेल हें खरें; परंतु कच्चा माल, भांडवल, वहातुक, यांत्रिक सामुग्री, किफायतशीर संघटना इत्यादि बाबतींत देशी धंद्याची किती कार्यक्षमता आहे व जकातीच्या वाढीमुळें शेवटी त्याच्या उत्पादकतेंत किती सुधारणा होणें शक्य आहे ह्याचा पूर्ण विचार केल्याखेरीज संरक्षणात्मक जकाती बसविल्या तर आर्थिक दृष्ट्या तें हानिकारक होईल. पोलादाच्या धंद्यास टॅरिफ बोर्डानें संरक्षण द्यावयाचें ठरविलें त्यापूर्वी, दहा वर्षांत पोलादाची उत्पत्ति १६३,००० टनावरून ६००,००० टनावर जाईल व उत्पादन मूल्य दर टनास १२६.५ रुपये ह्या परिमाणावरून ७८.८ रुपयावर उतरेल असा हिशेब केलेला होता. हे हिशेबी आकडे व्यवहारांत कितपत उतरतात हा प्रश्न निराळा, परंतु हिंदी धंद्यास सरकारी मदत द्यावयाची ती सरसहा गैरहिशेबीपणानें न देतां प्रत्येक धंद्याची विवक्षित काळीं जी आर्थिक परिस्थिति असेल व त्या धंद्याच्या भविष्यकालीन वाढीबद्दल ज्या वाजवी अपेक्षा असतील त्याची पूर्ण शहानिशा करूनच सरकारी मदतीची इष्टता व मान ही ठरविणें आवश्यक असतें, हें वरील विवेचनावरून दिसेल.

**१० कापसाच्या गिरण्यांचा धंदा**—कच्चा माल व गिऱ्हाईक ह्यांच्या सान्निध्याचे सर्व फायदे हिंदुस्थानांतील कापसाच्या गिरण्यास पहिल्यापासूनच मिळत आहेत व म्हणूनच गेल्या पाऊणशें वर्षांत त्यांची एकंदरीनें भरभराटच झालेली आहे. हल्ली आयात कापडावर शेकडा ११ टक्के व सुतावर शेकडा ५ टक्के जकात आहे त्याचाही संरक्षक फायदा हिंदी गिरणीवाल्यास आपोआपच मिळतो. अनेक वर्षें येथील गिरण्यांच्या कापडावर शेकडा साडेतीन टक्के पट्टी होती तीही आता नाहींशी झाली आहे. स्वदेशी चळवळ व खादीचा प्रसार ह्याचाही गिरण्यांच्या स्थितीवर एकंदरीनें अनुकूलच परिणाम झाला आहे. नैसर्गिक, कायदेशीर व भावनात्मक स्वरूपाच्या एवढ्या अनुकूल गोष्टी असूनही अजून हिंदुस्थान कापडाच्या बाबतींत स्वावलंबी झालेलें नाहीं एवढेंच नव्हे तर गिरणीवाले सरकारजवळ संरक्षणाप्रीत्यर्थ आजही जोराची मागणी करीत आहेत ह्याचें पुष्कळांस आश्चर्य वाटेल. त्यांतल्या त्यांत हें संरक्षण सर्वस्वी मँचेस्टरच्या गिरणीवाल्याविरुद्ध नसून आतां मुख्यतः जपानी गिरण्याविरुद्ध आहे हा येथील गिरणीवाल्याच्या मागणीचा विशेष आहे. जपानी हुंडणावळ उतरलेली आहे व जपानांत मजुरांच्या हितसंरक्षणार्थ सरकारी नियंत्रणें फारशीं नाहींत ह्यामुळें जपानी उत्पादकांस आपला माल स्वस्ताईनें विकतां येतो असें हिंदी व विशेषतः मुंबईच्या गिरणीवाल्यांचें

म्हणणें आहे. परदेशांत मजूरवर्गाच्या अनियंत्रित श्रमापासून उत्पन्न झालेला माल तेथील चलनाची अवनति झाल्यानें हिंदुस्थानांत स्वस्त विकला जावा व मजूरवर्गाचें हित पाहणाऱ्या व हुंडणावळीचा दर मुद्दाम रुपयास १८ पेन्सइतका वाढवून परदेशी व्यापाऱ्यास अप्रत्यक्षपणें शेंकडा १२॥ टक्के मदत देणाऱ्या हिंदुस्थानसरकारनें आपल्या देशी धंदेवाल्याच्या गिरण्या बुडूं द्याव्या हें योग्य नाही अशी त्यांची तक्रार होती. विशेषतः गेल्या ४–५ वर्षें गिरण्यांची स्थिति फारच हलाखीची झाली असल्यानें व गिरणीवाल्यांचें प्रस्थ सरकारी अधिकाऱ्याजवळ व कायदेमंडळांतही बरेंच असल्यानें ह्या तक्रारीचा नेहमी विशेष उच्चार होत असतो. हिंदी बाजारांत मँचेस्टरच्या गिरणीवाल्यासही जपानी कापडापासून धोका आहे असें सूचित करून आपल्या संरक्षणाच्या मागणीस मँचेस्टरचें अप्रत्यक्ष पाठबळ मिळविण्याचा गिरणीवाल्यांनी प्रयत्न केला आहे. कापसाच्या गिरण्यांचा धंदा हल्ली डबघाईस आलेला आहे ह्याची कारणें कोणती व ह्या स्थितीतून त्या धंद्यास बाहेर काढण्यास सरकारी मदतीची आवश्यकता आहे किंवा काय, हें ठरविण्याकरितां सरकारनें एक निराळेंच चौकशीमंडळ नेमलें होतें. त्या मंडळाचे निकाल व त्याबद्दलचें सरकारी धोरण ही विशेष बोधप्रद आहेत.

कापसाच्या गिरण्यांत सध्यां जी हलाखीची स्थिति दिसते ती सर्व जगभर पसरलेल्या औद्योगिक मंदीचेंच एक अंग आहे, असें मंडळाचें मत होतें. शिवाय, हिंदुस्थानातल्या परिस्थितीसंबंधानेंही मुंबईच्या गिरण्यांतील अंतर्गत कारणांवरच बोर्डानें विशेष भर दिला होता. मुंबईतील गिरण्या कपास उत्पन्न करणाऱ्या व कापड आणि सूत ह्याचा खप होणाऱ्या प्रदेशापासून दूर वसलेल्या आहेत व मुंबईच्या गिरण्यांची संघटना जेवढी किफायतशीर व कार्यक्षम असावी तेवढी नाही हीच कारणें बोर्डास विशेष महत्त्वाचीं वाटलीं. परदेशच्या प्रतिस्पर्ध्यांपैकीं फक्त जपानची स्पर्धाच येथील गिरण्यांस विशेष हानिकारक आहे व जपानमधील मजूरांच्या वाईट स्थितीमुळे जपानी उत्पादकास जेवढा विशेष फायदा मिळतो तेवढ्यापुरतें हिंदी गिरणीवाल्यास संरक्षण देणें आवश्यक आहे असें वरील मंडळानें ठरविलें. स्त्रीकामगारास रात्रीही गिरणींत कामास लावणें, व त्यामुळें एकाहून अधिक पाळ्यांनी काम करणें इत्यादि गोष्टींच्या योगानें जपानी कारखानदारास मिळणारी एकंदर गैरवाजवी सवलत सुताच्या बाबतींत शेंकडा १० व कापडाच्या बाबतींत शेंकडा १२॥ टक्के आहे असा बोर्डानें स्थूल हिशेब केला होता. १ जुलै १९२९ ह्या दिवशी मजूरांसंबंधी नवा कायदा जपानांत अंमलांत यावयाचा असल्यानें त्यापुढें जपानी व्यापाऱ्यांची स्पर्धा कमी होईल अशीही बोर्डास अपेक्षा होती. बोर्डानें गिरण्यांच्या अंतर्गत संघटनेबद्दल व सरकारी धोरणाबद्दल पुढील सूचना केल्या होत्या. 'अडत्ये व व्यवस्थापक ह्या नात्यानें गिरणी

१ ह्या प्रश्नाचा पुढील दोन प्रकरणांत सविस्तर विचार केलेला आहे.

चालविणारी निराळी मंडळी असण्याची मध्यांची पद्धत अनिष्ट आहे; गिरण्यांनी आपल्या मालांत विविधता आणणें व उंची प्रतीचा माल अधिक उत्पन्न करणें इष्ट आहे; धुलाई ( ब्लीचिंग ), रंग काम, छापणावळ इत्यादि कामें करण्याचा एक मध्यवर्ती कारखाना सरकारी साहाय्यानें मुंबईस काढावा; ३२ व त्यावरील नंबराच्या सुतावर दर पौंडास एक आणाप्रमाणें सरकारनें चार वर्षें मदत द्यावी; तीन वर्षेपर्यंत कापडावरील आयात जकात शेंकडा पंधरा टक्के करावी व ह्या वाढलेल्या जकातीच्या उत्पन्नांतून वरील मदतीस लागणारा पैसा उभारावा; सुताच्या आयातीवरील जकात वाढविल्यास सुताचा भाव वाढून हातमागावरील विणकराच्या धंद्याचा तोटा होईल म्हणून सुताच्या आयातीवरील कर वाढवू नये. कापसाच्या गिरण्यांस लागणारी यंत्रसामुग्री व कांही इतर सामान ह्यावरील आयात जकात तीन वर्षेपर्यंत उठवावी.' एकंदरीनें कापसाच्या गिरण्यास संरक्षणाची फारशी जरूरी नाही, अंतर्गत सुधारणांनी व एकंदर जगांतील व्यापारी परिस्थिति सुधारताच त्यांचा धंदा आपोआप किफायतशीर होऊ लागेल असेंच बोर्डाचें म्हणणें होतें. एक आणा पौंड-प्रमाणें भारी सुतावर मदत द्यावयाची ह्या सूचनेस स्वतः बोर्डाचे अध्यक्ष विरुद्ध होते व त्यांचेंच मत शेवटी सरकारनें मान्य करून ती सूचना फेटाळली. साहजिकपणेंच ही मदत देण्यास पैसा उभारण्याकरितां कापडावरील आयात जकात चार टक्क्यांनी वाढवावी ही जी सूचना होती तीही सरकारनें मान्य केली नाही. फक्त गिरण्यांची व इतर सर्व प्रकारची यंत्रसामुग्री हिंदुस्थानांत विन जकातीनें यावी असें सरकारनें ठरविलें. तसेंच, गिरण्यांच्या इतर सामानावरील जकातीही सरकारनें उठविल्या. शेंकडा ११ टक्के आयात जकात कापडावर हल्लीच आहे ती गिरणीवाल्यांचें योग्य संरक्षण करण्यास पुरेशी आहे व गिरणीवाल्यांनी आपल्या उत्पादनाची कार्यक्षमता वाढविणें हाच स्वतःचा धंदा सुधारण्याचा खरा मार्ग आहे असें सरकारनें ठरविलें. हा प्रतिकूल निकाल गिरणीवाल्यांच्या अपेक्षेविरुद्ध असल्यानें व सामान्य अशिक्षित लोकमत अशा बाबतींत सरकारच्या विरुद्ध असल्यानें सरकारवर पुष्कळच टीका झाली. परंतु वास्तविकपणें बोर्डाचे बहुतेक निकाल हिशेबी पद्धतीस धरून असल्यानें सुशिक्षित लोकमताचा गिरणीवाल्यांच्या विशिष्ट संरक्षणाच्या मागणीस पाठिंबा मिळाला नाही. एकंदर सर्वच उद्योगधंद्यांत हल्ली मंदी असल्यानें व त्यातल्या त्यात मुंबईच्या गिरण्यांत अंतर्गत दोष अनेक असल्यानें त्यांची स्थिति आजही खालावलेली आहे. परंतु वैयक्तिक भांडवलवाल्यांच्या तोट्याबरोबरच एवढा मोठा राष्ट्रीय धंदा बिकट परिस्थितीत असल्यास समाजाचाही अनेक मार्गांनी तोटा होतो हें मुंबईच्या गेल्या चार पाच वर्षांच्या अनुभवावरून स्पष्ट दिसेल. ह्यास्तव प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मार्गांनी गिरणीवाल्यांस आवश्यक त्या सुधारणांचा अंगिकार करावयास लावून व जरूर तेवढें त्यांस साहाय्य करून सरकार व लोकमत ह्यांनी कापसाच्या गिरण्यांच्या पुनर्घटनेस मदत केली पाहिजे. हा धंदा मोठ्या प्रमाणावर

चाललेल्या यांत्रिक हिंदी धंद्यांपैकीं प्रमुख असल्यानें त्याबद्दलची पुढील आंकडेवार माहिती दिली आहे.

| सन | गिरण्यांची संख्या | चात्यांची संख्या | मागांची संख्या | मजुरांची संख्या | वापरलेला कापूस=गठ्ठे(१ गठ्ठा=३९२ पौंड) |
|---|---|---|---|---|---|
| १८८० | ५६ | १४,५२,७९४ | १३,०१८ | ४२,९१४ | २,६७,५८५ |
| १९०० | १९३ | ४९,४५,७८३ | ४०,१२४ | १,६१,१८९ | १४,५४,३५२ |
| १९१४ | २७१ | ६७,७८,८९५ | १,०४,१७९ | २,६०,२७६ | २१,४३,१२६ |
| १९२७ | ३३६ | ८७,०२,७६० | १६१,९५२ | ३८४,६२३ | २४,१७,४१२ |

मुंबईतील गिरण्यांच्या सांपत्तिक स्थितींत १९१७ सालपासून कसकसे फेरबदल होत गेले हे पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

## मुंबईतील गिरण्यांच्या धंद्याची सांपत्तिक स्थिति.

| वर्ष | भरणा झालेले भांडवल. | शिल्लक निधि | जमीन, इमारती व यंत्रें ह्यांची मूळ किंमत. | जमीन, इमारती व यंत्रें ह्यांची त्या वर्षाची किं. | नफा + तोटा − | शिल्लक निधींत भर. जमा + कमी − | गिरण्यांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | लक्ष रुपये. | लक्ष रुपये. | लक्ष रुपये. | लक्ष रुपये. | लक्ष रुपये. | लक्ष रुपये. | |
| १९१७ | ७,६५ | २,३६ | १७,९८ | १२,१२ | +३,०२ | + ८० | ६३ |
| १९१८ | ८,१० | ३,४९ | १९,५२ | १२,७६ | +२,२८ | + ३८ | ६४ |
| १९१९ | ९,४० | ३,७८ | २०,९४ | १२,८९ | +६,१५ | +१,९० | ६७ |
| १९२० | १६,९८ | ६,५३ | ३३,५० | २३,७० | +१०,१० | +३,१८ | ८० |
| १९२१ | १७,८३ | ९,८० | ३३,०८ | २६,२३ | +८,४६ | +३,३२ | ८० |
| १९२२ | १७,९६ | १२,४४ | ४२,९४ | २९,५४ | +३,८७ | +१,३८ | ८० |
| १९२३ | १९,१८ | १३,९८ | ४६,५४ | ३०,७१ | −१,२८ | − ९ | ८१ |
| १९२४ | १९,२८ | १२,१३ | ४६,७६ | ३०,१५ | −२,४२ | − ६३ | ७९ |
| १९२५ | १९,२० | १०,४५ | ४६,७२ | २६,६३ | −२,८७ | − ६३ | ७९ |

# प्रकरण दहावें

## हिंदी चलनपद्धति

**१ हिंदुस्थानांतील जुनी चलनपद्धतिः**—प्रास्ताविक भागांत चलन व चलनपद्धति ह्यांचें जें विवेचन केलें आहे तें ध्यानांत ठेवून हिंदी चलनपद्धतीचा इतिहास व सध्यांचें स्वरूप ह्यांचा अभ्यास करणें उपयुक्त होईल. राष्ट्राच्या आर्थिक जीवनांत चलनाचें जें कार्य असतें तें समाधानकारक रीतीनें पार पडावयाचें असेल तर चलनपद्धतीत पुढील गुण असणें आवश्यक आहे, असें तेथें सांगितलेंच आहे (१) चलनाचा पुरवठा नेमका पुरेसा राहून किंमती स्थिर राहण्याची खात्री असावी; (२) परदेशी देवघेवींचें साधन ह्या नात्यानें असलेली चलनाची किंमत किंवा हुंडणावळीचा दर स्थिर राहून जरूर तेव्हा व जरूर त्या प्रमाणांत अंतर्गत व्यवहारांतील चलनाचें अंतर्राष्ट्रीय चलनांत रूपांतर होण्याची विश्वसनीय व्यवस्था असावी; (३) अंतर्गत व परराष्ट्रीय देवघेवींच्या परिमाणांत चढउतार होईल त्यास अनुसरून चलनाच्या पुरवठ्यांतही आपोआप बदल होणें इष्ट आहे. हे सर्व विशेष पूर्णांशानें नाहीं, तरी पुष्कळसे सुवर्णमूल्यमापन पद्धतीच्या अवलंबनानें उपलब्ध होतात असेंही तेथील विवेचनावरून व युद्धोत्तर कालांत प्रमुख पाश्चात्य राष्ट्रांत जे चलनविषयक फेरबदल घडून आले आहेत त्यांच्या निरीक्षणावरून स्पष्ट होईल. हिंदुस्थानाच्या अनेक भागांत प्राचीन कालीं व इंग्रजी अंमलापूर्वीच्या कित्येक शतकांत सोनें हें मूल्यमापनाचें प्रमुख साधन असे व सोन्याच्या नाण्याचाही पुष्कळ प्रसार झालेला होता. कंपनी सरकारच्या अंमलाखालीं हळुहळू चलनपद्धतींतून सोन्याचें उच्चाटन होऊन चांदी ह्या एकाच धातूवर मूल्यमापनाचें व कायदेशीर देवघेवींचें साधन बनविण्याचें काम सोंपविण्यांत आलें. ब्रिटिश अमदानीच्या उत्तर भागांत रौप्यचलनाची ही सामान्य पद्धति मागें पडून निरनिराळ्या स्वरूपांत मूल्यमापन सोन्यावर अधिष्ठित करण्यांत आलें. अनेक कमिट्या व कमिशनें बसून आजही कायदेशीर रीत्या सोनें हेंच येथील देवघेवींचें मूल्यमापक परिमाण समजलें जातें. तरी सोन्याचीं नाणीं कायदेशीर मानलेलीं नसून येथील टांकसाळींत तीं पाडलीही जात नाहींत. पहिल्या प्रथम हजारों वर्षें सुवर्णचलन प्रचारांत असून पुढें रौप्यचलनाचा व सुवर्णचलनविरहित सुवर्ण मूल्यमापनाचा अंगीकार केल्याचें हिंदुस्थान देशाचा अलीकडील चलनविषयक इतिहास हें एकच उदाहरण आहे. त्यांतील महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख केल्याशिवाय हिंदी चलनपद्धतीच्या सध्यांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होणार नाहीं.

सर्व देशाप्रमाणें हिंदुस्थान देशातही प्राचीन काळी विनिमयाचें क्षेत्र संकुचित असून देवघेवी बहुतेक ऐनजिनसीच होत. परंतु खिस्तीशकापूर्वी अनेक शतकें येथें सोनें, चांदी व तांबें ह्या धातूंची नाणी प्रचारांत होतीं व राजे महाराजे हे नाणीं पाडणें हा आपल्या राजसत्तेचा विशिष्ट अधिकार आहे असें मानीत. वेदकालांतही सोन्याचा देवघेवींत उपयोग होत होता व मध्यएशियांतील ज्या राष्ट्रांशीं हिंदुस्थानचा त्याकाळी व्यापार चालत असे त्यांच्यां-तील सुवर्णमय नाणीही येथें प्रचारांत असत. ऋग्वेदांत निष्क व दशहिरण्यपिंड ह्यांचा उल्लेख आहे व ब्राह्मणांतही पद व कृष्णाल ही नाणी त्या काळीं रूढ असल्याचा पुरावा आढळतो. बुद्ध काळांत ऐनजिनसी विनिमयाचा प्रचार हळुहळू नाहींसा होत जाऊन धात्वात्मक पैशाचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होऊं लागला. खिस्ती शकाची सुरुवात होण्याच्या सुमारास चांदी व ब्रॉन्झ ह्या धातूंचीं ओतीव व एकाच बाजूस शिक्का असलेली नाणी असल्याचें दिसतें. चाणक्याच्या अर्थशास्त्रांत सरकारी टांकसाळीच्या मुख्य अधिकाऱ्यानें ( लक्षणाध्यक्ष ) नाण्याचा पुरवठा नियमित करून विनिमयाचें माध्यम (व्यावहारिकम्) व कायदेशीर कर्ज फेडीचें साधन ( कोश प्रवेश्यम् ) ह्या दोन्ही नात्यानें पैशाची उपयुक्तता कायम राखावी असें सांगितलें आहे. नाणी पाडतांना निरनिराळ्या धातूंची कोणत्या प्रमाणात भेसळ करावी व खोटी नाणी पाडणाऱ्यांस काय शिक्षा कराव्या ह्याबद्दलही त्या ग्रंथांत सवि-स्तर माहिती आहे. महाभारतांत सोनें व तांबे ह्या धातूंच्या नाण्यांचा पुष्कळ उल्लेख केलेला आहे, परंतु त्याकाळी चांदीचें नाणें फारसें प्रचारात असलेलें दिसत नाही. सोनें, रुपें व तांबें ह्या धातूंच्या नाण्यांचीं वजनें व त्यांचें परस्पर प्रमाण ह्याबद्दल स्मृतिग्रंथांत सविस्तर माहिती आहे. त्याकाळीं रोमशी हिंदुस्थानाचा बराच मोठा व्यापार चालत असल्यानें अनेक प्रकारच्या रोमन नाण्यांचाही येथें प्रसार झालेला होता. खेड्यापाड्यांतील देवघेवी पुष्कळ शतकें पैशाच्या साहाय्यावांचून होत हें खरें. तरी मोठमोठ्या शहरांत व परदेशच्या व्यापारांत सोनें व रुपें ह्या धातूंची नाणीं मोठ्या प्रमाणात वापरलीं जाण्याची पद्धत खिस्ती शकाच्या आरंभीच्याच शतकांत येथें अंमलांत आली होती ह्यांत शंका नाहीं.

हिंदुस्थानाच्या इतिहासांतील मध्ययुगीन कालांत दिल्लीस मुसलमान बादशहांचा अंमल असे, व त्यांच्या अमदानीत अरबी वळणाची विशिष्ट चलनपद्धति त्यांनीं स्वीकारली होती. अल्तमश बादशहानें १७५ भाराचा चांदीचा टांक हें आपलें मुख्य नाणें केलें होतें. महंमद तघलखानें सोन्याचांदीच्या नाण्यांत अनेक सुधारणा केल्या व तांब्याची दुय्यम आणि प्रतीकरूप नाणी सुरू केली. परंतु ही नाणी खासगी टांकसाळींत पाडलीं न जाण्याची परिणामकारक व्यवस्था त्यांस करतां न आल्यानें बना-वट नाण्यांचा सुळसुळाट होऊन त्यांस ती रद्द करावी लागली. शीरखानानें सुरू केलेलें

११½ मासे वजनाचें चांदीचें वाटोळें नाणें अकबराच्या कारकीर्दीत सुधारून अंमलांत आणलें गेलें, असें अबुल फझलनें म्हटलें आहे. त्याच कारकीर्दीत ११ मासे वजनाचें सोन्याचें वाटोळें नाणें पाडलें जाऊन त्यास मोहोर असें म्हणण्याचा प्रघात पडला. ह्या मोहोरेची ९ रुपये किंमत असे. एका रुपयाचे ४६ पैसे होत असून पैसा किंवा दाम हें नाणें तांब्याचें असे. आग्रा, काबूल, अहमदाबाद ह्या ठिकाणीं व बंगाल्यांतील एका टांकसाळीत सोनें, रुपें व तांबें ह्यांचीं नाणीं पाडलीं जात. चांदीची नाणी पाडण्याची आणखी दहा ठिकाणें असून तांब्याचीं नाणीं तर पुष्कळच ठिकाणी पाडीत असत. हलक्या वजनाची व कापलेलीं नाणीं वाढून व्यवहारांत गोंधळ होऊं नये त्यास्तव विवक्षित वजनापेक्षां नाण्याचें कमी वजन असल्यास तें बेकायदेशीर ठरविलें जाई. हिंदुस्थानाच्या इतर भागांतील मुसलमानी राज्यांत सामान्यतः दिल्लीच्या बादशहांच्या चलनपद्धतीस अनुसरूनच नाणीं पाडली जात. मराठी राज्यांत सोन्याचा होन हें मुख्य व प्रमाणभूत नाणें असून जमीनमहसूलही होनांत ठरविला जाई. तरी मुसलमानी राज्यांतील रुपयाचाही व्यापाराच्या निमित्तानें सर्वत्र प्रसार झालेला होता. प्राचीन काळापासून दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यांचा पाश्चात्य राष्ट्रांशीं व्यापार चालत आल्यानें व ह्या निर्गतीचा मोबदला म्हणून सोन्याची सारखी आयात होत राहिल्यानें मद्रासकडेही प्रमुख नाणें सोन्याचा 'पागोडा' हेंच होतें. मद्रास इलाख्याच्या अनेक भागांत जुन्या रोमन सोनेरी नाण्यांचे पुष्कळ अवशेष सांपडले आहेत. एकंदरीनें उत्तर हिंदुस्थानांत चांदीच्या नाण्यांचा व दक्षिणेंत सोन्याच्या नाण्यांचा अधिक प्रसार असला तरी देशांत अनेक स्वतंत्र राज्यें असल्यानें निरनिराळ्या छापाच्या व वजनाच्या आणि धातूंच्या नाण्यांचा सुळसुळाट असे. परंतु प्रमुख नाणीं पाडण्यास टांकसाळी खुल्या असल्यानें व त्यांचीं वजनें सर्वांस माहीत असल्यानें पुरवठा व विश्वसनीयता ह्यांच्या बाबतींत चलनविषयक स्थिति त्यावेळच्या गरजांच्या मानानें समाधानकारक होती. हिंदुस्थानांत इंग्रजांचा अंमल सुरू झाला त्यावेळी सोन्याचांदीचीं एकंदर ९९४ नाणीं अस्तित्वांत होती व मुंबई इलाख्यांत दिवाणी कोर्टांत उपयोगीं पडण्याकरितां ३८ सोन्याच्या व १२७ चांदीच्या जुन्या नाण्यांचें परस्पर प्रमाण सरकारी हुकुमांत नमूद केलेलें होतें. [१]

**२ ब्रिटिश अमदानींतील फेरबदल:**—ईस्ट इंडिया कंपनीचा अंमल निरनिराळ्या भागांत चालू असल्यानें तेथील चलनांच्या विविधतेमुळें कंपनीच्या कारभारांत व व्यवहारांत बराच गोंधळ होत असे. स्थानिक नाण्यांखेरीज कंपनी सरकारचीं अशीं रुपया व इतर स्वतंत्र नाणींही प्रचलित असत. जुनीं देशी नाणी रद्द करून हळुहळू कंपनीसरकारचा रुपया हें एकच नाणें कायदेशीर ठरविण्याकडे कंपनीच्या अधिकाऱ्यांचा कल असे. सोन्याचें नाणें सर्वस्वी टाकून देण्याचा इंग्रजी अधिका-

१ न्यायमूर्ति रानडे– 'मराठी अमदानींतील चलनें व टांकसाळी.'

त्यांचा पहिल्या प्रथम विचार नव्हता, तरीही १८३५ मध्यें सोन्याचें नाणें बेकायदेशीर ठरविण्यांत येऊन १८० भाराचा व $\frac{1}{12}$ हिणकस असलेला चांदीचा रुपया हेंच एक नाणें सर्व ब्रिटिश हिंदुस्थानांत कायदेशीर व प्रमाणभूत चलन म्हणून चालू ठेवलें गेलें. १८४१ मध्यें चलनविषयक कायद्यांत बदल न करतां तात्पुरती व्यवस्था म्हणून सरकारी खजिन्यांत पंधरा रुपयांस एक ह्या प्रमाणांत सोन्याच्या मोहरा स्वीकारण्यांत येतील असा जाहिरनामा काढण्यांत आला. परंतु सोन्याचीं नाणीं पूर्णपणें कायदेशीर नसल्यानें व १५ रुपयास एक पौंड हें प्रमाणही त्यावेळच्या बाजारभावाच्या मानानें कमी असल्यानें सोन्याच्या नाण्यांचा प्रसार म्हणण्यासारखा झाला नाही. थोड्याच वर्षांत ही परिस्थिति बदलली. ऑस्ट्रेलिआ व कॅलिफोर्निआ येथें सोन्याच्या समृद्ध खाणी सांपडल्या व त्यांच्यांतील उत्पत्तीचा बाजारांत खप होऊं लागतांच सोन्याचा भाव उतरून पौंडास पंधरा रुपये हें प्रमाण भारी ठरलें. सरकारी खजिन्यांत व खाजगी देवघेवींत सोन्याच्या नाण्यांचा सुळसुळाट झाला. बाजारांत पंधरा रुपयांपेक्षां कमी किंमतीचें ठरणारें पौंड हें नाणें कायदेशीर दृष्ट्या तितक्या मोलाचें असल्यानें लोक सरकारी देणें सोन्याच्या नाण्यानें भागवूं लागले व सरकारचा त्यामुळें सहाजीकच तोटा होऊं लागला. म्हणून १८५३ च्या १ जानेवारीपासून १८४१ सालचा जाहिरनामा रद्द करण्यांत आला व सोन्याचीं नाणीं सरकारी खजिन्यांत घेण्याचें बंद झालें. परंतु हिंदुस्थानाचा परदेशी व्यापार जसजसा वाढूं लागला व सरकार आणि खाजगी व अधिकारी युरोपियनांची परदेशांत पैसे पाठविण्याची मागणी जसजशी तीव्र होत चालली तसतसा लोकमताचा व सरकारी धोरणाचा कल हिंदी चलन पद्धति सुवर्णमय करण्याकडे झुकूं लागला. १८६६ मध्यें ह्याच प्रश्नाचा विचार करण्याकरितां नेमलेल्या मॅन्सफील्ड कमिशननें सुवर्णचलनास अनुकूल शिफारसी केल्या, परंतु हिंदुस्थानांत सुवर्णचलन अस्तित्वांत येण्याच्या धोरणास ब्रिटिश सरकारचा जोराचा विरोध असल्यानें हिंदुस्थानांतील लोक व सरकार ह्यांच्या एकमताच्या सूचनेसही स्टेट सेक्रेटरीची मान्यता मिळूं शकली नाही. १८५३ पासून सोन्याचीं नाणीं सरकारी खजिन्यांत घेण्याचें बंद झालें होतें, तीं नाणीं म्हणून नव्हे तर सोन्याचे तुकडे ह्या नात्यानें स्वीकारण्याचा प्रघात मात्र पुन्हां सुरू केला गेला व पुढे दोन वर्षांनीं बाजारभाव बदलल्यानें रुपये व पौंड ह्यांचें परस्पर प्रमाणही कांहींसें वाढविण्यांत आलें.

द्विमूल्यमापन चलनपद्धतीचे अनेक दोष अंतर्राष्ट्रीय करारांच्या साहाय्यानें दूर करण्याची खटपट बहुतेक पाश्चात्य राष्ट्रें ह्याच सुमारास करीत होतीं व त्यांच्या प्रयत्नांस हिंदुस्थानसरकारचाही पाठिंबा होता. परंतु हिंदुस्थानांत सुवर्णचलन

---

१ पान ६२ पहा.

चालू होण्याच्या धोरणास प्रतिकूल असलेलें ब्रिटिश सरकार अंतर्राष्ट्रीय कराराच्या साहाय्यानें द्विमूल्यमापन पद्धति अस्तित्वांत आणण्याच्या प्रयत्नांसही अर्धवटच पाठिंबा देत असल्यानें व बहुतेक प्रगमनशील पाश्चात्य राष्ट्रांस सुवर्णचलन हें राष्ट्रीय वैभवाचें व सुस्थितीचें द्योतक आहे असें वाटत असल्यानें द्विचलनपद्धति शेवटी अशक्य कोटींतील ठरली. १८९२ साली भरलेल्या अंतर्राष्ट्रीय परिषदेंत द्विचलन पद्धति सर्व सुधारलेल्या राष्ट्रांस मान्य होण्याची अशक्यता पूर्णपणें निदर्शनास आल्यानें हिंदुस्थानसरकारनें हळुहळू सुवर्ण मूल्यमापन पद्धतीचा अंगीकार करण्याचें ठरविलें. इंग्लडनें १८१६ सालापासूनच सुवर्णमूल्यमापन पद्धतीचा अंगीकार केला होता; १८७१ मध्यें जर्मनींत व १८७६ मध्यें फ्रान्समध्येंही त्याच पद्धतीची प्रस्थापना झाली. हिंदी चलनपद्धति १८३५ सालापासून १८९९ पर्यंत रौप्यचलनात्मक होती व पाश्चात्य राष्ट्रांत द्विचलनपद्धतीच्या अडचणींमुळें सुवर्णचलनाचा अंगीकार करावा लागला होता तसें येथें होण्याचा संभव नव्हता. परंतु हिंदुस्थानांतील प्रमुख व कायदेशीर नाणें चांदीचें असल्यानें हिंदुस्थानसरकारावर एक अनाहूत आपत्ति येत असे. हिंदुस्थान देश अनेक आर्थिक व राजकीय बाबतीत इंग्लंडवर अवलंबून असल्यानें त्या राष्ट्रांत प्रतिवर्षी कोट्यवधि रुपयांचा येथील सरकारास खर्च करावा लागे. स्टेट सेक्रेटरीचा पगार व त्याच्या कचेरीचा खर्च, सरकारच्या निरनिराळ्या खात्यांस लागणारें विलायती सामान, सरकारी कर्जावरचें व्याज, रजेवरील अधिकाऱ्याचे पगार, पेन्शनीत निघालेल्या अधिकाऱ्यांचीं पेन्शनें इत्यादि बाबींत होणाऱ्या इंग्लंडमधील खर्चाचा बोजा हिंदुस्थानसरकारच्या तिजोरीवरच असे. पाश्चात्य राष्ट्रांनीं द्विचलनपद्धतीचा त्याग करून सोन्याच्या नाण्यासच प्राधान्य दिल्यानें त्या राष्ट्रांची चांदीस असलेली मागणी जवळ जवळ नाहींशी होऊन चांदीचा भाव उतरला. हिंदुस्थानसरकारचें उत्पन्न चांदीच्या नाण्यांत, म्हणजे रुपयांत येत असें व इंग्लंडातील खर्च मात्र सोन्याच्या नाण्यांत म्हणजे पौंडात, करावा लागे. चांदीचा भाव उतरल्यानें, म्हणजे विवक्षित वजनाचें सोनें घेण्यास आवश्यक असलेल्या चांदीचें परिमाण वाढल्यानें, हिंदुस्थानसरकारास आपले परदेशी देणें भागविण्यास अधिक रुपये उभे करावे लागत. रुपयाच्या परदेशी भावांत, म्हणजे हुंडणावळींत, एका पेन्साचा उतार झाल्यास येथील सरकारच्या परदेशच्या देण्यांत साधारणतः एक कोटी रुपयांची भर पडत असे. व्यापारी वर्ग व परदेशी देणें असलेले इतर लोक ह्यांचेंही चांदीच्या उतरत्या भावानें पुष्कळच नुकसान होई. ह्या बिनसरकारी वर्गाचें पहिल्यापासूनच असें मागणें होतें कीं हिंदी टांकसाळींतील चांदीचीं नाणीं वाटेल तेवढीं पाडून घेण्यास असलेली परवानगी रद्द करावी व चांदीच्या नाण्यांचा पुरवठा मर्यादित होऊन त्यांचें विनिमयमूल्य अगर हुंडणावळ हीं वाढूं लागतांच हळुहळू सुवर्णचलनपद्धति अस्तित्वांत आणावी. परंतु अंतर्राष्ट्रीय करारानें द्विचलनपद्धति स्थापिली गेल्यास चांदीचा भाव वाढून व चांदीचें सोन्याशीं

असलेलें प्रमाण स्थिर राहून आपल्या सर्व अडचणी दूर होतील असें हिंदुस्थान-सरकारास वाटत होतें. १८९२ साली ही आशा समूल नष्ट झाल्यानें व्यापारी वर्गाच्या वरील सूचनेचा विचार करणें हिंदुस्थानसरकारास भाग पडलें. ह्याच वर्षीच्या जून महिन्यांत हिंदुस्थानसरकारकडून स्टेट सेक्रेटरीस ह्या विषयाबद्दल एक खलिता पाठविण्यांत आला, त्यांत टांकसाळीत रुपये पाडून घेण्याची नागरिकांस असलेली सवलत तात्काल बंद करावी व रुपयांचा पुरवठा कृत्रिमपणें मर्यादित करून त्यांचें सोन्याशीं असलेलें प्रमाण वाढवावें आणि पुढें सुवर्णचलन अंमलांत आणण्याची व्यवस्था करावी असें सुचविलें होतें. १८९३ च्या जानेवारींत हिंदुस्थानसरकारनें आपल्या खलित्याच्या स्पष्टीकरणार्थ तारेनें पुढील अधिक विस्तृत सूचना केल्या. ( १ ) इंग्लंडमधील सोन्याचीं नाणी रुपयास १८ पेन्स अगर त्याहून अधिक भावानें हिंदुस्थानात चालू करण्याचा हिंदुस्थानसरकार जाहीरनामा काढील; व ( २ ) टांक-साळींत रुपये पाडण्याचें बंद केल्यास कांहीं काळ लोटल्यावर मग सोन्याची नाणीं पाडण्यास सुरुवात होईल. ह्या सूचनांस हिंदुस्थानांतील युरोपियन व्यापाऱ्यांचें पाठबळ होतें तरी येथें व इंग्लंडमध्यें विरोधही पुष्कळ होता. विशेषतः ब्रिटिश सरकारच्याच फडाणिशी खात्यातील अधिकारी अशा धोरणास तत्त्वतः प्रतिकूल होते. चलन-पद्धति प्रामाणिक व कार्यक्षम असण्यास टांकसाळी खुल्या असणें आवश्यक आहे व चलनाचा पुरवठा कृत्रिम उपायानीं मर्यादित करून हुंडणावळ वाढविणें ही निव्वळ फसवेगिरी आहे असेंच ह्या बाबतींत ब्रिटिश अधिकाऱ्याचें पहिल्या प्रथम मत होतें. परंतु पुढें हिंदुस्थान सरकारची सांपत्तिक स्थिति फारच खालावल्यानें व लोकपक्षानें सुचविलेले काटकसर वगैरे उपायही त्यांस अमान्य असल्यानें टांकसाळी बंद करून हुंडणावळींत चढ घडवून आणण्याच्या योजनेस ब्रिटिश अधिकाऱ्याचीही अनुमति मिळाली. हिंदुस्थानसरकारच्या सूचनाचा पूर्ण विचार करून त्याबद्दल शिफारशी करण्याकरिता स्टेट सेक्रेटरीनीं लॉर्ड हर्शल ह्यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक कमिटी नेमली.

**३ हर्शल कमिटी**—हिंदुस्थानसरकारच्या विलायती खर्चासंबंधींच्या अडच-णींस टांकसाळीतून रुपये पाडून घेण्याचा अधिकार नियमित करण्याखेरीज दुसरा तात्कालिक इलाज नाही, हें मत कमिटीनें मान्य केलें. परंतु टांकसाळीत सोनें आणून देणारास १६ पेन्सांस एक रुपया ह्या दरानें चांदीचे रुपये पाडून मिळावे असें कमिटीनें सुचविलें. ह्याच दरानें सरकारी खजिन्यांत सोन्याची नाणीं घेतलीं जावीं म्हणजे रौप्यचलनाचें सुवर्णचलनांत होणारें स्थित्यंतर अधिक सोपे होईल असाही कमिटीनें सल्ला दिला. ह्या शिफारशीचें १८९३ च्या ८ व्या कायद्यांत रूपां-तर होऊन हिंदी टांकसाळींत चांदीची नाणी पाडून मिळण्याचा नागरिकांचा हक्क नाहींसा करण्यात आला. सरकारास आपल्या स्वतःच्या गरजा भागविण्यास रुपयांची

जरूर लागल्यास ते पाडून घेण्यास त्यांस कायद्यानें मुभा ठेवण्यांत आली. टांकसाळीत सोनें घेऊन त्या मोबदला १६ पेन्सांस एक रुपया ह्या दरानें रुपये मिळतील अशी जाहीरनाम्यानें व्यवस्था केली गेली. टांकसाळी 'खुल्या' होत्या म्हणजे टांकसाळीतून चांदीचे रुपये पाडून घेण्याची लोकांस पूर्ण मुभा होती तोंपर्यंत रुपया व पौंड ह्यांमध्यें कोणतेंही विवक्षित प्रमाण कायम राखणें स्टेट सेक्रेटरी अगर हिंदुस्थान सरकार ह्यांस अशक्य होतें. कारण १८९३ सालापूर्वी ज्या भावानें हिंदुस्थान-सरकारावर हुंड्या विकण्यास स्टेट सेक्रेटरी तयार असत त्यापेक्षां हिंदुस्थानास चांदीच्या लगडी पाठवून तेथें त्यांचे रुपये पाडविणें किफायतशीर असल्यास विलायतचे व्यापारी तो दुसरा मार्गच स्वीकारीत; परंतु हिंदी टांकसाळीत चांदी घेण्याचें बंद झाल्यानें हा मार्ग खुंटला व रुपयांचा पुरवठा मर्यादित करून रुपया ह्या नाण्याचें विनिमयसामर्थ्य अगर सोन्याच्या नाण्यांतील भाव वाढविणें व विवक्षित दरावर तो कायम ठेवणें हिंदुस्थान सरकारास शक्य झालें. तरी प्रतिवर्षी एवढ्या मोठ्या प्रमाणावर होणारी स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांची विक्री म्हणजे रुपयांच्या पुरवठ्यांत होणारी वाढच असल्यानें रुपयांचा व चांदीचा भाव उतरण्यास त्यापासून मदतच होई. १८९३ साली नवे रुपये पाडण्याचें सरकारनें बंद केलें तरी हुंडणावळीचा दर त्या साली सरासरीनें १४·५ पेन्स होता तो १८९४ साली सरासरीनें १३·१ पेन्स, १८९५ सालीं १३·६ पेन्स व १८९६ साली १४·४ पेन्स असा राहिला. १८९७ सालीं मात्र हुंडणावळ सरासरीनें १५·४ पेन्स व १८९८ सालीं १५·९ पेन्स इतकी होती. हुंडणावळीच्या दरांतील हे फेरबदल व १८९३ सालच्या कमिटीनें आंखून दिलेल्या धोरणाचा पांच वर्षांचा अनुभव ह्यांचा विचार करून विलायतसरकारनें हिंदुस्थानांत कायमचें चलनविषयक धोरण कोणतें स्वीकारलें जावें ह्याबद्दल शिफारसी करण्याकरितां १८९८ साली फौलर कमिटी नेमली.

हुंडणावळीच्या दराखेरीज इतर बाबतींत त्यावेळी चलनविषयक परिस्थिति पुढें दिल्याप्रमाणें होती. (१) सोन्याची नाणीं पूर्णपणें कायदेशीर नसूनही सरकारी देण्याच्या मोबदला ती स्वीकारण्यांत येत; (२) पूर्णपणें कायदेशीर असें रुपया हें एकच नाणें होतें; (३) टांकसाळीत सोन्याची नाणी अगर लगडी आणून दिल्यास त्या मोबदला १६ पेन्सांस एक रुपया ह्या दरानें रुपये देण्यास आपण तूर्त तयार आहों असें सरकारनें जाहीर केलें होतें. सरकारी दर १६ पेन्स असूनही बाजारांत एक रुपयास त्याहून कमी पेन्स मिळत हें पांच वर्षांच्या सरासरी हुंडणावळीचे वर आंकडे दिले आहेत त्यावरून दिसून येईल. रुपयांचा पुरवठा मर्यादित करून हुंडणावळ वाढविण्याची आपली योजना एकंदरीनें यशस्वीच झाली व ती आतां कायम करणें व हळुहळू सुवर्णचलनात्मक सुवर्णमूल्य-मापनपद्धति अस्तित्वांत आणणें इष्ट आहे, असें हिंदुस्थानसरकारास वाटूं लागलें.

कांहीं रुपये वितळवून त्यांच्यांतील चांदीची विक्री करून सोनें विकत घ्यावें व कांहीं कर्ज काढूनही सोन्याचा सरकारजवळील पुरवठा वाढवावा अशी त्यांची सूचना होती. हुंडणावळीचा दर १५·९ पेन्स होता तोही कांहीं रुपये वितळविले म्हणजे १६ पेन्सांवर येईल असें सरकारास वाटत होतें. हिंदी चलनपद्धतीत कृत्रिम स्वरूपाचे असले फेरबदल करण्याच्या धोरणास ब्रिटिश सरकार पहिल्यापासून विरुद्ध होतें. हुंडणावळ कमी अधिक करून मिळणारा सरकारचा फायदा शेवटी हिंदी लोकांच्या खिशांतूनच येणार व हिंदुस्थाननें आपल्या आर्थिक व राजकीय परिस्थितीस साजेशी निर्भेळ रौप्यचलनपद्धतीच चालू ठेवावी किंवा ती पद्धति चालू राहणें अशक्य झाल्यास खरीखुरी सुवर्णमूल्यमापनपद्धति स्थापावी असें त्याचें म्हणणें होतें. रुपयास १६ पेन्स हा दर त्यावेळच्या प्रचलित दराच्या मानानें अधिक असल्यानें चहाच्या मळेवाल्यासारखे निर्गत वस्तूंचे व्यापारी नव्या सरकारी धोरणास विरुद्ध होते. परदेशी बाजारांत त्यांच्या मालास येणारी किंमत सोनेरी नाण्यांत मिळून तिचें रुपयांत परिवर्तन होताना भारी दरानें निर्गत व्यापाऱ्याचें तात्कालिक नुकसान होणार होतें. उलट, आयात व्यापाऱ्यास येथें किंमती कमी ठेवूनही परकी मालाची खरेदी किंमत भागविणें वाढलेल्या हुंडणावळीनें शक्य होत असल्यानें ते सरकारी धोरणास अनुकूल होते. हिंदी लोकमत सरकारच्या कृत्रिम, अदूरदृष्टि व धरसोडीच्या धोरणास सर्वस्वी प्रतिकूल असून येथें निर्भेळ सुवर्णचलन चालू व्हावें असें कांही सुशिक्षित पुढाऱ्यांचें म्हणणे होतें. देशांतील पुष्कळ व्यापारी सार्वजनिक पुढारी ह्यांचें मत तर १८९३ पूर्वी चालू असलेली रौप्यचलन पद्धतिच हिंदुस्थानास हितावह असून हुंडणावळ कमी झाल्याने सरकारचें नुकसान होत असलें तरी बहुसंख्याक शेतकरी वर्गाचा त्यात फायदाच आहे असें होतें. हुंडणावळीचा दर उतरल्यानें सरकारास येणारी तूट भरून काढण्यास खर्चांत काटकसर करणें व विलायतेंत होणारा खर्च कमी करणें हे खरे उपाय आहेत असें ते म्हणत. परंतु ५–६ वर्षांच्या अनुभवावरून टांकसाळी बंद करण्याचे धोरण यशस्वी ठरल्यानें तेंच कायम करून घेण्याकरिता तज्ज्ञांचा सल्ला घेण्यास नवी कमिटी नेमणें जरूर होतें. व्यापारी व धंदेवाल्या वर्गासही सरकारच्या चलनविषयक धोरणाची अनिश्चितता दूर होणें इष्टच होतें. म्हणून सर्व गोष्टींचा पुन्हा पूर्णपणें विचार करून कायमचें धोरण ठरविण्याकरितां १८९८ साली फौलर कमिटी नेमली गेली.

**४ फौलर कमिटी**—हिंदुस्थानांत निर्भेळ सुवर्णचलन चालू करावें व रुपयाप्रमाणें सॉव्हरीन हें नाणेंही रुपयास १६ पेन्स ह्या दरानें कायदेशीर ठरवावें असें फौलर कमिटीनें सुचविलें. हिंदी टांकसाळीत सोन्याची नाणी पाडून घेण्यास नागरिकांस पूर्ण मुभा असावी परंतु रुपये मात्र सरकारनेंच जरूरीपुरते पाडावे म्हणजे त्याचें रुपयातील चांदीच्या किंमतीहून सोन्याच्या नाण्याशीं अधिक प्रमाण ठरवित

येईल, असा फौलर कमिटीचा सल्ला होता. रुपया हें दुय्यम व प्रतीकरूप परंतु पूर्ण कायदेशीर नाणें झाल्यानें त्याची वास्तविक किंमत आणि दर्शनी किंमत यांत फरक राहील व तो फरक सरकारचा निव्वळ फायदाच होय; हा फायदा सोन्याच्या स्वरूपांत एका स्वतंत्र ठेवींत घालून त्या सोन्याच्या साहाय्यानें येथें पूर्णपणें सुवर्णात्मक चलनपद्धति स्थापन होईल असें कमिटीचें म्हणणें होतें. हिंदुस्थानात सोन्याचें नाणें प्रत्यक्षपणें चालू न करता मूल्यमापन व परदेशी देवघेवीचें अंतिम साधन एवढ्यापुरताच सोन्याचा उपयोग व्हावा ह्या कल्पनेवर उभारलेल्या एक दोन योजना फौलर कमिटीपुढें ठेवण्यात आल्या होत्या. परंतु त्या योजना अमान्य करून सुवर्णचलनसहित सुवर्ण परिमाण हिंदुस्थानात स्थापन करणें इष्ट व शक्य आहे असें कमिटीनें ठरविलें. हिंदुस्थानसरकार व परदेशांत देणें असलेले इतर लोक ह्यांस चांदीच्या भावांत उतार झाल्यानें जें नुकसान सोसावें लागतें तें दूर करण्याच्या हेतूनेंच मुख्यतः फौलर कमिटीनें आपली योजना सुचविली, हे खरें असलें तरी चलनविषयक सिद्धांत व परदेशांतील चलनपद्धति ह्याबद्दल प्रास्ताविक भागांत जें विवेचन केलें आहे त्यावरून फौलर कमिटीची योजना एकंदरीनें शास्त्रशुद्ध व व्यवहारोपयोगी होती हे स्पष्ट दिसेल.

ही योजना मान्य करून ती अंमलात आणण्यास हिंदुस्थानसरकारनें पुढीलप्रमाणें सुरुवात केली. ( १ ) सॉव्हरिन व अर्ध सॉव्हरीन ही नाणी कायदेशीर कर्जफेडीस सर्वस्वी योग्य आहेत असें ठरविण्यांत आलें; ( २ ) हिंदुस्थानात सोन्याच्या नाण्याची टांकसाळ स्थापण्याचा प्रयत्न केला गेला; हा प्रयत्न यशस्वी न होण्याची कारणें पुढे एका ठिकाणी यावयाचीच आहेत; ( ३ ) रुपये पाडून त्याची धात्वात्मक किंमत व कायदेशीर किंमत ह्यांच्यांतील फरकामुळें होणारा फायदा निराळा काढून ठेवून रुपयांचें सॉव्हरीनशी ठरलेलें १६ पेन्साचें प्रमाण कायम राखण्यास त्या ठेवीची मदत घ्यावयाचें ठरलें; ( ४ ) हिंदी लोकांनी रुपयाच्या ऐवजी सोन्याची नाणी वापरावी अशा धोरणानें खटपट करण्यांत आली. राजकीय व आर्थिक दृष्ट्या हिंदुस्थानाचा ज्या परकी राष्ट्रांशी मुख्यतः संबंध यावयाचा त्यांच्यांत प्रचलित असलेल्या सुवर्णचलनपद्धतीप्रमाणेंच हिंदुस्थानांत चलन सुरू केलें म्हणजे सरकार व लोक ह्यांच्या चलनविषयक सर्व अडचणी दूर होतील ह्या मतास अनुसरूनच फौलर कमिटीनें आपल्या सूचना केल्या व हिंदुस्थानसरकारनेंही पहिल्या प्रथम त्या मान्य केल्या. परंतु हळूहळू सरकारचें चलनविषयक धोरण धरसोडीचें व अनिश्चित होऊं लागलें, आणि फौलर कमिटीनें आंखून दिलेल्या मार्गावरून अनेक बाबतींत हिंदुस्थानसरकार स्खलन पावलें. हुंडणावळ स्थिर ठेवण्यास उपयोगांत आणावयाच्या ठेवींतील रक्कम लंडन येथें कर्जरोख्यांत गुंतविणें; हिंदुस्थानांत सोन्याची नाणीं पाडणारी टांकसाळ स्थापण्याचा विचार सोडून देणें; 'सुवर्ण मर्यादाहून'हीं[२] कमी भावानें विलायतेंत हिंदुस्थानसरकारवर रुपयांच्या हुंड्या

१ ह्या योजना लिंडसे व प्रोबिन ह्यांच्या होत्या. २ पान ८५ पहा.

विकून त्या येथील नोटांस तारण ठेवलेल्या ठेवींतून वटविणें; सुवर्णपरिमाण कायम ठेवण्याकरितां गोल्ड स्टँडर्ड रिझर्व ह्या नांवानें जी ठेव तयार होत होती तिच्यांत रुपयांचा अंतर्भाव करणें; त्याच ठेवीतील कांहीं रकमेचा सरकारास भांडवल पुरविण्यास उपयोग करणें; आणि हिंदुस्थानसरकारनें खाजगी व्यापाऱ्यांस लंडनवर हुंड्या देण्यास त्याच ठेवीचा व्यय करणें इत्यादि फार महत्त्वाच्या बाबतीत सरकारनें फौलर कमिटीच्या शिफारशी धाब्यावर बसविल्या. रुपयाचें अंतर्गत व परराष्ट्रीय विनिमयाचें साधन ह्या नात्यानें असलेलें मूल्य कायम राखणें हें चलनाचें मुख्य काम आहे; ते व्यवहारांत सोन्याचें नाणें न वापरतां व फक्त हुंड्यांची विक्री करून भागवितां येतें; म्हणजे सुवर्णचलनापेक्षां हीच पद्धत अधिक सोयीची व मितव्ययाची आहे, असें सरकारी अधिकारी व त्यांचे सहाय्यक प्रतिपादूं लागले.

**५ सुवर्णपरिवर्तनपद्धतिः**—फौलर कमिटीच्या शिफारशी कसोशीनें अंमलांत न आणतां सोन्याच्या नाण्यांस अंतर्गत व्यवहारांत काट देऊन फक्त परदेशी देवघेवींस तेवढें सोनें अगर लंडन येथें उपयोगी पडणाऱ्या सोन्याच्या हुंड्या देण्याचें जें धोरण क्रमाक्रमानें सरकारनें अंगिकारिलें त्यासच सुवर्णपरिवर्तनपद्धति असें पुढें नाव पडलें. ह्या पद्धतीतील विशेषांचा मागें प्रास्ताविक भागांत खुलासा केलेलाच आहे[१]. रुपया हे चांदीचें दुय्यम नाणें देवघेवीचें प्रमुख व पूर्णपणें कायदेशीर साधन असणें, नोटांचें परिवर्तन रुपयांत करण्याची सरकारवर जबाबदारी असणें, परंतु रुपया ह्याच चांदीच्या तुकड्यावर छापलेल्या नोटीचें परिवर्तन प्रमाणभूत धातूंत म्हणजे सोन्यांत करून देण्याची सरकारवर जबाबदारी नसणें, सोनें अगर सोन्याची नाणीं त्यांच्या मोबदला १५ रुपयांस पौंड ह्या दरानें रुपये देणें व ह्या भावापेक्षां अधिक रुपये पौंडास पडतील असा रंग दिसतांच हिंदुस्थानांत, इंग्लंडांत पौंड मिळणाऱ्या हुंड्या विकणें हे हिंदुस्थानांतील चलनपद्धतीचे विशेष सुवर्णपरिवर्तनपद्धतीशी सर्वथैव जुळते आहेत. हुंडणावळ कायदेशीर भावापेक्षां कमी होण्याची भीति असतां, म्हणजे रुपयास १६ पेन्सांऐवजी त्याहून कमी पेन्स मिळतील असें वाटतांच त्या म्हणजे कायदेशीर दरानें स्टेट सेक्रेटरीवर पौंडाच्या हुंड्या विकणें व हुंडणावळ वाढते असें दिसल्यास म्हणजे एक रुपयास १६ पेन्सांपेक्षां अधिक पेन्स द्यावे लागतात असें दिसल्यास कायदेशीर भावानें हिंदुस्थानसरकारवर स्टेट सेक्रेटरीनें रुपयांच्या हुंड्या विकणें, अशी अंतर्राष्ट्रीय विनिमयाचें साधन ठराविक दरानें मिळण्याची हमी घेणें हें परिवर्तनपद्धतीचें मुख्य अंग होतें. बाजारभावापेक्षां कायदेशीर भाव भिन्न असतानाच ह्या हमीचा मुख्यतः उपयोग व्हावयाचा असल्यानें कायदेशीर दरानें हुंड्या विकण्यांत अनेक प्रसंगी सरकारास तोटा सोसावा लागणें अपरिहार्य आहे. रुपयांच्या टांकसाळींतून होणारा फायदा स्वतंत्र ठेव म्हणून बाळगण्याचा हेतु हा तोटा भरून काढण्याचा होता, व पुष्कळ वर्षे ह्या ठेवीस हात न लावतां नोटांस तारण असलेल्या

---

१ पान ६४ पहा.

ठेवींतून सोनें देऊन व नवीन रुपये पाडून सरकारास हुंडणावळीचा दर कायम ठेवतां आला.

हिंदुस्थानांत एकही सोन्याचें नाणें न पाडतां रुपया व पौंड ह्यांच्यांतील परस्पर मूल्यसंबंध कायद्यानें ठरवून व निधीच्या साहाय्यानें कायम राखून हिंदुस्थानसरकारनें हिंदुस्थानास सुवर्णचलनाचे सर्व फायदे कमींत कमी खर्चात मिळवून दिले व अंतर्राष्ट्रीय व्यापारास सर्वस्वी स्थिर असा हुंडणावळीचा दर उपलब्ध करून दिला असें सरकारतर्फे सांगण्यांत येई. प्रो. कीन्ससारख्या प्रसिद्ध इंग्रज अर्थशास्त्रज्ञाचा ह्या पद्धतीस पाठिंबा असल्यानें व फिलिपाईन बेटें, स्ट्रेट्स सेटलमेंटस, पोर्टोरिको, आर्जे-टाईन व मेक्सिको ह्या इतर देशानीं पूर्णपणें व जपानसारख्या पहिल्या प्रतीच्या व स्वतंत्र राष्ट्रानें अंशतः तिचा अंगीकार केल्यानें सुवर्णपरिवर्तनपद्धतीची महायुद्ध सुरू होण्याचे सुमारास पुष्कळच प्रतिष्ठा वाढलेली होती. हिंदी लोकमत सरकारच्या चलनविषयक धोरणास व विशेषतः हिंदुस्थानात सोन्याचें नाणें न पाडण्याच्या व कृत्रिमपणें हुंडणावळीचा दर स्थिर ठेवण्याच्या आग्रहास विरुद्ध होतें; व फौलर कमिटीच्या सूचनास अनुसरून निर्भेळ सुवर्णचलनपद्धति येथें तात्काल अंमलांत आणली जावी अशी येथील बहुतेक सुशिक्षित व व्यापारी लोकांची जोराची मागणी होती. सरकारचें स्वतःच्या धोरणाचें समर्थन व लोकांची त्यावरलि टीका ह्यांचा विचार करून फौलर कमिटीच्या शिफारशी धाब्यावर बसवि-ण्यांत सरकारकडून कितपत चूक झाली व ह्यापुढें चलनविषयक धोरण काय असावें हें ठरविण्याकरितां १९१३ मध्यें चेंबरलेन कमिशन नेमण्यांत आलें. सुवर्णपरिवर्तन-पद्धतीसंबंधानें ह्या कमिशनचें म्हणणें पुढीलप्रमाणें होतें:– ‘ निव्वळ बचत करण्याची अगर अनुत्पादकपणे संपत्ति जवळ बाळगून ठेवण्याची इच्छा मोडून दिली तर विनिमयाचें साधन ह्या नात्यानें हिंदी लोकांस सोन्याच्या नाण्यांची जरूरही नाही व तीं आपणांस मिळावीं अशी त्याची इच्छाही नाहीं असें आमचें मत आहे. सध्या अंतर्गत चलन म्हणून नोटा व रुपये हीच साधनें अत्यंत उपयुक्त आहेत. सरकारनें हळुहळू नोटांचा प्रसार अधिक प्रमाणांत होण्याची खटपट करावी, मात्र असें करतांना हिंदुस्थानाचें परराष्ट्रीय देणें भागविण्याकरितां जेवढ्या अंतर्गत चलनाचें पौंडांत परिवर्तन होणें आवश्यक असेल तेवढें परिवर्तन कायदेशीर ठरलेल्या दरानें करून देण्याची त्यानें हमी घ्यावी’. हिंदुस्थानसरकारनें फौलर कमिटीच्या शिफारशीस न जुमानतां जें चलनविषयक धोरण क्रमशः स्वीकारलें होतें त्यास चेंबरलेन कमिशननें पूर्ण पाठिंबा दिला हें ह्या उताऱ्यावरून स्पष्ट होईल.

निव्वळ तात्त्विक दृष्ट्या बोलावयाचें तर नोटा ह्या सर्वांत उत्तम स्वरूपाचें चलन होत व सोन्याची जेवढी बचत होईल तेवढी फायदेशीरच आहे ह्याबद्दल चेंबरलेन कमिशनशी कोणाचेंही दुमत होण्याचा संभव नाही. परंतु कृत्रिम रीत्या ठरविलेला हुंडणावळीचा दर सर्व परिस्थितीत राष्ट्रास हितप्रद होईल किंवा नाहीं आणि विशेषतः

इंग्लंडसारख्या परकी व हिंदुस्थानच्या आर्थिक प्रतिस्पर्धी राष्ट्रानें हिंदी लोकमत धाब्यावर बसवून आपल्या राजकीय सत्तेच्या जोरावर सोन्याच्या नाण्यांस मज्जाव करणे न्याय्य अगर कायदेशीर आहे किंवा नाही ह्या प्रश्नांबद्दल चेंबरलेन कमिशनचे निकाल कोणासही मान्य होण्यासारखे नाहींत. चलनपद्धतीच्या प्रामाणिकपणावर लोकांचा पूर्ण विश्वास असणें जरूर आहे आणि इतर सर्व चलनांचें प्रमाणभूत धातूच्या पैशात परिवर्तन करून मिळण्याची पूर्ण खात्री असल्याखेरीज चलनपद्धतीवर लोकांचा विश्वास बसत नाहीं हें मत सर्व राष्ट्रांत मान्यता पावलेलें आहे. १९२५ साली खुद्द इंग्लंडमध्येंही ह्याच मताचें अवलंबन करून व पुष्कळ तोटा सोसूनही पौंडाच्या नोटांचें सोन्यात परिवर्तन करण्याची हमी दहा वर्षांनीं पुन्हां घेण्यांत आली. त्यातूनही ज्या राष्ट्राचा परदेशी व्यापाराचा आढावा प्रतिकूल असतो व ज्यांस पुरेसे सोनें मिळण्याची वानवा असते त्यानी आपखुषीनें सुवर्णपरिवर्तन-पद्धति स्वीकारली तर गोष्ट निराळी; चलनपद्धतीतील कृत्रिमतेनें उत्पन्न होणारे सर्व अनर्थ त्याही देशात टाळता येतील असें नाहीं. परंतु लोकमताचा पाठिंबा, राष्ट्रीय सरकारची सहानुभूति व सोन्याचा मितव्यय करण्याची आवश्यकता ह्यांमुळें कृत्रिम-तेचे दोष कमीत कमी होऊन हुंडणावळीची स्थिरता व सोन्याचा मितव्यय ह्यांचे फायदे राष्ट्रास मिळतील. परतु दरसाल ३०–४० कोटी रुपये अंतर्राष्ट्रीय देवघेवीची शिल्लक असून त्याचा पुष्कळसा भाग सोन्याच्या रूपानें देशांत येत असतां लोकमतास न जुमानता परकी सरकारनें कायदेशीर चलनाचें प्रमाणभूत धातूंत परि-वर्तन होऊं न देणें हे आर्थिक व राजकीय दृष्ट्या असमर्थनीय आहे. स्वतःच्या चल-नपद्धतीत परिवर्तनास मुभा ठेवून सोन्याचा मितव्यय करणें आवश्यक आहे ह्या सबबी-वर हिंदुस्थानास मात्र सोन्याच्या नाण्यास पारखें करूं पाहणें इतर राष्ट्रांच्या दृष्टीनें समर्थनीय ठरलें तरी हिंदुस्थानाचेंच हित पहिल्या प्रथम पाहण्याची ज्यांच्या-वर कायदेशीर व नैतिक जबाबदारी आहे त्यांनीं असल्या प्रयत्नांस भीक घालतां कामा नये. महायुद्धानंतर प्रत्येक राष्ट्र निर्भेळ सुवर्णचलनपद्धति पुन्हां अंमलांत आण-ण्याची खटपट करूं लागले व त्यामुळें आधीच मर्यादित झालेल्या सोन्याच्या पुरव-ठ्यास असलेली मागणी वाढली. अंतर्गत व्यवहारांत सोनें गुंतून राहूं नये व पररा-ष्ट्रीय देवघेवीस जरूर तेवढें सोनें उपलब्ध व्हावें ह्या उद्देशानें प्रत्येक राष्ट्रानें एका मध्यवर्ती पेढीत आपल्या सोन्याचा शक्य तेवढा पुरवठा एकत्रित करावा असा जिनोवा येथील परिषदेचा सल्ला होता. त्याच परिषदेच्या शिफारशी पुढें करून हिंदुस्थानांत सोन्याचें चलनी नाणें चालू करण्याच्या योजनेस कित्येक लोक विरोध करीत आहेत. परंतु मध्यवर्ती पेढीत सोनें साठविणें आवश्यक असलें तरी चलनाचें प्रमाणभूत नाण्यांत परिवर्तन होणें तेवढेंच किंबहुना त्याहूनही अधिक आवश्यक आहे, हें विसरता कामा नये. विशेषत: हिंदुस्थानांत पेढ्याचा विस्तार विशेषसा झाला नसल्यानें व येथील लोकांची मतें सरकारच्या चलनविषयक धोरणासंबंधीं बरीच साशंक अस-ल्यानें अंतर्गत चलन व सोनें ह्यांच्यांतील परिवर्तनाचें किमान परिमाण येथें बरेंच कमी

असणें जरूर आहे हें ध्यानांत ठेवल्यास सुवर्णचलन चालू होण्याचा आग्रह धरणें म्हणजे निव्वळ भावनाप्रियता नव्हे हें दिसून येईल.

६ **हिंदुस्थान व सोन्याचें नाणें**—महायुद्धाच्या पूर्वीचा काळ, महायुद्ध चालू असतांचा काळ व त्यानंतरचा काळ ह्यांमध्यें हिंदुथानचा परराष्ट्रिय व्यापार कितपत अनुकूल होता व त्यामोबदला सोन्याचांदीची आयात किती झाली हें पुढील कोष्टकांवरून दिसून येईलः— ( आंकडे लक्ष रुपयांचे )

| सन | खाजगी मालाची आयात व निर्यात | | | सोन्या–चांदीची खाजगी आयात | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | निर्यात | आयात | निव्वळ निर्यात | सोनें व सोन्याची नाणी | चांदी व चांदीची नाणी | एकूण |
| १९१३। १९१४ अखेर संपणाऱ्या पाच वर्षांची सरासरी | २,२२,२१ | १,४५,८५ | ७८,७६ | २८,८२ | ७,२२ | ३६,०४ |
| १९१४–१५ | १,८१,५९ | १,३७,९३ | ४३ ६६ | ८,४५ | १०,०१ | १८,४६ |
| १९१५–१६ | १,९७,३८ | १,३१,९९ | ६५,३९ | ४-९० | ५,५८ | १०,४८ |
| १९१६–१७ | २,४५,१५ | १,४९,६२ | ९५,५३ | ४,२० | –२,१६ | २,०४ |
| १९१७–१८ | २,४२,५६ | १,५०,४२ | ९२,१४ | २१,४६ | १,४६ | २२,९२ |
| १९१८–१९ | २,५३,८५ | १,६९,०३ | ८४,८२ | २ | ६ | ८ |
| १९१९–२० | ३,२६,७९ | २,००,८० | १,२५,९९ | १०,९७ | — १५ | १०,८२ |
| १९२०–२१ | २,५८,०५ | ३,३५,६० | – ७७,५५ | –८,८८ | ७,५९ | –१,२९ |
| १९२१–२२ | २,४५,४४ | २,६६,३४ | – २०,९० | –२,७९ | १४,९५ | १२,१६ |
| १९२२–२३ | ३,१४,३२ | २,२४,३१ | ९०,०१ | ४१,१८ | १८,१७ | ५९,३५ |
| १९२३–२४ | ३,६१,९१ | २,१७,०३ | १,४४,८८ | २९,१९ | १८,३८ | ४७,५७ |
| १९२४–२५ | ३,९८,३६ | २,४३,१८ | १,५५,१८ | ७३,७८ | २०,०६ | ९३,८४ |
| १९०८ते१९२५ सरासरी | २,७५,०४ | २,०२,३९ | ७२,६५ | १६,५० | ८,५४ | २५,०४ |

जगातील सोन्याचा एकंदर पुरवठा, त्यापैकीं चलनास उपयोगी पडणाऱ्या भागाचें परिमाण, हिंदुस्थान, चीन, इजिप्त ह्या देशांत जाणारा भाग, जगातील लोकसंख्येची वाढ ह्या सर्वांबद्दल कसोशीनें माहिती मिळवून पुढील महत्त्वाचें कोष्टक तयार करून एका प्रसिद्ध इंग्लिश पेढीवाल्यानें हिल्टनयंग कमिशनपुढें ठेवलें होतें. हिंदुस्थानाची सोन्याच्या नाण्याबद्दल असलेली मागणी व हिंदुस्थान एकंदर सोन्याच्या पुरवठ्याचा फाजील भाग अनुत्पादक मार्गांत गुंतवितें असा आरोप करून त्या मागणीस पाश्चात्य राष्ट्रें, व विशेषतः इंग्लंड, करीत असलेला विरोध ह्यांचा योग्य तऱ्हेनें विचार करण्यास पुढील कोष्टक[1] उपयोगी पडेलः—

१ हें कोष्टक 'हिल्टनयंग' कमिशनच्या रिपोर्टास जोडलेल्या पुराव्यामध्यें पान ५३४ वर आहे.

## जगांतील सोन्याच्या पुरवठ्याचा विनियोग

( गाळीव सोन्याच्या एका औंसास ८४ शिलिंग ११½ पेन्स ह्या

| वर्षे | उद्योगधंदे | | हिंदुस्थान | | चीन व इजिप्त | | एकंदर मागणी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | एकूण | शेंकडा प्रमाण | एकूण | शेंकडा प्रमाण | एकूण | शेंकडा प्रमाण | एकूण | शेंकडा प्रमाण |
| १४९३–१८३४[1] | २८० | ५० | ६० | १० | २८ | ५ | ३६८ | ६५ |
| १८३९ अखेर पांच वर्षे | १२ | ८७ | २ | १४ | ? | | १४ | १०० |
| १८४४ ,, ,, ,, | १३ | ६५ | २ | १० | ? | | १५ | ७५ |
| १८४९ ,, ,, ,, | १५ | ४० | ५ | १३ | ? | | २० | ५३ |
| १८५४ ,, ,, ,, | १६ | १४ | ५ | ४ | ? | | २१ | १८ |
| १८५९ ,, ,, ,, | २१ | १५ | १६ | १२ | ? | | ३७ | २७ |
| १८६४ ,, ,, ,, | ३१ | २५ | ३५ | २८ | ? | | ६५ | ५३ |
| १८६९ ,, ,, ,, | ४३ | ३२ | २४ | १८ | ? | | ६७ | ५० |
| १८७४ ,, ,, ,, | ५८ | ४८ | ११ | ९ | ? | | ६९ | ५७ |
| १८७९ ,, ,, ,, | ५९ | ५३ | ३ | ३ | ५ | ४ | ६७ | ६० |
| १८८४ ,, ,, ,, | ५३ | ५१ | १९ | १८ | ९ | ९ | ८१ | ७८ |
| १८८९ ,, ,, ,, | ५० | ४४ | १२ | १० | ४ | ४ | ६६ | ५८ |
| १८९४ ,, ,, ,, | ५२ | ३४ | ४ | ३ | ४ | ३ | ६० | ४० |
| १८९९ ,, ,, ,, | ६५ | २६ | २४ | ९ | ८ | ३ | ९७ | ३८ |
| १९०४ ,, ,, ,, | ७९ | २६ | ३१ | १० | १७ | ६ | १२७ | ४२ |
| १९०९ ,, ,, ,, | ९५ | २२ | ५० | १२ | १३ | ३ | १५८ | ३७ |
| १९१४ ,, ,, ,, | १२१ | २६ | ९६ | २० | ६ | १ | २२३ | ४७ |
| १९१९ ,, ,, ,, | ९१ | २१ | ५१ | १२ | १४ | ३ | १५६ | ३६ |
| १९२४ ,, ,, ,, | ८७ | २४ | १०३ | २९ | −२ | −१ | १८८ | ५२ |
| १४९३–१८३४ | २८० | ५० | ६० | १० | | | ३६८ | ६५ |
| १८६४ अखेर ३० वर्षे | १०८ | २४ | ६५ | १४ | | | १७३ | ३८ |
| १८९४ ,, ,, ,, | ३१५ | ४३ | ७३ | १० | | | ४१० | ५६ |
| १९२४ ,, ,, ,, | ५३८ | २४ | ३५५ | १६ | | | ९४९ | ४२ |
| एकूण | १२४१ | ३१ | ५३३ | १४ | | | १९०० | ४८ |
| १९२९[1] अखेर पांच वर्षे | ९० | २३ | १२० | ३० | | | २२० | ५६ |
| १९३४[1] ,, ,, ,, | ११० | ३१ | ११० | ३० | | | २३५ | ६५ |

१ हे आकडे अजमासानें घेतलेले आहेत.

## व जगांतील सोन्याच्या नाण्याचा पुरवठा

भावानें किंमत आकारून दशलक्ष पौंडांचे आंकडे दिले आहेत. )

| चलन ह्या नात्यानें इतर राष्ट्रांस उपलब्ध असलेला पुरवठा | | जगांतील सोन्याचे उत्पादन | | सोन्याच्या नाण्याचा पुरवठा | | | जगांतील लोकसंख्या | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण | वाढ | एकूण | वाढ | माणशीं प्रमाण | दशलक्षाचे आंकडे | वाढ शेंकडेवारी |
| १९६ | ३५ | ५६४ | — | १९६ | — | ५३ पेन्स | ८९० | — |
| — | — | १८ | — | १९६ | | ५१ ,, | ९२५ | ४ |
| ५ | २५ | २० | ४२ | २०१ | ३ | ५० ,, | ९६४ | ,, |
| १८ | ४७ | ३८ | ९० | २१९ | ९ | ५३ ,, | १,००३ | ,, |
| ९७ | ८२ | ११८ | २१० | ३१६ | ४४ | ७३ ,, | १,०४४ | ,, |
| १०१ | ७३ | १३८ | १७ | ४१७ | ३२ | ९२ ,, | १,०८९ | ,, |
| ५९ | ४० | १२५ | –९ | ४७६ | १४ | १०१ ,, | १,१३४ | ,, |
| ६७ | ५० | १३४ | ७ | ५४३ | १४ | ११० ,, | १,१८४ | ,, |
| ५१ | ४३ | १२० | –१० | ५९४ | ९ | ११५ ,, | १,२३५ | ,, |
| ४५ | ४० | ११२ | –७ | ६३९ | ८ | ११९ ,, | १,२९२ | ,, |
| २३ | २२ | १०४ | –७ | ६६२ | ४ | ११८ ,, | १,३५० | ,, |
| ४८ | ४२ | ११४ | १० | ७१० | ७ | १२० ,, | १,४१३ | ,, |
| ९१ | ६० | १५१ | ३२ | ८०१ | १३ | १३१ ,, | १,४७२ | ,, |
| १५६ | ६२ | २५३ | ६८ | ९५० | १९ | १५१ ,, | १,५२६ | ,, |
| १७९ | ५८ | ३०६ | २१ | ११३६ | १९ | १७२ ,, | १,५८८ | ,, |
| २७३ | ६३ | ४३१ | ४१ | १४०९ | २४ | २०३ ,, | १,६६६ | ५ |
| २४७ | ५३ | ४७० | ९ | १६५६ | १८ | २२६ ,, | १,७५२ | ,, |
| २७४ | ६४ | ४३० | –९ | १९३० | १७ | २५४ ,, | १,८२० | ४ |
| १७० | ४८ | ३५८ | –१७ | २१०० | ९ | २६४ ,, | १,९१० | ५ |
| १९६ | ३५ | ५६४ | — | १९६ | — | ५३ ,, | ८९० | — |
| २८० | ६२ | ४५३ | — | ४७६ | — | १०१ ,, | ११३४ | — |
| ३२५ | ४४ | ७३५ | ६२ | ८०१ | ६८ | १३१ ,, | १४७२ | ३० |
| १२९९ | ५८ | २२४८ | २०६ | २१०० | १६२ | २६४ ,, | १९१० | ३० |
| २१०० | ५२ | ४००० | — | — | — | — | — | — |
| १७५ | ४४ | ३९५ | १० | २२७५ | ८ | २७२ ,, | २०१० | ५ |
| १२५ | ३५ | ३६० | –९ | २४०० | ५ | २७२ ,, | २१२० | ५ |

हिंदुस्थानाची लोकसंख्या फार मोठी असून तेथील लोकांस सोन्याच्या नाण्यांचा व दागदागिन्यांचा अनुत्पादकपणें स्वतःजवळ संचय करण्याची संवय असल्यानें इतर राष्ट्रांच्या मानानें हिंदुस्थानास सोन्याची आयात अधिक होत आहे, ह्या मतास वरील आंकड्यांत मुळीच पुरावा मिळत नाही. उलट १९१९-२४ ह्या पचवार्षिक काळांतील विशिष्ट कारणांनी वाढलेले आंकडे सोडून दिले तर एकंदरीनें जगांतील लोकसंख्येच्या $\frac{1}{6}$ भागाचें वास्तव्य असलेल्या हिंदुस्थान देशांत सरासरीनें एकंदर सोन्याचा $\frac{1}{6}$ एवढाच भाग आलेला आहे असें दिसून येईल. तसेंच हिंदुस्थानाकडे सोन्याचा ओघ फार मोठ्या प्रमाणांत वळल्यानें इतर राष्ट्रांस त्यांच्या चलनविषयक गरजा भागविण्यास पुरेसें सोनें मिळत नाही हा युक्तिवादही वरील कोष्टकांतील आंकड्यांवरून पोकळ ठरतो. कारण चलनविषयक गरजा भागविण्यास पुरेसें सोनें मिळत नाही अशी तक्रार आज कित्येक वर्षें चालू असूनही पाश्चात्य राष्ट्रांत चलनाखेरीज इतर मार्गांत म्हणजे दागदागिने, कलाकुसरीचे व शोभिवंत जिन्नस तयार करण्याच्या धंद्यांत, सोन्याच्या पुरवठ्याच्या पुष्कळ भागाचा अजूनही व्यय होत आहे असें त्यांवरून दिसेल. हिंदुस्थानाकडे कायदेशीर मार्गांनीं येणारा सोन्याचा ओघ थांबविण्याची खटपट करण्याऐवजी पाश्चात्य राष्ट्रांनीं आपापल्या देशांतील सोन्याच्या पुरवठ्याचा विनियोग सर्वस्वी चलनात्मक गरजा भागविण्याकडे केला तर तो मार्ग त्यांसही अधिक श्रेयस्कर होईल.

हिंदुस्थान हा गरीब देश असल्यानें सोन्यासारख्या मूल्यवान नाण्याच्या प्रसारास येथें फारसा अवसर नाहीं, असें कांही लोक म्हणतात. परंतु अगदी प्राचीन कालापासून तों तहत इंग्रजांची सत्ता स्थापन होईपर्यंत ह्या देशांत सोन्याच्या नाण्यांचा पुरेसा प्रसार झालेला होता हें ऐतिहासिक सत्य असले लोक दृष्टीआड करतात. ब्रिटिश अमदानीत हिंदुस्थान पूर्वीपेक्षां कंगाल झालेला आहे व म्हणून पूर्वकाली सोन्याचें नाणें चालू असणें वाजवी असलें तरी हल्लीं तशी आर्थिक परिस्थिति नाही, असें म्हणण्याचें धाष्ट्य अर्थातच हेही टीकाकार करणार नाहींत. सोन्याचांदीस, विशेषतः सोन्यास, असलेल्या मागणीत एकदम वाढ होऊन पदार्थांच्या किंमती उतरूं नयेत व सोन्याचा उपयोग लहानसहान व्यवहारांत करण्याची जरूर पडूं नये ह्या गोष्टी सर्व राष्ट्राप्रमाणें हिंदुस्थानासही लागू आहेत. पेढ्यांची संघटना सुधारून व सुवर्णचलनपद्धतीतच योग्य ते निर्बंध घालून त्या साध्य करतां येतील. हिंदुस्थानांतील लोकांस सध्यां जो सोन्याचा अगर सोन्याच्या नाण्याचा हव्यास वाटतो तोही कमी व्हावयास पाहिजे असल्यास सुवर्णचलनसहित सुवर्णमूल्यमापनपद्धति अस्तित्वांत आणणें हाच परिणामकारक उपाय होय. व्यवहारांतून सोन्याच्या नाण्याचें उच्चाटन करण्याचा राजमार्ग म्हटला म्हणजे तें नाणें पाडण्याची व इतर चलनाच्या मोबदला देण्याची सरकारने कायदेशीर जबाब-

दागी घेणें हा होय. आपणांस जरूर तेव्हां सोन्याचें नाणें हटकून मिळेल अशी लोकांची खात्री झाल्यास ते व्यवहारांत सोन्याचें नाणें वापरण्याचें सोडून देतील एवढेंच नव्हे, तर जवळ सोन्याची कांहीं तरी शिल्लक असावी या हेतूनें दागदागिन्यांत जो सोन्याचा हल्लीं विनियोग होत आहे तोही कमी होईल. सुवर्णखंड मूल्यमापन पद्धतीवर लोकांचा विश्वास बसण्याची पद्धतशीर खटपट करावयाची असल्यास त्यांस सुवर्णचलनात्मक सुवर्णमूल्यमापन पद्धतीच्या अवस्थेंतून जाऊं देणें आवश्यक आहे. युरोपिअन राष्ट्रांनी सुवर्णखंड मूल्यमापन पद्धति आज नाइलाज म्हणून पत्करली आहे; ती हिंदुस्थानावर लादणें मुळींच न्याय्य नाहीं. उद्यां अनुकूल परिस्थिति उत्पन्न होतांच पुन्हां पूर्वीची पद्धति युरोपांत अंमलांत येणें साहजिक आहे. अशा स्थितींत स्वतःच्या स्वतंत्र देशांत निर्भेळ सुवर्णचलन चालू नाहीं म्हणून राजकीय दृष्ट्या परवश असलेल्या हिंदुस्थानास योग्यायोग्य आर्थिक प्रमेयाच्या साहाय्यानें ती पद्धत चालू करण्यापासून परावृत्त करण्याच्या पाश्चात्यांच्या प्रयत्नास हिंदी लोकमताचा केव्हांही पाठिंबा मिळणें शक्य नाहीं.

हिंदुस्थानाच्या परदेशी व्यापारांत एकंदरीनें ७०–७५ कोट रुपयांची निव्वळ बचत सालीना होत असते व स्टेट सेक्रेटरी व हायकमिशनर ह्यांच्या मार्फत होणारा खर्च वजा जाऊनही बरीच मोठी शिल्लक राहते हे वर दिलेल्या पहिल्या कोष्टका-वरून दिसून येईल. ही शिल्लक वाटेल त्या मार्गानें हिंदुस्थानात आणण्यास मुभा असली तर पुरेशा सोन्याची हिंदुस्थानात आयात होऊन सुवर्णचलन सहज चालू शकेल. शिवाय, हिंदुस्थानातही दरसाल सुमारें चार पांच कोटी रुपये किंमतीचें सोनें खाणींत पैदा होतें. रुपयासारखें प्रतीक नाणेंच कायदेशीर समजून त्याचा टांकसाळींतून पुरवठा केल्यानें एकंदरीनें नाण्याचा पुरवठा प्रमाणाबाहेर होतो व पूर्ण किंमतीचें सोन्याचें नाणें साहजिकच व्यवहारांतून नाहीसें होतें. प्रतीकरूप नाण्याचा सुळसुळाट आल्यानें किंमती निष्कारण वाढतात. देशाची सांपत्तिक परिस्थिति, आणि सर्व हिंदी वर्गांच्या हितास परिपोषक होईल असे चलनविषयक धोरण अंगीकारण्याची व लोकांच्या विश्वासास पात्र होईल अशी चलनपद्धति स्थापन करण्याची आवश्यकता हीं लक्षांत घेतां हिंदुस्थानात निर्भेळ सुवर्णचलनपद्धति अस्तित्वात येणें हे इष्ट व पूर्णपणें शक्य आहे असें म्हणणें प्राप्त आहे.

**७ सोन्याची टांकसाळ**—फौलर कमिटीच्या रिपोर्टानंतर ब्रिटिश सरकारनें हिंदु-स्थानांत सोन्याचें नाणें चालू करण्याचा कांहींसा प्रयत्न केला, परंतु अनेक कारणानीं तो यशस्वी होऊ शकला नाहीं. या एका लहानशा प्रयत्नाखेरीज एकंदरीनें, हिंदुस्थानांत सुवर्णचलनपद्धति सुरू होऊं नये व येथलि टांकसाळींत सोन्याची नाणी पाडली जाऊं नयेत अशाच धोरणानें ब्रिटिश सरकारचे पहिल्यापासून प्रयत्न होत आहेत. हिंदुस्था-नांत सोन्याच्या नाण्याचा प्रसार झाल्यास इंग्लिश पेढीवाल्यांच्या आर्थिक भरभरा-

टांस कमीपणा येईल अशी भीति वाटून ब्रिटिश व्यापारीही ब्रिटिश सरकारावर त्याच मताचा पगडा बसवीत असतात. हिंदुस्थानच्या आर्थिक हितसंबंधाची जाणीव व हिंदी लोकमताची मागणी ह्याचा प्रत्यक्ष अनुभव हिंदुस्थानसरकारास असल्यानें येथें सुवर्णचलन चालू करण्याचा व येथील टांकसाळींत सोन्याचें नाणें पाडून घेण्याचा हिंदुस्थान सरकारकडून कधीं कधीं प्रयत्न झालेला आहे. परंतु त्यास ब्रिटिश मंत्रिमंडळ व ब्रिटिश पेढीवाले ह्यांच्या विरोधापुढें नमावें लागतें. फौलर कमिटीच्या सूचनेनुसार हिंदुस्थानसरकारनें येथें सोन्याची टांकसाळ काढण्याचा प्रयत्न सुरू केला होता व टांकसाळ ताबडतोब सुरू होणार आहे असें मत १९०० मध्यें हिंदुस्थानसरकारच्या फडणविसांनीं जाहिरही केलें होतें. परंतु इग्लंडच्या फडणविशी खात्यातील अधिकाऱ्यांनीं अनेक अडचणी उपस्थित करून हिंदुस्थानसरकारास आपली योजना टाकून देणें भाग पाडलें. येथील व्यापारी, धंदेवाले आणि सामान्य लोक ह्यांनीं मात्र सोन्याच्या नाण्याबद्दलचें आपलें मागणें केव्हांही सोडलें नाहीं. १९१२ सालीं वरिष्ठ कायदे मंडळांत हा प्रश्न पुढें आणला जाऊन हिंदुस्थानसरकारनें स्टेट सेक्रेटरीस हिंदुस्थानात सोन्याचें नाणें पाडण्याची आवश्यकता आहे असें दर्शविणारा एक खलिताही पुन्हा पाठविला. इंग्लिश अधिकाऱ्यांपुढें पुन्हा ही योजना गेली तेव्हां त्यांनीं हिंदुस्थानात सोन्याचें नाणें पाडण्याची जी टांकसाळ होईल ती इग्लंडमधील टांकसाळीची शाखा समजली जावी किंवा हिंदुस्थानातील टांकसाळीचें सर्वच काम ब्रिटिश सरकारच्या टांकसाळीमार्फत चालावें असें सुचविलें. ही सूचना मान्य केल्यास जें थोडेंबहुत चलनविषयक स्वातंत्र्य हिंदुस्थानसरकारास होतें तेंही नष्ट होणार हें जाणून त्यावेळचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड क्रू ह्यांनीं हिंदुस्थान-सरकारास असें सुचविलें कीं सॉव्हरिन व अर्ध सॉव्हरिन ही इंग्रजी नाणीं हिंदुस्थानांत मुळींच न पाडतां मोहोर ह्या नावाचें व दहा रुपयास एक मोहोर ह्या प्रमाणाचें स्वतंत्र नाणें हिंदी टांकसाळींत पाडलें जावें. परंतु ह्याच सुमारास हिंदी चलनपद्धतीसंबंधी सर्व प्रश्नांचा विचार करण्यास चेंबरलेन कमिशन नेमलें गेलें होतें व इतर प्रश्नांबरोबर हिंदुस्थानातील सोन्याच्या टांकसाळीचा प्रश्नही त्या कमिशनकडे सोपविण्यांत आला. हिंदुस्थानात सोन्याचें नाणें चालू करण्याची आवश्यकता नाहीं एवढेंच नव्हे तर आपल्या देशात तें चालू व्हावें अशी हिंदी लोकांची खरोखर इच्छाही नाहीं असें चेंबरलेन कमिशनचें मत असल्यानें सोन्याच्या टांकसाळीस एकंदरीनें त्याचा विरोधच होता असें म्हटलें पाहिजे. तरी हिंदी लोकांच्या भावनांचें सोन्याच्या टांकसाळीखेरीज समाधान होत नसलें व सरकारी टांकसाळीप्रीत्यर्थ होणारा खर्च सोसण्यास लोक तयार असले तर सॉव्हरिन व अर्ध सॉव्हरिन ही नाणीं पाडणारी टांकसाळ हिंदुस्थानांत स्थापन होण्यास हरकत नाहीं असेंही कमिशननें म्हणून ठेवलें होतें. येथें सोन्याचें नाणें चालू होण्याबद्दल हिंदुस्थान-सरकारास आधीच फारसा उल्हास नव्हता, त्यातच चेंबरलन कमिशनचा

गर्व्हर्नर व ब्रिटिश अधिकाऱ्यांचा उघड विरोध याची भर पडल्यानें येथें सोन्याची टांकसाळ चालू होणे अशक्यप्राय झालें. परंतु महायुद्धाच्या काळांत चांदीचा भाव वाढून पुरेसे रुपये पाडणें हिंदुस्थानसरकारास अशक्य झालें, म्हणून १९१७ च्या डिसेंबरमध्यें खास बादशाही जाहीरनामा निघून मुंबईच्या टांकसाळींत ब्रिटिश नाण्याच्या बरहुकूम सोन्याचीं नाणीं पाडण्यास परवानगी मिळाली. मात्र सोन्याचीं नाणीं पाडण्याच्या कामगिरीपुरती मुंबईची टांकसाळ ही ब्रिटिश टांकसाळीची शाखा आहे असें समजलें जावें अशी अट घालण्यांत आली होती. महायुद्धाच्या काळांतील विशिष्ट परिस्थितीमुळें ही व्यवस्था झाली असल्यानें ती लवकरच बंद केली गेली. ह्या अपवादात्मक काळात २१ लाख मोहरा व १२॥ लाख सॉव्हरिन हिंदुस्थानात पाडले गेले. हिंदुस्थानात सोन्याचें नाणें चालावें किंवा नाहीं हा प्रश्न पुनः पुन्हा विवेचनास निघाल्यानें त्या प्रश्नाचा कायमचा निकाल लागेपर्यंत हिंदी टांकसाळींत सोन्याचें नाणें पाडलें जाणें अशक्य झालें आहे.

**८ सुवर्णपरिमाणास सुवर्णनिधीचा आधारः**—रुपयाची धात्वात्मक किंमत व कायदेशीर दृष्ट्या त्याचें पौंडाशी जोडलेलें प्रमाण ह्यात अंतर असल्यानें व रुपयाचा पुरवठा मर्यादित करून हें प्रमाण कायम राखण्यांत येत असल्यानें टांकसाळींतून पाडलेल्या प्रत्येक रुपयामागें सरकारचा कांही तरी फायदाच होत असे. हा सर्व फायदा स्वतंत्र निधि[१] म्हणून सोन्याच्या स्वरूपात ठेवण्यात यावा व हुंडणावळ १६ पेन्सापेक्षा कमी होण्याची भीति वाटल्यास कायदेशीर भावानें लंडनवर हुंड्या विकण्यास त्या निधीचा उपयोग व्हावा असें फौलर कमिटीनें सुचविलें होतें. परंतु ह्या शिफारशीच्या खऱ्या अर्थासंबंधानें भिन्न मतें उपस्थित झाल्यानें तिच्या अमलबजावणींत सरकारकडून बऱ्याच बाबतींत अतिक्रमण झालें, ह्याचा वर उल्लेख आलेलाच आहे. चेंबरलेन कमिशनपुढें हा प्रश्न आला तेव्हां सुवर्णनिधीचा खरा हेतु कोणता, तो निधि कोणत्या स्वरूपांत—सोनें, चांदी अगर कर्जरोखे—ठेवावा, तो इंग्लंडमध्यें असावा किंवा हिंदुस्थानांत असावा, आणि किती मर्यादेपर्यंत त्याची रक्कम वाढली म्हणजे तो जमविणें बंद करावें ह्या प्रश्नास निर्णायक उत्तरें देणें आवश्यक झालें. निधीतील सोनें विलायतेंत व्याजीं लावलें तर व्याजाच्या रकमेइतका फायदा होईल ह्या आशेनें स्टेट सेक्रेटरींनी तो उपक्रम सुरू केला होता असें सरकारचें म्हणणें होतें. हिंदी लोकांस स्वतःच्या खाजगी व सार्वजनिक भांडवलविषयक गरजा परदेशांत कर्ज उभारून भागवाव्या लागत असतां त्यांच्याचपासून अप्रत्यक्ष करानें उभारलेल्या निधींतील भाग विलायतेंतील मंडळ्यास अगर पेढ्यांस वापरण्यास सांपडावा एवढेंच नव्हे तर कर्जरोख्यांचे भाव प्रमाणाखाली उतरल्यानें हिंदुस्थानास निव्वळ खोट लागण्याचा प्रसंग यावा हें सर्वस्वी असमर्थनीय आहे असें सुशिक्षित हिंदी लोकमत होतें.

---

१ गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह.

तसेंच, ह्या शिलकी सुवर्णनिधीतील पैसा सरकारनें आगागाड्याच्या धंद्यांत भांडवल म्हणून गुंतविला हेंही गैर झालें व हुंडणावळीच्या स्थिरतेस त्यापासून धोका येईल अशी पुष्कळांकडून साधार टीका झाली. १९०७-८ साली दुष्काळ पडल्यानें अंतर्राष्ट्रीय व्यापाराचा आढावा हिंदुस्थानास प्रतिकूल झाला व परदेशांतून येणाऱ्या मालाच्या मोबदला येथून सोनें पाठविणें आवश्यक झालें. ह्याच वेळी अमेरिकेतही व्यापारी अरिष्ट कोसळून सोन्याची सर्वत्र टंचाई झाली. अशा वेळी हुंडणावळीचा दर उतरण्याची भीति वाटूं लागताच कायदेशीर हुंडणावळ स्थिर ठेवण्यास रुपयास १६ पेन्स ह्या भावानें येथून विलायतेस हुंड्या विकणें हिंदुस्थानसरकारास भाग पडलें. ८० लाख पौंड किंमतीच्या हुंड्या विकून ह्या अरिष्टांतून सरकार कसें बसें बाहेर पडलें, तरी सुवर्णनिधीच्या बाबतीत पुष्कळच सावधगिरी बाळगिली पाहिजे हें सरकारास त्या अनुभवावरून दिसून आलें. महाप्रयासानें का होईना परंतु एवढ्या अरिष्टांतही सरकारास हुंडणावळीचा कायदेशीर दर कायम ठेवता आला हे सुवर्णपरिवर्तनपद्धतीच्या चांगुलपणाचेंच चिन्ह होय, असें चेंबरलेन कमिशनास सहजच म्हणता आलें.

सुवर्णनिधीतील शिलकेचा मुख्य उपयोग हुंडणावळ स्थिर ठेवणें, म्हणजे ती १६ पेन्साच्या खालीं न जाऊं देणें हा आहे, व ज्याअर्थी लंडनवर सोन्याच्या हुंड्या विकून व प्रत्यक्ष सोनें तेथेंच मोकळें करून हा उद्देश सफल होणार आहे त्याअर्थी ह्या निधीतील पुष्कळसा भाग विलायतेंत ठेवणेंच आवश्यक आहे असें चेंबरलेन कमिशनचें मत पडलें. मात्र तेथेंही कर्जरोख्यांत पैसे गुंतविण्याचें मान कमी करावें व आणखी पुष्कळ वर्षें रुपये पाडण्यापासून होणारा फायदा ह्या निधीत घातला जावा असाही त्या कमिशननें सल्ला दिला. सुवर्णनिधीतील कांहीं कर्जरोखे व सर्व रुपये नोटांस तारण असलेल्या निधीत घालून त्या निधीतील सोनें सुवर्णनिधीत आणावें, म्हणजे एक कोटी पौंड ऐनजिनसी सोनें तावडतोब उपलब्ध होईल व पुढें तें दीड कोटी पौंड होईपर्यंत त्या निधीत सोनेंच घातलें जावें असा कमिशननें निकाल दिला. दीड कोटी पौंडांपेक्षा अधिक रक्कमेचें सोनें सुवर्णनिधीत सांठलें म्हणजे एकंदर निधीचा निम्मा भाग सोन्याच्या स्वरूपांत ठेवण्याची सरकारनें व्यवस्था करावी अशीही शिफारस करण्यांत आली. निधीतील सर्व रक्कम लंडन येथें सांठवून हिंदुस्थानांत रुपयास १ शि ३$\frac{२९}{३२}$ पेन्स ह्या भावानें वाटेल तेव्हां हुंड्या विकण्यास आपण तयार आहों असें सरकारनें जाहीर करावें असें कमिशननें सुचविलें होतें. चेंबरलेन कमिशनच्या शिफारसी अमलांत आणण्याचा काळ हा महायुद्धाच्या सुरुवातीचाच काळ होय. त्यावेळीं सरकारास स्वतःचा खर्च भागविण्यास व स्टेट सेक्रेटरीनें विकलेल्या हुंड्या वटविण्यास रुपयाची फार जरूर भासूं लागली. म्हणून सुवर्णनिधीचा हिंदुस्थानांत रुपयांच्या स्वरूपांत जो भाग ठेवलेला होता तो सरकारी शिलकेस कर्ज म्हणून

घेण्यांत आला. ह्याच वेळेस हिंदी टांकसाळीत पुष्कळ रुपयेही पाडले गेले, त्यामुळे आपोआप सुवर्णनिधीची रक्कम फुगत चालली. १९१७–१८ च्या अखेरीस निधीतील एकदर रक्कम ३४३.१ लक्ष पौंड होती व ती सर्व कमीअधिक मुदतीनें विलायतेंत व्याजी लावलेली होती. कर्जावरील व्याजानें ही रक्कम हळुहळू फुगत जाऊन ती लवकरच ४०० लक्ष पौंडावर गेली. ह्यांतील बराचसा भाग ब्रिटिश सरकारच्या कमी मुदतीच्या कर्जरोख्यांत गुंतविलेला होता. १९२० सालच्या एका कायद्यानें सुवर्णनिधीतील ४०० लक्ष पौंडावरील रक्कम नोटास तारण असलेल्या निधीत घालावी असें ठरविलें. १९२३ सालापासून सुवर्णनिधीतील कर्जरोख्यांचें व्याज सरकारच्या प्रतिवार्षिक उत्पन्नातच जमा करण्यात येत आहे. हिंदी लोकाना हवीशी वाटेल ती चलनपद्धति त्यास द्यावी असे एका बाजूनें म्हणून उलट सुवर्णचलन हिंदुस्थानात चालू करण्याची आवश्यकता नाही असें आपलें मत चेंबरलेन कमिशननें दिलें होतें. सुवर्णपरिवर्तनपद्धति हीच हिंदीचलनविषयक धोरणाचें उद्दिष्ट असावें असें ठरल्यानें सुवर्णनिधीस फारच महत्त्व आलें. तरी सुवर्णनिधीचें मुख्य काम हुंडणावळ १६ पेन्सापेक्षां **कमी** होऊं न देणें हेंच होय असें चेंबरलेन कमिशनला वाटले असल्यास, त्या वेळचे सोनें व चांदी ह्यांचे परस्पर भाव ध्यानात घेतां, आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

महायुद्धाच्या अपूर्व परिस्थितीमुळे चांदीचा भाव प्रमाणाबाहेर वाढून हुंडणावळ सोळा पेन्साहून पुष्कळच अधिक झाली व कायदेशीर दर कायम ठेवावयाचा तर १६ पेन्सास रुपया ह्या भावानें हिंदुस्थानांत जरूर तेवढे रुपये पुरविणें सरकारास भाग पडलें. चांदीचा पुरवठा मर्यादित असल्यानें व बाजारात रुपयांची ऐन जिनसी किंमत १६ पेन्सांहून पुष्कळच अधिक असतां त्या भावानें रुपये विकण्यात सरकारचा तोटा असल्यानें हुंडणावळ स्थिर ठेवण्याचा प्रयत्न सरकारास सोडून द्यावा लागला. हुंडणावळीत अपूर्व वाढ होऊन सुवर्णपरिवर्तनपद्धतीचा हिंदुस्थानसरकारास त्याग करावा लागला ह्याबद्दल चेंबरलेन कमिशनास फारसा दोष देता येणार नाही. परंतु नोटा व रुपये ह्याच्या मोबदला सोन्याचें नाणें मिळण्याचें आश्वासन नसेल तर चलनपद्धतीवर लोकांचा विश्वास बसावयाचा नाही व सोन्याची नाणी व्यवहारातून नाहीशी होऊन विनळविली अगर अनुत्पादकपणे साठविली जातील हे कमि-

१. ३१ मार्च १९२८ रोजी सुवर्णनिधीत पुढीलप्रमाणे रोख रकमा, सोनें व कर्जरोखे ह्याचा अंतर्भाव झालेला होता, व सर्व निधी अर्थात् विलायतेंत होता.

| | |
|---|---|
| १ पौंडाचे कर्जरोखे | ३७,८४३,६३८ पौंड. |
| २ सोनें | २,१५२,३३४ पौंड. |
| ३ बँक ऑफ इंग्लंडजवळ रोख | ४,०२८ पौंड. |
| एकूण | ४०,०००,००० पौंड. |

शनास कळलें नसतें असें नाही. कमिशनच्या म्हणण्याप्रमाणें जर लोकांस सोन्याचें नाणें वापरण्याची इच्छाच नव्हती तर नोटा व रुपये ह्यांच्या मोबदला सोन्याचें नाणें मिळण्याची व्यवस्था केल्यानें सरकारजवळील सोन्याचा निधि फारसा कमी होण्याची भीति वाटण्याचें कारण नव्हतें. उलट, लोकांची इच्छाच सोन्याचें नाणें आपणांस हवें अशी असल्यास, लोकांस हवे तें नाणें त्यांस द्यावें, ह्या कमिशनच्या आदेशाप्रमाणें सोन्याचें नाणें पाडण्यास व चालू करण्यास हरकत नव्हती. हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें चालू केलें तर सरकारी निधींतील सोन्याचा पुरवठा कमी होईल ह्या भीतीस फारसा आधार नाही. उलट, सोन्याचें नाणें चालू झाल्याने लहान मोठ्या पेढ्यांच्या जवळ सोन्याचा मुबलक पुरवठा होऊन सरकारी निधीस परराष्ट्रीय हुंडणावळ स्थिर ठेवण्यास त्याची मदतच होईल.

**९ हिंदुस्थानांतील नोटाः**—महायुद्धाच्या वेळी सरकारास चलनाची तूट पडल्यानें व लोकांसही अर्वाचीन विनिमयसाधनाची वाढत्या प्रमाणांत ओळख होऊं लागल्यानें अलीकडे हिंदुस्थानात नोटाचा पुष्कळच प्रसार झालेला आहे. नोटांच्या मोबदला रोख रुपये देण्याची व्यवस्था सार्वत्रिक व सोपी करण्याकडे सरकारची प्रवृत्ति असल्यानें लोकांचा नोटाबद्दलचा प्रतिकूल पूर्वग्रह पुष्कळ कमी होत आहे. तरी खेड्यापाड्यांतील व्यवहार सरासरीनें अल्प किमतीचे असल्यामुळे व थोड्या अंशीं लोकांच्या अज्ञानामुळे शहराबाहेर नोटाचा प्रसार अजूनही कमीच आहे. सन १८६१ पर्यंत सरकारी अगर पेढीच्या नोटा कायदेशीर चलन ह्या नात्यानें अस्तित्वांत नव्हत्या. मुंबई, मद्रास व बंगाल ह्या प्रांतांतील त्या त्या नावाच्या बँकास सरकारनें नोटा काढण्याची परवानगी कांही अटींवर दिलेली होती व त्याच्यापूर्वी इतरही कांही पेढ्या स्वतःच्या नोटा काढीत. परंतु ह्यापैकीं कोणत्याच नोटा कायदेशीर चलन म्हणून समजल्या जात नसत. १८६१साली एका स्वतंत्र सरकारी खात्यामार्फत कायदेशीर चलन म्हणून नोटा काढण्याचें ठरवून सरकारनें सर्व खाजगी पेढ्यांचा नोटा काढण्याचा हक्क रद्द केला. विशिष्ट रकमेच्या मर्यादेपर्यंत बिन तारणाच्या नोटा काढण्याची परवानगी देऊन त्या मर्यादेपलीकडे जेवढ्या नोटा काढावयाच्या असतील तेवढ्यांच्या पूर्ण किंमतीचें सोनें व नाणें तारण म्हणून जवळ बाळगण्याचें बँक ऑफ इंग्लंडच्या नोटा काढण्याच्या खात्याचे उदाहरण पुढें ठेवून हिंदुस्थानसरकारनें आपलें नोटांबद्दलचें धोरण आंखण्याचें ठरविलें. कमीत कमी नोटीची किंमत दहा रुपये असावी व चार कोटींच्यावर सर्व नोटांस पूर्णपणे सोन्याचांदीचें तारण असावें असें कायद्यानें ठरविण्यांत आलें. ही चार कोट रुपयांची मर्यादाही अधिकांत अधिक म्हणून ठरविलेली असून त्यापेक्षां विवक्षित कमी मर्यादा स्टेट सेक्रेटरीच्या सल्ल्यावरून हिंदुस्थानसरकारनें वेळोवेळी ठरवावयाची होती. सोन्याचांदीचें तारण नसलेल्या ह्या नोटांबद्दल सरकारी कर्जरोखे तारण म्हणून बाळगलेल्या निधींत ठेवावयाचे होते. देशाचे नोटा काढण्याकरिता अनेक विभाग केलेले असून त्यास सर्कल असें म्हणत. ज्या विभागामधून

नोट काढली असेल त्याच्यांतच तिच्या ऐवजी रोख पैसे मिळण्याचे असत. सरकारनें हळुहळू रोख पैसे देण्याची व्यवस्था सर्व देशभर केल्यानें नोटा अधिक लोकप्रिय होऊं लागल्या असें वर सांगितलेंच आहे. प्रारंभीं नोटांचा प्रसार किती कमी होता व त्यांस तारण असलेल्या निधीची घटना कशी होती हें १८६३ च्या डिसेंबर-मधील पुढील आंकड्यांवरून दिसेल. काढलेल्या नोटांची एकंदर किंमत ५,११,००,००० रुपये होती व त्यांबद्दल पुढीलप्रमाणें तारण ठेवलेलें होतें.

| | रुपये. |
|---|---|
| चांदीच्या नाण्याची शिल्लक | १,९३,२२,८६८ |
| चांदीच्या लगडीची शिल्लक | १,१७,००,००० |
| सरकारी कर्जरोखे | २,७७,००,१३२ |
| एकूण | ५,११,००,००० |

सोन्याचांदीच्या तारणाखेरीज कर्जरोख्यांसारख्या इतर कागदी तारणावर काढावयाच्या नोटांची कमाल किंमत कायद्यानें मर्यादित केलेली असली तर चलनपद्धति बरीच सदोष होते व ज्यावेळी कागदी चलनाची विशेष आवश्यकता असावयाची त्याच वेळीं सोन्या–चांदीचें तारण उपलब्ध नसल्यानें नोटा काढणें अशक्य होतें.[१] हाच अनुभव हिंदुस्थानांतही वारंवार आला असून कागदी तारणावरील नोटांच्या किंमतीची मर्यादा निरनिराळ्या वेळीं चढविण्यांत येऊन कागदी तारणापैकीही हिंदुस्थानांत किती भाग गुंतवावा व इंग्लंडमध्यें किती गुंतवावा हे ठरविण्यांत आलें. चेंबरलेन कमिशनची चौकशी सुरू झाली त्यावेळी, म्हणजे ३१ मार्च १९१३ रोजी, काढलेल्या नोटांची एकंदर किमत ६९ कोटी रुपये असून त्यास १४ कोटी रुपयांच्या कर्जरोख्यांचें व ५५ कोटी रुपयांच्या चांदी-सोन्याचें तारण होतें. कर्जरोख्याच्या तारणाबाबतची ही मर्यादाही क्रमाक्रमानेंच वाढली होती हें खालील आंकड्यावरून ध्यानात येईलः—

## कागदी तारणावरील नोटांची कमाल मर्यादा

( आंकडे कोट रुपयाचे आहेत )

| | हिंदुस्थान सरकारचे कर्जरोखे | इंग्लिश सरकारचे कर्जरोखे | एकूण |
|---|---|---|---|
| १८६१ | ४ | ० | ४ |
| १८७१ | ६ | ० | ६ |
| १८९० | ८ | ० | ८ |
| १८९६ | १० | ० | १० |
| १९०५ | १० | २ | १२ |
| १९११ | १० | ४ | १४ |

१ मागें पानें ७४--७७ पहा.

महायुद्धाच्या काळांत फार मोठ्या प्रमाणावर नोटा काढणें आवश्यक होऊन सोनें व चांदी ह्या दोहोंचीही टंचाई पडल्यानें व ब्रिटिश सरकारास हिंदुस्थानसरकारचें देणें झाल्यानें कागदी तारणावरील नोटांच्या किंमतीची मर्यादा एकेकाळीं १२० कोटी रुपयांपर्यंत वाढविली गेली व त्यातील बहुतेक सर्व भाग ब्रिटिश सरकारच्या अल्प मुदतीच्या कर्जरोख्यांत गुंतविला गेला. महायुद्धापूर्वीच्या पांच वर्षांत सरासरीनें कागदी तारणाचें एकंदर नोटांच्या किंमतीशीं प्रमाण शेंकडा २२ असें होतें. तें हळूहळू वाढत जाऊन १९१६ सालीं २९, १९१७ साली ५६, १९१८ साली ६२ व १९१९ सालीं ६५ असें झालें. कागदी तारणाची कायदेशीर व कायमची मर्यादा १४ कोटी हीच असून तात्पुरता उपाय म्हणून वाढत्या चलनविषयक गरजा भागविण्यास ती मर्यादा कमकशी वाढविली गेली हे पुढील आंकड्यांवरून दिसेलः--

## नोटांचें कागदी तारण

( आंकडे कोट रुपयांचे आहेत )

| | कायम मर्यादा | तात्पुरती मर्यादा | एकूण |
|---|---|---|---|
| १९११ | १४ | ० | १४ |
| १९१५ | १४ | ६ | २० |
| १९१६ | १४ | १२ | २६ |
| १९१७ | १४ | ३६ | ५० |
| १९१७ | १४ | ४८ | ६२ |
| १९१८ | १४ | ७२ | ८६ |
| १९१९ | १४ | ८६ | १०० |
| १९१९ | २० | १०० | १२० |

१९१४ सालापासून आजतागाईत नोटांच्या एकंदर किंमतीत कसकशी वाढ होत गेली व त्यांस ठेवलेल्या निरनिराळ्या स्वरूपाच्या तारणांचें एकंदर किंमतीशीं प्रमाण काय होतें हें पुढील कोष्टकांत स्पष्ट केलें आहेः—

## नोटांचा तारण-निधी.

| तारीख | काढलेल्या नोटांची एकूण किंमत (आंकडे कोट रुपयांचे आहेत.) | तारणाचा प्रकार. ( आंकडे कोट रुपयाचे आहेत ) | | | एकूण निधीशीं चांदीचें शेकडाप्रमाण | सोन्याचांदीची एकूण काढलेल्या नोटांच्या किंमतीशीं शेकडाप्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | चांदी व चांदीचें नाणें | सोनें व सोन्याचें नाणें | कर्जरोखे | | |
| ३१ मार्च १९१४ | ६६·१ | २०·५ | ३१·५ | १४·० | ३१ | ७८·० |
| ,, ,, १९१५ | ६१·६ | ३२·३ | १५·२ | २०·० | ५२ | ७७·३ |
| ,, ,, १९१६ | ६७·७३ | २३·५ | २४·१ | २०·० | ३५ | ७०·५ |
| ,, ,, १९१७ | ८६·३८ | १९·२ | १८·६ | ४८·४ | २२ | ४३·९ |
| ,, ,, १९१८ | ९९·७९ | १०·७ | २७·५ | ६१·४ | ११ | ३८·४ |
| ,, ,, १९१९ | १५३·४ | ३७·८ | १७·४ | ९८·० | २४ | ३५·६ |
| ,, ,, १९२० | १७४·५ | ३९·८ | ४७·७ | ८६·८ | २३ | ५०·० |
| ,, ,, १९२१ | १६६·१ | ६५·५ | २४·१ | ७६·४ | ३९ | ५४·२ |
| ,, ,, १९२२ | १७४·७ | ७७·४ | २४·३ | ७०·९ | ४४ | ५८·२ |
| ,, ,, १९२३ | १७४·७ | ८७·४ | २४·३ | ६३·३ | ५० | ६३·० |
| ,, ,, १९२४ | १८०·८ | ८८·० | २२·३ | ८३·५ | ४३ | ६५·० |
| ७ जून १९२५ | १७३·७ | ७४·१ | २२·३ | ७७·१ | ४३ | ५५·५ |
| ,, ,, १९२६ | १९३·३ | ८५·० | २२·३ | ८६·१ | ४४·० | ५५·४ |
| ३१ मार्च १९२७ | १८४·१ | १०४·५ | २२·३२ | ५७·३ | ५७·० | ६८·९ |
| ,, ,, १९२८ | १८४·९ | १०६·४ | २९·७६ | ४८·७३ | ५७·० | ७३·७ |
| १५ ऑग १९२९ | १८६·९ | १०५·५ | ३२·२ | ४५·० | ५६·४ | ७५·९ |

नोटास तारण म्हणून ठेवलेल्या निधीचा उपयोग नोटांच्या मोबदला रुपये देण्याकरिता करावयाचा असल्यानें पुष्कळ वर्षें ह्या निधीची सर्व रक्कम चांदीच्या अगर रुपयांच्या स्वरूपात हिंदुस्थानातच वाळगिली जाई. परंतु १८९८ साली पहिल्या प्रथम लंडनमध्यें ह्या निधीचा काही भाग ठेवण्यात येऊन त्याचा रुपये पाडण्याकरिता चांदी विकत घेण्याकडे अगर हुंडणावळ खाली जाऊ लागली असतां लंडनवर विकल्या जाणाऱ्या सोन्याच्या हुंड्या वटविण्याकडे विनियोग करण्याचा उपक्रम झाला. हा उपक्रम त्यावेळी हंगामी स्वरूपाचा म्हणून केला होता, परंतु १९०२ साली लंडनमध्यें ठेवलेल्या सोन्याच्या तारणावर येथें नोटा काढण्याचा प्रघात कायमचा कायदेशीर ठरविण्यात येऊन, स्टेट सेक्रेटरीस ब्रिटिश व्यापाऱ्याकडून सोनें घेऊन त्याबद्दल हिंदुस्थानसरकारवर हुंड्या विकणें व नोटास तारण असलेल्या निधीतून त्या येथें वटविणें शक्य झालें. तसेंच, लंडनहून हिंदुस्थानास येत असलेलें सोनें व चांदी ही समुद्रावर असल्यानें

सरकारच्या प्रत्यक्ष ताब्यात आली नसतांनाही त्यांस तारणनिधीचा भाग समजण्याचा व त्यांच्या आधारावर नोटा काढण्याचा प्रघात पडला. ज्या निधीचें मुख्य काम हिंदी तिजोऱ्यांत नोटा घेऊन त्यामोबदला रुपये मिळण्यास साहाय्य करणें हें होतें, त्या निधींतील बरीच मोठी रक्कम लंडन येथील पेढ्यांत गुंतली जावी व हुंडणावळ स्थिर ठेवण्याच्या, म्हणजे ती खाली जाऊं न देण्याच्या, ज्या कामाकरितां स्वतंत्र सुवर्णनिधि अस्तित्वांत होता, त्या कामीं खर्च व्हावी याबद्दल सरकारवर पुष्कळ टीका करण्यांत आली. रुपये पाडण्यास चांदी विकत घ्यावयाचीच तर ती हिंदुस्थानांतच मुंबईसारख्या पेठेंत घ्यावी म्हणजे निधी जाग्यावर राहून शिवाय स्वदेशी व्यापाऱ्यांस उत्तेजन दिल्यासारखे होईल असेंही सुचविण्यांत आलें. परंतु ब्रिटिश धंदेवाल्यांच्या तंत्रानें चालणाऱ्या व लंडनच्या पेढ्या व सोन्याचांदीचे व्यापारी ह्यांजबद्दल हिंदी राष्ट्राच्या हितसंबंधाहून अधिक कळकळ बाळगणाऱ्या स्टेट सेक्रेटरींनीं असल्या टीकेकडे अगर सूचनांकडे फारसें लक्ष्य दिलें नाहीं.

**१० तारणासंबंधीच्या कायद्यांत सुधारणा**—काढलेल्या नोटांस कर्जरोख्यांचें तारण ठेवावयाचें तें शक्य तितकें कमी प्रमाणांत ठेवून होतां होईल तों चांदी व सोनें ह्यांचें तारणनिधींतील प्रमाण वाढतें ठेवावें ह्या सावधगिरीच्या चलनविषयक धोरणाचें हिंदुस्थानसरकारनें जाणूनबुजून अवलंबन केलें होतें हें वर सांगितलेंच आहे. परंतु ह्या पद्धतीमुळें चलनाचें परिमाण गरजांच्या मानानें मर्यादित होतें असा वारंवार अनुभव ह्या व इतर देशांत आलेला आहे. इंग्लंडमध्यें हीच पद्धत अस्तित्वांत आहे व तेथील लोक चेकच्या साहाय्यानें आपल्या बहुतेक देवघेवी करतात; तरी तेथेंही विशेष अडचणीच्या काळांत हा कायदा तात्पुरता गुंडाळून ठेवून सरकारी कर्जरोख्यांच्या तारणावर ज्याचें रोख धात्वात्मक चलनांत परिवर्तन होऊं शकत नाहीं अशा, म्हणजे अपरिवर्तनीय, नोटा काढण्यास बँकेस परवानगी द्यावी लागते. काढलेल्या नोटांच्या एकंदर किंमतीच्या ठराविक शेंकडेवारीहून अधिक किंमतीचें तारण कर्जरोख्यांच्या स्वरूपांत ठेवलें जाऊं नये, किंवा सोन्याचांदीच्या तारणाचें एकंदर नोटांच्या किंमतीशीं असलेलें प्रमाण ठराविक शेंकडेवारीहून कमी होऊं नये अशा दिशांनीं कायद्यांत सुधारणा केल्यास कागदी चलनाच्या परिमाणांत एक प्रकारचा लवचिकपणा येऊन अपरिवर्तनीय कागदी पैसा काढावा लागण्याचे प्रसंग टळतील, असें कित्येक लोकांचें म्हणणें आहे. चेंबरलेन कमिशनचें मत ह्या सुधारणावाद्यांस अनुकूल होतें व तारणनिधींतील कर्जरोख्यांची मर्यादा १४ कोटींवरून २० कोटींवर न्यावी व नेहमीं सरकारनें आपल्या शिलकी खजिन्यांत जेवढ्या किंमतीच्या नोटा असतील त्या रकमेंत लोकांच्या हातांत व सामान्य खजिन्यांत असलेल्या नोटांच्या किंमतीचा ⅓ भाग मिळवून येणाऱ्या बेरजेइतक्या किंमतीचे कर्जरोखे तारणनिधींत ठेवण्यास हरकत नाहीं, अशी त्यानें शिफारस

केली. १९१९-२० सालच्या बॅबिंगटन[1] स्मिथ कमिटीनेंही ह्याच लवचिकपणाच्या धोरणास संमति देऊन काढलेल्या नोटांच्या एकंदर किमतीचा शेंकडा ४० एवढाच भाग सोन्याचांदीच्या स्वरूपांत ठेवण्याची कायद्यानें सक्ती करावी असें आपलें मन दिलें. नोटास तारण किती व कसें ठेवावें ह्याबद्दलच्या कायद्यांत लवचिकपणा असणें आवश्यक आहे, हें मत बॅबिंगटन स्मिथ कमिटीला एवढें पटलें होतें की कर्जरोखेही लांब लांब मुदतीचे न घेतां कमी मुदतीचे घ्यावे असें तिनें सुचविलें. शिवाय, बँक ऑफ इंग्लंडचें सावधगिरीचें धोरण सर्वस्वी सोडून देऊन प्रसंगविशेषीं चलनाची विशेष टंचाई आल्यास पांच कोटी रुपयांपर्यंत व्यापारी हुंड्याचें तारण ठेवूनही नोटा काढण्यात याव्या असा स्मिथ कमिटीनें सल्ला दिला. चांदी विकत घेण्यास जरूर तेव्हा व आवश्यक तेवढें सोनें लंडन येथें ठेवून तारण निधीचा बाकी सर्व भाग हिंदुस्थानातच रहावा असाही ह्याच कमिटीनें निकाल दिला. व्यापारी हुंड्यांच्या तारणावर चलनाची विशिष्ट मर्यादेपर्यंत टंचाई झाली असता नोटा काढण्यास १९२२ सालापासून सुरुवात झाली व पुढें अशा नोटांची अधिकांत अधिक किंमत बारा कोटींवर नेण्यात आली. नोटास तारण असलेल्या निधीबद्दल इतरही कायम स्वरूपाच्या कायदेशीर व्यवस्था करण्यात आल्या. स्टेट सेक्रेटरीनें ह्या निधीतले पांच कोटी रुपयांपेक्षा अधिक किंमतीचें सोनें आपल्याजवळ ठेवूं नये व ह्या निधीकरता विलायतेंत कर्जरोखे घ्यावयाचे तेही एक वर्षापेक्षा अधिक मुदतीचे घेऊ नयेत असा कायदा करण्यांत आला. हिंदुस्थानसरकारच्या कर्जरोख्यांची अधिकांत अधिक मर्यादा वीस कोटी रुपये आहे, त्यापैकीं बारा कोटीपेक्षां अधिक किमतीचे कर्जरोखे निव्वळ नामधारी म्हणजे हिंदुस्थानसरकारनें मुद्दाम काढून चलन खात्याच्या हवाली केलेले, नसावे असेंही कायदेशीर बंधन घालण्यात आलें. सरकारजवळील सोन्याचांदीचें प्रमाण काढलेल्या नोटांच्या किंमतीच्या निम्म्याहून कमी होत असेल तर अधिक नोटा काढूच नयेत असाही कायदा करण्यांत आला. स्वतःच्याच प्रॉमिसरी नोटा कागदी तारण म्हणून ठेवावयाची पद्धत युद्धाच्या व त्यानंतरच्या काळांत सर्वच देशांत व हिंदुस्थानातही फार मोठ्या प्रमाणावर पडली होती. परिस्थितीप्रमाणें तिच्यात कमी-अधिक फेरबदल करणारे कायदे त्या काळात केले गेले. परंतु व्यापारधंदा व सरकारची सांपत्तिक स्थिति ह्यांत स्थिरस्थावर झाल्यापासून वरील कायम स्वरूपाची कायदेशीर व्यवस्था करण्यांत आली.

**११ नोटांचा प्रसार**--हिंदुस्थानातील चलनी नोटा म्हणजे तावडतोब दर्शनी किंमतीइतके रोख रुपये देण्याचें वचन देणाऱ्या सरकारी प्रॉमिसरी नोटाच होत ५, १०, ५०, १००, १००० व १०,००० रुपये दर्शनी किंमतीच्या नोटा हिंदुस्थानसरकार काढतें. ह्या नोटा देशाच्या सात निरनिराळ्या विभागांत काढलेल्या असतात. हल्लीं १०० रुपये व त्याहून कमी किमतीच्या नोटा

१ ह्या कमिटीच्या इतर सूचनांचा विचार पुढें केला आहे.

वाटेल त्या विभागांत वटविता येतात. परंतु पूर्वी कलकत्ता, कानपूर, लाहोर, मुंबई, कराची, मद्रास व रंगून येथून काढलेल्या नोटांच्या मोबदला फक्त तेथील चलनी कचेऱ्यांतूनच रोख पैसे मिळत. हल्लींही १००० व १०,००० रुपयांच्या नोटा ज्या ठिकाणच्या असतील त्या ठिकाणांतच वटविण्याची सरकारवर कायदेशीर जबाबदारी आहे. महायुद्धाच्या काळात चलनास असलेली मागणी वाढून चांदीचा पुरवठा अपुरा झाला. ही अडचण दूर करण्यास सरकारने जे अनेक उपाय योजले त्यांपैकीच एक रुपयाच्या व अडीच रुपयाच्या नोटा काढणें हा एक होता. १९१९ सालच्या ३१ मार्च रोजीं ह्या नोटांची एकंदर किंमत अनुक्रमें १०॥ व १॥। कोट रुपये होती. युद्धकालीन विशिष्ट परिस्थिति नाहीशी झाल्यावर ह्या नोटा रद्द करण्यांत आल्या. हिंदुस्थानसरकारच्या एकंदर खर्चांत काटकसर करण्याचे मार्ग सुचविण्याकरिता नेमलेल्या इंचकेप कमिटीनें एक रुपयाच्या नोटा छापण्यास सरकारास फार खर्च येतो म्हणून त्या काढणें बंद करावें असें सुचविलें होतें. परंतु हिल्टन[१] यंग कमिशनची अशी शिफारस आहे की, एक रुपयाची नोट पुन्हा सुरू करावी, मात्र तिचे रुपया या नाण्यांत परिवर्तन करून घेण्याची सरकारवर जबाबदारी असूं नये. कागदी चलनाचा खेडेगावांत व लहान शहरांत हल्लींहून अधिक प्रसार होण्यास पांच रुपयाहून कमी किंमतीची एखादी तरी नोट असणें आवश्यक आहे असें पुष्कळ बिनसरकारी लोकांचेंही म्हणणें आहे. गेल्या वीस वर्षांत नोटांचा प्रसार किती वाढला आहे ह्याचें स्थूल दिग्दर्शन पुढील आंकड्यांवरून होईल:—

( आंकडे कोट रुपयांचे आहेत )

| | काढलेल्या एकंदर नोटांची किंमत | बिनसरकारी इसमांच्या हातांत असलेल्या नोटांची किंमत | इम्पीरियल बँकेखेरीज इतर खाजगी लोकांच्या हातांतील नोटांची किंमत. |
|---|---|---|---|
| १९०४–५ | ३९·२ | — | २८·१ |
| १९१४–१५ | ६४·० | ५६·५ | ४५·४ |
| १९२४–२५ | १७९·२ | १७७·७ | १६०·९ |
| १९२६–२७ | १८९·१ | १८७·९ | १५६·३ |

विवक्षित वर्षांत जेवढ्या नोटा काढल्या असतील, व जेवढ्या किंमतीचे रुपये अगर सॉव्हरिन पाडले अगर परदेशांतून आणले असतील त्यांतून त्यावर्षी सरकारी खजिन्यांत नोटा, रुपये व सॉव्हरिन ह्यांची जेवढी वाढ झाली असेल तेवढी वजा केली म्हणजे राहिलेली शिल्लक ही त्यावर्षी लोकांमध्यें मुरलेल्या चलनाचें परिमाणच

१ ह्या कमिशनच्या चौकशीचा पुढें उल्लेख केला आहे.

होतं. त्याबद्दल पुढें जे आंकडे दिले आहेत त्यावरून निर्गनगळ्या वर्षी चलनास मागणी किती होती व ती कोणत्या प्रकारच्या चलनानें भागली हें दिसेलः—

## मुरलेल्या चलनाचें परिमाण.

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| वर्ष | रुपये १ | नोटा २ | एकूण | सांव्हरिन ३ | १, २, व ३ मिळून बेरीज |
|---|---|---|---|---|---|
| १९०९–१० | १३.२२ | ५.०३ | १८.२५ | ४.३१ | २२.५६ |
| १९११–१२ | ११.५० | ४.४४ | १५.९५ | १३.३३ | २९.२७ |
| १९१३–१४ | —५.३२ | २.६५ | ७.९७ | १८.११ | २६.०८ |
| १९१४–१५ | —६.७० | –६.०१ | –१२.७१ | ८.४४ | —४.२८ |
| १९१६–१७ | ३३.८१ | १३.८९ | ४७.७० | —३.१८ | ५०.८८ |
| १९१८–१९ | ४५.०२ | ४९.२९ | ९४.३१ | —५.८८ | १००.१२ |
| १९१९–२० | २०.०९ | २०.२० | ४०.२९ | —३.३२ | ३६.९७ |
| १९२०–२१ | –२५.६८ | –५.९० | –३१.६८ | —४.३८ | –३५.९६ |
| १९२१–२२ | –१०.४६ | ९.३५ | —१.११ | २.७८ | १.६७ |
| १९२२–२३ | —९.५६ | ३.८७ | —५.६९ | ९.४३ | ३.७४ |
| १९२३–२४ | ७.६२ | ७.९६ | १५.५८ | ६.७४ | २२.३२ |
| १९२४–२५ | ३.६५ | –२.५१ | १.१४ | १४.५३ | १५.६७ |
| १९२५–२६ | —८.१७ | १.१६ | —७.०१ | ११.७ | ४.०६ |
| १९२६–२७ | –१९.७६ | –३.४० | –२३.१६ | ६.२४ | –१६.९२ |

पदार्थांच्या किंमतीतील वाढ, महायुद्धामुळें देवघेवीचें वाढलेलें परिमाण, रुपयाचा तुटवडा झाल्यानें नोटास येणारी चढीची मागणी इत्यादि विशेषाचे, तसेंच, सोन्याच्या नाण्याच्या कमीअधिक प्रसाराचें व मुरलेल्या चलनाच्या एकदर परिमाणाचें वरील आकड्यात चांगलें प्रत्यंतर दिसेल. देवघेवीच्या सोयीमुळें कांहीं नोटांस इतरांपेक्षां मागणी अधिक असते. १० रुपये व १०० रुपये ह्या किंमतीच्या नोटांचा सर्वांत अधिक प्रसार असून ५ रुपये व १००० रुपये किंमतीच्या नोटा त्याहून पुष्कळच कमी लोकप्रिय आहेत. वीस, पन्नास व पांचशें रुपयाच्या नोटाचा प्रसार फारच मर्यादीत आहे.

**१२ चलनविषयक उलाढाली**—इतर देशांतील चलनपद्धतीशी हिंदी चलनपद्धतीची तुलना केल्यास जे महत्त्वाचे फरक दिसून येतात त्यांत हिंदी पद्धत सर्वस्वी सरकारच्या प्रत्यक्ष हुकुमतीखाली आहे ह्या विशेषाचा प्रामुख्यानें अंतर्भाव करावयास पाहिजे. रुपये पाडून व नोटा काढून लोकांस चलन

पुरविणें, विलायतेंत हिंदुस्थानवर हुंड्या विकून अंतर्राष्ट्रीय व्यापारांतील देणीं भागविण्यास मदत करणें, हिंदुस्थानातच निरनिराळ्या भागातील सामान्य तिजोऱ्यांतून व नोटांस तारण म्हणून ठेवलेल्या खास तिजोऱ्यांतून लोकांच्या जरूरीप्रमाणे पैसा इकडे तिकडे हलवणे ह्या सर्व गोष्टी हिंदुस्थानांत सरकारच्या धोरणानें व प्रत्यक्ष हुकमतीनें चलतात. चलनाच्या पुरवठ्याचा व्याजाच्या दराशीं, बाजारभावाशी व आर्थिक परिस्थितीशी अत्यंत निकट संबंध असल्यानं हिंदुस्थानसरकारच्या चलनविषयक उलाढालीचाही हिंदी आर्थिक जीवनावर फारच महत्त्वाचा परिणाम होतो. इतर राष्ट्रात चलनविषयक धोरण सर्वसामान्यपणें सरकार, म्हणजे लोकप्रतिनिधींस जबाबदार असलेले मंडळ, ठरवीत असलें तरी प्रत्यक्ष चलनाच्या उलाढाली खाजगी मध्यवर्ती पेढ्यांच्या हातात असतात. देशातील सर्व धंदे व पेढ्या ह्यांच्या हितसंबंधाची अहर्निश जाणीव असल्यानें मध्यवर्ती पेढ्यांस चलनाचा पुरवठा, कर्ज मिळण्याच्या सोयी, व्याजाचे दर इत्यादि महत्त्वाच्या बाबींचें निःपक्षपातीपणे वेळेवरच नियमन करता येतें. प्रतिवर्षी विलायतेस कराव्या लागणाऱ्या खर्चाची रक्कम निश्चितपणे कशी पाठविता येईल याची हिंदुस्थानसरकारास प्रथम काळजी असते, त्यानंतर हिंदुस्थानाचा परराष्ट्रांशी जो व्यापार चालतो त्यास आवश्यक असलेल्या चलनाचा पुरवठा समाधानकारक असावा अशी सरकार खटपट करणार. ह्या दोन्ही हितसंबंधास जुळेल असे चलनविषयक धोरण वेळोवेळी अवलंबिण्याचा हिंदुस्थानसरकारचा प्रघात असल्यानें सामान्य नागरिक व धंदेवाले यांच्या सामुदायिक गरजांचा स्वतंत्रपणें विचार होत नाही. सरकारच्या चलनविषयक धोरणामुळे प्रजाजनावर अप्रत्यक्षपणे जबर कर लादले गेल्याचीं व अनेक महत्त्वाच्या धंदेवाल्यास नुकसान आल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. ह्यास्तव, चलनपद्धति तात्त्विक दृष्ट्या कोणतीही असली तरी तिचा व्यवहारात कारभार करण्याचें काम एखाद्या स्वतंत्र संस्थेच्या हातात असणें आवश्यक आहे. ह्या मतास अनुसरून चलनविषयक व पेढ्यासंबंधीच्या कांहीं सुधारणा अलीकडे सुचविल्या गेल्या आहेत, त्याचा ह्या व पुढील दोन प्रकरणात अधिक उल्लेख केलेला आहे.

इंपीरियल बँकेस सरकारचा पूर्ण आधार असून ज्या ठिकाणीं ह्या बँकेच्या शाखा आहेत तेथें सरकारी खजिने सहसा ठेवले जात नाहीत, व पैसे पाठविणें, सरकारी देणेंघेणें करणें, नोटा वटविणें इत्यादि कामें बँकेकडूनच होतात. नोटा वटविण्याकरितां मुद्दाम निरनिराळ्या ठिकाणीं ठेवलेल्या तिजोरींतून बँकेस जरूर लागेल तेव्हां बिनखर्चानें पैसे पाठविण्याची सरकारनें व्यवस्था केलेली आहे. सामान्यतः प्रत्येक सरकारी खजिन्यांत नोटांस रोख पैसे देण्याकरितां नोटांच्या स्वतंत्र निधीपैकीं कांहीं रक्कम ठेवलेली असते. एखाद्या तिजोरीत सामान्य खर्चास तूट पडली तरीही ह्या स्वतंत्र रकमेंतून जरूर तेवढे पैसे उचलून दुसऱ्या एखाद्या खजिन्यांत सामान्य

ठेवीतून नोटा वटविण्याकरितां बाजूस काढलेल्या भागात रक्कम टाकली म्हणजे भागते. पैशाची प्रत्यक्षपणें वहातुक न करतां निरनिराळ्या खजिन्यात कागदी हिशेब करून पुष्कळ रकमा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी नेण्याचें काम सहज करतां येतें. निरनिराळ्या ठिकाणच्या खजिन्यांचा पेढ्यांसारखा उपयोग करून खाजगी व्यापाऱ्यांस एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पैसा पाठविण्यास सरकार मदत करतें व दरसाल शें-पाऊणशें कोट रुपायांपर्यंत असला व्यवहार चालतो. सरकारचा पैसा कराच्या व इतर रूपानें जमतो तो देशाच्या निरनिराळ्या भागांतील लहान मोठ्या तिजोऱ्यात होय; उलट, सरकारचें देणें विलायतेत किंवा मोठमोठ्या शहरी पुष्कळ द्यावयाचें असतें. धान्य व कच्चा माल ह्यांचा निर्गत व्यापार मोठ्या प्रमाणावर करणाऱ्याची स्थिति ह्याच्या अगदी उलट असते. त्यांस शेवटी पैसे मिळावयाचे ते इंग्लंडात अगर मुंबई, कराची, रंगून, कलकत्ता, कानपूर, मद्रास, लाहोर, अशा मोठमोठ्या शहरी होय; परंतु ज्या सामान्य शेतकऱ्याकडून अगर उत्पादकाकडून त्यांनी माल घेतलेला असतो त्यांस लहान सहान शहरांत व खेडेगावात पैसे द्यावे लागतात. म्हणून मोठ्या शहरात अगर लंडनमध्ये व्यापाऱ्यांनी पैसे भरले तर हिंदुस्थानांतील लहान लहान गावांतही त्यांच्या प्रतिनिधीस ते मिळण्याची सरकार थोड्या खर्चात व्यवस्था करतें. सरकारची ही कामगिरी मुख्यतः पेढीच्या व्यवहारासारखी आहे व साहजिकच तिचा निरनिराळ्या प्रसंगी व्यापारावर पुष्कळ बरेवाईट परिणाम होतो. आपली चलनविषयक व पेढ्यांच्या व्यवहारासारखी सर्व जबाबदारी हिंदुस्थानसरकारनें एखाद्या निराळ्या संस्थेवर टाकल्यास व्यापारी, धंदेवाले व सामान्य लोक ह्यास सरकारी धोरणामुळें सध्यां अडचण भासते ती भासावयाची नाही. परंतु सरकारनें आपले सर्व लहान मोठे खजिने बंद करण्यापूर्वी देशाच्या सर्व भागात खाजगी पेढ्या निघणें व लोकांस त्यांच्या व्यवहाराची माहिती व संवय होणें आवश्यक आहे.

**१३ महायुद्धाचा हिंदी चलनपद्धतीवर परिणामः**—इंग्लंडचें जर्मनीशीं युद्ध सुरू झालें असें कळताच हिंदुस्थानसरकारच्या शाश्वतीविषयी पुष्कळ लोकांच्या मनांत साशंकता उत्पन्न झाली व पोस्टल सेव्हिंग बँकेंतून आपले पैसे काढण्यास व नोटांच्या मोबदला रोख रुपये मिळविण्यास ते उत्सुक झाले. लोकांच्या ह्या मागण्या भागविण्यास सरकारास पुष्कळच श्रम पडले हें खरें; तरी शेवटीं अशा सर्व मागण्या व्यवस्थितपणें भागल्यानें लोकांचा सरकारच्या चलनविषयक व्यवस्थेवरील विश्वास पूर्ववत् प्रस्थापित झाला. युद्धाचा फुकारा होतांच कांहीं काळ हुंडणावळही १६ पेन्सांच्या खाली गेली होती; परंतु सरकारनें वेळेवर कायदेशीर भावानें हुंड्या विकल्यानें ती स्थिर झाली. युद्ध जसजसें लांबत गेलें तसतसा एकंदरीनें हिंदी लोकांचा कांहीं बाबतींत आर्थिक फायदा होत गेला. युरोपांतील सर्व राष्ट्रें युद्धात गुंतल्यानें त्यांस पूर्वीप्रमाणें मालाचें उत्पादन करणें अशक्य झालें. ग्रेट ब्रिटन, दोस्त राष्ट्रें व अमेरिका,

तसेंच आफ्रिका व आशिया खंडांतील देश ह्याच्यांत हिंदुस्थानाचा माल जाऊं लागला. परदेशी मालाची आयात मात्र त्या मानानें कमी झाली. मागणीतील वाढीमुळें किमतीही वाढल्या. ह्या सर्वांचा परिणाम असा झाला की परकी राष्ट्रांस, विशेषतः इंग्लिश सरकार व इंग्रज व्यापारी ह्यांस हिंदुस्थानसरकार व हिंदी व्यापारी ह्यांचें अतोनात देणें झालें. हे देणें सामान्यतः सोन्याची आयात करून अगर विलायतेंत हिंदुस्थान सरकारवर हुंड्या विकून भागवावयाचें; परंतु सर्व राष्ट्रांनी सोन्याच्या निर्गत व्हातुकीस प्रतिबंध केल्यानें पहिला मार्ग हळूहळू बंद झाला. सोन्याचा सर्व पुरवठा एकत्र करून स्वतःच्या हुकुमतीखाली शिल्लक ठेवण्याचें धोरण सर्व राष्ट्रांनी स्वीकारल्यामुळें त्यांच्या सामान्य चलनविषयक गरजा भागविण्यास त्यांस चांदीची मोठ्या प्रमाणावर जरूर भासूं लागली. अमेरिकेखेरीज इतर सर्व पाश्चात्य राष्ट्रांत सोन्याची देवघेवच बंद होऊन चांदीचे भाव वाढले. महायुद्धाच्या काळांत चांदीचें उत्पादनही पूर्वीपेक्षा कमीच होत होतें. कागदी चलनांत बेसुमार वाढ झाल्यानेंही चांदीचे भाव अधिक चढण्यास मदत झाली. हिंदुस्थानाच्या परदेशी ऋणकोंस हिंदी लोकांचें कर्ज फेडण्यास मदत करण्याकरितां हिंदुस्थानावर हुंड्या विकाव्या तर हिंदुस्थानसरकारजवळही पुरेसे रुपये अगर ते पाडण्यास अवश्यक असलेली चांदी नव्हती. चांदीचा भाव वाढतां वाढतां १९२० साली एका औंसास ८९ पेन्स इतका झाला. भारी दरानें चांदी खरेदी करून स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्या वटविण्याचे हिंदुस्थानसरकारनें शिकस्तीचे प्रयत्न केले परंतु चांदीचा भाव जेव्हां इतका वाढला कीं रुपयांतील चांदीस बाजारांत सोळा पेन्सापेक्षा अधिक किंमत येऊं लागली तेव्हां हुंडणावळ कायम ठेवणें आणि नवीन रुपये पाडणें सरकारास अशक्य झालें.

महायुद्धापूर्वी खाजगी व्यापाराच्या देवघेवींत इतर राष्ट्रांस दरसाल सरासरीनें ७८.३६ कोटी रुपये हिंदुस्थानास द्यावे लागत. महायुद्धाच्या पांच वर्षांतही सरासरीनें प्रतिवर्षी तेवढेच म्हणजे ७६.३१ कोटी रुपये हिंदुस्थानाचें परराष्ट्राकडे येणें निघत असे. मागें चलनाच्या प्रतिवार्षिक वाढीचे आंकडे दिले आहेत त्यावरून युद्धकाळीं किती मोठ्या प्रमाणावर अनेक प्रकारचें चलन लोकांत सुरू झालें हें दिसून येईल. १८९८ पासून सरकारनें जी सुवर्णपरिवर्तन पद्धति येथें स्थापिली होती ती चालू राहण्यास विलायतेंत हिंदुस्थानावर व हिंदुस्थानांत विलायतेवर ठराविक कायदेशीर दरानें अपरिमित रकमेच्या हुंड्या विकतां येणें आवश्यक होतें. परंतु चांदीचा तुटवडा पडून त्या धातूचा भाव वाढल्यानें तसें करणें सरकारास आतां शक्य राहिलें नाहीं. चांदीचा भाव एका औंसास ४४ पेन्स इतका असला तर एका रुपयांतील चांदी बरोबर १६ पेन्सांची असते. परंतु चांदीचा भाव ह्यापेक्षांही वर गेल्यावर व तो एकसारखा वर जाणार हें माहीत असल्यावर सोळा पेन्सांस एक रुपया ह्या भावानें विलायतेंत हुंड्या विकणें नुकसानीचें

होतें. म्हणून जसजसा चांदीचा भाव वाढला तसतसा हुंडणावळीचा दरही स्टेट सेक्रेटरीनें वाढविला. हुंड्यांची एकदर रक्कम शक्य तितकी मर्यादित करून त्या वटविण्यास हिंदुस्थानांत कर्ज उभारणें, स्वतःच्याच प्रॉमिसरी नोटांच्या तारणावर नोटा काढणें, इत्यादि उपाय योजून अंतर्गत कायदेशीर चलन उभें केलें गेलें. परराष्ट्रांस, व विशेषतः इंग्लंडास, हिंदी मालाची जरूर होती तर त्यांनी त्याच्या मोबदला हिंदुस्थानास सोनें पाठविण्यास तयार व्हावें अगर हिंदुस्थानांत आपल्या सरकारच्या पतीवर कर्ज उभारून धनकोचें देणें देऊन टाकावें, असें स्टेट सेक्रेटरीनें म्हटलें असतें व स्वतःच्या गरजा भागविण्यास आवश्यक होतें त्यापेक्षा अधिक किंमतीच्या हुंड्या विकण्याचें नाकबूल केलें असतें तर त्यांत बेकायदेशीर असें काहीच झालें नसतें. अमेरिकन मालाची युरोपांत युद्धकालीं मोठ्या प्रमाणावर आयात होऊन युरोपियन राष्ट्रांस अमेरिकेचें कर्ज झालें तें अमेरिकेस सोनें पाठवून किंवा अमेरिकन नागरिकाकडून कर्ज घेऊनच भागविण्यात आलें होतें. जें अमेरिकेनें केलें तेच हिंदुस्थानासही करतां आलें असतें; व तसें केलें असतें तर सर्व चलनविषयक अडचणी दूर होऊन येथें सुवर्णचलनपद्धति अंमलांत आणणेंही सोपें झालें असतें.

परंतु इंग्लंडास सोन्याची जरूर असतां तें हिंदुस्थानास पाठविण्याची कल्पना साम्राज्य सरकारास रुचली नाही म्हणून म्हणा किंवा सुवर्णपरिवर्तनपद्धतीप्रमाणें कायदेशीर दरानें वाटेल त्या रकमेच्या हुंड्या हिंदुस्थानावर विकण्यास आपण बांधले गेलों आहों असें वाटल्यामुळें म्हणा, स्टेट सेक्रेटरीनें शक्य होतें तोंपर्यंत कायदेशीर दरानें व पुढें वाढत्या दरानें हुंड्या विकणें चालू ठेवलें. ब्रिटिश सरकारचे कमी मुदतीचे कर्जरोखे स्वीकारून त्यांच्या तारणावर नोटा काढून त्याही विलायती हुंड्या वटविण्यास उपयोगात आणल्या गेल्या. रुपये, अधेल्या, सॉव्हरिन व अर्ध-सॉव्हरिन ही नाणीं वितळवून त्यांच्यातील धातु बाजारात विकल्यास त्या नाण्यांच्या किंमतीपेक्षा अधिक किंमत कागदी चलनाच्या स्वरूपात मिळे व तेंही चलन कायदेशीर असल्यानें चांदीसोन्याचें चलन वितळविण्यात लोकांचा फायदा होता. नाणी वितळविण्यास लोकास मुभा ठेवल्यास चलनाची टंचाई अधिकच वाढेल असें वाटून १९१७ च्या जूनमध्यें ही नाणी वितळविणें हा गुन्हा ठरविण्यात आला. त्याच वर्षाच्या सप्टेंबरमध्यें चांदी अगर चांदीचें नाणें परदेशीं पाठविण्यास मनाई करण्यांत आली. जुलै महिन्यातच चांदीची आयात सरकारच्या खास परवानगीशिवाय करतां येणार नाही असें जाहीर झालें होतें. एकच महिना आधी देशांत येणारें सर्व सोनें सरकारनें वेळोवेळी ठरविलेल्या भावानें लोकांनीं सरकारास विकलेंच पाहिजे अशी व्यवस्था केली होती. एक रुपया व अडीच रुपये ह्या रकमांच्या नोटा व आठ, चार, दोन व एक आण्यांची

निकलची नाणी सरकारनें काढली ती ह्याच वेळीं होत. १९१७ साली ११ कोट ६६ लक्ष रुपये किंमतीचें साव्हरिनही गहूं व कापूस ह्यांच्या उत्पादकांस देण्याकरितां पुरविण्यांत आले. परंतु साव्हरिनमधील सोन्याची किंमत त्यावेळीं पंधरा रुपयांहून अधिक असल्यानें ते सर्व लोकांकडून वितळविले गेले असल्यास नवल नाही.

चलनाची टंचाई व चांदीचे रुपये पाडून देण्याची अशक्यता ह्या अडचणी कमी होण्याकरितांच १९१८ मध्यें नव्या मोहरा पाडून त्या व्यापाऱ्यांस देण्यांत आल्या. आगगाडीनें अगर टपालांतून मनी ऑर्डरीशिवाय इतर मार्गानें रोकड पैसा पाठविण्याची बंदी करण्यांत आली तिचा हेतूही सरकारला चलनाचा पुरवठा स्वतःच्या धोरणाप्रमाणें नियमित करतां यावा हा होय. अमेरिकन सरकारकडून चांदी विकत घेऊन तिचेही रुपये पाडण्यांत आले. हे रुपये पाडले तेव्हां सरकारच्या तिजोऱ्यांची स्थिति अगदीं हलाखीची होती. आणखी कांही दिवस अमेरिकन सरकारची चांदी न मिळती तर नोटांच्या मोबदला रुपये देणें बंद करावें लागले असतें. परंतु अमेरिकेंतून क्रमाक्रमानें २० कोटी डॉलर किंमतीची चांदी आल्यानें सरकारी अडचण पुष्कळशी दूर झाली. लोकांस सोनें पाहिजे होतें तें दर पंधरवड्यास बाजारभावापेक्षां कमी दरानें विकून सोन्याचा भाव उतरविण्याची सरकारनें १९१९ ऑगस्टमध्यें खटपट केली व ती बरीच यशस्वीही झाली. परंतु हुंडणावळीचे दर जे वाढविले होते ते खाली आणणें चांदीचे भाव चढीचे असेपर्यंत शक्यच नव्हतें.

**१४ बॅबिंग्टन स्मिथ कमिटीः**—१८९३ पासून १९१५ पर्यंत सुरळीतपणें चाललेली सुवर्णपरिवर्तनपद्धति महायुद्धाच्या काळीं निकामी ठरली. हुंडणावळीचा दर १६ पेन्सावरून ३२ पेन्सांच्याही वर पर्यंत नेण्यांत आला त्यांत बेकायदेशीर असें कांहीच झालें नाही हें खरे असलें तरी सरकारी धोरणाबद्दल लोकांची जी अपेक्षा होती तिच्या विरुद्ध हुंडणावळ वाढविली गेली ह्यांत शंका नाही. चांदीचा भाव वाढल्यानें हुंडणावळीच्या दरात जो घोंटाळा उपस्थित झाला त्याची चेंबरलेन कमिशन अगर फौलर कमिटी ह्यांस आगाऊ कल्पना येणें शक्य नव्हतें. कारण चांदीचा भाव ओसास ४४ पेन्स ह्यापेक्षां अधिक होईल हे त्यांच्या स्वप्नीही आलें नसेल. महायुद्ध संपल्यावरही सर्व राष्ट्रांत चलनविषयक गरजा भागविण्यास चांदीला जोराची मागणी असल्यानें व नवीन पुरवठा त्या मानानें मर्यादित असल्यानें हुंडणावळीचा दर लवकर पूर्व प्रमाणावर येईल अशी आशा बाळगण्यास जागा नव्हती. तसेच, इंग्लंडमधील मुख्य चलनी नाण्याच्या म्हणजे सॉव्हरिनच्या व तितक्याच किंमतीच्या ब्रिटिश नोटीच्या बाजारी किंमतीत महायुद्धापूर्वी मुळीच फरक नव्हता व हिंदुस्थानच्या चलनपद्धतीचा पाया म्हणून इंग्लंडमधील प्रमुख चलनाचा अंगीकार करतांना सॉव्हरिन व पौंडाची नोट ह्यांच्या किंमतीत फरक होईल अशी कल्पनाही नव्हती. परंतु महायुद्धाच्या वेळीं कागदी चलनांत बेसुमार वाढ

झा त्यानें पौंडाच्या नोटीची बाजारी किंमत सोन्याच्या सॉव्हरिनपेक्षां पुष्कळच कमी झाली; व हिंदी चलनपद्धतीचा इंग्लिश चलनाशीं निकट संबंध असल्यानें तिच्यांतही घोटाळे उत्पन्न होऊं लागले. चांदीच्या किंमतींत बेसुमार वाढ व सॉव्हरिन आणि पौंडाची नोट ह्यांच्या बाजारभावांतील वाढता फरक ह्या दोन्ही गोष्टीचा प्रत्यय हिंदुस्थान-सरकारास एवढ्या अनपेक्षितपणें आला की कसेंही करून स्वतःचें चलनविषयक धोरण शाबूत आहे हें दाखविण्यापलीकडे त्यांस कांहीच करतां आलें नाही. सुवर्णपरिवर्तनपद्धति चालू ठेवून बदलत्या परिस्थितीस अनुरूप असे दुसरे उपाय कोणते योजावे व सरकारनें महायुद्धाच्या काळांत हुंडणावळ, नोटा, सोन्या–चांदीचा व्यापार इत्यादिकांबद्दल जे अनेक तात्पुरते फेरबद्दल केले होते त्यापैकी कायम स्वरूप कोणकोणांस द्याव-याचें, हे ठरविण्यास व सरकारच्या पुढील चलनविषयक धोरणासंबंधी शिफारशी करण्यास १९१९ च्या मे महिन्यांत बॅबिंगटन स्मिथ कमिटी नेमण्यांत आली व १९२० च्या फेब्रुवारींत तिचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला.

चांदीचा भाव वाढला म्हणून रुपयातील चांदीचें परिमाण कमी करणें; नोटांबद्दल रुपये देण्याचें तात्पुरतें बंद करणें; एक रुपयाऐवजीं दोन किंवा तीन रुपये किंमतीचें परंतु जुन्या प्रमाणापेक्षां कमी वजनाची चांदी असलेलें दुसरें नाणें काढणें; हे उपाय स्मिथ कमिटीस कित्येकांकडून सुचविले गेले होते. परंतु हिंदुस्थानाच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक परिस्थितीत त्यांचें अवलंबन करणें योग्य नाहीं असें ठरवून व सुवर्णपरिवर्तनपद्धति हुंडणावळीचा दर स्थिर राहण्यावर अवलंबून असणार हें जाणून कमिटीनें असें सुचविलें कीं, १६ पेन्सांपेक्षा कांही तरी अधिक असा दर कायमचा ठरविण्यांत यावा. कमिटीच्या मतें १ रुपयास २४ पेन्स, म्हणजे एका सॉव्हरिनचा $\frac{1}{10}$ भाग सोनें, असा नवा दर अंमलांत आणणें इष्ट होतें. जुन्या दरानें ज्याप्रमाणें चांदीचा भाव ४४ पेन्सांस एक औंस एथवर असेपर्यंत नवे रुपये किफायतशीरपणें पाडतां येत त्याप्रमाणे रुपयास दोन शिलिंग ह्या दरानें ६६ पेन्सास एक औंस एथवर चांदीचा भाव चढेपर्यंत रुपये पाडणें किफायतशीर होत होतें. स्मिथ कमिटीची चौकशी चालू होती त्यावेळेस हुंडणावळीचा दर दोन शिलिंगांच्या जवळ जवळ होता व तो तेथेच स्थिर केल्यास हिंदी किंमतीचें मान परदेशी बाजारभावांच्या मानानें कमी राहील असेंही स्मिथ कमिटीस वाटत होतें. हुंडणावळीचा दर एकदां कायमचा बद-लला म्हणजे सोन्याची आयात व निर्यात मोकळेपणानें होऊं देण्यास हरकत नाही असें कमिटीचें मत होतें. तसेंच, सोन्याचा पुरवठा नाण्यांत गुंतविला न जातां सरकारी शिलकी निधींत हुंडणावळ स्थिर ठेवण्याच्या कामगिरी-करितां सांठवून ठेवावा असें कमिटीचें मत असूनही लोकांची सोन्या-बद्दलची मागणी भागविण्यास सोन्याच्या मोहरा पाडणें इष्ट आहे अशी तिनें शिफारस केली. मोहरा व रुपये ही दोन्ही नाणीं कायदेशीर असूनही मोहरांच्या

मोबदला रुपये देण्याची जबाबदारी चांदीचा पुरवठा मर्यादित आहे तोंपर्यंत कायदेशीर रीत्या सरकारवर असूं नये, असें कमिटीचें म्हणणें होतें. पौंडास दहा रुपये हा दर कायदेशीर रीत्या अंमलांत आणण्यापूर्वी लोकांस त्यांच्या जवळ असलेल्या सॉव्हरिनचे जुन्या दरानें १५ रुपये मिळण्यास काही मुदत देणें आवश्यक आहे, असेंही कमिटीनें सुचविलें. चांदीच्या आयातीस व निर्गतीसही नेहमी पूर्ण मुभा असावी व चांदीच्या आयातीवर असलेली जकात सरकारी उत्पन्नांत तेवढी तूट आल्यास हरकत नसेल तर दूर केली जावी, असा कमिटीचा सल्ला होता. सरकारनें चांदीची खरेदी हिंदुस्थानांतच करावी ह्या सूचनेस कमिटीनें पाठिंबा दिला नाही. हुंडणावळ स्थिर ठेवण्याचे कामास येणारा सुवर्णनिधी व नोटांस तारण असलेला निधी ह्यांबद्दलही कमिटीनें कित्येक सूचना केल्या व त्यांपैकी महत्वाच्या सूचनांचा मागें उल्लेख केलेलाच आहे. हुंडणावळीचा दर वाढल्यानें सरकारच्या विलायती कर्जरोख्यांचें हिंदी नाण्यांत रूपांतर करतांना रुपयास ८ पेन्सप्रमाणें जो तोटा होईल तो क्रमाक्रमानें सरकारच्या विलायती खर्चांत होणाऱ्या बचतीमुळें भरून निघेल असें स्मिथ कमिटीचें म्हणणे होतें.

हिंदी चलनपद्धतीच्या इतिहासाचें व गुणदोषांचें एथवर जें वर्णन केले आहे त्यावरून हिंदुस्थानसरकारचें चलनविषयक धोरण नेहमीच किती अनिश्चित असे व चलनविषयक सर्व अधिकार सरकारच्या हातांत असल्यानें वारंवार कायदे बदलून व जाहीरनामे काढून सर्व व्यवस्था कशी बदलण्यांत येई हें दिसून येईल. चलन म्हणजे मूल्यमापनाचें व कर्जफेडीचें साधन; त्याच्यांत वारंवार ढवळाढवळ करून व्यापारी, धनको व ऋणको आणि सामान्य नागरिक ह्यांच्या सांपत्तिक स्थितीत बरी वाईट घडामोड सरकारनें करावी ह्याबद्दल सरकारवर पुष्कळच टीका करण्यांत येई. स्मिथ कमिटीचें काम चालले होतें तेव्हां बाजाराची व अंतर्गत व्यापाराची परिस्थिति अत्यंत अस्थिर होती. त्यांतही त्या कमिटीकडे सोंपविलेल्या प्रश्नांत सुवर्णपरिवर्तनपद्धति शाबूत ठेवून तिला सहाय्यक अशा दुसऱ्या सूचना कराव्या अशी अट घातलेली होती. अशा अवघड परिस्थितींत हुंडणावळीचा दर १६ पेन्सांवरून २४ पेन्सांवर नेला जावा अशी शिफारस त्या कमिटीनें केली. स्वतःच्या खर्च खात्यांत चढीच्या हुंडणावळीनें बचत होईल ह्या आशेनें व देशांत महागाईमुळें माजलेल्या असंतोषास आळा घालण्याच्या हेतूनें हिंदुस्थानसरकारनेही स्मिथ कमिटीच्या सूचनांचा तावडतोब अंगीकार केला. सरकारच्या जुन्या चलनविषयक धोरणाचें कमिटीनें केलेलें समर्थन अगर पुढें सरकारनें कोणता मार्ग स्विकारावा ह्याबद्दल कमिटीनें दिलेला सल्ला सर्वस्वी चूक व अनर्थावह आहे असेंच हिंदी लोकांच्या बहुमतास वाटत होतें; व कमिटीचे एकटे हिंदी सभासद, दलाल, ह्यांनीं आपल्या भिन्नमतप्रदर्शक पत्रिकेंत ह्याच विचारसरणीचा परिपोष केला होता.

जुनें मूल्यमापनाचें परिमाण सोनें नसून सोन्याचें ब्रिटिश नाणें होतें, ह्या मताचा निषेध करून असलें मत मान्य करणें म्हणजे हिंदी चलनविषयक व्यवस्थेंत क्रांति घडवून आणणें होय असें त्यांनी प्रतिपादिलें. सोन्याचा सॉव्हरिन म्हणजे एका सॉव्हरिन-मध्यें असणारें सोनें, हेंच हिंदुस्थानाचें १८९९ पासून मूल्यमापनाचें कायदेशीर परिमाण आहे व त्याच्याशी एका रुपयास १६ पेन्स हें प्रमाण ठेवण्याचें सरकारनें कबूल केलें होतें असें दलाल ह्यांचें म्हणणें असून तेंच खरें होतें. इंग्लिश व्यापाऱ्यांस हिंदुस्थानातील लोकांचें जें देणें झालें तें त्यांस सोन्याच्या अगर चांदीच्या स्वरूपांत हिंदुस्थानास पाठविण्यास अगर येथें कर्ज काढून त्या रकमेंतून देऊन टाकण्यास लावलें असतें तर हिंदी चलनास असलेली मागणी निष्कारण वाढली नसती. एका बाजूने सरकार रुपये पाडीत असतां दुसऱ्या बाजूनें तें चांदीच्या निर्यातीस प्रतिबंध करीत होतें. हिंदुस्थानांतील चांदी बाहेरच्या बाजारांत जाऊं शकती तर चांदीचा भाव एवढा वाढलाच नसता असेंही दलाल ह्यांचें म्हणणें असून त्यांत पुष्कळ सत्य होतें. सुवर्णपरिवर्तनपद्धति असमाधानकारक असून ती पुन्हा अंमलांत आणणें अशक्य व अनिष्ट आहे ह्या आपल्या मतातही दलाल ह्यांनी प्रचलित हिंदी लोकमताचाच अनुवाद केला होता. स्मिथ कमिटीनें चलन-विषयक प्रश्नाची चौकशी केली तेव्हां सर्व जगांतील आर्थिक परिस्थिति एवढी अनिश्चित होती की कायम स्वरूपाच्या कोणत्याही शिफारशी त्या कमिटीनें करावयास धजणें रास्त नव्हतें. चादीचे भाव व त्याचप्रमाणें सर्व पदार्थांच्या किमती एकंदरीनें चढीच्या राहतील अशा अपेक्षेवर आपल्या शिफारशीची स्मिथ कमिटीने उभारणी केलेली होती व किंमतीत एकदम बराच उतार झाल्यास पुन्हां चौकशी करणे जरूर पडेल असेंहि तिनें सांगितलें होतें. त्याप्रमाणें लवकरच बाजारभावांत उतार होऊन कमिटीच्या सूचना अव्यवहार्य ठरल्या. सोन्याच्या मोहरा व कमी चादीचें दोन रुपये किंमतीचें नाणें काढून सरकारने लोकांच्या चलनविषयक गरजाभागवाव्या हे दलाल ह्यांचें मत कमिटीस व सरकारासही अमान्य झालें. मूल्यमापनाचें परिमाण व प्रतीकरूप नाण्यांतील धातूचें वजन ह्यांपैकी कोणत्या तरी एकांत बदल करणें आवश्यक झाल्यास मूल्यमापक परिमाण कायम ठेवून प्रतीकरूप नाण्यांतील धातूच्या वजनांत बदल करणें श्रेयस्कर आहे हें दलाल ह्यांचें मत त्यांच्या विरुद्ध असलेल्या कमिटीच्या मताहून तात्त्विक व व्यावहारिक दृष्ट्या अधिक बरोबर आहे, असेंच कोणीही म्हणेल.

**१५ स्मिथ कमिटी नंतर**—स्मिथ कमिटीच्या सर्व महत्त्वाच्या सूचनांस सरकारनें लवकरच कायदेशीर स्वरूप दिलें. २ फेब्रुवारी १९२० पासून देशांत येणारें सर्व सोनें १ रुपयास ११·३ ग्रेन शुद्ध सोनें, म्हणजे एका सॉव्हरिनमधल्या सोन्याचा $\frac{1}{10}$ भाग, ह्या भावानें आपल्या ताब्यांत घेण्याचें सरकारनें ठरविलें. २१

दिवसाच्या मुदतीत ज्यांच्या जवळ जुने सॉव्हरिन असतील त्यांस ते १५ रुपयांच्या भावानें मोडून देण्याची व्यवस्था करून, त्या मुदतीपुढें सॉव्हरिन व अर्धसॉव्हरिन हीं नाणी चलनांतून काढून टाकण्यांत आलीं. परंतु पुढें दोन अडीच महिन्यांनी दहा रुपयांस एक सॉव्हरिन ह्या दरानें सॉव्हरिन व अर्ध सॉव्हरिन ही नाणी पुन्हां कायदेशीर ठरविण्यांत आली. अर्थातच बाजारभावाप्रमाणें एका सॉव्हरिनचे दहापेक्षा अधिक रुपये येत असल्यानें कायदेशीर भावानें ते व्यवहारांत वापरण्यास कोणीही तयार होण्यासारखें नव्हतें. १९१९ च्या ऑगष्ट महिन्यापासून वेळोवेळी सरकारनें लोकांस कमी भावानें सोनें विकलें, व १९२० च्या सप्टेंबरपर्यंत एकंदर सव्वा कोटि तोळ्यांवर सोने लोकांस विकलें गेलें. सोन्याच्या ह्या विक्रीनें समाजांत खेळणाऱ्या चलनाचें परिमाण मर्यादित होऊन सोन्याचा भावही कांहीं दिवस पुष्कळच उतरला होता. परंतु ही विक्री बंद होतांच हळूहळू पुन्हां चढत जाऊन १९२१ मार्चच्या शेवटीं तो ३० रुपये तोळा इतका झाला. १९२०-२१ सालात सोन्याचांदीच्या अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय वहातुकीवरील सर्व नियंत्रणें हिंदुस्थान सरकारनें दूर केलीं. बाजारांतील त्या वेळचा हुंडणावळीचा दर २ शि. ८ पे. असा असून कायमचा कायदेशीर दर रुपयास चोवीस पेन्स ह्या प्रमाणानें कायम ठेवण्याची सरकार जबाबदारी घेणार, हें कळताच हिंदुस्थानांतील ज्या लोकांस विलायतेस पैसे पाठवावयाचे होते त्यांची लंडनवरील हुंड्यास असलेली मागणी बेसुमार वाढली. ह्या मागणीदारांपैकीं कांहीं लोकांस खरोखरच लंडनला पैसे पाठवावयाचे होते व पुढें भाव उतरल्यास आपला तोटा होईल म्हणून ताबडतोब पैसे पाठविण्याबद्दल त्यांची मागणी होती. परंतु दुसऱ्या कित्येकांस विलायतेत वास्तविकपणे पैसे पाठविण्याची जरूर नसता केवळ किफायतशीर दरानें पैसे पाठवून पुढें कायमचा २४ पेन्सांचा भाव स्टेट सेक्रेटरींनी अंमलात आणला की त्या दरानें लंडनहून परत हिंदुस्थानावर हुंड्या विकत घेऊन आपला फायदा करून घेण्याच्या इराद्यानें ते मागणी करीत होते. स्मिथ कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला तेव्हा हुंडणावळ २ शि. ८ पेन्स होती, ती ह्या मागणीमुळें व ब्रिटिश पौंडाची किंमत आणखी कमी झाल्यामुळें २ शि. १० पेन्सावर गेली. हिंदुस्थानसरकारास असें वाटलें कीं एकदा विलायती हुंड्यांच्या सर्व मागणीदारांची बाजारभावानें मागणी भागविली म्हणजे हुंडणावळ उतरत जाऊन दोन शिलिंगाचा दर कायम ठेवणें अधिक सोपें जाईल. ह्या अदूरदृष्टि व गैरवाजवी धोरणास बळी पडून सरकारनें स्टेट सेक्रेटरीवर भारी दरानें हुंड्या विकण्यास सुरवात केली.

ह्या पर्वणीचा फायदा घेण्यास अनेक लोक पुढें येऊन त्यांची मागणी भागविण्यास लंडन येथें स्टेटसेक्रेटरीजवळ ब्रिटिश सरकारनें काढलेले कमी मुदतीचे कर्जरोखे होते ते विकून पौंड उभे करावे लागले. हे कर्जरोखे

विकत घेतले तेव्हां हुंडणावळीचा दर कमी असून ते विकले त्यावेळी तो अधिक असल्यानें ज्या नोटांस त्या कर्जरोख्यांचें तारण होतें त्यांपैकी पुष्कळ रद्द कराव्या लागल्या किंवा त्या कायम ठेवून त्यांस तारण म्हणून हिंदुस्थान सरकारास अधिक कर्ज उभारावें लागलें. ह्या अनागोंदी हिशेबाच्या व्यवहारांत हिंदुस्थानसरकारास ३०–३५ कोटी रुपयांची खोट येऊनही पौंडाची बाजारी किंमतच कमी असल्यानें हुंडणावळ दोन शिलिंगांवर येण्याचें चिन्ह दिसेना. म्हणून हताश होऊन शेवटी सरकारनें हुंडणावळीचें नियमन करण्याचा प्रयत्न सोडून दिला. पुढें सर्व जगांतील आर्थिक परिस्थिति सुधारत जाऊन अंतर्राष्ट्रीय हुंडणावळीचे दर पूर्व ठिकाणाच्या जवळ जवळ येऊं लागले. विशेषतः पौंडाची किंमत एका सॉव्हरिनमध्ये जेवढें सोनें असावयाचें त्या सोन्याच्या किंमतीइतकी होऊं लागली. पौंड ह्या ब्रिटिश चलनाचा भाव असा चढत चालल्यानें रुपयांस मिळणाऱ्या पेन्सांचें परिमाण कमी होऊं लागलें. त्यांतच हिंदुस्थानांत आयात होणाऱ्या व्यापाराची रक्कम फुगत जाऊन त्यामानानें निर्यात व्यापार कमी होत गेला. त्याही कारणानें हुंडणावळ उतरत जाऊन दोन शिलिंगांहूनच नव्हे तर १६ पेन्सांहूनही ती कमी झाली. सरकारनें सुवर्णपरिवर्तनपद्धति राखावयाची तर दोन शिलिंगाच्या खालीं हुंडणावळ जाताच कायदेशीर भावानें लंडनवर हुंड्या विकणें सरकारास भाग होतें; परंतु दोन शिलिंग दहा पेन्सांवरून दोन शिलिंगावर हुंडणावळ आणण्याच्या व्यर्थ खटाटोपांत ३०–३५ कोट रुपये बुडू आल्यानें दोन शिलिंगाच्या खाली हुंडणावळ जाऊं नये म्हणून हुंड्या विकण्यास सरकारजवळ त्राण उरलें नाही. सोनें, कागदी पौंड, कायदेशीर परिवर्तनाचा दर ह्यांपैकी कोणतेंच मूल्यमापनाचें परिमाण अस्तित्वांत राहिलें नाहीं व सरकारने आपली ह्या विषयींची दुर्बलता जाहीर केली. मालाची आयात व निर्यात आणि चलनाचा पुरवठा ह्यांस अनुसरून हुंडणावळीचा दर आपोआप कमी अधिक होऊं लागला, व पुढे १८ पेन्साच्या आसपास पुष्कळसा स्थिर झाला. परंतु एकदां हात पोळल्यामुळे पुन्हा चलनपद्धतीत व हुंडणावळीच्या दरात फेरबदल करण्यापूर्वी सर्व जगांतील आर्थिक परिस्थिति व किंमतीचे मान अधिक स्थिर होण्याची आपण वाट पहात आहोंत असें सरकारतर्फे सांगण्यात आलें. १९२०–२१ पासून तो १९२६–२७ पर्यंत हिंदुस्थानात पायाशुद्ध चलन'पद्धति' अशी कोणतीच नव्हती व धंदेवाले आणि सार्वजनिक पुढारी सरकारनें आपलें कायमचे चलनविषयक धोरण जाहीर करावें अशी जोराची मागणी करीत होते. मध्यंतरी १९२४ च्या ऑगस्ट महिन्यात हिल्टन यंग कमिशन नेमलें जाऊन हिंदी चलनपद्धतीच्या इतिहासांतील अगदी अलीकडील चौकशीस प्रारंभ झाला.

**१६ हिल्टन् यंग कमिशनच्या शिफारसीः**—हिल्टन् यंग कमिशनकडे जे तीन मुद्दे चौकशी व शिफारस करण्याकरितां सोंपविले होते त्याजकडे पाहिलें

असतां १९२५ च्या आगस्टांत हिंदी चलनपद्धति किती विस्कळित झाली होती ह्याची कल्पना येते. हिंदुस्थानांत चलनविषयक परिमाण कोणतें असावें, चलन-पद्धति कोणाच्या हुकुमतीखाली असावी, तिच्या व्यवस्थेवर कोणाचा अधिकार चालावा व रुपयाचें सोन्याच्या नाण्याशी प्रमाण काय असावें हेच ते मुद्दे होत. कमिशनचें काम चालू होतें त्या वेळी सोन्याचें नाणें चलन म्हणून मुळीच वापरलें जात नसून सरकारचें धोरण रुपयास १८ पेन्स ह्या दरानें हुंडणावळ कायम करण्याचें होतें. ह्याच दरानें हिंदुस्थानांत व इंग्लंडांत हुंड्यांचा व्यवहार करण्याचा प्रघातही सरकारनें ठेवला होता. कायदेशीर दर असलाच तर तो दोन शिलिंगाचा असता ह्या नव्या भावानें हुंडणावळ कायम करण्याचा प्रयत्न करणें गैर कायदा असून व त्याबद्दल हिंदी लोकमत विरुद्ध असूनही सरकारनें आपलें धोरण चालूच ठेवलें; एवढेंच नव्हे तर कमिशन चौकशी करीत असतां हुंडणावळ कमी होण्याचा रंग दिसताच चलनाचा पुरवठा कमी करून ती १ शि. ६ पेन्सावर चढविण्यात आली. हिंदी चलनपद्धति घोटाळ्याची असून हुंडणावळीची स्थिरता कशावर अवलंबून आहे हें सामान्य माणसांस कळणें अशक्य आहे असें कमिशननें ठरविलें. सरकारजवळ अनेक प्रकारच्या ठेवी व निधी असण्यानें निष्कारण दुहेरी रकमा अडकून राहतात हे योग्य नाही असा कमि-शननें निकाल दिला व चलनविषयक अधिकार सरकारच्या हातांत व भांडवल आणि पत ह्यांची संघटना खाजगी पेढ्यांच्या हातात असा दुरंगी व्यवहार असणें धोक्याचें आहे असेंही कमिशनचें मत पडलें. सरकारची सध्याची चलनपद्धति अकृत्रिम नसून चलनाची वाढ व संकोच सर्वस्वी सरकारच्या इच्छेवर अवलंबून आहेत आणि हिंदी चलनपद्धतीत लवचीकपणा, म्हणजे लोकांच्या चलनविषयक गरजा वाढतांच चलनाचा पुरवठा वाढविण्याचा व त्या कमी होतांच चलन कमी करण्याचा गुण नाही, असेंही कमिशननें मत दिलें. प्रचलित पद्धति ह्याप्रमाणें सदोष ठरवून कमिशननें पुढीलप्रमाणें शिफारसी केल्या.

सुवर्णपरिवर्तनपद्धतीत हुंडणावळीच्या स्थिरतेचा गुण असला तरी तिच्यांत गुंतागुंती व कृत्रिमता फार, ह्यास्तव पूर्ण सुवर्णपरिमाण हिंदुस्थानांत चालू करणेंच आवश्यक आहे असें कमिशननें सुचविलें. हिंदुस्थानसरकारच्या फडणिशी खात्यानें सुवर्णपरिमाण व सुवर्णचलन सुरू करण्याची एक योजना कमिशनपुढे ठेविली होती. परंतु हिंदुस्था-नांत सोन्याचें नाणें चालू झाल्यास सोन्याचा भाव वाढून व चांदीचा उतरून सर्व जगांतील किंमतीच्या मानांत एकदम चढउतार होतील व त्याचा हिंदुस्थानावर विप-रीत परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं ह्या मुद्यावर कमिशननें ती योजना अमान्य ठरविली. सुवर्णचलन चालू करण्यास पुरेसें सोनें मिळवावयाचें तें अमेरिकेकडून विकत घेऊन अगर कर्ज काढून घ्यावें लागेल; असें करण्यांत व येथें सोन्याची नाणी पाडण्यांत सरकारास पुष्कळ खर्च येईल; व अमेरिका कर्जाऊ अगर विक्रीनें

हिंदुस्थानास सोनें देण्यास तयार होईल अशी खात्री नाही अशा अनेक अडचणी कमिशननें पुढें मांडल्या होत्या. सुवर्णपरिमाण पूर्णपणें चालू करण्याच्या योजनेस जोराचा पाठिंबा देणारें कमिशन सुवर्णचलनाच्या सरकारी योजनेसही तितक्याच जोरानें विरोध करतें ह्याचें पुष्कळांस आश्चर्य वाटलें. परंतु हिल्टन् यंग कमिशनच्या शिफारशीचा हाच विशेष होता की सुवर्णचलनविरहित सुवर्णपरिमाण येथें चालू करून लोकांत पेढ्यांच्या व्यवहारांचा प्रसार घडवून आणावयाचा, व पेढ्यांच्या साहाय्यानें लहानसहान रकमाही उत्पादकपणें गुंतूं लागल्या की सर्व देशांतील सुवर्णसंचय एका मध्यवर्ती पेढीजवळ ठेवून त्याच्या जोरावर साधें व पूर्ण सुवर्णपरिमाण स्थापन करावयाचें. लोकांच्या हातांत नाण्यांच्या स्वरूपांत सोने अडकून राहिलें तर सरकारास किंवा मध्यवर्ती पेढीसारख्या दुसऱ्या चलनविषयक सत्ताधारी संस्थेस चलनाच्या पुरवठ्याचें नियमन करणें अशक्य होईल; ह्यास्तव लोकांस नोटा व रुपये ह्यांच्या मोबदला प्रमाणभूत धातु म्हणून सोनें द्यावयाचें तें नाणें नसून सोन्याच्या लगडी असाव्या म्हणजे लोकांच्या हातांतील सोन्याच्या चलनाच्या पुरवठ्यावर प्रत्यक्षपणें कांहीं परिणाम होणार नाहीं असें कमिशनचें धोरण होतें, आणि म्हणून चलनाचा पुरवठा, सोन्याची खरेदीविक्री व पतीचे व्यवहार ह्या सर्वांचें नियंत्रण सरकारी खात्याकडून न होतां एका मध्यवर्ती पेढीमार्फत व्हावें अशी कमिशननें शिफारस केली. नोटा व रुपये पूर्वीप्रमाणेंच पूर्णपणें कायदेशीर चलन म्हणून चालावे; भारी किंमतीच्या नोटांचें कमी किंमतीच्या नोटांत परिवर्तन करून मिळावें; परंतु नोटांच्या मोबदला रुपये देण्याची जबाबदारी सरकारवर किंवा मध्यवर्ती पेढीसारख्या दुसऱ्या चलनाधिकारी संस्थेवर असूं नये अशीही कमिशननें शिफारस केली. परंतु चलन-पद्धतीचा पाया सोनें हें आहे ही गोष्ट लोकांस परिणामकारकपणें कळावी व चलना-धिकारी संस्थेस लोकांच्या हातांतील चलनाचा सोन्याचा पुरवठा मर्यादित करतां यावा ह्यास्तव त्या संस्थेमार्फत ठराविक भावानें सोन्याची खरेदी-विक्री व्हावी जावी असें कमिशननें सुचविलें. ह्याच स्वरूपाच्या पद्धतीचा मागें प्रास्ताविक भागांत सुवर्णखंड मूल्यमापन पद्धति ह्या नांवानें उल्लेख केला आहे.[१]

रुपयांचा सोन्याशी संबंध १८ पेन्सांस एक रुपया ह्या प्रमाणांत असावा असा कमिशनचा निकाल असल्यानें सोन्याच्या कायदेशीर खरेदीविक्रीचे दर ह्या प्रमाणास अनुसरून असावे असेंच अर्थातच कामिशनचें म्हणणें होतें. सरकारकडून कायदे-शीर चलनाच्या मोबदला सोनें विकत घेण्याचा व सोनें देऊन चलन मागण्याचा हक्क ४०० तोळ्यांवरील गिऱ्हाइकास असावा असें सुचविण्यांत आलें होतें. ठराविक दरापेक्षां सोनें स्वत झाल्यास तें विक्रीकरतां पेढीकडे अगर सरकारकडे

१ पान ६५ पहा

येईल; त्या मोबदला सरकारनें चलन दिलें म्हणजे एका बाजूस चलनाचा पुरवठा वाढून व उलट बाजूस सोन्याचा बाजारांतील पुरवठा मर्यादित होऊन आपोआप सोन्याचा भाव वाढेल; ह्याच्या उलट, बाजारांत ठराविक दरापेक्षां सोनें महाग असल्यास तें सरकारकडून कायदेशीर दरानें विकत घेण्यास लोक चलन आणून देतील. मग बाजारांतील चलन कमी होऊन सोनें वाढल्यानें सोन्याचा भाव आपोआप उतरेल. ह्याप्रमाणें अंतर्गत चलन चांदीचें व कागदाचें ठेवूनही त्याचें सोन्यांत व सोन्याचें त्यात वाटेल तेव्हां ठराविक दरानें परिवर्तन होण्याची हमी घेतली गेल्यानें सुवर्णपरिमाणाचे सर्व फायदे देशास मिळतील असें कमिशनला वाटलें. सरकारनें बाजारभावापेक्षां दर वेळेस तोट्यानें सोन्याची खरेदी-विक्री करावयाची तर त्याकरतां सोन्याचा पुरवठाही पुष्कळ पाहिजे व होता होईल तों लोकांच्या चलनविषयक गरजा अंतर्गत चलनानें भागतील अशी व्यवस्था व्हावयास पाहिजे. म्हणून कमिशननें अशी शिफारस केली की सरकारची सर्व चलनविषयक कामगिरी एका नव्या स्वतंत्र पेढीकडे सोंपविण्यात यावी. कमिशननें हुंडणावळीच्या दरासंबंधी व पेढ्यांच्या सुधारणासंबंधी ज्या शिफारसी केल्या होत्या त्याचें पुढील दोन प्रकरणांत अनुक्रमानें विवेचन केलेंच आहे. परंतु चलनपद्धति साधी असावी व तिच्यावर लोकांचा विश्वास असावा हे जे दोन गुण आवश्यक म्हणून कमिशननें मानले त्यांचा वरील योजनेत जवळ जवळ पूर्ण अभाव आहे हे सहज दिसेल. सामान्य लोकासही चलनपद्धतीत सुवर्णाचा अंतर्भाव केलेला आहे ही गोष्ट स्वानुभवानें पटावी ह्या हेतूनें सोन्याच्या सर्टिफिकेटाची पोस्टखात्यामार्फत विक्री करण्याची शिफारस करण्यात आली. पोस्टल कॅश सर्टिफिकेटप्रमाणें सोन्याची सर्टिफिकिटे विकून तीन किंवा पाच वर्षांनी रोख किंमतीबद्दल सव्याज रुपये अगर नोटा, किंवा विवक्षित वजनाचें सोनें मिळावें ही कमिशनची शिफारस कितपत साधी अगर विश्वासजनक आहे हें निराळें सांगावयास नको.

सर्व प्रकारच्या कायदेशीर चलनांचें परस्परांत परिवर्तन होण्याची व्यवहारात सरकारी सवडीनुसार व्यवस्था करावी; एक रुपया किंमतीच्या नोटा पुन्हा काढाव्या; सुवर्णनिधि व नोटांस तारण असलेला निधि हे एक करावे; नोटांच्या व रुपयाच्या मोबदला किती सोनें ठेवावें ह्याबद्दल शेंकडेवारीनें किमान मर्यादा ठरविण्याचा कायदा करण्यांत यावा; इत्यादि इतर सूचनाही कमिशननें केल्या होत्या. परकी राष्ट्रांत सोन्याचे भाव चढून व चांदीचे भाव उतरून आर्थिक व्यवहारांत गोंधळ माजेल ह्या सबबीवर हिंदी लोकमतानें वर्षानुवर्ष एकमुखानें केलेल्या सुवर्णचलनाच्या मागणीस वाटाण्याच्या अक्षता लावल्या गेल्या. कमिशनची ही वृत्ति हिंदी लोकांच्या मनांत चलनपद्धतीविषयी आधीच वसत असलेल्या साशंकतेच्या भावनेंत भरच टाकील ह्यांत शंका नाही. मध्यवर्ती बँकेच्या साहाय्यानें चलनाचें व हुंडणावळीचें

नियंत्रण करण्याची पद्धति यशस्वी होण्यास अत्यंत प्रगमनशील अशा पाश्चात्य राष्ट्रांत राजकीय, सामाजिक व शैक्षणिक प्रगति पुष्कळच व्हावी लागते; व तेथेंही लोकांच्या भावना व विश्वास ही दुखावली जाऊ नयेत म्हणून कसोशीनें व स्वार्थत्याग करूनही खटपट करण्यांत येते हें इंग्लंडच्या गेल्या ५–६ वर्षांच्या चलनविषयक इतिहासावरून स्पष्ट दिसेल. असें असतां जेथें पेढ्यांचा विस्तार फारच अल्प प्रमाणावर झालेला आहे व जेथील लोकांचा चलनपद्धतीच्या प्रामाणिकपणावरचा व कार्यक्षमतेवरचा विश्वास उडून गेला आहे त्या राष्ट्रांतील परकी सरकारास ह्या पद्धतीचें अवलंबन करण्यास सांगणे अदूर दृष्टीचें द्योतक होय. हिंदुस्थानाची विशिष्ट राजकीय व सामाजिक परिस्थिति ध्यानांत ठेवून कमिशननें सरकारच्या महायुद्धकालीन चलनविषयक धोरणाचें समर्थन केलें होते, परंतु आपली गुंतागुंतीची सुवर्णखंडमूल्यमापनपद्धति हिंदुस्थानसरकारपुढें ठेवताना त्याच राजकीय व सामाजिक परिस्थितीचा कमिशनला विसर पडला. हिल्टन् यंग कमिशनच्या शिफारशीस लोकमत सर्वस्वी विरुद्ध असूनही त्याचा अंगिकार करण्याचें सरकारनें ठरविलें आहे. रिझर्व बँकेची प्रस्थापना व १८ पेन्साचा हुंडणावळीचा दर ह्या बाबी प्रस्तुत शिफारशींत प्रमुख असल्यानें त्यांच्या अनुरोधानें पुढील दोन प्रकरणात योग्य स्थळीं गेल्या दोन अडीच वर्षांतील सरकारी चलनविषयक धोरणाचा विचार केला आहे.

# प्रकरण अकरावें

## परराष्ट्रीय हुंडणावळ

**१ हिंदी हुंडणावळ**—मागील प्रकरणांत हिंदी चलनपद्धतीचा विचार करीत असतां हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय हुंडणावळीचाही अनेक ठिकाणी उल्लेख केला आहे व चलनपद्धतीचा इतिहास व त्या पद्धतीची सुधारणा ह्यांचें पूर्णपणें आकलन होण्यास तेवढें विवेचन पुरेसेंही आहे. परंतु हिंदुस्थानाच्या विशिष्ट आर्थिक व राजकीय परिस्थितींत हुंडणावळीच्या प्रश्नास स्वतंत्र महत्त्व प्राप्त झालें आहे. विशेषतः गेल्या तीनचार वर्षांत '१६ विरुद्ध १८ पेन्स' हा लढा सर्व लोकांपुढें असल्यानें हुंडणावळ म्हणजे काय, हिंदुस्थानच्या चलनपद्धतींत तिचें विशिष्ट महत्त्व कोणतें व हुंडणावळीच्या दराची सरकारनें कशी व्यवस्था केली आहे ह्या बाबींविषयीं सामान्य नागरिकांत पुष्कळ जिज्ञासाही उत्पन्न झालेली आहे. ह्या कारणास्तव परराष्ट्रीय हुंडणावळीच्या प्रश्नाचा प्रस्तुत प्रकरणांत स्वतंत्रपणें विचार करण्याचें योजिलें आहे[१]. आगगाड्या, टपालखातें, वहातुकीचीं सुधारलेलीं साधनें व एकाच चलनपद्धतीचा सर्व देशभर बसलेला अंमल ह्या सोयी उपलब्ध नव्हत्या तेव्हां हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांचा आपापसांतील व्यापारही फारसा नसे, व जी कांहीं देवघेव निरनिराळ्या भागांतील लोकांमध्यें होई तिची देणी भागविण्यास सोनें अगर चांदी पाठविणें हेंही खर्चाचें व धोक्याचें असे. म्हणून निरनिराळ्या भागांतील व्यापारी एकमेकांवर हुंड्या काढून व त्या पेढीवाल्यांस विकून आपला व्यवहार करीत. हल्लीं अनेक देशांची आपापसांत देवघेव होऊन आयात व निर्यात मालाच्या हुंड्यांच्या कमी-अधिक पुरवठ्यास अनुसरून ज्याप्रमाणें हुंडणावळीच्या दरांत चढ उतार होतो, त्याप्रमाणें जुन्या काळीं हिंदुस्थानाच्या अंतर्गत व्यापाराच्या हुंड्यांच्या किंमतींतही होत असे. आजही हिंदुस्थानांतील ज्या देशी संस्थानांत स्वतंत्र चलनें आहेत तेथील चलनाची ब्रिटिश चलनांत असलेली किंमत थोड्याफार प्रमाणांत कमीअधिक होत असते. निजामाच्या राज्यांतल्या रुपयाचें ब्रिटिश रुपयाशीं ठराविक प्रमाण असूनही ज्या मानानें ब्रिटिश हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांस संस्थानी व्यापाऱ्यांचें निव्वळ देणें अधिक असेल त्या मानानें हैद्राबादी रुपयांत ब्रिटिश रुपयांची असलेली किंमत ठराविक प्रमाणाहून

---

१ मागें पानें ८१ ते ८६ ह्यांत परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा व परराष्ट्रीय हुंड्यांचा व्यवहार ह्यांबद्दल जें स्पष्टीकरण केलेलें आहे तें वाचून पाहिल्यास प्रस्तुत प्रकरणांतील विवेचन समजण्यास मदत होईल.

कमी असूं शकते. अर्थात्‌च ब्रिटिश रुपयाचा संस्थानी मुलखांतही मोठ्या प्रमाणावर उपयोग होत असल्यानें व पेढ्यांचे व्यवहार व वहातुकीची साधनें ह्यांतही मोठ्या प्रमाणावर सुधारणा होत आल्यानें हिंदुस्थानच्या अंतर्गत व्यापारांतही परराष्ट्रीय देवघेवीचें असलेलें हें स्वरूप नाहींसें होत आहे.

सन १८९३ पूर्वी हिंदुस्थानांत मूल्यमापनाचें साधन चांदीचा रुपया हें नाणें होतें व ज्या देशांशीं हिंदुस्थानाचा व्यापार चालत असे त्यापैकीं पुष्कळांमध्यें सोन्याचें नाणें प्रमाणभूत मानलेलें असे. म्हणून आयात व्यापार व निर्यात व्यापार ह्यांच्या किंमतीच्या परिमाणाप्रमाणेंच सोनें व चांदी ह्या धातूंच्या परस्पर किंमतीतील चढउताराचाही परराष्ट्रीय हुंडणावळीवर, म्हणजे एक रुपयास मिळणाऱ्या दुसऱ्या देशाच्या चलनाच्या भावावर, परिणाम होत असे. त्या सालापासून कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत सोनें हेंच हिंदुस्थानांत मूल्यमापनाचें साधन समजलें जात आहे तरी ज्याप्रमाणें इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, जपान इत्यादि सुवर्णमूल्यमापनपद्धति अस्तित्वांत असलेल्या राष्ट्रांत परस्पर व्यापाराच्या परिमाणास अनुसरून हुंडणावळीचा दर, म्हणजे एकाच्या चलनाचें दुसऱ्याच्या चलनाशीं असलेलें बाजारी प्रमाण, कमी अधिक होतें त्याप्रमाणें हिंदी चलनाचेंही इतर राष्ट्रांच्या चलनाशी असलेलें प्रमाण म्हणजे हिंदी हुंडणावळ, कमीअधिक होणें साहजिकच आहे. त्यांतल्या त्यांत हिंदुस्थानांत मुख्य नाणें, म्हणजे रुपया, हें प्रतीक स्वरूप असल्यानें व तें पाडून घेण्यास टांकसाळी खुल्या नसल्यानें सरकार रुपया व सॉव्हरिन, म्हणजे सॉव्हरिनमधील ऐनजिनसी सोनें, ह्यांचें जे प्रमाण ठरविल तेंच कायदेशीर प्रमाण समजावें लागतें. सोनें अगर चांदी ह्यांपैकीं कोणत्याच धातूचीं नाणीं पाडून घेण्यास टांकसाळी खुल्या नसल्यानें हिंदी नाणीं व परदेशांतील नाणीं ह्यांत टांकसाळी[1] प्रमाण असें कांहींच नसतें. रुपयांचा पुरवठा मर्यादित करून त्यांचें चलनविषयक मूल्य नियमित करण्याचा सरकारी प्रयत्न हाही सोन्याचांदीचा भाव, आयात व निर्यात व्यापाराचें परिमाण व सरकारची सांपत्तिक परिस्थिति इत्यादि विशेषांस अनुसरूनच करावा लागतो. हुंडणावळीचा चढउतार व पेढ्या, उद्योगधंदे, व्यापार, बाजारभाव, आणि हुंडणावळीचा दर ह्यांच्यांतील परस्पर संबंध सर्व देशांत असतात त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत असून सरकारची सांपत्तिक परिस्थिति व चलनविषयक धोरणाचा बिनचूकपणा ह्या कारणांचाही हुंडणावळीचे दर व देशाची आर्थिक परिस्थिति ह्यांवर परिणाम होत असतो.

१८९३ सालापूर्वी हिंदुस्थानांत रौप्य चलनपद्धति अस्तित्वांत असतां, चांदीचे भाव उतरून सरकारी खजिन्यात कशी तूट येऊं लागली व तें अरिष्ट टाळावें म्हणून

---

१ पान ८४ पहा.

सरकारनें कसकसे प्रयत्न केले, हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. चांदीचा भाव उतरल्यानें रुपयास मिळणाऱ्या पेन्साचें अगर सोन्याचें परिमाणही कमी झालें. हुंडणावळीचा दर असा उतरल्यानें आयात मालाचे व्यापारी व ज्या लोकांस कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें परदेशास पैसे पाठवावयाचे होते त्यांचें नुकसान झालें; कारण, पूर्वीइतकेच रुपये देऊन त्यांस पूर्वीपेक्षां कमी भाराचें सोनें अगर कमी किंमतीचें सोनेरी चलन घेऊन स्वस्थ बसावें लागे. उलट पक्षीं, ज्या लोकांस त्यांच्या परदेशी कर्जदाराकडून पैसे मिळावयाचे होते त्यांचा, म्हणजे मुख्यतः निर्यात मालाच्या व्यापाऱ्यांचा, हुंडणावळीच्या उतरत्या दरानें फायदा झाला. कारण, पूर्वीइतक्याच परदेशी चलनाचें हिंदी चलनात परिवर्तन होतांना, चांदीचा भाव उतरल्यानें त्यांस अधिक रुपये मिळूं लागले. १८९३ पासून रुपयांचा पुरवठा मर्यादित करून त्याचें परदेशी देवघेवीचें साधन ह्या नात्यानें असलेलें मूल्य १६ पेन्स ह्या दरानें कायम करण्याचें धोरण सरकारनें स्वीकारलें, व महायुद्धाच्या काळापर्यंत तें यशस्वीपणें चालविलें हें मागील प्रकरणावरून दिसलें असेलच. हिंदुस्थानसरकारास प्रतिवर्षी सुमारें तीस कोटी रुपये इंग्लंडात खर्चावयाचे असतात व ते पाठविण्यास हुंडणावळीचा दर स्थिर असल्यानें, आणि त्यांतल्या त्यात तो चढीचा असल्यानें, सरकारची सोय होते हें उघड आहे, आणि म्हणूनच मूल्यमापनाचें परिमाण बदलूनही हुंडणावळ शक्य तितकी भारी व स्थिर ठेवण्याचा सरकारकडून प्रयत्न होत असतो. परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा हिंदुस्थानास 'अनुकूल' अगर 'प्रतिकूल'[1] असेल त्याप्रमाणें हुंडणावळीचे दर अनुक्रमे चढतात व उतरतात हें खरें. परंतु सुवर्णपरिवर्तनपद्धति येथें अस्तित्वांत असल्यानें, हे दर पंधरा रुपयांस एक सॉव्हरिन ह्या प्रमाणास धरून असलेल्या दोन्ही सुवर्णमर्यादांच्या पलीकडे जाण्याची भीति वाटूं लागतांच, सरकार इंग्लंडात हिंदुस्थानावर व हिंदुस्थानात इंग्लंडवर वरील कायदेशीर दरानें हुंड्या विकण्यास तयार होई. स्टेट सेक्रेटरी हिंदुस्थानसरकारवर हुंड्या विकी त्या मुख्यतः स्वतःच्या खर्चास लागणारे पैसे हिंदुस्थानसरकाराकडून अप्रत्यक्षपणे लंडन येथें आणावे ह्या हेतूनेंच होय. परंतु अनेक प्रसंगी हिंदुस्थानातील मालाच्या इंग्रजी गिऱ्हाइकास मालाची किंमत कायदेशीर दरानें हिंदुस्थानास पाठविता यावी म्हणूनही हिंदुस्थान सरकारवर हुंड्या विकल्या जात. ह्या हुंड्यांस, त्या 'सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया इन् कौन्सिल' ह्या अधिकाऱ्यानें विकल्या असल्यानें कौन्सिल बिल्स् अगर निव्वळ कौन्सिल्स् असें म्हणत. कौन्सिल बिलें स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारवर काढलेली असत व सामान्यतः परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा हिंदुस्थानास अनुकूल असल्यानें कायदेशीर दरानें ती विकली जाण्यास हरकत पडत नसे. परंतु कधी कधी व्यापारी आढावा हिंदुस्थानास प्रतिकूल होऊन हुंडणावळीचा

---

१ मागें पानें ८१–८२ पहा.

दर उतरूं लागून कायदेशीर दराच्याही खाली जाण्याची भीति उत्पन्न होई. अशा वेळी परदेशी धनकोंच्या हिंदी ऋणकोंस कायदेशीर दरानें आपली देणीं देऊन टाकतां यावी ह्या हेतूनें हिंदुस्थानसरकार स्टेट सेक्रेटरीवर हुंड्या विकी. कौन्सिल बिलें स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थानसरकारावर काढलेलीं असून ह्या हुंड्या अगर बिलें हिंदुस्थानसरकारनें स्टेट सेक्रेटरीवर काढली असल्यानें ह्यांस 'रिव्हर्स कौन्सिल्स्' म्हणजे 'परत' अगर 'उलट्या' हुंड्या असें म्हणत. कौन्सिल बिलें व रिव्हर्स कौन्सिल्स हे शब्दप्रयोग नेहमी वापरण्यांत येत असल्यानें त्यांच्या अर्थाचें येथें स्पष्टीकरण केलेलें आहे.

पहिल्या प्रथम ईस्ट इंडिया कंपनी व पुढें हिंदुस्थानसरकार ह्यांस अनेक कारणांनीं विलायतेस पैसे पाठवावे लागत. ज्याप्रमाणें परदेशी मालाची हिंदुस्थानांत आयात करणारा व्यापारी आपलें विलायतचें देणें भागवितो त्याप्रमाणें वरील सरकारी व्यवहारांतही ऐनजिनसी सोनें पाठवून किंवा हिंदुस्थानांतून विलायतेस निर्यात झालेल्या मालाच्या हुंड्या विकत घेऊन लंडनमधील देणें भागविणें शक्य असतें व ह्या मार्गांचा सन १८६२ पूर्वी सरकार उपयोगही करीत असे. अलीकडे निर्यात मालाच्या हुंड्या विकत घेऊन येथून विलायतेस पैसे पाठविण्याचा पद्धतीचा उपक्रम हिंदुस्थानसरकारने पुन्हा केला आहे. ह्यापूर्वी हिंदुस्थानसरकारकडून स्टेट सेक्रेटरीकडे पैसे पाठविण्याचा प्रमुख मार्ग म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांची विक्री हाच होता. हिंदी मालाच्या परदेशी गिऱ्हाइकांकडून ब्रिटिश चलन स्वीकारून त्या मोबदला हिंदुस्थानसरकाराकडून कायदेशीर प्रमाणानें रुपये मिळण्याच्या हुंड्या देणे म्हणजे अप्रत्यक्षपणें हिंदुस्थानसरकारचा पैसा विलायतेस स्टेट सेक्रेटरीस पोंहोंचविणेंच होता. पहिल्या प्रथम अशा हुंड्याची विक्री महिन्यांतून एकदाच होत असे; परंतु पुढें पुढें ती दर पंधरवड्यास व दर आठवड्यासही होऊं लागली. शिवाय, हुंड्यामध्येंही तारेच्या हुंड्या व साध्या हुंड्या असा भेद असून तारेच्या हुंड्याचा भाव सहाजीकच साध्या हुंड्याहून अधिक असे. शिवाय, नियमित वेळेखेरीज अधेंमधें इतर वेळींही कोणी हुंड्या विकत मागितल्यास विवक्षित भावानें अशा खास हुंड्याही विकल्या जात. इतकेंही करून हिंदुस्थानास परराष्ट्राकडून येणें असलेला सर्वच पैसा ह्या मार्गांनी येऊ शकत नसे; व सोन्याच्या सॉव्हरिनांची हिंदुस्थानास निर्यात करून राहिलेलें देणें भागविणें परकी गिऱ्हाइकांस भाग पडे. स्टेट सेक्रेटरीच्या हिंदुस्थानसरकारवरील व हिंदुस्थानसरकारच्या स्टेट सेक्रेटरीवरील हुंड्यांची कायदेशीर दरानें विक्री करण्याची पद्धत हिंदुस्थानाच्या चलनविषयक संघटनेंत फार महत्त्वाची समजली पाहिजे. हिंदुस्थानास परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा सामान्यतः अनुकूल असल्यानेंच ह्या पद्धतीचें अवलंबन शक्य झालेलें आहे. ह्यास्तव पहिल्या प्रथम परराष्ट्रीय व्यापाराच्या आढाव्यासंबंधीं महत्त्वाच्या बाबींची माहिती देऊन मग स्टेट सेक्रेटरी व हिंदुस्थानसरकार ह्यांच्यांतील हुंड्यांच्या व्यवहाराकडे वळणें बरें.

**२ हिंदुस्थानचा परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा**—मालाच्या व्यापाराचा आढावा व एकंदर परराष्ट्रीय देण्याघेण्याच्या हिशेबाचा आढावा ह्यांमधील भेद मागें प्रास्ताविक भागात स्पष्ट केला आहे[1], त्याचें प्रत्यंतर हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापारांत चांगलें येतें. हिंदुस्थानांतून प्रतिवर्षी परदेशांस जो माल पाठविला जातो त्याची किंमत आयात मालाच्या किंमतीहून पुष्कळच अधिक असते. ह्या तफावतीचा मोबदला हिंदुस्थानास प्रत्यक्षपणें सोनें अगर चांदी पाठवून केला गेल्यास तितक्या पुरतें परराष्ट्रांनी हिंदुस्थानाचें देणें देऊन टाकलें असें उघड होतें. मालाची आयात व सोन्याचांदीची आयात ह्यांच्या किंमतीहून निर्गत मालाची किंमत अधिक असते व ह्या फरकापुरती स्टेट सेक्रेटरीनें हुंड्यांची जी विक्री केलेली असते त्याच्या मोबदला हिंदुस्थानात कशाचीच आयात झालेली मात्र दिसत नाही. परंतु सरकारचें विलायती देणें, परदेशी पेढ्या, आगबोटी, विमा कंपन्या, व्यापारी व नोकर ह्यांच्या कामगिरीबद्दल वेतन ह्या न दिसणाऱ्या बाबीची किंमत म्हणून हिशेबी आढाव्यांत तेवढी रक्कम खर्च घालणें, म्हणजे त्या रकमेबद्दल मालाची नव्हे तर ' कामगिऱ्यांची ' आयात झालेली आहे, असें म्हटलें पाहिजे. दृश्य व अदृश्य अशा सर्व बाबींच्या आयातनिर्गतीचा हिशेब केल्यास हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय देण्याघेण्याचा पुढीलप्रमाणें ताळेबंद तयार होईल.—

| **परराष्ट्रांकडे हिंदुस्थानाचें येणें** | **परराष्ट्रांस हिंदुस्थानानें द्यावयाचें देणें** |
|---|---|
| १ मालाची निर्यात. | १ मालाची आयात. |
| २ हिंदुस्थानानें परराष्ट्रांत काढलेलें कर्ज. | २ सोन्याचांदीची आयात. |
| ३ परराष्ट्रांत राहणाऱ्या हिंदी लोकांनी स्वदेशीं पाठविलेला पैसा. | ३ कर्जरोख्यांची आयात. |
| ४ हिंदुस्थानांत राहणाऱ्या प्रवासी, मिशनरी वगैरे परकी लोकास त्यांच्या देशातून आलेला पैसा. | ४ परराष्ट्रांत असणाऱ्या हिंदी लोकास व हिंदुस्थानात नोकरी करणाऱ्या परराष्ट्रीयाच्या कुटुंबास पाठवावयाचा पैसा. |
| | ५ हिंदुस्थानांत धंदा करणाऱ्या परकीयांचा नफा. |
| | ६ परदेशी पेढ्या, विमा कंपन्या, आगबोटीच्या मंडळ्या वगैरे धंदेवाल्यांच्या कामगिरीचें वेतन व परराष्ट्रात हिंदुस्थानानें काढलेल्या कर्जावरील व्याज. |

[1] पानें ८१–८३ पहा.

७ हिंदुस्थान सरकारचा विलायतेंतील खर्च, म्हणजे सरकारी नोकरीतील परकीयांचा पगार, भत्ता, पेन्शनें वगैरेबद्दल, तसेंच सरकारी मालाच्या व सोन्याचांदीच्या होणाऱ्या आयातीबद्दल द्यावयाचें देणें.

देण्याघेण्याच्या वरील सर्व बाबींचा हिशेब करून हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय देवघेवीचा बिनचूक आढावा काढणें अत्यंत कठीण आहे, कारण त्यापैकीं अनेक अदृश्य बाबींसबंधी विश्वसनीय आंकडे मिळविणें अशक्य आहे; तरी शक्य तेवढे आंकडे जमवून परराष्ट्रीय हिशेबाच्या आढाव्याचें पुढील कोष्टक तयार केलें आहे. त्यावरून महायुद्धापूर्वी प्रतिवर्षी सरासरीनें हिंदुस्थानाचें परराष्ट्रांकडे ७८·२ कोटी रुपये येणें निघे, व हा आंकडा महायुद्धाच्या पाच वर्षांत ७६·३ कोटी व महायुद्धानंतरच्या पांच वर्षांत ५२·४ कोटी इतका होता असें दिसून येईल. खाजगी व्यापाराच्या ह्या तफावतीचा मोबदला सोन्याचांदीची आयात होऊन व स्टेट सेक्रेटरीनें हुंड्या विकून हिंदी लोकांस मिळत असे. स्टेट सेक्रेटरीच्या ह्या हुंड्या मुख्यतः हिंदुस्थानसरकारचा विलायती खर्च भागविण्यास, रुपये पाडण्याकरिता चांदी विकत घेण्यास, कर्ज फेडण्यास अगर भांडवल म्हणून खर्च करण्यास, जरूर तो पैसा लंडनमध्यें आपल्या हातीं यावा म्हणून हिंदुस्थान सरकारवर विकल्या जात. व्यापारी आढाव्यानें हिंदुस्थानाचें इतर राष्ट्रांकडे सुमारें पाऊणशें कोटी रुपये येणें निघतें, असें असून सोन्याचांदीची आयात त्या मानानें मात्र फारच थोडी होते व स्टेट सेक्रेटरी आपल्या स्वतःच्या मामुली व विशेष खर्चाकरिता लागणाऱ्या रकमेपेक्षां अधिक किंमतीच्या ज्या हुंड्या विकतो त्या वाढाव्याच्या किंमतीच्या हुंड्यांबद्दल हिंदुस्थानास कांहींच मोबदला मिळत नाही असें वरवर पहाणारास वाटण्याचा संभव आहे. परंतु, परकी धंदेवाल्यांनी हिंदुस्थानांत मिळविलेला नफा हा अशा अप्रत्यक्ष मार्गानेंच त्यांच्या घरपोहोंचता व्हावयाचा असतो. हिंदुस्थानांत परकी धंदेवाल्यांचें अदमासें ८०० कोटी रुपये भांडवल गुंतलें आहे असें मानलें तर सुमारें ४० कोटी रुपये तरी त्यांचा निव्वळ नफा म्हणून प्रतिवर्षी विलायतेस पाठविणें आवश्यक होईल. ही ४० कोटींची रक्कम हिंदुस्थानाच्या कर्जखातीं घातली तर हिंदुस्थानांत निव्वळ आयात अधिक होत आहे असेंही दिसेल. ही निव्वळ आयात म्हणजे अर्थातच परकी भांडवलवाल्यांनी प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें येथील धंद्यांत गुंतविलेला अधिक पैसा होय हें निराळें सांगावयास नको. १९१३ सालापासून आजपर्यंतच्या परदेशी व्यापाराच्या आढाव्याचे सविस्तर आंकडे पुढील कोष्टकांत दिले आहेत:—

## हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा

( + अशी खूण निव्वळ निर्यातीकरितां व — अशी खूण निव्वळ आयातीकरितां केली आहे. )

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| | १९१३–१४ अखेरच्या पांच वर्षांची सरासरी. ( महायुद्धापूर्वीचा काळ ) | १९१८–१९ अखेरच्या पांच वर्षांची सरासरी ( महायुद्धाचा काळ ) | १९२३–२४ अखेरच्या पांच वर्षांची सरासरी ( महायुद्धानंतरचा काळ ) | १९१९–२० महायुद्ध संपल्यानंतरचें वर्ष | १९२४–२५ | १९२५–२६ | १९२६–२७ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ खाजगी हिंदी मालाची निर्यात | + २१९.६ | + २१५.९ | + २८५.६ | + ३०९.० | + ३८४.५ | + ३७४ ८ | + ३०१ ४ |
| २ परकी मालाची पुन्हां निर्यात | + ४.६ | + ८.१ | + १५.६ | + १७.७ | + १३.५ | + १०.४ | + ८ ० |
| ३ परकी मालाची आयात | – १४५.८ | – १४७.८ | – २४८.८ | – २००.८ | – २४३.१ | – २२४.२ | – २३०.१ |
| ४ खाजगी मालाच्या व्यापाराचा आढावा. | + ७८.२ | + ७६.३ | + ५२.४ | + १२५.९ | + १५५.० | + १६१.१ | + ७९.२ |
| ५ सोनें ( खाजगी ) | – २८.१ | – ७.८ | – १३.९ | – १०.९ | – ७३.९ | – ३४.८ | – १९.४ |
| ६ चांदी ( खाजगी ) | – ७.२ | – २.९ | – ११.७ | + .१ | – ०२.० | – १७.१ | – १९.७ |
| ७ चलनी नोटा ( खाजगी ) | — | — | —.४ | – .१ | —.२ | – —१ | — .१ |
| ८ सोनें चांदी व पैसाअडका ह्यांच्या खाजगी व्यवहाराचा आढावा. | – ३६.० | – १०.८ | – २६.१ | + १६.८ | – ९४.२ | – ५२.८ | – ३९.३ |
| ९ अंतर्राष्ट्रिय देवघेवींच्या दृश्य बाबीचा आढावा. | + ४२.२ | + ६५.५ | + २६.३ | + ११५.१ | + ६०.७ | + १०९.२ | + ३९.९ |

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारावर विकलेल्या हुंड्या, हिंदुस्थानसरकारानें हिंदुस्थानांत विकत घेतलेल्या लंडनवरलि हुंड्या, व हिंदुस्थानातील व्यापारी व पेढ्या ह्यांच्या विलायतेंतील ठेवी घेऊन त्या मोबदला त्यांस येथें दिलेल्या रकमा ह्या तिहींची बेरीज. | − | ४१.३ | − | ३४.९ | − | १५.४ | − | ३६.८ | − | ५६.३ | − | ६१.२ | − | २.८ |
| ११ हिंदुस्थान सरकारनें लंडनवर विकलेल्या हुंड्या. | + | .५ | + | ५.५ | + | ९.४ | + | १८.५ | | — | | — | | १.९ |
| १२ सरकारी कर्जरोख्यांचा व्यवहार | − | .८ | − | .३ | − | .०५ | − | १.३ | − | .२ | − | १.२ | + | .०३ |
| १३ हिंदुस्थानसरकारच्या कर्जरोख्यांवरील व्याज हिंदुस्थानांत मिळण्याबद्दल हुंड्या. | − | .४ | − | .३ | − | .३ | − | .२ | − | .४ | − | .३ | − | .३ |
| १४ सरकारतर्फे झालेल्या पैशाच्या व्यवहाराचा आढावा. | − | ४२.६ | − | ३०.१ | − | ६.३ | + | १९.८ | − | ५७.१ | − | ६२.८ | − | १.२ |
| १५ सर्व दृश्य बाबींचा हिशेब करून निघणारा आढावा. | − | .४ | + | ३५.४ | + | १९.९ | + | ९५.३ | + | ३.६ | + | ४६.३ | + | ३८.७ |

**३ व्यापारी आढाव्यांतील बाकी चुकविण्याची पद्धतः**—दृश्य व अदृश्य अशा सर्व देण्याघेण्याच्या बाबींची (आयात व निर्यात हुंड्यांच्या खरेदीविक्रीनें वजावाट होऊन राहिलेली) शिल्लक सोन्याचांदीच्या अगर स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्याच्या साहाय्यानें कशी चुकविली जाते, त्याबद्दल एखाद्या विवक्षित वर्षाचे सर्व आंकडे घेऊन खुलासा करणें उपयुक्त होईल. आपण महायुद्धाच्या वेळचेंच १९१६--१७ साल हें उदाहरणात्मक मानल्यास असें दिसतें कीं, त्या वर्षी खाजगी मालाच्या आयातनिर्यातीच्या व्यापारांत ९०·२७ कोटी रुपयांनी आढावा हिंदुस्थानास अनुकूल होता. म्हणजे विलायती माल हिंदुस्थानांत आणणाऱ्या व्यापाऱ्यांची परकीय चलनाबद्दल, किंवा सॉव्हरिनाबद्दल, जी मागणी होती त्यापेक्षां हिंदुस्थानाचा माल आपापल्या देशांत नेणाऱ्या परकीयांची रुपयांस असलेली मागणी सुमारें ९० कोटी रुपयांनी अधिक होती. हिंदुस्थानातून निर्यात झालेल्या मालाची किंमत परदेशांतून येथें आलेल्या मालाच्या किंमतीतून परस्पर भागावी, म्हणजे निर्यात मालाच्या व आयात मालाच्या हुंड्याची परस्पर वजावाट व्हावी, असें म्हटलें तरी आयात हुंड्यांच्या किंमतीहून निर्यात हुंड्यांची किंमत ९० कोटि रुपये अधिकच भरत होती. येथील व्यापाऱ्यांस ही रक्कम हुंड्यांच्या व्यवहारांखेरीज इतर मार्गांनीं मिळणें आवश्यक होतें. हे ९० कोटी रुपये कांहीं अंशीं सरकारनें हुंड्याबद्दल चलन पुरवून व काहीं अंशीं अदृश्य अशा आयातीबद्दल हिंदी शिपाइकांनीं दिलेल्या पैशातून भागले गेले. सरकारकडून पुरविण्यांत आलेल्या चलनाची एकदर रक्कम ५९·०४ कोटी रुपये होती व तिचा तपशिल पुढीलप्रमाणें होता.

| | | |
|---|---|---|
| १ | स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थानसरकारवर विकलेल्या हुंड्या वटविण्याकरितां दिलेलें चलन. ... ... | ४७·०७ कोटि |
| २ | पोस्टांतून मनीऑर्डरी आल्या त्यांबद्दल मिळालेलें चलन. ... ... ... ... | ३·३० ” |
| ३ | इराण व इतर देश येथून हिंदुस्थानसरकारवर पाठविलेल्या तारेच्या हुंड्याची रक्कम. ... ... | ४·५० ” |
| ४ | पूर्व आफ्रिकेंतील सरकारामार्फत एका हिंदी पेढीस दिलेली रक्कम. ... ... ... | ३·६७ ” |
| ५ | ब्रिटिश सरकारच्या खास हुकुमतीखालील कांहीं वसाहतींतून हिंदुस्थानसरकारवर विकलेल्या हुंड्या. ... | ·२३ ” |
| ६ | मेसापोटेमियामधून परत आलेल्या सरकारी नोटा वटविण्यास द्यावे लागलेले रुपये. ... ... | ·३० ” |
| | एकूण सरकारमार्फत भागविलेली परराष्ट्रीयांची हिंदी चलनाबद्दलची मागणी | ५९·०४ ” |

ह्याखेरीज सुमारें ३१ कोटी रुपये खाजगी व्यापाऱ्यांच्या आढाव्यानें परराष्ट्रीयां-कडे फिरावयाचे, त्याची विल्हेवाट पुढीलप्रमाणें झाली. अंतर्राष्ट्रीय देवघेवींचाच मुख्यतः व्यवहार करणाऱ्या पेढ्यांच्या मार्फत २५ कोटी रुपयांच्यावर रक्कम मालाच्या आयातीखेरीज इतर कारणांनीं परदेशांस पाठविली गेली. त्यापैकी सुमारें ७॥ कोटी रुपये रक्कम हिंदुस्थानांतील लोकांनीं ब्रिटिश सरकारचे निरनिराळ्या प्रकारचे कर्ज-रोखे विकत घेण्यास पाठविली होती. शिवाय, ब्रिटिश नागरिकांचें येथील मंडळ्यांत खाजगी रीतीनें भांडवल गुंतलेलें आहे त्यावरील नफा म्हणून आणखी एक मोठी रक्कम इंग्लंडला पाठविली गेली. इंग्लंडांत नोंदलेल्या परंतु हिंदुस्थानांत धंदा कर-णाऱ्या अशा मंडळ्यांचा नफा पेढ्यांमार्फत विलायतेस पाठविला गेला त्याची रक्कमही सुमारें ७॥ कोटी रुपये झाली. ह्याखेरीज शिल्लक राहिली ती रक्कम, म्हणजे त्या वर्षांत चुकवितां न आलेली, हिंदुस्थानाची परराष्ट्रांकडील बाकी होय. अशा बाक्या अनेक कारणांनीं सांठून राहतात व मग एखादे वर्षांत त्या सर्व चुकत्या झाल्या म्हणजे आयात व्यापारांत एकदम वाढ दिसून येते. महायुद्धाच्या काळांत व त्यानंतरच्या एक दोन वर्षांत परकी राष्ट्रांकडे अशाच बाक्या तुंबून राहिल्यानें १९२०-२१ मध्यें मालाच्या निर्यातीपेक्षां आयातीची किंमत ७६ कोटींनीं अधिक भरली. एकाच देशांतील व्यक्तिव्यक्तींमधील देण्याघेण्याप्रमाणेंच भिन्न राष्ट्रांतील लोकांच्या देण्याघेण्याचाही पूर्ण हिशेब विवक्षित वर्षाच्या शेवटीं पूर्णपणें चुकता होतोच असें नाहीं. देणें व घेणें ह्या दोहोंच्या रकमा एका वर्षाच्या हिशेबांतून पुढील वर्षाच्या हिशेबांत ओढाव्या लागतात.

स्टेट सेक्रेटरी हिंदुस्थानसरकारावर हुंड्या विकून येथील पैसा विलायतेस आक-र्षण करून घेतो. सरकारनें विलायतेहून सामानसुमान अगर सोनेचांदी ह्यांची आयात केली असेल तिची किंमत ह्या हुंड्याच्या विक्रीतूनच भागते. त्याचप्रमाणें, मुलकी व लष्करी पेशाच्या परकी नोकरांस येथें आणून त्यांजकडून अनेक कामगिऱ्या सरकार करून घेतें. ह्या अदृश्य आयातीचा मोबदलाही स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांच्या विक्रीतून द्यावा लागतो. म्हणजे हिंदुस्थानांत खाजगी व्यापाऱ्यांनी मालाची आयात केल्यास ती ज्याप्रमाणें अंतर्राष्ट्रीय हिशेबाच्या आढाव्यांत खर्च खातीं दाखवावयाची त्याचप्रमाणें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्याही अदृश्य आयातींच्या किंमती भागविण्याकरितां काढलेल्या असल्यानें व त्या वटविण्यास हिंदुस्थानसरकारास एकंदर राष्ट्राच्या वतीनें आपल्या शिलकेंतून पैसे द्यावे लागत असल्यानें, खर्चखातींच दाखविणें भाग आहे. खासगी व्यापाऱ्यानें विला-यतेहून मालाची आयात केली तर तो एखाद्या निर्गत व्यापाऱ्याची लंडनवरील हुंडी येथें विकत घेऊन ती आपल्या विलायती धनकोस पाठवून आपलें देणें देऊन टाकतो. हिंदुस्थानसरकारही अलीकडे हिंदुस्थानांत लंडनवर मिळणाऱ्या निर्यात

व्यापाऱ्यांच्या हुंड्या विकत घेऊन त्या स्टेट सेक्रेटरीमार्फत विलायतेंत वटविते व आपल्या धनकोंचें देणें देऊन टाकतें. सामान्यतः हिंदुस्थानसरकार व स्टेट सेक्रेटरी येथून विलायतेस पैसे पाठविण्याचा व्यवहार पेढ्यांशीं व मोठमोठ्या धंदेवाल्यांशीच करतात. हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांस त्यांच्या मालाबद्दल अनेक विलायती गिऱ्हाइकांस पैसे पाठवावयाचे असतात व ते एखाद्या अंतर्राष्ट्रीय पेढीच्या लंडनमधील शाखेंत पैसे भरून हिंदुस्थानांतील शाखेंत ते उपलब्ध होण्याची खटपट करतात. परंतु हिंदुस्थानांत विलायती माल आलेला असतो त्या मालाच्या हुंड्या लंडन येथील पेढी विकत घेते व गिऱ्हाइकांकडून त्यांचे पैसे वसूल करण्याकरितां हिंदुस्थानास पाठविते. हिंदुस्थानाच्या एकंदर व्यापारी देवघेवींपैकी निर्यात हुंड्यांची किंमत आयात हुंड्यांहून अधिक असल्यानें लंडन येथील पेढ्यांस हिंदुस्थानास सॉव्हरिन पाठवून त्यामोबदला रुपये मिळवून निर्यात व्यापाऱ्यांची शिल्लक मागणी भागवावी लागते. परंतु, स्टेट सेक्रेटरी हाही एक हिंदुस्थानास मोठ्या प्रमाणावर माल व कामगिऱ्या पुरविणाऱ्या व्यापाऱ्यांप्रमाणें असल्यानें तो आपल्या गिऱ्हाइकांवर म्हणजे हिंदुस्थानसरकारवर हिंदुस्थानांत आयात होणाऱ्या इतर मालांच्या हुंड्यांप्रमाणें हुंड्या लिहून त्या लंडन येथील अंतर्राष्ट्रीय पेढ्यांस विकतो. ज्याप्रमाणें अशा इतर आयात हुंड्यांचे पैसे हिंदुस्थानांतील पेढ्यांच्या शाखांमार्फत शेवटीं गिऱ्हाइकांकडून वसूल होतात त्याचप्रमाणें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्याचे पैसे शेवटी पेढ्यांमार्फत हिंदुस्थानसरकारकडून वसूल होतात. नुसत्या आयात व निर्यात व्यापाराचे आंकडे घेतले तर देवघेवीचा आढावा हिंदुस्थानास अनुकूल आहे असें वाटेल; तसेंच इंग्लंड देशाच्या एकंदर परराष्ट्रीय व्यापाराच्या आंकड्यावरून अंतर्राष्ट्रीय व्यापाराचा आढावा इंग्लंडास प्रतिकूल आहे असा समज होईल. कारण, हिंदुस्थानांत मालाची आयात मालाच्या निर्यातीहून कमी आहे व उलट इंग्लंडांत एकंदर निर्यातीहून आयात अधिक आहे. परंतु वरीलप्रमाणे कामगिऱ्यांची आयात व निर्यात ह्यांचा हिशेब केला तर आपणांस असें दिसेल की, इंग्लंड देश फार मोठ्या प्रमाणावर इतर देशांस कामगिऱ्या पुरवितो व त्या मोबदला पुष्कळ किंमतीच्या मालाची इंग्लंडमध्यें आयात होते. उलट, हिंदुस्थान देशांत मोठ्या प्रमाणावर परकी कारागीर, नोकर, भांडवलवाले, धंदेवाले इत्यादिकांच्या कामगिऱ्यांची आयात केली जाते म्हणून पुष्कळ किंमतीचा माल परदेशास पाठवून त्यांच्या वेतनाची फेड करावी लागते; शिवाय, हिंदुस्थानसरकार अगर येथील एखादी स्थानिक किंवा व्यापारी संस्था ह्यांनीं परदेशांत कर्ज उभारलें तर त्या रकमेइतकें हिंदुस्थानाचें तात्पुरतें दुसऱ्या देशांकडे येणें आहे असाच हिशेब होईल, म्हणजे परदेशाहून कर्जाऊ आणलेलें भांडवल हें हिंदुस्थानांत येईपर्यंत अदृश्य निर्यातीवजाच मानलें पाहिजे. परंतु हळुहळू व्याज व मुदलांतील फेड ह्या नात्यानें हिंदी ऋणकोंस जसजसे परदेशांत पैसे पाठवावे लागतील तसतसे ते अदृश्य आयातीच्या

मोबदला पाठविले गेले असें म्हणावें लागेल. जें राष्ट्र मोठया प्रमाणावर परकी नोकर, कारागीर, भांडवलवाले इत्यादिकांचा उपयोग करतें त्यांस दृश्य मालाची निर्यात आयातीहून अधिक करून आपलीं परराष्ट्रीय देणीं भागविणें जरूर पडतें. उलट, इंग्लंडसारख्या ज्या राष्ट्रांतील नोकर व धंदेवाले व सावकार ह्यांचा इतर देशांत मोठ्या प्रमाणांत उपयोग केला जात आहे त्या राष्ट्रांस दृश्य मालाच्या निर्यातीहून अधिक किंमतीच्या मालाची आयात करणें परवडतें. आयात व निर्यात व्यापाराचें हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीच्या दृष्टीनें खरें महत्त्व काय व स्टेट सेक्रेटरीचा व हिंदुस्थानसरकारचा त्यांतील भाग कोणत्या स्वरूपाचा आहे हें प्रस्तुत विवेचनावरून दिसेल.

**४ अदृश्य आयातीचें खरें स्वरूपः**—एखाद्या राष्ट्राच्या परराष्ट्रीय व्यापारांत विवक्षित वर्षी आयात मालाच्या किंमतीहून निर्यात मालाची किंमत अधिक असली तर तेवढ्यावरून त्या राष्ट्राच्या सांपत्तिक परिस्थितीविषयी अनुकूल अनुमान काढणें बरोबर नाही, हें मागील प्रास्ताविक भागांतील व वरील विवेचनावरून स्पष्ट झालें आहे. परंतु हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापाराच्या आढाव्यांत निर्यात मालाची किंमत नेहमीच आयात मालाच्या किंमतीहून अधिक असल्यानें ह्या निव्वळ निर्यातीच्या मोबदला हिंदुस्थानास मिळणाऱ्या अदृश्य अशा आयात बाबीचें राष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीनें खरें स्वरूप कोणतें ह्याबद्दल आजपर्यंत बराच वादविवाद झाला आहे. निव्वळ निर्यातीपैकीं जो भाग सोन्याचांदीच्या स्वरूपानें इकडे आणला जात नाही, विशेषतः स्टेट सेक्रेटरीच्या मार्फत होणाऱ्या खर्चाबाबत हुंड्यांच्या साहाय्यानें ज्या रकमा परस्पर इंग्लंडांत वसूल केल्या जातात तेवढा पैसा म्हणजे 'दुर्बल व परतंत्र हिंदुस्थानानें श्रीमंत व सत्ताधारी इंग्लंडास दिलेली खंडणी,' अगर 'आधींच निःसत्व झालेल्या देशाच्या आर्थिक शरीरास लागलेल्या जळवा' होत अशी एकांतिक मतेंही कधीं कधीं ऐकूं येतात. उलट, प्रस्तुत प्रकारचा अनुकूल व्यापारी आढावा हा, परदेशांतील कार्यक्षम अधिकारी, कुशल व तरबेज कारागीर, कर्तृत्ववान् धंदेवाले आणि भांडवलाचे धाडसी मालक ह्यांच्या बिनमोल व आवश्यक कामगिऱ्यांचें वेतन होय असेंही सांगण्यांत येतें. अंतर्राष्ट्रीय व्यापाराबद्दल सर्वसामान्यपणें प्रास्ताविक भागांत व हिंदुस्थानाच्या विशिष्ट दृष्टीनें प्रस्तुत भागांत जें विवेचन केलें आहे त्यावरून हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापारांत नेहमी दिसून येणारा 'अनुकूल आढावा' म्हणजे इंग्लंडनें हिंदुस्थानाकडून फुकट उपटलेली संपत्ति नसून इंग्लंडांतील अधिकारी, सैनिक, पेढीवाले, धंदेवाले, भांडवलवाले, आगबोटीवाले, वगैरे लोक हिंदुस्थानांत व्यवसाय करतात त्यांची ती कमाईच होय हें सहज ध्यानांत येईल. परंतु ह्या बाबतीत महत्त्वाचे दोन प्रश्न आहेत. पहिला प्रश्न असा की, अधिकारी, सैनिक, धंदेवाले, भांडवलवाले वगैरे मंडळी इंग्लंडांतून येथें आणण्यापूर्वी हिंदुस्थानांत त्या प्रकारच्या

लोकांचा जो पुरवठा असतो त्याचा पूर्णपणें उपयोग करण्यास व त्यांत योग्य वाढावा होण्यास सरकारचें धोरण अनुकूल आहे किंवा कसें ? दुसरा प्रश्न असा कीं, नोकर, धंदेवाले अगर भांडवलवाले ह्या नात्यानें परकीयांच्या कामगिऱ्यांचा येथें उपयोग सुरू झाला म्हणजे त्यांस द्यावी लागणारी किंमत स्पर्धा व कार्यक्षमता ह्यांस अनुसरून कमींत कमी रहावी अशी सरकार खबरदारी घेतें किंवा आपल्या जातभाईस येनकेन प्रकारेण होईल तेवढी कमाई हिंदी लोकांच्या खिशातून मिळवून देण्याचा प्रयत्न करीत असतें ? ह्या दोन प्रश्नांचें उत्तर सरकारी धोरणास बहुंशीं प्रतिकूल असेंच मिळणार व ज्या मानानें हिंदुस्थानांतून इंग्लंडला आज जात असलेल्या संपत्तीत इंग्लिश लोकांस हिंदुस्थानात असमर्थनीय मार्गानें व अनावश्यकपणें मिळालेल्या संपत्तीचा भाग अधिक असेल त्या मानानें निव्वळ निर्यात म्हणजे इंग्लंडनें हिंदुस्थानाकडून घेतलेली खंडणी अगर हिंदुस्थानास लागलेल्या आर्थिक जळवा असें म्हणण्यास हरकत नाही. परदेशांतील भांडवल व तज्ञ ह्याचा जरूर तेव्हां उपयोग करून घेणें आवश्यक व हितावहही आहे ह्याबद्दल अर्थशास्त्राच्या कोणाही विद्यार्थ्यास शंका नाहीं. परंतु जीं कामें हिंदी लोकाकडून कार्यक्षमतेनें होण्याची खात्री आहे ती करण्यास इंग्रज लोक आणणें व त्यांसही प्रमाणाबाहेर कमाई करून देणें हें देशाच्या आर्थिक हितास सर्वथैव बाधकच समजलें पाहिजे. हिंदुस्थानास इग्लंडच्या सहवासानें शांततेची प्रस्थापना, दळणवळणाच्या साधनांची वाढ इत्यादि स्वरूपानें फायदा झाला तसाच इंग्लंडासही आर्थिक व राजकीय स्वरूपाचे अनेक फायदे हिंदुस्थानापासून मिळाले आहेत. परस्पर फायद्याच्या ह्या मोजणीवरून हिंदी लोकांस मागें टाकून इंग्रजांस भारी कमाई होण्याचीं अनेक साधनें येथें उपलब्ध करून देण्याच्या धोरणाचे कधीही समर्थन होऊ शकणार नाहीं. हिंदी लोकांस राज्यघटनेंत पूर्ण अधिकार मिळून, हिंदुस्थानसरकारानें सहानुभूतीचें व औद्योगिक सरक्षणाचें धोरण स्वीकारलें नाही व परकी नोकर आणि भांडवलवाले ह्यांची संख्या किमान मर्यादेपर्यंत उतरली नाही तोपर्यंत हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापारांत असमर्थनीय स्वरूपाचा असा एक भाग कायम राहणारच.

**५ स्टेट सेक्रेटरीच्या महायुद्धकालीन हुंड्या**—हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा संपूर्णतेनें समजण्यास स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांचे कार्य नीट ध्यानांत येणें आवश्यक असल्यानें प्रस्तुत प्रकरणांत त्यांचें स्पष्टीकरण केलेलें आहे. महायुद्धाच्या असामान्य परिस्थितीत हुंड्यांचा हा व्यवहार स्टेट सेक्रेटरीनें कोणत्या प्रकारानें केला व त्याचे हिंदुस्थानाच्या चलनपद्धतीवर, उद्योगधंद्यांवर व सरकारच्या आर्थिक सामर्थ्यावर कोणते परिणाम झाले हें समजून घेणें उपयुक्त होईल. १९१६–१७ ह्या युद्धकालीन वर्षांतील आयातनिर्यातीचे आंकडे मागें दिले आहेत व जवळ जवळ साठ कोटि रुपयांपर्यंत स्टेट सेक्रेटरीनें हिंदी व्यापाऱ्यांकडे यावयाच्या परकी

पैशाचा ओघ हुंड्यांच्या मार्गानें आपल्याकडे वळविला व तितक्या किंमतीचें चलन हिंदुस्थानसरकाराकडून येथील लोकांस देवविलें, असें त्यांवरून दिसेल. ह्याच वेळीं ब्रिटिश सरकारच्या वतीनें हिंदुस्थानसरकार युद्धविषयक खर्च मोठ्या प्रमाणांत भागवीत होतें. ह्या रकमा वास्तविकपणें ब्रिटिश सरकाराकडून हिंदुस्थानसरकारास येणें असलेलें कर्जच होत्या. त्यांपैकीं बराच मोठा भाग स्टेट सेक्रेटरीनें अल्प मुदतीच्या इंग्लिश सरकारच्या कर्जरोख्यांच्या स्वरूपांत परस्पर इंग्लंडांत वसूल करून घेतला. निर्यात व्यापाऱ्यांची हुंड्यांस असलेली मोठी मागणी व ब्रिटिश सरकाराकरितां हिंदुस्थान-सरकारास भागवावा लागणारा खर्च ह्या दोहोंचा परिणाम असा होई कीं, हिंदुस्थान सरकाराजवळील सर्व शिलका अप्रत्यक्षपणें लंडन येथें स्टेट सेक्रेटरीजवळ जाऊन पडत. १९१६–१७ साली ह्याप्रमाणें ७ कोटि पौंडावर रक्कम हिंदुस्थान सरकाराजवळून स्टेट सेक्रेटरीच्या हातात गेली. हातांतील शिलका वापरून, नवे रुपये शक्य होतें तोंवर पाडून व लंडनमधील कर्जरोख्यांच्या तारणावर येथें नोटा काढून हिंदुस्थानसरकारास हुंड्या व युद्धखर्च ही भागवावी लागली. स्टेट सेक्रेटरीनेंही हातीं आलेल्या ७ कोटि पौंड रकमेची विल्हेवाट कांहीं रकमा नित्य खर्चाकरिता, कांहीं चांदी विकत घेण्याकरितां, कांहीं कर्जफेडीकरितां व कांहीं सुवर्णनिधि व नोटांस तारण असलेला निधी ह्यांमार्फत कर्जरोख्यांत गुंतविण्याकरितां वापरून केली. पुढील दोन वर्षांत म्हणजे १९१७–१९१८ व १९१८–१९१९ ह्या सालांत निर्गत व्यापाराची किंमत फेडण्याकरितां स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांस असलेली मागणी व ब्रिटिश सरकारमार्फत हिंदुस्थानांत करावयाचा खर्च ह्या दोहोंचे आंकडे वाढतच गेले. वरील मार्गांखेरीज कमीअधिक मुदतीचें कर्ज काढूनही ह्या मागण्या हिंदुस्थान सरकारास भागवाव्या लागल्या. हिंदुस्थानांत सरकारच्या तिजोऱ्या अशा तऱ्हेनें कोरड्या पडत असता स्टेट सेक्रेटरीजवळ मात्र ब्रिटिश चलनाचा व कर्जरोख्यांचा पूर येत होता. त्यांपैकीं जरूर तेवढा भाग स्वतःच्या नेहमीच्या खर्चास घेऊन बाकीची रक्कम निरनिराळ्या खात्यांतर्फें, व विशेषतः नोटांस तारण असलेल्या निधीमार्फत, लंडनमध्यें व्याजी लावून स्टेट सेक्रेटरीनें त्यांची विल्हेवाट केली. शिवाय, दहा कोटि पौंड एवढी रक्कम हिंदुस्थानामार्फत ब्रिटिश सरकारास युद्धखर्चाप्रीत्यर्थ देणगी म्हणून देण्यांत आल्यानें तेवढ्या किंमतीचे ब्रिटिश सरकारचें स्टेट सेक्रेटरीजवळ असलेले कर्जरोखे रद्दच झाले. ह्या देणगीची रक्कम ब्रिटिश सरकारच्या एकंदर युद्धखर्चाच्या मानानें अगदींच अल्प होती हें खरें आहे. तरी ऐनवेळीं हिंदुस्थानसारख्या गरीब राष्ट्रानें तेवढी रक्कम इंग्लंडास बहाल केल्यानें ब्रिटिश सरकारास परकी कर्ज वारणें सोपें झालें. वास्तविक पाहतां स्टेट सेक्रेटरीजवळ एवढ्या रकमा शिल्लक असतां त्यानें हिंदुस्थान-सरकारास असलेलें विलायतेंतील कर्ज देऊन टाकण्याचें मनांत आणलें असतें तर

आर्थिक दृष्ट्या हिंदुस्थानाचा फायदाच झाला असता. परंतु तसें न करतां, अधिक रकमा लंडन येथेंच व्याजी लावून स्टेट सेक्रेटरीनें ब्रिटिश सरकार व ब्रिटिश व्यापारी आणि पेढीवाले ह्यांस त्यांची कर्जें फेडण्यास व चलनविषयक मागणी भागविण्यास मोठीच मदत केली. ह्या धोरणाचा हिंदी चलनपद्धतीवर व हिंदुस्थानसरकारच्या सांपत्तिक परिस्थितीवर किती अनिष्ट परिणाम झाला, ह्याचें मागील प्रकरणांत दिग्दर्शन केलेलेंच आहे.

६ **स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांचें कार्य**--हिंदुस्थानसरकारतर्फे स्टेट सेक्रेटरीस विलायतेंत जेवढा खर्च करावा लागतो तेवढ्याच किंमतीच्या हुंड्या त्यानें हिंदुस्थानसरकारवर विकाव्या, किंवा हिंदुस्थानास पैसे पाठवूं इच्छिणाऱ्या इंग्लंडांतील व्यापाऱ्यांची मागणी भागविण्याकरितांही अशा हुंड्या विकण्याचें त्यानें अंगावर घ्यावें याबद्दल तज्ज्ञांत मतभेद होता. वास्तविकपणें स्टेट सेक्रेटरी ह्या दोन्ही कारणांनीं हुंड्या विकी व हिंदुस्थानसरकार हातांतील शिलकेंतून, सुवर्णनिधीतून व नोटांस तारण असलेल्या निधींतून रुपये देऊन त्या वटवीत असे. स्वतःचा खर्च भागून राहिलेली पौंडांची रक्कम स्टेट सेक्रेटरी तिकडे व्याजी लावी, कर्जफेड करण्यास उपयोगांत आणी अगर चांदी विकत घेण्यास खर्च करी. स्टेट सेक्रेटरीनें कायदेशीर दरानें हव्या तेवढ्या हुंड्या हिंदुस्थानसरकारावर विकणें हें सुवर्ण-परिवर्तन पद्धतीस सर्वथैव अनुसरूनच होतें. परंतु स्वतःच्या खर्चापेक्षां अधिक किंमतीच्या हुंड्या स्टेट सेक्रेटरीनें विकल्यास हिंदुस्थानकडे येणाऱ्या सोन्याचा ओघ मर्यादित होतो, गरीब हिंदी नागरिकांचेकडून प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें उभारलेले पैसे लंडनच्या पेढ्यास स्वस्ताईनें वापरण्यास सांपडतात, व हिंदुस्थानास मात्र परकी भांडवल भारी दरानें येथें आणावें लागतें, अशी प्रतिकूल टीका स्टेट सेक्रेटरीच्या धोरणावर केली जाई. उलट, सरकारी धोरणाचें समर्थन करूं इच्छिणारे लोक असें सांगत कीं ' स्टेट सेक्रेटरीनें हुंड्यांस असलेली मागणी पूर्णपणें न भागविली तर हिंदुस्थानांत सॉव्हरिन पाठविणें व त्यांच्या मोबदला हिंदुस्थानसरकारकडून रुपये घेऊन ते हिंदी उत्पादकांस देणें ब्रिटिश व्यापाऱ्यांस भाग पडेल. असें झालें म्हणजे हिंदुस्थानसरकारजवळच्या निधींतील सुवर्णमय भाग प्रमाणाबाहेर वाढून चांदी विकत घेण्यास तो परत इंग्लंडला पाठवावा लागेल. सोन्याची व चांदीची अशी वहातुक करणें गैरसोयीचें व खर्चाचें असल्यानें स्टेट सेक्रेटरीनें परस्पर हुंड्या विकून हातीं येणाऱ्या पौंडांच्या साहाय्यानें चांदी विकत घेऊन इकडे पाठवावी हेंच योग्य होय. शिवाय, हा पैसा लंडनमधील बँकांत व्याजी लावल्यानें हिंदुस्थानाचा फायदाही होतो. ' ही विचारसरणी अंशतः खरी आहे हें सांगावयास नको; परंतु ह्या तात्त्विक मुद्याच्या आधारावर स्टेट सेक्रेटरी निष्कारण कमी भाव लावून प्रमाणाबाहेर हिंदुस्थानसरकारावर हुंड्या विकी ह्याचें प्रत्यक्ष चेंबरलेन

कमिशनलाही समर्थन करतां आलें नाहीं, व सार्वजनिक हितसंबंधांस बाध येईल अशा तऱ्हेनें खाजगी व्यापाऱ्यांची हुंड्यांस असलेली मागणी भागविणें रास्त नाही असेंच त्या कमिशनचें मत पडलें. सुवर्णपरिवर्तनपद्धतीचें तत्त्व पूर्णपणें अंमलांत आणावयाचें तर हिंदुस्थानांत सॉव्हरिन मुळीच येऊं देणें इष्ट नव्हतें, परंतु तसें करणें सरकारास शक्य नव्हतें. अर्धवट व धरसोडीच्या धोरणानें हिंदी लोक व हिंदुस्थान सरकार ह्यांचा मात्र तोटा होई. बॅबिंग्टन स्मिथ कमिटीनें तर ह्या बाबतीत आपला असा निकाल दिला की स्टेट सेक्रेटरीनें स्वतःच्या सर्व गरजा भागविण्यास पुरेशा हुंड्या तेवढ्या विकाव्या, व्यापाऱ्यांची सोय व्हावी ह्या हेतूनें हुंड्या विकण्याचें कारण नाही. चालू खातीं व कायम स्वरूपाच्या खर्चाकरितां हिंदुस्थान-सरकारजवळ ज्या शिलकी असतात त्याच्यांत स्टेट सेक्रेटरीनें स्वतःच्या गरजांहून अधिक किंमतीच्या हुंड्या विकण्याचें धोरण ठेवल्यास अनपेक्षित घोटाळे उत्पन्न होतात व प्रसंगविशेषीं खर्च भागविण्यास तात्पुरतें कर्जही उभारावें लागतें. हिंदुस्थानसरकारकडून विलायतेंत स्टेट सेक्रेटरीकडे पैसे पाठविण्याचा हुंड्यांच्या विक्रीखेरिज मार्ग म्हणजे लंडनवरील हुंड्या हिंदुस्थान सरकारनें येथेंच विकत घेऊन त्या वटवण्याकरितां स्टेट सेक्रेटरीकडे पाठविणें हा होय. या मार्गाचें अवलंबन केल्यास स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांच्या बेसुमार विक्रीमुळें होणारे घोटाळे व नुकसान ही पुष्कळशी टळतील ह्यांत शंका नाही. १९२४–२५ सालापासून सरकारनें हें धोरण अंमलांत आणलें आहे. ह्या बाबतीत पुढील कोष्टकांतील माहिती उपयुक्त पडेल.

**हिंदुस्थानसरकाराकडून स्टेट सेक्रेटरीच्या खजिन्यांत पैशाचा भरणा केला गेला त्याचे मार्ग.**

( आंकडे पौंडांचे आहेत. वर्ष १९२४–२५. )

| | | |
|---|---|---|
| १ | लंडनवरील हुंड्या हिंदुस्थानात विकत घेऊन पाठविल्या त्यांची किंमत. ... | ३३,१९१,००० |
| २ | वरीलप्रमाणें हुंड्या लंडन येथें विकत घेतल्या त्यांची किमत. ... ... | ७००,००० |
| ३ | नोटांस तारण असलेल्या निधीपैकीं लंडन येथें असलेल्या भागातून स्टेट सेक्रेटरीनें आपल्या खर्चाकरिता घेतलेली रक्कम. ... ... ... ... | |
| ४ | सुवर्णनिधीच्या लंडन येथील ठेवीतून वरीलप्रमाणें घेतलेली रक्कम. ... ... | |
| ५ | स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थानसरकारवर विकलेल्या हुंड्यांची किंमत. ... ... | ७,५७९,१६२ |
| | | एकूण ४१,४७०,१६२. |

**७ स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांचे दर:**—विवक्षित काळीं रुपया व पौंड ह्यांमध्यें कायदेशीर प्रमाण असतें त्यास अनुसरून स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांचा एक किमान व एक कमाल असे दर असतात व ह्या मर्यादांसच मागें 'सुवर्णमर्यादा' असें म्हटलेलें आहे. रुपया व पौंड ह्यांचें परस्पर प्रमाण १५:१ हे असतांना हुंड्यांची किमान व कमाल किंमत अनुक्रमें करून १५ ७/८ व १६ १/८ पेन्स इतकी असे. स्टेट सेक्रेटरी १६ १/८ पेन्सांहून अधिक किंमत मागूं लागल्यास सॉव्हरिन हिंदुस्थानास पाठविणें हेंच ब्रिटिश व्यापाऱ्यांस किफायतशीर वाटे; उलट, ब्रिटिश व्यापारी १५ ७/८ पेन्सांहून कमी भावानें रुपये मागू लागल्यास स्टेट सेक्रेटरीस सुवर्णनिधींतून पैसे घेऊन किंवा लंडन-मध्यें कर्ज काढून आपली गरज भागवावी लागे. परंतु हुंड्यांस मागणी जास्त अगर कमी तीव्र असेल त्या मानानें कायदेशीर प्रमाणापेक्षां अधिक अगर कमी भावानें स्टेट सेक्रेटरीस आपल्या हुंड्या विकणें शक्य होत असे. ऑक्टोबर, महिन्याच्या सुरुवातीपासून तों मार्च महिन्याच्या अखेरपर्यंत हिंदुस्थानाचा निर्यात व्यापार जोरांत चालतो, त्यामुळें ह्या काळांत स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्यांस मागणीही जोराची असे. फक्त ह्या तेजीच्या हंगामांतच स्टेट सेक्रेटरीनें आपल्या हुंड्या विकल्या तर त्यांस भाव चांगला येऊन हिंदुस्थानसरकारची बचत झाली असती; परंतु पुढें हंगाम कसा होईल हें आधीं सांगणें पावसाच्या भविष्याइतकेंच अनिश्चित असल्यानें स्टेट सेक्रेटरी बाराही महिने हुंड्यांची विक्री नियमितपणे करीत असे. अशा धोरणानें स्टेट सेक्रेटरीस निश्चित भावानें पैसा मिळून शिवाय हुंडणावळीच्या दरांतही स्थैर्य उत्पन्न होण्यास मदत होते. हुंडणावळीचा भाव सुवर्णमर्यादेपेक्षां वर जाईल अशी भीति वाटतांच स्टेट सेक्रेटरीने आपल्या हुंड्या विकल्या म्हणजे त्या मोबदला दिलेल्या रुपयांनी व नोटांनी हिंदुस्थानांतील चलनांत, वाढ होई; उलट, सुवर्णमर्या-देपेक्षां हुंडणावळ कमी होईल असें वाटल्यास लंडनवर हिंदुस्थानांत हुंड्या विकल्यानें त्यांच्या मोबदला सरकारच्या हातांत चलन येऊन बाजारांतील चलनाचा पुरवठा कमी होऊन हुंडणावळ वाढण्यास मदत होत असे. स्टेट सेक्रेटरीनें हिंदुस्थान सरकारवर हुंड्या विकून चलनाचा पुरवठा वाढवावयाचा व हिंदुस्थान सरकारनें जरूर तेव्हां स्टेट सेक्रेटरीवर 'परत' हुंड्या विकून तो कमी करावयाचा असें चलनाच्या पुरवठ्याचें दुहेरी नियमन करणें सरकारास शक्य होतें तोंपर्यंत सुवर्णपरिवर्तन पद्धति यशस्वीपणें चालली. ह्या काळांत वर्षाच्या निर-निराळ्या महिन्यांत कमी—अधिक किंमतीच्या हुंड्या कसकशा विकल्या जात हें पुढील कोष्टकावरून दिसेल.

| महिना | १९१२–१३ | १९१३–१४ | १९१६–१७ |
|---|---|---|---|
| | हुंड्यांची एकंदर किं. | हुंड्यांची एकंदर किं. | हुंड्याची एकदर किं. |
| एप्रिल | २,७२ | ३,९२ | १,८० |
| मे | २,८३ | ८३ | २,९४ |
| जून | २,०९ | १,५० | १,३९ |
| जुलै | २,८२ | १,३१ | १,२० |
| ऑगस्ट | २,०१ | १,७० | १,५५ |
| सप्टेंबर | २,२२ | ४,०९ | १,४० |
| ऑक्टोबर | ३,५३ | ६,१२ | ४,१४ |
| नोव्हेंबर | ३,२० | ४,११ | १०,५८ |
| डिसेंबर | ४,८१ | ५,९० | ८,४५ |
| जानेवारी | ५,३७ | ६,८० | ४,६७ |
| फेब्रुवारी | ४,४१ | ४,९१ | ५,९४ |
| मार्च | २,४९ | ३,४१ | ४,८८ |
| एकूण | ३८,५० | ४६,६० | ४९,०४ |

इंग्लंडमध्ये हिंदुस्थानावर व हिंदुस्थानांत इंग्लंडवर कायदेशीर प्रमाणानें हुंड्या विकून चलनाचा पुरवठा नियमित करावयाचा व हुंडणावळ स्थिर राखावयाची, ह्या पद्धतीचा अमल महायुद्धकाली कां चालूं शकला नाही, त्याबद्दल मागील प्रकरणांत स्थूल मानानें विवेचन केलेलें आहे. विशेषतः चांदीच्या भावांत बेसुमार वाढ झाल्यानें व हिंदुस्थानास परकी राष्ट्रांकडून घेणें असलेले पैसे फार मोठ्या प्रमाणांत विलायतेंत तुंबून राहिल्यानें परदेशी हुंड्यांच्या व्यवहाराची नेहमीची पद्धत विस्कळित झाली व त्यांतच मूल्यमापनाचें परिमाण असलेला ऐनजिनसी सॉव्हरिन व ब्रिटिश चलनातील पौंड यांच्या किंमतींत फरक पडून हुंडणावळीचा दर पूर्वीसारखा स्थिर ठेवणें अशक्य झालें. सुवर्णपरिवर्तनपद्धतीत सरकारनें हुंडणावळीचा दर कायम ठेवण्याचें अंगावर घेतलें असूनही तसें करणें महायुद्धाच्या अपूर्व परिस्थितीत सरकारास शक्य झालें नाहीं, व हुंडणावळीचा दर आधी तात्पुरता व मग कायमचा बदलण्याचा सरकारकडून यत्न करण्यांत आला. सुवर्णपरिवर्तनपद्धतीत अंतर्गत व्यवहारांतील चलनाचा पुरवठा मर्यादित करून वाटेल तो हुंडणावळीचा दर कायम राखणें तात्त्विक दृष्ट्या शक्य असतें हें खरें. तरी एकदां एक दर कायम केला म्हणजे मूल्यमाप-

नाचें साधन ह्या नात्यानें अंतर्गत चलनास विवक्षित सोन्याच्या परिमाणाइतकें मूल्य दिलें जातें; व हुंडणावळ बदलल्यानें मूल्यमापनाचें परिमाणच बदलून देण्याघेण्याच्या व्यवहारांत कृत्रिम घोटाळे व नफानुकसानें उत्पन्न होतात. सुवर्णपरिवर्तनपद्धतीवर कृत्रिमपणाचा दोषारोप पहिल्यापासूनच होत होता. परंतु महायुद्धकाली व पुढें स्मिथ कमिटीच्या शिफारशीनंतर सरकारास हुंडणावळ स्थिर ठेवणें कृत्रिम उपायांनींही अशक्य झाल्यानें ती पद्धति यशस्वी रीतीनें चालून दाखविण्याइतकें आर्थिक सामर्थ्य अगर बौद्धिक बल सरकारजवळ नाहीं असें सिद्ध झालें.

महायुद्धापूर्वी चांदीचा भाव औंसास सुमारें २४-२५ पेन्स इतका असे, तो १९१७ च्या ऑगस्ट महिन्यांत ४६ पेन्सांवर गेला व पुढें तो एकसारखा वाढत जाऊन १९२० च्या फेब्रुवारी महिन्यात ८९॥ पेन्सइतका झाला. चांदीचा भाव जोंपर्यंत १ औंसास ४४ पेन्स ह्याहून कमी होता तोंपर्यंत रुपयांतलि चांदीची किंमत १६ पेन्सांहून कमी किंमतीची भरत असे व रुपया वितळवून ती विकणें किफायतशीर नव्हतें. परंतु ४४ पेन्सांस एक औंस चांदी इतका भाव होतांच रुपयांतील चांदीची बाजारी किंमत १६ पेन्सांवर भरे. पुढेंही ह्यापेक्षां जास्त भाव झाल्याबरोबर लोकांनी रुपये वितळूं नयेत व हिंदी चलनास असलेली मागणी भागवितां यावी ह्या हेतूंनी हुंडणावळीचा दरही सरकारनें वाढविला. चांदीच्या भावांत व हुंडणावळींत क्रमशः झालेली वाढ ध्यानांत येण्यास पुढील कोष्टकें उपयुक्त आहेत.

## चांदीच्या किंमतींत वाढ

| वर्ष आणि महिना. | एका औंसाची पेन्सांत किंमत | | वर्ष व महिना | एका औंसाची पेन्सांत किंमत | |
|---|---|---|---|---|---|
| | जास्तीत जास्त | कमीत कमी | | जास्तींत जास्त | कमींत कमी |
| १९१४ सरासरी | २७ ३/४ | २२ १/४ | १९१८ डिसेंबर | ४८ ३/४ | ४८ ७/१६ |
| १९१५ ,, | २७ १/४ | २२ ५/१६ | १९१९ मे | ५८ | ५६ ९/१६ |
| १९१६ जानेवारी | २७ ५/१६ | २५ ११/१६ | १९१९ ऑगस्ट | ६१ ३/४ | ५५ ३/४ |
| १९१६ डिसेंबर | ३७ | ३५ १/१६ | १९१९ सप्टेंबर | ६४ | ६४ |
| १९१७ जानेवारी | ३९ १/८ | ३८ | १९१९ आक्टोबर | ६६ १/२ | ६२ ३/४ |
| १९१७ ऑगस्ट | ४६ | ४० १/८ | १९१९ नोव्हेंबर | ७६ | ६५ १/२ |
| १९१७ सप्टेंबर | ५५ | ४६ | १९२० जानेवारी | ८५ | ७५ ७/८ |
| १९१८ एप्रिल | ४९ १/४ | ४५ १/४ | १९२० फेब्रुवारी | ८९ १/२ | ८२ |

## हुंडणावळीच्या दरांत वाढ

| दर बदलल्याची तारीख | | तारेच्या हुंडीचा कमीत कमी दर | |
|---|---|---|---|
| | | शि. | पे. |
| ३ जानेवारी १९१७ | ... | १ | ४$\frac{१}{४}$ |
| २८ ऑगस्ट १९१७ | ... | १ | ५ |
| १२ एप्रिल १९१८ | ... | १ | ६ |
| १३ मे १९१९ | ... | १ | ८ |
| १२ ऑगस्ट १९१९ | ... | १ | १० |
| १५ सप्टेंबर १९१९ | ... | २ | ० |
| २२ नोव्हेंबर १९१९ | ... | २ | २ |
| १२ डिसेंबर १९१९ | ... | २ | ४ |

१८९३ सालापासून १९१७ पर्यंत हिंदुस्थानसरकारास चलनविषयक ज्या अडचणी उत्पन्न होत त्या बहुतेक चांदीचा भाव सारखा उतरत गेल्यामुळें हिंदुस्थानांत मागणीच्या मानानें चलनाचा पुरवठा अधिक होऊन हुंडणावळ कायदेशीर दराहून कमी होण्यासंबंधीच्या असत. १९०७ सालच्या दुष्काळांत व १९१५ सालीं परकी व्यापार एकदम तात्पुरता कमी झाला त्यावेळीं अशाच अडचणी उत्पन्न झाल्या व हुंडणावळ १ शि. ४ पेन्सांहून कमी होण्याची भीति वाटूं लागली. लंडनवर कायदेशीर दरानें जरूर तेवढ्या हुंड्या विकतां आल्यानें ही तात्पुरती अडचण दूरही झाली. परंतु १९१६–१७ पासून १९२०–२१ पर्यंत निर्यात व्यापाऱ्यांची व ब्रिटिश सरकारची हिंदी चलनास असलेली मागणी चढीची राहिल्यानें ती भागविणें सरकारास अशक्य झालें. त्यांतच चांदीच्या वाढत्या भावाची भर पडल्यानें सुवर्णपरिवर्तनपद्धतीचा डोलारा कोसळून पडला. ह्या वर्षांतील नव्या रुपयांचे व नोटांचे आकडे मागील प्रकरणांत दिले आहेत, त्यावरून हिंदुस्थानसरकारनें चलन पुरविण्याचे किती निकराचे प्रयत्न केले हें दिसून येतें. महायुद्धास लागणारा माल येथून पाठविला तर त्याचे पैसे ठराविक भावानें उत्पादकांच्या हातांत पडावे यास्तव परराष्ट्रीय देवघेवींचा व्यवहार करणाऱ्या पेढ्यांस विशेष सवलतीही देण्यांत आल्या. परंतु चलनास असलेली मागणी व चांदीची किंमत ह्या दोहींत कल्पनेच्या बाहेर वाढ होऊन हुंडणावळीचा दर वाढविणें सरकारास भाग पडलें. सुवर्णपरिवर्तनपद्धतीच्या तत्त्वास पूर्णपणें अनुसरावयाचें तर सरकारनें वाटेल तें करून, रुपयांतील चांदी कमी करून किंवा अपरिवर्तनीय नोटा काढूनही, हुंडणावळ कायम ठेवावयास पाहिजे होती, असें कित्येक तज्ज्ञांचें मत होतें व त्यांत तथ्यही बरेंच होतें. परंतु राजकीय व सामाजिक

कारणांस महत्त्व देऊन वरील मार्ग न अवलंबितां सरकारनें हुंडणावळीचा दरच वाढविला हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. असें करण्यानें निर्यात मालाच्या व्यापाऱ्यांचें जें कांही नुकसान झालें तें जगांतील वाढत्या किंमतींमुळें पुष्कळ भरून आलें व त्यांच्या तोट्याची भरपाई एकंदर राष्ट्राच्या दृष्टीनें आयात व्यापाऱ्यांचा फायदा होऊन झाली असेंही सरकारतर्फे सांगण्यांत आलें.

**८ हुंडणावळीच्या दरांत व किंमतींत वाढः**—युद्धकालीन परिस्थितीमुळें चलनास असलेल्या मागणींत बेसुमार वाढ होणें, सोन्याच्या व चांदीच्या वहातुकीवर निर्बंध पडल्यानें व चांदीच्या किंमतींत वाढ झाल्यानें धात्वात्मक अगर पुरेसें तारण असलेल्या कागदी चलनानें ती भागविता न येणें, बिन तारणाच्या कागदी चलनाचा सुळसुळाट होऊन किंमतींत वाढ होणें व त्यामुळें परराष्ट्रीय व्यापारांत घोंटाळा माजून हुंडणावळीचे दर प्रमाणाबाहेर वाढणें, हे अनुभव हिंदुस्थानाप्रमाणें इतर राष्ट्रांसही आले. सोन्याचांदीच्या वहातुकीचें व किंमतीचें, तसेंच परदेशी हुंड्यांच्या व्यवहाराचें जरूर तेवढें नियंत्रण करणें इंग्लंड व अमेरिका ह्या राष्ट्रांसही भाग पडलें होतें व जवळ जवळ शंभर वर्षे सोन्याइतकेंच शहाजोग समजलें गेलेलें ब्रिटिश चलनही अमेरिकन डॉलरच्या मानानें कमी किंमतीचें ठरलें. जी राष्ट्रे प्रत्यक्षपणे युद्धात पडलेली होती त्यांनी युद्धकालीन परिस्थिति नाहींशी होतांच कायम स्वरूपाची जुनी पद्धति शक्य तितकी पुन्हां अस्तित्वात आणली. हिंदुस्थानाचा महायुद्धात प्रत्यक्ष असा थोडाच भाग होता; उलट, दोस्त राष्ट्रांस भारी दरानें माल पुरवून व त्यांचे इतर राष्ट्रांतील बाजार अंशतः काबीज करून हिंदी धंदेवाल्यांनी आपलें हितच करून घेतलें होतें. ह्या आर्थिक भरभराटीचा फायदा चलनपद्धति अधिक पायाशुद्ध करण्याकडे किंवा सुवर्णचलनात्मक सुवर्णमूल्यमापनपद्धति स्थापण्याकडे करणें अशक्य नव्हतें. हे तर त्यांनी केलें नाहींच, पण उलट, होती ती सुवर्णपरिवर्तन पद्धतिही योग्यपणें हिंदुस्थानसरकारास चालविता आली नाही व हुंडणावळीच्या दरांत व परराष्ट्रीय व्यापारांत अनेक अनिष्ट फेरबदल त्यास करावे लागले, हे खचित भूषणावह नव्हे. महायुद्धाच्या काळांत सुवर्णपरिवर्तनपद्धति धडपणें चालूं शकली नाही हे माहीत असूनही चलनपद्धतीचा फेर विचार करण्यास नेमलेल्या बॅबिंग्टन स्मिथ कमिटीस, सुवर्णपरिवर्तन पद्धतीच्या अस्तित्वास धक्का न लावतां रुपयाचें सोन्याशी असलेलें प्रमाण, म्हणजे कायदेशीर हुंडणावळ, तेवढी बदललेल्या परिस्थितीस अनुसरून बदलण्यास व इतर आनुषंगिक गोष्टींचा विचार करण्यास सांगण्यात आलें. त्या कमिटीनें, चांदीच्या किमतीत वाढ झाल्यानेंही रुपये पाडणें तोट्याचें ठरूं नये व हुंडणावळ कमी होत जाऊन किंमतींच्या मानांत वाढ होऊं नये, ही दोन उद्दिष्टें पुढें ठेऊन १ रुपयास २४ पेन्स म्हणजे ११·३ ग्रेन वजनाचें सोनें, असा नवा कायदेशीर दर सुचविला. हुंडणावळीचा दर भारी झाल्यानें परदेशी वस्तूंच्या

किंमती तर उतरतातच, परंतु निर्यात व्यापारास आळा बसल्यानें एकंदर किंमतीचें मानही कमी राहतें. उलट, निर्यात व्यापार, म्हणजे हिंदुस्थानांतून परदेशी पाठविल्या जाणाऱ्या मालाच्या उत्पादकांचा व व्यापाऱ्याचा धंदा, व परदेशी मालाशी ज्याची स्पर्धा असते असे कारखानदार ह्यांच्या मालाच्या किंमती उतरल्यानें त्यांचें मात्र नुकसान होतें. हिंदुस्थान सरकारास विलायतेंत कराव्या लागणाऱ्या खर्चांत चढीच्या हुंडणावळीनें कशी बचत होते, हें मागें सांगितलेंच आहे.

हुंडणावळीचा दर कोणताही ठरविला तरी सरकारजवळ अंतर्गत चलनाचा पुरवठा नियमित करण्याचें सामर्थ्य आहे तोंपर्यंत तो चालू राहणें शक्य आहे व शेवटी पदार्थांच्या किंमती मूल्योद्भवाच्या सर्वसामान्य सिद्धान्तानें ठरतात तशा ठरून हुंडणावळीच्या दरातील बदलानें अक्षय नुकसान असें कोणाचेंच होत नाहीं, ह्या गोष्टी तत्त्वतः खऱ्या आहेत. परंतु हुंडणावळीच्या एका कायदेशीर दरावरून दुसऱ्या दरात रूपांतर होत असता नवा दर पहिल्याहून भारी असेल तर किंमतींत उतार होईल, धनकोंचा वास्तविक फायदा होईल, आयात व्यापार वाढेल व उलटपक्षीं निर्यात व्यापारी व निर्यात मालाचे उत्पादक ह्यांचें, कारखानदारांचें व ऋणकोंचें आणि नागरिकांचें नुकसान होईल हें उघड आहे. ह्याच्या उलट, नवीन दर पहिल्याहून कमी असला तर निर्यात मालाचे उत्पादक व व्यापारी, कारखानदार व नागरिक ह्यांचा तात्पुरता फायदा होईल. हिंदुस्थान सरकार व त्याचे सल्लागार ह्यास भारी हुंडणावळीमुळें विलायती खर्चांत बचत, आयात मालाच्या व्यापारास उत्तेजन, महर्घतेमुळें पसरणाऱ्या असंतोषास प्रतिबंध व कमी किंमतीमुळें सरकारी खर्चांत होणारी बचत एवढे फायदे मिळत असल्यानें जेव्हा जेव्हा हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय हुंडणावळीचा प्रश्न विचारास निघाला, तेव्हा तेव्हा सरकारी धोरण भारी हुंडणावळीस एकंदरीनें अनुकूल असल्याचें आढळून आलें. बहुसंख्याक शेतकरी वर्ग, कर देणारे सामान्य नागरिक व कारखानदार ह्यांचें अशा धोरणापासून एकंदरीनें नुकसानच झालें आहे. ठराविक वेतन असणाऱ्या नोकर वर्गाचें भारी हुंडणावळीनें किंमती कमी झाल्या म्हणजे चांगलेंच हित साधतें ह्यात शंका नाहीं. परंतु ज्या ज्या वर्गास राष्ट्रीय उत्पन्नांतून त्याच्या स्वतःच्या सीमागत उत्पादकतेस व संख्याबलास अनुसरून कमी अधिक कमाई व्हावयाची असते, त्याचें उत्पन्न भारी हुंडणावळीनें शेवटी कमी होऊन कमी किंमतीमुळें होणाऱ्या तात्पुरत्या फायद्यासही त्यास मुकावें लागतें. बॅबिंग्टन स्मिथ कमिटीनें हुंडणावळ १६ पेन्सावरून २४ पेन्सावर न्यावी असें सुचविताना ह्या मुद्याचा पूर्ण विचार केला नाहीं व पुढें हिंदी उत्पादकाचा उत्पादन खर्च कमी किंमतीस अनुसरून कमी न झाला, तर हुंडणावळीच्या प्रश्नाचा पुन्हां विचार करावा असेंही सुचविलें !

चांदीचा भाव व पदार्थांच्या किमती ह्यांमध्ये महायुद्धाच्या व त्या पुढील वर्षांत एवढे बदल झालेले होते कीं, त्यांच्या आधारावर कायम स्वरूपाच्या सूचना करणें गैरमुत्सद्दीगिरीचें होतें. परंतु सुवर्णपरिवर्तन पद्धति कायम ठेवलीच पाहिजे व शिफारसीही तत्काळ केल्या पाहिजेत ह्या दुहेरी पेचांतून सुटण्यास बॅबिंग्टन स्मिथ कमिटीस मार्गच नव्हता. नाहीतर सर्व जगाची आर्थिक परिस्थिति अस्थिर आहे हें माहीत असून, व हुंडणावळीचा दर एकच एक कायम असण्याने उद्योगधंद्यांची व व्यापाऱ्यांची सोय होते हें खरें असलें तरी हुंडणावळीची स्थिरता हें अंतर्राष्ट्रीय व्यापाराचें आवश्यक साधन नाही, हे मत ग्राह्य असूनही १६ पेन्सावरून हुंडणावळीचा दर एकदम २४ पेन्सावर नेऊन कायद्यानें कायम करावा अशी कमिटीनें शिफारस केली नसती.

हिंदुस्थानाच्या मालास बाहेर देशीं ज्या किंमती मिळतात त्याचें रुपयात रूपांतर होताना चढीच्या हुंडणावळीनें कमी रुपये हातीं येण्याचा प्रसंग येतो, व निर्यात व्यापार त्यामुळे मर्यादित होतो. परदेशीं जाणाऱ्या मालाचें परिमाण व त्यास मिळणाऱ्या रुपयातील किमती उतरल्या की त्या वस्तूंच्या अन्तर्गत किंमतींतही उतार होतो. उलट, आयात मालाबद्दल परकी उत्पादकास द्यावयाच्या किमतीचें रुपयातील रूपांतरही कमी रकमेंत होऊं लागल्यानें आयात मालाच्या किमती उतरतात व त्या व्यापारास उत्तेजन मिळते. भारी हुंडणावळीच्या साहाय्यानें निर्यात व्यापार मर्यादित होऊन व आयात व्यापार वाढून परराष्ट्रीय बाजारात येणाऱ्या किंमती व स्वदेशात मिळणाऱ्या किंमती ह्या दोहोत उतार होऊन त्याची परस्पर सांगड घातली जाते. महायुद्धाच्या काळात राष्ट्राराष्ट्रातील देवघेवीत सोन्याची वहातुक जवळ जवळ बंदच झाली होती, व त्या पुढील काळातही ती अल्प प्रमाणावरच होई. तसेंच, प्रत्येक राष्ट्रांत कागदी चलन बेसुमार निघून किंमतीतही पुष्कळ वाढ झालेली होती, तेव्हा अंतर्राष्ट्रीय हुंडणावळ मुख्यतः प्रत्येक राष्ट्राच्या किंमतीच्या मानावरून, म्हणजे त्या राष्ट्रांतील चलनाच्या वस्तू विकत घेण्याच्या सामर्थ्यावरून, ठरत असे. हुंडणावळीचा दर सुवर्ण मर्यादांच्या पलीकडे गेला म्हणजे सोन्याची वहातुक व्हावी, तिचा परिणाम बाजार भावावर व आयात निर्यात व्यापाराच्या परिमाणावर व्हावा आणि पुन्हां हुंडणावळ सुवर्ण मर्यादांच्या आंत यावी, ह्या सर्वसामान्य चलनविषयक सिद्धांताचें व्यवहारांत प्रत्यंतर दिसण्यास त्या वेळीं वावच नव्हता. किमतीच्या मानाचा व हुंडणावळीच्या दराचा अन्योन्य संबंध त्यावेळच्या परराष्ट्रीय अनुभवावरून प्रामुख्यानें दिसून आल्यानें, हिंदी हुंडणावळ वाढवून येथील किंमतीचें मान कमी ठेवतां येईल ह्या मतास प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञांचा पाठिंबाही मिळवितां आला.

**९ चोवीस पेन्सांची हुंडणावळ**–स्मिथ कमिटीनें आपल्या शिफारसी केल्या तेव्हांच सर्व राष्ट्रांतील किंमतीचें व हुंडणावळीचें मान अस्थिर होतें. कमिटीच्या

शिफारसी सरकारच्या हातांत आल्या तेव्हां तर ही चलबिचल अधिकच प्रामुख्यानें दिसूं लागली. १९२०–२१ ह्या सालात आयात व्यापारात पुष्कळच वाढ झाल्यानें व येथील पुष्कळशा विलायती व्यापाऱ्यांस व पेढीवाल्यांस आपला साचलेला पैसा इंग्लंडास पाठवावयाचा असल्यानें इंग्लिश चलनास त्याची व हिंदी व्यापाऱ्यांची चांगली मागणी होती. त्यामुळें हुंडणावळीचे बाजारांतील दर उतरत होते. सरकारनें मात्र एका रुपयास $\frac{1}{10}$ सॉव्हरिन हे प्रमाण अमलांत आणण्याचे ठरवून त्या प्रमाणास अनुसरून वेळोवेळीं $\frac{1}{10}$ सॉव्हरिनची ब्रिटिश चलनात जी किंमत होती त्या किंमती इतक्या दरानें लंडनवर हुंड्या विकण्याचें ठरविलें व १९२० पासून 'परत' हुंड्याची विक्रीही सुरू झाली. बाजारातील दराहून सरकारी दर पुष्कळच अधिक असल्यानें ज्या लोकांस खरोखरच विलायतेस पैसे पाठवावयाचे होते ते व केवळ रुपयांस अधिक पेन्स मिळत असता ते विलायतेंत पाठवावेत व मग कमी पेन्सांस रुपया मिळू लागला की आपले रुपये परत आणावेत ह्या सट्टेबाजीच्या धद्यांत सामील झालेले इतर लोक ह्यांची सरकारच्या हुंड्यास कल्पनातीत मागणी सुरू झाली. सट्टेबाजीच्या मागणीस आळा पडावा म्हणून सरकारनें प्रयत्न करून पाहिले. परंतु बाजारभाव व सरकारी भाव ह्यात एवढा मोठा फरक होता की वाटेल ते करून सरकारच्या हुंड्या स्वतःकरिता मिळण्याची खटपट करण्यास लोक तयार होते. ह्या हुंड्या विलायतेंत नोटास तारण असणाऱ्या निधीत जे कर्जरोखे होते ते विकून वटविल्या गेल्या व १६ अगर १८ पेन्सांस एक रुपया ह्या भावानें येथून विलायतेस पाठविलेल्या रकमा ३० अगर ३२ पेन्सास एक रुपया ह्या दरानें परत आणण्यात २५–३० कोटी रुपयांची सरकारी तिजोरीस टोकर बसली हे मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. एका बाजूस ब्रिटिश चलनाची किंमत सोन्याच्या नाण्याहून कमी झालेली व उलट बाजूस, हिंदुस्थानातील परराष्ट्रीं पैसा पाठवू इच्छिणाऱ्याची मागणी तर एवढी मोठी की निर्यात हुंड्या, पेढ्यांच्या हुंड्या, सरकारी हुंड्या व सरकारतर्फे कमी भावानें होणारी सोन्याची विक्री इतक्या मार्गानीही ती भागेना. अशा परिस्थितीत $\frac{1}{10}$ सॉव्हरिन बरोबर एक रुपया हे प्रमाण परिणामकारक रीतीनें अस्तित्वात आणणें केवळ अशक्य होतें.

जी गोष्ट सर्व माहीतगारांस स्पष्टपणें दिसत होती ती सरकारास मात्र कळली अगर पटली नाही व रुपयास $\frac{1}{10}$ सॉव्हरिन हा दर अस्तित्वात आणण्याच्या भरी पडून बाजारी हुंडणावळीहून अधिक भावानें सुद्धा विलायतेवर हुंड्या विकण्याचें सरकारनें चालूच ठेवलें. बाजारी हुंडणावळ १९२० च्या एप्रिलमध्यें रुपयास २८ पेन्स इंग्लिश चलन अशी होती, ती जूनमध्यें २५ पेन्स, सप्टेंबरमध्ये २२ पेन्स, नोव्हेंबरमध्यें २० पेन्स, डिसेंबरमध्ये १८ पेन्स, १९२१ च्या जानुआरीत १६ पेन्स व मार्चांत १५ पेन्स एवढी उतरली. विलायतेंत सांचविलेले पैसे संपत

चालल्यानें व बाजारी हुंडणावळ अशी सारखी उतरत राहिल्यानें सरकारनेंही आपले दर उतरवून शेवटी बरेच दिवस १ शि. ११ १९/३२ पेन्स हा दर कायम ठेवला. इंग्लिश चलनाची किंमत उतरलेली असल्यानें सॉव्हरिनचा १/१० भाग म्हणजे १ शि. ११ १९/३२ पेन्स नसून जवळ जवळ २८ पेन्स होत असत. म्हणजे हुंड्यांचा भाव इंग्लिश चलनांतील त्या वेळचे २४ पेन्स एवढ्यावर आणतांना रुपयाचें प्रमाण १/१० सॉव्हरिन हें सरकारनें सोडून दिल्याप्रमाणें झालें. परंतु ह्या भावानें हुंड्या विकण्याइतकेंही त्राण सरकारजवळ न उरल्यानें त्या विकणेंच पुढें सरकारनें बंद केलें. पहिल्यानें कायदेशीर दर १६ पेन्स होता तो अंतर्गत चलनाचा पुरवठा जरूर तेवढा सरकारास वाढवितां न आल्यानें अव्यवहार्य ठरला व आतां सरकारनें २४ पेन्सांचा दर ठरविला होता तो लोकाजवळील चलन त्यांच्या गरजा कमी झाल्या असूनही सरकारास कमी करतां आलें नाही म्हणून कोट्यवधि रुपयांच्या तोट्यानेंही सरकारास परिणामकारक करतां आला नाही. हा एक अनुभव व पुढें आयात व्यापाऱ्यांनी २४ पेन्साच्या कायदेशीर हुंडणावळीवर विसंबून परदेशांतून माल आणला असता व त्याबद्दल परदेशी पैसे पाठविण्यास त्यांनी सरकारजवळ कायदेशीर दराने लंडनवर हुंड्या मागितल्या असतां त्या पुरविण्याचें सरकारनें नाकारलें हा दुसरा अनुभव, ही सरकारच्या त्या वेळच्या चलनविषयक धोरणाच्याच नव्हे तर सुवर्णपरिवर्तन पद्धतीच्याच अयशस्वी-पणाचीं स्पष्ट चिन्हें होत. महायुद्धानंतर हिंदी मालास परदेशची मागणी चढीची राहील ही सरकारी सल्लागाराची व कित्येक व्यापाऱ्यांची अपेक्षा, परदेशांतील हलाखीमुळें खोटी ठरली व त्या अपेक्षेबरहुकूम आखलेलें हुंडणावळीसंबंधाचें धोरण अव्यवहार्य ठरलें. १९१९-२०साली खाजगी व्यापाराचा परराष्ट्रीय आढावा ११९ कोटी रुपयांनी हिंदुस्थानास अनुकूल होता, तोच पुढील वर्षी ७९ कोटींनी प्रतिकूल झाला! हिंदी मालास परदेशांत असलेली मागणी मर्यादित झाली, तेव्हांच चांदीच्या भावांत उतार व्हावा व भारी किमतीनें परदेशांतून आणलेल्या मालाची हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर आयात व्हावी हा योगायोग सरकारच्या चलनविषयक धोरणास फारच अनिष्ट ठरला. चांदीचा भाव दर औंसास एप्रिल १९२० मध्यें सरासरीनें ६४॥ पेन्स होता, तो जूनमध्यें ४४ पेन्स, ऑगस्टमध्यें ५७ पेन्स व सप्टेंबरमध्यें ३८ पेन्स असा उतरला. १९२१ च्या मार्च महिन्यांत तर ३० पेन्सांस एक औंस चांदी मिळूं लागली. १९२०-२१ ह्या वर्षांत व्यापारी आढावा हिंदुस्थानास कसा प्रतिकूल होत गेला व त्यास अनुसरून हुंडणावळीचा दरही कसकसा उतरला हें पुढील कोष्टकावरून दिसेल.

## परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा व हुंडणावळीचा दर ह्यांतील फेरबदल.

( १९२०-२१, )

अधिक आयात (-) अधिक निर्यात (+) आंकडे कोट रुपयांचे आहेत.

| | | आयात | निर्यात | निव्वळ निर्यात | हुंडणावळीचा दर पेन्स. |
|---|---|---|---|---|---|
| एप्रिल | १९२० | २२ | २८ | +६ | २६ |
| मे | १९२० | २४ | २८ | +४ | २७ ३/८ |
| जून | १९२० | २६ | २३ | -३ | २५ १/४ |
| जुलै | १९२० | २८ | २१ | ७ | २३ |
| ऑगस्ट | १९२० | ३१ | २० | -११ | २२ ३/४ |
| सप्टेंबर | १९२० | २९ | २१ | -८ | २२ १/२ |
| ऑक्टोबर | १९२० | ३२ | २१ | -११ | २१ ३/८ |
| नोव्हेंबर | १९२० | ३२ | १९ | -१३ | २० १/८ |
| डिसेंबर | १९२० | ३२ | २० | -१२ | १८ ३/८ |
| जानेवारी | १९२१ | ३१ | १९ | -१२ | १८ १/८ |
| फेब्रुवारी | १९२१ | २५ | १८ | -७ | १६ ३/४ |
| मार्च | १९२१ | २४ | १८ | -६ | १५ ११/१६ |

**१० हुंडणावळीच्या प्रश्नाची पुन्हां चौकशीः**—सरकारनें २४ पेन्सांहूनही अधिक भावानें हुंड्या विकून हुंडणावळ २४ पेन्साच्या दरावर स्थिर करण्याचा कांहीं दिवस प्रयत्न केला, परंतु पुढें हुंडणावळ २४ पेन्साहून क्रमाक्रमानें १५-१६ पेन्सांवर आली तरी कायदेशीर भावानें लंडनवर हुंड्या विकण्याचें सरकारनें नाकारलें. ज्या व्यापाऱ्यांनी परदेशाहून माल मागविला होता त्याचा माल देशांत येऊन उतरूंही लागला. परंतु २४ पेन्स किंमतीच्या मालास हिंदुस्थानात १ रुपयाच द्यावा लागेल ह्या अपेक्षेनें आणलेल्या मालाची किंमत १६, १८ किंवा २० पेन्सास १ रुपया ह्या भावानें देण्याची वेळ आली तेव्हां कित्येक व्यापाऱ्यांनी मालाचा कबजा घेण्याचेंही नाकारलें. हें त्यांचें कृत्य व्यापारी सचोटीस अर्थातच सोडून झालें, परंतु सरकारच्या गैरहिशेबी व धरसोडीच्या धोरणानें सरकारी खजिन्यावरच नव्हे तर राष्ट्राच्या एकंदर व्यापारावर किती अनिष्ट परिणाम झाला हें त्यावरून चांगलें सिद्ध होतें. १९२०-२१ सालांत परराष्ट्रीय व्यापाराचा आढावा हिंदुस्थानास प्रतिकूल होता, तसाच १९२१-२२ मध्येंही तो प्रतिकूलच राहिला. परंतु त्या वर्षापासून मंदी कमी होत जाऊन निर्गत व्यापार हळूहळू वाढूं लागला.

१९२२–२३, १९२३–२४ व १९२४–२५ ह्या सालांत निव्वळ निर्गतीचे आंकडे वाढत जाऊन हुंडणावळही चढत चढत १८ पेन्सांस एक रुपया ह्या प्रमाणाजवळ येऊन ठेपली. सरकारी हिशेबांत १९२०–२१ पासून २४ पेन्सांस एक रुपया हाच दर चालू होता, त्यामुळें सरकारच्या अंदाजपत्रकांत कृत्रिमपणा व काल्पनिकपणा पुष्कळच येत असे. शिवाय, कायदेशीर रीत्या सॉव्हरिनची किंमत दहा रुपयेच असल्यानें त्यांची हिंदुस्थानात आयात कमी प्रमाणावर होऊं लागली व व्यवहारांत तर ते मुळीच चालत नसत. अशा तऱ्हेनें चलनाचा पुरवठा मर्यादित झाल्यानें हुंडणावळ एकदा सोळा पेन्सांच्याही खाली गेली होती ती १८ पेन्सावर आली व त्याहूनही वर जाण्याची चिन्हें दिसूं लागली. १९२२–२५ ह्या काळात सरकारास चलनपद्धतीस कायमचें स्वरूप देण्याबद्दल अनेक सूचना करण्यात आल्या होत्या व २४ पेन्सांची भ्रामक हुंडणावळ कायदेपुस्तकात कायम ठेवून अप्रत्यक्षपणें चलनाचा पुरवठा मर्यादित करण्याकडे व हुंडणावळ कृत्रिम उपायानी वाढविण्याकडे सरकारचा कल आहे, अशीही सरकारवर टीका होऊं लागली. १८ पेन्साचा दर पुष्कळ दिवस कायम राहिला ह्याचें श्रेय आयात व निर्यात व्यापाराच्या परस्परसंबंधास न देता सरकारच्या चलनविषयक धोरणास व त्या दरानें विलायतेस पैसे पाठविण्याच्या कृत्यास देणें आवश्यक आहे, असें पुष्कळ तज्ज्ञाचें मत होतें व तें पुष्कळसें खरेंही होतें.

एकंदर जगातील आर्थिक परिस्थिति स्थिर झालेली नाहीं म्हणून आपणास चलनविषयक धोरणाचा व हुंडणावळीच्या दराचा पुन्हां विचार इतक्यात करता येत नाहीं, ही सरकारची सबब लौकरच निराधार ठरली. १९२४ साली इंग्लंडने आपली चलनपद्धति महायुद्धापूर्वीच्या नहमीच्या व्यवस्थेप्रमाणें पुन्हां थाटली व नोटाबद्दल सोनें मिळण्याची व्यवस्था केली. हिंदुस्थान सरकारने १९२५ साली हिल्टनयंग कमिशन नेमलें व त्याकडे अनेक चलनविषयक बाबींचा विचार करण्याचें कार्य सोंपविलें, ह्याबद्दल मागील प्रकरणांत उल्लेख केलेलाच आहे. प्रस्तुत स्थळीं त्या कमिशनकडे सोंपविलेल्या हुंडणावळीच्या कायम दरासंबंधीच आणखी थोडें विवेचन करावयाचें आहे. हिल्टनयंग कमिशनचें काम सुरू झालें तेव्हां हुंडणावळीचा वास्तविक दर १८ पेन्स होता व तो बराच काल स्थिर राहिलेला होता. शिवाय, हुंडणावळीचा दर चढीचा असल्यानें निर्गत व्यापार मर्यादित होऊन व आयात व्यापार वाढून हिंदुस्थानातील किंमतीचें मान परदेशच्या वाढलेल्या किंमतीच्या मानानें एकंदरीत कमी होत होतें, हेंही स्पष्टपणें कळण्यासारखें होतें. परंतु १८ पेन्साचा हा दर नैसर्गिक स्वरूपाच्या आर्थिक घडामोडीस धरून स्थिर राहिला होता किंवा नाही, व जर तो सरकारच्या चलनविषयक धोरणामुळें, म्हणजे येथील चलनाचा पुरवठा मर्यादित करून हुंडणावळीचा

दर १८ पेन्सांवर ठेवण्याच्या सरकारी हट्टामुळें, स्थिर राहिला असेल तर १८ पेन्सां-पेक्षां १६ पेन्सांचा महायुद्धापूर्वीचा दर अधिक वहिवाटीचा म्हणून तोच सरकारनें कायम करण्याचें धोरण स्वीकारणें रास्त होतें किंवा नाही, ह्याच महत्त्वाच्या प्रश्नास कमिशनला उत्तर देणे भाग होतें. हुंडणावळीचा दर ठरविण्याचा जेव्हां जेव्हां प्रसंग आला तेव्हां तेव्हां सरकारी धोरणाचा कल चलनाचा पुरवठा कृत्रिमपणे मर्यादित करून हिंदी चलनाची परराष्ट्रीय चलनातील किंमत वाढविण्याकडे व येथील निर्यात व आयात मालाची किंमत उतरून शेतकरी व कारखानदार ह्यांच्या होणाऱ्या नुकसानीकडे दुर्लक्ष करण्याकडे झुकता होता, असा सरकारवर हिंदी लोकपक्षाचा पहिल्यापासूनच आरोप होता. आतांही १८ पेन्सांचा दर सरकारने कृत्रिमपणें स्थिर केलेला आहे व त्यापासून कायम उत्पन्नाच्या मूठभर लोकांखेरीज सर्वच वर्गाचे शेवटी नुकसान होणार आहे, ह्यास्तव १६ पेन्साचा जुना व त्यातल्या त्यांत कमी कृत्रिम हाच दर सरकारने कायम करावा असे हिंदी कारखानदार, व्यापारी व तज्ज्ञ ह्यांपैकी बहुतेकांचें म्हणणें होतें. हुंडणावळीचा दर कायद्यानें बदलणें म्हणजे मूल्यमापनाचे परिमाणच बदलणे होय व सरकारने व्यापारी देवघेवींच्या नैसर्गिक ओघाकडे दुर्लक्ष करून स्वतःच्या खजिन्याच्या फायद्याकरितां किंवा कृत्रिमतेनें किंमतीत चढउतार घडवि-ण्याकरितां अधिकाराच्या जोरावर हुंडणावळीच्या दरात फेरबदल करणें योग्य नाही असेच पुष्कळांचें म्हणणे होतें.

११ **'सोळा विरुद्ध अठरा' पेन्सांचा लढाः**—कमिशनची चौकशी सुरू होण्यापूर्वी सरकारने १८ पेन्सांचा दर स्थिर करून ठेवलेला होता व तो दर पुष्कळ दिवस कायम आहे, त्यास अनुसरून अंतर्गत किंमतींचें मान परराष्ट्रीय किंम-तीच्या बरोबर येऊ पहात आहे ह्या मुद्यावर भर देऊन कमिशननेंही त्याच दरास आपली संमति दिली. कमिशन नेमलें जाण्यापूर्वी हिंदुस्थान सरकार १८ पेन्साचा दर कायम करण्याच्या हेतूनें हिंदुस्थानातील चलनाचा पुरवठा मर्यादित करीत असता, स्टेट सेक्रेटरीचें म्हणणे असें होतें की चलनाचा पुरवठा आणखी मर्यादित करून १८ पेन्सांहूनही भारी दर ठरविण्यांत यावा. परंतु तसें केल्यास हिंदुस्थानातील किंमती फारच उतरतील व शेतकरी आणि कारखानदार ह्यांचें बेसुमार नुकसान होईल, ही कारणें पुढे करून हिंदुस्थान सरकारनें १८ पेन्साचा दरच कायम करण्याचें ठरविलें. चलनाचा पुरवठा मर्यादित करून हवा तो हुंडणावळीचा दर कायम करावयाचा व त्या दरास अनुसरून आयात व निर्यात व्यापाराची आणि अंतर्गत व परराष्ट्रीय बाजारभावाची नवी सांगड घालून द्यावयाची हें तत्त्व चलनाधिकारी सरर्थस वाटेल तेव्हां उपयोगात आणता येते व विशेषतः गेल्या दहाबारा वर्षांत जगातील अनेक देशांत ते अंमलांतही आणलें गेलें आहे परंतु हिंदुस्थान सरकारने आपल्या दुर्बल-तेच्या व धरसोडीच्या धोरणानें चलनपद्धतीत अनेक घोटाळे माजविले व कोट्यवधि रुपयाचें नुकसान झाल्यावर व स्वतःची चूक ध्यानांत आल्यावर, हुंडणावळीचा

दर ठरविला तोही नवा व चढीचा ठरविला आणि अप्रत्यक्षपणें येथील उत्पादकांवर व नागरिकांवर अधिक बोजा लादला. कमिशनचेंही ह्या बाबतीत असें म्हणणें पडलें की, १८ पेन्साच्या दरानें अंतर्गत किंमतीची व परराष्ट्रीय किंमतीची सांगड आता जवळ जवळ पूर्णपणे बसलेली आहे; ह्यावेळी १८ पेन्सांचा दर १६ पेन्सांवर आणला तर हिंदुस्थानांतील किमतींत पुन्हा वाढ होईल व परराष्ट्रीय किमतीशी त्याची जोड पडण्यास आणीक काही काळ जावा लागेल. १९२२ ते १९२५ या वर्षांचे हुंडणावळीचे व अंतर्गत आणि परराष्ट्रीय किमतीचे आंकडे तपासून कमिशननें बहुमतानें असा निकाल दिला की, हुंडणावळ व किंमती ह्यांच्यातील परस्पर तडजोड झालेली असून १९२५ सालच्या मध्यापासून अंतर्गत व परराष्ट्रीय किमतीचें मान बहुतेक स्थिर आहे. कायदेमंडळानें शेवटी कमिशनचा व हिंदुस्थान सरकारचे त्या वेळचे फडणवीस, सर बेसिल ब्लॅकेट ह्यांचा, वरील निकाल केवळ तीन मताच्या जोरावर मान्य केला व हिंदुस्थानांतील कायदेशीर हुंडणावळीचा दर १८ पेन्स हा ठरविण्यात आला.

कायदेमंडळानें १८ पेन्साचा दर मान्य करण्यापूर्वी सर्व देशभर १६ पेन्स ह्या दराचे पुरस्कर्ते व सरकारी धोरणाचें समर्थन करणारे ह्यांच्या दरम्यान बरेंच वाग्युद्ध चालू होतें. भारी दर मजूर वर्गास, गरीब लोकांस व धनकोंस श्रेयस्कर आहे व हलक्या दरात उत्पादकाचें, कारखानदाराचें व ऋणकोंचेंही शेवटी नुकसान नाही, असें एका पक्षानें म्हणावें; व उलट १६ पेन्साचा दर शेतकरी वर्गास, कारखानदारांस व ऋणकोंस अनुकूल आहे व १८ पेन्साच्या दरानें मजूर वर्गाचें व उपभोक्त्याचेंही शेवटी नुकसानच होईल असें दुसऱ्या पक्षानें उत्तर द्यावें असा प्रकार चाललेला होता. विशेषतः हिल्टनयंग कमिशनचेच एक हिंदी सभासद व सोळा पेन्साच्या दराचे पुरस्कर्ते सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास ह्यांचे म्हणणे असें होतें की, सरकारनें कृत्रिमपणे चलनाचा पुरवठा मर्यादित करून भारी दर कायम केला व त्या दरास अनुसरून अंतर्गत किमती उतरावयाच्या त्या अजून पुऱ्या उतरल्या नव्हत्या. म्हणजे १८ पेन्सांचा दर कायम केला तर किंमती अधिक उतरून उत्पादक वर्गाचें अपरिमित नुकसान होईल व देशाचे व्यापारधंदे बुडतील. १८ पेन्साचा दर कायम केल्यापासून येथील बाजारभावांत व शेतकरी आणि कारखानदार ह्यांच्या धंद्याच्या किफायतशीरपणात जे फेरबदल झालेले आहेत त्यावरून सर पुरुषोत्तमदास ह्यांच्या म्हणण्यास दुजोराच मिळण्यासारखा आहे. अजूनही मुंबई, कराची वगैरे निर्यात व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या केंद्रांत १६ पेन्सांचा दर पुन्हां कायदेशीर ठरविला जावा ह्याबाबत चळवळ चालू आहे. परंतु दिवसानुदिवस हुंडणावळीच्या चालू दरानुसार किंमतीच्या अंतर्गत व परराष्ट्रीय मानांची तोंडमिळवणी होण्याकडे व्यापारी घडामोडीचा कल असल्यानें १८ पेन्सांचा दर पुन्हां बदलून १६ पेन्सांवर आणणें मुष्किलीचें आहे. तरी सरकारनें केवळ आपल्या तिजोरीचें हित साधून व येथील बाजारभावांत कृत्रिमपणे उतार करावयाचें ठरवून भारी हुंडणावळ मुद्दाम कायम केली व त्यामुळें शेतकरी वर्गाचें, कारखानदारांचें, नागरिकांचें व अप्रत्यक्षपणें सर्व राष्ट्राचें फार मोठें आर्थिक नुकसान झालें ह्यांत शंका नाही.

---

# प्रकरण बारावें

## पेढ्या

**१ हिंदुस्थानांतील जुनी पेढ्यांची पद्धतः**—चलनपद्धति व हुंडणावळ ह्या दोन महत्त्वाच्या आर्थिक प्रश्नाशी पतीच्या व्यवहाराचें नियंत्रण करणाऱ्या व लोकांची चलनविषयक व भांडवलविषयक मागणी भागविण्यास मदत करणाऱ्या पेढ्यांच्या संघटनेचा प्रश्नही संलग्न आहे. मागील दोन प्रकरणांत हिंदुस्थानांतील पेढ्यांच्या व्यवहाराचा अनेक ठिकाणीं उल्लेख आलेला आहे. प्रस्तुत प्रकरणांत पेढ्यांसबंधीं हिंदुस्थानांत कशी परिस्थिति आहे ह्याचाच स्वतन्त्रपणें विचार करावयाचा आहे. मागें प्रास्ताविक भागांत पतपेढ्यांचे व्यवहार व पाश्चात्य देशांतील पेढ्यांच्या पद्धति ह्याविषयीं जें विवरण केलें आहे,[१] तें वाचल्यास, हिंदी पेढ्यांच्या परिस्थितीसंबंधीं प्रस्तुत प्रकरणांत केलेलें विवेचन कळून येण्यास मदत होईल. विशेषतः अलीकडील अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय व्यापारास चेक, हुंड्या, शेअर, कर्जरोखे इत्यादि चलनविषयक व भांडवलविषयक साधनांची किती जरूरी असते व त्यासंबंधाचें धोरण तात्त्विक दृष्ट्या बरोबर व व्यावहारिक दृष्ट्या सावधगिरीचें नसलें तर व्यापार व उद्योगधंदे ह्यावर अनिष्ट परिणाम होण्याचा कसा संभव असतो हें प्रास्तविक भागांतील विवेचनावरून ध्यानांत येईल.

ब्रिटिश अमदानींत संपत्तीच्या उत्पादनाचे व विनिमयाचे अर्वाचीन प्रकार सुरू होण्यापूर्वींही कित्येक शतकें हिंदुस्थानांत पेढ्यांचे व्यवहार विस्तृत प्रमाणावर चालत. व्याजबट्ट्याचा सावकारी धंदा करणारे लोक तर देशाच्या सर्व भागांत पुष्कळच होते, परन्तु पेढीचा स्वतंत्र व्यवहार करणारे, म्हणजे ठेवी ठेवून त्यावर व्याज देणारे, हुंड्या विकणारे व सरकारासही कर्ज देणारे, धंदेवाले मोठमोठ्या शहरांत व व्यापारपेठेंत असत. अशा पेढीवाल्यांच्या सचोटीबद्दल सर्वत्र विश्वास असून त्यांचें सामाजिक व राजकीय महत्त्वहि विशेष असे. स्मृतिग्रंथांत व कौटिलीय अर्थशास्त्रासारख्या लौकिक महत्त्वाच्या प्रबंधांत व्याजाचे दर, जामीनकीची जबाबदारी, तारणाचें प्रमाण, कर्जरोख्याचे कागद इत्यादि पेढ्यांच्या व्यवहारांबद्दल पुष्कळ माहिती सांपडते. व्याजानें पैसे कर्जाऊ देणें हें वैश्यवर्णास उचित आहे[२] असें हिंदू

१ मागें पानें ७०–८६ पहा.

२ ‘कुसीदं कृषिवाणिज्यं शुल्कशिल्पानुवृत्तिभिः’ नारद १. ४६
पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेवच ।
वणिक्पथं कुसीदंच वैश्यस्य कृषिमेवच ।। मनु १. ९०

धर्मशास्त्रांत सांगितलेलें असून ह्या धंद्याबद्दल सविस्तर नियमही स्मृतींमध्यें आढळतात. ह्या व शिलालेखांसारख्या इतर पुराव्यावरून असें दिसतें कीं ख्रिस्ती शकापूर्वी पुष्कळ वर्षें पेढीवाल्याचे गण व श्रेणी हिंदुस्थानांत अस्तित्वांत होत्या आणि ठेवी ठेवून त्यावर व्याज देणें, कर्जाऊ पैसे देणें, हुंड्या विकणें, मालाचा विमा उतरणें इत्यादि व्यवहार मोठ्या प्रमाणावर चालत असत. आजही देशाच्या निरनिराळ्या भागांत पेढ्यांचा धंदा ज्या स्वरूपानें चालतो त्याच स्वरूपात गेलीं दोन हजार वर्षें तरी तो चाललेला आहे ह्यांत शंका नाही. निव्वळ पैसे कर्जाऊ देण्याच्या सावकारी धंद्याखेरीज येथील पेढीवाले पहिल्यापासून हुंड्या विकत घेणें, व्यापाऱ्यांस भांडवल पुरवणें, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पैसे पाठविणें इत्यादि महत्त्वाच्या आर्थिक कामगिऱ्या करीत आहेत. पेढ्यांच्या ह्या व्यवहारास जोडूनच एक किंवा अधिक प्रकारच्या वस्तूंचा मोठ्या प्रमाणावर व्यापार करण्याचा प्रघातही असल्या धंदेवाल्यांत दिसून येतो व एकंदरीनें तो सोयीचाही आहे. मोठमोठ्या शहरात व विशेष महत्त्वाच्या गावातच काय त्या अर्वाचीन स्वरूपाच्या पेढ्या दिसतात व आयात-निर्यात व्यापारात अगर मोठ्या प्रमाणावर धंदा करण्यात गुंतलेल्या गिऱ्हाइकासच त्यांचा उपयोग होतो. परंतु देशाच्या दूरदूरच्या भागात व मध्यम प्रतीच्या गावात लहान सहान धंदेवाल्याची व व्यापाऱ्याची सोय जुन्या पद्धतीनें चालणाऱ्या देशी पेढीवाल्याकडूनच होते. मुंबईसारख्या मोठमोठ्या शहरातही अंतर्गत व्यापाराचा पुष्कळ भाग देशी सराफांच्या साहाय्यानें चालत असतो. अशा व्यवहाराची एकंदर किंमत शंभर कोटि रुपयांवर असावी असा अंदाज आहे. मोठमोठ्या पेढ्यांचा व्यवहार प्रत्यक्षपणे मोठमोठ्या व शहरातील धंदेवाल्याशीं तेवढा चालतो; व इतर सर्व धंदेवाले व व्यापारी ह्यांस मुख्यतः सराफामार्फतच नव्या स्वरूपाच्या पेढ्यांचें साहाय्य मिळणें शक्य असतें. अलीकडे स्वदेशी व विलायती पेढ्यांचा देशात पुष्कळ प्रसार झालेला असूनही जुन्या सराफी धंद्याचें अंतर्गत व्यापाराच्या वाढतीतील महत्त्व कमी झालेलें नाही.

**२ इलाखा बँका**—जुन्या देशी पद्धतीच्या पेढ्याहून भिन्न अशा नव्या स्वरूपाच्या ज्या अनेक सरकारी, निम-सरकारी व खाजगी, स्वदेशी व परदेशी, आणि लहान व मोठ्या पेढ्या हल्ली हिंदुस्थानांत आहेत, त्याचे पुढील प्रकार आहेत. (१) पूर्वी मुंबई, मद्रास व बंगाल ह्या इलाख्यात त्या त्या नावाच्या स्वतंत्र मोठ्या बँका होत्या, त्यांचें एकीकरण होऊन अस्तित्वांत आलेली इम्पीरियल बँक ऑफ इंडिया. (२) अंतर्राष्ट्रीय देवघेवीचे व्यवहार ह्या व इतर देशांत करणाऱ्या परदेशी पेढ्या. (३) समाईक भांडवलाच्या तत्त्वावर उभारलेल्या हिंदी पेढ्या; (४) टपाल खात्यामार्फत चालणाऱ्या सरकारी सेव्हिंग्ज् बँका; (५) जमिनी गहाण लावून घेऊन

त्यांच्या तारणावर कर्ज देणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या पेढ्या; ( ६ ) धंदेवाले व कारखानदार ह्यांस भांडवल पुरविण्याचें काम मुख्यत: करणाऱ्या औद्योगिक पेढ्या; ( ७ ) सहकारी तत्त्वानुसार चालणाऱ्या पेढ्या; व ( ८ ) हिंदुस्थानात जी नवी रिझर्व बँक नांवाची स्वतंत्र मध्यवर्ती पेढी अस्तित्वात यावी अशी सध्या खटपट चालू आहे ती मध्यवर्ती पेढी. ह्यापैकी सहकारी पेढ्याचा इतिहास व संघटना ह्याचें येथील आर्थिक परिस्थितीत विशेष महत्त्व असल्यानें त्याचा पुढील प्रकरणात स्वतंत्रपणे विचार केलेला आहे. इतर प्रकारच्या अर्वाचीन पेढ्यांची क्रमश: थोडक्यात माहिती होणे हिंदुस्थानाच्या आर्थिक प्रगतीच्या विद्यार्थ्यास आवश्यक आहे.

गेल्या शतकाच्या सुरुवातीस हिंदुस्थानाचा परराष्ट्रीय व्यापार अल्प प्रमाणावरच होता व त्या व्यापारास लागणारें पेढ्यांचें साहाय्य मुख्यत: परकीय अडत्यांची मोठमोठी दुकानें असत त्यांच्यामार्फतच मिळे. परंतु, परराष्ट्रीय व्यापारात व त्याजवर अवलंबून असणाऱ्या अंतर्गत व्यवहारातही जसजशी वाढ होऊं लागली तसतशी स्वतंत्र व सुधारलेल्या पेढ्याची आवश्यकता अधिक भासूं लागली. सरकारलाही आपल्या अंतर्गत व विलायती देवघेवीचे अनेक व्यवहार अर्वाचीन पद्धतीनें चालणाऱ्या एखाद्या मोठ्या पेढीच्या साहाय्याखेरीज योग्यपणें करणें अवघड वाटूं लागलें. ह्यास्तव १८०६ मध्यें बँक ऑफ बेंगॉल ह्या नावाच्या पेढीची सरकारी सनदीच्या साहाय्यानें स्थापना करण्यात आली. त्या पेढीच्या भांडवलात व नियामक सत्तेत सरकारचा पुष्कळसा हात होता. परराष्ट्रीय व्यापाराची केंद्रे वाढूं लागली तसतशी नव्या स्वरूपाच्या पेढ्याची आवश्यकताही अधिक भासूं लागली. बंगाल इलाख्याच्या पेढीप्रमाणे मुंबई व मद्रास ह्या ठिकाणी त्या त्या नावाच्या पेढ्या सरकारी मदतीनें स्थापल्या गेल्या. हळुहळू ह्या पेढ्याच्या भांडवलांत व प्रत्यक्ष हुकमतीत असलेला आपला भाग सरकारनें काढून घेतला. तरी सामान्य गिऱ्हाइकाच्या हितास बाध येऊं नये व ज्या पेढ्यावर सरकारी पैसा व कामगिऱ्या ह्यांची बरीच जबाबदारी असते त्याच्या व्यवहारांत घोटाळे होऊं नयेत, म्हणून त्याच्या व्यवस्थेबद्दल ठोकळ नियम सरकारकडून करून दिलेले असत. इ. स. १८७६ पर्यंत सरकारच्या सर्व शिलका ह्या पेढ्यांजवळ ठेवल्या जाव्या अशी कायद्यानें व्यवस्था केली होती. परंतु बिन सरकारी पेढीच्या हातांत अमर्यादितपणे सार्वजनिक पैसा रहूं देणें धोक्याचें आहे, असें मुंबई बँकेच्या उदाहरणावरून दिसून आलें. पूर्वे जुनी मुंबई बँक १८६८ मध्यें मोडली जाऊन तिच्या जागी त्याच नावाची नवी बँक अस्तित्वांत आली. १८७४ च्या सुरुवातीस मुंबई बँकेनें आपल्या जवळील ठेवीचा पुष्कळ भाग लवकर मोकळा न करतां येणाऱ्या मार्गानी गुंतविल्यानें सरकारला स्वत:च्या ठेवी वेळेवर परत मिळू शकल्या नाहीत. अशा अस्थिर स्वरूपाच्या खाजगी पेढ्यांत सरकारी पैसा गुंतल्यानें वेळेवर सरकारच्याही पतीस

धोका येण्याची भीति असते; म्हणून १८७६ सालापासून कायद्यात असा बदल केला गेला की, बंगाल, मुंबई व मद्रास ह्या बँकांत सरकारतर्फे विवक्षित किमान मर्यादेपर्यंत पैसे ठेवले जावे व त्यावर त्या पेढ्यांनी सरकारास व्याज देऊं नये. मात्र, ह्या किमान मर्यादेपेक्षा सरकारी ठेवीची रक्कम कमी झाल्यास तेवढ्या तुटवड्याच्या रकमेवर चालू दरानें सरकारनें पेढ्यांस व्याज द्यावें. ह्या तीन इलाख्यांतील पेढ्यांखेरीज सरकारनें देशाच्या निरनिराळ्या भागांत आपले स्वतंत्र खजिने ठेवण्याची पद्धत ह्याच वेळेपासून मोठ्या प्रमाणावर सुरू केली. पुष्कळसा सरकारी पैसा इलाखा बँकांस बिनव्याजी वापरावयास मिळे व सरकारी देवघेवी मुख्य मुख्य ठिकाणीं पुष्कळशा त्यांच्या मार्फत होत ह्यामुळें त्या बँकांचा विशेष फायदा होई. ह्या मोबदला सरकारनें त्यांच्या कारभारावर काहीं नियंत्रणें घातलीं होती. परराष्ट्रीय हुंडणावळीचा अगर परदेशांत कर्ज उभारण्याचा व्यवहार करण्यास त्यांस बंदी होती. हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय व्यापाराच्या क्षेत्राची स्वतःकडे मक्तेदारी राखूं पाहणाऱ्या प्रचंड परकी पेढ्यांच्या आग्रहावरूनच इलाखा बँकांवर हें नियंत्रण घालण्यांत आलें होतें, व ह्या बाबतींत हिंदुस्थान सरकारास स्टेट सेक्रेटरीपुढें नमावें लागलें होतें ह्या खेरीज, डायरेक्टरांची संख्या व लायखी, बँकेच्या व्यवहाराचे प्रकार, त्याच्या प्रतिक मर्यादा इत्यादि बाबतींतही कायदेशीर नियमन होतें.

अलीकडे इलाखा बँकांखेरिज कांहीं इतर मोठ्या पेढ्या अस्तित्वांत आल्या आहेत आणि अंतर्गत व्यापारास त्यांची मदतही पुष्कळ होते. परंतु ह्या बँका स्थापन होण्यापूर्वी अंतर्गत व्यापाऱ्यास चलनविषयक व भांडवलविषयक साहाय्य करण्याचें कार्य मुख्यतः इलाखा बँकांवरच पडे व आजही इम्पीरियल बँक व तिच्या शाखा ह्यामार्फत पुष्कळच व्यापारी देवघेवी पूर्ण केल्या जातात व अनेक व्यापाऱ्यांस भांडवलविषयक साहाय्य मिळतें. लोकांच्या ठेवी घेणें, त्यांस योग्य तारणावर कर्ज देणें, हुंड्या देणें, मालाच्या हुंड्या विकणें व विकत घेणें ही सामान्य पेढ्यांची कामेंही इलाखा बँकाकडून मोठ्या प्रमाणावर होतात. इलाख्यांची मुख्य ठिकाणें व इतर महत्त्वाची शहरें येथें सरकारी देवघेवीचा बहुतेक सर्व व्यवहार ह्या बँकांमार्फतच होतो व त्याबद्दल सरकारकडून त्यास योग्य वेतन मिळतें. १९२० सालीं ह्या तीन इलाखा बँकांचें एकीकरण होऊन इम्पीरियल बँकेची स्थापना झाली. त्या वर्षापूर्वी सरकारी ठेवींच्या किमान मर्यादा कोणत्या होत्या व भांडवल, ठेवी, शिलका इत्यादि बाबतींत इलाखा बँकांची परिस्थिति कशी होती हें पुढील कोष्टकांवरून दिसेल.:—

परिस्थिति कशी होती हें पुढील कोष्टकांवरून दिसेल:—

( आंकडे पौंडांचे आहेत. )

| बँकेचें नाव | सरकारी ठेवींची किमान कायदेशीर मर्यादा | सरकार प्रत्यक्षपणे ठेवी राहू देई त्याच्या मर्यादा | | बँकेस मिळणारें सरकारी वेतन. |
|---|---|---|---|---|
| | | कमीत कमी | अधिकांत अधिक | |
| बंगाल बँक | २३३,३०० | ४६७,००० | ५३३,००० | २९०० |
| मद्रास बँक | १२०,००० | १३३,००० | — | ८०० |
| मुंबई बँक | १३३,००० | २६७,००० | ३३३,००० | ८०० |

आंकडे लक्ष रुपयांचे व तिन्ही बँकाची एकत्रितपणे त्या त्या वर्षाच्या ३१ डिसेंबरची स्थिति दाखविणारे आहेत.

| | १९०५ | १९१४ | १९१६ | १९१८ | १९१९ |
|---|---|---|---|---|---|
| भांडवल व शिलकी निधी | ६,२३ | ७,६४ | ७,३५ | ७,२० | ७,३२ |
| ठेवी १ सरकारी | ३,११ | ५,६१ | ५,२० | ८,६४ | ९,०२ |
| २ खाजगी | २२,२६ | ४०,४० | ४४,७० | ५०,९७ | ६८,०१ |
| रोख शिल्लक | ८,२३ | २०,८४ | १७,२७ | १७,०७ | २६,०३ |

कलकत्ता, मुंबई व मद्रास येथील मुख्य पेढ्यांखेरीज त्या बँकाच्या अनुक्रमें २५, १४ व २३ इतर शाखा होत्या.

**३ परराष्ट्रीय देवघेवींचा व्यवहार करणाऱ्या बँका**—हिंदुस्थानाचा परराष्ट्रांशी जो आयात–निर्यात व्यापार चालतो त्यातील देवघेवींचा व्यवहार करणाऱ्या बँका सर्व परकीयांच्याच आहेत. त्यापैकी काही बँकांच्या व्यवहाराचें मुख्य क्षेत्र हिंदुस्थान हेंच आहे व इतर कांहींचा व्यवहार हिंदुस्थानाप्रमाणें इतर पौरस्त्य राष्ट्रां-

तर्‍ही मोठ्या प्रमाणावर चालतो. ह्या दोन्ही प्रकारच्या पेढ्यांबद्दलची पुढील माहिती उपयुक्त आहे.

आंकडे १००० पौंडाचे व ३१ डिसेंबर १९२६ ह्या तारखेचे आहेत.

| | बँकाची संख्या | भरणा झालेलें भांडवल. | शिल्लक निधी व इतर | ठेवी | | रोख शिल्लक | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | हिंदुस्थानाच्या बाहेर | हिंदुस्थानात | हिंदुस्थानाच्या बाहेर | हिंदुस्थानांत |
| आपल्या व्यवहारापैकीं पुष्कळसा भाग हिंदुस्थानांत करणाऱ्या पेढ्या | ५ | ९,६४४ | १०,४७१ | ७३,५३३ | ५१,०७,२४ | १४,२३४ | ७,३२,९९ |
| इतरत्र व्यवहार करणाऱ्या प्रचंड पेढ्यांच्या केवळ शाखा म्हणून हिंदुस्थानात असलेल्या बँका | १३ | ६७,७६९ | ६०,११९ | ८३६,३५३ | २०,४६,९८ | १२२,०५२ | ३३,९८१ |

हिंदुस्थानांतील इलाखा व इतर बँका अंतर्गत व्यापारांतील देवघेवी भागविण्याचें काम करतात, व ह्या अंतर्राष्ट्रीय पेढ्या हिंदुस्थानाच्या परराष्ट्रीय देवघेवी भागविण्यास मदत करून एकंदर व्यापारी व्यवहार पूर्ण करतात. हिंदुस्थानांतून परराष्ट्रांस निर्यात झालेल्या मालाच्या हुंड्या त्या विकत घेतात व लंडन येथील इतर बँकास कटमिती कापून देऊन अगर मुदत भरताच इंग्रजी गिऱ्हाइकांस त्या सादर करून त्यांचे पैसे वसूल करतात. उलट, ज्या परदेशस्थ व्यापाऱ्यांनी हिंदुस्थानास माल पाठविलेला असतो त्यांच्या हुंड्या लंडन येथें विकत घेऊन वसूल करण्याकरतां त्या येथें आणतात. परंतु अशा हुंड्यांची एकंदर किंमत निर्गत हुंड्यांच्या एकंदर किंमतीच्या मानानें नेहमींच कमी असल्यानें स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्या विकत घेऊन किंवा जरूर तर सॉव्हरिनांची आयात करून ह्या पेढ्या लंडनहून हिंदुस्थानांतील निर्यात हुंड्या पूर्णपणें विकत घेण्यास लागणारा पैसा हिंदुस्थानांत परत आणतात. तसेंच, आपल्या लंडन येथील शाखेवर किंवा दुसऱ्या एखाद्या इंग्लिश गिऱ्हाइकावर

काढलेल्या हुंड्या हिंदुस्थानसरकारास अगर इग्लंडांत पैसे पाठवूं इच्छिणाऱ्या इतर मागणीदारास विकूनही ह्या पेढ्या निर्यात हुंड्या विकत घेण्यास पुरेसें चलन उभारतात. ह्या सर्व व्यवहारांत कमीअधिक दरानें बट्टा कापून मिळाल्यानें ह्या पेढ्याचा पुष्कळच फायदा होतो. विशेषतः तेजीच्या हंगामांत पुष्कळ उत्पादकास पैसे द्यावयाचे असल्यानें पैशास एकदम भारी मागणी येते व सर्व निर्यात व्यापारी आपापल्या हुंड्या सदरहू अंतर्राष्ट्रीय पेढ्यास विकून टाकण्यास उत्सुक असतात. साहजिकच ह्या पेढ्या आपली मनोनीत वाढत्या दरानें कापून घेतात, म्हणजे कमी किंमतीस हुंड्या विकत घेतात व त्या किफायतशीर दरानें लंडन येथें वसूल करून घेतात. ह्याशिवाय, येथील लोकांच्या ठेवी ठेवणें, त्यांस कर्ज देणें, त्यांच्या अंतर्गत व्यापारास सहाय्य करणें हे व्यवहारही वरील बँका अलीकडे मोठ्या प्रमाणावर करूं लागल्या आहेत. देशाच्या निरनिराळ्या भागांत ह्या पेढ्याच्या ५० वर शाखा आहेत व त्यांमध्यें येथील लोकांच्या ७ कोटी पौंडाहून अधिक रकमेपर्यंत ठेवी आहेत. शाखा व लोकांच्या ठेवी ह्याबद्दलचे इलाखा बँका व हिंदी समाईक भांडवलाच्या बँका ह्याचे १९१८ सालचे आकडे अनुक्रमें ६८ शाखा व ६० कोटी रुपये ठेवी, आणि २०६ शाखा व ३७ कोटि रुपये ठेवी असे आहेत हें ध्यानात घेतल्यास परदेशी देवघेवीच्या व्यवहाराचा सर्वस्वी मक्ता असलेल्या ह्या परकी पेढ्या अंतर्गत व्यवहारातही येथील पेढ्यांशीं अलीकडे किती तीव्र स्पर्धा करूं लागल्या आहेत हे स्पष्ट होईल. महायुद्धाच्या वेळी त्या पेढ्यांवर हुंडणावळीच्या दराबद्दल सरकारनें नियंत्रणें घातली व पुढें त्याची भरपाई करण्याकरता पेढ्यास किफायतशीर अशा भावानें त्यास हुंड्या विकल्या त्याबद्दल व अलीकडे सरकार ह्या बँकांजवळून त्यांच्या लंडन येथील शाखावर हुंड्या विकत घेऊन त्या स्टेट सेक्रेटरीकडे पाठवितें ह्याबद्दल मागील प्रकरणांत उल्लेख आलेला आहे. ह्या पेढ्या हिंदुस्थानांतील निर्यात हुंड्या विकत घेऊन अप्रत्यक्षपणें आपला पैसा विलायतेस पाठवितात, आणि विलायतेंत त्या हुंड्याचे पैसे जमले म्हणजे तेथें ब्रिटिश व्यापाऱ्यांनी हिंदुस्थानास पाठविलेल्या मालाच्या हुंड्या अगर स्टेट सेक्रेटरीच्या हिंदुस्थानसरकारवरील हुंड्या विकत घेऊन तो पैसा परत हिंदुस्थानास आणतात. हल्ली सरकारच येथील शाखांकडून निर्यात हुंड्या विकत घेऊं लागल्यानें निर्यात हुंड्या लंडनला पाठविण्याच्या व स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्या तेथें विकत घेऊन हिंदुस्थानास पाठविण्याच्या त्रासातून त्यांची मुक्तता झालेली आहे.

**४ समाईक भांडवलाच्या हिंदी पेढ्याः**--अर्वाचीन पद्धतीने व समाईक भांडवलाच्या साहाय्याने पेढ्यांचे व्यवहार करण्याचा धंदा हिंदुस्थानांत गेल्या तीस एक वर्षांतच अस्तित्वांत आलेला आहे. सन १९००--१९०१ मध्यें नोंदलेल्या पेढ्यांची संख्या ४३० असून त्यांचें भरणा झालेलें भांडवल ३ कोटी ८२ लक्ष रुपये होतें. १९०५-६ साली हेच आंकडे अनुक्रमें ५९५ पेढ्या व ४ कोटी ४० लक्ष रुपये भांडवल असे असून १९२०--२१ साली पेढ्यांची संख्या ४९२ असूनही भांडवल मात्र ७ कोटी ९१ लक्ष रुपये होतें. पुढें अनेक पेढ्या बुडून त्यांची संख्या कमी झाली. तरी महायुद्धापासून पेढ्यांची संख्या व त्याचे भांडवल ह्यांत पुष्कळ वाढ झालेली आहे. ह्याबद्दलचे पुढील आंकडे महत्त्वाचे आहेत.—

**समाइक भांडवलाच्या पेढ्या व कर्ज देणाऱ्या मंडळ्या**

| वर्ष | संख्या | भरणा झालेलें भांडवल | | |
|---|---|---|---|---|
| १९००-०१ | ४३० | ३.८२ | कोटि | रुपये |
| १९०५-०६ | ५९५ | ४.४० | ,, | ,, |
| १९१०-११ | ४९२ | ७.९१ | ,, | ,, |
| १९१३-१४ | ५५२ | ७.९१ | ,, | ,, |
| १९१९-२० | ५५६ | ९.३५ | ,, | ,, |
| १९२०-२१ | ७३५ | २०.४१ | ,, | ,, |
| १९२१-२२ | ८२८ | २७.२४ | ,, | ,, |

**१९२१-२२ सालच्या आंकड्यांचें पृथक्करण**

| मंडळ्यांचे प्रकार | संख्या | भरणा झालेलें भांडवल | | |
|---|---|---|---|---|
| १ पेढ्यांचे व्यवहार करणाऱ्या मंडळ्या | ३८६ | १३.१९ | कोटि | रुपये |
| २ कर्ज देणाऱ्या मंडळ्या | १५३ | २.२६ | ,, | ,, |
| ३ पैसे व्याजीं लावणाऱ्या मंडळ्या | ५२ | ९.४२ | ,, | ,, |
| ४ निधि, चिट वगैरे संस्था | २३७ | २.३७ | ,, | ,, |
| एकूण | ८२८ | २७.२४ | ,, | ,, |

नोंदविलेल्या मंडळ्यापैकीं पुष्कळांचे व्यवहार अगदी अल्प प्रमाणावर चालतात हें वरील आंकड्यांवरून दिसून येईलच. ज्या मंडळ्यांचें भांडवल व शिल्लक निधि ह्यांची एकंदर रक्कम एक लाख रुपयांवर आहे अशा पेढ्यांचे दोन वर्ग केलेले असतात: भांडवल व शिल्लक निधि ह्यांची बेरीज १ लाखाहून अधिक व पांच लाखांहून कमी असणाऱ्या बँकांचा पहिला वर्ग व ही बेरीज ज्या पेढ्यांच्या बाबतीत पांच लाखांवर असते त्याचा दुसरा वर्ग होय. ह्या दोही वर्गाबद्दल निराळी माहिती खालीलप्रमाणें आहे.

## समाईक भांडवलाच्या मोठ्या पेढ्या

३१ डिसेंबर १९२६ सालची परिस्थिति दाखविणारे आंकडे

| पेढ्यांचा वर्ग | संख्या | भांडवल व शिल्लक निधि | ठेवी | रोख शिल्लक |
|---|---|---|---|---|
| | | लक्ष रुपये | लक्ष रुपये | लक्ष रुपये |
| १ ज्यांचें भांडवल व शिल्लक निधि ह्यांची बेरीज पाच लाख रुपयांहून अधिक आहे अशा पेढ्या | २७ | १०६९ | ५९,६१ | ९,११ |
| २ ज्यांचें भांडवल व शिल्लक निधि ह्यांची बेरीज १ लक्ष रुपये व ५ लक्ष रुपये ह्याच्या-दरम्यान आहे त्या पेढ्या | ४६ | १२२ | ३,४५ | ८२ |

वरील हिंदी पेढ्यांपैकीं कित्येकांत व्यवस्थापक युरोपियनच आहेत. समाईक भांडवलाच्या साहाय्यानें अर्वाचीन पद्धतीवर पेढ्यांचे व्यवहार करण्याची पद्धत हिंदुस्थानांत नवी असल्यानें त्या चालविणाऱ्या लोकांपैकीं कित्येकांस जरूर तेवढें विशिष्ट ज्ञान व अनुभव ही नसतात. १९०५—६ सालीं स्वदेशी चळवळीच्या लाटेस उसळी आली होती; त्यावेळीं अनेक पेढ्या अज्ञ व अननुभवी लोकांनी काढल्या व आत्मीयत्वाच्या भावनेनें मध्यम वर्गांतील पुष्कळ लोकांनी त्यांस आश्रयही दिला. परंतु त्यांचे व्यवहार सावधगिरीनें, कसोशीनें व प्रामाणिकपणानें न चालल्यानें त्यांच्यापैकीं पुष्कळांस आपलें दिवाळें काढावें लागलें. १९१३ सालच्या बँकांच्या दिवाळ्यांचें सत्र व त्यामुळें मध्यम वर्गांतील अनेक लोकांचें झालेलें नुकसान ह्या गोष्टींची अजूनही पुष्कळांस आठवण असेल.

**५ बँकांचीं दिवाळीं**:—१९१३ सालीं अनेक देशी बँकांची दिवाळीं निघालीं त्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या चालकांस पेढ्या कार्यक्षमतेनें व सावधगिरीनें कशा चालवाव्या हें माहीत नव्हतें हेच होय. दिवाळी निघालेल्या बँकांच्या व्यवस्थेंत पुढील दोष प्रामुख्यानें दिसून आले. (१) डायरेक्टर लोकांस पेढ्याच्या व्यवहाराची प्रत्यक्ष माहिती फारच कमी असे व साहजिकच बँकेच्या व्यवस्थेचें योग्य नियमन त्यांजकडून होत नसे; (२) पुरेशा तारणाखेरीज कर्ज दिलें जाई व बँकेचे हिशेबहि व्यवस्थितपणें ठेवलेले नसत; (३) बँकेचा पुष्कळसा पैसा उद्योगधंद्यांत गुंतविलेला असून जरूर पडल्यास लवकर हातीं येण्यासारखा नव्हता; (४) कित्येक बँकांनी आपला पैसा सट्टेबाजींत घालविला व दुसऱ्या कित्येकांनी भारी व्याजानें लोकांजवळून ठेवी घेऊन त्या धोक्याच्या व गैरफायदेशीर धंद्यांत गुंतविल्या; (५) कांहीं बँकांनी पेढ्यांच्या सामान्य व्यवहाराबरोबरच इतर व्यापारधंदा सुरू करून पेढीच्या धंद्यांत आवश्यक असलेली सावधगिरी धाब्यावर बसविली; (६) ह्या अज्ञानाच्या व अननुभवाच्या दोषाखेरीज दुसरे निखालस लुच्चेगिरीचे प्रकारही कांहीं बँकांत दिसून आले व विशेषतः हिशेबांची घालमेल करून भांडवलांतूनच व्याज व नफा देण्याचा उपक्रम कित्येक बँकांत आढळला. अशा दोषपूर्ण व डळमळित पायावर उभारलेल्या पेढ्या लोकांच्या गरविश्वासाची अल्पशी झुळुक लागतांच कोसळून पडल्या ह्यांत आश्चर्य नाहीं. तरी त्यावेळीं दिवाळी काढलेल्या बँकांत एकंदरीनें लहान लहान बँकाच अधिक होत्या व एका अर्थानें अर्वाचीन पद्धतीच्या हिंदी पेढ्यांची योग्य व पायाशुद्ध वाढ होण्यास त्या अरिष्टाची अप्रत्यक्ष मदतच झाली. दिवाळी निघालेल्या बहुतेक बँकांची नांवें मात्र भपकेदार असत व अधिकृत भांडवलाचा आंकडाही मोठा असे. परंतु लोकांनीं घेतलेल्या भांडवलाचें अधिकृत भांडवलाशी व प्रत्यक्ष भरणा झालेल्या भांडवलाचें अधिकृत व घेतलेल्या भांडवलाशी फारच कमी प्रमाण असे. महायुद्धानंतर हिंदुस्थानांत कांहीं वर्षें व्यापार व धंदे ह्यांची चलती होती; परंतु पुढें लगेच मंदीचे दिवस आले, त्यावेळींही बऱ्याच बँकांस आपली दिवाळी काढावी लागली. १९२३ ह्या एका सालांतच २० बँकांची दिवाळी निघाली, व मुंबईची टाटा इंडस्ट्रिअल बँक, सिमल्याची अलायन्स बँक व कलकत्ता इंडस्ट्रियल बँक ह्यांसारख्या एकंदर ३ कोट ९३ लक्ष भांडवल भरणा केलेल्या बँकांसही त्यावेळीं धंदा बंद करावा लागला. तरी युद्धोत्तर काळच्या व्यापारी अरिष्टांत गडप झालेल्या ह्या बँकांचें उदाहरण सोडलें तर एकंदरीनें असें दिसून येतें कीं सावधगिरीनें व कार्यक्षमतेनें पेढ्यांच्या धंद्यांत भांडवल घातलें तर केवळ धंद्यास मागणी नाहीं म्हणून बूड येतें असें सहसा होत नाहीं. ठेवी परत करण्यास पेढ्यांनी पुरेसा पैसा हातांशीं बाळगावा लागतो व ही व्यवस्था जों जों अधिक समाधानकारक असेल तों तों लोकांचा बँकेवरील विश्वास व बँकेची स्थिरता ह्यांत वाढ होते. हातांशीं ठेवलेल्या

शिलकीचें एकंदर ठेवींशीं प्रमाण वर वर्णिलेल्या परराष्ट्रीय पेढ्यांजवळ बरेंच अधिक असतें. इम्पीरियल बँकेचे बाबतीत हें प्रमाण त्यांहूनही अधिक असतें. परंतु देशी बँकांत मात्र सदरहू प्रमाण सामान्यतः अगदींच कमी असतें. अलीकडे देशी बँका शिलकीचें प्रमाण वाढतें ठेवण्याचें धोरण स्वीकारीत आहेत. प्रत्येक पेढीनें आपल्या जवळील एकंदर भांडवल, ठेवीदारांची रक्कम व त्या परत मागितल्या जाण्याचा संभव ह्यांचा पूर्ण विचार करून सामान्यतः लौकर मोकळा करता येईल अशा मार्गानें आपला पैसा गुंतविला व ठेवीदारांची नेहमीची मागणी भागविण्यास पुरेशी शिल्लक ठेवली तर धंद्यास सहसा धोका येत नाहीं. परदेशी देवघेवीचा व्यवहार करणाऱ्या बँका, इलाखा बँका व देशी बँका ह्यांच्या शिलकेचें त्यांच्याजवळ असलेल्या ठेवींच्या रकमेशीं निरनिराळ्या वर्षांत सरासरीनें शेंकडेवार प्रमाण किती होतें, हें पुढील कोष्टकावरून दिसेलः—

| | १९१० | १९१३ | १९१६ | १९१९ | १९२५ | १९२६ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ इलाखा बँका | ३१ | ३६ | ३५ | ३१ | २१* | २६* |
| २ परदेशी देवघेव करणाऱ्या बँका | | | | | | |
| (अ) मुख्यतः हिंदुस्थानात व्यवहार करणाऱ्या | १६ | १९ | २५ | ३५ | १३ | १४ |
| (ब) मुख्यतः हिंदुस्थानाबाहेर व्यवहार करणाऱ्या | २१ | १७ | ३५ | ६७ | १५ | १७ |
| ३ समाईक भांडवलाच्या हिंदी बँका | | | | | | |
| (अ) पाच लाखांवरील भांडवलाच्या | ११ | १८ | २४ | २१ | १९ | १५ |
| (ब) एक व पांच लाख ह्यामधील भांडवलाच्या | | १६ | १७ | २४ | २० | २४ |

* हे आकडे इंपीरियल बँकेसंबंधीं आहेत.

६ **पेढ्यांचें नियमन**—१९१३ सालीं हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर बँकांचीं दिवाळीं निघालीं तेव्हांपासून पेढ्यांच्या व्यवहाराचें कायदेशीररीत्या कांहीं नियमन करणें आवश्यक आहे किंवा काय ह्या प्रश्नाचा सरकारी व खाजगी रीतीनें अनेक वेळां ऊहापोह झालेला आहे. ह्याच सालीं हिंदुस्थानसरकारनें प्रांतिक सरकारांचीं ह्या विषयासंबंधींचीं मतें मागविलीं होतीं व पुढील स्वरूपाचीं नियंत्रणेंही सुचविलीं होतींः— '(१)

स्वतःस बँक म्हणविणाऱ्या व बँकांबाबत असलेल्या कायद्यान्वयें नोंदलेल्या प्रत्येक बँकेच्या विकलेल्या भागांची किंमत विवक्षित मर्यादेहून कमी असूं नये; ( २ ) भागीदारांनीं विकत घेतलेल्या ह्या भागांच्या किंमतीचा पुरेसा भाग ठराविक काळांत प्रत्यक्षपणें भरणा केला जावा; ( ३ ) बँकेचा शिलकी निधि पुरेसा वाढला नाहीं तोंपर्यंत कमाईची सर्वच्या सर्व रक्कम भागीदारास वांटून देण्यास मनाई असावी; व ( ४ ) 'बँक' ह्या नांवानें व्यवहार करणाऱ्या धंदेवाल्यानें पेढ्यांच्या व्यवहारांखेरीज इतर व्यापारांत अगर उद्योगधंद्यांत पडूं नये.' अननुभवी व कधीं कधीं अप्रामाणिक लोकांनीं कायदेशीरपणें नोंदलेल्या बँका चालवून ठेवीदारांचें व एकंदर बाजारचें नुकसान होऊं नये ह्यास्तव कायदेशीर नियंत्रणें असणें इष्ट आहे, ह्याबद्दल दुमत नाहीं. परंतु ठेवीदारांचें व गिऱ्हाइकांचें हितसंरक्षण सरकार कायद्यानें करूं लागलें तर बँकेच्या व्यवस्थापकाची जबाबदारी व ठेवीदारांची व गिऱ्हाइकांची जागरूकता कमी होऊन बँका बुडाल्यास त्याचें खापर सरकारच्या माथ्यावर फुटल्याशिवाय राहणार नाहीं. व्यवस्थापकास बेजबाबदार व ठेवीदारांस गाफील होण्यास उत्तेजन न देतां सरकारनें सुचविलेल्या वरील प्रकारचीं कांहीं नियंत्रणें घालणें शक्य व इष्टही आहे. मध्यवर्ती कायदे मंडळांत व इतरत्र हा प्रश्न वारंवार चर्चेस निघालेला आहे. सध्यां पेढ्यांच्या प्रसाराबद्दल सर्व प्रांतिक व मध्यवर्ती सरकाराकडून खास कमिट्या नेमून चौकशी होत आहे. तिच्या अनुषंगानेंही ह्या बाबीचा पुन्हा विचार होईलच. परंतु कायदेशीर नियमन कोणत्याही स्वरूपाचें असलें तरी बँकांशीं व्यवहार करणाऱ्या लोकांत स्वहित-संरक्षणाची तीव्र जागरूकता व बँका चालविणाऱ्या मंडळांत सार्वजनिक जबाबदारीची पूर्ण जाणीव ह्या भावनांची पूर्ण वाढ झाल्याखेरीज व समाईक भांडवलाच्या पेढ्यांबद्दलची सर्व माहिती सध्याहून अधिक स्पष्टपणें जाहीर होत गेल्याखेरीज बँकांचे व्यवहार नीटपणें चालणार नाहींत.

हिंदुस्थानाच्या सध्याच्या आर्थिक परिस्थितींत पेढ्यांचा प्रसार होण्याची विशेष आवश्यकता असल्यानें सरकारी नियंत्रणाबद्दल सावधगिरी बाळगणें जरूर आहे. लहानसहान गांवांतही स्वतंत्र पेढ्या अगर मोठ्या पेढ्यांच्या शाखा स्थापल्या जाऊन त्यांच्या द्वारा थोडथोड्या रकमा एकत्र केल्या गेल्याशिवाय लहानमोठ्या धंदेवाल्यांच्या भांडवलविषयक गरजा भागावयाच्या नाहींत व बाजारांतील व्याजाचे भारी दरहि उतरावयाचे नाहींत. सुधारलेली चलनपद्धति अस्तित्वांत येण्यास व देशाची औद्योगिक प्रगति होण्यास पेढ्यांच्या वाढत्या प्रसाराची किती आवश्यकता आहे, ह्याबद्दल मागें अनेक ठिकाणीं विवेचन केलेलें आहे.[१] सरकारनें पेढ्यांच्या व्यवहारांचें नियंत्रण करतांना त्यांच्या नैसर्गिक प्रसाराच्या मार्गांत अनावश्यक अडचणी उपस्थित करतां कामा नये. विशेषतः हिंदुस्थानसरकारच्या सर्वच आर्थिक धोरणाबद्दल लोकांच्या

---

१ मागें पानें ७२-७४ पहा.

मनांत साशंकता असल्यानें देशी बँकांवरील सरकारी नियंत्रणें प्रमाणाबाहेर जाऊं न देण्याची विशेष खबरदारी घेतली पाहिजे. १९१३ साली बँकेमागून बँकेचे दिवाळें निघूं लागलें व ठेवीदारांच्या मनांत चलबिचल होऊन कांहीं चांगल्या बँकाही धोक्यात आल्या. अशा वेळी सरकारनें सहानुभूतीचें व हिंमतीचें धोरण स्वीकारून व बँकांची बरी–वाईट स्थिति अजमावून त्याप्रमाणें स्वतःवर हमी घेतली असती तर दिवाळ्यांचें सत्र इतकें लांबलें नसतें, असें कित्येकांचें म्हणणें आहे. १९२३ च्या एप्रिलमध्ये सिमल्याची अलायन्स बँक बुडण्याच्या बेतांत आली, तेव्हां त्या बँकेच्या दिवाळ्याचा इतर बँकांवर अनिष्ट परिणाम होऊं नये म्हणून इम्पीरियल बँकेनें सरकारच्या हुकमावरून त्या बँकेच्या सर्व ऋणकोंचे निम्मे पैसे देण्याची हमी घेतली. असेंच धोरण १९१३ साली, त्यातल्या त्यात बऱ्या पेढ्यांच्या बाबतीत, सरकारनें स्वीकारलें असतें तर ठेवीदारात व सामान्य भागीदारात एवढा हाहाःकार उडाला नसता. १९१३ साली हिंदी ठेवीदारांचे व भागीदारांचें नुकसान होणार होतें म्हणून स्वदेशी बँकांची दिवाळीं निघत असलेलीं सरकारनें निमूटपणें पाहिलीं व १९२३ साली युरोपियन ठेवीदारांचे मोठ्या प्रमाणावर नुकसान होण्याची भीति दिसताच एका परदेशी बँकेच्या मदतीस मात्र सरकार धावून गेलें, अशी सरकारी धोरणाची कोणी चिकित्सा केली, तर ती अगदीच भ्रामक आहे असें ठरविणें कठिण जाईल. व्यापाराच्या तेजीमंदीत उत्तम प्रकारें चालविलेल्या पेढ्यासही कधीकधीं दुर्दैवानें बिकट दिवस येतात. अशा पेढ्यास योग्य ती मदत करणें हें सरकारचें कर्तव्य, अनिष्ट स्वरूपाच्या पेढ्यांच्या व्यवहाराचें नियत्रण करण्याइतकेंच महत्त्वाचें आहे. काहीं बेजबाबदार लोक स्वतःचें हित साधण्याकरता अगर निव्वळ दुष्टाव्यानें लहान महान कारणांवरुन पेढ्यांबद्दल अनिष्ट बातम्या पसरवितात, किंवा अन्यमार्गानें त्यांनी बदनामी करण्याचा प्रयत्न करतात. अशा लोकांवर गुन्हा शाबीत झाल्यास त्यांस कडक शिक्षा करण्याची कायद्यानें व्यवस्था होणें इष्ट आहे अशी सूचना करण्यांत आली आहे. परंतु पेढ्यांच्या व्यवहारांवर योग्य स्वरूपाच्या सार्वजनिक टीकेचा इष्ट परिणाम होणें आवश्यक असतें. योग्य टीका व बेजबाबदार कंड्या ह्यांच्यांतील फरक ओळखून काढणें कठिण असल्यानें ह्या बाबतींतील कायदा अजून बदललेला नाहीं.

**७ जमीनीचे मालक व पेढ्यांच्या सोयीः**—गिऱ्हाइकांच्या विशिष्ट गरजांस अनुसरून दुकानदारानें आपला व्यवहार केला पाहिजे हे सामान्य व्यवहारांतलिच तत्त्व आहे. पेढ्यांसही स्वतःच्या कुळांच्या विशिष्ट गरजांस व संवयीस अनुरूप असें धोरण अनेक बाबतीत स्वीकारावें लागतें. परंतु कित्येक कुळांची आर्थिक परिस्थिति, त्यांच्या भांडवलविषयक गरजा व त्यांस पेढ्यांकडून हव्या असणाऱ्या साहाय्याचें स्वरूप ही नेहमींच्या व्यवहारांहून एवढीं भिन्न असतात कीं सामान्य पेढ्यांचा त्यांस म्हणण्यासारखा उपयोग होत नाहीं. नवे धंदे स्थापूं इच्छिणारे योजक,

आपल्या मर्यादित उत्पन्नांत काटकसर करून गांठीं ठेवलेले पैसे सुरक्षित ऱ्हावें व त्यावर शक्य तितकें व्याजही मिळावें अशी अपेक्षा करणारे मध्यम वर्गांतील लोक, लहान प्रमाणावर, सामान्यतः गैरफायद्यानें, शेती करणाऱ्या शेतकऱ्यांची धंद्यास व इतर खर्चास कर्ज मिळण्याविषयींची मागणी व जमीनीच्या साधारणतः बऱ्या स्थितींतल्या मालकाची आपल्या शेतीच्या सुधारणेकरतां लांब मुदतीच्या व माफक दराच्या कर्जाची मागणी, ह्याप्रमाणें भिन्न प्रकारच्या वर्गांची भिन्न स्वरूपाची मागणी असते व ती भागविण्यास पेढ्याही विशिष्ट स्वरूपाच्या असाव्या लागतात. पेढ्यांच्या सर्वसामान्य व्यवहाराचें व संघटनेचें मागें प्रास्ताविक भागांत विवेचन केलेलें आहे व येथवर प्रस्तुत प्रकरणांत सामान्य पेढ्यांसंबंधीं हिंदुस्थानची परिस्थिति कशी आहे ह्याचाही थोडक्यांत विचार केलेला आहे. लहान लहान व कर्जबाजारी हिंदी शेतकऱ्यांस व अगदीं लहान धंदेवाल्यांस उपयोगी पडणाऱ्या सहकारी पतपेढ्यांचा पुढील प्रकरणांत स्वतंत्रपणें विचार करण्याचें योजिलें आहे. आतां येथें शेतजमीनीच्या मालकांस, धंदेवाल्यांस व पैसे व्याजी लावूं इच्छिणाऱ्या मध्यम वर्गांतील लोकांस योग्य स्वरूपाच्या पेढ्यांच्या सोयी हिंदुस्थानांत कितपत उपलब्ध आहेत हें पहावयाचें आहे.

स्वतःच्या मालकीची पुष्कळ जमीन असून तिची सुधारलेल्या पद्धतीनें मशागत करण्याइतकी कर्तबगारी व भांडवलाची सोयही ज्यांस उपलब्ध आहे असे जमीनदार हिंदुस्थानांत फारच थोडे आहेत. कायम धाऱ्याची पद्धत अस्तित्वांत असलेल्या भागांतील जमीनदार व इतर प्रांतांतील इनामदार, जहागीरदार व सरदार ह्यांचें जमीनीच्या किफायतशीर मशागतीकडे जितकें लक्ष्य असावें तितकें गेलेलें नाहीं. एखादी शेतीवाडी कोर्ट ऑफ वॉर्डसूच्या ताब्यांत असली तर कांहीं वर्षें तिची काळजीपूर्वक व्यवस्था लागून ती भरभराटीस आल्याचीं कित्येक उदाहरणें सांपडतात. गुजराथेंतील तालुकदार आपल्या मालमत्तेकडे नीट लक्ष्य देत नाहींत व शेतकी गैरफायदेशीर होऊन ते कर्जबाजारी होण्याची भीति असते, ह्यास्तव सरकारनें निराळा कायदा करून त्या अन्वयें स्वतंत्र अधिकारी नेमून आणि तालुकदारांच्या मालकी हक्कांवर व्यावहारिक नियंत्रणें घालून त्यांच्या हलगर्जीपणामुळें शेतवाडीचें होणारें नुकसान पुष्कळसें कमी केलें आहे. सामान्य जमीनदार वर्गानें मात्र जमीनीच्या मशागतीकडे अधिक लक्ष्य देऊन उत्पादक साधनें व संघटना ह्यांत जरूर त्या सुधारणा करून आपापल्या मालमत्तेची अधिक किफायतशीरपणें वहिवाट करणें शक्य व जरूर आहे. असें करण्यास त्यांस बरेंचसें भांडवल कमी दरानें व लांब मुदतीनें द्यावें लागेल. सामान्य पेढ्यांनीं आपले पैसे लांब मुदतीच्या, कमी व्याजाच्या व स्थावर तारणाच्या व्यवहारांत गुंतविणें शक्य व इष्टही नसतें. म्हणून सरकारी मदतीनें व विशिष्ट वर्गांनीं गुंतविलेल्या

भांडवलाच्या साहाय्यानें जमीनदारांकरता स्वतंत्र पेढ्या निघणें आवश्यक आहे. आयर्लंड, फ्रान्स, इजिप्त इत्यादि देशांत अशा पेढ्या यशस्वी झाल्या आहेत व हिंदुस्थानातही अशा पेढ्या काढण्याबद्दल आज पन्नास वर्षें चळवळ चालू आहे. परंतु मध्यंतरी सहकारी चळवळीचें बीज येथें पेरलें गेलें व त्या पेढ्यांमार्फत सर्व जमीनीच्या मालकाच्या भांडवलविषयक गरजा भागतील असें कांहीं काळ लोकास वाटत होतें. परंतु अलीकडे सहकारी पेढ्यांच्या हितकारक परिणामाचा अपुरेपणा लोकांस दिसून येऊं लागल्यापासून जमीनीच्या मालकांकरता स्वतंत्र पेढ्या असण्याची आवश्यकता सरकारास व लोकांस पटलेली आहे. १९२५ साली मद्रास इलाख्यात असली बँक काढण्याचें ठरलें व जमिन गहाण लावून घेऊन जमीनदारास माफक व्याजाच्या दरानें व लांब मुदतीनें कर्ज देण्याचा उपक्रम सुरू झाला. अलीकडे मुंबई इलाख्यातही अशा पेढ्या निघं लागल्या आहेत. असेच अनेक उपक्रम होऊन व सरकारचें त्यास योग्य तेवढें प्रोत्साहन मिळून जुनें कर्ज वारण्यास, व उत्पादक सुधारणा घडवून आणण्यास भांडवल मिळालें व त्याचा जमीनदारांनी कसोशीनें विनियोग केला तर त्या वर्गाची व एकंदर शेतकीच्या धंद्याची स्थिति बरीच सुधारण्यासारखी आहे. जमीनीच्या तारणावर कर्ज मिळण्याच्या सोयीचा हा प्रश्न सहकारी चळवळीशी कांहीं बाबतीत संलग्न असल्यानें त्याचा पुढील प्रकरणांत पुन्हा थोडा उल्लेख करावा लागेल.

**८ औद्योगिक पेढ्या**—व्यापाऱ्यास त्याच्या जवळील हुंड्या विकत घेऊन व कारखान्याच्या मालकांस चालू खर्चासाठीं अल्प मुदतीनें कर्ज देऊन त्यांच्या गरजा इंम्पीरियल बँक व समाईक भांडवलाच्या सामान्य पेढ्या ह्यांस भागविता येतात. परंतु एखादा धंदा नवीनच सुरू करावयाचा असला म्हणजे त्यास भांडवलाची गरज भारी प्रमाणावर व जास्त मुदतीवर लागते. शिवाय, तो धंदा किफायतशीर होईल किंवा नाहीं ह्याची अगाऊ अटकळ बांधणें सामान्य पेढी-वाल्यास जड जातें. ह्याकरितां नव्या जुन्या धंद्यास भांडवल पुरविण्याकरितां स्वतंत्र पेढ्या काढणें उपयुक्त ठरतें. औद्योगिक पेढ्या स्वतःजवळ तज्ञ परीक्षक बाळगून त्यांच्यामार्फत कुळाच्या धंद्याची सांपत्तिक परिस्थिति बिनचूक अजमावूं शकतात व एखाद्या धंदेवाल्यास पैसे दिले म्हणजे त्याच्या एकंदर व्यवहारावर जरूर तेवढें नियंत्रणही ठेवतात. अर्वाचीन पद्धतीनें धंदा करण्यांत सुरुवातीस भांडवलाचा खर्च पुष्कळ करावा लागत असला तरी धंद्याची प्राथमिक अवस्था नाहींशी झाल्यावर त्यांत कमाई चांगली होते. धंद्यांत भांडवल गुंतविणाऱ्यांस ही गोष्ट माहीत असते व एखाद्या औद्योगिक बँकेच्या व्यवस्था-पकांत व परीक्षकांत लायक इसम आहेत अशी त्यांची व पैसे गुंतविणाऱ्या सामान्य जनसमूहाची खात्री झाली तर पेढीस पैशाचा तुटवडा पडणार नाहीं. शिवाय,

उद्योगधंद्यांस मदत करण्याकरतां काढलेल्या पेढ्यांस सरकारचें साहाय्य अनेक मार्गांनी मिळण्यासारखें आहे. सरकारकडून स्वतःच कांही कांही धंद्यांस भांडवल पुरविण्याचा उपक्रम मद्रास, संयुक्त प्रांत, आणि बिहार व ओरिसा ह्या प्रांतांत झालेलाच आहे. तरी बहुंशी खाजगी स्वरूपाच्या परंतु विश्वसनीय पेढीमार्फत सरकारी मदत मिळत गेल्यास तिचा उत्पादक मार्गांनीं विनियोग होण्याचा अधिक संभव आहे. जपानांत औद्योगिक पेढ्या निराळ्या असून त्यांस सरकारी मदतही असते. कुळांचे धंदे यशस्वी होतील किंवा नाहीं हें अगाऊ सांगणें, मोठमोठ्या रकमा लांब लांब मुदतीपर्यंत अडकावून ठेवणें व धंदेवाल्यांवर एकसारखी नजर ठेवणें ह्या गोष्टी इम्पीरियल बँकेसारख्या पेढीस फार तर मर्यादित प्रमाणावरच करता येतील. जर्मनीची मध्यवर्ती पेढी औद्योगिक स्वरूपाचा पुष्कळ व्यवहार करते व त्या देशातील सरकारही ह्या धोरणास मनापासून व स्वार्थत्यागपूर्वक मदत करतें. हीच गोष्ट थोड्या प्रमाणावर येथेंही घडून येणें अशक्य नाही. जमीनीचे मालक व धंदेवाले ह्यास इम्पीरियल बँकेकडून सध्यांपेक्षां अधिक साहाय्य मिळणें इष्ट व शक्य आहे. परंतु इम्पीरियल बँकेस सामान्य पेढ्यांचे व्यवहार मोठ्या प्रमाणावर व देशाच्या दूरदूरच्या भागांत करावे लागत असल्यानें विशिष्ट स्वरूपाच्या भांडवलविषयक गरजा तिला समाधानकारकपणें भागवितां येणार नाहीत. सरकारनें ह्या बाबतीत अधिक सहानुभूतीचें व विधायक स्वरूपाचें धोरण स्वीकारल्याखेरीज इम्पीरियल बँकेस धंदेवाल्यांस एवढीही मदत करतां येणार नाही, हे उघड आहे.

इम्पीरियल बँकेच्या धोरणांत सरकारी प्रेरणेनें इष्ट तो फेरबदल होऊनही स्वतंत्र औद्योगिक पेढ्याची आवश्यकता नाहीशी होणार नाही. १९१६ सालच्या औद्योगिक कमिशननें जपान व जर्मनी येथील परिस्थितीचें व हिंदुस्थानच्या सद्यःकालीन गरजांचें परीक्षण करून असा निकाल दिला की, येथें स्वतंत्र औद्योगिक पेढ्या स्थापन होणें आवश्यक आहे व त्यांस ठराविक अटीवर सरकारनें मदत केल्यास व त्यांचें कामही कांही मूलभूत महत्त्वाच्या सावधगिरीच्या धोरणास धरून चालल्यास अशा बँकांपासून हिंदुस्थानाचें आर्थिक हित पुष्कळच साधेल. औद्योगिक बँकांची घटना व त्यांचे व्यवहार ह्यांजबद्दल कमिशननें पुढील सूचना केल्या होत्या:—[1]

( १ ) एकंदर व्यवहारास लागणाऱ्या भांडवलाचा बराच मोठा भाग भागीदारांकडून व डिबेंचर धारण करणारांकडून उभारलेला असावा; ( २ ) एकाच स्वरूपाच्या धंद्यांत प्रमाणाबाहेर पैसा गुंतवूं नये; ( ३ ) जमीन, इमारती, यंत्रसामुग्री इत्यादि स्थावर मिळकतीच्या तारणावर दिलेल्या कर्जाची रक्कम शक्य तितकी मर्यादित केली जावी; ( ४ ) धंदेवाल्यांस लागणाऱ्या चालू भांडवलांतच बँकेचा पैसा अधिक गुंतविला जावा; ( ५ ) धंद्याच्या सुरुवातीसच

१ मागें पान ४४ पहा.

लागणारें भांडवल पुरवितांना बँकेनें फार सावधगिरी बाळगावी व निदान पहिल्या प्रथम तरी नवे धंदे स्वतःच्या जबाबदारीवर काढूं नयेत; व (६) आपल्या व्यवहाराच्या निरनिराळ्या भागांपैकीं कोणताही एक प्रमाणाबाहेर जाऊं देऊं नये. १९१८ सालीं मुंबईस टाटा इंडस्ट्रिअल बँक निघाली, तिला सरकारी मदत कोणत्याही स्वरूपाची नव्हती. बँकेचें भरणा झालेलें भांडवल सुरुवातीस ७० लाख रुपये होतें व लवकरच तें २½ कोट रुपयांपर्यंत वाढविण्यांतही आलें होतें. ह्या बँकेच्या कलकत्ता, हैद्राबाद (दक्षिण), कानपूर, दिल्ली, लखनौ, मद्रास व लंडन येथें शाखा असून प्रथमपासूनच औद्योगिक व्यवहाराबरोबरच इतर सामान्य पेढ्यांचे व्यवहारही ती बँक करीत असे. तीन चार वर्षांतच येथील आर्थिक परिस्थिति प्रतिकूल होऊन नव्याजुन्या अनेक धंद्यांचीं दिवाळीं निघालीं. एवढ्या मोठ्या प्रमाणावर स्वतंत्र औद्योगिक पेढी काढण्यास वेळ अनुकूल नाहीं असें टाटा इंडस्ट्रिअल बँकेच्या प्रमुख व्यवस्थापकांनीं ठरविलें व १९२२ मध्यें आपले 'औद्योगिक' व्यवहार बंद केले. ज्या कार्याकरितां बँक स्थापन झाली तें कार्य तिनें सोडल्यामुळें तिच्या स्वतंत्र अस्तित्वाचें कारण उरलें नाहीं व पुढील वर्षीच सेंट्रल बँक ऑफ इंडिया ह्या हिंदी पेढीशीं तिचा मिलाफ करण्यांत आला. औद्योगिक पेढीचा हा पहिलाच मोठा उपक्रम अपेशी ठरल्यानें तशा पेढ्या काढण्यास खाजगी भांडवलवाले पुन्हां धजत नाहीत. ह्या परिस्थितींत सरकारनें, धंदेवाल्यांनीं व भांडवलवाल्यांनी काय उपाय योजणें आवश्यक आहे ह्याचा पुन्हा पूर्ण विचार होणें जरूर असून तो सरकारतर्फे सध्यां चालू असलेल्या पेढ्यांविषयीच्या चौकशींत होईल अशी अपेक्षा आहे.

**९ बँकेचे व सराफी हुंड्यांचे दर**—सरकारी कर्जरोख्यांच्या तारणावर बँक गिऱ्हाइकास ज्या दरानें कर्ज देण्यास तयार असते त्या दरास बँकेचा दर असें म्हणतात. इतर कर्जरोखे तारण ठेवून दिल्या जाणाऱ्या कर्जास व हुंड्या विकत घेऊन दिलेल्या कर्जास व्याजाचे दर वरील दराहून भारी असतात. निरनिराळ्या प्रांतांत पैशाच्या कमी अधिक पुरवठ्यास व तारणाच्या शहाजोगपणास अनुसरून बँकांचे व्याजाचे दरही भिन्न असतात. विशेषतः अंतर्गत व्यापार करणारांस कर्ज देण्याचे व त्यांच्या हुंड्या वटविण्याचे देशी सराफांचे जे दर असतात ते बँकांच्या दरांहून सामान्यतः पुष्कळच अधिक असतात व निरनिराळ्या गिऱ्हाइकांकडून निरनिराळे दर घेण्याची पद्धतही त्यांच्यांत अधिक प्रमाणावर दिसून येते. कित्येक वेळां हे सराफ लोक आपल्या जवळील हुंड्या कमी कसरीनें इम्पीरियल अगर इतर नव्या पद्धतीच्या बँकेजवळ वटवितात. मंदीच्या हंगामात समाईक भांडवलाच्या बँकांजवळ पुष्कळ पैसा असतो व त्यांचे दरही उतरलेले असतात; परंतु सराफांच्या दरांत कालमानानें फारसे फरक होत नाहीत व त्यांचे दरही भारी असतात. म्हणून बँकांचे दर उतरले म्हणजे सराफांच्या व त्यांच्या दरांत पुष्कळ अंतर पडून सराफांस आपल्या हुंड्या बँकांस विकल्यानें पुष्कळ फायदा होतो. कधीं कधीं

व्यापाऱ्यांच्या मागण्या फार वाढून त्या मानानें सराफांच्या जवळील पैसा कमी पडला तर ते इम्पीरियल व इतर बँकाकडून अनेक स्वरूपानें कमी दराचें कर्ज घेऊन आपल्या गिऱ्हाइकांस भारी दराने देतात. सामान्यतः सराफ अंतर्गत व्यवहारातच पडतात. बँका परराष्ट्रीय व्यवहाराच्या अनुषंगानें होणाऱ्या व्यवहारांत गुंतलेल्या असतात. व्याजाच्या दरात ह्या दोहोंत असलेला फरक दिवसानुदिवस कमी होत आहे, तरी अजूनही देशी पेढीवाले व समाईक भाडवलाच्या बँका ह्याजमध्ये परस्पर व्यवहार नियमित अगर मोठ्या स्वरूपात होत नाही. सराफ लोक सरकारी कर्जरोखे, मंडळ्याचे भाग, परदेशी हुंड्या इत्यादिकांच्या तारणावर व्यवहार सहसा करीत नाहीत. शेतकऱ्यास व लहान धंदेवाल्यांस कर्ज देणें, मालाच्या हुंड्या भारी दराने वटविणें व सोन्याचांदीच्या गहाणावर पैसे कर्जाऊ देणें हेच सराफाचे मुख्य व्यवहार होत. अशा व्यवहारांत दर साल दर शेंकडा २५ पर्यंतही व्याजाचे दर चालू असतात. परंतु सराफाच्या आपापसातील हुंड्यावर मात्र ५ ते ८ टक्क्यावर सहसा कटमिती कापून द्यावी लागत नाही.

तेजीच्या हंगामांत पैशास मागणी जोराची असल्याने बँकांचे दर भारी असतात. ठेवीदारानी ह्याच वेळी आपल्या ठेवी ठेवाव्या म्हणून बँका ठेवीवरील व्याजाचे दरही तात्पुरते वाढवितात. जूनपर्यंतच्या पहिल्या सहामाहीत व्याजाचे दर भारी असून पुढील सहामाहीत ते उतरतात. मागणीत पुष्कळ फरक झाल्यानें व्याजाच्या दरांतही पुष्कळ फरक पडतो. इतर राष्ट्राचा परराष्ट्रीय व्यापार मुख्यतः तयार मालाचा असल्यानें वर्षाच्या एका भागातच बहुतेक व्यवहार करण्याचा त्यांजवर प्रसंग येत नाही व त्यामुळें त्यांच्यांतील बँकाचे दर पर्यायानें स्थिर असतात. शिवाय, ठेवी ठेवण्याची संवय व सर्व देशभर पसरलेल्या लहान मोठ्या बँकाची मध्यवर्ती बँकेशी नेहमी व्यवहार करण्याची पद्धत ह्यांचा तिकडे पुष्कळ प्रसार झालेला असल्यानें व्याजाचे दर एकंदरीनें कमीही असतात. दोन सहामाहीतील इंपीरियल बँकेच्या दराचे पुढील कोष्टक वाचण्यासारखे आहे.

## इम्पीरियल बँकेचा व्याजाचा दर.

| वर्ष | ३० जून अखेरची सहामाही | ३१ डिसेंबर अखेरची सहामाही | वार्षिक सरासरी |
|---|---|---|---|
| १९२१ | ६·०४ | ५·११ | ५·५७ |
| १९२२ | ७·१३ | ४·५१ | ५·८१ |
| १९२३ | ७·४२ | ४·५० | ५·९६ |
| १९२४ | ८·०५ | ५·३२ | ६·६८ |
| १९२५ | ६·५८ | ४·७० | ५·६४ |
| १९२६ | ५·६५ | ४·०० | ५·७३ |
| १९२७ | ६·५० | ५·०० | |
| १९२८ | ६·९५ | — | — |

सराफ लोकांचा देशी व्यापाऱ्यांशी व उत्पादकांशी निकट संबंध येत असल्यानें पैशास असलेल्या मागणीच्या मानानें व्याजाच्या दरांत होणारे फरक पहिल्याप्रथम त्यांच्या दरांत दिसून येतात. बँकांच्या दरांत पुढें कसे फेरबदल होतील हें सराफी बाजारांतील दरावरून कांहींसें दिसून येण्यासारखें असतें. परंतु बँका व सराफांच्या पेढ्या ह्यांचे परस्पर व्यवहार अजून नियमितपणें होत नसल्यानें बँकांच्या दरापेक्षां शेंकडा पांच सहा टक्क्यांनीही सराफी दर भारी असतो. अलीकडे सराफ व बँका ह्यांच्यातील परस्पर व्यवहाराचें प्रमाण वाढत आहे असें वर सांगितलेंच आहे. बँकांच्या दराशींच संलग्न असलेल्या दुसऱ्या एका प्रश्नास १९२१ सालापर्यंत पुष्कळ महत्त्व असे. तेजीच्या हंगामांत व्यापाऱ्यांची पैशास असलेली मागणी व बँकांचे दर ह्यांत पुष्कळ वाढ होते, असें वर सांगितलें आहे. हा तेजीचा हंगाम म्हणजे शेतांतून पिकें निघाल्यापासून तो पावसाळा सुरू होण्यापर्यंतचा म्हणजे सामान्यतः ऑक्टोबर ते एप्रिल हा काळ होय. ह्याच वेळीं शेतकऱ्यांचा सारा व लोकांकडून येणारे इतर पैसे सरकारास मिळावयाचे असतात. १९२१ पर्यंत सरकारच्या बहुतेक शिलकी त्यांच्याच तिजोऱ्यांत अडून पडल्यामुळें बाजारांत पैशाची टंचाई व भारी व्याजाचे दर ह्यांचा अनुभव येत असतां सरकारी खजिने मात्र तुडुंब भरलेले असत. सरकारचे स्वतंत्र खजिने सर्व जिल्ह्यांत व महत्त्वाच्या गावांत असत व मुंबई, मद्रास व कलकत्ता येथें मोठाले शिलकी खजिने ठेवले जात. १८७६ पूर्वी सरकार आपल्या सर्व शिलकी इलाखा बँकांजवळ ठेवी. परंतु मुंबई बँकेकडून एकदा सरकारास धोका आल्यापासून सरकारनें आपल्या शिलका स्वतंत्र खजिन्यांत बाळगण्यास सुरुवात केली, हें योग्यच केलें. तरीही, तिन्ही इलाखा बँकांजवळ किमान शिलकी बिनव्याजी राखण्याचें कबूल करून वास्तविकपणें त्या मर्यादेहून पुष्कळ अधिक रकमा सरकार त्या बँकांजवळ ठेवी ह्याबद्दल वर माहिती आलेली आहे. ह्याशिवाय, पैशाची बाजारांत विशेष टंचाई असे तेव्हां सरकार इलाखा बँकास शक्य तेवढी पैशाची मदतही करी. स्वतःचे व्यवहार पूर्ण विश्वासनीयतेनें चालविता न आल्यानें इलाखा बँकांची सरकारी गिऱ्हाइकी बुडून त्यांस पैशाची टंचाई भासूं लागली ह्यांत त्यांजवर अन्याय झाला असें म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु ह्या बाबतींत दुसरी एक तक्रार अशी होती कीं, सरकार वाजवीपेक्षा जास्त रक्कम स्टेट सेक्रेटरीजवळ शिल्लक ठेवतें व तो त्या रकमेंतील बराचसा भाग लंडनमधील पेढीवाल्यांस कमी व्याजाच्या दरानें वापरावयास देतो. ह्या तक्रारींत बरेंच तथ्यही होतें. १९२१ सालीं इम्पीरियल बँक अस्तित्वांत आल्यापासून सरकारनें आपल्या सर्व शिलका त्या बँकेजवळ ठेवींच्या रूपानें हवाली केलेल्या आहेत, व ज्या ठिकाणीं इम्पीरियल बँकेची शाखा नसेल तेथेंच फक्त सरकारी खजिने जरूर तेवढे ठेवलेले आहेत. पैशासंबंधीं व चलनासंबंधीचे सरकारचे सर्व व्यवहार एका सुप्रतिष्ठित मध्यवर्ती पेढीच्या हातांत गेले म्हणजे हा प्रश्नच मिटेल.

**१० सेव्हिंग्ज बँका**:—मध्यम व गरीब वर्गांतील लोकांस आपल्या लहान लहान ठेवी सुरक्षितपणें व्याजी लावण्याच्या सोयीची पुष्कळ आवश्यकता असते व अशा सोयी असण्यानें त्या वर्गांत मितव्ययाचा व पैशाची शक्य तेवढी बचत करून ते व्याजी लावण्याच्या संवयीचा प्रसार होतो. परंतु अशा गिऱ्हाइकांच्या संख्येच्या मानानें त्यांच्या ठेवी अल्प व त्यांस येणारी मागणी भागविण्यास हातांत ठेवाव्या लागणाऱ्या शिलकेचें प्रमाण अधिक, म्हणून सामान्य पेढ्यांस त्यांच्या गरजा नीट-पणें भागवितां येत नाहीत. तरी प्रायः सर्व पेढ्यांत एक सेव्हिंग्ज बँकेचें खातें असतें व कमी अधिक प्रमाणांत लोक त्याचा उपयोगही करून घेतात. विशेषतः मुंबईच्या 'सेंट्रल बँक ऑफ इंडिया' ह्या पेढीनें अगदीं लहान लहान रकमांचीही लोकांनीं बचत करून त्या व्याजी लावाव्या अशा उद्देशानें चांगली व्यवस्था केलेली आहे. गरीबीतही मितव्ययाचा गुण व्यवहारांत आणण्यास पुष्कळ वाव असतो व सामान्य नागरिकास बचत करण्याची संवय असणें हें राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीस फार अवश्यक आहे. आपापल्या नागरिकास मितव्ययाची संवय अगदी लहानपणा-पासून लागावी ह्या करता कित्येक पाश्चात्य राष्ट्रांत लहान मुलास शाळेंतही त्यांच्या खाऊच्या पैशांतून बचत करून ते 'व्याजी' लावण्यास उत्तेजन देण्यांत येतें. अशा स्वरूपाचे उपक्रम हिंदुस्थानात यशस्वी होण्यास विशेष अवसर नाहीं हे खरें असलें तरी नव्या पिढीस खऱ्या मितव्ययाचे फायदे समजावून देण्याची मध्याहून अधिक पद्धतशीरपणणें व्यवस्था होणें जरूर आहे. सर्व प्रकारच्या सेव्हिंग्ज बँका ह्या बाबतींत पुष्कळच कामगिरी करतात व त्यांच्या कामगिरीचें महत्त्व प्रत्यक्ष आर्थिक परिमाणावरून न ठरवितां त्यांच्या प्रसारामुळें मितव्ययाचें व पैसे व्याजी लावण्याच्या संवयीचें लोकांस जें शिक्षण मिळतें त्याचे आर्थिक व नैतिक महत्त्व अधिक मानलें पाहिजे.

सेव्हिंग्ज बँकेंत आपले पैसे ठेवू इच्छिणाऱ्या लोकांस स्वतःच्या पैशाबद्दल सुर-क्षितता वाटणें हें फार महत्त्वाचें असतें, म्हणून सरकारी सेव्हिंग्ज बँकेचे व्याजाचे दर कमी असूनही तेथें आपले पैसे ठेवण्यास लोक उत्सुक असतात. १८३३ सालापासून सरकारनें सेव्हिंग्ज बँका चालू केल्या व १८८२–३ पर्यंत त्यांचें काम कलकत्ता, मुंबई व मद्रास ह्या ठिकाणीं इलाखा बँकांच्या मार्फत व इतर ठिकाणीं सरकारी तिजोऱ्यांच्या मार्फत चालत असे; परंतु त्या सालापासून पोस्ट ऑफिसांस जोडून सेव्हिंग्ज बँका काढण्याची पद्धत अस्तित्वांत आली. लोकांच्या दाराशी अशा तऱ्हेनें सरकारी पेढ्या उघडल्यानें त्यांची लोकप्रियताही पुष्कळ वाढली व ठेवींची वाढ एकदम प्रमाणाबाहेर होऊं नये म्हणून सन १८८९–९० मध्यें ठेवींची कमाल मर्यादा तीन हजार रुपयांवरून दोन हजार रुपयांवर आणली गेली. पुढें १८९४–५ मध्यें व्याजाचा दरही ३॥। टक्क्यावरून ३$\frac{1}{2}$ टक्क्यावर आणला, तरी ठेवींची एकंदर रक्कम वाढतच गेली. १८९३–४ मध्यें एकंदर ठेवींची रक्कम ९

कोटी रुपये होती, ती १९०२-३ मध्यें ११ कोटी रुपये व १९१३-१४ मध्ये २३ कोटी रुपये एवढी वाढली. विशेषतः १९१३ सालीं अनेक बँका बुडाल्यामुळें मध्यम वर्गांतील लोकांचा पोस्ट ऑफिसाखेरीज इतर बँकांवरील विश्वास बराच उडाला. एप्रिल १९१४ मध्यें एका ठेवीची कमाल मर्यादा पाच हजारांवर नेण्यांत आली. त्याच साली युद्ध सुरू होतांच पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँकेच्या ठेवीदारांत चलबिचल होऊन त्यांपैकीं पुष्कळांनीं आपल्या ठेवी काढून घेतल्या, परंतु सरकारनें ही मागणी तात्काल भागविल्यानें लोकांचा विश्वास पुन्हां बसला व त्यांच्या ठेवीची रक्कम वाढूं लागली. सरकारनेंही महायुद्धाच्या वेळी व पुढें जी कर्जे उभारलीं त्यांपैकीं बहुतेकांत पोस्ट ऑफिसांमार्फत काढलेला एक भाग असे. ह्या उपक्रमानें सरकारी कर्जरोख्यांत पैसे गुंतविण्याची संवय मध्यम वर्गांत वाढली. भरलेल्या रोख रकमेपेक्षा कांही मुदतीनें अधिक रकमेनें भरपाई करून मिळणारी कॅश सर्टिफि-किटेंही पोस्ट ऑफिसामार्फत महायुद्धाच्या वेळीच सरकारने प्रथम काढली व त्यांचा प्रसारही पुष्कळ झालेला आहे. पोस्ट ऑफिसामार्फत सरकारच्या इतर कायमच्या कर्जरोख्यांची खरेदीविक्री करण्यासही सरकार ठेवीदारांस पुष्कळ सवलती देतें. ठेवी-दाराचा पैसा आपल्या नेहमींच्या भांडवलविषयक गरजा भागविण्यास सरकार वापरतें व त्यांची मागणी आपल्या सामान्य शिलकेंतील पैशानें भागवितें. अशा धोरणानें लोकांत मितव्ययाचा प्रसार होऊन त्याची सोय होते व सरकारासही कमी व्याजानें कर्ज मिळतें. शिवाय, पोस्टांतील सेव्हिंग्ज बँकेचे दर इतर बँकांतील सेव्हिंग्ज खात्याहून कमी असल्यानें त्यांच्याशी सरकारनें अयोग्य स्पर्धा केली असेंही होत नाहीं. उलट, जेथें बँका नाहींत अशा अनेक ठिकाणी पोस्टल बँका असल्यानें त्या विशिष्ट शैक्षणिक व आर्थिक कामगिरी करतात, ह्यांत शंका नाहीं. पोस्टल सेव्हिंग्ज बँकेच्या ठेवींची वाढ कसकशी होत आली आहे हे पुढील कोष्टकावरून दिसेलः—

आंकडे हजारांचे आहेत.

| वर्ष | ठेवीदारांची संख्या | नव्या ठेवींची रक्कम रुपये | काढलेल्या पैशा-ची रक्कम रुपये | निव्वळ ठेवींची रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| १९००—१ | ८१६ | ३,९०,३५ | ३,५०,९७ | १०,०४,३३ |
| १९०५—६ | १,११६ | ५,५०,०३ | ४,९१,५० | १५,९९,२६ |
| १९११-१२ | १,५०१ | ८,७८,७० | ६,८०,७२ | १८,८९,८५ |
| १९१३-१४ | १,६३९ | ११,६०,३७ | ९,०४,७३ | २३,१३,७५ |
| १९१४-१५ | १,६४४ | ९,३०,३२ | १७,८८,११ | १४,८९,२९ |
| १९१५-१६ | १,६६० | ८,१६,३२ | ७,७३,४६ | १५,३७,१२ |
| १९२०-२१ | १,८७७ | १८,८४,८५ | १७,३३,४८ | २२,८३,२१ |
| १९२५-२६ | २,३१७ | १९,७८,६८ | १८,१९,४८ | २७,२३,१४ |
| १९२६-२७ | २,५१८ | २१,१७,०१ | १८,८९,२६ | २९,५०,८९ |

**११ पेढ्यांचा प्रसार**— गिऱ्हाइकांनीं चेकनें काढलेल्या रकमांबद्दल बँकांची परस्पर देणीघेणी वजावाट करून निकालांत काढण्याकरतां मोठमोठ्या व्यापारी केंद्रांत क्लिअरिंग हौसेस नांवाच्या संस्था असतात, असें प्रास्ताविक भागांत सांगितलेंच आहे. हिंदुस्थानांत मुंबई, मद्रास, कराची, रंगून, दिल्ली, सिमला, अहमदाबाद ह्या ठिकाणीं अशा संस्था आहेत. इम्पीरियल बँक, परराष्ट्रीय पेढ्या, प्रमुख स्वदेशी बँका ह्या वरील संस्थांच्या सभासद आहेत, व त्यांच्यातील वजावाट करून शिल्लक राहिलेल्या रकमा इम्पीरियल बँकेवर चेक देऊन भागविल्या जातात. चेकनें व्यवहार करण्याची पद्धत आपल्या इकडे वाढत्या प्रमाणावर असल्यानें ह्या संस्थांचें महत्त्वही पुढें मागें विशेष वाढेल ह्यांत शंका नाहीं. इम्पीरियल बँकेच्या शाखा व सहकारी पेढ्या ह्यांच्या प्रसारामुळे लोकांत पेढ्यांच्या व्यवहाराची माहिती अधिकाधिक पसरत आहे, व देशाच्या विस्ताराच्या अगर लोकसंख्येच्या प्रमाणांत येथें पेढ्या निघाल्या व त्यांची आपापसांतील देणी घेणी वाढली म्हणजेच क्लिअरिंग हाउसेस ह्या संस्थांस खरें महत्त्व प्राप्त होईल. प्रतिवर्षी क्लिअरिंग हाउसमार्फत किती रकमांची वजावाट झाली ह्याबद्दल पुढील माहिती उपयुक्त आहे.

आकडे लक्ष रुपयांचे आहेत.

| वर्ष | एकंदर रक्कम | वर्ष | एकंदर रक्कम |
|---|---|---|---|
| १९०१ | ८,०२७ | १९१७ | ९०,१८१ |
| १९०६ | १२,८९५ | १९२० | ३०१,१४० |
| १९११ | ५१,६१२ | १९२२ | २१०,५२३ |
| १९१३ | ६४,७८० | १९२४ | १९२,२४९ |
| १९१५ | ५६,०३६ | १९२६ | १७५,४०८ |
| | | १९२७ | १७९,५१० |

चेकनें होणाऱ्या देवघेवींची एकंदर रक्कम गेल्या दहा पंधरा वर्षांत बरीच वाढली आहे, व विशेषतः महायुद्धानंतर कांहीं वर्षें येथील उद्योगधंदे व व्यापार ह्यांची तात्पुरती चलती झाली त्या काळांत तीन हजार कोट रुपयांपर्यंत देवघेवी चेकनें भागविल्या गेल्या. पेढ्यांची संख्या, त्यांच्याजवळील ठेवींची रक्कम व त्यांच्या गिऱ्हाइकांची चेक वापरण्याची संवय ह्यांत वाढ होत आहे हें खरें. तरी पाश्चात्य राष्ट्रांतील बँकांच्या मानानें येथील पेढ्यांची प्रगति अगदींच असमाधानकारक आहे असें म्हटलें पाहिजे. इंग्लंडमध्यें निदान पांच बँका तरी अशा आहेत की त्यांपैकीं कोणत्याही एकीजवळच्या ठेवींचीच रक्कम हिंदुस्थानांतील सर्व पेढ्यांजवळील ठेवींच्या रकमेहून

१ मागें पान ७४ पहा.

अधिक भरेल ! हिंदुस्थानाची औद्योगिक प्रगति होण्यास भांडवलाची व तें लोकांजवळून जमवून धंदेवाल्यांस व व्यापाऱ्यांस पुरविणाऱ्या पेढ्यांची फार आवश्यकता आहे. तरी पेढ्यांचा प्रसार देशाच्या औद्योगिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीतील विशेषांसच अनुलक्षून व्हावयास पाहिजे, व पेढ्यांची संख्या व त्याची अंतर्गत रचना ह्या बाबतीत लोकांच्या गरजा व संवयी ह्यासच प्रामुख्य दिलें पाहिजे हें उघड आहे. सहकारी पेढ्यांच्या व पोस्टल सेव्हिंग्ज बँकांच्या द्वारा लोकांत पेढ्यांच्या व्यवहाराबद्दलचें ज्ञान पसरत आहे. नोटांच्या प्रसाराप्रमाणेंच काहीं वर्षांनीं पेढ्यांचा विकास होऊन चेकनें पैसे देण्याच्या पद्धतीचा प्रसार झाल्याशिवाय राहणार नाहीं. हिंदुस्थानची सर्वसामान्य आर्थिक परिस्थिति जशी विशिष्ट स्वरूपाची आहे त्याचप्रमाणें येथील पेढ्यांची संघटना व तिची सुधारणा ह्या बाबतींतही बरेंच वैशिष्ट्य असणें अपरिहार्य आहे. इंग्लंड, जर्मनी, अमेरिका इत्यादि प्रगमनशील पाश्चात्य राष्ट्रांत त्यांच्या विशिष्ट गरजा भागविण्यास समर्थ अशा विशिष्ट स्वरूपाच्या पेढ्यांच्या संघटना आहेत. हिंदुस्थानासही ह्यापैकीं कोणत्याही एका पद्धतीचा पूर्णत्वानें अंगिकार करण्यापेक्षां स्वतःच्या परिस्थितींत योग्य व शक्य अशी संघटना करणें अधिक श्रेयस्कर ठरेल.

**१२ मध्यवर्ती बँक**—नोटा काढणें, देशांतल्या देशांत व परराष्ट्रांत पैसे पाठविण्यास मदत करणें, स्वतःच्या पतीवर येथें व इग्लंडांत कर्ज उभारणें, त्याचप्रमाणें आपल्या शिलकांतून व निधींतून इतरांस कर्ज देणें इत्यादि पेढ्यांच्या सामान्य व्यवहारासारखीं जी कामें हिंदुस्थान सरकार पहिल्यापासून करीत आलें आहे तीं एखाद्या सरकारी अगर खाजगी मध्यवर्ती पेढीवर सोंपविलीं जावीं, ही कल्पना बरीच जुनी आहे. सन १८३३ पासून ह्या योजनेचा अनेकवार उहापोह झालेला असून मोठमोठे सरकारी अधिकारी व व्यापारी ह्यांनीं ती फलद्रूप करण्याचे आटोकाट प्रयत्न केले. तरीही १९१३ सालीं चेंबरलेन कमिशन सर्व हिंदी चलनविषयक प्रश्नाचा विचार करण्यास नेमलें गेलें तोंपर्यंत मध्यवर्ती पेढीची योजना व्यवहार्यतेच्या मर्यादेंत आहे ह्याबद्दलही एकमत झालें नव्हतें. मध्यवर्ती पेढी अस्तित्वांत असणें व सरकारचीं पैशासंबंधीं सर्व कामें तिच्याकडून होणें आवश्यक आहे ह्याबद्दल एकमत असूनही त्या पेढीच्या कोणत्याही विवक्षित योजनेस पाठबळ न मिळण्याचें कारण मुख्यतः इलाखा बँकांची आपापसांतील चुरस हेंच होय. इलाखा बँकांशीं पहिल्यापासून सरकारचा संबंध होता व त्यांस सरकारी व इतर कामाचा अनुभवही पुष्कळ होता हे मागें सांगितलेंच आहे. मध्यवर्ती पेढीची कोणतीही नवी योजना करावयाची झाल्यास तिन्ही इलाखा बँका एकत्र करून त्यांचीच एक मध्यवर्ती पेढी बनवावी असेंच कोणीही सुचवी. परंतु ह्या पेढ्यांचें आपापसांत जमत नसल्यानें व सवता सुभा राखून आपली मिळकत वाढविण्याकडे त्यांच्या चाल-

कांचें व भागीदारांचें लक्ष असल्यानें कोणतीच योजना यशस्वी होण्याची चिन्हें दिसेनात. कित्येक लोक तर हिंदुस्थान देश विस्तारानें फार अवाढव्य असल्यानें व येथें पेढ्यांचा अगदी अल्प प्रमाणांत प्रसार झाला असल्यानें एकच एक मध्यवर्ती पेढी येथें असणें इष्ट व शक्य नाही असेंही म्हणत. परंतु अशा लोकांची संख्या अगदी थोडी होती व सरकारी नोटांचा प्रसार, वाढता अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय व्यापार, नवीन धंद्यांच्या गरजा व चलनविषयक उलाढाली, देशाच्या आर्थिक परिस्थितीचें सूक्ष्म ज्ञान असलेल्या संस्थेनें करण्याची इष्टता इत्यादि कारणांनी हिंदुस्थानांत मध्यवर्ती पेढी असावी असेंच सामान्य मत होतें. चेंबरलेन कमिशनचे एक सभासद प्रो. कीन्स ह्यांनी तिन्ही इलाखा बँकांच्या एकीकरणाच्या तत्वावर मध्यवर्ती पेढी काढण्यासंबंधी एक योजना त्या कमिशनपुढे ठेवली होती. ह्या प्रश्नाचा विचार करण्यास एक स्वतंत्र कमिटी नेमावी असें कमिशनने सुचविलें, तरी मध्यवर्ती पेढीच्या स्थापनेस चेंबरलेन कमिशनचें मत सर्वथैव अनुकूल होतें, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. महायुद्धकालीन अनुभवावरून, विशेषतः देशाचा परराष्ट्रीय व्यापार आणि सरकारचें चलनविषयक धोरण ह्यांबद्दलच्या इतिहासावरून सरकारची पैशासंबंधाची कामगिरी अंगावर घेणारी निराळी पेढी असणें अत्यावश्यक ठरलें. इलाखा बँकांची एकीकरणाच्या योजनेस संमती न मिळाली तर स्वतंत्र पेढी काढावी, परंतु मध्यवर्ती पेढीचा हा प्रश्न पुढें ढकलूं नये ह्याबद्दल १९२० सालच्या सुमारास जवळ जवळ एकमत झालें होतें.

मध्यवर्ती पेढी काढावयाची ती पूर्णपणें सरकारच्या मालकीची व सरकारी हुकमतीखाली चाललेली अशी न काढता इलाखा बँकांचें एकीकरण घडवून आणून अशा संयुक्त संस्थेस मध्यवर्ती पेढीचें स्वरूप देण्याच्या योजनेस कित्येक लोकांचा एक महत्त्वाचा आक्षेप होता. इलाखा बँकांत भांडवल व हुकुमत ही बहुतेक युरोपियन भांडवलवाल्यांच्या हातांत असून ते हिंदी धंदेवाल्यांच्या अडचणीकडे सहानुभूतीपूर्वक लक्ष देत नाहीत असा एक प्रवाद होता व तो अंशतः यथार्थ असल्याचें औद्योगिक कमिशनलाही आढळून आलें होतें. ह्या आक्षेपाचें निरसन करण्यास नव्या मध्यवर्ती पेढीत हिंदी भांडवलवाले व धंदेवाले ह्यांचा समप्रमाण अंतर्भाव करणें आवश्यक होतें. शिवाय, मध्यवर्ती पेढी म्हटली म्हणजे तिनें सरकारचे सर्व व्यवहार करणें आवश्यक असणार व तसें करतांना इलाखा बँकांच्या एकीकरणानें तयार झालेली मध्यवर्ती बँक परराष्ट्रीय हुंड्याचा व्यवहार करूं लागली म्हणजे त्या धंद्यांत आज आपला मक्ता सांगणाऱ्या परकी पेढ्यांच्या पोटावर हटकून पाय यावयाचा. मध्यवर्ती पेढीस परराष्ट्रीय हुंड्यांच्या व्यवहारांतून बाहेर ठेवल्याखेरीज युरोपियन भांडवलवाल्यांचें त्या योजनेस पाठबळ मिळण्यासारखें नव्हतें. तसेंच, मध्यवर्ती बँक सुरळीतपणें चालू झाल्याखेरीज सरकारची चलनविषयक कामगिरी

व विशेषतः नोटा काढण्याचा अधिकार तिच्यावर सोंपविणें धोक्याचें आहे असें वाटल्यावरून तीं कामेंही नव्या मध्यवर्ती पेढीकडे पहिल्या प्रथम देऊं नये असें ठरलें. अशा अर्धवट अधिकाराच्या योजनेस कांहीं इलाखा बँकांचे भागीदार विरुद्ध होते, तरी ही योजना मान्य न केल्यास त्या पेढ्यांस असलेला सरकारी आधार सुटेल व परकी भांडवलवाल्याच्या प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष हुकुमतीखालीं असलेली एखादी दुसरीच पेढी सरकारी व्यवहाराचें मानाचें व फायद्याचें काम उपटील, ह्या भयाच्या जोरावर एकीकरणाच्या योजनेस त्यांची शेवटीं सम्मति मिळविली गेली. ह्या योजनेसच पुढें कायदेशीर स्वरूप दिलें जाऊन ती १९२० चा बँक ॲक्ट ह्या नावानें अंमलांत आली.

**१३ इंपीरियल बँक ऑफ इंडियाः**—वरील कायद्यान्वये तिन्ही इलाखा बँकांचें एकीकरण होऊन जी नवी पेढी अस्तित्वात आली तिचें नाव इंपीरियल बँक ऑफ इंडिया असें आहे. ह्या बँकेचा कारभार चालविण्यास एक मध्यवर्ती मंडळ असून, कलकत्ता, मुंबई व मद्रास येथील स्थानिक मंडळांच्या साहाय्यानें बँकेचे सर्व व्यवहार चालवावयाचे असतात. पुढें मागें सदरहू तीन शहराखेरीज अन्यत्र स्थानिक मंडळें स्थापली गेल्यास त्यांचेंही हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें मध्यवर्ती मंडळानें साहाय्य घेतल्यास चालेल. बँकेच्या मध्यवर्ती शासक मंडळाची घटना पुढीलप्रमाणे आहे,—

( १ ) मध्यवर्ती मंडळाच्या शिफारसीवरून हिंदुस्थान सरकारनें नेमलेले दोनपर्यंत मुख्य व्यवस्थापक ( मॅनेजिंग गव्हर्नर्स ).

( २ ) स्थानिक मंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष, व चिटणीस.

( ३ ) सरकारच्या चलन खात्याचा मुख्य अधिकारी ( कंट्रोलर ऑफ करन्सी ) किंवा सरकारनें नेमलेला दुसरा एखादा अधिकारी.

( ४ ) हिंदुस्थान सरकारनें नेमलेले चारापर्यंत बिनसरकारी सभासद.

वरील सभासदांपैकीं स्थानिक मंडळाच्या चिटणिसास व कलम ३ मधील चलन खात्याच्या किंवा दुसऱ्या अधिकाऱ्यास मंडळाच्या सभेस हजर राहतां येतें परंतु कोणत्याही प्रश्नाचा निकाल ठरवितांना त्याचें मत मात्र मोजलें जात नाहीं. सरकारच्या आर्थिक धोरणावर अगर शिलकासंबंधीं परिस्थितीवर बँकेच्या कोणत्याही कृत्याचा अनिष्ट परिणाम होईल असे सरकारास वाटल्यास त्या बाबतीत बँकेस जरूर तो हुकूम पाठविण्याचा गव्हर्नर जनरल इन् कौन्सिल ह्यास अधिकार आहे. ह्याशिवाय, बँकेच्या नेहमीच्या कामाबद्दल एखादी सूचना पुढें आली असता सरकारच्या चलनी अधिकाऱ्यांस ती आक्षेपार्ह वाटली तर ती अंमलात न आणण्याबद्दल तो बँकेस लेखी नोटीस देऊं शकतो व त्या बाबत गव्हर्नर जनरल इन् कौन्सिलचा निर्णय होईपर्यंत बँकेस ती सूचना अंमलांत आणतां येत नाहीं.

## १९२८ डिसेंबर अखेर इंपीरियल बँक ऑफ इंडिया ह्या पेढीचे हिशेब.

( आंकडे लाख रुपयाचे आहेत. )

| कर्ज | रुपये | जिंदगी | रुपये |
|---|---|---|---|
| भरणा झालेलं भांडवल | ५६२·५० | सरकारी कर्जरोखे | १९०६·५६ |
| शिल्लक निधी | ५१७·५० | इतर कर्जरोखे, शेअर वगैरे | २७२·३३ |
| सरकारी ठेवी | ८७९·२० | कर्ज दिलें | २१३८·०० |
| इतर ठेवी | ६९५७·६५ | हातांवरील कर्ज | २६६७·१० |
| सरकारकडून हुंड्यांवर काढलेलं कर्ज | ७००·०० | अंतर्गत व्यापारी हुंड्या | १२३७·२१ |
| | | परदेशी हुंड्या | ३९·३३ |
| इतर कर्ज | १६०·५६ | स्थावर माल | २८४·०० |
| | | इतर | ९९·५८ |
| | | इतर बँकांजवळ ठेवी | ११·६६ |
| | | रोख | ११२१·६४ |
| एकूण | ९७७७·४१ | एकूण | ९७७७·४१ |

रोख शिलकेचे एकंदर कर्जाशी प्रमाण शें. १३

इंपीरियल बँकेचा दर द. द. ७.

## इम्पीरियल बँकेच्या शिलका आणि बँकेचा दर.

| महिन्याची सुरुवात | | रोख शिल्लक ( लाख रुपये ) | बँकेचा दर द. द. |
|---|---|---|---|
| एप्रिल | १९२७ | १५,३१ | ७ |
| मे | ,, | १४,९४ | ७ |
| जून | ,, | १८,९५ | ७ |
| जुलै | ,, | ३२,३६ | ५ |
| ऑगस्ट | ,, | ३२,२२ | ४ |
| सप्टेंबर | ,, | ३०,३७ | ४ |
| ऑक्टोबर | ,, | २८,०९ | ५ |
| नोव्हेंबर | ,, | २४,१० | ५ |
| डिसेंबर | ,, | १०,९६ | ५ |
| जानेवारी | १९२८ | १३,६८ | ७ |
| फेब्रुवारी | ,, | १४,०८ | ७ |
| मार्च | ,, | ११,६७ | ७ |

**१४ रिझर्व बँकः**—हिल्टन्‌यंग कमिशन हिंदुस्थानातील चलनविषयक परिस्थितीचें परीक्षण करीत असतां त्यास येथील पेढ्यांच्या व चलनविषयक संघटनेंत एक महत्त्वाचा दोष दिसून आला. नोटा व रुपये पुरविण्याचें काम सर्वस्वी सरकारच्या हातांत होतें; म्हणजे सरकार हीच चलनाधिकारी ,संस्था होती. परंतु लोकांस कर्ज देणें, इतर बँकांच्या व सराफांच्या हुंड्या वटविणें हे भांडवलविषयक काम मुख्यतः इम्पीरियल बँकेकडून व इतर बँकांकडून होई. पतीवर व्यवहार करणाऱ्या पेढ्या स्वतःजवळ रोख शिलका बाळगताना आपल्या एकट्याच्या देण्याचाच विचार करीत. सर्व बँकांच्या परिस्थितीचें एकत्रित अवलोकन करून रोख शिलकीचें प्रमाण बाजारांतील एकंदर मागणीस अनुसरून कमी अधिक करण्यास समर्थ अशी एक मध्यवर्ती पेढी नव्हती. इंपीरियल बँक अशा मध्यवर्ती स्वरूपाचें काही काम करी, हें खरें. तरी त्या बँकेच्या स्वतःच्याच अनेक शाखा असल्यानें व सामान्य स्वरूपाचा व्यवहारही पुष्कळ असल्याने इतर बँकांच्या परिस्थितीची तिला पूर्णत्वानें जाणीव असणें शक्य नव्हतें. चलनाधिकारी संस्था सरकार, आणि पेढीच्या दरात चढउतार करून पतीचे व्यवहार मर्यादित करण्याचा अधिकार इंपीरियल बँकेसारख्या अर्धवट मध्यवर्ती बँकेस, अशी दुरंगी व विस्कळित संघटना हिल्टनयंग कमिशनास दिसून आली. हिंदुस्थानातील व्यापारी व पेढीवाले ह्यांच्या पतीवरील व्यवहार करण्यास लागणाऱ्या पैशासंबंधीच्या गरजा, म्हणजे व्यापाऱ्यांस आपल्या हुंड्या माफक दरानें वटवून मिळण्याच्या सोयी व पेढीवाल्यांस हुंड्या विकत घेण्यास व ठेवी परत करण्यास जवळ पुरेसा रोकडवजा पैसा ह्या नीट भागण्यास पतीच्या व्यवहाराचें व चलनविषयक धोरणाचें नियंत्रण करणारी एकच संस्था असणें आवश्यक आहे असें कमिशनचें मत पडलें. सध्याही सरकारचें चलनी खातें व इंपीरियल बँक ह्यांच्यात कांहींसें सहकार्य होत असतें हे वर सांगितलेंच आहे. तरी चलनाचा पुरवठा व पतीचे व्यवहार ह्यांचें नियमन एकाच संस्थेनें करणे इष्ट आहे व ती संस्था सरकार किंवा इंपीरियल बँक ह्यांच्या ऐवजी दुसरीच एक नवीन स्वतंत्र मध्यवर्ती पेढी असणें आवश्यक आहे, असें कमिशननें ठरविलें.

इंपीरियल बँक ही कांहीं नवीन निघालेली संस्था नव्हती आणि तिला सरकारी व इतर कामाचा अनुभव पुष्कळ होता. तिन्ही इलाखा बँका एकत्र करून १९२० सालीं ही पेढी स्थापिली गेली तींही मध्यवर्ती पेढीचें सर्व काम तिनें करावें ह्याच गर्भित हेतूनें होय. असें असून हिल्टन्‌यंग कमिशननें स्वतंत्र रिझर्व बँक असावी असें सुचविलें, ह्याचें काही जणांस आश्चर्य वाटलें. परंतु इंपीरियल बँकेचा इतिहास व मध्यवर्ती पेढीच्या विशिष्ट व्यवहारांचें महत्त्व ह्यांची ज्यांस माहिती आहे त्यास मध्यवर्ती बँक निराळी असणेंच योग्य आहे, हे मत मान्य होतें. नोटा काढून चलनाचा पुरवठा वाढविणें व अंतर्गत चलन आणि सोनें ह्यांचें परस्पर प्रमाण म्हणजे मूल्यमापनाचें परिमाण कायम

राखणें, ही एवढ्या प्रचंड जबाबदारीची कामगिरी आहे की जिच्या निःपक्षपातीपणावर, सहानुभूतीवर आणि सामर्थ्यावर व्यापाऱ्यांचा आणि सामान्य नागरिकाचा पूर्ण विश्वास नाही अशा पेढीच्या हातांत ती देणें इष्ट नव्हतें. मध्यवर्ती बँकेने केवळ सरकारचे पैशासंबंधीचे व्यवहार व चलनविषयक उलाढाली करावयाच्या असतात असें नाहीं, तर इतर बँकांस त्यांच्या सामान्य व्यवहारांत ज्या वेळेस पैशाची टंचाई पडेल त्या वेळेस त्यांस पैसे पुरविण्याचे महत्त्वाचें कार्य तीस करावें लागतें. हें कार्य साधण्याचा प्रमुख मार्ग म्हणजे इतर बँकांनी व्यापाऱ्याकडून कसर कापून विकत घेतलेल्या हुंड्या त्याजकडून कमी कसर कापून घेऊन पुन्हा विकत द्याव-याच्या. असें केल्यानें सामान्य बँकास जरूर तेवढ्या हुंड्या विकत घेण्यास लागणाऱ्या पैशाचा पुरवठा होतो. ह्याशिवाय, इतर बँकांच्या ठेवीदारांनी एकदम मागणी केली तर त्यांस त्यांच्या रकमा परत देण्यास पेढ्यांस हातांत रोख शिल्लक पुष्कळ ठेवावी लागते. परंतु मध्यवर्ती पेढीकडून प्रसंगी कर्ज मिळण्याची खात्री असेल तर हातांतील रोख शिल्लक कमी ठेवूनही भागतें. विकत घेतलेल्या हुंड्या व बँकांस दिलेलें कर्ज ह्या दोहोंचा विचार केवळ स्वतःच्या नफ्याच्या दृष्टीनें न करता कमीत कमी वेतनानें इतर बँकांस स्वतःचा उपयोग कसा करून देता येईल हें मध्यवर्ती पेढीनें अवश्य पहावयाचें असतें. इम्पीरियल बँकेच्या ठेवी ठेवून घेण्याचा व हुंड्या विकत घेण्याचा स्वतःचाच धंदा एवढा मोठा आहे की, इतर बँकांच्या अडचणींकडे सहानुभूतीनें व निःपक्षपातीपणानें पाहतां येणें व त्यास साहाय्य देणें तीस नेहमीचें शक्य होईल, असा विश्वास इतर पेढ्यास कधीही वाटणार नाही. शिवाय, इम्पीरियल बँकेचें मुख्य कार्य देशांत पेढ्यांचा प्रसार करणें हें आहे व त्याबद्दल सरकारी मदतही तिला मिळत आहे. हें काम योग्यपणे कर-ण्यासच इम्पीरियल बँकेचें भांडवल, अनुभव व धडाडी ह्यांची पूर्ण जरूर लागेल व तें करता येण्यापुरती सरकारी मदतही त्या बँकेस चालू ठेवावी लागेल. मध्यवर्ती बँकेने सामान्य पेढीचे कोणतेही व्यवहार करूं नयेत व कांही मध्यवर्ती ठिकाणें सोडून इतर ठिकाणी सरकारी व रिझर्व बँकेचें कामही इम्पीरियल बँकेच्या शाखामार्फत केलें जावें असें कमिशननें सुचविलें.

रिझर्व बँक ही खाजगी भागीदारांनी उभारलेली नवी पेढी असावी व तिच्या व्यव-हारांचें आणि व्यवस्थेचें कायद्यानें नियमन करावें अशी हिल्टनयंग कमिशनची शिफारस होती व कायदेशीर व्यवस्थेबद्दल पुढील सूचना करण्यांत आल्या होत्या. ( १ ) रिझर्व बँकनें पुरेसा शिलकी निधि ठेवावा व मर्यादित प्रमाणांत नफाही घ्यावा, परंतु ह्यापेक्षां अधिक कमाई झाल्यास ती सरकारचे हवाली केली जावी. ( २ ) रिझर्व बँक स्थापन झाल्यापासून पांच वर्षांचे आंत सरकारी नोटा सरकारी खजिन्यां-खेरीज दुसऱ्या कोठेही कायदेशीर चलन म्हणून चालूं नयेत; नोटा काढण्याचा अधि-

कार सरकारनें बँकेवर सोंपवावा व तो पहिल्याप्रथम २५ वर्षांच्या मुदतीनें बँकेनें वापरावा; बँकेच्या नोटा पूर्णपणें कायदेशीर चलन समजल्या जाव्या व त्यांच्या मोबदला कायद्याप्रमाणें इतर चलन व सोनें मिळण्यास सरकारची जामिनगिरी असावी. ( ३ ) खाजगी व्यक्तीच्या बाबतीत कायदेशीर दरानें ४०० तोळ्यांहून अधिक वजनाच्या सोन्याची खरेदी विक्री करण्यास बँक कायद्यानें बांधली जावी. ( ४ ) सुवर्णनिधि व नोटास तारण असलेला निधि हे एकत्र करून बँकेच्या हवाली केले जावे. बँकेनें काढलेल्या नोटांस तारण म्हणून कमीत कमी त्याच्या किंमतीच्या शेंकडा ४० एवढे सोनें अगर सोन्याच्या हुंड्या निधीत ठेवल्या जाव्या व नेहमी शेंकडा ५० ते ६० पर्यंत सोनें अगर सोन्याच्या हुंड्या हातात राहतील अशी बँकेनें खटपट करावी; निधीतील सोनें अगर सोन्याच्या हुंड्या ह्याचें प्रमाण शेंकडा ४० हून कमी करणें झाल्यास सरकारची परवानगी घेणें व त्याबद्दल सरकारास खास कर देणें आवश्यक असावें. ( ५ ) सरकारच्या सर्व शिलका व इतर बँकांच्याही शिलका विवक्षित प्रमाणात रिझर्व बँकेजवळ रहाव्या.

कमिशनच्या रिझर्व बँकेसंबंधाच्या सर्व शिफारसी मान्य करून त्यास कायदेशीर स्वरूप देण्याकरिता सरकारनें कायद्याचा एक मसुदा मध्यवर्ती कायदेमंडळांत रिझर्व बँक बिल, ह्या नावानें प्रविष्ट केला. १९२७ मध्यें हे बिल लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट ह्याच्या सिलेक्ट कमिटीकडे तपशिलवार विचार करण्याकरिता पाठविलें गेलें. सरकारी योजनेंत मध्यवर्ती पेढी राजकीय चळवळीपासून सर्वस्वी अलिप्त असावी हें ब्रुसेल्स व जिनीव्हा येथील परिषदांचें व हिल्टनयंग कमिशनचें मत पूर्णपणें अंतर्भूत केलेलें होतें. त्या योजनेनुसार रिझर्व बँकेच्या मध्यवर्ती शासकमंडळात एकंदर १४ सभासद असावयाचे होते व त्यापैकीं ९ भागीदारांनी निवडलेले, तीन पर्यंत गव्हर्नर जनरल इन कौन्सिल ह्यांनी नेमलेले व एक मुख्य व एक दुय्यम व्यवस्थापक सरकारनें नेमलेले असे होते. ह्या योजनेस सिलेक्ट कमिटीत जोराचा विरोध झाला. खाजगी भांडवलाच्या बँकेंत मुख्याधिकार काही विवक्षित भांडवलवाल्याच्या हातांत जाऊन सामान्य हिंदी व्यापाऱ्याचें व जनतेचें हित धोक्यांत पडेल, ह्यास्तव रिझर्व बँक पूर्णपणें सरकारी भांडवलाची व सरकारच्या हुकुमतीखालची असावी असें सिलेक्ट कमिटीच्या अनेक सभासदांचें म्हणणें होतें. कमिशनच्या योजनेनुसार सरकारी बिलात कायदेमंडळाच्या सभासदांस बँकेच्या शासक मंडळाचें सभासद होण्यास मनाई केलेली होती, ती तर दूर व्हावीच व शिवाय, बँकेच्या शासक मंडळांत कायदे मंडळांचेही काही प्रतिनिधि घेतले जावे अशीही सिलेक्ट कमिटीत जोराची मागणी केली गेली. आपल्या योजनेस जोराचा विरोध आहे हें ओळखून सरकारतर्फे अशी एक तडजोड सुचविण्यांत आली कीं, बँकेचें भांडवल सरकारी असावें परंतु तिच्या शासक मंडळांत कायदे मंडळाचा

कोणीही सभासद नसावा. ह्या सूचनेसही कायदे मंडळांतलें लोकमत पुष्कळच विरुद्ध होतें. सर बेसिल ब्लॅकेट ह्यांनीं कांहीं झालें तरी रिझर्व बँक अस्तित्वांत आणावयाचीच असें ठरवून निरनिराळ्या प्रकारांनीं लोकपक्षाशीं तडजोड करण्याचे प्रयत्न चालविले. परंतु हें तडजोडीचें धोरण स्टेट सेक्रेटरीस पसंत न पडून त्यांच्या हुकुमावरून सरकारनें रिझर्व बँक बिलाचा विचारच तहकूब केला. हिंदुस्थानांत मध्यवर्ती पेढी स्थापण्याचा महत्त्वाचा प्रश्न अशा तऱ्हेनें कांहीं काल तरी मागें पडल्यासारखा झाला आहे. पेढ्यांबद्दल सध्या हिंदुस्थान सरकारनें जी चौकशी कमिटी नेमली आहे, तिच्या कार्यक्षेत्रांत मध्यवर्ती पेढीबद्दलचा विचारही होणार आहे हें सांगावयास नको.

# प्रकरण तेरावें

## सहकारी चळवळ

१ **हिंदी शेतकऱ्यांची हलाखी**—गेल्या शतकाच्या शेवटीं शेवटीं हिंदुस्थानांत वारंवार दुष्काळ पडले व त्यांपासून प्राणहानि व वित्तहानि पुष्कळ झाली. त्या दुष्काळांबाबत सरकार व लोकाचे पुढारी ह्याची चौकशी चालू असतां त्यास येथील शेतकऱ्यांची परिस्थिति अत्यंत हलाखीची आहे, त्याचें उत्पन्न फार कमी आहे व ते अत्यंत कर्जबाजारी झालेले आहेत असें दिसून आलें. विशेषत: अनेक ज्ञात व अज्ञात कारणांनीं ब्रिटिशाच्या अमदानींत शेतकऱ्यांची स्थिति फारच खालावली, असा सर्वांचा ग्रह होऊं लागला. शांततामय राजवटींत लोकसंख्येची वाढ जोरात सुरू झाली. सरकारची कडक शासनपद्धति व आर्थिक आणि सामाजिक विकासाचा नैसर्गिक ओघ, ह्यांमुळें खेड्यापाड्याची स्वायत्तता व सुस्थिति ह्यांत बिघाड होऊं लागला. ब्रिटिशाच्या पूर्वीच्या राज्यांत कुळें व सावकार ह्याच्यातील व्यवहार पुष्कळसे तडजोडीनें तुटत व कोणत्याही कराराबद्दल एकांतिक स्वरूपानें कोर्ट कचेरींत न बसतां पंचायती व न्यायाधीश हे 'न्याय' करीत असत. परंतु इंग्रजी राज्यपद्धति व्यक्तिप्रधान असल्यानें कुळानें सावकाराशीं विवक्षित प्रकारचा करार केल्याचें सिद्ध झालें म्हणजे त्यास अनुसरून कुळावर हव्या तेवढ्या रकमेचे हुकुमनामे होत. लोकांची जुनी सामाजिक पद्धत व त्याची आर्थिक, राजकीय आणि शैक्षणिक प्रगति ह्यांच्याशीं सरकारी न्यायपद्धति सुसंगत नसल्यानें तिच्या मार्फत कायदेशीर न्याय मिळाला तरी पुष्कळ वेळां सामाजिक व आर्थिक दृष्ट्या अन्यायच होई. तसेंच, इंग्रज सरकारची जमीन-महसुलाची पद्धतही व्यवहारांत फार अडचणीची होई. पौराणिक कालांत, आणि मोगलांच्या व मराठ्यांच्या राज्यांत जमिनधाऱ्याचे कमाल दर एकंदरीनें भारी असत हें खरें. तरी, एक तर त्यावेळीं सरकारदेणें शेतावरच सरकारचा भाग बाजूस काढून ऐन जिनसी दिलें जात असल्यानें, शेतकऱ्यास पिकलें तरच सरकारास मिळे. दुष्काळ आल्यास आपोआपच सरकार-साऱ्याची त्या प्रमाणांत सूट मिळे. दुसरें असें कीं, दप्तरी आंकड्यांच्या आधारानें किंवा राज्यकर्त्यांच्या द्रव्यतृष्णेच्या शमनार्थ कमाल दर भारी ठेवलेले असले तरी व्यवहारांत अनेक कारणांनीं इतकी सूट दिली जाई कीं शेतकऱ्यांस त्यांच्या उत्पन्नाच्या मानानें सरकार देण्याचें ओझें वाटत नसे. इंग्रजांनीं जुन्या पद्धतीचें धोरण अंमलांत आणतांना तें आपणांस

सर्वस्वी अनुकूल करून घेऊन स्वतःस सर्व जमिनीचे मालक ठरविलें व शेतकऱ्यां-कडून कराच्या रूपानें सर्व खंड घेण्याचा आपला अधिकारही गाजविण्यास सुरवात केली. खंडाबद्दलही प्रतिवर्षी अगर प्रत्येक शेतावर जाऊन चौकशी न होता ढोकळ पुराव्यांवरून सर्वसामान्य अंदाज ठरविण्यांत आले; व ह्या अंदाजात्मक खंडाचा सामान्यतः निम्मा भाग आपण घेतों असें सरकार म्हणे. ह्याप्रमाणें एकदां सारा ठरला म्हणजे दुकाळीं सुकाळीं सरकार तो वसूल करून घेई. जमीनमहसुलाची ही पद्धत सर्वस्वी चुकीची व अन्यायाची होती, परंतु तिचा अंमल कडकपणें सुरू झाल्यानें शेतकऱ्यास फार जाच होऊं लागला. परकी मालाच्या वाढत्या प्रसारानें उद्योगधंदे जसजसे बुडत चालले तसतसा शेतकीच्या धंद्यावरील ताण वाढूं लागला. जमीनीची सुपीकता उतरत चालली, ती सुधारण्यास शेतकऱ्याजवळ पैसा नव्हता, व सावकारांच्या हातांत जमीनी गेल्या तर उत्पादकपणें मशागत करण्याकडे त्यांचें लक्ष नसे. दुष्काळांची व सार्वत्रिक अज्ञानाची ह्या परिस्थितीत भर पडल्यानें ह्या शतकाच्या सुरवातीस हिंदुस्थान देश म्हणजे दरिद्री, कर्जबाजारी, अज्ञ, अनुत्साही व दुष्काळपीडित शेतकऱ्याचें माहेरघर बनले होतें. ह्या भयंकर परिस्थितीची अप्रत्यक्ष जबाबदारी सरकारास जाणवत होती. सुशिक्षित हिंदी पुढाऱ्यांचीही आपल्या बहुसंख्याक देशबांधवांच्या ह्या हृदयद्रावक स्थितीकडे पूर्ण नजर असून तिची चिकित्सा करून तीवर उपाययोजना सुचविण्याची त्यांची तयारी होती. परंतु देशाच्या त्या वेळच्या परिस्थितीत कर्तुमकर्तुम् सर्व सत्ता व जबाबदारी सरकारच्या हातात असल्यानें लोकांचें दारिद्र्य व कर्जबाजारीपणा दूर करण्यास उपाय योजावयाचे तेही सरकारी प्रेरणेनें व सरकारमार्फत होणें सहाजिक होतें.

**२ सरकारच्या निष्फल उपायांची यादी**—सामान्य शेतकऱ्यास सरकारच्या तिजोरीतून माफक दरानें कर्ज देण्याची पद्धत ब्रिटिश अमदानीच्या अगदी सुरवातीपासून अस्तित्वांत होती. ह्या पद्धतीतील सर्वमान्य असे अनेक दोष दूर करण्याकरिता १८८३ व १८८४ साली अनुक्रमें शेतजमीनीची सुधारणा करण्याकरिता व शेतकऱ्याच्या सामान्य गरजा भागविण्याकरिता सरकारी कर्ज देण्याबाबत दोन कायदे करण्यांत आले. १८८३ च्या कायद्यान्वयें शेतजमीनीची उत्पादकता वाढविण्याकरितां विहिरी बांधणें, बंधारे घालणें ह्या सारख्या विवक्षित सुधारणाकरिता सरकारी कर्ज मिळे व तें फेडण्याची मुदतही दीर्घ असे. १८८४ च्या कायद्याप्रमाणें मिळणारें कर्ज बी, आउतें, गुरेढोरें इत्यादि चालू स्वरूपाच्या शेतकीच्या साधनाकरिता असे व त्याची मुदत कमी असे. ह्या दोन्ही कायद्यान्वयें मिळणाऱ्या सरकारी कर्जाचा, अगर तगाईचा, शेतकऱ्यांस बराच उपयोग झाला ह्यात शंका नाही. परंतु सरकारी कर्ज मिळे तें फक्त शेतकऱ्याच्या धंदेविषयक गरजा भागविण्यापुरतें; त्याच्या इतर घरगुती व सामाजिक गरजा भागविण्यास त्याला कर्ज लागल्यास सावकाराचे

पाय धरणें आवश्यक होई. कर्ज काढावयाचेंच तर जो आपल्या सर्व गरजा भागविण्यास कर्ज देईल त्या सावकाराकडून तें घेण्यास शेतकरी प्रवृत्त होत ह्यांत आश्चर्य नाही. शिवाय, सरकारी कर्ज विवक्षित मुदतीच्या ठराविक हप्त्यानें सरकारचे अधिकारी सक्तीनें वसूल करीत, त्यामुळेंही सामान्यतः शेतकऱ्यास तगाई घेणें आवडत नसे. रयताचा कर्जबाजारीपणा कांही अशी सावकारांच्या लबाडीच्या व्यवहारानें वाढत असे व प्रामाणिकपणें कर्ज फेडण्याची सर्वस्वी निराशा झाल्यास कित्येक कुळें क्वचित् आततायीपणाचे मार्ग स्वीकारण्यास प्रवृत्त होत. महाराष्ट्रांत १८७५ मध्यें असले कांही गुन्हे घडले व त्यांची मामुली चौकशी होऊन कांहीं गुन्हेगारांस शिक्षाही झाल्या. परंतु रयतांच्या मनांत गुन्हेगारीची प्रवृत्ति कशामुळें झाली ह्याचा म्हणजे विशेषतः त्यांच्या दारिद्र्याचा व कर्जबाजारी-पणाचा, विचार करण्याकरतां सरकारनें एक कमिशन नेमलें. ह्या कमिशनास सावकार व कुळें ह्यांच्यांतील अनेक व्यवहार लबाडीचे आहेत व कुळांच्या अज्ञानाचा व अनन्यगतिकत्वाचा सावकार अन्यायानें फायदा घेतात असें दिसून आलें. कमिशनच्या शिफारसीस अनुसरून सरकारनें १८७९ मध्यें महाराष्ट्रांतल्या शेतकऱ्यांच्या साहाय्याकरिता एक स्वतंत्र कायदा पास केला. ह्या कायद्याची ज्या ज्या जिल्ह्यांत अंमलबजावणी होते तेथील कोर्टास सावकार व शेतकरी ह्यांच्यामधील प्रत्येक खटल्याचा मूळापासून, म्हणजे निव्वळ कायद्याच्या कलमावर अगर कर्जखताच्या पुराव्यावर न विसंबता, विचार करून न्याय व योग्य निवाडा करण्याची मुभा असते; विशेषतः शेतकऱ्याकडून कर्जफेड व्हावयाची ती त्याच्या मालमत्तेची एकदम जप्ती न होता, लहान लहान हप्त्यानी व्हावी अशी कोर्टास व्यवस्था करतां येते. शेतकऱ्यास मदत करण्याकरिता पास केलेल्या ह्या कायद्यानें त्यास खरी मदत तर कोणतीच झाली नाही, परंतु सावकार व शेतकरी त्या दोघांसही लबाडीचे व्यवहार अधिक प्रमाणात करण्यास त्यामुळें उत्तेजन मिळालें, हें महाराष्ट्रातील सर्वसामान्य नागरिकास माहितच आहे.

१८८३–८४ च्या सुमारासच शेतकऱ्यांना कर्जमुक्त करण्याकरिता, निदान त्यांस कमी व्याजाच्या दरानें कर्ज मिळण्याकरितां, दुसरीही एक योजना कित्येक पढाऱ्यानी तयार केली होती. जमीनीच्या तारणावर लांब मुदतीनें व माफक व्याजाच्या दरानें शेतकी सुधारण्यास कर्ज देणाऱ्या विशिष्ट स्वरूपाच्या पेढ्या कांही इतर राष्ट्रांत अस्तित्वांत आहेत असें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. हिंदुस्थानांतही अशा पेढ्या काढाव्या व सरकारच्या आणि सहृदय व परोपकारी नागरिकांच्या भांडवलाच्या साहाय्यानें लहान प्रमाणवर शेती करणाऱ्या रयतास कर्ज पुरवावें अशी एक योजना महाराष्ट्रांत व गुजराथेंत पुढें आली. हिंदुस्थानांत भांडवलाचा पुरवठा मर्यादित असल्यानें व्याजाचे दर सामान्यतः भारी असतात व

गरजू आणि गरीब शेतकऱ्यांस तर जबर व्याजाखेरीज कर्जच मिळत नाहीं. सरकारनें व परोपकारी नागरिकांनी सामान्य दरानें भांडवल पुरविलें व विशिष्ट संघटनेच्या शेतकऱ्यांच्या पेढीमार्फत तें रयतांस दिलें गेलें तर शेतीची व जमीनीच्या मालकांची स्थिति सुधारेल असें वाटत होतें. मुंबई इलाखा व विशेषतः पुणे जिल्हा, ह्याच्यांतील पुढाऱ्यांनीं व सरकारी अधिकाऱ्यांनी ह्या योजनेंत प्रमुखपणानें भाग घेतला होता व तिला हिंदुस्थान सरकारचीही सहानुभूति होती. पुणे जिल्ह्यांतील पुरंदर तालुक्यात नव्या पद्धतीची पहिली पेढी उघडावी असें ठरलेंही होतें. परंतु पेढीच्या विशिष्ट घटनेस व पुढील व्यवहारास सरकारची विधायक सहानुभूति असणे आवश्यक होतें, ती देण्याचें स्टेट सेक्रेटरीनें नाकारलें. सरकारी कर्ज देण्याच्या पद्धतीचे दोष दूर करून सरकार व सुस्थितीतील नागरिक ह्यांच्या सहकार्यानें निदान त्यातल्या त्यात मोठ्या शेतकऱ्याची तरी आर्थिक स्थिति कायमची सुधारण्याचा हा प्रयत्न अशा तऱ्हेनें अगदी ऐन वेळेस निष्फल ठरला.

**२ सहकार्याच्या तत्त्वाचा उगम**—मागें प्रास्ताविक भागांत[1] सहकार्याच्या आर्थिक तत्त्वाचें सामान्य विवेचन केलेलें आहे त्यावरून लहानसहान धंदेवाल्यांस स्वावलंबनानें व जुटीनें, मोठ्या प्रमाणावर व्यवहार करून मिळणारे फायदे संपादण्याचें तत्त्व म्हणजे सहकार्य. हें दिसून येईल. उत्पादक, व्यापारी, उपभोक्ते ह्या निरनिराळ्या नात्यानें लोकांनी आपापली जूट केल्यास सध्या मध्यस्थास द्यावा लागणारा फायदा त्यास द्यावा न लागून, किंवा एकट्या दुकट्या इसमाची पत कमी असल्यानें त्यास भारी व्याज पडतें तें न पडून, व्यक्तिशः नागरिकाचा व समाजाचा फायदाच होतो. गेल्या शतकाच्या मध्याचे सुमारास जर्मनीतील आर्थिक व सामाजिक परिस्थिति, ह्या शतकाच्या आरंभी असलेल्या हिंदुस्थानाच्या परिस्थितीहून फारशी भिन्न नव्हती. लोकसंख्या वाढणें, परकी मालाच्या प्रसारामुळे देशी धंदे बुडणें, जमीनिवर प्रमाणाबाहेर ताण पडून व तिची सुपीकता कमी होत जाऊन लागवड गैरफायद्याची होणें, व शेतकरी आणि कारागीर वर्गांत दारिद्र्य, कर्जबाजारीपणा व निरुत्साह ह्यांचा प्रसार होणें, हे सर्व विशेष त्या वेळच्या जर्मन राष्ट्रांत सहज दृष्टिगोचर होण्यासारखे होते. अशा वेळी दोन परोपकारी गृहस्थांनी सहकार्याच्या तत्त्वाचा जर्मन कारागीर व शेतकरी ह्यांनी अंगिकार करून स्वावलंबनाने व 'सहकार्यानें' स्वतःचा उद्धार करून घ्यावा, अशा शिकवणुकीचा प्रसार करण्यास सुरुवात केली. शूल्झ डिलिट्झ ह्या जर्मन गृहस्थानें कारागिरांच्या सहकारी तत्त्वावरील पतपेढ्या स्थापण्याविषयी विशेष खटपट केली. ह्या प्रकारच्या पतपेढ्या सहकार्याच्या तत्त्वावर चालविलेल्या असत हें खरें, तरी त्या पेढ्यांची संघटना एकंदर सामान्य व्यापारी पेढ्यांच्या संघटनेप्रमाणे असे. भागीदारांच्या भांडवलाचें मोठें प्रमाण, पेढीच्या कर्जाबद्दल मर्यादित

[1] पानें ४५-४७ पहा.

जबाबदारी, होईल तो फायदा भागीदारांत वांटून घेण्याची पद्धति, कमी मुदतीनें कर्ज देण्याचा प्रचार व पेढीच्या सर्व चालकास रूढीप्रमाणें पगार देण्याची व्यवस्था हे इतर पेढ्यांचे विशेष जर्मन कारागिराच्या ' सहकारी ' पेढ्यांमध्येंही होते. परंतु आपल्या सभासदांच्या मितव्ययावर, स्वावलंबनावर, कर्तबगारीवर व परस्पर साहाय्यावर त्याची उभारणी केलेली असल्यानें त्यास[1] सहकारी पतपेढ्याचाच एक प्रकार असें म्हटलें पाहिजे. जर्मन शेतकऱ्याची आर्थिक परिस्थिति जर्मन कारागिराहूनही वाईट होती, म्हणून त्यास ह्या स्वरूपाच्या पेढ्यापासून फायदा होण्यासारखा नव्हता. भागीदाराच्या संख्येचें व भागाच्या किंमतीचें अल्प प्रमाण, पेढीच्या कर्जाबद्दल सभासदाची अमर्यादित जबाबदारी, कर्जाची दीर्घ मुदत, फायदा मिळविण्यापेक्षा सभासदास कमी व्याजानें कर्ज देण्याकडे अधिक लक्ष्य, पेढीच्या चालकाकडून वेतनाखेरीज काम करून घेण्याची पद्धत व विशेषतः पेढीच्या सभासदामध्ये स्वावलंबन, स्वाभिमान, सचोटी, परस्पर साहाय्य, मितव्यय इत्यादि नैतिक गुणाचा परिपोष करून त्याच्या मालमत्तेच्या नव्हे तर त्याच्या शीलाच्या तारणावर कर्ज उभारण्याची शक्यता, हे सर्व विशेष जर्मनीतील शेतकऱ्याच्या पतपेढ्यात मोठ्या प्रमाणावर दिसून येतात. ह्या प्रकारच्या सहकारी पतपेढ्याचा रेफैसन नांवाच्या जर्मन गृहस्थानें आजन्म पुरस्कार केला होता म्हणून त्यास 'रेफैसन' प्रकार असें म्हणतात. निरनिराळ्या पाश्चात्य राष्ट्रांत त्यांच्या परिस्थितीस व तेथील लोकांच्या गरजास अनुसरून ह्या दोन्ही प्रकारच्या सहकारी संस्थाचा लवकरच पुष्कळ प्रसार झाला. हिंदुस्थानसरकारनें येथील शेतकऱ्याच्या आर्थिक स्थितीत सुधारणा घडवून आणण्याकरिता वर सांगितलेले जे प्रयत्न केले ते सर्व निष्फळ ठरल्यावर पाश्चात्य राष्ट्रांतील शेतकरी व कारागीर वर्गात भरभराटीस आलेल्या सहकारी पेढ्याकडे सरकारी अधिकाऱ्याची दृष्टि वळणें साहजिकच होतें.

१९०१ सालच्या दुष्काळ कमिशननें हिंदुस्थानातील शेतकऱ्यात रेफैसन प्रकारच्या सहकारी पतपेढ्या सुरू करणें आवश्यक आहे असें आपले मत नमूद केलें, व दुष्काळ निवारण्याचे प्रयत्न करता करता जेरीस आलेल्या हिंदुस्थानसरकारनें ते तत्त्वतः मान्यही केलें. परंतु ह्या कमिशनच्या चौकशीपूर्वीही कांहीं सरकारी अधिकाऱ्यानी सहकार्याच्या तत्त्वाचा येथील शेतकऱ्यात प्रसार करण्याचा सरकारनें प्रयत्न करावा असें सुचविलें होतें. १८९५ साली सर फ्रेडरिक निकलसन ह्या मद्रासचरकारच्या अधिकाऱ्यानी मद्रास इलाख्यात व कांहीं पाश्चात्य राष्ट्रात पाहणी करून जर्मनीत रेफैसननें अस्तित्वांत आणलेल्या पेढ्यासारख्या पेढ्या हिंदुस्थानात स्थापणें आवश्यक आहे, असा आपल्या चौकशीचा थोडक्यात निकाल सांगितला. उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं अधिकाऱ्यानी आपापल्या भागातील शेतकऱ्यांत सहकार्याच्या तत्त्वावर पेढ्या स्थापण्यास सुरुवातही केली होती. परंतु समाईक भांडवलाच्या मंड-

१ मागें पान ४४ पहा.

व्यांस लागू असलेल्या अनेक कायदेशीर नियमांची त्यांस फारच अडचण भासूं लागली होती व ती दूर करण्यास सरकारनें कांही तरी उपाय योजावे अशी त्यांची खटपटही चालू होती. १९०१ च्या दुष्काळी कमिशनचें मतही सहकारी पेढ्यांच्या स्थापनेस अनुकूल असेंच पडल्यानें त्या धोरणानें हिंदुस्थानसरकारनें उपाययोजना करण्याचें ठरविलें. सहकारी पेढ्या स्थापण्यास कायद्यांत फेरबदल कसकसे करावयास पाहिजेत, हें ठरविण्याकरितां एक कमिटी नेमली गेली. सहकारी चळवळीचे इंग्लंडांतील प्रमुख पुरस्कर्ते मि. वुल्फ ह्यांचाही सल्ला घेण्यांत आला; व ह्या कमिटीच्या शिफारशीस कायदेशीर स्वरूप देण्याकरिता १९०४ साली एक स्वतंत्र कायदा पास केला गेला.

**४ सहकारी पेढ्यांबद्दलचे कायदे**—सहकारी पेढ्यांचें वैशिष्ट्य हें असतें की, त्या स्वावलंबनाच्या व परस्पर साहाय्याच्या तत्त्वावर स्थापलेल्या असतात. सरकारी प्रयत्नांनी अगर प्रेरणेनें स्थापन झालेल्या पेढ्यांच्या सभासदांत सहकार्याच्या ह्या नैतिक विशेषाची आवड असण्याचा फारच थोडा संभव असतो. १९०४ च्या कायद्यानें हिंदुस्थानसरकारनें सहकारी पेढ्यांच्या संस्थापनेस अप्रत्यक्षपणें सुरवात केली तेव्हा त्यास ह्याबद्दलची जाणीव होती. सरकारचा सहकारी पतपेढ्यांशी असलेला संबंध सर्वस्वी आत्मीयत्वाचाही असूं नये व सरकारनें ह्या संस्थांशी अगदीच तिऱ्हाइत तटस्थांसारखेंहि वागू नये, हें मत सरकारास तत्त्वत: तरी ग्राह्य होतें. १९०४ च्या कायद्यामध्ये सहकारी पेढ्या नोंदविण्याच्या अटी व नोंदविलेल्या पेढ्यास मिळणाऱ्या विशेष सवलती एवढ्याचाच मुख्यत: विचार झालेला होता. प्राप्तीवरील कर, स्टँप व नोंदणी फी ह्या सरकारी उत्पन्नाच्या बाबी सहकारी पेढ्यांस माफ केल्या गेल्या. प्रत्येक प्रांतातील सरकारनें एक स्वतंत्र 'सहकारी' खातें काढावें व सरकारी नियमांस अनुसरून चालणाऱ्या पेढ्यास सरकारकडून भांडवलही कर्ज म्हणून मिळावें असें ठरलें. सरकारी मदत व सरकारी अटी ह्यांच्या कक्षेंत मुख्यत: सरकारी अधिकाऱ्यांच्या प्रेरणेनें स्थापन झालेल्या 'सहकारी पेढ्यांत' सहकार्याचें नैतिक स्वातंत्र्य किती प्रमाणात आढळण्याची अपेक्षा होती ते आज सागणें कठीण आहे. १९०४ च्या कायद्यान्वयें हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत पुष्कळ पेढ्या नोंदविल्या गेल्या हें पुढें दिलेल्या आंकड्यांवरून दिसेलच. परंतु ह्याप्रमाणें पतपेढ्यांच्या संख्येंत वाढ होत असतां, १९०४ चा कायदा अनेक बाबतींत सदोष व अपुरा आहे असें दिसून आलें. त्या कायद्यान्वयें फक्त पेढ्या, म्हणजे मुख्यत: पैसे कर्जाऊ देणाऱ्या संस्था, नोंदविल्या जात. मालाची खरेदीविक्री करण्यास एखादें दुकान अगर वस्तु तयार करण्याचा एखादा कारखाना सहकार्याच्या तत्त्वानुसार काढल्यास त्या कायद्याचा उपयोग होत नसे. तसेंच, कांहीं सहकारी पेढ्यांनी हिशेबतपासणी-

करितां किंवा भांडवल मिळविण्याचे बाबतींत परस्पर सहकार्य करण्याकरितां आपली एखादी निराळी संस्था स्थापिली तर तीही १९०४ च्या कायद्यान्वयें नोंदतां येत नसे. शिवाय, सहकारी पेढ्यांचें 'शहरांतल्या' व 'खेडेगांवांतल्या' असें वर्गीकरण कायद्यानें मान्य केलें असून पहिल्या वर्गांतील सर्व पेढ्याच्या सभासदांवर पेढीच्या कर्जाबद्दल मर्यादित जबाबदारी असावी व दुसऱ्या प्रकारच्या सर्व पेढ्यांच्या सभासदांच्या बाबतींत ती अमर्यादित असावी असा नियम असे. अमर्यादित जबाबदारीच्या तत्त्वावर काढलेल्या सहकारी पेढीनें आपल्या भागीदारांस नफा वांटून देण्यासही त्या कायद्यांत मुभा दिलेली नव्हती.

१९०४ च्या कायद्यांतले हे सर्व दोष १९१२ सालच्या सहकारी संस्थासंबंधाच्या कायद्यानें दूर केले व सहकारी संस्थांच्या त्या नंतरच्या प्रसाराच्या वाढत्या आकड्यांवरून त्या सुधारणा आवश्यक होत्या असेंही सिद्ध झालें. खेड्यांतील सहकारी पेढ्या, त्यांनी आपापसांत संघटना करून हिशेब तपासण्याची व्यवस्था करण्याकरितां व एकमेकाच्या कर्जास जामीन राहण्याकरितां स्थापिलेली मंडळे (यूनिअन्स), सरकार व ठेवीदार ह्यांकडून व सामान्य पेढ्यांकडून भांडवल मिळण्यास काढलेल्या मध्यवर्ती सहकारी पेढ्या, कांही प्रांतात स्थापन झालेल्या प्रांतिक सहकारी पेढ्या, सहकारी तत्त्वावर चालविलेल्या विमा मंडळ्या, अशा अनेक प्रकारच्या सहकारी संस्थांचा १९१२ नंतर झपाट्यानें प्रसार झाला. निरनिराळ्या क्षेत्रांत काम करणाऱ्या सहकारी पेढ्यांचे पैशाच्या बाबतींत परस्पर संबंध कोणते असावे, त्यांचे व्यवहार कोणत्या सामान्य नियमांप्रमाणें चालणें आवश्यक आहे व एकंदरीनें सहकारी संस्थाचा अनपेक्षित वेगानें होणारा प्रसार पायाशुद्ध आहे किंवा नाही हें पुन्हां पारखून पाहून कोणत्या नव्या सुधारणा करणे इष्ट आहे, हें ठरविण्याची वेळ आली आहे असें लवकरच सरकारास वाटू लागलें. ही चौकशी करण्याकरितां १९१३ मध्ये हिंदुस्थानसरकारनें सर एडवर्ड मॅकलॅगन ह्यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक कमिटी नेमली. ह्या कमिटीचें काम चालू झालें तोंपर्यंत सहकारी पेढ्यांत झालेली वाढ पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

## सहकारी संस्थांची वाढ (१९०६–१९१४)

| वर्ष | सहकारी संस्थांची संख्या | सभासदांची संख्या | चालू भांडवल रुपये |
|---|---|---|---|
| १९०६—७ | ८४३ | ९०,८४४ | — |
| १९०७—८ | १,३५० | १,४८,६९८ | ४१,७५,२११ |
| १९०८—९ | १,९४८ | १,७९,१४४ | ७२,२५,११९ |
| १९०९—१० | ३,३९७ | २,२०,६७६ | १,०१,२९,२३२ |
| १९१०—११ | ५,२६२ | २,९९,३७६ | १,५३,३१,७०२ |
| १९११—१२ | ८,०५७ | ३,९१,९५७ | २,३५,८८,३७८ |
| १९१२—१३ | ११,५४८ | ५,१३,८५१ | ३,३३,०१,६०३ |
| १९१३—१४ | १४,५६६ | ६,६१,८५९ | ४,६४,२७,८४२ |

**५ मॅकलॅगन कमिटीचा रिपोर्ट**—हिंदुस्थानांतील सहकारी संस्थांची संघटना व त्यांचे विशेष ध्यानांत येण्यास मॅगलॅगन कमिटीच्या रिपोर्टाचें अजूनही पुष्कळ साहाय्य होतें, ह्यास्तव त्यांतील महत्त्वाचा भाग अगदीं त्रोटकपणें पुढें दिलेला आहेः—

१

'पतपेढ्यांची संख्या पुष्कळ वाढत आहे, त्याप्रमाणें इतर प्रकारच्या सहकारी संस्थांचीही अधिक वाढ होणें जरूर आहे. मजूर, कारागीर व मध्यम वर्गांतील लोक ह्यांना अनेक मार्गांनी सहकारी संस्था उपयुक्त होतील. परंतु अशा सर्व संस्थांच्या सभासदांस सहकार्याच्या तत्त्वाची पूर्ण ओळख आहे व त्यास अनुसरूनच त्यांच्या संस्थेचें काम चाललेलें आहे, ह्याबद्दल प्रत्येक प्रांतातील मुख्य सहकारी अधिकाऱ्यानें काळजी बाळगावी. जमीनीच्या मोठमोठ्या मालकांच्या भांडवलविषयक गरजा भागविण्यास निराळ्या पेढ्या स्थापल्यास जमीनीच्या मालकांची व सरकारचीही सोय होईल. सहकारी संघटनेची प्राथमिक संस्था म्हणजे खेड्यांतील पतपेढी. तिचे सभासद खरेखरे सहकार्यवादी असणें आवश्यक आहे. प्राथमिक पेढीच्या सभासदांची व कार्यक्षेत्राची व्याप्ति मर्यादित ठेवल्यानें त्यांच्यांत खऱ्या सहकारी तत्त्वाचा प्रसार होणें सोपें जाईल. सभासदांची पूर्वीची कर्जें किती आहेत ह्याची नीट चौकशी केली जावी. पेढ्यांची संख्या वाढविण्याचा मुद्दाम प्रयत्न करूं नये. पेढ्यांचें भांडवल, भागाची किंमत, ठेवी, कर्ज व शिल्लक निधि ह्यांतून मिळतें ह्यापैकीं भागाची किंमत फार असूं नये व तिची कमाल मर्यादा ठरविली जावी. वाटून दिल्या जाणाऱ्या नफ्यासहि मर्यादा असावी. शेतकऱ्यांच्या पेढ्यांतील सभासदांची पेढीच्या कर्जाबद्दलची जबाबदारी तत्त्वतः 'अमर्यादित' असावी, परतु प्रत्यक्षपणें भागाच्या किंमतीपेक्षा अधिक रक्कम त्याजकडून वसूल करणें भाग पडल्यास ती त्याच्या भागाच्या प्रमाणात वसूल केली जावी. प्राथमिक पेढीस स्थानिक लोकांचा विश्वास व सहानुभूति ही किती प्रमाणात प्राप्त झाली आहेत, हे त्याजकडून येणाऱ्या ठेवींच्या रकमेवरूनच ठरविलें पाहिजे व स्थानिक ठेवींच्या रकमेंत वाढ होणें हे पेढीच्या यशाचें द्योतक मानलें पाहिजे. पेढीच्या सेव्हिंग्ज् बँक खात्याशिवाय इतर ठेवी सामान्यतः एक वर्षाहून कमी मुदतीच्या असूं नयेत. मध्यवर्ती सहकारी पेढी व प्रांतिक सरकारचे मुख्य सहकारी अधिकारी ( रजिस्ट्रार ) हे प्रत्येक पेढीनें विवक्षित वर्षी किती कर्ज काढावें ह्याची कमाल मर्यादा ठरवितील, त्याहून पेढीनें आपल्या सभासदास त्या वर्षी द्यावयाच्या कर्जाची कमाल मर्यादा अधिक असूं नये. शिवाय, सरकारनें व मध्यवर्ती पेढीनें ठरविलेल्या कमाल मर्यादेच्या आतच पेढीनें अधिकात अधिक कर्ज किती काढावें व पेढीच्या सभासदांपैकीं प्रत्येकास जास्तीत जास्त कर्ज किती द्यावें हेंही आगाऊ ठरविणें आवश्यक आहे. सहकारी पेढ्यांनी शेतकऱ्यांच्या सामान्य गरजा

भागीविण्यांस कर्ज द्यावें व त्याची मुदतही कमी असावी. विशेष सुधारणा करण्यास लांब मुदतीचें कर्ज कोणास पाहिजे असेल तर तें पूर्वीप्रमाणेंच सरकारकडून घेतलें जावें. सरकारनें १८८३ व १८८४ सालच्या कायद्यान्वयें द्यावयाचें कर्ज सहकारी पेढ्यांच्या मार्फत द्यावें. सहकारी पेढ्यांचे व्याजाचे दर इतर सावकारांहून कमी असतात, त्यामुळें सावकारांचे दरही उतरत आहेत. सहकारी पेढ्यांचें कर्ज वेळेवर वसूल होणें अत्यंत आवश्यक आहे. तसें न होईल तर सहकारी पेढ्या अयशस्वी झाल्या असें म्हटलें पाहिजे. सभासदाकडे बाकी थकल्यास रजिस्ट्रारकडे तक्रार केली जावी व रजिस्ट्रारला तसें करणें इष्ट वाटल्यास त्यानें ती तक्रार पंचांकडे पाठवावी. वार्षिक नफ्यांतील $\frac{1}{4}$ भाग शिलक निधीत टाकला जावा व राहिलेल्या नफ्यापैकी $\frac{1}{10}$ पर्यंत रक्कम कोणत्याही 'धर्मादाय' खातीं खर्च करण्यास परवानगी असावी, असा कायदा आहे. परंतु शिलकनिधी शक्य तितका अधिक वाढणें व शेवटीं भांडवलाकरितां बाहेरील सहाय्यकांवर व सरकारावर असलेलें पेढ्यांचें अवलंबन कमी होणें जरूर आहे. विशेष तपासणीचें काम सध्यां तरी सरकारतर्फेंच केलें जावें; सर्वसामान्य पाहणीचें काम सहकारी पेढ्यांच्या मंडळींनीच ( यूनियन्स ) करण्यास हरकत नाही.'

'विवक्षित जिल्ह्यांतील प्राथमिक संस्थांस भांडवलविषयक मदत करण्यास मध्यवर्ती सहकारी पेढ्या असाव्या. प्राथमिक पेढी व मध्यवर्ती पेढी ह्यांच्या दरम्यान एक परस्परांबद्दल जामीनदारी घेणारीं सहकारी मंडळें कांहीं कांहीं प्रांतांत आहेत व त्यांचा प्रसार होणें इष्ट आहे. प्राथमिक पेढ्यांकडून ठेवी घेऊन, त्यांच्यांतून व बाहेरच्या कर्जांतून त्यांस कर्ज देणें हें मध्यवर्ती पेढ्यांचें मुख्य काम होय. मध्यवर्ती पेढीनें आपले भागीदार असलेल्या पेढ्यांसच कर्ज द्यावें व काही व्यक्तिशः भाग घेणारे सभासद असतील त्यांजकडून भागाची पूर्ण किंमत सुरवातीसच वसूल करण्याची खबरदारी घ्यावी. भागीदाराची जबाबदारी 'मर्यादित' असावी व नफ्याचा कमाल दरही मर्यादित असावा. चालू खात्यांतील व इतर ठेवी परत करण्यास पुरेसा पैसा हातांशी राहील अशी मध्यवर्ती पेढ्यांनी काळजी बाळगावी. प्रांतिक सहकारी पेढी व सामान्य समाईक भांडवलाच्या पेढ्या ह्यांजकडून मध्यवर्ती सहकारी पेढ्यांनी हातावरील कर्ज घेण्यास हरकत नाही. व्यक्तिशः सभासदांस मध्यवर्ती पेढीनें सहसा कर्ज देऊं नये व सामान्य पेढ्यांचे इतर व्यवहारही करूं नयेत. सभासद असलेल्या प्रत्येक पेढीची पत व ती ज्या कार्याकरितां कर्ज मागत असेल त्याचें स्वरूप ह्यांची नीट चौकशी केली जावी. पेढ्यांस हातउसनें पैसे द्यावयाचे ते उत्तम तऱ्हेनें चाललेल्या पेढ्यांसच द्यावे. निदान मोठमोठ्या प्रांतांत एक प्रांतिक सहकारी पेढी असावी व मध्यवर्ती सहकारी पेढ्यांस साहाय्य करण्याचें कार्य तिनें करावें. मध्यवर्ती बँकांनीं आपाप-

सांत अगर सामान्य बँकांशी व्यवहार करावयाचा तो प्रत्यक्षपणें न करतां प्रांतिक पेढीमार्फत करावा. प्रांतिक पेढीच्या घटनेंत सुरुवातीस धंदेवाईक व्यापाऱ्यांचें वर्चस्व असण्यास हरकत नाहीं; परंतु क्रमशः सहकारी पेढ्यांच्या हातांत सत्ता जाईल अशी व्यवस्था करावी. प्रांतिक पेढीनें प्राथमिक संस्थांस प्रत्यक्षपणें कर्ज न देतां मध्यवर्ती पेढीमार्फत द्यावें. प्रांतिक सहकारी पेढीनेंही ' सहकारी ' पेढ्यांखेरीज इतरांशीं सामान्यतः व्यवहार करूं नये. सरकारनें सहकारी चळवळीशी असलेला आपला संबंध कमीत कमी मर्यादेपर्यंत ठेवावा हे इष्ट आहे. तरी सरकारच्या आर्थिक व नैतिक पाठबळाखेरीज हिंदुस्थानासारख्या देशांत सहकारी संस्थांची वाढ होणार नाही हें विसरूं नये. कलेक्टरसारख्या सरकारी अधिकाऱ्यांनी तिऱ्हाइताच्या व मित्रत्वाच्या नात्यानें सहकारी संस्थांस शक्य ती सर्व मदत करावी; परंतु आपल्या अधिकाराच्या जोरावर त्यांच्या चालक वर्गांत जागा मिळण्याची अगर त्यांच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याची खटपट करूं नये. प्रत्येक प्रांतांत शेतकी, उद्योग धंदे व सहकारी संस्था ह्यांसंबंधीं काम करणारीं निरनिराळीं सरकारी खातीं आहेत, तीं एकत्र करून प्रांतिक 'संवर्धनाचें' एकच खातें केलें जावें. हिंदुस्थानसरकारनेंही सहकारी संस्थांच्या प्रगतिकडे लक्ष्य ठेवणारा एक स्वतंत्र अधिकारी नेमून प्रांतिक सहकारी खात्यांच्या कामावर सर्वसामान्यपणें नजर ठेवावी. सहकारी पेढ्यानीं हुंड्यांचा व्यवहार सुरू केल्यास त्यांच्या हुंड्या योग्य कसर कापून इलाखा बँकांनी विकत घ्याव्या अशी व्यवस्था करावी, व तसें करणें अव्यवहार्य ठरल्यास एकंदर देशाकरितां म्हणून सरकारनेंच एक राष्ट्रीय सहकारी पेढी स्थापावी. '

१९१५ सालापासून आजपर्यंत सहकारी चळवळीसंबंधानें जे अनेक प्रश्न उपस्थित झाले आहेत त्याचा विचार करून ते सोडविण्यास मॅकलॅगन कमिटीच्या रिपोर्टाचा विशेष उपयोग झाला आहे.

**६ सहकारी संघटनेविषयीं कांहीं प्रमुख प्रश्न**—मॅकलॅगन कमिटीच्या शिफारशीस हिंदुस्थानसरकारची सर्वसामान्य संमति होती व प्रत्येक प्रांतानें आपापल्या स्थानिक परिस्थितीस जुळेल त्या मानानें त्यांचें व्यवहारांत अवलंबन करावयाचें ठरविलें होतें. काही शिफारशीबद्दल मात्र सहकारी चळवळीत काम करणाऱ्या पुष्कळ सरकारी व बिनसरकारी गृहस्थांचा तीव्र मतभेद होता. उदाहरणार्थ, मध्यवर्ती सहकारी पेढ्यांनी आपलेजवळ विवक्षित वर्षांत जेवढ्या ठेवी परत करावयाच्या असतील त्यांच्या निम्मी शिलक हाताशी ठेवावी ही शिफारस सहकारी संस्थेसारख्या हातातोंडाशी व्यवहार करणाऱ्या पेढ्यांच्या बाबतीत अशक्यप्राय होती. गेल्या दहा पंधरा वर्षांत निरनिराळ्या प्रांतांत सहकारी चळवळीसंबंधानें अनेक प्रश्न उपस्थित झाले आहेत व स्थानिक अडचणी व परिस्थिति ह्यांच्यामुळें त्यांचें स्वरूपही प्रांता-

प्रांतांत भिन्न असलेलें दिसतें. विवक्षित प्रांताच्या निरनिराळ्या जिल्ह्यांत, तालुक्यांत व गांवांतही तेथील विशिष्ट परिस्थितीचा सहकारी चळवळीवर पगडा बसलेला असतो. पंजाब, ब्रह्मदेश, मद्रास, मुंबई इत्यादि प्रांतांपैकीं प्रत्येकाच्या आर्थिक, शैक्षणिक वगैरे विशेषांस अनुसरून तेथील सहकारी चळवळही विशिष्ट स्वरूपानें प्रगति पावत आहे. तरी अनेक सहकारी परिषदा व सहकारी वाङमय ह्यांत प्रामुख्यानें दिसून येणाऱ्या सर्वसामान्य अशा अडचणीही पुष्कळ आहेत. सहकारी संस्थांची वाढ झपाट्यानें होत असून त्याची व्यवस्था सुरळीतपणें चालावी ह्या उद्देशानें सरकारी व बिनसरकारी संघटनेंत जेवढ्या सुधारणा करणें आवश्यक आहे तेवढ्या झालेल्या नाहीत. सहकारी संस्थांच्या सभासदांत खऱ्या सहकार्याच्या तत्त्वाची जाणीव आधीच फार कमी असल्यानें संघटनेंतील ही उणीव विशेष हानिकारक होण्याची भीति आहे. सहकार्याच्या तत्त्वाचें शिक्षण व प्रसार, सहकारी संस्थाची कार्यक्षम संघटना, सरकारी अधिकाऱ्यांच्या साहाय्याशिवाय कडक शिस्तीनें सहकारी संस्थांचें काम चालविण्याचा प्रघात, व निरनिराळ्या नव्या क्षेत्रांत सहकारी संस्था काढण्याचा उपक्रम ह्या दिशांनीं सुधारणा झाल्याशिवाय सहकारी चळवळ मध्यांच्या परावलंबनाच्या अवस्थेंतून निघून स्वतंत्र रीतीनें व जोमदारपणें वाढू शकणार नाही.

सहकारी संघटनेचा पाया म्हणजे खेड्यांतील प्राथमिक पेढी; हिच्यांत कमीत कमी दहा सभासद असतात व त्यांनी एकमेकावर नीट लक्ष्य ठेवून सहकारी पेढींतून घेतलेल्या कर्जाचा शेतकीची उत्पादकता वाढण्याकडे उपयोग होत आहे किंवा नाहीं, हें पहावयाचें असतें. सामान्य सभासद स्वतःच्या कर्तव्याबद्दल व अंतिम हिताबद्दल एवढी जागरूकता दाखवितांना आढळत नाहीं, एवढेंच नव्हे, तर पेढीच्या कार्यकारी मंडळाचे सभासदही ह्या बाबतींत सामान्यतः म्हणण्यासारखी काळजी बाळगत नाहीत. दुष्काळामुळें अगर बाजारांतील कांहीं अडचणीमुळें सभासदाकडून येणारे हप्ते थकले तर एक असो; परंतु नेहमीच कर्जवसुलीबद्दल पुष्कळ ढिलाई असते व कार्यकारी मंडळांतील सदस्यास दिलेलें कर्जही वेळेवर येत नसल्यानें त्यास इतरावर सक्ती करण्याचें नैतिक धैर्य नसतें. ह्याखेरीज, अंतगत तट व मितव्ययाचा अभाव ह्यांमुळेंही सहकार्याच्या तत्त्वाचें पदोपदीं उल्लंघन होतें. प्राथमिक पेढ्यांची वारंवार कसून तपासणी करण्याकरिता स्वतंत्र बिनसरकारी संस्था कांहीं प्रांतांत आहेत. परंतु त्यांचें काम समाधानकारक रीतीनें चालत नसल्यानें पेढ्यांस कर्ज देणाऱ्या मध्यवर्ती पेढ्या, व कधी कधी सरकारी अधिकारी, ह्यांजवरच ती जबाबदारी येऊन पडते. मध्यवर्ती पेढ्यांचें काम भांडवल पुरविण्याचें असल्यानें तपासणीचें कामही त्यांच्याकडेच असणें इष्ट नाहीं, हें उघड आहे. परंतु दुसऱ्या स्वतंत्र व विश्वसनीय व्यवस्थेच्या अभावीं ज्यास आपलें भांडवल कर्ज म्हणून गुंतवावें लागतें त्यांनीं म्हणजे मध्यवर्ती व प्रांतिक पेढ्यांनीं आपली तपासणी चालू ठेवणें अपरिहार्य आहे.

मद्रास, पंजाब, ब्रह्मदेश, मध्यप्रांत, बिहारओरीसा ह्या प्रांतांत निरनिराळ्या स्वरूपांत प्राथमिक पेढ्या आपापसांत संघटना करून तपासणीची व्यवस्था करीत आहेत. ज्या मानानें ही व्यवस्था कार्यक्षम आणि विश्वसनीय ठरेल त्या मानानें मध्यवर्ती व प्रांतिक सहकारी पेढ्या व सरकारी अधिकारी आपापलें अंग तपासणीच्या कामांतून काढून घेतील हें उघड आहे. 'गॅरन्टीग यूनियन' ह्या नांवाच्या विशिष्ट संस्था कांही प्रांतांत अस्तित्वात आहेत. प्राथमिक पेढ्या ह्याच सदरहू यूनियनच्या सभासद असतात. मध्यवर्ती पेढीनें यूनियनच्या एका सभासदास दिलेल्या कर्जाची हमी (गॅरंटी) कांहीं विवक्षित प्रमाणांत सर्व सभासद एकजुटीनें आपल्या अंगावर घेतात, म्हणूनच अशा संस्थांस गॅरंटीग यूनिअन्स असें म्हणतात. कर्जाची आपापसांत हमी घ्यावयाची असल्यानें तपासणीचे कामही यूनियनला करणें भाग पडतें. परंतु वास्तविकपणें यूनियननें दिलेली हमी विशेष उपयोगी पडत नाही व यूनियनतर्फे होणारी तपासणीही सर्वस्वीं विश्वसनीय नसते, असें अनुभवास येत आहे. ह्या बाबतींत अपवादात्मक अशाही कित्येक प्राथमिक पेढ्या व यूनिअनस् आहेत हें खरें. तरी प्राथमिक पेढीपासून तों प्रांतिक पेढीपर्यंत भांडवल पुरविण्यास व कामाची तपासणी करण्यास सर्वस्वी स्वायत्त संघटना निर्माण करावयाची असेल तर सभासदांत व कार्यकारी मंडळांत सध्याहून अधिक जबाबदारी व कार्यक्षमता येणें आवश्यक आहे, हें विसरता कामा नये.

**७ भांडवलाचा पुरवठा व हिशेब तपासणी**:—सहकारी चळवळ ही मुख्यतः गरीब व गरजू लोकांनी सहकार्याच्या बळावर आपली आर्थिक सुधारणा घडवून आणण्याकरता हातीं घेतलेली असते व म्हणून सहकारी संस्थांच्या सभासदांच्या ठेवी व त्यांनीं दिलेलें भांडवल एवढ्यावर सहकारी पेढ्यांचा व्यवहार चालेल अशी अपेक्षा करणें व्यर्थ होय. शहरांतील सहकारी पेढ्यांचे सभासद खेड्यांतील सभासदांहून सामान्यतः कमी दरिद्री असल्यानें शहरांतील सहकारी संस्थांची स्थिति भांडवलाच्या बाबतींत अधिक समाधानकारक असते. शिवाय, सामान्य पेढ्या व पैसे गुंतवूं इच्छिणारे धनिक ह्यांच्याशीं संबंध जोडणें शहरांतील सहकारी पेढ्यांस शक्य होतें. अशा पेढ्या हळुहळू खेडेगांवांतील सहकारी पेढ्यांसही सहाय्य करूं शकतात व चांगल्या तऱ्हेनें चालविलेल्या शहरांतील सहकारी पेढीचें लवकरच मध्यवर्ती पेढींत रूपांतर होतें. अशा पेढ्यांचे सभासद सामान्यतः मध्यम वर्गांतील लोक असतात व त्यांची जबाबदारी मर्यादित असते. आसपासच्या खेड्यांतील पेढ्यांस भांडवल पुरविण्याचें अंगावर घेतल्यानें त्यांची तपासणी करणेंही आवश्यक होतें. मध्यवर्ती सहकारी पेढ्यांचें महत्त्व सहकारी संघटनेत विशेष समजलें जातें तें ह्याच कारणानें होय. मध्यप्रांतांत तर अशा पेढ्यांचें विशेष प्रस्थ असून त्याबद्दल तेथील सहकार्यकार्यांत वादविवादही बराच चालू आहे.

मध्यवर्ती पेढ्या व प्राथमिक सहकारी संस्था ह्यांच्या परस्पर संबंधांविषयीं सध्यां जशी अनिश्चित परिस्थिति आहे तशीच मध्यवर्ती पेढ्या व प्रांतिक पेढी ह्यांच्या-संबंधीं दिसून येते. कांहीं प्रांतिक पेढ्या मध्यवर्ती पेढ्यांनी मुद्दाम स्वतःच्या भांडवल विषयक गरजा भागविण्याकरितां काढलेल्या आहेत व दुसऱ्या कांही सामान्य पेढीचा विकास होऊनच 'प्रांतिक' बनलेल्या आहेत. मुंबई प्रांतिक सहकारी पेढी ह्या दुसऱ्या प्रकारची आहे. प्रांतिक पेढ्या मध्यवर्ती पेढ्यांच्या ठेवी ठेवून घेणें व त्यांस कर्ज देणें हे व्यवहार करतात, त्याचप्रमाणें ज्या भागांत मध्यवर्ती पेढ्या नाहीत तेथें प्रत्यक्षपणें प्राथमिक पेढ्यांशीही त्यांस व्यवहार करावा लागतो. मुंबई प्रांतिक सहकारी पेढीच्या प्रांताच्या अनेक भागांत शाखा आहेत व प्रत्यक्ष तपासणीचेंही काम तिच्या नोकरां-कडून केलें जातें. ह्यावरून सहकारी संस्थांची संघटना कोणत्याहि एका विवक्षित योजनेबरहुकूम न होतां स्थानिक गरजा व परिस्थिति ह्यांस अनुसरून निरनिराळ्या संस्था अस्तित्वांत येतात व एकाहून अनेक कामें त्यांस करावी लागतात हें दिसून येईल. पुढें मागें सहकारी चळवळ सध्याहून अनेक पटींनीं लोकप्रिय झाली म्हणजे विकासवादाच्या तत्त्वांनुसार स्वतंत्र कामास स्वतंत्र संस्था असा विशिष्ट श्रमविभाग कदाचित् होईल. सामान्य व्यापारी पेढ्यांचा भांडवल मिळविण्याचा एक महत्त्वाचा व सोपा मार्ग म्हटला म्हणजे उत्पादक अगर व्यापारी यांजकडून विकत घेतलेली मालाची हुंडी दुसऱ्या मोठ्या पेढीस कमी कसरीनें विकावयाची. ह्या व्यवहारानें लहान लहान पेढ्यांची पुष्कळ सोय होते व मोठ्या पेढ्यांसही इतर पेढ्यांना केवळ हातावर पैसे कर्जाऊ देण्याचा सहसा प्रसंग येत नाही. सहकारी पेढ्यांत हुंड्यांचा व्यवहार म्हणण्यासारखा चालत नाही व सहकारी पेढ्यांच्या हुंड्या इतर सामान्य पेढ्या सध्यांच्या परिस्थितीत केव्हाच विकत घेत नाहीत. सामान्य पेढ्यांचा प्रसार सध्यांहून अधिक झाल्याखेरीज व सहकारी पेढ्यांची संघटना पुष्कळ सुधा-रल्याखेरिज भांडवल मिळण्याचा हा मार्ग सहकारी संस्थांस उपलब्ध होणार नाहीं हें उघड आहे. तरी ह्या दोन्ही दिशांनी सुधारणा घडवून आणण्याचे विधायक प्रयत्न होणें जरूर असून सरकारनें ह्या बाबतीत पुढाकार घेणें आवश्यक आहे. नव्या योजनेप्रमाणें रिझर्व बँकेची स्थापना झाल्यावर सरकारनें इंपीरियल बँकेच्या शाखांमार्फत शिल्लक निधीतील पैशांच्या सहाय्यानें सहकारी पेढ्यांची संघटना व सामान्य पेढ्यांची संघटना ह्यांच्यांतील दुवा जोडण्याचा प्रयत्न करणें जरूर आहे.

कोणत्याही समाईक संस्थेचा, विशेषतः पेढीचा, कारभार चोखपणे चालण्यास हिशेबतपासणी पद्धतशीर व कडकपणें होणें अत्यावश्यक आहे. हिंदुस्थानातील सह-कारी पेढ्या सरकारी प्रेरणेनें व कायदेशीर नियमांच्या साहाय्यानें अस्तित्वांत आलेल्या आहेत. भांडवलाच्या व करमाफीसारख्या इतर सवलतीही सार्वजनिक पैशांतून सह-कारी पेढ्यांस मिळत आहेत. सरकारद्वारा एकंदर राष्ट्रानें एका विवक्षित स्वरूपाच्या

पेढ्यांस दिलेल्या ह्या सवलतींचा दुरुपयोग होत नाहीं ह्याबद्दल सरकारास आपली खात्री करून घेणें आवश्यक आहे. शिवाय, सहकारी संस्थांशीं सरकारचा संबंध आहे ह्या समजावरून त्यांस द्रव्यरूपानें साहाय्य करणाऱ्या लोकानाही त्या संस्थांच्या कारभागबद्दल विश्वास वाटणें जरूर असतें. ह्या दोन्ही कारणांनीं हिशेबतपासणीचें काम पहिल्यापासून सरकार तर्फेनें व मोफत करीत आलें आहे. सरकारद्वारा होणाऱ्या ह्या सक्तीच्या हिशेबतपासणीस तात्त्विक आक्षेप पुष्कळ घेतां येतील व अनेक लोकानी तिला व्यावहारिक विरोधही केलेला आहे. परंतु दुर्दैवानें ज्या ज्या संस्थांची हिशेबतपासणी सरकारनें खाजगी संस्थांच्या हातांत दिली त्यांच्या बाबतींत हिशेबाचा चोखपणा फार दिवस टिकला नाहीं. सहकारी संघटनेंत अंगभूत कार्यक्षमता सध्यांहून अधिक वाढेपर्यंत सरकारतर्फे हिशेबतपासणी चालू ठेवणें आवश्यक आहे एवढेंच नव्हे, तर तीही सध्यांहून अधिक पद्धतशीर व्हावयास पाहिजे. सरकार सहकारी संस्थांकडून हिशेबतपासणीचा अंशतः मोबदला म्हणून कांहीं थोडी रक्कम अलीकडे घेत असतें तेंही न्याय्य आहे. हिशेब तपासणीची विश्वसनीय व कार्यक्षम व्यवस्था करण्याकरितां कांहीं सहकारी पेढ्यांनीं परस्पर सहकार्य करून एखादें मंडळ नेमलें अगर एखाद्या अधिकाऱ्याची नेमणूक केली तर अशा योजनेस सरकारनें जरूर सहानुभूति दाखवावी; व ज्या मानानें अशा स्वतंत्र व कार्यक्षम हिशेबतपासणीची व्यवस्था लागेल त्या मानानें आपली सध्याची हिशेबतपासणी मर्यादित करून फक्त सर्वसाधारण तपासणीचा अधिकार आपल्याकडे ठेवावा.

**८ उपभोक्ते व उत्पादक ह्यांच्यांत सहकार्याचा प्रसार**—हिंदुस्थानांतील सहकारी चळवळीची सध्या एकांगी वाढ झालेली आहे; शेतकऱ्यास भांडवल पुरविण्याखेरीज इतर मार्गांनीं तिची फारच थोडी प्रगति झालेली आहे, व विशेषतः उत्पादक कारागीर व उपभोक्ते गिऱ्हाइकें ह्याजमध्यें तिचा व्हावा तसा प्रसार झालेला नाहीं, हे वर ध्यानांत केलेलेंच आहे. हिंदुस्थानांतील दर माणशीं सरासरी उत्पन्न एवढें कमी आहे कीं, सामान्य इसमास त्याच्या आयुष्यक्रमांत लागणाऱ्या अनेक वस्तु सध्याहून कमी किंमतीस मिळाल्या तर त्या बचतीपासून त्याचा पुष्कळच फायदा होईल. त्यांतल्यात्यांत, आपल्या इकडे दुकानदारीचा धंदा सुखवस्तु वर्गांत फार लोकप्रिय असल्यानें खरे उत्पादक व खरे उपभोक्ते ह्यामधील मध्यस्थाची प्रमाणाबाहेर वाढ झालेली असून त्यांच्या कमाईचा बोजा उत्पादक व उपभोक्ते ह्यांच्या खिशांतूनच जावा लागतो. विशेषतः मध्यम वर्गांतील लोकांनीं परस्पर सहकार्यानें मालाचे स्टोअर किंवा दुकान काढलें तर तें यशस्वीपणे चालण्यास अडचण पडूं नये. मद्रासमध्यें त्रिप्लिकेन येथें सहकारी दुकान नमुनेदारपणें चाललेलें आहे. परंतु सामान्यतः खऱ्या सहकार्याचें व मितव्ययाचें महत्त्व आपल्या इकडील मध्यम वर्गांतील सुशिक्षितांसही पूर्णपणें कळत नाहीं व एकतंत्रीपणानें व्यवहार करणें त्यांस अधिक मानवतें. महायुद्धाच्या वेळीं

कित्येक पदार्थ मिळण्यास फार त्रास पडे व किंमतीचें मानही तेव्हां चढीचें होतें. त्या वेळेस सहकारी दुकानें अनेक निघाली, परंतु सभासदांत तत्त्वनिष्ठा व सहकार्य ह्यांचा अभाव असल्यानें त्यांपैकी बहुतेक बंद पडलीं. स्वतःस लागणारा सर्व माल दुकानांतून न घेतां इतर सभासदांनी व गिऱ्हाइकांनी घेतलेल्या मालावरील नफा मात्र आपल्या पदरांत पडावा ह्या हेतूनें सहकारी दुकानांत पडणाऱ्या लोकांचाच भरणा अधिक असल्यानें मालाचा उठाव होणें व फायदा मिळणें अशक्य झालें. घर बांधण्याच्या हेतूनें निघालेल्या सहकारी संस्थांचा उपभोक्त्याच्या संस्थांतच अंतर्भाव केला पाहिजे. ह्या संस्था सुखवस्तु लोकांच्या असतात व त्या विशिष्ट कार्याकरितां स्थापिलेल्या असल्यानें तेवढ्यापुरतें सहकार्य घडणें सोपें असतें. पुणें, मुंबई वगैरे ठिकाणीं मध्यम वर्गांतील लोकांनीं सरकारी साहाय्यानें चालविलेल्या अशा कांहीं संस्था यशस्वी झाल्या आहेत. संस्थेनें बांधलेल्या घरांत रहात असतांच हप्त्यानें किंमत देऊन सभासदांस घर आपल्या मालकीचें करून घेण्याची अशा संस्थांमुळें चांगली सोय झालेली आहे.

सहकारी संस्थांमुळें गिऱ्हाइकांस ज्याप्रमाणें दुकानदाराच्या खिशांत जाणारा पैसा स्वतःच्या हातांत ठेवणें शक्य होतें त्याचप्रमाणें लहानसहान कारागिरांनीं जूट करून सहकार्यानें उत्पादन केलें तर सध्या कारखानदाराच्या हातांत जाणारा संपत्तीचा कांहीं ओघ कारागिराकडे वळून त्याची सांपत्तिक स्थिति सुधारेल. अलीकडचें युग मोठ्या प्रमाणावर व यांत्रिक साधनांनी उत्पादन करण्याचें आहे; त्यामुळें उद्योगधंद्यांत उत्पादनार्थ सहकार्य करण्यास सामान्य कारागीर व कामकरी वर्गास विशेष अवसर नाहीं हें[1] खरें. तरीही सोनार, लोहार, तांबट, विणकर, चांभार इत्यादि कारागिराच्या बाबतींत भांडवलाचा, कच्च्या मालाचा व जरूर तेथें प्रेरक शक्ति व लहान सहान यंत्रें ह्यांचा सहकार्यानें पुरवठा झाल्यास त्याचा धंदा भरभराटीस येण्याचा पुष्कळ संभव आहे. विशेषतः हातमागाच्या कापडास असलेला नैसर्गिक व कृत्रिम खप एवढा मोठा आहे की विणकराचा धंदा तरी सहकार्यानें पूर्ण यशस्वी होण्यास मुळीच अडचण पडूं नये. परंतु विणकर वर्गांत दिसून येणारें सर्वसामान्य अज्ञान, व्यसनीपणा, त्यांच्यांतील स्वार्थसाधु पुढाऱ्यांचाच सहकारी संस्थास विरोध इत्यादि कारणांनीं विणकरांच्या सहकारी संस्थांचा प्रसार अजून फार मर्यादित असून त्यास यशही म्हणण्यासारखें लाभलेलें नाहीं. तरी खादी व स्वदेशी कापड ह्यांच्या प्रसारार्थ अहर्निश खटपट करणाऱ्या लोकांनीं विणकर वर्गांत सहकारी संघटनेची स्थापना करण्याचे प्रयत्न केल्यास त्यांस शेवटीं फलप्राप्ति झाल्याखेरीज राहणार नाहीं.

उत्पादनार्थ केलेल्या सहकार्यास शेती व तदनुषंगिक व्यवसाय ह्यांमध्यें अर्थातच अधिक अवसर आहे. आपल्या शेतांची सहकार्यानें लागवड करण्याचें शेतकऱ्यांनीं ठर-

१ मागें पानें ४६ व ११४–५ पहा.

विलें तर बी, आउतें, यांत्रिक साधनें, उत्पादक सुधारणा इत्यादि बाबतींत त्यास अनेक फायदे होऊन शेतीचें उत्पन्न वाढल्यावांचून रहाणार नाहीं. इटलीमध्यें अशा संस्था यशस्वी झालेल्या आहेत; परंतु हिंदी शेतकऱ्यांच्या व्यक्तिप्रधान मनोरचनेमुळें त्यांचा येथें प्रसार होण्याचीं चिन्हें दिसत नाहीत. विहीर खोदणें, कुंपण करणें, पंप चालविणें अशा विवक्षित कार्याकरितां सहकार्य केल्याची अनेक उदाहरणें आहेत. परंतु सर्वसामान्य शेतकीकरतां सहकार्य केल्याची उदाहरणें फारच क्वचित आढळतील. शेताचे लहान लहान तुकडे दूरवर पसरल्यानें शेतीचा धंदा गैरफायदेशीर होतो म्हणून त्यांचें एकीकरण अर्धवट सक्तीनें घडवून आणण्याचे प्रयत्न हल्लीं चालू आहेत. परंतु सहकार्यानें लागवड करण्याची शेतकऱ्यांस संवय लागेल तर असली पुनर्घटना अनावश्यक होईल. निदान पक्षी, शेतकीचें उत्पन्न वाढण्यास लागवड मोठ्या क्षेत्रांत व किफायतशीर प्रमाणावर करणें इष्ट आहे हें शेतकऱ्यांस पटलें म्हणजे जमीनीच्या तुकड्यांच्या एकीकरणाचा कायदा लोकांस मान्य होणें अधिक सोपें जाईल. दुधाचा पुरवठा सहकारी संस्थांनीं केला तर त्यांस फायदा होऊन लोकांसही शुद्ध दूध माफक भावानें मिळेल. अनेक पाश्चात्य राष्ट्रांत दूधदुभत्याचा पुरवठा करणाऱ्या सहकारी संस्था आहेत व म्युनिसिपॅलिटीसारख्या स्थानिक सार्वजनिक संस्थाही तें काम आपल्या अंगावर घेतात. हिंदुस्थानांतील शहरांत दूधपुरवठ्याच्या सोयी अगदीं असमाधानकारक असून सहकारी डेअऱ्या सध्यांपेक्षां अनेक पटीनीं अधिक काढल्या तरी त्या कार्यक्षमतेनें चालविल्यास खात्रीनें यशस्वी होतील. गुजराथ, कर्नाटक वगैरे भागांत कापूस, भुइमूग, वगैरेची विक्री करणाऱ्या सहकारी संस्था आहेत; बी व खतें विकत घेण्याकरितां स्थापिलेल्या सहकारी संस्थाही अनेक भागात आहेत. ह्याशिवाय पाणीपुरवठा, गुरांचा विमा, वगैरे बाबींकरतां अस्तित्वांत आलेल्या संस्थाही कोठें कोठें आहेत. आपापल्या सभासदांस विवक्षित वस्तु अगर कामगिरी कमी किंमतीनें मिळवून देऊन ह्या सर्व संस्था त्यांचें व समाजाचें हित साधतात हें उघड आहे.

**९ सहकारी संस्थांची वाढः**—भांडवलविषयक व इतर, शेतीच्या व बिनशेतीच्या धंद्यांतील, खेडेगांवांतील व शहरांतील—अशा निरनिराळ्या सहकारी संस्था कितपत समाधानकारक रीत्या चाललेल्या आहेत व हिंदी शेतकऱ्यांच्या, कारागिरांच्या व मध्यम वर्गांच्या हलाखीचा व कर्जबाजारीपणाचा प्रश्न त्यामुळें कितपत सोडविला गेला आहे, ह्याचा विचार करण्यापूर्वीं सहकारी संस्थांची एकंदर वाढ आजतागाईत किती झाली हें कळून येण्यास पुढें कांही आंकडे दिले आहेत ते उपयुक्त होतील.

## हिंदुस्थानांतील सहकारी चळवळीसंबंधीं माहिती.

(१९२६–२७)

| प्रदेश | सहकारी संस्थांची संख्या | सभासदांची संख्या | चालू भांडवलाची रक्कम |
|---|---|---|---|
| | | | रुपये |
| सर्व हिंदुस्थान | ८९,०७१ | ३,४२१,९०५ | ६७,९३,६१,००० |
| मुंबई इलाखा | ५,०९१ | ४७०,९८१ | १०,२६,५०,००० |

## एकंदर हिंदुस्थानासंबंधींच्या आंकड्यांचें पृथक्करण.

(१९२५-२६)

| संस्थेचा प्रकार | संस्थांची संख्या | सभासदांची संख्या |
|---|---|---|
| प्रांतिक व मध्यवर्ती पेढ्या ... | ५७७ | २१४,२०१ |
| तपासणी करण्याकरिता व परस्पर कर्जाची हमी घेण्याकरितां स्थापलेल्या संस्था ... | १४२१ | ३४,२१४ |
| शेतकऱ्यांच्या प्राथमिक संस्था ... | ७८,९४० | २,६२२,०४० |
| शेतीखेरीज इतर धंद्यांतील लोकांच्या प्राथमिक संस्था ... | ८,१३३ | ७९९,८६५ |
| एकूण | ८९,०७१ | ३,४२१,९०५ प्राथमिक पेढ्यांच्या सभासदांची संख्या |

## चालू भांडवलाच्या रकमेचें पृथक्करण.

(१९२५-२६)

| भांडवलाचा प्रकार | रक्कम रुपये |
|---|---|
| १ भागाच्या किमतीचा भरणा करून उभारलेलें भांडवल ... ... ... ... | ८,८७,३८,००० |
| २ व्यक्तिशः सभासदांकडून घेतलेल्या ठेवी व कर्ज | ४,४९,५२,००० |
| ३ प्राथमिक संस्थांकडून " " " | २,३६,९९,००० |
| ४ प्रांतिक व मध्यवर्ती पेढ्यांकडून घेतलेल्या ठेवी व कर्ज ... ... ... .. | २२,८३,७६,००० |
| ५ सरकारकडून घेतलेलें कर्ज व ठेवी .. | १,५१,०१,००० |
| ६ सभासद व सहकारी संस्था आणि सरकार ह्यांखेरीज इतर मार्गांनी मिळविलेलें भांडवल .. | २१,८४,४२,००० |
| ७ शिल्लक निधि वगैरे ... ... .. | ६,००,५३,००० |
| एकूण | ६७,९३,६१,००० |

## मुंबई इलाख्याचे सविस्तर आंकडे.

( १९२६–२७ )

| संस्थेचा प्रकार. | संस्थाची संख्या | सभासदांची संख्या | चालू भांडवल रुपये | शिल्लक निधी रुपये | बाकी थकलेले रुपये |
|---|---|---|---|---|---|
| मध्यवर्ती पेढी | २१ | १२,२८१ | ३,६४,६८,२३४ | ७,८०,१४२ | ४३,८८,३६८ |
| शेतकी संस्था | ४,२८६ | ३,००,०७७ | ३,६३,५०,३४७ | ३७,४७,००८ | ८२,२३,५९० |
| इतर धंद्यातील लोकांच्या संस्था | ६८४ | १७०,३७२ | २३८,३२,२३१ | १२,१८,९४४ | १३,६२,५२२ |
| यूनिअन्स | ९२ | ... | ... | ... | ... |
| विमा संस्था | ८ | ... | . | ... | ... |
| एकूण | ५,०९१ | ४८२,७३० | १०,२६,५०,८१६ | ६०,८६,०९७ | १,३९,७४,४३० = २२·३ शेकडा. |

**१० शेतगहाणावर कर्ज देणाऱ्या पेढ्याः**—सहकारी चळवळीशी ज्यांचा निकट संबंध आहे व ती एकंदरीने यशस्वी झाली आहे, असें ज्यांस वाटतें त्यांनाही त्या चळवळीपासून शेतकऱ्याचा कर्जबाजारीपणा विशेषसा कमी झाला आहे असें म्हणता यावयाचें नाही. पूर्वीपेक्षां हल्ली शेतकऱ्यास कमी व्याजाच्या दरानें कर्ज मिळतें ह्याचें पुष्कळसें श्रेय सहकारी चळवळीस देणे योग्य आहे. परंतु मिळालेल्या कर्जाच्या साहाय्यानें आपला धंदा किफायतशीर करून स्वतःची सांपत्तिक स्थिति सुधारण्यास व जुनें कर्ज देऊन टाकण्यास शेतकरी समर्थ झाले आहेत असें आढळून येत नाही. सहकारी चळवळीचा शेतकऱ्यांच्या आर्थिक जीवनावर विशेषसा इष्ट परिणाम दिसून न येण्याची अनेक कारणें असून त्यापैकी कित्येकांचा पुढें विचार केलेलाच आहे. परंतु सहकारी संस्थाचा एक विशिष्ट 'दोष' अगर कमीपणा असा असतो की सामान्यतः एकाच सभासदास मोठी रक्कम दीर्घ मुदतीनें देणें त्यास शक्य नसते व म्हणून आपल्या सभासदांच्या मालकीच्या जमीनींच्या तारणावर प्रत्यक्षपणें अगर विकाऊ कर्जरोख्यांनी कर्ज काढणाऱ्या स्वतंत्र परंतु सहकारी तत्त्वावरच चाललेल्या पेढ्या स्थापिल्या तर ही उणीव भरून येईल असें सांगण्यांत येतें. सहकारी चळवळीच्या पुरस्कर्त्यांत सध्यां ह्या प्रकारच्या पेढ्या काढण्याबद्दल बराच उत्साह दिसून येत आहे व पंजाब, बंगाल, मद्रास, ब्रह्मदेश, व अलीकडे मुंबई, ह्या प्रांतात त्यांची स्थापनाही झाली आहे. पेढ्यांस भांडवल कर्जाऊ देऊन किंवा त्याच्या सभासदांच्या जमीनीच्या तारणावर उभारलेल्या

कर्जरोख्यांपैकीं बराचसा भाग विकत घेऊन सरकारही ह्या योजनेस प्रत्यक्षपणें मदत करीत आहे. परंतु ह्या बाबतींत हेंही ध्यानांत ठेवणें जरूर आहे कीं, लहानमोठ्या शेतकऱ्यांचा धंदा किफायतशीर न होण्यास व त्यांजमध्यें कर्जबाजारीपणाचा फैलाव होण्यास भांडवलाची—पुष्कळ, दीर्घकालीन व माफक व्याजाच्या दरानें मिळणाऱ्या भांडवलाची—उणीव हें एकच कारण नाहीं. सामाजिक, आर्थिक व राजकीय स्वरूपाच्या दुसऱ्याही अनेक बाबतींत इष्ट फेरबदल घडून आल्याखेरीज निव्वळ भांडवल मिळण्याच्या सोयी वाढवून कर्जबाजारीपणा कमी होण्याची अपेक्षा करणें बरोबर नाहीं. उलट, सामान्य व शेतगहाणाच्या सहकारी पेढ्यांची संघटना पूर्णपणें कार्यक्षम नसल्यास कर्जबाजारीपणा वाढण्याची मात्र भीति आहे. आपल्याइकडील सामान्य शेतकऱ्याजवळ गहाण लावून देण्यास फारशी जमीन नसते. किंबहुना शेतकऱ्याजवळ जमीनजुमल्यासारखें वस्तुमय तारण पुरेसें नसल्यानें त्यास व्याजाचे भारी दर द्यावे लागत ते द्यावे लागू नयेत म्हणून तर व्यक्तिगत पतीवर त्यांस माफक दरानें कर्ज मिळण्याची सहकारी पेढ्यांमार्फत सोय करण्यांत आली. जमिनीच्या गहाणावर माफक दरानें कर्ज मिळविण्याइतके गबर शेतकरी देशांत फार थोडे आहेत व तेवढ्यासच वरील योजनेचा काय तो फायदा होईल. दीर्घकालीन कर्ज माफक दरानें शेतकऱ्यास देण्याची १८८३ च्या कायद्यानें सरकारनें व्यवस्था केलेलीच आहे व तें कर्ज सहकारी पेढ्यांच्या मार्फत दिलें जाण्याचीही अलीकडे बहिवाट चालू झाली आहे. ह्या पद्धतीतच योग्य त्या सुधारणा केल्यास आपल्या जमिनींत भारी खर्चाच्या उत्पादक सुधारणा घडवून आणूं इच्छिणाऱ्याची गरज भागेल. ह्याशिवाय, ज्या भागांतील शेतकऱ्याची स्थिति जमिनीच्या गहाणाच्या पेढ्या यशस्वी होण्यास योग्य असेल तेथें त्या काढल्या जाणें इष्ट आहे व त्यांस इतर सहकारी संस्थांप्रमाणें सरकारी सहाय्य मिळणेंही आवश्यक आहे. परंतु शेतकीखेरीज इतर धंदे सुधारून जमिनीवरील ताण कमी होइपर्यंत व शेतकरी वर्गांत उपयुक्त शेतकीशिक्षणाचा प्रसार होईपर्यंत निव्वळ भांडवल मिळण्याच्या सोयी वाढवून कर्जबाजारीपणा कमी होईल अशी आशा बाळगणें व्यर्थ होय.

**११ सहकारी चळवळीचें भवितव्य**—सहकारी चळवळ यशस्वी करण्यास सरकार व लोक ह्यांचे आज पाव शतक आटोकाट प्रयत्न चालले असूनही शेतकऱ्यांची सर्वसामान्य आर्थिक परिस्थिति सुधारत नाहीं व त्यांच्या डोक्यावरील कर्जाचा भार उतरत नाहीं, ह्याबद्दल त्या चळवळीस यत्किंचितही दोष देतां येणार नाहीं. उलट, सामान्य शेतकऱ्याचें अज्ञान, गांवांतील अनेक प्रकारचे पक्षभेद, शेतीच्या धंद्याची हलाखीची स्थिति इत्यादि अनेक अडचणींतून मार्ग काढून त्या चळवळीनें कांहीं ठिकाणच्या शेतकऱ्यांची स्थिति पुष्कळ सुधारली व इतरांचें कर्ज

निदान आहे त्यापेक्षां वाढूं दिलें नाही आणि त्यांस माफक दरानें भांडवल पुरवून एकंदरीने व्याजाचा दर उतरविला ही कमी महत्त्वाची आर्थिक कामगिरी नाही. पंजाबासारख्या ज्या प्रांतांत जमीन सुपीक आहे, पाणीपुरवठा विपुल आहे व शेतकरीही जवान बसाहतवाले आहेत तेथें इतर प्रांतांपेक्षां सहकारी चळवळ अधिक यशस्वी झालेली दिसते, ह्यावरून सहकार्याचें तत्त्व पूर्णपणें हितावह होण्यास इतर प्रकारांनीही परिस्थिति अनुकूल असावी लागते हें दिसून येईल. शेतकरी व कारागीर ह्यांची आर्थिक परिस्थिति सुधारण्याच्या हेतूनें सहकार्याच्या चळवळीचा पुरस्कार करणाऱ्यानी ह्या इतर बाबींकडेही लक्ष्य दिलें पाहिजे. मोठमोठ्या उद्योगधंद्यांची व पेढ्यांची वाढ होणें, परदेशी व्यापाराचें धोरण हिंदुस्थानांतील उत्पादकांस परिपोषक राहणें, जमीनमहसुलाचें सरकारी धोरण शेतकऱ्यांस अधिक न्यायाचें होणें, धंदेशिक्षणाची वाढ होणें, देशातील सर्व साधनांचा सहानुभूतीपूर्वक व परिणामकारक रीतीनें राष्ट्रहितसंवर्धनार्थ उपयोग करण्यास तत्पर असणाऱ्या राष्ट्रीय सरकाराची स्थापना होणें, अशा प्रकारच्या सकृद्दर्शनी सहकारी चळवळीशी असंबद्ध वाटणाऱ्या सुधारणा घडून आल्याखेरीज सहकार्याच्या इष्टफलदायी तत्त्वाचा व सहकारी चळवळीत पडणाऱ्या कामकऱ्याच्या श्रमाचा पूर्णपणें उपयोग होणार नाही.

हिंदुस्थानांतील जुनी स्वायत्त व सामुदायिक समाजरचना विचारांत घेऊन 'जगांतील एका कोणत्या तरी देशांत सहकारी चळवळ यशस्वी व्हावयाची असेल तर तो देश हिंदुस्थान होय,' असें कित्येक प्रसिद्ध सहकारवादी म्हणतात. परंतु सामान्य हिंदी नागरिकाच्या मनांत सदैव जागृत असलेली व्यक्तिप्रधान किंवा एककल्लीपणाची भावना ते ध्यानांत घेत नाहीत. हिंदी स्वभावांतील हा विशेष दृष्टीआड केल्यानें सहकारी चळवळीस पुष्कळसें यांत्रिक अगर निर्जीव स्वरूप प्राप्त झालें आहे. ह्या स्वभावविशेषांत विस्तृत शिक्षणानें इष्ट फरक होण्यासारखा आहे ह्यांत शंका नाही. परंतु तसा फरक घडून आला नाही तोपर्यंत सामान्य हिंदुवासीयास सहकार्याचें तत्त्व आपोआप पटेल व सहकारी संस्थांपासून त्याचा हटकून फायदा होईल अशी कल्पना करून चालणें चुकीचें आहे. विशेषतः सहकार्याचे नैतिक व सामाजिक फायदे हिंदी लोकांत कितपत पसरले आहेत हें ठरविण्यापूर्वी त्यास सहकार्याच्या तत्त्वाचें व व्यवहाराचें खरें शिक्षण कितपत मिळालें आहे ह्याची चौकशी केली पाहिजे. अनेक सहकारी संस्थांत सहकाऱ्यांस अयोग्य असेंच नव्हे तर लचाडीचे व्यवहारही आढळून येतात हें विसरतां कामा नये. सहकारी पेढी म्हणजे सरकारच्या एका खात्यामार्फत कमी व्याजाच्या दरानें कर्ज मिळण्याची सोय, असें मानणाऱ्या सभासदांचा भरणा सध्याहून पुष्कळ कमी झाल्याखेरीज सहकार्याच्या नैतिक अगर सामाजिक फायद्यांचा येथें म्हणण्यासारखा प्रसार झाला

आहे, असें म्हणणें कठीण जाईल. स्वावलंबन, सचोटी, बंधुभाव, स्वातंत्र्यप्रियता इत्यादि सहकारी गुणांचा इष्ट मर्यादेपर्यंत येथील सहकारी संस्थांत प्रसार झालेला आहे, असें कोण म्हणेल ?

सरकारी अधिकारी व आपल्या देशबांधवांची निरिच्छपणें सेवा करूं इच्छिणारे पुढारी ह्यांच्या संघटित प्रयत्नांनी वरीलपैकी अनेक औद्योगिक, शैक्षणिक व राजकीय सुधारणा घडून येऊन कालांतरानें सहकारी चळवळ हिंदुस्थानाच्या सामाजिक संघटनेचा एक महत्त्वाचा भाग होऊन बसणें अशक्य नाही. परंतु तसें होण्यास चळवळीची प्रगति अनेक बाबतींत सध्याहून कांहीशा निराळ्या प्रकारानें व्हावयास पाहिजे. आपापल्या कार्यक्षेत्रांतील सहकारी संस्था, सभासद व भांडवल ह्यांच्या आंकड्यांत वाढ दाखविणें हेच एक आपल्या कार्यक्षमतेचें लक्षण आहे ही भावना नष्ट होऊन, सहकारी संस्था सध्यापेक्षां अधिक दोषहीन करण्यानेंच आपण ह्या चळवळीची खरी प्रगति घडवून आणूं ह्या कल्पनेचा अधिक प्रसार व्हावयास पाहिजे. किंबहुना, हिंदुस्थानांतील सहकारी चळवळीच्या इतिहासांत सध्यांचा काल वास्तविकपणें मुख्यतः दोषनिरसनाचा व आवश्यक आणि इष्ट तेथेंच संख्यावाढ करण्याचा आहे, असें म्हटलें पाहिजे. सहकारी संस्थास मदत तर करावयाची परंतु त्यांच्या कारभारात ढवळाढवळ करावयाची नाही, किंवा स्वतःच विशेष पुढाकार घेऊन वाढ अगर सुधारणा घडवून आणावयाच्या नाहीत, असें सरकारी धोरण ठेवणें कठीण आहे, हे खरें, तरी तें तसें ठेवण्याची दक्षता बाळगिल्याखेरीज खऱ्या सहकार्याचा लोकांत प्रसार होणें अशक्यप्राय आहे. सरकारनें आपलें शक्तिसर्वस्व खर्च करून ह्या बाबतींत कोणती कामगिरी करणें इष्ट व आवश्यक असेल तर ती सहकार्याच्या तत्त्वाच्या व व्यावहारिक प्रकारच्या शिक्षणाचा प्रसार करणें ही होय. ह्या दृष्टीनें सरकारी व खाजगी संस्थांचे सध्या कांही प्रयत्न चालू आहेत, ते वाढत्या प्रमाणावर होणें जरूर आहे. सहकारी चळवळीचा प्रसार हळुहळू झालेला पुरवला, परंतु त्या चळवळीच्या नावाखाली आंतबट्ट्याचे, लबाडीचे अगर निव्वळ नफेबाजीचे व्यवहार होतां कामा नयेत, असेंच धोरण सरकार व लोक ह्यांनी ठेवलें पाहिजे.

# प्रकरण चौदावें

## राष्ट्रीय उत्पन्नांतील वांटेकरी

**१ हिंदुस्थानाचें राष्ट्रीय उत्पन्न**—विवक्षित समाजातील लोक आपल्या भांडवलाच्या सहाय्यानें नैसर्गिक साधनापासून स्वसुखसंवर्धनार्थ जेवढे उपयुक्त जिन्नस तयार करतात तेवढें त्या समाजाचें उत्पन्न होय, असें मागें प्रास्ताविक भागांत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें एकंदर राष्ट्रीय उत्पन्नातून व्याज, खड, मजूरी व नफा ह्या स्वरूपात निरनिराळ्या वर्गास त्याची कमाई कशी मिळते ह्याबद्दलही तेथेंच उलगडा केलेला आहे. राष्ट्रीय उत्पन्नातून प्रत्येक प्रकारच्या कामकऱ्यांस आपापला न्याय्य हिस्सा पूर्णांशानें मिळण्यास कशा तऱ्हेची परिस्थिति अवश्यक असते व प्रतिकूल आर्थिक परिस्थिति स्वतःस अनुकूल करून घेण्यास निरनिराळे वर्ग, विशेषतः मजूर वर्गांतील लोक, कोणते उपाय योजतात ह्याबद्दलचें प्रास्ताविक भागांतील विवेचनही हिंदुस्थानाच्या एकंदर उत्पन्नाची विभागणी समजून येण्यास उपयुक्त होईल. उत्पादनाचे निरनिराळे घटक भिन्न वर्गाच्या ताब्यात असण्याची व त्याच्या सहकार्यानें संपत्तीचें उत्पादन करण्याची पद्धत हिंदुस्थानांत अजून पूर्णावस्थेस गेलेली नाही; तरीही येथें श्रमविभागाचा दिवसानुदिवस वाढत्या प्रमाणावर प्रसार होत आहे. मोठ्या प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन करून नफ्याच्या स्वरूपानें कमाई करणारे कारखानदार, मळेवाले, खाणीचे चालक ह्यांसारखे भांडवलवाले, कमी अधिक प्रमाणावर व भिन्न मार्गांनी पैसे कर्जाऊ देऊन व्याज मिळविणारे सावकार व पेढीवाले, उत्पादनाकरिता व विनिमयाकरिता आवश्यक असणारे सर्व प्रकारचे व सर्व दर्जाचे श्रम पुरविणारे कामकरी व खंडाच्या उत्पन्नावर चरितार्थ चालविणारे जमिनीचे मालक ह्याप्रमाणें संपत्तीच्या उत्पादनास भिन्नपणें मदत करून तिच्यांतून भिन्न स्वरूपानें आपला हिस्सा घेणारे स्वतंत्र वर्ग हिंदुस्थानात दृष्टिगोचर होऊं लागले आहेत हे खरें आहे. अशा वर्गांतील लोकांचें जें उत्पन्न असतें तें संपत्तीच्या विभागणीविषयीं प्रास्तविक भागांत जी सर्वसामान्य तत्त्वें सांगितली आहेत त्यांस अनुसरूनच मिळणें सहाजिक आहे.

परंतु संपत्तीच्या विभागणीसंबंधी येथील परिस्थिति ध्यानांत घेत असतां दोन महत्त्वाच्या बाबी दृष्टीआड होऊं देतां कामा नये. हिंदुस्थान देश मुख्यतः शेतकरी

---

१ पानें ९०–१२६ पहा.

पेशाचा आहे व येथील बहुतेक जमीनधाऱ्याच्या पद्धति अशा आहेत कीं, त्यांजमध्यें प्रत्यक्ष शेतकरी हा निव्वळ मजूर न राहतां जमिनीच्या उत्पन्नांतून त्यास आपल्या भांडवलाचा व धंदा चालविण्याच्या चातुर्याचा मोबदलाही मिळवितां येतो. मुंबई, मद्रास, वऱ्हाड वगैरे प्रांतांतील शेतकरी तर बहुशः आपल्या जमिनीचे मालकच आहेत. परंतु बंगाल, संयुक्तप्रांत व मध्यप्रांत ह्यांसारख्या मुख्यत्वेंकरून जमीनदारी वळणाच्या धारापद्धतीच्या प्रांतांतही प्रत्यक्ष लागवडीचें काम कायद्यानें विशिष्ट हक्क दिलेल्या व 'मालकी'चे बहुतेक सर्व फायदे उपभोगणाऱ्या हक्कदार कुळांकडून केलें जातें. ह्यामुळें सामान्य शेतकरी हा कमीअधिक प्रमाणांत स्वतःच्या धंद्यापुरता जमीनीचा मालक, भांडवलवाला, मजूर व चालक असतो ही विशेष महत्त्वाची गोष्ट समजली पाहिजे. संपत्तीच्या विषम विभागणीसंबंधानें अगर शेतकरीवर्गाच्या उत्पन्नासंबंधानें विवेचन करीत असतां ही गोष्ट लक्षांत न बाळगल्यास तें विवेचन भ्रामक ठरल्याशिवाय राहणार नाहीं. तसेंच स्वतःच्या अंगमेहनतीखेरीज इतर सर्व उत्पादक साधनांस पारखा झालेला व भांडवलवाल्या मोठमोठ्या कारखानदाराच्या हुकमतीखालीं गेलेला औद्योगिक मजुराचा वर्ग हिंदुस्थानात फारच अल्प आहे ह्याही गोष्टीकडे डोळेझांक करून चालावयाचें नाहीं. इंग्लड अगर अमेरिका ह्या राष्ट्रांतील बहुसंख्याक नागरिकाचें स्थूल वर्णन करावयाचें झाल्यास कारखान्यात काम करून दर आठवड्यास मजूरी मिळविणारे व मोठमोठ्या शहरांत भाड्याच्या जागेंत राहून व बाजारातून सर्व जिन्नस विकत आणून आपला उदरनिर्वाह करणारे मजूर असेंच केलें पाहिजे. परंतु खेडेगावांतील सामान्य हिंदी मनुष्य म्हणजे अंशतः अगर पूर्णपणें स्वतःच्या 'मालकी'च्या असलेल्या जमीनीची कांहीं स्वतःच्या व कांहीं कर्जाऊ घेतलेल्या भांडवलाच्या सहाय्यानें व आपल्या कुटुंबांतील माणसाच्या आणि जरूर तेव्हां मोलानें लावलेल्या मजुराच्या सहाय्यानें लागवड करणारा व खेडेगावांत स्वतःच्या झोंपडींत राहून अंशतः स्वतःच्या जमीनींत उत्पन्न झालेल्या धान्यावर गुजारा करणारा शेतकरी होय असेंच म्हणणें यथार्थ होय. इंग्लंड व अमेरिका ह्यासारख्या राष्ट्रांतही उत्पादनाचे एकाहून अधिक घटक कधी कधी एकाच मनुष्याच्या हातात असतात व उलट, हिंदुस्थानात उत्पादनाच्या एकाच घटकावर स्वतःच्या उदरनिर्वाहाकरिता अवलंबून असलेल्या लोकांची संख्या वाढत आहे. परंतु मुख्यत्वेंकरून हिंदुस्थानात अजूनही पूर्णपणें अगर अंशतः स्वायत्त असणाऱ्या शेतकऱ्याचाच पुष्कळ भरणा आहे असें म्हटलें पाहिजे. उद्योगधंदे व व्यापार ह्या क्षेत्रांतही स्वायत्त व लहान लहान धंदेवाले अजून पुष्कळ आढळतात व मोलानें मिळणाऱ्या कामकऱ्यांचा ते अल्प प्रमाणावर उपयोग करून घेतात. ह्याखेरीज इतर महत्त्वाचे वर्गही हिंदी समाजांत अस्तित्वांत आहेत व ह्या सर्वांच्या कमाईचा राष्ट्राच्या एकंदर उत्पन्नाच्या मानानें विचार होणें आवश्यक आहे. विशेषतः सर्व प्रकारच्या कामकऱ्यांचें वेतन परंपरागत, रूढीनें ठरविण्याची जुनी पद्धत

अर्वाचीन स्पर्धात्मक काळांत नाहीशी होत असल्यानें राष्ट्रीय संपत्तीच्या विभागणीचें तात्त्विक व सामाजिक दृष्ट्या विवेचन होणें इष्ट आहे.

हिंदुस्थानच्या एकंदर राष्ट्रीय उत्पन्नांतून निरनिराळ्या वर्गास त्यांचा हिस्सा कोणत्या तऱ्हेनें मिळत आहे, ह्या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाच्या परिमाणाबद्दल स्थूल कल्पना असणें आवश्यक आहे. मागें 'लोकसंख्या आणि संपत्ति' ह्या प्रकरणांत हिंदुस्थानांतील शेतीच्या व इतर धंद्यांच्या एकंदर उत्पन्नासंबंधीच्या कांही अंदाजिक आंकड्यांचा विचार केलेला आहे, त्यावरून आपल्या देशात लोकसंख्येच्या मानानें संपत्तीचें उत्पादन किती कमी आहे, हें दिसून येण्यासारखें आहे. इतर पाश्चात्य व पौरस्त्य राष्ट्रांच्या मानानें हिंदुस्थानांतील सरासरी उत्पन्नाचें मान विशेषच असमाधानकारक आहे हें पुढील आंकड्यांवरून दिसून येईल.

( १९१४ सालचे आंकडे उदाहरणात्मक म्हणून दिले असून कांही अलीकडील आकडेही दिले आहेत. )

| देशाचें नाव | एकंदर उत्पन्न लक्ष पौंड | दर माणशी उत्पन्न पौंड | |
|---|---|---|---|
| | १९१४ | १९१४ | अलीकडील आकडे |
| अमेरिका | ७,२५,०० | ७२ | १२५ |
| इंग्लंड | २,२५,०० | ५० | ७७ |
| जर्मनी | २,१५,०० | ३० | — |
| फ्रान्स | १,५०,०० | ३८ | ३८ |
| ऑस्ट्रिया हंगरी | १,१०,०० | २१ | — |
| इटली | ८०,०० | २३ | २१ |
| जपान | ३२,५० | ६ | — |
| कॅनडा | ३०,०० | ४० | — |
| ऑस्ट्रेलिया | २५,८० | ५४ | — |
| स्पेन | २३,०० | ११ | — |
| **हिंदुस्थान** | **७५,०७** | **३** | **५** |

हिंदुस्थानात जी नैसर्गिक साधनें उपलब्ध आहेत त्यांचा येथील लोक स्वसुखवर्धनार्थ पुरेसा उपयोग करीत नाहीत किंवा त्यांच्या श्रमाची उत्पादकता फारच कमी आहे असें वरील आंकड्यांवरून स्पष्ट दिसतें. कोणकोणत्या प्रकारच्या सुधारणा

घडून आल्या असतां राष्ट्राच्या एकंदर उत्पन्नांत भर पडेल त्याबद्दल मागें अनेक प्रकरणांत विवेचन केलेलेंच आहे. परतु आहे त्या उत्पन्नापैकीही अनेक रकमा वजा घातल्याशिवाय हिंदी लोकांत प्रत्यक्षपणें किती उत्पन्नाची विभागणी होते हें कळणार नाही. मागें 'परराष्ट्रीय हुंडणावळ' ह्या प्रकरणांत स्टेट सेक्रेटरीचा खर्च, परदेशी नोकरांची व व्यापाऱ्याची कमाई, इत्यादि ज्या अदृश्य बाबींचा उल्लेख केला आहे त्यांजबद्दलची रक्कम परदेशीयांस मिळावयाची असल्यानें हिंदुस्थानाच्या एकंदर उत्पन्नांतून ती वजा करूनच हिंदी लोकांत विभागल्या जाणाऱ्या संपत्तीचें परिमाण ठरविलें पाहिजे. हिंदुस्थानाचें एकंदर उत्पन्न प्रतिवर्षी २१०० कोटी रुपये असतें, व दर माणशी उत्पन्नाची सरासरी ८४ रुपये असते असें १९२१ सालच्या उत्पन्नाच्या व किंमतीच्या आकड्यांवरून स्थूल मानानें म्हणता येईल. जमीनीचे मालक, खंडकरी, मजूर व सावकार आणि धंदेवाले ह्याजमध्यें ह्या उत्पन्नाची विभागणी कोणत्या प्रकारानें होत आहे ह्याबद्दल क्रमशः माहिती करून घेणें आवश्यक आहे.

**२ जमीनीचा खंड**—प्रास्ताविक भागांत 'खंड' म्हणजे काय व व्याज, मजूरी व नफा ह्या स्वरूपाच्या इतर उत्पन्नांहून तो तत्त्वतः कितपत भिन्न असतो ह्याविषयी विवेचन केलें आहे. जमीनीच्या मालकाच्या सामान्य उत्पन्नांतून खंडाखेरीज इतर अनेक स्वरूपांनी मिळणारी रक्कम वजा करूनच खंडाची रक्कम ठरवावी लागते व हा 'निव्वळ' खंड म्हणजे मालकांस स्वतःच्या प्रत्यक्ष श्रमाशिवाय मिळणारें उत्पन्न होय हेंही तेथेंच सांगितलें आहे. तात्त्विक दृष्ट्या खंडास अनार्जित उत्पन्नाच्या वर्गांत लोटणें आवश्यक असलें तरी राष्ट्रीय संपत्तीच्या विभागणीविषयी विचार कर्तव्य असता तिच्यातील खंडाच्या स्वरूपाचा भाग कोणाच्या हातांत जातो हें ठरविणें अगत्याचें आहे. जमीनीचा मालक कोण, सरकार, जमीनदार की शेत कसणारा शेतकरी ? ह्या प्रश्नास मूलभूत महत्त्व प्राप्त होते ते ह्याचमुळें होय; कारण ज्याच्या मालकीची जमीन ठरेल त्यासच जमीनीच्या खंडाचें उत्पन्न मिळणें न्याय्य होईल. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जमीनधाऱ्याच्या पद्धतींचें पुढे वर्णन केलेलें आहे त्यावरून जमीनीच्या मालकी हक्कासंबंधानें येथील परिस्थिती किती गुंतागुंतीची आहे हें दिसून येईल. ह्याच अनिश्चिततेमुळें सरकारासही जमीनीची मालकी आपणाकडेच आहे असें म्हणण्यास सवड मिळाली आहे. शेतजमीनीच्या मालकी हक्काबाबत सरकार, जमीनदार व शेतकरी ह्याजमध्यें जो लढा आहे तो मुख्यत्वेकरून हिंदुस्थानच्या इतिहासांतील कांही विशिष्ट परिवर्तनावरूनच उद्भूत झालेला आहे. सर्व देशांत पूर्वकाली अनेक परकीयांच्या व वसाहतवाल्यांच्या स्वाऱ्या झालेल्या आहेत. परकीय जेते अगर वसाहतवाले संख्येनें व बलानें जितदेशीयांस भारी असले तर सामान्यतः त्यांची सर्व जमीन

१ मागें पान ९५ पहा.

लुबाडून प्रत्यक्षपणे आपल्या मालकीची करण्यास ते चुकत नसत. हिंदुस्थानांतील आर्यांच्या अगर इंग्लंड व इतर काही देशांतील रोमन लोकांच्या स्वाऱ्यांचा इतिहास ह्या बाबतीत उद्बोधक आहे. परकीय जेत्यांची संख्या व त्यांची सत्ता एवढी प्रबल नसेल तर जित लोकांवर व त्यांच्या मालमत्तेवर सामान्य हुकमत चालवून व त्यांजकडून कराच्या अगर खंडणीच्या रूपानें त्यांच्या उत्पन्नांतील शक्य तेवढा भाग घेऊनच सत्ताधाऱ्यांस समाधान मानावे लागे. मोगल बादशहांच्या कारकीर्दीतील येथील जमीनधाऱ्यांची पद्धत पाहिली व तिची रोमन अगर आर्य वसाहतींतील परिस्थितीशीं तुलना केली तर ऐतिहासिक प्रगतीच्या ह्या दोन्ही विशेषांचें प्रत्यंतर दिसून येईल. राजकीय जेते व वसाहतवाले ह्या दोन्ही नात्यानें परकीयांच्या अनेक स्वाऱ्या हिंदुस्थानावर झालेल्या आहेत व त्यामुळें येथील जमीनीच्या 'मालकी' बद्दल अशाश्वती व गोंधळ ही वाढलेली आहेत. इंग्रजांचें हिंदुस्थानावरील आक्रमण वरील ऐतिहासिक ओघास धरूनच होतें हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

परकीयांच्या एका मागून एक होणाऱ्या स्वाऱ्यांमुळें उत्पन्न झालेल्या शेतजमीनीच्या मालकीहक्कामधील गोंधळांत अंतर्गत राजसत्तेच्या वारंवार होणाऱ्या उलथापालथी-पासून भरच पडली. विशेषतः अठराव्या शतकाच्या शेवटीं मध्यवर्ती मोगल सत्ता कमकुवत होऊन दिल्लीच्या बादशहाचे प्रांतिक अधिकारी, सारावसुलीचे मक्तेदार व जहागीरदार आणि इनामदार मिळालेल्या संधीप्रमाणें आपल्या ताब्यांतील मुलखावर मालकी सांगण्यास प्रवृत्त झाले. अनेक शतकें युद्धें व राजक्रान्त्या ह्यांचें माहेरघर बनलेल्या हिंदुस्थानांत वरील प्रकारांनीं जमीनीच्या मालकीचे मूळ हक्क पुसट होत गेले व पूर्वकाळीं जमीनीचा मालक असणारा प्रत्यक्ष शेतकरी त्याच्याहून उच्च दर्जाच्या अनेक हक्कदारांच्या भाराखालीं दडपला जाऊं लागला. अगदीं अलीकडील जेते, म्हणजे इंग्रज सरकार, राज्यारूढ झाल्यावर त्यास सर्व शेतजमीनीच्या मालकीचा वारसा पूर्वीच्या राजांकडून आपणाकडे आला आहे असें म्हणण्यास वरील परिस्थितीमुळें जागा सांपडली असल्यास नवल नाहीं. कांहीशा समर्थनीय स्वरूपाच्या ह्या अज्ञानालाच सर्व एकतंत्री व परकी राजसत्तांत अंगभूत असलेल्या द्रव्यलालसेची जोड मिळाल्यानें येथील शेतजमीनीवर सरकारची मालकी आहे ह्या सिद्धान्ताच्या यथार्थतेबद्दल इंग्रज अमदानींतील अव्वल अधिकाऱ्यांच्या मनांत शंका येण्याचें कारणही उरलें नाहीं. अजूनही बहुतेक सरकारी अधिकारी प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें ह्याच विचारसरणीस अनुसरून आपलें जमीनमहसूलासंबंधाचें धोरण ठरवीत असतात. जमीनीवरील सरकारी माल-

---

१ मुंबई इलाख्याचे सेटलमेंट कमिशनर मि. अँडरसन व कार्यकारी मंडळी सर लुई म्यु ह्यांचे लेख व भाषणें.

कीच्या ह्या ऐतिहासिक पुराव्यांत 'शेत जमीन सरकारच्या म्हणजे समाजसत्तेच्या मालकीची असणें इष्ट आहे' ह्या तात्त्विक सिद्धान्ताची भर पडली म्हणजे कित्येक अधिकाऱ्यांस व ग्रंथकारांस 'हिंदुस्थानांतील शेतजमीन सरकारच्या मालकीची आहे' हे विधान निःपक्षपातबुद्धीनें अगर सामाजिक हितसंवर्धनाच्या दृष्टीनें पडताळून पाहणें म्हणजे व्यर्थ कालक्षेप करण्यासारखें आहे असें वाटतें.

शेतजमीनीची मालकी सरकारकडे आहे की खाजगी नागरिकांकडे आहे ह्या प्रश्नाचें महत्त्व केवळ शाब्दिक अगर तात्त्विक स्वरूपाचें नसून सरकारनें शेतकऱ्याकडून किती साग घेणें इष्ट व न्याय्य आहे ह्या व्यावहारिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नाशी त्याचा जिव्हाळ्याचा संबंध येतो. सरकार जमीनीचें मालक आहे असें ठरलें म्हणजे ज्याप्रमाणें खाजगी मालक जमीनीचा पुरवठा व तिला असलेली मागणी ह्यांच्या परस्पर संबधांस अनुसरून ठरेल तेवढा खंड कुळाकडून चोपून घेतो त्याप्रमाणें सरकारासही शेतकऱ्याकडून कराच्या रूपानें शक्य तेवढी भारी रक्कम वसूल करण्यास कायद्यानें मोकळीक राहते. 'सरकार जमीनीचें मालक असलें काय किंवा शेतकरी जमीनीचा मालक असला काय दोन्हीही सारखीच. जमीनीचा मालक ह्या नात्यानें तरी शेतकऱ्यांस म्हणजे आपल्या स्वतःच्या कुळास सुस्थितीत ठेवण्याची, त्याजकडून वाजवीपेक्षा अधिक खंड न घेण्याची, जबाबदारी सरकारवर येऊन पडतेच की नाही!' असला कोटिक्रम अत्यंत भ्रममूलक होय. वाजवी खंड किती व गैरवाजवी किती ह्याबद्दल निश्चित स्वरूपाचे नियम ठरलेले आहेत असें नाही. शेतजमीनीचा मर्यादित पुरवठा व जवळ जवळ ४/५ लोकसंख्येचें उदरनिर्वाहाचें आवश्यक साधन म्हणून तीस असलेली बेसुमार मागणी ह्यांच्या परस्पर प्रमाणावरून जेवढा खंड ठरेल तेवढा मालक घेणारच. मग तो मालक सरकार हें असो अगर एखादी खाजगी व्यक्ति असो. त्यांतल्या त्यांत आपली घेणी बळजबरीनें वसूल करण्याची सत्ता सरकारच्या हातांत असल्यानें आपला खंड वसूल करतांना स्वार्थी मक्तेदार व सर्वसत्ताधीश राज्यकर्ते ह्या दुहेरी नात्यानें वागण्याची सरकारची प्रवृत्ति होणें अपरिहार्य आहे. खंडास मालकाच्या चांगुलपणाचीच काय ती बेभरंवशाची मर्यादा असणार; परंतु करांस अर्थशास्त्राचे सर्वमान्य व कडक नियम लागू पडतात व ते नागरिकत्वाचे हक्क, समता आणि न्याय ह्यांचा पुरस्कार करणारे असतात हे येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. शेतजमीनीचा सर्व खंड घेण्याचा हिंदुस्थानसरकारास हक्क आहे असें इंग्लिश अधिकारी व ग्रंथकार पहिल्या प्रथम उघडपणेंच प्रतिपादीत असत. लॉर्ड कॉर्नवालीस ह्यांच्या कारकीर्दीत बंगाल्यांतील जमीनदारांची सरकारनें शेतजमीनीवरील मालकी मान्य करून सरकारनें जमीनीच्या खंडांतील वाढत्या भागांवरील आपला हक्कही मुद्दाम स्वतंत्र कायदा करून त्यांस दिला. न्याय्य हक्कदार बाजूस सारून केवळ सरकारच्या शब्दानें जमीनदार मालक बनूं शकले, ह्यावरून सरकारनें स्वतःचा मालकी हक्क शाबीत केल्यास

सरकारच्या उत्पन्नांत आपोआपच भर पडण्यास मदत होईल अशी कल्पना उद्भूत होऊं लागली. जेम्स मिल ह्या प्रसिद्ध इतिहासकारानें १८३१ मध्यें सरकार शेतजमीनीचे मालक आहे व हिंदुस्थानसरकारचे पहिले फडणीस जेम्स विलसन ह्यांनीं १८६० मध्यें सरकार घेणें खंडाच्या स्वरूपाचें आहे, ह्याच मताचा उघडपणें पुरस्कार केलेला आहे. विद्वान इंग्रज ग्रंथकार व वरिष्ठ अधिकारी ह्यांच्या पुढील पिढींत येथील शेतजमीनीच्या मालकीहक्कासंबंधी ऐतिहासिक दृष्ट्या अधिक खोल विचार केला गेला. ब्रिग्जसारखे चौकस ग्रंथकार व लॉर्ड लिटनसारखे व्हाइसरॉय ह्यांनी 'शेतजमीन सरकारच्या मालकीची असून सरकारसारा हा खंडाच्या स्वरूपाचें देणें आहे' ह्या मतास ऐतिहासिक पुरावा मुळीच नसल्याचें कबूल केलें आहे. तरी आजमितीसही जमिनमहसुलासंबंधीचे कायदे व सारावाढ आणि सारावसुली करणाऱ्या अधिकाऱ्यांचें धोरण ह्यांमधून शेतजमीनीच्या सरकारी मालकीच्या कल्पनेचें उच्चाटण पूर्णपणें झालेलें आहे असें म्हणतां येणार नाही.

इंग्रजी अंमलापूर्वी हिंदुस्थानांत जी मुसलमानी व हिंदु राज्यें पद्धतशीरपणें चाललेली होती त्याजमध्यें जमीनीची मालकी सर्वस्वी खाजगी नागरिकांच्या हातांत असल्याचा पुष्कळच सबळ पुरावा इतिहासावरून मिळण्यासारखा आहे. जमीनीवरील साऱ्याचें जमीनीच्या एकंदर ऐनजिनसी उत्पन्नाशी प्रमाण बसवून त्याचे मामुली व कमाल दर ठरविलेले असत. शांततेच्या काळांत कमाल दर कधीच वसूल केले जात नसत. शेतकऱ्यास युद्धासारख्या संकट कालाखेरीज इतर वेळीं आपल्या उत्पन्नाचा पुष्कळसा भाग उपभोगण्यास मिळे. शेतीची उत्पादकता व सरकारची सांपत्तिक परिस्थिति ह्या दोहोंतही इष्ट स्वरूपाचा लवचिकपणा असे व सामान्यतः जमीनींतील सर्व प्रकारच्या उत्पन्नांचा बराचसा भाग शेतकऱ्यांच्या हातांतच राही. ऐतिहासिक काळांतील अगर अलीकडील कांहीं जुलमी व लोभी राजांचें उदाहरण सोडून दिलें व सुव्यवस्थितपणें चाललेलें कोणतेंही हिंदी राज्य घेतलें तर त्यांत जमीनीची मालकी इतर वस्तूंच्या मालकीप्रमाणेंच खाजगी लोकांच्या हातीं असे, व आपल्या उत्पन्नाच्या व सांपत्तिक गरजांच्या मानानें सरकार त्याजकडून कमी-अधिक कर वसूल करी असें स्पष्ट दिसतें. त्या वेळच्या आर्थिक संघटनेंत शेतकीचा धंदा हाच प्रमुख असून सरकारचें उत्पन्नही त्या धंद्यावरील करावरच मुख्यत्वेंकरून अवलंबून असल्यानें जमीनमहसुलाबद्दल व शेतकऱ्यांच्या आर्थिक स्थितीबद्दल सर्व न्यायी राजे आस्था बाळगीत ह्यांत आश्चर्य नाही.

सरकारच्या जमीनीवरील हक्कासंबंधींच्या वादांत जुन्या धार्मिक व समाजशास्त्रीय संस्कृत ग्रंथांतील आधारही कित्येक वेळां पुढें केले जातात. परंतु हे सर्व आधार ससंदर्भ तपासून पाहिले तर त्यांजपासून जमीनीची मालकी

सामान्यतः खाजगी नागरिकांच्याकडे असे ह्या निकालासच पुष्टी मिळते. उदाहरणार्थ, चाणक्याच्या अर्थशास्त्रांत प्रत्यक्षपणें राजाच्या खाजगी मालकीच्या असलेल्या जमीनीसंबंधाने व विवक्षित भागांत सरकारनें मुद्दाम प्रत्यक्ष मदत करून वसाहती करविलेल्या असत तेथील शेतकऱ्यांच्या स्थितीसंबंधानें जे उल्लेख आहेत त्यांजवरून हिंदू राजाच्या सर्वसामान्य हक्कासंबंधीं निष्कर्ष काढण्याचा कांहीं विद्वान ग्रंथकारांनीहीं प्रयत्न केला आहे. परंतु त्या त्या वचनांचा वरील संदर्भानें अर्थ केल्यास सरकारची मालकी राजांच्या खाजगी मालमत्तेपुरती व प्रत्यक्षपणें मदत करून मुद्दाम वसविलेल्या खेड्यांतील जमीनीपुरती मर्यादित होती, आणि इतर सर्व जमीनी खाजगी मालकीच्या होत्या असेंच सिद्ध होतें. अनेक स्मृतिग्रंथांतील ह्या विषयावरील उल्लेखही शेतजमीनीची खाजगी मालकी निःसंशय सिद्ध करणारेच आहेत.

अठराव्या शतकाच्या शेवटच्या पांचपंचवीस वर्षात बंगालमध्ये ज्या इंग्रज अधिकाऱ्यांवर जमीनमहसुलाची नागरिकावरील जबाबदारी ठरविण्याची व ती त्याजकडून वसूल करण्याची पाळी आली त्यास जमीनीच्या उत्पन्नात अनेक प्रकारचे हक्क सांगणारे एवढे वर्ग दिसले की, जमीनदारासारखा शेतसाऱ्याची सर्व जबाबदारी स्वतःवर घेणारा स्वतंत्र 'मालक' वर्ग निर्माण करण्याखेरीज त्यांस दुसरा मार्गच सुचला नाही; परंतु बंगाल व इतर प्रांत ह्यांच्यातील शेतजमीनीच्या हक्कासंबंधीची खरी परिस्थिति हळूहळू स्पष्ट होऊं लागल्यानें स्टेट सेक्रेटरी, व्हाइसरॉय व बेडन पॉवेल सारखे तज्ज्ञ ग्रंथकार ह्यांची शेतजमीनीवर सरकारचा मालकी हक्क नाही ह्याबद्दल खात्री पटत चालली. परंतु सरकारच्या सांपत्तिक गरजा नेहमीच बेसुमार असल्यानें ज्या हक्काच्या जोरावर शेतकऱ्यांकडून आपणास अधिक वसूल घेता येईल त्या हक्कास सरकारी अधिकारी मनात चिकटून बसले असल्यास नवल नाही. त्यातही, आधुनिक कालातील खंडासंबंधीची समाजसत्ताप्रेरित मतें अवलंबिल्याचें श्रेय मिळवून आपल्या पुरातन कालापासून चालत आलेल्या अन्यायाच्या धोरणाचें वरकांती खरें दिसणारें समर्थन करणें सरकारी अधिकाऱ्यांस[3] शक्य झाले असून पूर्वी सरकार बेजबाबदार होतें म्हणून व हल्ली ते फार प्रगमनशील होत आहे म्हणून बहुसंख्याक व गरीब शेतकरी वर्गावर सारखाच अन्याय चालू राहणार अशी भीति वाटण्यास जागा आहे.

**३ जमीनधाऱ्याच्या पद्धति**—लॉर्ड कॉर्नवॉलीस ह्यांच्या कारकीर्दीत बंगाल इलाख्यांत जुन्या मुलकी अधिकाऱ्याच्या अगर लहान लहान संस्थानिकाच्या वंशजास सरकारनें शेतजमीनीचा 'खंड' वसूल करण्याचे आपले सर्व हक्क बहाल करून त्यामोबदला

१ व्हिन्सेंट स्मिथः ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया.

२ बृहस्पति १९·१८,२२,२३.

३ अँडरसन कृत 'फॅक्टस् अँन्ड फॅलसीज अबाउट दि बॉंबे लॅन्ड रेव्हेन्यू सिस्टिम्'

त्यांजकडून त्या वेळचें सरकार येणें अविच्छिन्नपणें मिळण्याची हमी घेतली. ह्याप्रमाणें सर्व शेतजमीनीची मालकी कांहीं थोड्या जमीनदारांस कायद्याच्या माहात्म्यानें प्राप्त होऊन त्यास सरकारास द्याव्या लागणाऱ्या साऱ्याची रक्कमही कायमची ठरविली गेली. ह्या पद्धतीस जमीनदारी, अगर कायम साऱ्याची पद्धत असें सामान्यतः म्हणतात. बंगालमध्यें सर्वच जमीनदाऱ्या कायम साऱ्याच्या पद्धतीनें चाललेल्या आहेत हें खरें; तरी इतर कांहीं प्रांतांत जमीनदारी पद्धत अस्तित्वांत असून, म्हणजे कांहीं थोड्या खाजगी व्यक्तींस पुष्कळशा शेतजमीनिवरील मालकीहक्क सरकारनें कायद्यानें दिला असून व त्या जमीनीवरील सर्व शेतसारा ह्या कायदेशीर जमीनदारांमार्फत सरकारास मिळत असून सारा मात्र कायम ठरविलेला नसतो. कायम व हंगामी दोन्ही प्रकारच्या जमीनदाऱ्यांत जमिनीचे खरे मालक व इतर हक्कदार ह्याच्या हितसंबंधास बाध येण्याची भीति असते, व आपण स्वतःचें येणें बिनधोकपणें वसूल करण्याच्या नादांत खऱ्या मालकास दृष्टीआड करून निऱ्हाइतास मालक बनविलें ह्या गोष्टीची सरकारास जाणीव झाल्यापासून जमीनदारांच्या वरिष्ठ व कनिष्ठ कुळांचें न्याय्य हितरक्षण करण्याकरितां अनेक कायदेही करण्यांत आलेले आहेत. परंतु अनेक प्रांतांत जमीनीचे खरे मालक व इतर हितसंबंधी बाजूस राहून कर वसूल करणारांसच सरकारनें मालक ठरविल्यानें जमीनीच्या उत्पन्नातील खंडाच्या स्वरूपाचा भाग शेतकऱ्याच्या पदरांत न पडता बहुतांशीं जमीनदाराच्या खिशांत उतरतो. संपत्तीच्या न्याय्य विभागणीच्या दृष्टीनें हा मोठाच दोष होय, व तो पिढ्यानपिढ्या चालत आल्यानें जमीनदाराच्या कुळाची आर्थिक परिस्थिति खालावली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सरकारनें कुळाच्या हितसंरक्षणार्थ केलेल्या कायद्याचा पुढें उल्लेख केलेला आहे त्यावरून हा अन्याय व्यवहारांत कसा व कितपत दूर केलेला आहे हें दिसून येईल.

जमीनदारीची पद्धत बंगालखेरीज मद्रास इलाख्याच्या उत्तरेकडील भागांतही चालू आहे. परंतु आग्रा व औध ह्या संयुक्त प्रांतात अनेक गावांचे गट अगर महाल, हे विवक्षित घराण्यांच्या समाईक ताब्यांत होते. ह्या सर्व वांटणीदाराचे हक्क सरकारनें मान्य करून कुळाकडून त्यास जो एकंदर खंड मिळे त्याचा विवक्षित भाग सरकार त्याच्या प्रतिनिधीकडून घेई. जेथें जमीनदारी पद्धत अस्तित्वांत असते तेथें सारा घेणारें सरकार व शेताची लागवड करणारी कुळें ह्याच्या दरम्यान कुळांकडून खंड वसूल करून त्याच्यांतून सरकारसारा भरणाऱ्या जमीनदारांचा एकच वर्ग असतो. परंतु आग्रा व औध ह्या प्रांतांतील परिस्थिति अशी होती कीं सरकार व कुळें ह्याच्यामध्यें जमीनीचे मालक व पूर्वकालीन राजसत्ताचे अगर वसुली मक्तेदाराचे वंशज असे दोन हक्कदार आढळत. औध प्रांतांत पूर्वकालीन राजकीय हक्कदारांचें—ह्यास तेथें तालुकदार असें म्हणतात—गांवाच्या मालकांपेक्षा पुष्कळच

अधिक वर्चस्व होतें. वास्तव त्या भागात सरकारनें तालुकदारांस मुख्य जमीनदार ठरवून गावाची जमाबंदी त्याजमार्फत ठरविण्याचा प्रघात घातला व जुन्या मालकांस विवक्षित प्रमाणात खंडाचा हिस्सा मिळावा असें ठरविलें. आग्रा प्रांतात मात्र जुन्या मालकांच्या हक्काचें तालुकदारांनी विशेष आक्रमण केलें नसल्यानें सरकारनें खंडाचा बराचसा भाग मालकाकडे राखून त्याजकडून तालुकदारास त्याच्या पूर्वकालीन हक्काबद्दल खंडाचा थोडासा हिस्सा देण्याची पद्धति अवलंबिली. विवक्षित वर्षांच्या मुदतीनंतर कुळांकडून मालकास अगर तालुकदारास मिळणाऱ्या खंडाची पुन्हा चौकशी करून त्यामानानें सरकार सारा वाढविण्याची पद्धत संयुक्त प्रांतातही अस्तित्वात आहे. आग्रा व औंध ह्या दोन्ही प्रांतात आज कुळांच्या वर्गात पडणारे सर्वच शेतकरी पहिल्यापासून मालकांच्या अगर तालुकदारांच्या मालकी हक्काखाली होते असे नाही. विशेषतः औधमध्ये सरकारनें तालुकदारास मुख्य जमीनदार मानलें असल्यानें तेथील कुळांच्या हक्काचें संरक्षण करण्याची सरकारास विशेष जरूरी भासू लागली आहे.

विवक्षित महालाची स्वतंत्र धारेबंदी करण्याच्या ह्या पद्धतीस महालवारी पद्धत असें म्हणतात. संयुक्त प्रांतात बहुतेक ह्याच पद्धतीचा अमल आहे आणि पंजाबमध्यें पुष्कळ ठिकाणी तसलीच व्यवस्था आहे. तेथें बहुतेक शेतकीची गावें स्वतः शेतें कसणाऱ्या अनेक शेतकऱ्यांच्या समाईक ताब्यात असतात व सरकार सर्व गावावर एकदरीनें सारा आकारून तो गावच्या प्रतिनिधीकडून अगर लंबरदाराकडून वसूल करतें. जमीन कसणारा शेतकरी व खंडावर आपला हक्क सांगणारे सरकार ह्यांच्या दरम्यान ह्या पद्धतीत दुसरे मध्यस्थ नसल्यानें खंडाच्या उत्पन्नाचा काही तरी भाग शेतकऱ्यास मिळण्याचा संभव असतो. तरी जमीन सावकाराच्या ताब्यात गेल्यास त्याजपासून व सामान्यपणें सरकार देण्याच्या अमर्यादित मागणीपासून त्याचेंही योग्यपणें संरक्षण करावें लागतें. ह्या विषयीच्या कायद्यांचा पुढें विचार केला आहे. मध्यप्रांतांतही सरकारने जुन्या कर वसूल करणाऱ्या मक्तेदाराशी विवक्षित गावाबद्दल करार करून प्रत्यक्ष शेतकऱ्याकडून सारा गोळा करण्याचें काम त्यांवर सोपविलेलें आहे. त्या व्यवस्थेंत शेतकऱ्याचे अनेक मालकी हक्क अन्यायानें 'मालगुजार'कडे दिले गेल्यानें त्याचें नुकसान होत आहे. मालगुजार व कुळें ह्यांचे परस्पर संबंध सविस्तरपणें कायद्यानें ठरवून देण्याची सरकारनें व्यवस्था केली आहे. तरी मालगुजाराने कुळांकडून खंड किती घ्यावा व मालगुजाराकडून त्यापैकी किती भाग सरकारनें वसूल करावा हे सरकारी अधिकारीच प्रत्येक नवी जमाबंदी करतेवेळीं ठरवितात.

सर्व गांवांवर एकंदरीनें सरकार देणें ठरविण्याची व त्याबद्दल गावकऱ्यांची सामुदायिक जबाबदारी मान्य करण्याची ही पद्धत मद्रास इलाख्यांत चालू

करण्याचा तेथील सरकारनें पूर्वी एकदां प्रयत्न केला होता. परंतु प्रत्येक शेतकरी त्याच्या जमीनीच्या लागवडीबद्दल व साऱ्याबद्दल प्रत्यक्षपणें सरकारास जबाबदार धरण्याची रयतवारी पद्धतच अनेक कारणांनीं सरकारास मान्य झाल्यानें मद्रास व मुंबई ह्या प्रांतांत तीच पद्धत शेवटी चालू करण्यांत आली. प्रत्येक रयताशी सरकार-सारा ठरवून तो कायम करून टाकण्याचा सरकारचा पहिल्या प्रथम उद्देश होता व तो अंमलांत आला असता तर प्रत्येक रयत आपापल्या जमीनीपुरता पूर्ण जमीनदार बनला असता व ही पद्धत महाराष्ट्रांत पूर्वकाली अस्तित्वांत असलेल्या मिरासदारी पद्धतीशी जवळ जवळ समान ठरली असती. परंतु खेडेगावांची सामुदायिक संघटना मोडून व्यक्तिशः शेतकऱ्यांकडून सारा घेण्याचें धोरण तेवढेंच अंमलात आल्यानें प्रत्येक नव्या सारावाढीच्या वेळी सरकारच्या वाढत्या मागणीस विरोध करण्यास जमीनीचे मालक असमर्थ झाले. कायदेशीर दृष्टीनें रयतास आपली जमीन दुसऱ्यास खंडानें देण्यास, व तिच्यावर गहाण, खरेदी, बक्षीस इत्यादि व्यवहार करण्यास पूर्ण मुभा असते व तेवढ्यापुरता तो आपल्या जमीनीचा 'मालकच' असतो हें खरें. तरी सरकारच प्रत्यक्षपणें त्याजकडून खंड वसूल करण्याचा व तो ठराविक मुदतीनें वाढविण्याचा अधिकार राजवीत असल्यानें त्याची 'मालकी' पोकळ ठरते व संपत्तीच्या विभागणीत खंड म्हणून त्याच्या पदरात जो भाग पडणें न्याय्य असतें त्यातील बराचसा हिस्सा सरकारच्या तिजोरीत जातो. ह्याखेरीज, कांहीं प्रांतांत सरकारी जमीनीची लागवड करणारावर गहाण, खरेदी इत्यादि बाबतीतही नियंत्रणें आहेत ती निराळी. परंतु नियंत्रित हक्कदारीच्या ह्या पद्धतीच्या जमीनीचें क्षेत्र-फळ फारच मर्यादित असल्यानें ती अपवादात्मकच समजली पाहिजे.

जमीनदार, तालुकदार व मालगुजार ह्यांस त्यांच्या कुळांकडून मिळणाऱ्या खंडाच्या रकमांतून सामान्यपणें निम्मा हिस्सा सरकार आपला वांटा म्हणून घेतें व राहिलेली रक्कम जमीनीच्या मालकीबद्दलचा मोबदला म्हणून जमीनदाराच्या हातांत राहते. परंतु अनेक स्थळीं वहिवाटीनें स्थापन झालेले व जुन्या राज्यकर्त्यांनी मान्य केलेले सामान्य रयतांचे हक्क बाजूस सारून त्यांच्या जागी निराळेच मालक कायद्यानें मान्य करण्याच्या व त्यांजकडून खंडाच्या निम्म्या इतका, व कधी कधी अधिकही, भाग सरकारसारा म्हणून वसूल करण्याच्या ह्या पद्धतीचा, 'हिंदुस्थानांतील सर्व शेत-जमीन राजकर्त्यांची आहे ह्या अव्यक्त कल्पनेप्रमाणें जमीनदारांमार्फत सरकार आपला खंड वसूल करतें व त्याच्या श्रमाचा मोबदला म्हणून अगर निव्वळ मेहेर-बानीनें त्याजकडे कांहीं भाग राहूं देतें' असा अर्थ करण्यास सवड सांपडलेली आहे. कांहीं झालें तरी पूर्वापार जमीनीचे मालक असलेल्या शेतकऱ्यास ह्या व्यवस्थेनें खंडात न्याय्य भाग मुळीच मिळत नाही हे निर्विवाद आहे. रयतवारी प्रांतांत तर सरकार प्रत्यक्षपणेंच जमीनीच्या उत्पन्नांतील आपला भाग ठरवितें व वसूल

करीत असल्यानें, रयतानी आपली शेतें खंडानें दिली तर त्यांना किती खंड मिळेल ह्या काल्पनिक प्रश्नाच्या अंदाजिक उत्तरावरूनच सरकार आपल्या साऱ्याची रक्कम ठरवितें. प्रत्यक्ष भाडेपट्टे, किंमतीची वाढ, वाहतुकीचीं साधनें व बाजार ह्यांची सुधारणा इत्यादि बाबींचा ठोकळ मानानें अंदाज करून काल्पनिक खंड व त्याचा अर्धा अगर तृतीयांश सरकारी हिस्सा ठरविण्याची पद्धत किती हास्यास्पद व जुलमी आहे ह्याचा बारडोली येथील सारावाढीच्या उदाहरणांत पुष्कळच पुरावा सांपडण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें, सामान्य रयत जमिनीच्या मालकास जो खंड देत असेल त्या रकमेवरून सरकार सारा आकारणें किती धोक्याचें व अन्यायाचें आहे, हे बारडोली येथील सारा-वाढीची फेरचौकशी करण्याकरिता नेमलेल्या सरकारी अधिकाऱ्यांनीच स्पष्टपणे दाखविलेलें[1] आहे. 'खंड' म्हटला म्हणजे तो 'अनार्जित' वाढावा असलाच पाहिजे, ही कल्पना भ्रामक असून विवक्षित परिस्थितीत तो रयतेच्या भांडवलाच्या अगर श्रमाच्या वाजवी कमाईतून द्यावा लागणें अपरिहार्य आहे, हे प्रास्ताविक भागांतील खंडाबद्दलच्या व मक्तेदारीसंबंधाच्या सामान्य विवेचनावरून स्पष्ट होईल[2]. किंबहुना, शेतकऱ्याकडून मालकास मिळणारा खंड हा प्रमाणभूत न मानता शेतकऱ्याच्या सामान्य आर्थिक परिस्थितीचा संपूर्णतेने विचार करूनच खंडाच्या रकमाचें खरें स्वरूप व महत्त्व ही ठरविली पाहिजेत, हा बारडोली कमिटीचा निष्कर्षच अँडरसन साहेबांसारख्या प्रतिनिविष्ट जमाबंदी अधिकाऱ्याच्या आग्रहाहून अधिक न्याय्य व समर्थनीय आहे असे म्हटलें पाहिजे. परंतु उत्पन्नाचे अगर खंडाचे आकडे ठरवि-ण्याची कोणतीही पद्धत घेतली तरी शेतकीच्या निव्वळ उत्पन्नाचा अर्धा अगर तृती-यांश हिस्सा सरकारदेणें कोणत्याही सामान्य करपद्धतींत योग्य समजले जाणार नाही. सरकार जमिनीचें मालक असून येईल तेवढा खंड सक्तीनें वसूल करण्याचा आपला अधिकारच ह्या बाबतीत गाजविते व अशा मार्गानें शेतकऱ्यांच्या न्याय्य उत्पन्नाचा फार मोठा भाग शेंकडो वर्षे सरकार व जमीनदारासारखे कायद्यानें निर्माण केलेले काही मध्यस्थ ह्यांच्या हातात जात असल्यानें शेतकऱ्यांची आर्थिक स्थिति असमाधानकारक झालेली आहे. खाण्याचीं धान्यें व कच्चा माल ह्यास असलेल्या मागणीच्या मानानें ती उत्पन्न करण्यास आवश्यक असलेल्या जमी-नीचा पुरवठा मर्यादित असल्यानें ती ज्यांच्या ताब्यात आहे त्यास खंडाच्या स्वरूपाचें उत्पन्न मिळणें व सामाजिक प्रगतीच्या सामान्य ओघानें ते वाढत जाणें साहजिक आहे. भांडवलवाल्यांस व्याज व मजुरास मजुरी ही उत्पन्नें मिळणें जेवढें न्याय्य आहे तेवढेच जमिनीच्या मालकांस त्याच्या कामगिरीबद्दल, म्हणजे उत्पादनाचा एक आवश्यक घटक पुरविल्याबद्दल, खंडाच्या रूपानें वेतन मिळणें न्याय्य आहे.

[1] बारडोली येथील सारावाढीसंबंधी खास चौकशी करण्याकरिता नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट.
[2] पान ९५–९७ पहा.

खंडावर शेतकऱ्याचा काहीएक हक्क नाही, त्यानें खंडापैकीं सरकार मागेल तेवढा भाग निमूटपणें द्यावा, नाहीतर जमीन सोडून जावें, असलें बेपर्वाईचें धोरण अन्यायमूलक होय. जेथें शेतजमीनीचा पुरवठा मागणीच्या मानानें कमालीचा मर्यादित होऊन उत्पादन खर्चाच्या मानानें मालकास बेसुमार उत्पन्न होत असेल तेथें त्या उत्पन्नापैकी आकस्मिक भागास पूर्णपणें 'अनार्जित' ठरविणें शक्य होईल. तेही जमीनीच्या मालकानें जमीन विकत घेतांना खर्चिलेल्या भांडवलाचा त्यास पूर्ण मोबदला देऊनच ठरविलें पाहिजे. हिंदुस्थानांत शेतजमीनीची खरेदीविक्री नेहमी होत असते व शेतीत गुंतविलेल्या भांडवलास 'व्याज' पुरेसें सुटत नाही असा सामान्य अनुभव आहे. असें असतांना शेतकऱ्याच्या जमीनीतील एकंदर उत्पन्नांतून सर्व उत्पादनखर्च वजा करून निव्वळ 'अनार्जित' स्वरूपाचे उत्पन्न ठरविणें व त्यावर जबर कर लादण्याचा प्रयत्न करणें फारच दुर्घट आहे. जमीनीच्या मालकास 'खंड' म्हणून मिळणारें उत्पन्न खरोखरच खंडाच्या म्हणजे अनार्जित उत्पन्नाच्या स्वरूपाचें आहे हे ठरविणें जेवढें धोक्याचें आहे तेवढेंच जमीनीला भाग किंमती येतात एवढ्यावरून जमीनीचें निव्वळ उत्पन्न वाढत असलेंच पाहिजे असा निष्कर्ष काढणेंही हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीत भ्रामकच ठरेल. भाडेपट्ट्यांत नमूद केलेल्या खंडाच्या रकमा कित्येक वेळा 'बिनामी' असतात त्याचप्रमाणे खरेदीखतांतील रकमाही कधीं कधीं पोकळ असू शकतात. तसेंच, असाहाय्य परिस्थितींतील कूळ मालकास खंडचिठ्ठी देतांना निव्वळ खंडाच्या रकमेचाच त्यांत अंतर्भाव करण्यास ज्याप्रमाणें असमर्थ असतें व म्हणून ही रक्कम वास्तविक खंड आहे असें मानणें बरोबर नाही त्याप्रमाणें नाठाळ कुळाकडून कर्जवसूली करण्यास अगर बिनधोक व स्थावर मालमत्ता करून ठेवण्यास उद्युक्त झालेल्या खरेदीदारांनी दिलेल्या किंमतीवरून प्रचलित व्याजाच्या दरानें जमीनीच्या उत्पन्नाचा अंदाज करणेंही अयोग्य आहे. खंडचिठ्ठ्या व खरेदीखतें ह्यांतील रकमांचा पूर्णपणें व तारतम्यानें विचार करून व शेतकऱ्याची एकंदर आर्थिक स्थिति अजमावून निव्वळ खंडाची रक्कम ठरविण्याचें अशक्यप्राय कार्य उरकल्यास त्या खंडावर विशिष्ट धोरणानें कर लादण्यास तात्विक दृष्ट्या सरकारास पूर्ण मुभा आहे. परंतु तसें करतांना करासंबंधींचे सामान्य नियम व एकंदर समाजाच्या सुखवर्धनाच्या दृष्टीनें इष्ट असलेलें धोरण डोळ्यापुढे ठेवणें जरूर आहे. ज्याची कमालीची सांपत्तिक हलाखी सरकारासही कबूल आहे व जी दूर करण्यास अनेक कमिशनें, कायदे व खातीं ह्यांचा खटाटोप व खर्च करण्यास सरकार तयार आहे त्या बहुसंख्याक शेतकरी वर्गावर सध्यां जमीनमहसुलाच्या निमित्तानें जो भार पडत आहे त्याचें खऱ्या समाजसत्तावादावरूनही समर्थन होईल असें वाटत नाहीं.

इंग्लंडसारख्या देशांत सर्व शेतजमीन मूठभर जमीनदारांच्या मालकीची असल्यानें व जमीनीचा पुरवठा मागणीच्या मानानें एकसारखा मर्यादित होत असल्यानें एकंदर समाजाकडून मिळणाऱ्या वाढत्या खंडाच्या रकमा त्यांच्या खिशांत कांहीही खटपट न करता पडतात, म्हणजे भांडवल व श्रम ह्याचा पूर्ण मोबदला मिळून त्यापेक्षांही त्यास अधिक कमाई होते. अशा स्थितीत बहुजनसमाजाच्या हुकमतीखालीं असलेल्या सरकारनें राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें खंडावर जबर कर बसविण्याचें धोरण स्वीकारल्यास गैरवाजवी होणार नाही. परंतु हिंदुस्थानच्या पुष्कळशा भागांत शेतजमीनीचा ताबा सामान्य शेतकऱ्याच्या हातांत आहे. मोठमोठ्या जमीनदारांचीही संख्या दिवसानुदिवस कमी होत आहे; सामान्य शेतकऱ्यास त्याच्या धंद्यापासून स्वतःच्या उदरनिर्वाहाची साधनेंही पूर्णपणे मिळत नाहीत; व बहुसंख्याक, म्हणजे एकंदर लोकसंख्येपैकीं शेंकडा ७१ इतक्या, शेतकरी वर्गाची सरकारी धोरणावर कोणत्याही प्रकारची हुकमत नाही. अशा भिन्न परिस्थितीत विलायतच्या समाजसत्तावाद्यांच्या तत्त्वावरून सरकारच्या शेतसाऱ्यासंबंधीच्या धोरणाचें समर्थन करूं लागण्यास जबाबदार म्हणविणाऱ्या अधिकाऱ्यांनी व ग्रंथकारांनी प्रवृत्त व्हावें हें आश्चर्य होय. उलट, शेतीचा धंदा हाच येथील मूलभूत महत्त्वाचा धंदा आहे व शेतकरी वर्गाचें हित तेंच बहुतांशी राष्ट्राचें हित होय असा निश्चय करून जमीनीची पूर्ण मालकी शेतकऱ्याकडेच राखण्याची व त्याच्या उत्पन्नावर शक्य तेवढा माफक कर लादण्याची खबरदारी घेणें हेंच धोरण अधिक न्याय्य व प्रगमनशील ठरेल. प्रत्यक्ष शेतकरी व सरकार ह्यांच्या दरम्यान ज्या प्रांतांत जमीनदारांचा निराळा वर्ग आहे तेथें कुळांकडून खंडाच्या रूपानें जमीनदारांनी गैरवाजवी रकमा घेऊं नयेत ह्या स्तुत्य उद्देशानें सरकारनें कायदे केलेले असून न्यायालयांमार्फत आपल्यावरील अन्यायाची दाद लावून घेण्यासही शेतकऱ्यास तेथें परवानगी मिळालेली आहे. परंतु स्वतः सरकारच जेथें जमीनदार आहे त्या रयतवारी प्रांतांत मात्र सरकारनें जमाबंदीसंबंधी सविस्तर व कायदेशीर नियम करण्याचें व त्या नियमांच्या आधारावर रयतास न्यायालयाकडून मदत मागतां येण्याची परवानगी देण्याचें नाकारलें आहे.

खंडाची रक्कम सामान्यतः वाढती असते म्हणून कोणत्याही सरकारनें शेतीच्या उत्पन्नावरील कराची आपली रक्कम कायद्यानें कायमची ठरवूं नये हें म्हणणें रास्त आहे. कायमधाऱ्याच्या पद्धतीनें बंगाल्यांतील जमीनदारांचा जो विशेष फायदा होत आहे त्यावरून शेतसारा कायमचा ठरविण्याऐवजी दीर्घ मुदतीची जमाबंदी करणें हेंच अधिक इष्ट होय असें म्हटलें पाहिजे. परंतु ही मुदत पुष्कळच दीर्घ असणें व साऱ्याची रक्कम फार कमी असणें आवश्यक आहे. गेल्या शें दीडशें वर्षांत सारावाढ करतांना एवढे अन्याय झालेले आहेत कीं सध्यांचा सारा आणखी

कित्येक वर्षे न वाढविण्याचें धोरण स्वीकारल्याखेरीज पूर्वीच्या अन्यायाचें अंशतः ही परिमार्जन होणें व शेतीच्या धंद्याच्या भरभराटीकरता जे अनेक प्रयत्न हल्ली चालू आहेत त्यांस यश येणें अशक्य आहे. सामाजिक व आर्थिक प्रगतीच्या ओघांत पुढेमागें शेतीचा धंदा चांगला किफायतशीर होऊं लागल्यास त्याच्या उत्पन्नावर वाढते कर बसविणें शक्य होईल. आजही जमीनीच्या ज्या मालकांस त्याच्या शेतीपासून मोठमोठीं उत्पन्नें मिळत आहेत त्याजवर प्राप्तिवरील करप्रमाणें कर बसविण्यास हरकत नाही. हिंदी करपद्धतीसंबंधाच्या पुढील प्रकरणात ह्याबद्दल अधिक विवेचन केलेलें आहे.

४ **कुळांच्या हिताचें संरक्षणः** --रयतवारी पद्धतीत सरकारनें शेतकऱ्यावरील साऱ्याचा बोजा शक्य तितका कमी करणें ज्याप्रमाणें आवश्यक असते, त्याचप्रमाणें जमीनदार, तालुकदार व मालगुजार हेही आपल्या कुळाकडून प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें, वाजवीपेक्षां अधिक ' खंड ' घेणार नाहीत व त्यांस निष्कारण काढून टाकणार नाहीत अशी सरकारने कायदेशीर व्यवस्था करणें योग्य आहे. पहिल्या प्रथम बंगाल्यांत जमीनदारीची व कायमधाऱ्याची पद्धत स्थापिली गेली ती सरकारचें रयतांकडील येणें अविच्छिन्नपणें मिळावें ह्या हेतूनेंच होय. त्यावेळी जमीनदारांकडून सरकारने घ्यावयाच्या शेतसाऱ्याची जी रक्कम ठरली ती पुष्कळच भारी म्हणजे एकंदर जमीनीच्या खंडाचा $\frac{9}{10}$ भाग एवढी ठरविण्यांत आली होती. ही रक्कम शेतकऱ्यांकडून वसूल करणे जमीनदारांस नेहमीच दुर्घट होई व सरकारच्या तिजोरीत वेळेवर भरणा न झाला तर जमीनदारीचा लिलांव करण्यासही सरकार मागेंपुढें पहात नसे. जमीनदारांस त्यांच्या कुळाकडून खंड वसूल करण्यास जरूर ते अधिकार प्राप्त व्हावे ह्यासाठी अनेक कायदे व सरकारी हुकूम निघाले व त्याच्या साहाय्याखेरीज त्यावेळी जमीनदारास आपलें सरकारदेणें भागविणें अशक्यप्राय झाले असतें. परतु ते कायदेशीर नियम शेतकऱ्यांस फारच जाचक होऊं लागले व पुढे खंडाखेरीज इतर लहानसहान बाबतींत व वाढत्या उत्पन्नाच्या निमित्ताने वाढत्या खंडाच्या मागणींत जमीनदारांच्या हक्कांचे रूपांतर होऊं लागलें. पिढ्यानुपिढ्या स्वतःच्या मालकीची जमीन कसणाऱ्या शेतकऱ्यास शेतें सोडून जाणें भाग पडलें व शेतांच्या उत्पन्नांत इतर हितसंबंध असलेल्यांचे हक्कही बुडत चालले. जोपर्यंत जमीनदारानें सरकारास द्यावयाची रक्कम त्यास आपल्या कुळांकडून उभारतां येणें मुष्किलीचें होत असे तोंपर्यंत कुळांच्या वतीनें जमीनदारांवर नियंत्रणें घालणें शक्य नव्हते. परतु अधिक जमीनी कसल्या गेल्यानें, किंमतीच्या वाढत्या मानानें आणि शांतता व दळणवळणाच्या साधनांची सुधारणा झाल्यामुळें खंडाचे उत्पन्न जसजसें वाढू लागलें तसतसें जमिनदारांकडून कुळावर होणाऱ्या जुलुमाकडे सरकारचें अधिक लक्ष्य वेधूं लागलें. जमीनीच्या उत्पन्नावर हक्क सांगणाऱ्या सर्व वर्गांच्या

हितसंबंधांची चौकशी करून त्यापैकीं न्याय्य ठरतील त्यांचे शक्य तितकें संरक्षण करण्याच्या उद्देशानें १८५९ सालीं पहिल्याने सरकारी कायदा पास केला गेला. ह्या कायद्यांतील ठळक ठळक दोष दूर करण्याकरितां पुढेंही अनेक कायदे केले गेले, व इतर प्रांतांत सरकारला कुळें व सारा भरणारे मध्यस्थ ह्यांचे संबंध कायद्यानें ठरविण्याचा जेव्हां जेव्हां प्रसंग आला तेव्हां तेव्हां हाच कायदा उदाहरणात्मक समजला गेला.

विवक्षित गांवांत बारांहून अधिक वर्षें शेतकी करीत असलेल्या सर्व शेतकऱ्यास ह्या कायद्यानें स्थायिक कुळांचे ( ऑक्युपन्सी ) विशिष्ट हक्क दिले गेले. मौरुसी कुळांखेरीज इतरही वरिष्ठ व कनिष्ठ दर्जाचे हक्कदार कायद्यानें मान्य केले होते. ह्या हक्कदारांची संख्या व प्रकार भिन्न प्रांतांत भिन्न आहेत. परंतु अशी स्थायिक कुळें रयतवारी भागांखेरीज इतर सर्व भागांत कोणत्याना कोणत्या तरी स्वरूपांत व मोठ्या प्रमाणावर आढळून येत असल्यानें त्यांच्या कायदेशीर हक्कांची एका बंगाल प्रांताबद्दल सविस्तर माहिती करून घेतल्यास सरकारच्या ह्या बाबतींतील धोरणाची सामान्य कल्पना येईल. मौरुसी अगर स्थायिक कुळांकडून जमीनदारास जो खंड मिळत असेल त्यांत कुळाच्या संमतीखेरीज अगर सरकारी कोर्टाच्या परवानगीखेरीज वाढ करता येत नाहीं. शिवाय, वाढ करावयाची झाल्यास ती विशिष्ट कारणांकरिता व ठराविक प्रमाणांतच करावी लागते. कुळाला आपल्यावरील खंड कांहीं कारणानें अन्याय्य वाटला तर मुलकी कोर्टामार्फत तो उतरवून घेण्याची त्यास मुभा असते. मध्यप्रांतांत तर कुळांचे खंडही सरकारमार्फत साराबाढीच्या वेळीच ठरविले जातात व कांहीं कुळांच्या बाबतींत साराबाढीच्या संपूर्ण मुदतीपर्यंत त्यांत वाढ करण्याचा मालगुजारास हक्क नसतो. कायद्यानें कुळांस दिलेल्या ह्या सर्व सवलतींचाही दुरुपयोग करून जमीनदाराचें देणें द्यावयाचें कुळांनी अजीबात बंद केलें तरच त्यांस काढून टाकतां यावें, नाहीं तर सामान्यपणें मौरुसी कुळ कायमचें समजलें जावें अशी बंगाल्यांतील मूळ कायद्यानें व्यवस्था केलेली आहे. तसेंच मौरुसी कुळांचे हे हक्क त्यांस वंशपरंपरेनें उपभोगतां येण्यास व कांहीं अटीवर इतरांस देऊन टाकतां येण्यास कायद्यानें मुभा ठेवलेली आहे. शेतीची जनावरें, आउतें, बी इत्यादि शेतीचीं साधनें खंडाबाबत जप्त केलीं जाऊं नयेत, खंड हप्त्यानें देतां यावा, सरकारनें जमीनदारास शेतसाऱ्याची माफी दिली तर ती कुळांसही त्या प्रमाणांत मिळावी, शेतकऱ्यानें आपल्या

१ ऑक्युपन्सी टेनंट ह्या इंग्रजी शब्दास पर्यायशब्द म्हणुन निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे शब्द वापरले जातात. मौरूसी कास्तकार हा शब्द मध्यप्रांतांत वापरला जातो. त्या प्रांतांत अस्तित्वांत असलेल्या ॲबसोल्युट ऑक्युपन्सी टेनंट ह्या वर्गास तिकडे कित्येक मौरूसी कास्तकार असें म्हणतात. ह्या दोन्हीं वर्गांतील कुळांनी आपलीं शेतें इतरांस पोटभाड्यानें दिली तर त्या दुसऱ्या कुळास शिकमी कास्तकार म्हणण्याचा प्रघात आहे.

खर्चानें शेतांत सुधारणा केल्या व त्यांमुळें जमीनीचें उत्पन्न वाढलें तर खंडांत वाढ होऊं नये व कुळें जमीन सोडून जातील तेव्हा त्यास त्यांनीं केलेल्या सुधारणांबद्दल भरपाई मिळावी वगैरे इतरही अनेक सवलती कुळांबाबतच्या कायद्यानें स्थायिक अगर मौरुसी कुळास मिळालेल्या आहेत. एकंदरीनें रयतवारी पद्धतीतील जमीन धारण करणाऱ्या मालकास त्यांच्या धंद्याबद्दल जेवढी शाश्वति वाटते तेवढी जमीनदारी पद्धतींतील मौरुसी कुळांस वाटावी अशीच व्यवस्था करण्याकडे ह्या कायद्यांचा कल आहे. संयुक्तप्रांत, पंजाब, मध्यप्रांत, मद्रास वगैरे इतर इलाख्यांत अशाच स्वरूपाचे कायदे केलेले आहेत. विशिष्ट हक्क असणारी वरिष्ठ दर्जाची कुळें, मौरुसी अगर स्थायिक कुळें व मामुली कुळें असे कुळाचे तीन स्थूल वर्ग असून स्थानिक व ऐतिहासिक परिस्थितीस अनुसरून निरनिराळ्या प्रांतांत त्यांचें हितसंरक्षण सरकारनें केलेलें आहे. अजूनही जमीनदारीपद्धत अंमलांत असलेल्या प्रांतांत कुळाबाबतचे कायदे सुधारण्याची जोराची चळवळ चालू आहे.

मुंबई इलाख्याच्या बहुतेक भागात रयतवारी पद्धतच अस्तित्वांत आहे तरी जहागीर, इनाम, तालुकदारी, खोती वगैरे इतर कांहीं पद्धतीही थोड्याफार प्रमाणात प्रचलित आहेत. जुन्या राजांनी विवक्षित कामगिरीचा मोबदला म्हणून कांहीं जमीनीवरील शेतसारा सर्वांशीं अगर अंशतः खाजगी इसमांस बहाल केलेला असे. कांहीं ठिकाणीं ज्यास इनाम दिलेलें असे त्यांस त्याच्या जमीनीवरील सरकारसाऱ्याची माफी मिळे व इतर कांहीं ठिकाणीं इनामदार व जहागीरदार ह्यास जमीनीच्या मालकाकडून सरकारसारा घेण्याचा हक्क देऊन टाकला जाई. इंग्रजसरकारनें जहागीरदार व इनामदार ह्यांच्या हक्काची पूर्ण चौकशी करून ते मान्य केलेले आहेत. गुजराथेंत जुन्या राजवंशांचे अनेक अवशेष तालुकदार ह्या नावानें अस्तित्वांत असून विवक्षित गांवातून जमीन महसूल वसूल करून त्यातील कांहीं अंश स्वतःकडे ठेवण्याचा त्यांचा हक्क मान्य करण्यांत आला आहे. ह्याखेरीज संयुक्त प्रांतातील पद्धतीप्रमाणें शेतजमीनीच्या समाईक मालकीच्या कल्पनेवर उभारलेले गिरास वांटा, मेहवासी, भागदारी, नर्वादारी वगैरे इतरही कांहीं प्रचार संयुक्त प्रांताप्रमाणें गुजराथेंत आढळतात. कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांतील खोत हे मुळांत शेतीची वसाहत करविणारे व सारा गोळा करणारे होते, परंतु अनेक कारणांनीं त्यास कालांतरानें जमीनदारांचा दर्जा प्राप्त झाला. खोती गांवांत मूळ वसाहतवाल्याचे जे वंशज अजून शेती करीत आहेत त्याचा 'धारेकरी' ह्या नांवाचा निराळा वर्ग असून त्यांजवळून फक्त सरकारसारा वसूल करण्याचें काम खोतांकडे आहे. इतर कुळाकडूनही खोत सरकार सारा वसूल करतात, परंतु त्यांजकडून सरकारसाऱ्याहून अधिक रक्कम 'खंड' म्हणून घेण्याचा त्यांस हक्क आहे. रत्नागिरी जिल्ह्यांत खोतीबाबत स्वतंत्र कायदा अस्तित्वांत असून

खोतांचे व कुळांचे हक्क त्यामध्यें स्पष्टपणें नमूद केलेले आहेत. परंतु हा कायदा कुलाबा जिल्ह्यातील खोतांस न लावल्यानें त्याच्या बाबतीत सरकारी अधिकारी हवें तें धोरण स्वीकारण्यास मोकळे आहेत. रयतवारीखेरीज ह्या इतर पद्धतींत शेताची प्रत्यक्ष लागवड मुख्यतः कुळाकडून होत असल्यानें त्यांच्या हिताचें संरक्षण करणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणे, रयतवारी पद्धतींतही अलीकडे खंडानें शेतें देण्याचा प्रचार वाढत असल्यानें ह्या हंगामी कुळांच्या न्याय्य हक्काबद्दलही सरकारनें योग्य तजवीज करणें इष्ट आहे. जमीनधारा व जमीनमहसूल ह्यासंबंधी ज्या अनेक सुधारणा होणें आवश्यक आहे त्यामध्यें रयतवारी व अन्यत्र जमीनदारी पद्धतींतील कुळाच्या न्याय्य हिताचें संरक्षण करण्याची कायदेशीर व्यवस्था करण्याच्या योजनेचाही अंतर्भाव केला पाहिजे.

कुळाच्या हक्कसंरक्षणाकरिता सरकारनें कायदे केल्यानें जमीनधाऱ्याची पद्धत गुंतागुंतीची होते व जमीनीची मशागत जास्तीत जास्त कार्यक्षमतेनें होण्यास अडथळे उत्पन्न होतात, असें कोणास सकृद्दर्शनी वाटल्यास आश्चर्य नाही. परंतु सरकारनें आधीच न्याय्य हक्कांचें उल्लंघन करून अज्ञानानें अगर हलगर्जीपणानें नवे हक्कदार उत्पन्न केल्यामुळे आता जुन्या हक्कदारांच्या हितसंबंधाचें संरक्षण करणें आवश्यक झालें आहे. तसेंच, शेतकी हा एकच धंदा आज बहुसंख्याक हिंदी नागरिकांस उपलब्ध असल्यानें त्यांच्या गरजू स्थितीचा जमीनीचे मालक अन्याय्य फायदा घेणार नाहींत ह्याबद्दलही न्यायी व समाजहिततत्पर सरकारनें काळजी घेतली पाहिजे. मात्र असें करतांना लागवडीच्या धंद्यांत मजूर व भांडवल ह्यांची मोकळेपणानें हालचाल होऊन उत्पादन कार्यक्षम होण्याच्या मार्गांत सरकारनें अडथळे उपस्थित करता कामा नये. सरकारनेंही शेतसाऱ्यासंबंधी आपलें धोरण ठरवितांना शेतीच्या धंद्याची उत्पादकता कमी न होऊं देण्याची व बहुसंख्याक शेतकरी वर्गास सुस्थितींत राखण्याची खबरदारी घेतली पाहिजे. जमीन जो प्रत्यक्षपणें कसतो किंवा भांडवल पुरवून व सुधारलेलीं साधनें वापरून लागवड अधिक किफायतशीर करण्यास प्रत्यक्षपणें मदत करतो अशा मनुष्याच्या हातांतच जमीनीची मालकी जाणें इष्ट आहे. सामाजिक व राजकीय दृष्ट्याही जमीनीची मालकी प्रत्यक्ष लागवड करणाऱ्या मध्यम परिस्थितीच्या नागरिकाच्या हातांत असणें हितावह होय, ह्याबद्दल मागें कित्येक प्रकरणांत उल्लेख आलेला असून पुढील प्रकरणांत जमीनीवरील करासंबंधानें विवेचन करतांना अधिक खुलासा करावयाचा आहे. स्वतःच्या मालकीची जमीन कसणारे शेतकरी व जमीनीच्या मालकांकडून खंडानें जमीन घेऊन तिची लागवड करणारी कुळें ह्यांचे परस्पर प्रमाण निरनिराळ्या भागांत भिन्न आहे. परंतु रयतवारी प्रांतांत अजूनही जमीनीची लागवड बहुतांशी तिच्या मालकांकडूनच होत आहे ही इष्ट गोष्ट होय.

हेंच तत्त्व शक्य तोंवर कायम ठेवून इतर उत्पादनविषयक व सरकारसान्यासबंधीच्या सुधारणा घडवून आणल्यास शेतजमीनीच्या मालकीपुरता तरी संपत्तीच्या विभागणीचा प्रश्न येथें बिकट होणार नाही. विभागणीच्या दृष्टीनें, जमीनीची मालकी बहुसंख्याक शेतकरी वर्गाकडे असणें व त्यांस खंडांतील न्याय्य भाग मिळणें हें जसें आवश्यक आहे, त्याचप्रमाणें उत्पादनाच्या दृष्टीनें जमीन धारण करणाऱ्या रयतांस भांडवल, सुधारलेली साधनें, किफायतशीर संघटना इत्यादि बाबतींत शेतकीकमिशनच्या शिफारशीच्या धर्तीवर विधायक मदत मिळणेंही जरूर आहे. मोठमोठ्या शहरांतील राहत्या व व्यापारधंद्याच्या जागांच्या बाबतींतही अलीकडे खंडाची वाढ व त्याजवर बसविण्याचे कर ह्यासंबंधानें नवीन प्रश्न उपस्थित होत आहेत. परंतु त्यांच्या बाबतींत हिंदुस्थानातील विशेष परिस्थिति इतर देशांहून फारशी भिन्न नसल्यानें त्यांच्या बाबतींत प्रास्ताविक भागात वर्णिलेलें प्रगमनशील धोरण स्वीकारणेंच आवश्यक आहे. खाणीच्या उत्पन्नासही हाच न्याय लागू आहे.

**५ हिंदी मजूर**--जमीन व भांडवल ह्या उत्पादनाच्या साधनांस सर्वस्वी पारखा झालेल्या व केवळ स्वतःच्या अंगमेहनतीनें मजूरी मिळवून चरितार्थ चालविणाऱ्या लोकाचा वर्ग हिंदुस्थानांत अगदींच अल्पसंख्याक आहे. तरी मोठमोठ्या कारखान्यांत व शहरांत मोलानें काम करणाऱ्या मजूरांची संख्या व शेतकी, विणकाम इत्यादि धंद्यांत पूर्णपणें किंवा अंशतः गुंतलेल्या मजूरांची संख्या मोठी व वाढती असल्यानें त्यांच्या आर्थिक स्थितीचा पूर्णपणें विचार करणें जरूर आहे. राष्ट्रीय उत्पन्नाची विभागणी सामाजिक हिताच्या दृष्टीनें हितावह आहे किंवा नाहीं, व मजूरवर्गाची कमाई त्याची कार्यक्षमता कायम राहण्यास व वाढण्यास पुरेशी आहे किंवा कसें, ह्या प्रश्नांचा उलगडा मजूरांच्या वास्तविक परिस्थितीच्या संपूर्ण अवलोकनावरूनच होणें शक्य आहे. मुंबईसारख्या औद्योगिक महत्त्वाच्या शहरात आधुनिक कारखानदारीची पद्धत लोकांस प्रत्यक्ष डोळ्यांसमोर दिसत आहे. 'मजूर' वर्गाची संख्या व संघटना ह्यात इष्ट सुधारणा होत असून अंतर्राष्ट्रीय मजूरपरिषदेंत हिंदी मजूरांचे प्रतिनिधि इतर महत्त्वाच्या औद्योगिक राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या बरोबरीनें भाग घेत आहेत. विशेषतः महायुद्धाच्या काळापासून उद्योगधंद्यांच्या वाढीस व कारखान्यात काम करणाऱ्या मजूराच्या चळवळीस पुष्कळच उत्तेजन मिळालेलें आहे. सामान्य हिंदी मजूर अशिक्षित व अननुभवी असल्यानें कित्येक स्वार्थसाधु व विघ्नसंतोषी लोक मजूरांच्या चळवळीस अनिष्ट वळण देण्याचा प्रयत्न करतांना दिसतात. परंतु ही स्थिति बहुतेक अपवादात्मक असून सध्याच्या आर्थिक संक्रमणाच्या काळांत कांहीशी अपरिहार्यही आहे. हिंदी मजूर अधिक अनुभवी व सुसंघटित होऊं लागतांच स्वार्थसाधु व उपऱ्या लोकांची सत्ता कमी होत जाऊन पाश्चात्य राष्ट्रांतील मजूरसंघांप्रमाणें स्वहितार्थ झगडणारे व विधायक

कामगिरी करणारे खरेखुरे मजूरसंघ इकडे स्थापन होतील अशी आशा आहे. मोठमोठ्या धंद्यांत गुंतलेल्या मजूरांच्या संख्येच्या मानानें शेतीच्या धंद्यांत व लहान घरगुती धंद्यांत गुंतलेल्या मजूरांची संख्या फार मोठी असून त्यांच्यांत संघटना होऊन त्यांची आर्थिक स्थिति सध्यांहून अनेक पटींनी सुधारणें आवश्यक आहे. किंमतीच्या मानांत चढ, दळणवळणाच्या साधनांत वाढ, उद्योगधंद्यांची मजूरांस असलेली वाढती मागणी, खेडेगांवांच्या स्वायत्ततेचा ऱ्हास इत्यादि कारणांनी शेतकी व घरगुती धंदे ह्यांत गुंतलेल्या मजूरांतही हालचाल होत असून आपली कमाई वाढविण्याचा ते कसून प्रयत्न करीत आहेत. परंतु संघटना, ज्ञान व कार्यक्षमता ह्यांच्या अभावी त्यांची स्थिति अजूनही असमाधानकारक असून कारखान्यातील मजूरांप्रमाणे त्यांच्या विशिष्ट अडचणींकडेही लक्ष्य वेधणें जरूर आहे.

मागें[1] हिंदुस्थानातील लोकसंख्येच्या धंदेवार विभागणीविषयी आकडे दिलेले आहेत त्यांवरून हिंदी मजूरांपैकी निरनिराळ्या प्रकारच्या धंद्यांत कितीजण काम करीत आहेत हें विस्तरशः दिसून येईल. हिंदुस्थानाच्या एकंदर लोकसंख्येपैकी २३ कोटि लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर अवलंबून आहे. त्यांपैकी १०॥ कोटि लोक प्रत्यक्ष कामकरी असून त्याच संख्येंत सुमारें ३½ कोटि स्त्रीकामकऱ्यांचा अंतर्भाव होतो. ७॥ कोटि शेतकऱ्यांपैकी बहुतेक सर्वांशी अगर अंशतः स्वतःची जमीन कसणारे आहेत व शेतकीच्या धंद्यांत केवळ मजूर ह्या नात्यानें काम करणाराची संख्या दोन कोटीहून विशेष अधिक नाही. खाणी व शेतकी खेरीज, उपयुक्त वस्तु तयार करण्याचे, वहातुकीचे व व्यापाराचे धंदे ह्यांमध्यें काम करणाऱ्यांची संख्याही अडीच कोटि असून त्यांपैकी नोंदविलेल्या कारखान्यातील मजूरांची संख्या मात्र २७ लाख एवढीच आहे. शेतकीच्या धंद्यांतील मजूराची मागणी हंगामी असल्यानें व इतर उद्योगधंद्यांची स्थिति अनिश्चित आणि असमाधानकारक असल्यानें कोणत्याही एका धंद्यांत न गुंतलेल्या अशा फिरत्या बिनकसबी कामकऱ्यांचा वर्गही मोठा आहे. शहरांतील घरगुती नोकरी, आगगाड्यांच्या कारखान्यातील काम, बंदरांतील हमाली, खाणी, गिरण्या व इतर कारखाने ह्यामधील सर्वसामान्य काम, इत्यादि स्वरूपाची नोकरी पत्करण्यास ह्या वर्गातील लोक नेहमी तयार असतात. शहरांतून खेडेगांवांत व खेडेगांवांतून शहरांत मजूराचा नेहमी थारेपालट चालू असतो. हिंदी मजूरांची परिस्थिति व संघटना ह्यांविषयी विचार करीत असतां निरनिराळ्या प्रकारच्या मजूरांचे वरील विशेष ध्यानांत घेणें आवश्यक आहे.

**६ मजूरीची पद्धतः**—नोकर व मालक ह्यांचे परस्पर संबंध कोणत्या प्रकारचे असावे ह्याविषयीं जुन्या हिंदुशास्त्रांत जे उल्लेख सांपडतात त्यांवरून 'नोकरी हा एक करार असून त्याची कलमें नोकर व मालक ह्या दोघांसही बंधनकारक असावा,

---

[1] पानें २६४-२७० पहा.

असाच त्या काळचा सामान्य कायदा होता असें दिसतें. ठरलेला करार नोकरानें अगर मालकानें मोडला तर त्यापासून सरकार दंड घेई व जरूर तेथें करार मोडणाराकडून दुसऱ्या पक्षास नुकसान भरपाई देववी. अनेक ठिकाणीं गुलामगिरीची पद्धत अस्तित्वांत होती व घाणेरडें अगर काबाड कष्टाचें काम गुलामांकडून करून घेण्याचा प्रचार असे. बिगार व.वेठ ह्यांसारखे अर्धवट गुलामगिरीचे प्रकारही तेव्हां अस्तित्वांत असत. अस्पृश्य मानलेल्या वर्गाची स्थिती तर अत्यंत असमाधानकारक असून कांहीं विशिष्ट धंदे ठराविक मोबदल्यानें त्यांस करावे लागत. निरनिराळ्या वर्गास भिन्न प्रकारची कामें रूढीनें व शास्त्रसंमत कायद्यानें वांटून देऊन प्रत्येक कामगिरीचें वेतनही शिरस्त्याप्रमाणें ठरवून टाकण्याची ही 'अचल' पद्धति अलीकडील वाढत्या विनिमयाच्या व स्पर्धात्मक काळांत नाहीशी होत आहे. सामाजिक जीवन हें मुख्य ध्येय मानून विशिष्ट वर्गाकडून त्या जीवनवर्धनार्थ विवक्षित कामगिरी करून घेण्याची व तिचा त्या वर्गास ठराविक व बहुंशी ऐनजिनशी मोबदला देण्याची ही जुनी पद्धत समाजधारणेस त्यावेळच्या अशांततेच्या व अप्रगल्भ परिस्थितींत पुष्कळच उपयोगी पडली. परंतु उत्पादक कार्यक्षमतेस व व्यक्तीच्या अंगांतील वर्धिष्णु गुणांस योग्य संधी मिळण्याची शक्यता ह्या गोष्टी शांततामय काळात व पूर्वीच्या स्वायत्त खेडेगांवांच्या मानानें फारच प्रचंड अशा अलीकडलि राष्ट्रांत विशेष महत्वाच्या असल्यानें प्रत्येक व्यक्तीस देशाच्या वाटेल त्या भागात जाऊन, स्वतःस हवा तो धंदा, मान्य होईल त्या मजूरीनें मिळविण्याची कायद्यानें व रूढीनें पूर्ण मुभा दिलेली आहे. मोठमोठ्या औद्योगिक व व्यापारी शहरांतील मजूरवर्गाच्या मूळ स्थानाचें व मनोवृत्तीचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास अशा प्रकारचा बदल झपाट्यानें होत आहे हें स्पष्ट दिसेल. घरगुती नोकर, बिनकसबी सामान्य मजूर, कारखान्यांतील कामगार ह्या सर्वांस त्यांच्या आर्थिक महत्त्वाची जाणीव वाढत्या प्रमाणावर होत असून स्वतंत्रतेनें वागण्याची व घासाघीस करून मिळेल तेवढें अधिक वेतन कमविण्याची प्रवृत्ति त्यांमध्यें दिसून येत आहे. सरकारनेंही कारखाने, अपघात, संप इत्यादि बाबतींत अनेक कायदे केलेले आहेत व आपल्यास सरकारच्या मार्फत मालकांकडून अगर एकंदर समाजाकडून कांहीं 'हक्क' मिळावयाचे आहेत ही कल्पना मजूर वर्गाच्या अधिक परिचयाची होऊं लागली आहे.

सामान्य मजूर वर्गाच्या मनोरचनेंत व त्यांस उपलब्ध असलेल्या औद्योगिक सवलतींत असा इष्ट फरक घडून येत आहे, तरी आसामांतील चहाच्या मळ्यावर काम करणाऱ्या मजूरांसारखे कांहीं कामकरी अजूनही आर्थिक दृष्ट्या पूर्णपणें स्वतंत्र झालेले नाहींत. मळ्यांचे मालक आजूबाजूच्या प्रांतांतून मध्यस्थांच्या मार्फत अशिक्षित व भोळसर मजुरांचा ( कूलीचा ) भरणा करीत, व एकदां मजूर मळ्यावर आला म्हणजे तो जवळ जवळ पूर्णपणें मळेवाल्याचा गुलाम बने. ह्या बाबतींत

सरकारनेंच पहिल्या प्रथम कांही विशिष्ट कायदे करून मळेवाल्यांस विशेष अधिकार दिलेले होते. परंतु मजूरांवर होणाऱ्या अमानुष अन्यायाविरुद्ध चळवळ सुरू झाल्या-पासून सरकारनें हळू हळू मक्तेदारांमार्फत कूलीचा मुदतशीर करारानें भरणा कर-ण्याची व कूलीनें काम करण्याचें नाकारल्यास तो गुन्हा समजण्याची पद्धत नाहींशी केली आहे. हल्लींही आसामांतील चहाच्या मळ्यांतील कामकऱ्यांबद्दल स्वतंत्र कायदेशीर व्यवस्था असून तिच्यावर देखरेख करण्यासाठी सरकारने एक स्वतंत्र बोर्ड नेमिलें आहे. मुदतबंदीच्या करारानें मक्तेदारांमार्फत भरणा होणाऱ्या मजूरांच्या बाबतीत उत्पन्न होणाऱ्या अडचणी फिजी, नाताळ, त्रिनिदाद, ब्रिटिश ग्यायना, जमेका वगैरे वसाहतीत जाणाऱ्या हिंदी मजुराच्यासंबंधात विशेषच तीव्र स्वरूपाच्या असत. ह्या पद्धतीबद्दलही पुष्कळ चळवळ झाल्यानें अलीकडे ती बहुतेक बंद झालेली आहे. तरीही सीलोन व स्ट्रेट सेटलमेंट ह्या वसाहतीत हिंदी मजूर मोठ्या प्रमाणावर अजूनही जातात. हे मजूर सामान्यतः निकृष्ट वर्गाचे असून त्यांजकडून वसाहतीत करून घेतलीं जाणारी कामेंही अत्यंत हलक्या प्रतीचीं व कमी वेतनाचीं असतात. शिवाय, राजकीय दृष्ट्याही वसाहतीतील हिंदी लोकास अगदीच कमी प्रतीचे लेखण्यांत येऊन त्यांजवर अपमानकारक अशी सामाजिक बंधनेंही अनेक वसाहतीत घातलेली आहेत. हिंदुस्थानची आर्थिक परिस्थिति खालावल्यानें येथील लोकांनी परदेशीं जावें व वसाहतवाल्यांचें सामाजिक गुलाम ह्या नात्यानें हलक्या प्रतीची कामें करून पोट भरण्याचा त्याजवर प्रसंग यावा ही गोष्ट हिंदी लोक व सरकार ह्यास सारखीच लज्जास्पद व चीड आणणारी आहे. ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व वसाहतींच्या प्रतिनिधींची ह्या बाबतीत सभा होऊन मुदतबंदीची पद्धत पूर्णपणें मोडून टाकण्याचें व परदेशाहून येणाऱ्या मजूरांवर शक्य तेवढी कमी नियंत्रणें घालण्याचें धोरण त्या सभेनें मान्य केलेलें आहे. काहीं वसाहतीत हिंदी मजूरांस जोराची मागणी असून आपखुषीनें तेथें जाऊन काम करणाऱ्यांस पुरेसें वेतन व इतर सवलती देण्याची त्यांस जरूरी भासते. शिवाय, त्यांची राहण्याची वगैरे नीट व्यवस्था लावण्यास व त्यांस चांगल्या तऱ्हेनें वागविण्यास तेथील सरकार तयार असतें. अशा वसाहतीत हिंदी मजुरास जाऊं दिल्यास त्यांची आर्थिक स्थिति सुधारून येथील धंद्यावरील ताण कमी होतो, हें ध्यानांत घेऊन हिंदुस्थानसरकारनें अशा विशिष्ट वसाहतीस आपखुषीनें जाणाऱ्या मजूरांस पाठविण्याची मुभा ठेविली असून तेथें कराराप्रमाणें त्यांचे हक्क अंमलांत येत आहेत किंवा नाहीं हें पाहण्यास आपले अधिकारीही नेमलेले आहेत. तरी अजूनही बहुतेक वसाहतींत हिंदी लोकांवर अन्यायमूलक नियंत्रणें असून हिंदुस्थानाचा राजकीय व आर्थिक दर्जा सध्यांहून अधिक समाधानकारक होईपर्यंत वसाहती व परराष्ट्रें ह्यांमध्यें राहणाऱ्या हिंदी मजूरांचा प्रश्न कायमचा सुटाव-याचा नाहीं.

**७ मजूरीचे दर**—शेतकीच्या प्रमुख धंद्यांत व अनेक लहानसहान घरगुती धंद्यांत जे मजूर मोलानें काम करतात, त्यांच्या मजूरीच्या दरांचे विश्वसनीय

आंकडे मिळणें दुरापास्त आहे. परंतु निरनिराळ्या भागांतील मजुरांच्या सामान्य आर्थिक परिस्थितीसंबंधानें जी माहिती अनेक मार्गांनी उपलब्ध होते तिजवरून व कांहीं ठिकाणीं प्रत्यक्ष चौकशी करून शेतींत व लहानसहान धंद्यांत काम करणाऱ्या मजुरांचें वेतन स्थूल मानानें अजमावतां येतें. अर्थातच मजुरीची रक्कम किती आहे व मजुरांस लागणाऱ्या उपयुक्त वस्तूंचे भाव कसकसे आहेत ह्या दोन्ही प्रश्नांच्या उत्तरावरूनच मजुरीचे 'वास्तविक' दर ठरविणे आवश्यक असतें.[1] खेडेगांवांतील बाजारभावांबद्दलही निश्चित माहिती मिळणें कठीण असतें व अजूनही कित्येक ठिकाणीं मजुरांचें वेतन त्यांस अंशतः वस्तूंच्या स्वरूपांत देण्याचा प्रघात अस्तित्वांत आहे. त्यांतल्या त्यांत मोठमोठ्या शहरांत व संघटित धंद्यांत मिळणाऱ्या मजुरीबद्दल आंकडेवार माहिती अधिक समाधानकारक असते. ह्या सर्व माहितीवरून कांहीं वर्षांपूर्वी सरकारतर्फे झालेल्या एका चौकशीचा असा निष्कर्ष होता कीं एकंदरीनें हिंदुस्थानांत मजुरीचें मान वाढलें आहे. शेतींत काम करणाऱ्या मजुरांच्या कमाईत उद्योगधंद्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या कमाईतील वाढीपेक्षां अधिक वाढ झालेली आहे असेंही त्या चौकशीवरून दिसून आलें. मध्याच्या शतकाच्या सुरुवातीपासून महायुद्धाच्या सुरवातीपर्यंत मजुरीच्या द्रव्यमय व वास्तविक दरांत शेंकडेवारीनें किती वाढ झाली हे पुढील आंकड्यावरून स्पष्ट होईल.

| | मजुरीची रक्कम | | वास्तविक मजुरी | |
|---|---|---|---|---|
| | १९०० | १९१२ | १९००-०४ | १९१२ |
| खेडेगावें | | | | |
| शेतीतील मजूर | १२५ | १८९ | १२० | १३२ |
| खेडेगावांतील कारागीर. | १२७ | १९१ | १२२ | १३८ |
| सरासरी. | १२६ | १९० | १२१ | १३८ |
| नगरें. | | | | |
| कसबी मजूर | १२२ | १८३ | ११९ | १३४ |
| सामान्य मजूर | १२१ | १९८ | १२२ | १४५ |
| घरगुती नोकर | ११७ | १५९ | ११३ | ११६ |
| सरासरी. | १२३ | १८१ | ११८ | १३३ |
| मोठी शहरें. | | | | |
| कसबी मजूर. | १२२ | १७७ | १८१ | १३० |
| सामान्य मजूर. | १२३ | १७९ | ११७ | १३२ |
| घरगुती नोकर. | ११८ | १५९ | ११३ | ११६ |
| सरासरी | १२२ | १७४ | ११७ | १२८ |

१ पान १०१ पहा.

महायुद्ध सुरू झाल्यापासून किंमतींत व कारखानदार आणि व्यापारी ह्यांच्या कमाईत वाढ होऊं लागली, परंतु त्या मानानें मजूरीत तावडतोब वाढ होऊं शकली नाहीं. वाढत्या धंद्यामुळें व इन्फ्ल्युएंझाच्या साथीमुळें मजूरांचा पुरवठा मर्यादित होऊं लागला तेव्हां मात्र मजूरीचे दरही झपाट्यानें चढूं लागले व १९१८–१९ सालच्या दुष्काळामुळें खाण्याच्या पदार्थांचे भाव कडकले तेव्हां तर मजूरीत विशेषच वाढ झाली. महायुद्धाच्या काळांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या धंद्यातील मजूरास मिळणाऱ्या मजूरींत कसकसे फेरबदल होत गेले हें शेकडेवारीनें पुढील कोष्टकावरून दिसेल.

| धंद्याचें नाव | १९१४ | १९१५ | १९१६ | १९१७ | १९१८ |
|---|---|---|---|---|---|
| कापूस, मुंबई | १०० | १०३ | १०३ | १०६ | १२९ |
| लोकर, कानपूर | १०० | ११२ | १०८ | ११७ | ११८ |
| कोळशाच्या खाणी, बंगाल | १०० | १०० | १०० | १०८ | ११६ |
| चहा, आसाम | १०० | १०२ | १०३ | १०९ | ११९ |
| दारू गाळणें, पंजाब | १०० | १०१ | १०९ | १२१ | १३० |
| ताग, बंगाल | १०० | १०१ | १०० | १०१ | १०३ |
| कागद, बंगाल | १०० | ९९ | ९९ | ९९ | १०० |
| तांदूळ, रंगून | १०० | १०० | १०० | १०० | १०० |

मुंबई शहरांतील कापसाच्या गिरण्याच्या धंद्यातील मजूरांच्या कमाईच्या रकमेंत व त्यांच्या वास्तविक मजुरींत १९१४ ते १९२१ ह्या सालांत शेंकडेवारीनें किती वाढ झाली हें पुढील कोष्टकावरून स्पष्ट होईल.

| | मजूरीची रक्कम | | वास्तविक मजूरी | |
|---|---|---|---|---|
| | १९१४ | १९२१ | १९१४ | १९२१ |
| पुरुष | १०० | १९० | १०० | ११४ |
| बायका | १०० | १७३ | १०० | १०४ |
| मुलें | १०० | १९२ | १०० | ११५ |
| सर्व कामकरी | १०० | १८७ | १०० | ११२ |

१९१३ सालच्या मानानें मुंबई इलाख्यांत शेतीच्या धंद्यांत गुंतलेल्या मजूरांच्या कमाईंत गेल्या सहा सात वर्षांत किती वाढ झालेली आहे त्याबद्दलचे पुढील आंकडे उद्बोधक आहेत.

( १९१३ सालचे दर १०० बरोबर धरले आहेत. )

| वर्ष | शहर गांवे | | | खेडें गांवे | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | शेतावरील मजूर | सामान्य मजूर | कसबी मजूर | शेतावरील मजूर | सामान्य मजूर | कसबी मजूर |
| १९२१ | १७९ | १८४ | १८० | १५९ | १४८ | १६६ |
| १९२२ | १८९ | १९२ | १९५ | १७० | १६२ | १७९ |
| १९२३ | २०० | २०० | १९६ | १७१ | १७१ | १८७ |
| १९२४ | १९५ | १९६ | २०९ | १७६ | १८१ | १९१ |
| १९२५ | २२१ | २०८ | २२४ | २०६ | १८१ | २११ |
| १९२६ | २२१ | २०४ | २१६ | १९४ | १८१ | २१५ |
| १९२७ | २०० | १९२ | २११ | १७६ | १७६ | २०६ |

महायुद्धाच्या काळापासून आज तागायत अनेक लहान मोठ्या धंद्यांत संपांचें सत्र चालू असून किंमतीच्या मानांत होणारी वाढ व मजूरांच्या पुरवठ्यांतील तुटवडा ह्याचा फायदा घेऊन सरकारी व खाजगी नोकर आणि अनेक दर्जाचे शेतकीं-तील व उद्योगधंद्यांतील मजूर ह्यांनीं आपल्या कमाईंत वाढ करून घेतली. गेल्या पांच पंचवीस वर्षांत हिंदुस्थानांतील व्यापार धंद्यांत व कारखान्यांत बरीच वाढ झालेली असल्यानें सर्व प्रकारच्या मजूरांस असलेली मागणी व त्यांचें वेतन ही सामान्यतः चढीचीं आहेत. विशेषतः एका ठिकाणचे मजूर दुसऱ्या ठिकाणीं नेणें दुर्घट असल्यानें विवक्षित ठिकाणी मजूरांच्या मर्यादित पुरवठ्यामुळें मजूरीचे दर चढीचे राहूं शकतात. मजूरीच्या रकमेंतील वाढीप्रमाणें किंमतीचें मानही वाढतें असल्यानें राहणीच्या मानांत वास्तविक सुधारणा म्हणण्यासारखी झालेली नाही. पुण्यासारख्या शहरांत तीस—पस्तीस वर्षांपूर्वी चार आणे रोजानें गडी मिळत, त्यावेळीं बाजरी रुपयाला १६ शेर, व तांदुळ १० शेर मिळत असत. घरभाडें, गोडें तेल, जळण,

कापड इत्यादिकांचीही स्वताई असल्यानें सामान्य मजूराचें चार आण्यांत भागत असे. आतां बाजरीची धारण सहा शेरावर व तांदुळाची तर चारच शेरावर येऊन बसल्यानें मजूरांनीं रोज दहा बारा आणे मजूरी मिळविल्यास आश्चर्य नाही व ह्या वाढत्या वेतनापासून त्यांचें राहणीचें मान विशेष सुधारलें असेंही म्हणतां यावयाचें नाही. शहरांतील व मोठमोठ्या उद्योग धंद्याच्या केंद्रांतील मजूर दिवसानुदिवस अधिक हुशार व संघटित होत असल्यानें किंमतीच्या मानांतील वाढीपेक्षांही मजूरीच्या रकमेंत कांहींशी अधिक वाढ करून घेणें त्यांस शक्य झालें आहे. मुंबई शहर व मुंबई इलाखा ह्यामधील कांही प्रमुख धंद्यांतील मजूरांच्या राहणीच्या खर्चांत, त्यांस मिळणाऱ्या मजूरीच्या रकमेंत व त्यांच्या वास्तविक मजूरींत १९१४ सालाच्या मानानें १९२१ मध्यें कसकसे फेरफार झाले ह्यासंबंधीचे आंकडे खाली दिले आहेत:—

( १९१४ सालचे आंकडे १०० बरोबर धरले आहेत. )

| | राहणीचा खर्च | मजूरीची रक्कम | वास्तविक मजूरी |
|---|---|---|---|
| पुरुष कामकरी | | | |
| गिरण्यांतील कामगार | | | |
| रोजंदारीचे मजूर | १६२ | १८९ | ११७ |
| उक्त्या कामाचे मजूर | १६२ | १७४ | १०८ |
| इंजिनें व इमारती ह्यांवरील माणसें | १६२ | १८३ | ११३ |
| स्टोअर व वखार खातें | १६२ | १६६ | १०३ |
| रामोशी | १६२ | २०४ | १२६ |
| कारकून | १६२ | १९२ | ११९ |
| स्त्री कामकरी | | | |
| रोजंदारीचे मजूर | १६२ | १५९ | ९९ |
| उक्त्या कामाचे मजूर | १६२ | १६९ | १०५ |
| झाडूवाल्या | १६२ | १८७ | ११६ |
| मुलें | | | |
| पूर्ण दिवस | १६२ | १८० | ११२ |
| अर्धा दिवस | १६२ | १८५ | ११५ |

## खेडेगांवांतील मजूरांची कमाई

( १९०० सालचे आंकडे १०० बरोबर धरले आहेत. )

| सन | राहणीच्या खर्चांत वाढ | मजूरीच्या किंमतीत वाढ | | | वास्तविक मजूरीतील वाढ | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | शेतातील मजूर | सामान्य मजूर | कसबी मजूर | शेतातील मजूर | सामान्य मजूर | कसबी मजूर |
| १९१४ | ११७ | १८० | १८३ | १३३ | १५४ | १५६ | ११४ |
| १९२१ | १९५ | २७० | २५८ | २१७ | १३८ | १३२ | १११ |
| १९२२ | २०० | २९० | २८३ | २३३ | १४५ | १४३ | ११७ |

**८ हिंदी कारखान्यांसंबंधीं कायदे**:—मोठमोठ्या शहरांतील कारखान्यांत व इतर उद्योगधंद्यात काम करणाऱ्या मजूरास सामान्यतः शेतीत गुंतलेल्या व खेडेगांवातील मजूरांहून अधिक मजूरी मिळते. परंतु शहरांतील दाट वस्ती, कारखान्यांतील कंटाळवाणे व दीर्घकालपर्यंत करावयाचे काम, कौटुंबिक जीवनाचा अभाव इत्यादि बाबतीत शहरवासी मजूरांची स्थिति खेड्यांतील मजूरापेक्षा पुष्कळच असमाधानकारक असते. विशेषतः यांत्रिक साधनानी चालणाऱ्या प्रचंड कारखान्यांत कामकऱ्यांस प्रमाणाबाहेर राबविण्याची व अशुद्ध आणि कोंदट हवेंत व धोक्याच्या वातावरणात त्यांस काम करावयास लावण्याची अदूरदर्शी मालकांस नेहमी संवय असते. ह्या प्रकारच्या स्वार्थी भांडवलवाल्यांपासून समाजहितवर्धनाच्या दृष्टीने मजूरांचें संरक्षण करण्याची सर्व सुधारलेल्या राष्ट्रांस आवश्यकता वाटते.[१] १८५१ मध्यें मुंबईस पहिली कापसाची गिरणी स्थापिली गेली व क्रमाक्रमानें गिरण्यांची संख्या वाढत जाऊन ती १८८० मध्यें ५८ वर गेली. त्या वर्षी कापसाच्या गिरण्यात काम करणाऱ्या मजूरांची संख्या सरासरीनें ३९,५०० एवढी होती. सन १८७५ च्या पूर्वी कांही वर्षे इंग्लंडमध्यें कारखान्यांतील मजूरांबाबत कायदे करून मालकांवर अनेक बाबतीत मजूरांच्या संरक्षणाची जबाबदारी टाकण्याची चळवळ जोरांत चाललेली होती. त्या चळवळीमुळें विलायती गिरण्यांच्या मालकांवर अनेक नियंत्रणें टाकण्यांत आलीं होतीं. हिंदी गिरण्यांतील मजूरांसंबंधी तशी नियंत्रणें नसल्यानें येथील गिरणीवाल्यांस अप्रत्यक्षपणें त्यांच्या

१ पान ११ पहा.

धंद्यांत साहाय्य मिळतें अशी मँचेस्टरच्या गिरणीवाल्यांची तक्रार सुरू झाली व ती न्याय्य आहे असें इंग्लंडांतील पुढाऱ्याचेंही मत बनलें. मुंबईच्या गिरण्यांतील मजूरांच्या काम करण्याच्या पद्धतीविषयी चौकशी करून तिचें कायदेशीर नियमन कसें करावें हें सुचविण्याकरितां १८७५ मध्यें स्टेट सेक्रेटरीच्या हुकुमावरून एक कमिशन नेमण्यांत आलें. ह्या कमिशननें पुढील सूचना केल्या. '( १ ) यंत्रांभोंवतीं संरक्षक कुंपणें घालावीं. ( २ ) आठ वर्षांखालील मुलास गिरण्यांत कामावर लावूं नये. ( ३ ) आठ ते चौदा वर्षांच्या मुलास रोजी आठ तासाहून अधिक काम पडूं नये. ( ४ ) दिवसाचें काम विश्रांतीचा एक तास धरून बारा तासांहून अधिक असूं नये. ( ५ ) आठवड्यांतून एक दिवस कारखाना बंद रहावा. ( ६ ) प्रत्येक कारखान्यांत पिण्याच्या पाण्याची चांगली व्यवस्था राखावी.' कमिशननें फक्त मुंबईतील गिरण्या व कारखाने ह्यांची पाहणी करून आपल्या शिफारसी केल्या होत्या. हिंदुस्थानसरकारनें इतर प्रांतांतील कारखान्यांचीही चौकशी करून व कमिशनच्या शिफारसीत काही फेरफार करून १८८१ चा हिंदी कारखान्यांबद्दलचा पहिला कायदा पास केला. वयांत आलेल्या मजूरांच्या कामाचे तास नियमित करण्यासंबंधींची कमिशनची शिफारस सरकारनें मान्य केली नाही. सात ते बारा वर्षें वयाच्या मुलांना मात्र रोजीं नऊ तासाहून अधिक काम पडूं नये व सात वर्षांखालील मुलास कारखान्यांत कामावर घेऊं नये असा ह्या कायद्यानें निर्बंध घातला. यंत्रांना कुंपणें घालणें व अपघाताची सरकारास वर्दी देणें ह्याबद्दलही कारखानदारावर कांहीं नियंत्रणें घालण्यात येऊन प्रांतिक सरकारांस कारखान्यांची तपासणी करण्याचे विशेष अधिकार देण्यांत आले. ज्या कारखान्यात यांत्रिक शक्तीचा उपयोग केला जात असेल व जेथें एका वेळी शंभराहून अधिक मजूर कामास लावले जात असतील अशा कारखान्यांसच हा कायदा लागू व्हावयाचा होता. कायद्याचे कार्यक्षेत्र व त्यामुळें कारखानदारावर घातली जाणारी नियंत्रणें ह्या दोन्ही बाबतींत १८८१ चा कायदा किती मर्यादित स्वरूपाचा होता, हें वरील कलमांवरून दिसून येईल.

हिंदी मजूरांचे परोपकारशील मित्र व हिंदी गिरण्यांस चुकून काही विशेष उत्तेजन मिळतें किंवा काय हें डोळ्यांत तेल घालून पाहणारे मँचेस्टरचे गिरणीवाले ह्यांस वरील नियंत्रणें अपुरी वाटून ती अधिक विस्तृत व दृढ होण्याबद्दल त्यांनीं खटपट करावी ह्यांत आश्चर्य नाही. १८८४ सालीं मुंबई सरकारनें एक कमिटी नेमून गिरण्यांतील मजूरांच्या स्थितीची पुन्हां पाहणी करविली. तसेंच, सरकारच्या आरोग्यखात्यामार्फत व एका खास कमिटीकडून गिरणीतील कामकऱ्यांच्या शरीरप्रकृतीसंबंधाने चौकशी केली गेली. १८८१ मध्यें विलायत सरकारच्या कारखान्यांची एका पाहणी करणाऱ्या अधिकाऱ्यानें हिंदी कारखान्यांची पाहणी करून कांहीं सूच-

नाहीं केल्या होत्या. परंतु हिंदुस्थानसरकार इंग्लंडांतील कारखान्यांवर असलेलीं सर्व नियंत्रणें हिंदी कारखान्यांवर टाकण्यास नाकबूल असल्यानें स्टेट सेक्रेटरी व मँचेस्टरचे गिरणीवाले ह्यांच्याशीं त्याचा बराच मतभेद झाला. १८९० मध्यें कारखान्यांसंबंधी सर्व प्रकारची चौकशी करून, १८८१ च्या कायद्यांत कोणत्या सुधारणा कराव्या ह्याबद्दल शिफारशी करण्याकरतां एक स्वतंत्र कमिशन नेमण्यांत आलें. ह्या कमिशनच्या शिफारशीवरून १८९२ चा कारखान्यांसंबंधींचा कायदा पास करण्यांत आला. ह्या कायद्यांत पुढील महत्त्वाच्या गोष्टींचा अंतर्भाव करण्यांत आला. '( १ ) ज्या कारखान्यांत यांत्रिक शक्तीचा उपयोग होत असेल व जेथें ५० अगर अधिक कामकरी एकदम काम करीत असतील अशा कारखान्यांस हा कायदा लागू व्हावयाचा होता. प्रांतिक सरकारास किमान कामकऱ्यांची ही मर्यादा विशिष्ट बाबीत वीसपर्यंत उतरविण्याची कायद्यानें मुभा दिली होती. ( २ ) मुलांचें किमान वय ९ व कमाल १४ ठरविण्यांत येऊन त्यांस पहाटे पाच व रात्री आठपर्यंतच केव्हां तरी कामास लावलें पाहिजे व त्यांचे दररोजचे कामाचे तास सातांहून अधिक असतां कामा नयेत असें बंधन घातलें गेलें. ( ३ ) स्त्रीकामकऱ्यांसही ह्याच म्हणजे पहाटे पांच ते रात्री आठ ह्या वेळांत काम करण्यास सामान्य परवानगी ठेवण्यात आली व त्यांचे कामाचे कमाल तास ११ ठरविण्यांत आले. ( ४ ) मुलांचे दिवसाचे एकंदर कामाचे तास सहा अगर सहांहून अधिक असल्यास त्यांस अर्धा तास व बायकांचे एकंदर तास ११ असल्यास त्यांस दिडतास मधली विश्रांति देण्यांत यावी अशी व्यवस्था झाली. ( ५ ) कारखाना आठवड्यांतून एक दिवस बंद रहावा व दुपारीं बारा ते दोन पर्यंत केव्हातरी अर्धा तास काम बंद रहावें ह्या कलमांचा मुलें व बायका ह्यांबरोबर मोठ्या पुरुष कामकऱ्यांसही फायदा मिळाला. शिवाय, ( ६ ) स्वच्छता, शुद्ध हवेचा पुरवठा इत्यादि बाबतीतही ह्या कायद्यानें कारखानदारांवर कांहीं नियंत्रणे टाकली.'

ह्याच सुमारास डंडी येथील तागाच्या गिरण्यांस बंगालमधील तागाच्या कारखान्यांची स्पर्धा जाणवूं लागली होती व बंगाल्यांतील कारखान्यांत बायकांस रात्रीं कामाला लावण्यांत येत असल्यानें आपणांवर अन्याय होतो अशीही त्यांनीं स्टेट सेक्रेटरीकडे तक्रार केली. कलकत्त्याचे तागाचे कारखानदारही ब्रिटिश होते व त्यांनी डंडी येथील कारखानदारांच्या ह्या उठाठेवीचा जोरानें निषेध केला. बंगालचें प्रांतिक सरकार व हिंदुस्थानसरकार ह्यांनीही तागाच्या कारखान्यांवर विशेष नियंत्रणें घालण्याची जरूरी नाहीं असाच निकाल दिल्यानें कारखान्यासंबंधींचे कायदे अधिक बंधनकारक करण्याचा परकी कारखानदारांचा हा प्रयत्न फसला. परंतु १९०६ साली इंग्लंडमध्यें उदार मतवादी पक्ष अधिकारारूढ झाल्याचा फायदा घेऊन तेथील कारखानदार व मजूरसंघ ह्यांनी हिंदुस्थानांतील मजूरांच्या संरक्षणार्थ अधिक

जोरानें खटपट चालविली. १९०४-५ च्या सुमारास हिंदी गिरण्यांच्या मालास वाढती मागणी असल्यानें ती भागविण्यास गिरण्या दररोज १४–१५ तासही चालू ठेवण्यास मालक उद्युक्त झाले व त्याच वेळी विजेचा प्रकाश गिरण्यांस मिळाल्यानें तसें करणें त्यांस शक्यही झालें. ह्या प्रकाराबद्दलही सर्वत्र गवगवा होऊन हिंदी कारखान्यामधील कामाच्या पद्धतीची चौकशी करून कायद्यांत करावयाच्या जरूर त्या सुधारणा सुचविण्याकरितां १९०६ साली एक कमिटी व १९०७ साली एक कमिशन नेमण्यांत आलें. हिंदुस्थानांतील परिस्थिति इंग्लंडाहून भिन्न आहे, विशेषतः हिंदी मजूर एक सारखा फार वेळ काम न करतां अधून मधून विश्रांति घेतो व कामांत टंगळमंगळ करतो हें कारखानदारांचें मत कमिशनला मान्य होऊन हिंदी कारखान्यांचे कामाचे कमाल तास ठरवितांना ह्या गोष्टीचा विचार करणें आवश्यक आहे असेंच त्याचें म्हणणे होतें. कमिशनच्या सभासदांपैकी बहुसंख्याकाचें मत असें पडलें की पुरुष कामकऱ्यांच्या कामाच्या तासांवर कायदेशीर नियंत्रणें घालूं नयेत. परंतु कमिशनच्या शिफारशीचा १९११ सालच्या कायद्यांत पुढीलप्रमाणें अंतर्भाव झाल्यानें अप्रत्यक्षपणें पुरुष कामकऱ्यांच्या कामाचे तासही मर्यादित झाले. '(१) १४ ते १७ वर्षें वयाच्या कामकऱ्यांचा एक नवा वर्ग निर्माण करावा व ह्या वर्गास रोजीं बारांहून अधिक तास काम देऊं नये. (२) स्त्री कामकऱ्यांसही सर्व बाबतीत ह्या नव्या वर्गाप्रमाणें वागविलें जावें, (३) मुलांचे कामाचे तास रोजीं ६ हून अधिक असूं नयेत. (४) कापसाच्या व तागाच्या गिरण्यांतलि पुरुष कामकऱ्यांनाही १२ तासांवर काम करावयास लागूं नये.' ह्या शेवटल्या शिफारशीबद्दल गिरण्यांच्या मालकांत बराच असंतोष पसरला व ब्रिटिश प्रतिस्पर्ध्यांच्या अन्यायमूलक चळवळीस बळी पडूनच हिंदुस्थानसरकारनें आपल्या-वर नियंत्रणें घातली अशी तक्रार करण्यास त्यानी सुरुवात केली. हिंदुस्थानांतील मजूरांसबंधीच्या कायद्यांत सुधारणा घडवून आणण्यासाठी हल्ली जी चळवळ चालू आहे तिला ब्रिटिश कारखानदार व मजूरसंघ ह्यांचा जो प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष पाठिंबा मिळतो तोही बहुतेक स्वार्थमूलक आहे अशी येथील कारखानदाराची तक्रार आहे. तसेच, हिंदुस्थानांतलि राजकीय पक्ष मजूरांसंबंधीच्या कायद्यांस नेहमी पाठबळ देतात तेंही सामान्य जनतेची लोकप्रियता संपादण्याकरितां होय व अशा राजकीय हेतूंनी उद्योगधंद्यांवर नियंत्रणें घालणें हें राष्ट्राच्या आर्थिक प्रगतीस विरोधक आहे असाही हिंदी भांडवलवाल्यांचा एक आक्षेप असतो. परकी भांडवलवाले व मजूरसंघ ह्यांच्या पुरता हा आक्षेप कांहींसा खराही आहे, तरी अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय स्वरूपाच्या अशा अनेक चळवळीच्या साहाय्यासेरीज हिंदी कारखानदारांनी आपण होऊन मजूरांच्या स्थितीत योग्य सुधारणा घडवून आणली असती असें म्हणवत नाहीं.

**१ हिंदी मजूरसंघः**—पाश्चात्य राष्ट्रांतील सरकारांनी आपापल्या देशांतील मजूरांच्या हितसंवर्धनार्थ ज्या अनेक कायदेशीर व्यवस्था केलेल्या आहेत त्यांचें बहुतेक श्रेय त्या त्या राष्ट्रांतील मजूरांच्या संघटित चळवळीस दिलें पाहिजे. हिंदी मजूरांत संघटनेस नुकताच प्रारंभ होत आहे एवढेंच नव्हे तर खरा 'मजूर' वर्गही येथें अजून पूर्णपणें अस्तित्वांत आलेला नाहीं. कारखान्यांतील मजूर वारंवार खेडेगांवी जाऊन शेतकीस मदत करीत असल्यानें विशिष्ट उद्योगधंद्यांस कायमचा वाहिलेला असा मजूर वर्ग येथें फारसा दिसत नाहीं. शिवाय, मजूरांचें सर्वसामान्य अज्ञान एवढें असतें कीं त्यांची संघटना करणें परवा परवापर्यंत अशक्य-प्राय वाटे. आगगाड्या, पोस्ट व तारखातें वगैरे धंद्यात गुंतलेल्या साधारण सुशि-क्षित व सुस्थितीतील कामकऱ्यांची संघटना यशस्वी होणें सुलभ असतें. अलीकडे ह्या धंद्यांतील कामकऱ्यांस मिळणारें वेतन इतर धंद्यांच्या मानानें समाधानकारक दिसतें तें त्यांच्या संघटित प्रयत्नाचेंच फळ होय. इतर धंद्यात मात्र विस्कळित स्वरूपाचे लहानसहान संघ चालविण्याकरिता अस्तित्वात आलेल्या अनेक संस्था-कडून व सामान्य नागरिकांपैकीं कांहीं सद्गृहस्थांकडून संघटनेकरिता व मजूरांची स्थिति सुधारण्याकरितां कित्येक वर्षे खटपट होत असे. मुंबई, अहमदाबाद, कलकत्ता, जमशेदपूर, मद्रास व गिरण्या आणि कारखाने ह्यांच्या इतर बहुतेक केंद्रांत अलीकडे मजूरांची संघटना व्यवस्थितपणें चालू आहे. विशिष्ट प्रांतांतील व एकंदर हिंदुस्थानांतील मजूरसंघाचें संघटनेंही होत असून अंतर्राष्ट्रीय मजूरपरिषदेकरिता हिंदी कामगारवर्गा-तर्फे प्रतिनिधी निवडण्याची महत्त्वाची जबाबदारी मजूर संघाच्या राष्ट्रीय सभेकडेच असून मजूर संघटनेपैकीं मध्यवर्ती संस्था ह्या नात्यानें ती आज मान्यता पावलेली आहे. मजूरांच्या ह्या सर्वसामान्य मध्यवर्ती संस्थेखेरीज आगगाड्या, पोस्ट इत्यादि विवक्षित धंद्यांच्याही अखिल भारतीय संस्था आहेत. ह्या संस्थांचे बहुतेक चालक नोकर वर्गाच्या बाहेरचे आहेत, तरी लहान लहान मजूर संघांत व मध्यवर्ती संस्थांत कामगारवर्गा-पैकीं कांहीं लोक अलीकडे जबाबदारीच्या जागांवर कामें करीत आहेत. हिंदुस्थानां-तील मजूर संघांची एकंदर संख्या १७० असून जवळ जवळ अडीच लाख मजूर-त्यांचे सभासद आहेत. एकट्या मुंबई शहरांतच बारा सुसंघटित संघ असून त्यांच्या सभासदांची संख्याही वाढती आहे. अहमदाबादेस मजूरसंघ विशेष प्रबल असून त्यांची सांपत्तिक स्थिति इतर ठिकाणच्या मजूर संघांच्या मानानें समाधान-कारक आहे व त्यांची संयुक्त संघटनाही झाली आहे. सभासदांस अनेक प्रकारांनीं आर्थिक मदत करणें, शाळा व इस्पितळें चालविणें असलीं विधायक कामेंही ह्या संघां-कडून केलीं जातात. कायमचे सभासद, नियमित वर्गणी, कार्यक्षम कार्यकारी मंडळें, आणि विधायक व प्रतिबंधक मार्गांनीं मजूरांची स्थिति सुधारण्याची एकसारखी खटपट ह्या बाबतींत हिंदी मजूरसंघांच्या संघटनेंत पुष्कळ सुधारणा अर्थातच अजून व्हावयास पाहिजे. मजूरसंघांस कायदेशीर अस्तित्व प्राप्त व्हावें

व संपासारख्या समर्थनीय स्वरूपाच्या कामगिरीकरतां कराव्या लागणाऱ्या कांही आनुषंगिक चळवळीस सामान्य दिवाणी व फौजदारी कायद्याचा बाध येऊं नये ह्यास्तव मजूरसंघाच्या नोंदणीचा स्वतंत्र कायदा असणें इष्ट असतें.[1] इंग्लंड व इतर राष्ट्रें ह्यांच्या कायद्यांच्या धर्तीवर त्यांत जरूर ते फेरबदल करून १९२६ सालीं संघ नोंदणीचा कायदा हिंदुस्थानांतही पास झालेला आहे. मजूरसंघाची घटना, कार्यकारी मंडळांचे सभासद, संघांच्या पैशाचा विनियोग, इत्यादि बाबतीत नोंदलेल्या संघांवर कांही विशिष्ट नियंत्रणें असतात. नोंदलेल्या संघास धंद्यातील तंटे तोडून घेण्यास अगर संप करण्यास आवश्यक असलेल्या गोष्टी करताना दिवाणी व फौजदारी कायद्यांची अडचण येऊं नये अशी व्यवस्था केलेली आहे. एखाद्यानें कामगारास कामावर जाऊं नका असें सांगितल्यास त्याजवर दिवाणी दावा करून सामान्य कायद्याप्रमाणें मालकास नुकसानभरपाई घेतां येते. तसेंच दिवाणी कायद्याच्या दृष्टीनें आक्षेपार्ह असलेलें हें कृत्य संघटितपणें करणें व पिकेटिंग वगैरे करून कामगारास अडथळा करणे हे फौजदारी कायद्यान्वये गुन्हे ठरतात. मजुरांची संघटना होऊन त्याचा संप करण्याचा अधिकार त्यास उपभोगता यावा म्हणून वरील बाबतीत त्यांस कायद्यानें स्वतंत्रपणें ते हक्क बहाल केलेले आहेत.

**१० तडजोड व चौकशीः**—अलीकडे संपाची व त्यांमध्यें गुंतलेल्या कामगारांची संख्या झपाट्यानें वाढत आहे. मजूर सुसंघटित असले म्हणजे संप करणें अधिक सोपें होतें हें खरें. तरी संघटित मजुरांच्या संपाबद्दल तडजोड करण्याची कांही कायदेशीर व्यवस्था असल्यास संप लौकर व दोन्ही पक्षी अधिक समाधानकारकपणें मिटविणें शक्य होतें. संप करण्यापूर्वीही मालक अगर मजूर ह्यांस एखाद्या बाबतींत स्वतःवर अन्याय होतो असें वाटल्यास एखाद्या त्रयस्थाकडून पंचायत करवून घेता येते.[2] ह्या दोन्ही प्रकारची कांही तरी व्यवस्था येथील प्रांतिक अगर मध्यवर्ती सरकारनें करावी ह्याबद्दल कित्येक वर्षें चळवळ चाललेली होती. तिचें सत्फळ म्हणजे १९२९ सालच्या धंद्यातील तंट्याबाबतचा कायदा होय. ह्या कायद्यान्वयें सरकारला कोणत्याही तंट्याबद्दल तडजोड करण्याकरिता अगर नुसती चौकशी करून आपले निकाल प्रसिद्ध करण्याकरिता मंडळें नेमता येतात व ह्या मंडळांस लेखी व तोंडी पुरावा घेण्याचा अधिकार प्राप्त होतो. तडजोडीकरिता नेमावयाची मंडळें निदान एका पक्षाकडून तशी मागणी झाल्याखेरीज नेमतां येत नाहीत परंतु चौकशी मंडळ सरकार आपण हून च नेमूं शकतें. चौकशीमंडळ सामान्यतः त्रयस्थांचें असावयाचें असून तडजोड मंडळावर मात्र दोन्ही पक्षांचे प्रतिनिधी घेतले जातील. दोन्ही प्रकारच्या मंडळाचे निकाल केवळ शिफारसीच्या स्वरूपाचे असा-

---

१ पानें १०९—११३ पहा.

२ पानें ११७—१२१ पहा.

वयाचे आहेत व लोकमताचा त्यांस सक्रिय पाठिंबा मिळेल तरच ते परिणामकारक होतील हें उघड आहे. आगगाड्यांसारख्या सार्वजनिक जीवनास मूलभूत महत्त्वाच्या धंद्यांत ज्या नोकरांस महिनेवार पगार मिळतो त्यांनीं आगाऊ सूचना दिल्याखेरीज संप करणें व त्यांस तसा संप करावयास उत्तेजन देणें हीं दोन्हीं कृत्यें ह्या कायद्यानें गुन्हे ठरतात. स्वतःच्या धंद्याखेरीज इतर धंद्यांतील अन्यायाविरुद्ध सहानुभूतिमूलक संप पुकारण्याबद्दल किंवा सरकार अगर समाज ह्यांची महत्त्वाच्या बाबतींत गैरसोय करून त्यांच्या वजनाचा मालकांकडून मजुरांच्या मागण्या मान्य होण्यास उपयोग करून घेण्याच्या उद्देशानें संप करण्याबद्दल कांहीं नियंत्रणेंही १९२९ च्या कायद्यानें घातली आहेत. संपाची तीव्रता अलीकडे किती वाढत आहे हें मुंबई, जमशेदपूर, अहमदाबाद इत्यादि ठिकाणीं वारंवार होणाऱ्या मोठमोठ्या संपावरून सामान्य नागरिकाच्याही अनुभवास येत आहे. १९२९ सालच्या पहिल्या तिमाहीतील संपांबद्दल खालीं कांहीं आंकडे दिले आहेत त्यांवरून तडजोड व चौकशी करण्याची कायदेशीर व्यवस्था अंमलांत आणून मजूर, मालक व समाज ह्यांस भोगावा लागणारा त्रास व नुकसान चुकविण्याची किती जरूरी आहे हें दिसून येईल.

१

| प्रांताचें नांव | तट्यांची संख्या | तंट्यांत गुंतलेल्या कामकऱ्यांची संख्या | तंट्यांत फुकट गेलेले दिवस |
|---|---|---|---|
| मुंबई | २९ | ५१,१५७ | ५४२,४८८ |
| बंगाल | ७ | १८,५८५ | ११५,०१० |
| मद्रास | २ | ४,२०० | ३४,२०० |
| आसाम | २ | १,०३३ | २,०२७ |
| संयुक्त प्रांत | २ | १,११० | ३१,६९० |
| दिल्ली | २ | ४०० | १,२०० |
| ब्रह्मदेश | १ | ९०० | ९३,६०० |
| एकूण | ४५ | ७७,३८५ | ८२०,२१५ |

२

तंट्यांचीं कारणें.

| धंद्याचें नांव | मजुरी | बक्षिसी (बोनस) | व्यक्ती विषयक | रजा व नाम | इतर |
|---|---|---|---|---|---|
| कापसाच्या व लोकरीच्या गिरण्या | ८ | ० | १५ | ० | ६ |
| तागाच्या गिरण्या | ३ | १ | १ | ० | ० |
| यांत्रिक कारखाने | ० | ० | ० | १ | ० |
| आगगाड्यांचे कारखाने | १ | ० | ० | ० | ० |
| इतर | ४ | १ | ३ | ० | १ |
| एकूण | १६ | २ | १९ | १ | ७ |

३

तंट्यांचा निकाल.

| धंद्याचें नांव | मजुरांस अनकूल | अर्धवट अनुकूल | प्रतिकूल | तंटे चालू |
|---|---|---|---|---|
| कापसाच्या व लोकरीच्या गिरण्या | ५ | ५ | १४ | ५ |
| तागाच्या गिरण्या | १ | २ | १ | १ |
| यांत्रिक कारखाने | — | — | — | १ |
| आगगाड्यांचे कारखाने | — | — | १ | — |
| इतर | ४ | ३ | १ | १ |
| एकूण | १० | १० | १७ | ८ |

**११ मालकांची जबाबदारी**—मजूरात स्वावलंबन, आत्मविश्वास व कार्यक्षमता ह्यांचा परिपोष होण्यास त्यांची स्वतंत्र संघटना असणें हें सर्वथैव इष्ट व आवश्यक आहे. परंतु मजूर संघांनी आपापल्या न्याय्य मागण्याबद्दल मालकाशीं नेहमीं झगडत असावें व संप किंवा सार्वजनिक टीका ह्यांची आंच लागेपर्यंत कारखानदारांनीं मजूरांच्या सौख्याकडे व न्याय्य गरजांकडे दुर्लक्ष करावें हें समाजाहितविघातक होय. उदार मनाचे व धोरणी मालक आपल्या नोकर वर्गास नेहमीं

संतुष्ट राखण्याचा प्रयत्न करितात व सुखी कारागिरांकडून वाढत्या कार्यक्षमतेनें काम करून घेऊन आपलाही कार्यभाग साधतात. स्वतःच्या हक्कांविषयी जागृत झालेल्या मजूर वर्गाची वृत्ति सामान्यतः असल्या प्रयत्नांबद्दल साशंकतेची असणें साहाजिक आहे.[1] परंतु कारखानदारांनी संघटितपणें व विशेषतः सरकार व समाजहितवर्धक संस्था ह्यांच्या सहकार्यानें मजूरांच्या उपयोगी पडणाऱ्या अनेक वस्तूंचा व सोयींचा पुरवठा करण्याचें ठरविलें तर त्यामुळें मजूरांस त्यांची न्याय्य कमाई मिळून कारखानदारांचेंही वास्तविक नुकसान होणार नाही. सामान्य मजूर व कारखानदार हे दोघेही ह्या बाबतींत अज्ञ व बेफिकीर असतात. हिंदुस्थानांतील कारखानदारीच्या शहरांत राहण्याच्या, आरोग्याच्या, शिक्षणाच्या व इष्ट स्वरूपाच्या करमणुकीच्या सोयी पुरेशा नसल्यानें मजूरांची खेड्याबद्दलची आवड कायम राहते व धंद्याशी सर्वथा एकरूप झालेला कर्तबगार मजूरवर्ग उत्पन्न होऊं शकत नाही. व्यक्तिशः मालक, त्यांचे संघ, स्थानिक संस्था व सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकरितां अस्तित्वांत आलेल्या अनेक खाजगी संस्था ह्यांच्या परस्पर सहकार्यानें हवाशीर, स्वस्त व स्वतंत्र घरें, दवाखाने व रुग्णालयें, शाळा, सहकारी दुकानें व पेढ्या, करमणुकीचीं साधनें इत्यादि बाबतींत पुष्कळच सुधारणा होऊन मजूर अधिक सुखी व कार्यक्षम होणें अवश्यक आहे. विशेषतः, मुलें व बायका ह्यांच्या कामाबद्दल व कामावर नसतांना बाहेर तीं ज्या पद्धतीनें राहतात त्याबद्दल मालकांकडून सध्यापेक्षां अधिक आस्था बाळगिली जाणें आवश्यक आहे. स्त्री व पुरुष मजूरांनी कुटुंब करून कारखान्याच्या गावीं राहणें नैतिक व सामाजिक, तसेंच आर्थिक दृष्ट्याही इष्ट आहे. लहान मुलें बेकायदेशीरपणें कामास लावण्याची अनेक कारखानदारांस संवय असते. सरकारनें सध्याहून अधिक तपासणी अधिकारी नेमून व कांहीं खाजगी संस्थांची व व्यक्तींची तपासणीच्या कामीं मदत घेऊन ह्या व मजूरांच्या हिताच्या इतर बाबतींत मालकांकडून कायदेशीर नियंत्रणें पाळलीं जात आहेत ह्याबद्दल खात्री करून घेणें आवश्यक आहे. मद्रास, जमशेटपूर, नागपूर, मुंबई इत्यादि ठिकाणीं कांहीं कांहीं मालकांनी आपल्या मजूरांची अनेक बाबतींत सोय करण्याचें अंगावर घेतलेलें असून कांहीं खाजगी हिंदी व मिशनरी संस्थांचीही त्यास मदत आहे. परंतु ह्या दिशेनें मालकांकडून संघटित प्रयत्न व्हावे तेवढे झालेले नाहीत. मजूरसंघ व कारखानदारांचे संघ यांनी स्थानिक आणि सामाजिक संस्थांच्या मदतीनें मजूरांची प्रत्यक्ष स्थिति सुधारल्यास मजूर कार्यक्षम व संतुष्ट राहून धंद्यात वारंवार होणाऱ्या तंट्यास आळा बसेल. शेतीचा धंदा व शहरांतील लहान सहान धंदे यांमधील मजूरास त्यांचें न्याय्य वेतन मिळण्याच्या व त्यांची स्थिति चांगली राहण्याच्या बाबतींत बहुतेक सर्व जबाबदारी मालकांवरच पडते व ती त्यांनी पूर्णपणें ओळखिल्यास

---

[1] पानें ११७–१८ पहा.

सध्यां काहीं कांहीं भागांत मजुरांमध्यें हलाखी व असंतोष माजण्याचीं चिन्हें दिसत आहेत तीं नाहींशीं होतील. स्थानिक संस्थांचेंही आपापल्या हद्दींतील मजुरांच्या राहणीकडे सध्यांहून अधिक लक्ष्य जाणें आवश्यक आहे. प्रत्यक्ष मजूर म्हणून काम केलेले व मजूर वर्गाचे सर्व हाल भागलेले खरे 'मजूर' पुढारी जसजसे अधिक उत्पन्न होतील तसतशी मजुरांची खरी परिस्थिति लोकांपुढे येऊन मालक व स्थानिक संस्था ह्यांस आपली जबाबदारी निवारणें भाग पडेल. परंतु मालकांनीं आपण होऊनच आपली जबाबदारी ओळखिली व सुशिक्षित लोकमतानें मालकास त्यांच्या जबाबदारीची जाणीव करून देऊन त्यास त्यांच्या मजूरहितवर्धक प्रयत्नांत साहाय्य केलें तर भिन्न वर्गांत उत्पन्न होणारें हाडवैर इकडे वेळींच दाबून टाकतां येईल.

**१२ अंतर्राष्ट्रीय मजूर चळवळ**—महायुद्धापूर्वीच्या काळांत बहुतेक पाश्चात्य राष्ट्रांत भांडवलवाले व मजूर ह्यांचे संबंध फारसे मित्रत्वाचे नसून त्यांच्या दरम्यान एक प्रकारची तेढ उत्पन्न झालेली होती. भांडवलवाल्यांच्या अप्रत्यक्ष हुकमतीखालीं असलेल्या सरकारांनीं युद्ध सुरू केलें असतां मजूर वर्ग एकनिष्ठेनें सरकारी धोरणास पाठबळ देईल किंवा नाहीं ह्याबद्दल अनेक मुत्सद्यांचीं मनें साशंक होतीं. विशेषतः, मजुरांच्या अंतर्राष्ट्रीय संस्था स्थापन झालेल्या असल्यानें व सर्व राष्ट्रांतील मजुरांनीं एकजुटीनें वागून भांडवलवाल्यांची सत्ता उलथून पाडण्याचें त्यांच्या अंतर्राष्ट्रीय मजूर संघटनेचें धोरण असल्यानें ही भीति काहींशी साधार होती. परंतु एकदां युद्ध झाल्यावर सर्व राष्ट्रांतील मजुरांनीं सामाजिक यादवी क्षणभर बाजूस ठेवून राष्ट्रीय एकोप्याच्या भावनेनें आपापल्या सरकारास पूर्णपणें मदत केली. मजूर वर्गाच्या ह्या देशभक्तीचें व स्वार्थत्यागाचें पारितोषिक म्हणून सर्व राष्ट्रांनीं, विशेषतः इंग्लंड व दोस्त राष्ट्रें ह्यांनीं, महायुद्धानंतर मजुरांच्या हितसंरक्षणार्थ संघटित प्रयत्न करण्यांचें ठरविलें. हें धोरण ठरवितांना राष्ट्रामध्यें असंतुष्ट मजूर वर्ग असणें हें शांतता-संरक्षणास अपायकारक आहे ह्या गोष्टीचीही दोस्त राष्ट्रांच्या मुत्सद्यांस जाणीव होती. १९१९ मध्यें पॅरिस येथें तह झाला त्याचें एक महत्त्वाचें अंग म्हणून राष्ट्रसंघाची व अंतर्राष्ट्रीय मजूर परिषदेची संघटना करण्याचें दोस्त राष्ट्रांनीं ठरविलें. ह्या घटनेनुसार अंतर्राष्ट्रीय मजूर परिषदेची कचेरी राष्ट्रसंघाच्या कचेरीबरोबरच अस्तित्वांत आली. सर्व मजुरांस सुस्थितींत ठेवण्याची व त्यांचे न्याय्य हक्क त्यांस देण्याची प्रत्येक राष्ट्रानें तहनाम्याच्या कलमान्वयें हमी घेतलेली आहे. प्रतिवर्षी भरणाऱ्या अंतर्राष्ट्रीय मजूरपरिषदेस मजूर, मालक व सरकार ह्यांचे प्रतिनिधि पाठविणें, परिषदेंत ठरलेलें धोरण आपल्या देशांत शक्य तितकें अमलांत आणणें व अंतर्राष्ट्रीय मजूरकचेरीस लागणारी माहिती पुरविणें ह्या जबाबदाऱ्या सर्व सुधारलेल्या राष्ट्रांनीं आतां आपल्या अंगावर घेतलेल्या आहेत. हिंदुस्थान देश हा तह-

नाम्यावर सही करणाऱ्या राष्ट्रांपैकीं एक असून राष्ट्रसंघ व अंतर्राष्ट्रीय मजूरपरिषद् ह्यांमध्यें त्याचें स्वतंत्र अस्तित्व कबूल केलें गेलें आहे. अंतर्राष्ट्रीय मजूर परिषदेच्या कार्यकारी मंडळात ज्या राष्ट्रांस त्यांच्या औद्योगिक महत्त्वामुळें कायमचें सभासदत्त्व प्राप्त होतें त्यात हिंदुस्थानचा समावेश झालेला आहे. सहाजिकच परिषदेनें मजूर केलेल्या ठरावांची अंमलबजावणी करण्याच्या बाबतीत हिंदुस्थानसरकारवर विशेष जबाबदारी येऊन पडते. सर्व देशांतील परिस्थिति सारखी नसल्यानें पाश्चात्य राष्ट्रांतील मजुरांबद्दल जें धोरण परिषद् मान्य करते तेंच पौरस्त्य राष्ट्रांतील मजुरां-संबंधीं ठरविलें जातें असें नसून त्यांत आवश्यक दिसणारे फरक केले जातात. हिंदी उद्योगधंद्यांतील मजुरांच्या ज्या कांहीं अडचणी असतील त्या सर्व जगांतील मजूर, भांडवलवाले व सरकार ह्यांच्या प्रतिनिधींपुढें जाहीरपणें मांडण्याची संधि मिळाल्यानें त्या दूर होण्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें पुष्कळच मदत झालेली आहे. कारखान्यांसंबंधीं, खाणींसंबंधीं, अपघातासंबंधीं, विशिष्ट धंद्यांतील कामकऱ्यांसंबंधीं वगैरे जे कायदे गेल्या सात आठ वर्षांत हिंदुस्थानांत पास झाले आहेत ते बहुतांशीं अंतर्राष्ट्रीय मजूर परिषदेच्या चळवळीमुळेंच होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**१३ कारखान्यांसंबंधीं अलीकडील कायदेः**—अंतर्राष्ट्रीय मजूरपरिषदेचें पहिलें अधिवेशन अमेरिकेंत वॉशिंग्टन येथें होऊन कामाचे तास, बेकारी, बायका व मुलें ह्यांचें काम वगैरे बाबतींत एक सर्वमान्य ठराव करण्यांत आला. ह्या ठरावास हिंदुस्थानसरकारनें आपली मान्यता देऊन त्याच्या आधारानें १९११ सालच्या कारखान्यांसंबंधीच्या कायद्यांत जरूर त्या सुधारणा करून १९२२ चा नवा कायदा पास करविला. ह्या कायद्याचीं प्रमुख कलमें पुढें दिलीं आहेतः—( १ ) मुलाच्या वयाची कमाल मर्यादा १४ वरून १५ वर नेण्यांत आली असून किमान मर्यादा नवाहून बारावर चढविली आहे. ( २ ) ज्या ठिकाणीं यांत्रिक शक्ति वापरली जाते व जेथें वीस किंवा विसाहून अधिक कामकरी काम करतात अशा कारखान्यास कायदा लागू व्हावयाचा आहे. जेथें यांत्रिक शक्ति वापरली जात नसेल व जेथें निदान दहा माणसें काम करीत असतील अशा कारखान्यासही कायदा लागू करण्याचा सरकारनें आपल्याकडे हक्क ठेवलेला आहे. ( ३ ) मुलाच्या वयाच्या दाखल्याबद्दलचे नियम कडक केले असून तपासणी करणाऱ्या अधिकाऱ्यास ह्या बाबतींत विशेष अधिकार देण्यांत आले आहेत. ( ४ ) इमारतीची सुरक्षितता व हवेतील कृत्रिम दमटपणा ह्या बाबतींत मजुरांस अपाय न होईल अशी व्यवस्था करण्याची जबाबदारी कारखानदारावर टाकण्यांत आली आहे. ( ५ ) बायका व १८ वर्षांखालील कामकरी ह्यांस शिशाच्या कारखान्यांत कामावर लावण्याची मनाई केलेली आहे. ( ६ ) विश्रांतीची किमान वेळ १ तास करण्यांत आलेली असून कोणाही इसमास एक-सारखें पांच तासांहून अधिक वेळ कामावर ठेवूं नये अशी व्यवस्था झाली आहे.

(७) मुलांना दिवसांतून सहा तासांपेक्षां अधिक वेळ काम देणें अगर त्यांस एक-सारखें चार तासांहून अधिक काळ राबविणें हें बेकायदेशीर ठरविलें आहे. (८) कामकऱ्यांचे आठवड्यांतील कमाल तास ६० व दिवसाचे जास्तीत जास्त तास ११ ठरविले आहेत. विशिष्ट धंद्यांत प्रांतिक सरकारनें आठवड्यास ६० हून अधिक तास काम करण्याची खास परवानगी दिल्यास ह्या अधिक तासांबद्दल कामकऱ्यांस नेहमीच्या निदान सव्वापट वेतन मिळावें असें ठरविण्यांत आलें आहे. (९) चहा, नीळ, कॉफी इत्यादिकांच्या मळ्यांत कामाच्या तासाबद्दल अपवाद करण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास आहे परंतु त्या अधिकारावर मध्यवर्ती सरकारचें नियंत्रण रहावयाचें आहे. (१०) कायदा मोडल्याबद्दल दंडाची रक्कम २०० रुपयाची ५०० रुपयेपर्यंत नेलेली असून त्या रकमेंतून जरूर तेथें कामकऱ्यांस नुकसानभरपाई मिळण्याची व्यवस्था झालेली आहे.'

कामकरी आपलें काम करीत असतां त्यास अपघात झाला व तो अपघात त्याच्या हलगर्जीपणामुळें झालेला नसला तर मजुरास अगर त्याच्या नातलगांस अपघाताच्या स्वरूपाच्या मानानें कारखानदारांकडून नुकसानभरपाई मिळण्याबाबत एक स्वतंत्र कायदा १९२३ साली पास झालेला आहे. खाणींमधील कामकऱ्यांबद्दल निराळा कायदा असून जमीनीखाली काम करणाऱ्या मजुराचे आठवड्यातील कमाल तास ५४ ठरविण्यात आलेले आहेत. तसेच, खाणींमध्यें जमीनीखालील कामावर बायकांस कामाला न लावण्याबद्दलही सरकारी हुकमानें कांहीशी व्यवस्था झालेली आहे. सर्व धंद्यांतील स्त्रीकामकऱ्यास बाळंतपणाबद्दल कांही सवलती व आर्थिक मदत मिळावी ह्या उद्देशानें पाश्चात्य राष्ट्रांच्या धर्तीवर कायद्याचा एक मसुदा मध्यवर्ती कायदेमंडळापुढे आलेला होता परंतु तो पास झाला नाही. शेतकी व इतर धंदे ह्यांमध्यें नेहमीच दिसून येणाऱ्या बेकारी बद्दल, किंवा मजुराचा आजारीपणा व वार्धक्य ह्याबद्दलही कायदेशीर मदत मिळण्याची व्यवस्था अजून झालेली नाही. उद्योगधंद्यांची भरभराट, मजुरांची कार्यक्षमता व संघटना आणि लोकमताची जागरूकता ह्यांत इष्ट फेरबदल झाल्यानेंच मजुरांसंबंधीच्या कायद्यात अधिक सुधारणा होणें शक्य आहे. कारखान्यांतील कामाची पद्धत, तडजोड, मजूर-संघांची नोंदणी इत्यादि बाबींसंबंधी कायदेशीर व्यवस्था आणि मजुरांची चळवळ ह्यांची पूर्णपणे चौकशी करून मजुरांसंबंधीचे कायदे व मजुरांची संघटना ह्यांमध्ये कोणकोणते फरक घडवून आणणें इष्ट आहे ह्याबद्दल शिफारसी करण्याकरितां एक कमिशन सध्यां नेमलेलें आहे. ह्या कमिशनच्या शिफारशीचा हिंदी मजूरवर्गाच्या व एकंदर राष्ट्राच्या योग्य हितसंवर्धनास उपयोग होईल अशी आशा आहे.

**१४ मुंबई इलाख्यांतील कारखाने**—मुंबई इलाख्यांतील कारखान्यात काम करणाऱ्या मजूरांच्या स्थितीबद्दलचा १९२८ सालचा सरकारी अहवाल नुकताच

प्रसिद्ध झाला असून हिंदी उद्योगधंद्यांतील मजुरांच्या स्थितींत होणाऱ्या फरकाचें उदाहरण म्हणून त्यांतल्या महत्त्वाच्या विशेषाकडे लक्ष्य वेधणें आवश्यक आहे. मुंबई इलाख्यांत १९२८ अखेर नोंदलेल्या कारखान्याची संख्या १६६१ होती, तरी त्यांपैकीं १४९८ कारखानेच चालू होते. एकंदर चालू कारखान्यांत ७१५ कायमचे व ७८३ हंगामी असून ह्या आंकड्यात कापसाच्या कारखान्यांचा भाग अनुक्रमें २१५ व ६७६ एवढा होता. कारखान्यांतील मजुरांची एकंदर संख्या ३,५६,०८३ होती; त्यापैकीं २,१९,४२८ मजूर कापसाच्या गिरण्यांत व ४९,००० मजूर सरकी काढण्याच्या व गठ्ठे दाबण्याच्या कारखान्यांत कामास होते. स्त्री कामकऱ्याची संख्या मुंबईंत २८,१७३ व इलाख्याच्या इतर भागांत ४६,९१९ एवढी होती. मुंबई शहरांत फक्त १२२ लहान मुलें कामावर होतीं व इतर भागांतील कारखान्यांत काम करणाऱ्या मुलांची संख्या ५,०६१ होती; तरी गेल्या वर्षाच्या संख्येहून ही संख्या शेंकडा १८ ने कमी आहे. सरकारी अधिकारी व गिरण्यांचे चालक ह्यांच्या सहकार्यानें कायदेशीर मर्यादेहून लहान मुलांस कामावर लावण्याच्या पद्धतीस हळुहळू आळा बसत आहे. सरकारनें तपासणीकरितां नेमलेले अधिकारी ह्या बाबतींत कसोशीनें खटपट करीत असून गिरण्यांच्या मालकांच्या हेरास टाळण्याकरितां अनेक प्रसंगी त्यास युक्त्याही योजाव्या लागतात. कारखान्यांमधील खुली हवा व इतर आरोग्यसंवर्धक बाबी ह्यांमध्यें सुधारणा घडून येत आहे. १९२८ सालीं अपघाताची एकंदर संख्या ४५१८ इतकी असून त्यांपैकीं ३९ प्राणघातक होते. आगगाड्यांच्या कारखान्यांत एकंदरीनें अधिक अपघात होतात. त्यांमध्यें व इतर कारखान्यांत सावधगिरीच्या सूचना व संरक्षक उपाय ह्याबद्दल माहिती पसरविण्याचा प्रयत्न जोरानें चालू आहे. कारखान्यांतील मजुरांची राहण्याची व्यवस्था अजूनही एकंदरीनें असमाधानकारक आहे. सरकार व कारखानदार ह्यांनीं ही अडचण सुधारण्याचे केलेले प्रयत्न म्हणण्यासारखे यशस्वी झालेले नाहींत. कारखानदार लोक अपखुषीनें व स्वतःच्या खर्चानें मजूरवर्गाकरितां ज्या सोयी करतात त्यामध्यें थोडी बहुत वाढ झाली आहे हें खरें; तरी सार्वत्रिक संपाच्या वातावरणाचा परिणाम कारखानदारांच्या ह्या बाबतींतील धोरणावर एकंदर अनिष्ट झाला असल्यास आश्चर्य नाहीं. लेकुरवाळ्या बायका कारखान्यांत काम करीत असतां त्यांच्या मुलांची काळजी घेण्याकरितां काढलेलीं शिशुगृहें हळुहळू अधिक लोकप्रिय होत आहेत. असल्या गृहांची संख्या मुंबईमध्यें १४, अहमदाबादेस २२ व सोलापुरास २ अशी होती. सोलापुरांत शिशुसंगोपनाबद्दल इतर मार्गांनीं बरीच विधायक कामगिरी होत आहे. अहमदाबाद व सोलापूर येथील कारखानदारांनीं शाळा चालविलेल्या असून मुंबईच्या कांहीं भागांत तर आतां सक्तीचें प्राथमिक शिक्षण सुरू झालें आहे. कारखानदारांनीं काढलेले दवाखाने व ठेवलेले पुरुष व स्त्री डॉक्टर त्यांची संख्या वाढत आहे. स्वस्त दरानें धान्यविक्री करण्याची

दुकानेंही चालू आहेत. कांहीं कारखान्यांत मजूरांस केलेल्या दंडाची व बेपत्ता मजूरांच्या वेतनाची रक्कम बाजूस काढून तिच्यातून मजुरास अनेक मार्गांनी मदत करण्याचा प्रघात आहे. त्याखेरीज प्रॉव्हिडंट फंडासारख्या सोयीही कित्येक कारखान्यांत चालू आहेत. मुंबईबाहेरच्या एका ठिकाणी तीन कारखान्यांतील मजूरांच्या आर्थिक स्थितीची खाजगी रीतीनें चौकशी करण्यात आली, त्यांत पुढील गोष्टी दृष्टोत्पत्तीस आल्या. एकंदर कामगारांपैकी जवळ जवळ निम्मे कर्जबाजारी आहेत. ज्यांची कमाई महिन्यास २५ रुपयाखाली आहे अशांचें माणशी कर्ज सरासरीनें २०० रुपये आहे. व्याजाचे दर द. द. १२ ते ४० असून सरासरी दर द. द. २० हा आहे. मुंबईमधील मजूरांत सहकारी पतपेढ्यांचा प्रसार झालेला असून त्याची संख्या सध्या ६४ आहे.'

**१५ व्याज**—अलीकडील अर्वाचीन घटनेंतील भांडवलाचें महत्त्व व व्याजाचें आर्थिक स्वरूप ह्याबद्दल प्रास्ताविक भागात विवेचन केलेलें आहे.[१] तसेंच सर्व राष्ट्रांत प्राचीन काळीं व्याज घेणें हे गर्ह्य का मानलें जाई याविषयीही तेथें उलगडा केलेला आहे. अगदीं प्राचीन काळची विशिष्ट परिस्थिति सोडून दिली तर भांडवल कर्जाऊ देणें ही महत्त्वाची आर्थिक कामगिरी असून तिचा मोबदला म्हणून ऋणकोकडून धनकोस व्याज मिळणें न्याय्य व आवश्यक आहे, हें मत हिंदुस्थानात सर्वत्र मान्य झालेलें आढळतें. गहाणाचा प्रकार कमी अधिक मूल्यवान असेल त्या मानानें व ऋणको ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अगर शूद्र वर्णांपैकीं असेल त्या मानानें व्याजाचे दर कमी अधिक असावेत; मित्रत्त्वाच्या नात्यानें अगर दयार्द्रतेनें दिलेल्या कर्जावर व्याज घेऊं नये; दाम दुप्पटीपेक्षा अधिक रक्कम वसूल करूं नये; अशा अर्थाचीं अनेक वचनें मनु, नारद इत्यादिकांच्या स्मृतींत व इतर धार्मिक आणि पौराणिक ग्रंथांत सांपडतात. इस्लामी धर्मांत व्याज घेणें निषिद्ध मानलेलें असून कांहीं कर्मठ मुसलमान अजूनही बँकेतील आपल्या ठेवींवरील अगर कर्जरोख्यांवरील व्याज स्वीकारीत नाहीत. हा अपवाद सोडला तर सोन्याचांदीच्या व जमीनजुमल्याच्या गहाणावर सावकारी करण्याचा प्रघात देशांतील सर्व भागांत व वर्गांत प्रसृत झालेला आहे असें दिसून येतें. खेडेगावांतील कित्येक सावकार कुळांकडून व्याज म्हणून धान्य व इतर उपयुक्त जिन्नसही स्वीकारतात. सामान्यतः व्याजाचे दर येथें भारी असून निरनिराळ्या भागांत व निरनिराळ्या कुळांस ते भिन्नही असतात. भांडवलास असलेल्या मागणीच्या मानानें त्याचा मर्यादित पुरवठा व कुळांची कमी अधिक पत ह्यास अनुसरूनच व्याजाच्या दरांतील फरक होत असतात. बहुतेक वेळां फिर्यादी–अर्यादी करून कर्जाची रक्कम वसूल करावी लागत असल्यानें त्या जिकीरीबद्दलही सावकार वाढत्या व्याजाच्या दरानें अगाऊच भरपाईची व्यवस्था

---

१ पानें ९१–९५ पहा.

करून ठेवतो. धंदेवाईक सावकारांखेरीज समाजांतील इतर मध्यम व सुखवस्तु वर्गांपैकी अनेक लोकही आपल्याजवळील शिलकीचा बराचसा भाग व्याजी लावून उत्पन्न वाढविण्याचा प्रयत्न करतात. बहुतेक कुळांजवळ शेतजमीनीखेरीज दुसरें तारण नसल्यानें व जमीनीस अनेक सामाजिक व आर्थिक कारणांनीं वाढती मागणी असल्यानें, जमीनीच्या उत्पन्नाच्या मानानें तिच्यांत गुंतलेलें भांडवल अधिक आहे.

युद्ध, दुष्काळ वगैरे विशिष्ट कारणांनी व्याजाच्या दरांत होणारी असामान्य वाढ बाजूस ठेवली तर पूर्वकाळापासून दरसाल दरशेंकडा बारा ते पंधरा हा व्याजाचा दर हिंदुस्थानांत प्रचलित आहे असें दिसतें. सामाजिक व राजकीय शांतता, शिक्षण, पेढ्यांच्या सोयी, उद्योगधंद्यांची वाढ इत्यादि कारणांनी अलीकडे पूर्वीच्या मानानें व्याजाचा दर पुष्कळच उतरला आहे. सहकारी पतपेढ्यामार्फत कमी व्याजाच्या दरानें कर्ज मिळण्याच्या सोयी उपलब्ध झाल्यानें त्यांच्या स्पर्धेमुळें सामान्य व्याजाचा दरही उतरण्यास मदत झालेली आहे. तरीही ऋणकोची पत व भांडवलाचा पुरवठा ह्या बाबतींत जेथें विशेष असमाधानकारक परिस्थिति असेल तेथें व्याजाचे दर सामान्य दराहून पुष्कळ भारी असतात. येथील भांडवलवाल्या वर्गांत सोनेंचांदी व जमीनजुमला ह्यांचें पुरेसें तारण असल्याखेरीज कर्ज देण्याच्या बाबतींत जरूर तेवढी हिंमत दिसून येत नाहीं; त्यामुळें भारी व्याजाचें आमिष दिसल्याखेरीज ते भांडवल गुंतविण्यास तयार होत नाहींत. सामान्य शांततेच्या काळांत सरकारची पत सर्वांत अधिक असल्यानें सरकारी कर्जास कमींत कमी व्याज पडतें व इतर धंदेवाले, व्यापारी, शेतकरी, कारागीर ह्यांस त्यांच्या कमी अधिक पतीस अनुसरून वाढत्या व्याजाचे दर देणें भाग पडतें. महायुद्धापूर्वी सरकारला शेंकडा ४–५ व्याजाच्या दरानें कर्ज मिळत असे. परंतु पुढें महायुद्धाप्रीत्यर्थ काढलेल्या दुसऱ्या व सामान्य कर्जास शेंकडा सातपर्यंत व्याज देणें सरकारास भाग पडलें.

उद्योगधंद्यांच्या व कारखान्यांच्या अलीकडे झालेल्या विस्तारामुळेंही भांडवलास असलेल्या मागणीच्या मानानें पुरवठा मर्यादित भासूं लागला होता. बाजारभाव वाढल्यानेंही व्याजाचा दर चढीचा राहण्यास मदतच झाली. सरकारच्या भांडवलासंबंधीच्या असामान्य गरजा आतां मागल्या असल्यानें व कारखाने आणि मंडळ्या स्थापण्याच्या महायुद्धकालीन परिस्थितीमुळें उठलेली लाट आतां ओसरली असल्यानें व्याजाचे दर पुन्हां उतरत आहेत. शेतकरी, कारागीर व लहानमहान व्यापारी ह्यांजवळ फारसें तारण नसल्यानें त्यांस मात्र अजूनही भारी व्याजानें कर्ज काढावें लागतें. व्यापारी हंगामांत मागणीच्या मानानें भांडवलाचा पुरवठा विशेष मर्यादित होत असल्यानें बँकांचे व हुंड्यांचे दर पुष्कळच वाढतात ह्याबद्दल मागे माहिती दिलेलीच आहे.

**१६ व्याजाच्या दरांसंबंधीं कायदे**:–शेतकरी व कारागीर वर्गाची भांडवलास असलेली मागणी उपलब्ध पुरवठ्याच्या मानानें तीव्र असते, व त्यांजवळ शहाजोग तारणही फारसें नसते. शिवाय ऋणको गरजवंत आणि अडाणी व धनको संपन्न आणि चाणाक्ष असा प्रकार असल्यानें अनेक प्रसंगीं कर्जाच्या बाबतीत फसवेगिरीचे व्यवहार होऊन कर्ज घेणारास वाजवीपेक्षां अधिक व्याजाचे दर द्यावे लागतात. अज्ञ व गरजू कुळांस सावकारांनी अशा तऱ्हेनें नडवूं नये ह्या हेतूनें कांही कायदेशीर व्यवस्था करतां येईल किंवा काय ह्याबद्दल हिंदुस्थानसरकारचा अनेक वर्षांपासून विचार चाललेला होता. महाराष्ट्रांतील शेतकऱ्यास कर्जमुक्त करण्याच्या उद्देशानें १८७९ साली पास केलेल्या कायद्यांचा व त्याच्या अनिष्ट परिणामांचा मागें उल्लेख आलेलाच आहे. त्याच स्वरूपाचा एक सर्वसामान्य व्याजाच्या दरासंबधीं कायदा करावा ह्या उद्देशानें अनेकवार प्रयत्न केल्यावर सन १९१४ मध्ये हिंदुस्थान सरकारनें प्रांतिक सरकारकडून पुढील सूचनावर त्यांची मतें मागविली. '( १ ) कर्जरोखे लबाडीचे व अन्यायाचे आहेत असें न्यायाधिशास वाटल्यास त्यांतील शर्तीबरहुकूम कुळांविरुद्ध निकाल न देतां योग्य तेवढ्या रकमेबद्दलच हुकुमनामा देण्याची कोर्टास मुभा असावी; ( २ ) व्याजाचा एक कमाल दर ठरवून कोर्टामार्फत त्या दराहून अधिक दरानें वसुली केली जाऊं नये; ( ३ ) व्याज म्हणून द्यावयाची रक्कमही विशिष्ट मर्यादेपेक्षां अधिक असूं नये; म्हणजे उदाहरणार्थ, दामदुपटीहून अधिक रकमेचा निवाडा कोर्टामार्फत मिळूं नये.' हिंदुस्थानांत पूर्वी प्रचलित असलेल्या कायद्यास व रूढीस आणि अलीकडील अनेक पाश्चात्य देशांतील कायदेशीर बंधनास अनुसरूनच ह्या सूचना केलेल्या होत्या. परंतु त्याचा कायद्यांत अंतर्भाव झाल्यास नागरिकांच्या व्यवहार–स्वातंत्र्यास बाध येऊन शिवाय लुच्चेगिरीचे व्यवहार आणि कज्जेदलाली वाढेल असें कित्येकाचें म्हणणें होतें. महाराष्ट्रांतील शेतकऱ्याच्या ऋणविमोचनार्थ केलेल्या प्रयत्नांच्या अनुभवावरून व इतर देशांतील व्याजबट्ट्यासंबंधीच्या कायद्याच्या इतिहासावरून ह्या म्हणण्यास दुजोराच मिळतो. तरीही सामान्य लोकमतास तसा कायदा हवा म्हणून व वाढत्या कर्जबाजारीपणास कांही तरी उपाय योजणें सरकारास आवश्यक वाटलें म्हणून १९१८ मध्यें वरील सूचनांच्याच अनुरोधानें एक कायदा हिंदुस्थान सरकारनें पास केला. कुळाचें अज्ञान व दारिद्र्य आणि भांडवलाचा तुटवडा ह्या गोष्टी जोंपर्यंत अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत भारी व्याजाचे दर व लबाडीचे कर्जरोखे कायम राहणारच; त्यांस कायद्यानें प्रतिबंध होणें शक्य नाहीं. शिक्षण, सहकारी व सामान्य पेढ्या, शेतकीची व इतर उद्योगधंद्यांची उत्पादकता ह्यामध्ये समाधानकारक वाढ झाल्यास बेसुमार व्याजाचे दर आपोआप नाहींसे होतील. कायद्याच्या साहाय्याची अपेक्षा न बाळगतां आपलें कर्ज अनेक पट व्याजानें वसूल करणारे 'काबुली' सावकार हिंदुस्थानांत बहुतेक सर्वत्र पसरले आहेत, आणि त्यांच्या व्यवहारांचें नियमन करण्याची आवश्य-

कता तीव्रतेनें भासत आहे. अलीकडे सरकारी व निमसरकारी कर्जरोख्यांत पैसे गुंतविण्याची सवय मध्यम वर्गांत व वरिष्ठ दर्जाच्या नोकरांत वाढत्या प्रमाणावर दिसून येते. तसेच, कारखाने व औद्योगिक आणि व्यापारी मंडळ्या ह्यांच्या भागात पैसा गुंतविण्याचीहि कांही वर्गांत प्रवृत्ति वाढत आहे. समाईक भांडवलाच्या भागाची मूळ किंमत कोणतीही असली तरी बाजारात त्यांची खरेदी विक्री व्हावयाची ती त्या भागावर मिळणाऱ्या नफ्याच्या प्रमाणात कमी अधिक किंमतीनें होत असते. ह्याचा परिणाम असा होतो की भारी नफ्याच्या दिवसात भाग विकत घेणाऱ्या लोकांस धंद्याच्या सामान्य अगर बिकट स्थितीत फारच नुकसान सोसावें लागतें, व त्यांच्या कटु अनुभवाचा इतरावर अनिष्ट परिणाम होऊन ते भाग विकत घेण्यास नाखुष होतात. मुंबई इलाख्यातील कापसाच्या गिरण्यांच्या भागांत पैसे गुंतविणारांची अलीकडे अशीच काहीशी स्थिति झालेली आहे.

१७ **शेतीच्या धंद्यांतील नफा**—जमीन, भांडवल व सामान्य कामकऱ्याचे श्रम ह्या उत्पादनास आवश्यक असलेल्या घटकास खंड, व्याज व मजूरी ह्या स्वरूपानें मोबदला मिळतो व हे घटक एकत्र आणून त्याच्या सहकार्यानें उत्पादन घडवून आणणाऱ्या योजकाच्या श्रमाचें व कौशल्याचे वेतन म्हणून त्यास नफा हें अनिश्चित स्वरूपाचें उत्पन्न मिळतें असें मागे सांगितलें आहे. योजकास मिळणाऱ्या ह्या सामान्य नफ्याखेरीज मक्तेदारीच्या उत्पन्नासारखा किंवा निव्वळ आकस्मिक कारणांनी मिळणारही नफा अर्वाचीन औद्योगिक घटनेंत नेहमी दृष्टिगोचर होतो. ह्या स्वरूपाचा नफा इकडील सामान्य शेतकऱ्यास क्वचितच मिळतो. सुपीक जमीन, पाणीपुरवठ्याच्या उत्तम सोयी, बाजाराचें सान्निध्य, माफक व्याजानें मिळणारे भांडवल, खतें व सुधारलेली आउतें वापरण्याचा प्रघात इत्यादि बाबतीत अनुकूल परिस्थिति असणाऱ्या शेतकऱ्यांचा वर्ग फारच अल्पसंख्याक असून त्यास सामान्यतः नफा मिळतो असें म्हणण्यास हरकत नाही. तसेंच, कपास, ऊंस इत्यादि व्यापारी महत्त्वाचीं पिकें करणाऱ्या शेतकऱ्यास परराष्ट्रीय बाजारांत एकाएकी अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाल्यास आकस्मिक स्वरूपाचा विशेष फायदाही होत असला पाहिजे. परंतु मूळ उत्पादक शेतकरी आणि शेवटलें गिऱ्हाइक ह्यांमध्यें असणाऱ्या अनेक अडत्यांस व मध्यस्थांस वरील दोन्ही प्रकारचा नफा पुष्कळसा चाखावयास मिळतो. धान्याच्या बाजारभावांत झालेल्या वाढीमुळें सामान्य शेतकऱ्यांस काहींशी अधिक कमाई होणें साहजिक आहे; परंतु वी, मजूरी वगैरेंच्या वाढत्या उत्पादनखर्चामुळें कमाईतील खरा वाढवा असा फारच थोडा शिल्लक उरतो.

पूर्वी निरनिराळ्या भागांची देवघेवीच्या बाबतीत स्वायत्तता असे व शेतकऱ्यांस आपल्या धंद्यांत सामान्य नफा म्हणून ठराविक उत्पन्न मिळूं शके. अलीकडे देशाच्या इतर भागांची व परदेशांची स्पर्धा येथील शेतकऱ्यांस जाणवूं लागली आहे. भांडवल,

पाणीपुरवठा, सुधारलेली आउतें, व्यापारी संघटन इत्यादि किफायतशीर धंद्यांच्या आवश्यक साधनांच्या अभावीं ह्या स्पर्धात्मक उत्पादनाच्या काळांत शेतकऱ्याचा टिकाव लागत नाहींसा झाला असल्यास नवल नाहीं. धंद्यामधील नफा तर दूरच राहिला, परंतु जमीनींत घातलेल्या भांडवलास व श्रमास बाजारभावाप्रमाणें व्याज व मजूरीही पूर्णपणें न मिळतां शेतकी करणारे अनेक शेतकरी, ( विशेषतः जिराइती जमीनीवर ) दृष्टीस पडतात. जमीन व भांडवल ह्या बाबतींत दुसऱ्यांवर अवलंबून असणाऱ्या खंडकऱ्यांची स्थिति तर विशेषच असमाधानकारक आहे. जमीनीचे लहान लहान तुकडे झाल्यानें शेतकऱ्यांस उपलब्ध असलेल्या साधनाचाही त्यास पूर्णपणें उपयोग करता न येऊन त्यांच्या उत्पन्नांत खोट येते. पाणीपुरवठा व भांडवल ह्या बाबतींत समाधानकारक स्थिति असलेला व फळें, भाजीपाला, गळिताची धान्यें, कपास, ऊस वगैरे पिकें पेरणारा अल्पसंख्याक वर्ग सोडून इतर सामान्य शेतकऱ्यांकडे पाहिलें तर त्यास त्याच्या धंद्यात सामान्यतः नफा होत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

**१८ उद्योगधंद्यांतील व व्यापारांतील नफा**—जी स्थिति सामान्य शेतकऱ्याची तीच स्वतःच्या हिंमतीवर धंदा करणाऱ्या सामान्य कारागिराची होय. यांत्रिक साधनांनी मोठ्या प्रमाणावर उत्पन्न केल्या जाणाऱ्या स्वस्त मालाच्या स्पर्धेपुढे अशा उत्पादकांस हात टेकणें भाग पडतें. त्यातल्या त्यांत भांडवल व कांहीं सुधारलेली यंत्रें ह्या बाबतींत अनुकूल परिस्थिति असेल तर त्यांच्या साहाय्यानें आपला धंदा किफायतशीर करून दाखविणारे कांहीं कार्यक्षम योजक सापडतात. उदाहरणार्थ, जोडे, बूट, वहाणा इत्यादि पायतणें तयार करणाऱ्या सामान्य चांभारास त्याच्या धंद्यात पुरी मजूरीही सुटत नाहीं; परंतु गिऱ्हाइकाच्या मागण्या नीटपणे शोधून काढून त्याबरहुकूम माल पुरविणारे व आपल्या हाताखालीं मजूर ह्या नात्यानें अनेक चांभारास कामास लावणारे कित्येक धंदेवाले आहेत. ह्यापैकीं कांहीं स्वतः जातीनें चांभार असून त्यांस फायदाही चांगला मिळतो. महायुद्धाच्या काळापासून किंमतीच्या मानात झालेल्या वाढीमुळें संघटना व उत्पादनपद्धति ह्यांमध्यें योग्य त्या सुधारणा केल्यास लहान धंदेही किफायतशीरपणें चालणें शक्य झालें आहे. बांधकाम, सुतारकाम, विणणें, शिवणें, छापणें, घरांची वगैरे उक्ती कामें अंगावर घेऊन करणें इत्यादि धंद्यात स्वतःच्या संघटनाचातुर्यानें चांगला नफा मिळविणारे अनेक लोक हल्लीं दिसून येतात. पिठाच्या गिरण्या, लोखंडी ओतकामाचे कारखाने, कौलें व विटा पाडण्याच्या भट्ट्या ह्यांसारखे लहान सहान कारखानदारीचे धंदे स्वतःच्या हिंमतीवर किफायतशीरपणें चालविणारेही पुष्कळ लोक आहेत. चैनीच्या वस्तू तयार करण्याचे कित्येक धंदेही फायदेशीरपणें चाललेले आहेत.

वरील लहान सहान धंद्यांखेरीज अर्वाचीन पद्धतीनें चालविलेले मोठमोठे संघटित धंदे विविध आहेत. कापूस व ताग ह्यांच्या गिरण्या, चहाचे मळे, कोळसा व लोखंड

ह्यांच्या खाणी, पेढ्या, विमा व परराष्ट्रीय व्यापार ह्यांचे व्यवहार करणाऱ्या मंडळ्या इत्यादि धंदे एकंदरीनें फायदेशीरपणें चाललेले आहेत. त्यांच्या भागीदारास डिव्हिडंडच्या[1] रूपानें व्याज व नफा ही दोन्हीं मिळतात. तरी सामान्य व्याजाच्या दराहून सरासरीनें डिव्हिडंड अधिक असल्यानें सामान्य व निव्वळ नफा भागदारांस पुष्कळच मिळतो. अर्थातच ज्यांनीं भारी नफ्याच्या दिवसांत महागाईनें बाजारांत भाग विकत घेतले असतील त्यांस नफ्याच्या उत्पन्नांत खरोखर फारच थोडा भाग मिळतो. कापसाच्या गिरण्यांप्रमाणेंच, तागाच्या व कागदाच्या गिरण्यांसही युद्धकालीन असामान्य परिस्थितीमुळें पुष्कळ फायदा झाला होता. त्या रकमेचा बराचसा भाग उत्पादक सुधारणा घडवून आणण्याकरितां खर्च केला असता अगर शिल्लक निधि म्हणून बाजूस काढून ठेवला असता तर त्या धंद्यांतील भागीदारास कायमचा नफा मिळण्याची व्यवस्था झाली असती. परंतु अल्पकालिक अनुकूल परिस्थितीत मिळालेला बहुतेक सर्व नफा डिव्हिडंड म्हणून वाटून टाकल्यानें धंद्यांची उत्पादकता वाढण्याचे दूरच राहून, शिवाय भारी दरानें भाग विकत घेणारांचें भांडवल मात्र प्रमाणाबाहेर गुंतलें गेलें. तागाच्या व कापसाच्या गिरण्यांतील नफ्याचे आंकडे पुढे दिलेले आहेत. त्यावरून नफा वाटताना त्या मंडळ्यांनीं धोरण किती ढिलाईचें ठेवलें होतें तें दिसून येईल.

## तागाच्या गिरण्यांचा धंदा.

| वर्ष | निव्वळ नफा. (पोंड) | भरणा झालेल्या भांडवलाशी नफ्याची शेंकडेवारी |
|---|---|---|
| १९१४ | ८२३,००० | १० |
| १९१५ | ४,६६१,००० | ५८ |
| १९१६ | ६,१५५,००० | ७५ |
| १९१७ | ४,३८५,००० | ४९ |
| १९१८ | १०,५७८,००० | ११३ |

१ मागें पान ४४ पहा.

## मुंबईतील कापसाच्या गिरण्यांचा धंदा.

| वर्ष | भरणा झालेलें भांडवल* | नफा* | नफ्याची भांडवलाशीं शेंकडेवारी |
|---|---|---|---|
| १९१० | ६४० | ६० | ९.४ |
| १९१२ | ६८० | २६० | ३८.२ |
| १९१४ | ७८० | ८९ | ११.४ |
| १९१९ | १३,१० | १३०६ | ९९.७ |
| १९२० | १६,१० | १६५८ | १०३.० |
| १९२१ | १६,६० | १५३९ | ९२.६ |
| १९२२ | १८,९० | ७२७ | ३८.४ |
| १९२४ | १९,२८ | –२४२ | ३.२ |
| १९२५ | १६,२० | –२८७ | २.२ |

* आकडे लक्ष रुपयांचे आहेत. —तोटा

लोखंड, कागद, सिमेंट इत्यादि इतर वस्तूंच्या कारखान्यांसही महायुद्धोत्तर कालांत मंदीचे दिवस आलेले आहेत. तरी अलीकडे यांत्रिक साधनांच्या साहाय्यानें व साधारण मोठ्या प्रमाणावर चालविलेल्या अनेक धंद्यात भांडवल गुंतविण्याची पद्धत वाढत्या प्रमाणावर पडत असल्यानें त्या त्या धंद्यांपासून कमी अधिक प्रमाणात भागीदारांस नफा मिळत आहे. पोलादाचा हिंदुस्थानातील बहुतेक सर्व धंदा टाटा कंपनीच्या हातांत आहे. ह्या मंडळीनें १९२०–२१ सालापर्यंत आपल्या भागीदारांस भारी दराचें डिव्हिडंड वांटलें. त्यावर्षी 'डिफर्ड' भाग धारण करणारास तर शेंकडा २०२ इतकें डिव्हिडंड वाटलें गेलें. तेव्हांपासून पोलादाच्या किंमती कमी व्हावयास लागून मंडळीच्या फायद्यांत व भागाच्या बाजारभावांतही पुष्कळच उतार झाला. हल्ली ह्या धंद्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें सरकारी मदत असूनही सामान्य भागीदारांस अजून डिव्हिडंड मिळूं लागलें नाही. उत्पादकतेच्या मानानें धंद्यात भांडवल अधिक गुंतलें गेल्यानें अशी असमाधानकारक स्थिती झालेली असून भांडवल कमी केल्याखेरीज ह्या धंद्यास ऊर्जितावस्था यावयाची नाही, असें म्हणण्यास जागा आहे. कोळशाच्या खाणी व विशेषतः चहाचे मळे ह्या धंद्यांनही सामान्यतः जबर नफा पडतो, परंतु तो बहुतेक सर्व परकी भांडवलवाल्याच्या खिशांत उतरत असल्यानें हिंदुस्थानच्या राष्ट्रीय उत्पन्नांत निरनिराळ्या हिंदी वर्गांचा किती भाग आहे हें ठरवितांना तो जमेस धरता येणार नाही. निरनिराळ्या प्रकारच्या धंद्यांत सध्यां मिळणाऱ्या नफ्याची सरासरी व त्या मानानें त्या धंद्यांतील मंडळ्यांच्या भागांचा बाजारभाव ह्याबद्दल पुढें कांहीं आंकडे दिले आहेत.

| मंडळीचे नांव | भागाची मूळ किंमत | डिव्हिडंडची अगदी अलीकडील रक्कम | भागाचा बाजारभाव (रुपये) |
|---|---|---|---|
| बँक ऑफ इंडिया | १०० रु. पैकी भरणा ५० रु. | १० | ९९½ |
| इंपीरियल बँक | ५०० | १६ | १४३० |
| ग्वाल्हेर सिमेंट | १०० | १० | ९० |
| सेंट्रल इंडियन माइनिंग | १० | — | ७ |
| दौंड बारामती रेल्वे | १०० | ६ | ११० |
| सिआलकोट नरोवाल ,, | १०० | ५ | ९५ |
| सिंध लाईट रेल्वे | १०० | ११ | १३५ |
| न्यू बेंगर प्रेस (गठ्ठे दाबण्याचा कारखाना) | ५०० | १४ | ७९० |
| आन्ध्र व्हॅली इलेक्ट्रिक (सामान्य) | १००० | २ | ५३५ |
| पुना इलेक्ट्रिक | १०० | ७ | १४० |
| विष्णू कॉटन (सामान्य) | ५०० | १७ | २१०० |
| चौबे कॉटन | ५०० | ० | १५२ |
| सोलापूर मिल्स | १००० | १२५ | ४७७५ |
| 'ओरिएण्टल' विमा कंपनी | २०० पैकी भरणा १५० | ५० | १९७५ |
| टाटा आयर्न (सामान्य) | ७५ | ० | ५२½ |
| टाटा आयर्न (डिफर्ड) | ३० | ० | १६१¼ |

# प्रकरण पंधरावें

## हिंदुस्थानांतील सरकारी उत्पन्न व खर्च

**१ जुनी हिंदी करपद्धति**—आपल्या प्रजाजनाच्या संपत्तीतून सरकारी खर्चाकरितां राजानें जरूर व योग्य तो भाग घेणें न्याय्य आहे असें मत हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासून अस्तित्वांत आहे. राजानें निरनिराळ्या प्रकारच्या उत्पन्नातून किती भाग घ्यावा ह्याबद्दल जुन्या ग्रथात अनेक उल्लेख असून एकंदरीनें प्रजेवर अयोग्य भार न पडेल अशा धोरणानें राजानें कर लादावे व प्रजेनेंही आपलें सामाजिक कर्तव्य म्हणून योग्य तो भाग सरकारास देण्यास तयार व्हावें ह्या मतांचा स्पष्ट शब्दात पुरस्कार केलेला आढळतो. कर व विशिष्ट कामगिरीचें मूल्य अगर वेतन अशा प्रकारच्या सर्व स्वरूपानीं, व प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्षपणें, राजे आपापली उत्पन्नें वसूल करीत. आर्थिक व्यवहारात पैशाचा सढळपणें उपयोग केला जात नसे तेव्हा सरकार आपली येणीं वस्तूंच्या व कामगिऱ्याच्या रूपानेंही वसूल करी. 'स्वतःचें व धनोत्पादक नागरिकाचें दोघांचेंही हित साधेल अशा धोरणानें राजानें कर लादावे. जळू, वासरूं व मधमाशी हीं आपापलें भक्ष्य ज्याप्रमाणें लहान लहान घासांनीं स्वीकारतात त्याप्रमाणें राजानीही प्रतिवर्षी आपल्या प्रजेकडून माफक कर वसूल करावे. ( कर मुळीच न घेतल्यानें ) राजानें स्वतःचें निर्मूलन करूं नये व लोभीपणानें बेसुमार कर घेऊन लोकांचेंही निर्मूलन करूं नये. असें करण्यानें दोघांसही पीडा होते. व्यापारी, शेतकरी, कारागीर व मजूर ह्यांकडून त्यांच्या ऐपतीप्रमाणें कर वसूल केले जावे व मजूरांकडून करांच्या ऐवजी अंगमेहनतीनें काम करून घ्यावें. व्यापाऱ्यांकडून कर घेताना त्यांस कराव्या लागणाऱ्या खर्चाबद्दल योग्य सूट दिली जावी. गुरें व सोनें ह्यांच्या वाढीपैकी एक पन्नासांश भाग राजानें घ्यावा व धान्यापैकीं अष्टमांश, षष्ठांश अगर द्वादशांश घ्यावा. जमीनीच्या उत्पन्नातून कर घेतांना शेताची जागा, जमीनीचा मगदूर व लागवड करण्यास लागणारे श्रम ह्या गोष्टी हिशेबात धरल्या जाव्या व त्यांस अनुसरून कराचें प्रमाण कमी अधिक व्हावें. झाडें, मांस, मध, तूप, अत्तर, वनस्पति, मसाल्याचे पदार्थ, फुलें, मुळें व फळें ह्यांतला सहावा हिस्सा राजानें घ्यावा. पानें, गवत, वेताचे जिन्नस, कातडी, मातीचीं भांडी, व दगडाचे जिन्नस ह्यांवरही कर घेतले जावे.' ह्याप्रमाणें करपद्धतीबद्दल सविस्तर नियम मनुस्मृतींत आढळतात व तिच्यावरील अनेक टीका-

१ मागें पान १३१ व १४१ पहा.

कारांनीही त्या नियमांचा अर्थ करतांना आर्थिक महत्त्वाच्या बाबीकडे पूर्ण लक्ष्य पुरविलेलें दिसतें. आपल्या राज्यांत शांतता राखणें, न्यायदान करणें, लोकांची स्थिति सुधारणें ह्याबद्दल राजांवर ज्या जबाबदाऱ्या होत्या त्या पार पाडण्यास वरील 'शास्त्रशुद्ध' मार्गांनी त्यांनी आपलें उत्पन्न मिळविणें इष्ट आहे हें सर्वमान्य होतें. हिंदुस्थानच्या मध्ययुगीन इतिहासांत आणि मोंगल व मराठे ह्यांच्या राज्यांत मुख्यतः ह्याच करपद्धतीच्या तत्त्वाचें शक्य तितकें अवलंबन केलें जाई. ह्या करपद्धतींत लवचीकपणा विशेष असून एखाद्या करानें विवक्षित नागरिकांवर 'जुलूम' होत आहे असें दिसल्यास तो लगेच कमी अगर माफ करण्यांत येई. प्रजाजनांसही राजाचा भाग त्यास देऊन टाकणें आवश्यक व अपरिहार्य आहे ह्याची पूर्ण जाणीव असे. जुलमी व लोभी राजांचे कांहीं अपवाद सोडून दिले तर येथील जुनी करपद्धति एकंदरीनें पायाशुद्ध, लवचीक व समाजहितास परिपोषक अशीच होती असें म्हटलें पाहिजे. ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत आपला अंमल बसविला त्यावेळीं बहुतेक ठिकाणची करपद्धति विस्कळित झालेली तिला आढळली. निरनिराळे जिन्नस, व्यवसाय, वस्तूंचे उत्पादक, विनिमय व उपभोग ह्या सर्वांवर कर बसविलेले असून त्यांपैकीं पुष्कळ करांची वसूली मक्तेदारांमार्फत करण्याची वहिवाट पडली होती. कराची विविधता व ते स्वार्थसाधु मक्तेदारामार्फत वसूल करण्याचा प्रघात ह्यामुळें प्रजाजनास त्रास व नुकसान ही नेहमी सोसावी लागत. बंगाल्यांत पहिल्या प्रथम कंपनी सरकारनेंही आपला जमीनधारा इजारदारामार्फत वसूल करण्याचा प्रघात ठेवला होता. परंतु हळुहळू लहानसहान कर बंद करून शेतसारा आणि मीठ व अफू याच्या विक्रीचें उत्पन्न ह्यासारख्या कांहीं मोठ्या बाबींपासूनच सरकारी उत्पन्न काढण्याचें ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं

१ यथा फलेन युज्येत राजा कर्ताच कर्मणाम्। तथावेक्ष्य नृपो राष्ट्रे कल्पयेत् सततं करान्॥
२ यथाल्पाल्पमदन्त्याद्यं वार्योकोवत्सषट्पदाः। तथाल्पाल्पो गृहीतव्यो राष्ट्राद्राज्ञाब्दिकः करः॥
३ नोच्छिन्द्यादात्मनो मूलं परेषां चातितृष्णया। उच्छिन्दन्ह्यात्मनो मूलमात्मानं तांश्चपीडयेत्॥
४ कारुकान् शिल्पिनश्चैव शूद्रांश्चात्मोपजीविनः। एकैकं कारयेत्कर्म मासिमासि महीपतिः॥
५ क्रयविक्रयमध्वानं भुक्तंच सपरिव्ययम्। योगक्षेमंच संप्रेक्ष्य वणिजो दापयेत्करान्॥
६ पंचाशद्भाग आदेयो राज्ञा पशुहिरण्ययोः। धान्यानामष्टमो भागः षष्टोद्वादशएववा॥

**मेधातिथिः**—मूल्याधिकयोः पशुहिरण्ययोः पंचाशभ्दागो ग्राह्यः। धान्यानां भागविशेषः सुकरदुष्कारापेक्षया मंतव्य.।

**कुल्लुकः**—भूम्युत्कर्षायकर्षापेक्षया कर्षणादि क्लेशलाघवगौरवापेक्षः अयं बह्वल्पग्रहण विकल्पः।

**नंदनः**—सर्वत्र व्ययव्यतिरिक्तलाभविषया भागकल्पना। भूमेर्मध्यमोत्तमाधमापेक्षया व्यवस्थितविषयोयमष्टमादिको विकल्पः कल्पनीय।

७ आददीताथषड्भागं द्रुमांसमधुसार्पिषाम्। गंधौषधिरसानाच पुष्पमूलफलस्यच॥
८ पत्र शाक तृणानांच चर्मणां वैदलस्यच। मृन्मयानांच भांडानां सर्वस्याश्ममयस्यच॥

मनु. ७

ठरविलें. तरीही १८३६ मध्यें एकट्या पुणें शहरांत निरनिराळे ६० 'कर' वसूल केले जात हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. शेतसारा व अफू ह्यांखेरीज मिठाच्या मक्त्याचें उत्पन्न व जकाती हे कर हळहळू अधिक उत्पादक होऊं लागले. कंपनीचा अंमल जसजसा निरनिराळ्या प्रांतांत वाढूं लागला व दळणवळणाच्या साधनांत सुधारणा होऊन राजकीय शांतता जसजशी प्रस्थापित होऊं लागली तसतसें वरील महत्त्वाच्या करांचें उत्पन्न वाढत जाऊन लहान सहान कर सोडून देणें शक्य झालें. विशेषतः १८५७ सालच्या बंडानंतर शेतसारा व अबकारी ह्या दोन्ही बाबीत पुष्कळच वाढ केली गेली व आगगाड्या, जंगलें, जकाती, टपालखाते, स्टॅम्प व नोंदणी खातें इत्यादि इतर उत्पन्नाच्या बाबीही पुढे येऊं लागल्या. प्राप्तीवरील कर व जकाती ह्यांमध्यें गेल्या दहा पंधरा वर्षांत विशेष वाढ झाली आहे; त्यापूर्वी जमीनसाऱ्याचें उत्पन्न सरकारच्या एकंदर उत्पन्नाच्या तृतीयांशानें अगर निम्म्यानें असे. त्याचप्रमाणें सर्व लहान-मोठ्या बाबींच्या उत्पन्नाची एकंदर रक्कमही महायुद्धापूर्वी फारशी मोठी नसे व अजूनही इतर राष्ट्रांच्या मानानें ती फारच अल्प आहे. ह्या पुराव्यावरून कित्येक ग्रंथकार हिंदुस्थान देश हा सुधारलेल्या सर्व राष्ट्रांत हलक्या करांच्या बाबतींत पहिला नंबर पटकावील असें म्हणतात. परन्तु हिंदी लोकांचे सरासरी उत्पन्न व हिंदुस्थान सरकारवर लोकमताचें नियंत्रण नसल्यानें सरकारी खर्च खऱ्या राष्ट्रीय महत्त्वाच्या कामगिऱ्यांवर होण्याची अशक्यता ह्या गोष्टी ध्यानांत घेतां वरील मत भ्रामक आहे हें वरवर पहाणारासही दिसून येईल.

**२ हल्लींच्या करपद्धतीचे कांहीं विशेष**—अंतर्गत व परराष्ट्रीय व्यापार मोठ्या प्रमाणावर चालणारे कारखाने व धंदे, पेढ्यांचा विस्तार इत्यादि औद्योगिक व आर्थिक प्रगतीच्या अंगांत अलीकडे बरीच सुधारणा होऊं लागल्यानें प्राप्तीवरील कर, जकाती, अबकारी, स्टँप वगैरे जुने कर पहिल्यापेक्षां पुष्कळच अधिक उत्पादक होत असून करमणकीवरील व वारशावरील करांसही लवकरच महत्त्व प्राप्त होईल असें दिसतें. शेतसाऱ्याबद्दल मागें स्थूल निर्देश केलेला आहे[1] त्यावरून तो कर मालमत्तेवर किंवा शेतीच्या उत्पन्नावर लादला जातो असें दिसून येईल. महायुद्धामुळें हिंदुस्थानातील सरकारचा खर्च वाढून त्यास जुन्या करांचे दर वाढविणें व नवे कर बसविणें भाग पडलें. जुनी करपद्धति अशा तऱ्हेनें बदलत असतां निरनिराळ्या वर्गांवरील कराचा बोजाही कमी-अधिक प्रमाणांत वाढला. परंतु करामध्यें वाढ करतांना समतेच्या अगर दुसऱ्या कोणत्याही विशिष्ट तत्त्वाकडे लक्ष्य दिलें गेलें नसल्यानें करपद्धतींत अनेक दोष दिसून येऊं लागले. ह्या सर्व दृष्टींनीं प्रचलित पद्धतीचे निरीक्षण करविण्याकरितां व नवीन करांचे आणि सुधारणाचे मार्ग निदर्शित करण्याकरितां १९२४ मध्यें हिंदुस्थान सरकारनें एक कमिटी[2] नेमली. महायुद्धापूर्वी कित्येक वर्षें हिंदुस्थान सरकार खुल्या व्यापाराच्या तत्त्वानुसार आपल्या जकातीचे

---

१ मागे पानें १३५--१३९ पहा. २ टॉडहंटर कमिटी.

दर ठरवीत असल्यानें त्या कराचें उत्पन्न मर्यादित असे; परंतु युद्धकालीन खर्च भागविण्याकरितां व पुढें 'विवेकनिष्ठ' संरक्षणाचें अवलंबन करण्याचें ठरल्यामुळें जकातीचे दर व त्यांचें उत्पन्न ह्यांत झपाट्यानें वाढ करावी लागली ह्या गोष्टीचा मागील एका प्रकरणांत उल्लेख केलेलाच आहे. कर लादून उत्पन्न मिळविणें व निरनिराळ्या खर्चाच्या बाबींवर त्यांचा विनियोग करणें ह्या बाबतींतील सर्व अधिकार पूर्वी मध्यवर्ती हिंदुस्थान सरकारच्या हातीं होते. सन १८७१ पासून क्रमाक्रमानें हे अधिकार प्रांतिक सरकारास मिळूं लागले व १९१९ च्या सुधारणाचा कायदा अमलांत आल्यापासून तर आर्थिक बाबतींत मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींची फारकत झालेली आहे. ह्या बाबींची राष्ट्रीय व प्रांतिक सरकारांत विभागणी झालेली असून स्वतःच्या कार्यक्षेत्रांत कर लादण्यास खर्च करण्यास व कर्ज काढण्यास प्रांतिक सरकारास बरेंच स्वातंत्र्य मिळालेलें आहे. हे फेरबदल १९२१ सालीं अमलांत आले त्यावेळीं मध्यवर्ती सरकारनें निरनिराळ्या प्रांतिक सरकारांकडून कांहीं ठराविक रक्कम दरवर्षी घ्यावी असें ठरलें होतें. परंतु मध्यवर्ती सरकारला सांपत्तिक सुस्थिति प्राप्त होताच ही पद्धतही नाहींशी होऊन प्रांतिक उत्पन्न व खर्च ह्याचें क्षेत्र आतां मध्यवर्ती सरकारच्या वर्चस्वापासून जवळ जवळ पूर्णपणें मुक्त झालेलें आहे. राज्यपद्धतींत ज्या मानानें संयुक्त घटनेचें तत्त्व अमलांत येत आहे त्यामानानें आर्थिक बाबतींतही तें दृष्टिगोचर होत आहे. परंतु प्रांतिक सरकारांवरील मध्यवर्ती सरकारची हुकमत पूर्णपणें ढिली झाली नसल्यानें येथील करपद्धतींत अजूनही एकतंत्रीपणा बराच आहे. प्रांतिक कायदेमंडळाच्या हातांत सरकारच्या उत्पन्नाचीं व खर्चाचीं सूत्रें फक्त नावापुरतींच असून सरकार लोकमतास पूर्णपणें जबाबदार नसल्यानें अनेक मार्गांनीं कायदेमंडळाच्या खऱ्या इच्छेविरुद्ध आपलें धोरण राखूं शकतें. राज्यघटनेंतील सुधारणाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटल्याखेरीज उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींवरील सत्तेच्या विभागणीतही इष्ट त्या सुधारणा घडून यावयाच्या नाहींत. त्या दृष्टीनें पाहिलें तर सध्याचा काळ संक्रमणाचा आहे व आज प्रमुख वाटणारे कांहीं विशेष कालांतरानें कमी महत्त्वाचे होत जातील. तरी सध्याच्या करपद्धतीची सुधारणा व्हावयाची तीही तिच्या वाढीच्या ऐतिहासिक ओघास अनुसरूनच व्हावयाची असल्यानें सरकारी उत्पन्न व खर्च ह्याबद्दलच्या आकड्यांच्या माहात्म्यानें त्याचें विस्तरशः विवेचन करणें आवश्यक आहे.

**३ सरकारी उत्पन्न व खर्च ह्यांबद्दल कांहीं आंकडे**—१९२१ सालापूर्वी प्रांतिक सरकारांच्या उत्पन्नाचे व खर्चाचे आकडे मध्यवर्ती सरकारच्या हिशेबातच समाविष्ट केले जात. अलीकडे मात्र हिंदुस्थान सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांचीं अंदाजपत्रकें व त्यांचे हिशेब ही स्वतंत्र ठेवली जातात. पुढील कोष्टकांत मुंबई सरकारच्या गेल्या तीन वर्षांतील जमाखर्चाचें एक कोष्टक दिलेलें आहे त्यावरून प्रांतिक सरकारांच्या अंदाजपत्रकाचें स्वतंत्र स्वरूप वाचकांच्या ध्यानांत येईल. त्याचप्रमाणें, पूर्वी आगगाड्यांचें एकंदर उत्पन्न व त्यावर होणारा एकंदर खर्च ह्याबद्दलच्या आकड्यांचा हिंदुस्थान सरकारच्या सर्वसामान्य हिशेबांत अंतर्भाव केलेला असे. हल्लीं आगगाड्यांचे हिशेब व त्यांचें अंदाजपत्रक हीं दोन्हीं स्वतंत्र असतात व प्रतिवर्षी हिंदुस्थान सरकारास

[1] पान ३९६ पहा.

आगगाड्यांच्या धंद्यापासून मिळणाऱ्या निव्वळ उत्पन्नाचा ठराविक अंश मात्र सर्व-सामान्य अंदाजपत्रकांत व हिशेबांत दाखविला असतो. निरनिराळ्या वर्षांतील उत्पन्नाचे व खर्चाचे आंकडे वाचतांना ह्या फेरबदलांचें महत्त्व ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे.

**उत्पन्न**

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| तपशील | १९१३-१४ | १९२०-२१ | १९२५-२६ | | १९२६-२७ | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार |
| प्रमुख बाबी | | | | | | |
| जमीन महसूल | ३२·०८ | ३१·९७ | ·३८ | ३५·१६ | ·४१ | ३४·४७ |
| अफू | २·४३ | ३·५३ | ४·१४ | — | ४.३३ | — |
| मीठ | ५·१६ | ६·७६ | ६·३२ | — | ६·६९ | — |
| स्टँम्प | ७.९७ | १०·९५ | ·२७ | १३·३८ | ·२६ | १२·९२ |
| अबकारी | १३·३४ | २०·४३ | ·४२ | १९·४७ | ·४१ | १९·४१ |
| जकाती | ११·३३ | ३१·८९ | ४७.७७ | | ४७·३८ | |
| प्राप्तीवरील कर | २·९२ | २२·१९ | १५·८५ | ·२६ | १५.६४ | ·३३ |
| इतर | ५·०४ | ७·५४ | १०·९ | ७·५८ | १·०७ | ७·७५ |
| प्रमुख बाबींचें एकंदर उत्पन्न | ८०·५९ | १३५·२६ | ७६·२४ | ७५·८८ | ७६·२३ | ७४·९० |
| व्याज | २·०२ | ४·३० | ४·२१ | २·३४ | ४·०८ | २·३५ |
| टपाल व तार खातें | ५·३९ | ९·६२ | ·८६ | — | ·७० | — |
| चलन, टांकसाळ व हुंडणावळ वगैरे. | ५० | ·७३ | ४·६३ | — | ४·१५ | — |
| मुल्की खात्यांतील जमा | २·११ | ३·५५ | ·८९ | ३·५८ | ·८६ | ३·६५ |
| तसलमात | १·१५ | २०·३० | ·५४ | २·०३ | ·६० | १·९१ |
| आगगाड्या ( निव्वळ जमा ) | २६·४३ | २५·०१ | ३४·४० | ·३ | ३४·०७ | ·२ |
| कालवे वगैरे | ७·०६ | ८·७९ | ·१२ | ७·४८ | ·१० | ६·६९ |
| इतर सार्वजनिक कामें | ·४४ | ·७६ | ·१२ | ·६८ | ·१५ | ·६९ |
| लष्करी खात्याची जमा | २.०५ | ६·६६ | ४·३९ | — | ४·९४ | — |
| विशेष जमा | — | — | ·६३ | १·५५ | ·६० | १·२१ |
| प्रांतिक खंडण्या | — | — | ६·०८ | −६ ०८ | ५·१३ | −५·१३ |
| एकूण उत्पन्न | १२७·८१ | २१५·०१ | १३३·१७ | ८७·५१ | १३१·६५ | ८६·४३ |

## खर्च

( आंकडे कोट रुपयांचे आहेत. )

| तपशील | १९१३–१४ | १९२०–२१ | १९२५–२६ |  | १९२६–२७ |  |
|---|---|---|---|---|---|---|
|  |  |  | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार |
| उत्पन्न गोळा करण्याचा खर्च. | १३·९१ | २२·५० | ५·३७ | १०·५५ | ४·१९ | १०·५४ |
| कर्जांवरील व्याज. | २·२७ | १६·३७ | १८·३४ | ३·२७ | १६·७४ | २.९४ |
| टपाल व तारखातें. | ४·९० | ९·४३ | —·०१ | ... | ·७५ | ... |
| टांकसाळ व चलन. | ·१९ | ·२८ | ·७० | ... | ·७६ | ... |
| मुलकी खात्यांचा खर्च. | २६·९० | ४५·५५ | १०·७६ | ४९·१६ | ११·१३ | ५०·९८ |
| मुलकी खात्यांचा संकीर्ण खर्च. | ८·१० | ११·२४ | ४·२५ | ७·०२ | ३·९६ | ७·३० |
| दुष्काळ निवारण. | १·५० | १·५० | ... | ... | ... | ... |
| आगगाड्या-व्याज व इतर. | १९·२५ | १९·३७ | २८·९१ | ·०१ | २८·०५ | ·१ |
| कालवे वगैरे. | ५·२९ | ७·०१ | ·२० | ६·११ | ·१८ | ६·८३ |
| इतर सरकारी कामें. | १०·५१ | १२·७९ | १·६० | ९·५२ | १·८९ | १०·७७ |
| लष्करी खाती. | ३१·८९ | ९४·०४ | ६०·३९ | ... | ६०·९१ | ... |
| विशेष खर्च. | ... | ... | ·२५ | ·०५ | २·९९ | ·५१ |
| एकंदर खर्च. | १२४·७६ | २४०·१३ | १२९·८६ | ८५·८९ | १३१·६५ | ९०·१७ |
| वाढावा. | ... | ... | ३·३१ | १·६१ | ... | –३·७४ |
| एकूण बेरीज. | ... | ... | १३३·१७ | ८७·५१ | १३१·६५ | ८६·४६ |

## मध्यवर्ती सरकारच्या जमाखर्चाचे आंकडे

उत्पन्न.

| तपशील | १९२६-२७ (अखेरचे हिशेब) | १९२७-२८ ( दुरुस्त केलेले अंदाज ) | १९२८-२९ (अंदाज पत्रका-प्रमाणें) |
|---|---|---|---|
| | रुपये | रुपये | रुपये |
| उत्पन्नाच्या प्रमुख बाबी | | | |
| जकाती | ४७,३८,१०,७२१ | ४८,६३,५०,००० | ५०,१८,३७,००० |
| प्राप्तीवरील कर | १५,६४,९६,३३८ | १५,६४,६२,००० | १६,९९,५८,००० |
| मीठ | ६,६९,८१,०५३ | ६,७५,४२,००० | ७,००,०८,००० |
| अफू | ४,३३,१३,७४८ | ३,८०,२२,००० | ३.४७,७७,००० |
| इतर बाबी | २,१७,५०,१४८ | २,२७,६४,००० | २,२०,१०,००० |
| प्रमुख बाबींची बेरीज | ७६,२३,५२,००८ | ७७,११,४०,००० | ७९,८५,९०,००० |
| आगगाड्या निव्वळ जमा | ३४,०७,०८,३८७ | ३८,९५,२०,००० | ३८,५०,००,००० |
| कालवे (निव्वळ जमा) | १०,२५,५७६ | १०,४७,००० | १२,३६,००० |
| टपाल व तारखातें (निव्वळ नफा) | ७०,६४,५७७ | ५१,७६,००० | ५७,३७,००० |
| व्याज | ४,०८,५९,२८५ | ३,३०,५०,००० | २,९१,९७,००० |
| मुलकी खातीं | ८६,०५,०७९ | ९५,३४,००० | १,०१,३२,००० |
| चलन व टाकसाळ | ४,१५-५१,२२७ | २,७२-९७,००० | २,४८,८१,००० |
| सरकारी बांधकामें | १५,७८,७९१ | १५,६३,००० | १४,४१,००० |
| संकीर्ण | ६०,०१,०९६ | ८६,४९,००० | ८१,८२,००० |
| लष्करी खात्यांकडील जमा | ४,९४,६८,०६४ | १,४८,८४,००० | २,९४,१२,००० |
| प्रांतिक खंडण्या वगैरे | ५,१७,७५,००० | १०,५९,००० | — |
| विशेष बाबी | ६०,१०,२५८ | १,८४,७९,००० | २६,६७,००० |
| एकंदर उत्पन्न | १,३१,६१,९१,७९९ | १,२७,७३,९८,००० | १,२९,६४,७५,००० |

## खर्च.

| तपशील | १९२६–२७ ( अखेरचे हिशेब ) | १९२७–२८ ( दुरुस्त केलेले अंदाज ) | १९२८–२९ ( अंदाज पत्रकांतील आंकडे ) |
|---|---|---|---|
| | रुपये | रुपये | रुपये |
| उत्पन्न गोळा करण्याचा खर्च. | ४,१९,९५,१६९ | ४,१९,९५,००० | ४,२४,८४,००० |
| मिठाबद्दल व इतर खात्यांबद्दल चालू जमेंतून होणारा कायम खर्च. | ७,१८,३८५ | १६,८७,००० | ६,४१,००० |
| आगगाड्या (व्याज वगैरे खर्च ). | २८,०५,९५,१७७ | ३२,५९,६२,००० | ३३,०२,००,००० |
| कालवे. | १५,५०,४३६ | ९२,००० | २३,१०,००० |
| टपाल व तारखातें. | ७५,८२,१९२ | ८१,६७,००० | ८१,६६,००० |
| कर्जावरील व्याज. | १६,७४,४९,६७२ | १५,५७,८३,००० | १४,९०,६१,००० |
| मुलकी खात्याचा खर्च | ११,१३,४३,८४७ | ११,२८,९६,००० | ११,६९,४५,००० |
| चलन व टांकसाळ. | ७६,३७,०७२ | ९१,४९,००० | ६९,६३,००० |
| सरकारी बांधकामें. | १,८९,७४,१६० | १,६२,५५,००० | १,७३,३१,००० |
| संकीर्ण. | ३,९६,१५,६०५ | ३,९१,७४,००० | ४,१०,०६,००० |
| लष्करी खातीं. | ६०,९१,६३,८८९ | ५६,४०,८४,००० | ५८,०४,१२,००० |
| मध्यवर्ती व प्रांतिक हिशेबांची वजावाट. | ४,५२,८९६ | ३,४७,००० | ... |
| विशेष खर्च. | २,९९,२१,३०८ | १८,८७,००० | ४,५०,००० |
| चालू उत्पन्नांतून करावयाचा एकंदर खर्च. | १,३१,६९,९९,७९९ | १,२७,७३,९८,००० | १,२९,५९,९६,००० |
| वाढावा. | ... | ... | ... |
| एकूण बेरीज. | १,३१,६९,९९,७९९ | १,२७,७३,९८,००० | १२९,६४,७१,००० |

## मुंबई सरकारचें उत्पन्न

( आंकडे हजार रुपयांचे आहेत. )

| उत्पन्नाच्या बाबी | १९२३-२४ | १९२८-२९ दुरुस्त केलेला अंदाज | १९२९-३० अंदाज |
|---|---|---|---|
| १ प्राप्तीवरील कर | | | |
| २ जमीन महसूल | ५,०८,८९ | ५,३४,२२ | ५,१२,०० |
| ३ अबकारी | ४,३४,५९ | ३,८८,०० | ३,८९,०० |
| ४ स्टँप | १,७९,८९ | १,७४,०० | १,७६,७३ |
| ५ जंगलें | ७१,५० | ७३,०० | ७२,९५ |
| ६ नोंदणी | १२,८७ | १२,३० | १२,३० |
| ७ इतर कर | ९,४० | २०,०४ | २०,६८ |
| ८ कालवे वगैरे | ५४,०२ | ६८,२४ | ७०,२२ |
| ९ व्याज | १,०२,९२ | १,५२,६७ | १,४६,४५ |
| १० मुलकी खाती | ५६,३६ | ७६,४४ | ७९,२२ |
| ११ सार्वजनिक बांधकामें | १७,८९ | ३७,५४ | ३९,७४ |
| १२ संकीर्ण | ३२,८५ | ४३,१९ | ५२,८४ |
| १३ मध्यवर्ती सरकारकडून येणें | -२८,३६ | — | — |
| १४ उत्पन्नाच्या विशेष बाबी | -- | ५ | १० |
| एकूण वसूल | १४,५२,८२ | १५,७९,६९ | १५,७१,८३ |
| कायम हिशेबाची खातीं | | | |
| डेव्हलपमेंट खातें | २८,४४ | ७९८ | — |
| कर्जखातें | ११,५५,८८ | ५,९६,५२ | ४,७५,३५ |
| एकूण कायम खाती | ११,८४,३२ | ६,०४,४९ | ४,७५,३५ |
| शिल्लक | ४,३३,९५ | ३,२८,४६ | २,६५,९१ |
| एकंदर जमा | ३०,७१,०९ | २५,१२,६४ | २३,१३,०९ |

## मुंबई सरकारचा खर्च.

(आंकडे हजार रुपयांचे आहेत.)

| खर्चाच्या बाबी | १९२३–२४ | १९२८–२९ दुरुस्त अंदाज. | १९२९–३० अंदाज |
|---|---|---|---|
| १ वसूल गोळा करण्याचा खर्च. | २,७१,९३ | १,७१,७९ | १,६५,७५ |
| २ कालवे वगैरे | १००,३१ | १०६,२३ | १,११,८७ |
| ३ व्याज. | | | |
| अ. डेव्हलपमेंट | १,४०,३० | ८८,८२ | १,०९,४५ |
| ब. साधारण. | १४,७७ | १,३३,६९ | ९६,३९ |
| ४ राज्यकारभार. | ९८,८३ | २,२३,०७ | २,२४,०३ |
| ५ न्यायदान. | ६८,८७ | ७२,६१ | ७२,६६ |
| ६ पोलीस व तुरुंग. | १,९१,४२ | १,९३,९६ | १,९९,७९ |
| ७ शिक्षण. | १,९१,७५ | २,०४,४२ | २,०९,१९ |
| ८ आरोग्य व वैद्यक. | ६२,६२ | ८१,२७ | ८७,०४ |
| ९ शेतकी. | २३,८३ | ३०,०६ | ३०,५५ |
| १० उद्योगधंदे. | १,५१ | ८४ | १,४८ |
| ११ इतर मुलकी खातीं | ६,९८ | ५,५२ | ५,७७ |
| १२ सरकारी बांधकामें. | ९७,९२ | १,५४,३५ | १,६०,७३ |
| १३ संकीर्ण. | १,२९,८२ | ९१,२२ | ८६,८८ |
| १४ विलायतेतील खर्च. | २२,५८ | ४०,९६ | ३८,५५ |
| चालू वसूलातून खर्च एकूण | १४,२३,०४ | १५,९८,८१ | १६,००,१३ |
| १५ कायम स्वरूपाचा खर्च | १०,६५,२४ | ६,३४,३३ | ४,४७,०५ |
| एकूण खर्च | २४,८८,६८ | २२,३३,१४ | २०,४७,१८ |
| शिल्लक | ५,८२,४१ | २,७९,५० | २,६५,९१ |
| एकूण बेरीज | ३०,७१,०९ | २५,१२,६४ | २३,१३,०९ |

१९२१ सालापासून हिंदुस्थान सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांच्या एकंदर उत्पन्नाच्या व खर्चाच्या आंकड्यांत कसकसे फेरबदल होत गेले व त्यांची सांपत्तिक स्थिति एकंदरीनें कशी होती हें पुढलि कोष्टकावरून दिसेल.

| वर्ष | | उत्पन्न रुपये | खर्च रुपये | वाढावा रुपये | तूट रुपये |
|---|---|---|---|---|---|
| १९२१–२२ | मध्यवर्ती | १,१५,२१,५०,३१७ | १,४२,८६,५२,०१७ | — | २७,६५,०१,७०० |
| | प्रांतिक | ७०,४३,०३,७३६ | ७९,१६,२५,५५६ | — | ८,७३,२१,८२० |
| १९२२–२३ | मत्यवर्ती | १२१,४१,२९,१५६ | १,३६,४३,०५,५४८ | — | १५,०१,७६,३९२ |
| | प्रांतिक | ७५,७१,८५,२३८ | ७७,२३,३८,५२२ | — | १,४९,५३,२८४ |
| १९२३–२४ | मध्यवर्ती | १,३२,७८,६४,५२७ | १,३०,३९,६४,७६९ | २,३८,९९,७५८ | — |
| | प्रांतिक | ७८,८५,०९,३८९ | ७६,०९,२८,६६० | २,७५,८०,७२९ | — |
| १९२४–२५ | मध्यवर्ती | १,३७,५३,१८,११९ | १,३१,८४,९२,४२१ | ५,६८,२५,६९८ | — |
| | प्रांतिक | ८१,२८,१८,०८२ | ७८,४०,६९,७२३ | २,८७,४८,३५९ | — |
| १९२५–२६ | मध्यवर्ती | १३३,१७,३०,४९२ | १,२९,८६,१२,३०५ | ३,३१,१८,१८७ | — |
| | प्रांतिक | ८७,५१,२०,१३० | ८५,८९,५२,७९२ | १ ६१,६७,३३८ | — |
| १९२६–२७ | मध्यवर्ती | १३१,६५,४६,९०३ | १३१,६५,४६,९०३ | — | — |
| | प्रांतिक | ८६,४३,१५,९५८ | ९०,१७,२२,७९३ | — | ३,७४,०६,९३५ |

**४ करांचा बोजा**—म्युनिसिपॅलिट्या व लोकलबोर्डें ह्यांसारख्या स्थानिक संस्था, प्रांतिक सरकारें व मध्यवर्ती हिंदुस्थान सरकार ह्या सर्वांचा एकंदर खर्च भागविण्याकरितां जो पैसा उभा करावा लागतो त्याचा बोजा शेवटी प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें एकदर प्रजाजनांवरच पडतो. हा बोजा उचलण्यास प्रजा समर्थ आहे किंवा नाहीं, व करांच्या रूपानें नागरिकांवर फाजील बोजा पडत आहे किंवा कसें ह्या प्रश्नांची उत्तरें देतांना कर देणाऱ्या नागरिकांचें आर्थिक सामर्थ्य व सरकारी खर्चामुळें त्यांस मिळणाऱ्या सुखसोयींचें मान ह्या दोहोंचा विचार करणें आवश्यक आहे. सरकारी खर्चांत मितव्ययाचें धोरण निष्ठुरपणें अंमलांत आणणें अत्यंत जरूर असतें. त्याचप्रमाणें खर्च करतांना सामान्यतः ज्या खर्चापासून समाजांतील अधिकांत अधिक भागांचें हितवर्धन होईल अशा खर्चास प्रामुख्य देणेंही इष्ट असतें. परंतु राज्यकारभारात बहुजनसमाजाचें वर्चस्व स्थापन झाल्याखेरीज सरकारी खर्चाचा योग्य तो भाग बहुसंख्याक वर्गांवर खर्च होण्याची व करांच्या बोजाची निरनिराळ्या वर्गांतील विभागणी सापेक्षतः गरीब असलेल्या वर्गांस न्याय्य होणें शक्य नसतें. करांचा एकंदर बोजा प्रजेला कष्टकारक होत आहे की काय हें ठरविण्याचा स्थूल मार्ग म्हटला म्हणजे सरासरी उत्पन्नाचें मान व करांचा सरासरी बोजा ह्यांचें परस्पर प्रमाण समाधानकारक आहे किंवा नाहीं हें पाहणें, हा होय. मागील एका प्रकरणांत हिंदी लोकांचें सरासरी उत्पन्न सालीना सुमारें ८४ रुपये आहे असें सांगितलें आहे. एवढ्या गरीब राष्ट्रांत हिंदुस्थान सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांच्यासारखी अवाढव्य खर्चाची राज्यघटना चालू ठेवणे मितव्ययाच्या तत्त्वास सर्वस्वी विरोधक आहे ह्यांत शंका नाही. त्यांतल्यात्यांत हिंदुस्थान सरकारचा अवाढव्य लष्करी खर्च, लष्करांत उच्च पगाराच्या बहुतेक सर्व जागांवर गोऱ्या लोकांची नेमणूक व राज्यघटनेंत सामान्य जनतेच्या हुकमतीचा पूर्ण अभाव इत्यादि कारणांमुळें हिंदुस्थानांत करांचा बोजा लोकांच्या उत्पन्नाच्या मानानें बेसुमार वाढण्याची, व कराचा भार निरनिराळ्या वर्गांत विषमतेनें विभागला जाण्याची, आणि सरकारी खर्चानेंही प्रजाजनांच्या सर्वसामान्य हितास योग्य महत्त्व दिलें न जाण्याची फार भीति असते. महायुद्धापासून सर्वच राष्ट्रांत बाजारभाव वाढलेले असून सरकारच्या खर्चांतही बेसुमार वाढ झालेली आहे. तरी हिंदुस्थानांतील सरासरी उत्पन्नाचा लहान आंकडा ध्यानांत घेतां, येथें सामान्य जनतेकडून वसूल केल्या जाणाऱ्या लहानशा करांचा बोजा ते देणारांस असह्य भासल्यास आश्चर्य नाहीं. निव्वळ करांच्या रूपानें मध्यवर्ती, प्रांतिक व स्थानिक सरकारें लोकांकडून कमींत कमी १६५ कोटी रुपये, म्हणजे एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाच्या एक दशांश भागाइतकी रक्कम, वसूल करतात. अमेरिका, बेल्जम, इटली, फ्रान्स व इंग्लंड ह्या देशांत करांच्या एकंदर बोजाचें राष्ट्रीय उत्पन्नाशी शेंकडेवारीनें प्रमाण अनुक्रमें ११·५, १७, १९·२, २०·९, व २३·२ असें आहे. परंतु त्या देशांतील उत्पन्नाची माणशी सरासरी हिंदुस्थानच्या

१२ ते ४० पट आहे हें ध्यानांत घेतल्यास लोकांच्या उत्पन्नाचा $\frac{1}{10}$ भाग हिंदुस्थानांतील सरकारनें करांच्या रूपानें घेणें म्हणजे लोकांचें आधीच असमाधानकारक असणारें उपभोगसामर्थ्य आणखी मर्यादित करणें होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.' त्यांतल्या त्यांत, एक स्थानिक सरकारी संस्थांची गोष्ट सोडून दिली तर एकंदरीनें प्रांतिक व विशेषतः हिंदुस्थान सरकार यांच्या खर्चाचा फारच थोडा भाग प्रत्यक्षपणें लोकहितास परिपोषक असलेल्या मार्गांनीं खर्च होतांना दिसतो. करांचें बहुतेक उत्पन्न मुलकी व लष्करी खात्याचे अवाढव्य खर्च भागविण्यांतच खर्च होतें. शिक्षण, आरोग्य, उद्योगधंद्यास मदत, पाणीपुरवठा, सार्वजनिक उपयोगाचीं कामें इत्यादि बाबींवर त्या मानानें फारच थोडी रक्कम खर्ची पडते. पाश्चात्य राष्ट्रांचें उत्पन्न हिंदुस्थानच्या उत्पन्नाहून अनेक पटींनी जास्त असल्यानें तेथील लोकांचें करदानसामर्थ्य मोठ्या प्रमाणावर असतें एवढेंच नव्हे तर सरकारच्या खर्चावर लोकांची हुकुमत असल्यानें आणि सर्व रक्कम देशातल्या देशांत व बहुतांशीं लोकोपयोगी खात्यांवर खर्च होत असल्यानें कराच्या रूपानें प्रजेनें केलेला त्याग सुखसोयींच्या व वाढत्या उत्पादकतेच्या स्वरूपानीं तीस परत मिळतो. ह्या सर्व बाबतींत हिंदुस्थानाची स्थिति निराशाजनक आहे. सर्वांगीण राजकीय सुधारणा होऊन सरकारी उत्पन्न व खर्च ह्या बाबतींत लोकमतानुसार अर्वाचीन पद्धतीच्या सुधारणा झाल्याखेरीज येथील करपद्धतीची पाश्चात्य करपद्धतीशीं वास्तविकपणें तुलना करतां येणार नाहीं. तरी विशिष्ट कर, खर्चाच्या बाबी व उत्पन्न गोळा करण्याची व खर्च करण्याची व्यवस्था ह्याबद्दल सविस्तर माहिती करून घेतल्यास त्या त्या बाबतींत तात्कालिक सुधारणा कोणत्या घडून येण्यासारख्या आहेत हें दिसून येईल.

**५ जमीनमहसूल**—मागें शेतजमिनीचे मालक व कुळें ह्यास राष्ट्रीय उत्पन्नांत जो हिस्सा मिळतो त्याबद्दल विवेचन करतांना जमीनधाऱ्याच्या तात्त्विक स्वरूपाचा व तो ठरविण्याच्या सरकारी पद्धतींचा उल्लेख केलेलाच आहे. जमीनधाऱ्यापासून येणारें उत्पन्न कराच्या उत्पन्नाहून निराळें दाखविण्याचा सरकारी अधिकाऱ्यांचा प्रघात आहे, तो मुख्यतः शेतजमीन सरकारच्या मालकीची असून तिच्या खंडांतील आपला हिस्सा शेतसाऱ्याच्या स्वरूपानें सरकार घेतें, ह्या कल्पनेनुसारच होय. १९२१ सालापासून शेतसारा हा सर्वस्वी प्रांतिक सरकारास तोडून दिलेल्या बाबींपैकीं आहे व सुधारणाचा मसुदा ज्या संयुक्त पार्लमेंटरी कमिटीनें दुरुस्त केला तिची सूचना अशी होती कीं इतर करांप्रमाणें जमीनमहसूल ह्या करावरही प्रांतिक कायदे मंडळाचें पूर्ण नियंत्रण असावें. असें असून अजूनही प्रांतिक कायदे मंडळांची शेतसारा आकारण्याच्या अगर गोळा करण्याच्या पद्धतीवर प्रत्यक्षपणें कोणतीच हुकमत नाहीं. ह्या बाबतींतील व्यवस्था बहुतेक प्रांतांत सरका-

रच्या वटहुकुमानुसार व परंपरागत धोरणाप्रमाणें होत असते. जमीनसारा ठरविणें व तो गोळा करणें ह्या गोष्टी सरकारच्या खास हुकुमतीखालच्या आहेत ह्या कल्पनेनुसार जमीनमहसुलाचे नियम ( लँड रेव्हेन्यू कोड ) मामुली पद्धतीप्रमाणें जुन्या कायदेमंडळांतून पास करून घेतलेले आहेत. मोठमोठे व सुसंपन्न जमीनदार ज्या भागांत अस्तित्वांत आहेत तेथें शेतसारा म्हणजे त्यांस त्यांच्या कुळांकडून मिळणाऱ्या खंडाच्या उत्पन्नावर सरकारचा कर आहे असें म्हटलें तर तें तात्त्विक व व्यावहारिक दृष्ट्या खरें ठरेल. परंतु देशाच्या इतर भागांत, म्हणजे जेथें सामान्यतः लहान प्रमाणावर शेतकी चालते तेथें, शेतसारा हा मुख्यत्वेंकरून मालमत्तेवरील करासारखा आहे. शेतसारा शेतकऱ्याच्या कोणत्याना कोणत्या तरी स्वरूपाच्या कमाईतून दिला जाणें अपरिहार्य असलें तरी त्यास प्राप्तीवरील करांच्या वर्गांत ढकलणें बरोबर होणार नाहीं; कारण तसें म्हटलें तर शेतसारा हा कांहीं किमान उत्पन्नाच्या शेतकऱ्यांकडून घेतांच कामा नये. ज्याप्रमाणें शेतकी खेरीज इतर उत्पन्नाच्या बाबतीत दरसाल २००० रुपयांपर्यंत सुटीची मर्यादा आहे त्याप्रमाणें शेतसाऱ्याच्याही बाबतीत किमान मर्यादा ठरविणें आवश्यक होईल. पूर्वकाळीं शेतकीखेरीज इतर धंद्यांची विशेष वाढ झालेली नसल्यानें सर्वच देशांत जमीनजुमल्यावरच मुख्यत्वें करून कर बसविलेले असत. व्यापार, कारखानदारी, सावकारी, पेढ्यांचे व्यवहार, इत्यादि मार्गांनीं संपत्तीचें उत्पादन वाढत्या प्रमाणावर होऊं लागतांच हळूहळू त्यांच्या उत्पन्नावर कर बसविले जाऊं लागले. जमीनजुमल्यावरील कर होतां होईल तेवढे कमी ठेवून त्याचें उत्पन्न स्थानिक संस्थांस देण्याची पद्धत पडूं लागली तीही समाजांत शेतकी खेरीज इतर उत्पादक धंद्यांचा प्रसार होऊं लागल्यामुळेच होय. स्पर्धात्मक व प्रगमनशील आर्थिक पद्धतीत शेतीच्या धंद्याचें विशिष्ट महत्त्व नाहीसें झाल्यानें प्राप्तीवरील सामान्य कर ज्या उत्पन्नांवर लादावयाचे त्यात शेतीच्या उत्पन्नाचा अंतर्भाव केला गेला. हिंदुस्थानांतही शेतकीखेरीज इतर उत्पादक धंद्याचा अलीकडे झपाट्यानें प्रसार होऊं लागला आहे, असें असून येथील सरकारची शेतसाऱ्याकडे पाहण्याची दृष्टि बदललेली नाहीं. मालमत्तेवरील कर लादतांना विवक्षित व्यक्तीच्या एकंदर करदानसामर्थ्याचा विचार होत नसल्यानें त्यामुळें समतेच्या तत्त्वाचें उल्लंघन होण्याचा संभव असतो. त्यांतल्या त्यात, हिंदुस्थानांत इतर धंद्यांच्या व मालमत्तेच्या मानानें शेतीचा धंदा व शेतजमीन ह्यांवर अधिक बोजा पडत असल्यानें येथील करपद्धति सदोष व अन्याय्यमूलक झालेली आहे. अनेक प्रसंगीं शेतकऱ्यास शेतीचा निव्वळ फायदा असा कांहींच होत नसतां त्याच्या मजूरीतून अगर जें कांहीं थोडें भांडवल त्यानें जमीनींत घातलें असेल त्याच्या कमाईतून त्यास शेतसारा भरावा लागतो. रयतवारी भागांतील शेतें अनुत्पादक आहेत, व शेतकरी वर्ग कमालीचा कर्जबाजारी झाला आहे, ह्या सर्व गोष्टी मान्य करूनही सर्व शेतकऱ्यांकडून सारा वसूल करणें व तो ठराविक मुदतीनें वाढविणें हें समर्थनीय नाहीं. विशेषतः

कारागिर, लहान सहान व्यापारी, खेडेगांवांतील सावकार ह्यांच्या प्राप्तीवर कराचा बोजा पडत नसतां सरग्हा सर्व शेतकऱ्यांवर तो वाढत्या प्रमाणांत टाकणें अन्यायाचें आहे.

हळुहळू शेतसारा स्थानिक संस्थांच्या हुकमतीखाली देणें व शेतकीखेरीज इतर धंद्यांतील उत्पन्नावर योग्य ते कर बसवणें अशी दुहेरी सुधारणा घडवून आणल्याखेरीज ह्या प्रश्नाचा कायमचा व समाधानकारक निकाल लागणार नाही. इतके दिवस हिंदी शेतकरी वर्ग अज्ञ व सोशीक म्हणून प्रसिद्ध असल्यानें सरकारनें उत्पन्न उभारण्याचा सोप्यांत सोपा मार्ग म्हणून त्यांवर कर लादले हें सहाजिकच झालें. परंतु आतां शेतकरी वर्गांत आपल्या न्याय्य हक्कांबद्दल जागृति होत असल्यानें व त्याची सध्याची असमाधानकारक स्थिति सुधारण्याची आवश्यकता सर्वत्र भासूं लागल्यामुळें सरकारनें वरील धोरणानें प्रयत्न करणें आवश्यक आहे. रयतास शेताच्या लागवडीपासून खरोखर कमाई किती होत आहे हें पाहूनच त्यावर कर आकारणें जरूर आहे. निव्वळ विवक्षित प्रकारच्या जमीनींत सरासरीनें अमुक इतकें उत्पन्न निघण्याची अपेक्षा आहे एवढ्यावरून तिच्या मालकावर कर बसविल्यास हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितींत त्यापासून अन्याय झाल्यावांचून राहणार[1] नाही. सर्व प्रकारच्या जमीनीवर स्थानिक संस्थांचा खर्च भागविण्यास अल्प प्रमाणांत कर बसवून मोठमोठ्या जमीनदारांकडून इतर उत्पन्नावरील करप्रमाणें कर घेण्याचा प्रघात क्रमाक्रमानें सुरू होणें आवश्यक आहे. बंगालमध्यें व इतर कांही प्रांतांतील ज्या विशिष्ट भागांत कायम धाऱ्याची जमीनदारी अंमलांत आहे तेथें तर जमीनदाराच्या मोठमोठ्या उत्पन्नांवर कर बसविणें विशेष जरूर आहे. मागील प्रकरणांत ह्या प्रश्नाचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार केलेला असून सर्व जमीनदार गबर असतातच असें नाही व त्याजवर जादा कर लादणें कायद्याचा काटेकोरपणें विचार केल्यास समर्थनीय ठरेल असेंही नाही, हें वाचकाच्या ध्यानांत आलें असेलच. परंतु कायदेशीर हक्क हेंही समाजहितार्थ समाजसंस्थेनें निर्माण केलेले असतात व आजच्या बदललेल्या परिस्थितींत बंगाल्यांतील जमीनदारास सरकारला साडे तीन कोटि रुपये द्यावे लागत असून त्याच्या कुळांकडून मात्र त्यास १६ कोटी रुपये खंड मिळतो ह्या गोष्टी ध्यानांत घेतां प्राप्तीवरील कर, फार तर सवलतीच्या दरानें, त्याजवर लादण्यास आतां कांही हरकत आहे असें म्हणतां येणार नाही. त्यांतल्या त्यांत प्राप्तीवरील कर प्रांतिक सरकारच्या पूर्णपणें हवाली केला गेल्यास आपल्याच कुळांची व शेजाऱ्यांची स्थिति अप्रत्यक्षपणें सुधारण्यास आपण मदत करीत आहोंत असें जमीनदारांस समाधान मानून घेतां येईल. आजही शेतीच्या उत्पन्नावरील कर

---

[1] खंडाच्या अगर जमीनविक्रीच्या सरासरी आकड्यांवरून जमीनधारा ठरविल्यास व्यक्तिशः अनेक रयतांवर कसा अन्याय होतो ह्याचें स्पष्ट चित्र बार्डोली येथील साराबाढीसंबंधी खास चौकशी करण्यास नेमलेल्या सरकारी कमिटीच्या अहवालांत पहावयास सांपडेल.

प्रांतिक सरकारांच्या हवाली केले गेले असल्यानें ह्या धोरणास अनुसरून सुधारणा घडवून आणणें शक्य व इष्ट आहे. बंगाल सरकारची स्थिति सांपत्तिक दृष्ट्या असमाधानकारक असल्यानें ह्या सुधारणेस तेथें विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. कोणत्याना कोणत्या तरी मार्गानें कायमधाऱ्याच्या जमीनीची मोठमोठी उत्पन्नें करांच्या कात्रीत धरणें आवश्यक आहे. तसें न झाल्यास त्या त्या प्रांतांतील इतर नागरिकांवर पडणारा करांचा बोजा प्रत्यक्षपणें व इतर प्रांतांतील नागरिकांचा बोजा अप्रत्यक्षपणें, वाढविल्यासारखें होऊन त्यांवर अन्याय होईल. बंगालमधील शेतकीचा धंदा एकदरीनें मुंबई व मद्रास ह्या इलाख्यांहून कमी किफायतशीर आहे असें म्हणतां येणार नाही; असें असून बंगाल्यात जमीनमहसुलाचें एकरी व माणशी प्रमाण इतर दोन्ही इलाख्यांहून पुष्कळच कमी आहे. मद्रास, मुंबई व बंगाल ह्यामध्यें जमीनमहसुलाचें एकरी प्रमाण अनुक्रमें २॥ रु., १ रु. १० आ., व १ रु. २ आ. असें आहे, व माणशीं प्रमाण अनुक्रमें २ रु., २ रु. ५ आ. व १० आणे असें आहे. ह्या आंकड्यांवरून बंगाल इलाख्यातील शेतीच्या उत्पन्नावर न्याय्य प्रमाणाहून कमी कर बसतो हें उघड दिसेल.

**६ सरकारी उत्पन्नाच्या बिनकरांच्या बाबीः**—शेतजमीन सरकारच्या मालकीची असून शेतकऱ्याकडून सरकार सारा वसूल करतें तो 'कर' नसून 'खंड' आहे असा हिंदुस्थान सरकारचा पुष्कळ दिवस आग्रह होता, व अजूनही ह्या मताचा प्रतिध्वनी सरकारी धोरणांत व तत्समर्थनार्थ सरकारी अधिकारी करीत असलेल्या भाषणांत सांपडतो. कराखेरीज सरकारी उत्पन्नाच्या सध्याच्या महत्त्वाच्या बाबी म्हटल्या म्हणजे खंडण्या, अफू, आगगाड्या, कालवे, जंगलें, टपाल व तारायंत्रखातें ह्या होत. हिंदुस्थानातील अफूचें उत्पादन सरकार स्वतःच्या हकुमतीखाली करतें व ह्या मक्त्यापासून त्यास दर वर्षी उत्पन्नही पुष्कळ मिळतें. अफूची विक्री सरकारमार्फतच होत असून हिंदुस्थानाबाहेरील कित्येक देशांत, विशेषतः चीनमध्यें, अफूला पुष्कळ गिऱ्हाईक असतें. हिंदी अफूचा चीनमध्यें वाढत्या प्रमाणांत खप व्हावा ह्यास्तव ब्रिटिश सरकारनें पहिल्याप्रथम विशेष खटपट केली होती व ह्या धोरणामुळें गेल्या शतकात अफूच्या विक्रीपासून हिंदुस्थान सरकारास उत्पन्नही चांगलें मिळे. परंतु चिनी राष्ट्रानें १९०७ सालापासून ह्या व्यसनास आळा घालण्याचें धोरण स्वीकारल्यानें व त्या धोरणाची अंमलबजावणी करण्यांत हिंदुस्थान सरकारनें स्वार्थत्यागपूर्वक सहकार्य करावें अशी ब्रिटिश सरकारनेंच निकड लावल्यानें हिंदी अफूचा परराष्ट्रांतील खप हळूहळू कमी होत चालला. अलीकडे राष्ट्रसंघानेंही ह्या प्रश्नांत लक्ष्य घालतें असून अफूच्या परराष्ट्रीय व्यापारापासून हिंदुस्थान सरकारास मिळणारें उत्पन्न घटत आलें आहे आणि तें लवकरच नष्टप्राय होईल असें दिसतें. इतर राष्ट्रांच्या व्यसनी संवयीपासून हिंदुस्थाननें फायदा मिळविणें

नैतिक दृष्ट्या गैर आहे ह्याबद्दल दुमत होणार नाही. परंतु प्रत्यक्ष हिंदुस्थानांत दारूसारख्या व्यसनाचा होत असलेला प्रसार बंद करावा अशी लोकमताची चळवळ चालू असतां त्यास खरी सहानुभूति न दाखविणाऱ्या सरकारनें दुसऱ्या राष्ट्रांस व्यसनमुक्त करण्याकरितां स्वार्थत्याग करण्यास तयार व्हावें हें आश्चर्य होय. ब्रिटिश सरकारच्या हुकुमानें ज्याप्रमाणें अफूचा परराष्ट्रीय व्यापार थांबला त्याप्रमाणें हिंदी लोकमताची हिंदी सरकारवर हुकुमत बसेल तेव्हांच अफू, गांजा, दारू ह्यांसारख्या अंतर्गत व्यसनांस आळा बसणार असे ह्या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें.

हिंदुस्थानातील जंगलांचा विस्तार व त्याचें आर्थिक महत्त्व ह्याबद्दल मागें विवेचन केलेलें आहे त्यावरून जंगलातील बहुविध संपत्तीचा सरकारनें योग्य मार्गानें उपयोग केल्यास त्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणें पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे हें दिसून येईल. जंगलांबद्दलची सर्व कामगिरी हल्लीं प्रांतिक सरकाराकडे असून कित्येक प्रांतात त्यांवरील हुकुमत कायदेमंडळांस जबाबदार असणाऱ्या प्रधानावर सोंपविलेली आहे. जंगलाचें सरकारास मिळणारें निव्वळ उत्पन्न हल्लीं सुमारें दोन कोटी रुपये आहे, तें जंगलांचा किफायतशीरपणें धंदा केल्यास पुष्कळ वाढण्यासारखें आहे. टपाल व तारखातें चालविणें ही सरकारची एक महत्त्वाची कामगिरी आहे. दळणवळण व वहातुक ह्यांमधील सुधारणामुळे राष्ट्राचे जे सामाजिक, राजकीय व आर्थिक फायदे होतात ते मिळविण्याचें बहुमोल साधन ह्या दृष्टीनें टपाल व तार हीं खातीं सरकारनेंच चालविण्याची सर्व राष्ट्रांत पद्धत आहे. ह्या खात्यांचा बोजा सरकारवर न पडतां सामान्यतः त्यांच्या उत्पन्नांतून त्याचा खर्च भागावा असें धोरण हिंदुस्थानातही राखण्यात येतें. परंतु ह्या धंद्यांत सरकारची मक्तेदारी असल्यानें कार्डें व पाकिटें ह्याच्या किंमती वाढवून अप्रत्यक्षपणें नागरिकांवर कर बसविणेंही सरकारास शक्य असतें. पूर्वीपेक्षा कार्डें व पाकिटें ह्यास हल्लीं दुप्पट किंमत द्यावी लागते, त्यामुळें सरकारी उत्पन्न वाढलें असलें तरी लोकांवरील बोजाही वाढला आहे. त्याचप्रमाणें कोर्ट फी व नोंदणी ह्या बाबत जीं तिकीटें लावावीं लागतात त्याच्या विक्रीमुळेंही सरकारास नागरिकांवर कर लादतां येतात. सरकार देण्याचे हे दोन्ही प्रकार सर्वस्वी करांसारखे नसले तरी त्यांमध्यें करांचें स्वरूप कमी अधिक प्रमाणात दृग्गोचर होतें. ह्या दोन्ही उत्पन्नाच्या बाबी प्रांतिक सरकारावर सोंपविलेल्या आहेत व त्यापैकीं बहुतेकांनी अलीकडे नोंदणी व कोर्ट फी ह्यांच्या दरांत वाढ केलेली आहे, ती करवाढीसारखीच होय.

**७ आगगाड्या**—आगगाड्यांच्या विस्तारासंबंधानें मागें 'आर्थिक क्रांति' ह्या प्रकरणांत कांहीं आंकडे देऊन येथील औद्योगिक व व्यापारविषयक संघटनेंत त्यांचें विशिष्ट महत्त्व कोणतें आहे हें विशद केलेलें आहे. बहुतेक हिंदी आगगाड्यांचे रस्ते येथील सरकारच्या मालकीचे असून ते सरकारनें प्रत्यक्षपणें चालवावे

किंवा अनेक वर्षें अस्तित्वांत असलेल्या इंग्लिश मंडळ्यांमार्फत चालवावे ह्या प्रश्नाबद्दल पुष्कळ वर्षें वादविवाद चालू होता. शेवटीं, ह्या प्रश्नाचा सांगोपांग विचार करून कायमचें धोरण ठरविण्याकरितां १९२० मध्ये स्वतंत्र कमिटी नेमली गेली. ह्या कमिटीचें अध्यक्षपद आगगाड्यांच्या धंद्यातील प्रसिद्ध इंग्रज तज्ज्ञ सर वुइल्यम् ॲक्वर्थ ह्यास दिलेलें होतें. आगगाड्याचा धंदा सामान्यतः खाजगी मंडळ्यांच्या हुकमतीखाली असणें किफायतशीर असतें असें त्यांचें मत असूनही हिंदी आगगाड्यांबद्दल त्याचा व त्याच्या कमिटीचा निकाल खाजगी मंडळ्यांस प्रतिकूल असा पडला. हिंदी आगगाड्याची मालकी सरकारची असून त्यांची व्यवस्था मात्र विलायती खाजगी मंडळ्यांकडे असणें हे धंद्याच्या अगर उतारू व गिऱ्हाईक ह्यांच्या हिताचें नाहीं असें कमिटीनें ठरविलें. अनेक वर्षें हिंदी लोकमत ज्या सुधारणेचें समर्थन करीत होतें तिला परिपोषक असाच हा निकाल होता. सामान्यतः कोणताही धंदा खाजगी व्यक्ती अगर मंडळी जेवढ्या कार्यक्षमतेनें करते तेवढ्या कार्यक्षमतेनें तो सरकारी अधिकाऱ्याकडून चालत नाहीं असा अनुभव आहे. परंतु हिंदुस्थानात आगगाड्याच्या धंद्याची मालकी, भांडवल व नुकसानीची जबाबदारी सरकारकडे व धंदा चालविण्याची हुकमत व नफ्यामध्यें मोठी हिस्सेदारी परकी मंडळ्याची अशी स्थिती असल्यानें ती चालू ठेवणें अशक्य होतें. तिसऱ्या वर्गानें प्रवास करणारे गरीब हिंदी नागरिक व आपापल्या धंद्यांस योग्य सवलती मिळवू इच्छिणारे स्वदेशी धंदेवाले ह्यांच्या हितसंबधाचा परकी मंडळ्यांकडून सहानुभूतिपूर्वक विचार होण्याचीही आशा नव्हती. अशा परिस्थितीत ॲक्वर्थ कमिटीनें हिंदुस्थान सरकारनें क्रमाक्रमानें आपल्या मालकीच्या सर्व आगगाड्या आपणच चालवाव्या अशी जी शिफारस केली ती योग्यच होती व तिचा अंगीकारही तावडतोब करण्यात आला.

आपल्या आगगाड्या सरकारनें स्वतःच चालवावयाच्या त्या धंदेवाईक कार्यक्षमतेनें चालवाव्या व सरकारच्या सर्वसामान्य आर्थिक आणि राजकीय परिस्थितीतील फेरबदलाचा त्यावर अनिष्ट परिणाम होऊं न देण्याची खबरदारी घ्यावी असे कमिटीनें स्पष्टपणें म्हटलें होतें. ही गोष्ट घडवून आणण्यास रेल्वे बोर्ड हे खातें अर्धवट स्वतंत्र करून त्याचें उत्पन्न व खर्च ही सरकारच्या सर्वसामान्य जमाखर्चांतून निराळी काढावीं असेंही कमिटीनें सुचविलें. हिंदुस्थान सरकारच्या फडणिशी खात्यांतील अगदी अलीकडील घडामोडींचा पुढें विचार केला आहे तेथें ह्या सूचनेचें अधिक विवेचन होईलच. १९२७–२८ अखेर हिंदुस्थानांत एकंदर ३९,६३८ मैल आगगाड्याचा रस्ता असून सरकारच्या मालकीच्या रस्त्यांची एकंदर लांबी २८,००४ मैल होती. त्यापैकीं १४,३६३ मैल लांबीच्या रस्त्यावरील आगगाड्या प्रत्यक्ष सरकारकडून चालविल्या जात. हिंदी संस्थानांमध्यें आग-

गाड्यांच्या रस्त्यांची एकंदर लांबी ५८०८ मैल इतकी होती. सरकारनें मदत देऊन बांधविलेल्या परंतु अजून सरकारी मालकीच्या नसलेल्या रस्त्यांची लांबी ५३४२ मैल होती. सरकारच्या मदतीखेरीज बांधलेल्या रस्त्याची लांबी फक्त ६३ मैलच होती. गेल्या दोन वर्षांत आगगाड्यांच्या रस्त्यांचा आणखी विस्तार झालेला असून हल्लीं त्यांची एकंदर लांबी ४१ हजारांवर झालेली आहे. पूर्णपणें सरकारी बनलेल्या रस्त्यांची लांबी सुमारें २९,५०० मैल झाली असून त्यापैकीं १८००० मैल प्रत्यक्ष सरकारच्या व्यवस्थेखालीं आहेत. क्रमाक्रमानें सर्व रस्ते सरकारच्या मालकीचे होऊन रेल्वे बोर्डामार्फत त्यांची व्यवस्था होऊं लागली म्हणजे सरकारवर प्रचंड आर्थिक जबाबदारी येऊन पडेल. धंदेवाईक कार्यक्षमता व राष्ट्रीय धोरण ह्यांचा समन्वय करण्याचें अवघड कार्य सरकारास घडवून आणतां न आलें तर सरकारी उत्पन्न व खर्च ह्यांत पुष्कळसे घोंटाळे माजतील.

**८ कालवे**—कालवे व पाणी पुरवठ्याची इतर साधनें ही शेतीच्या उत्कर्षास व दुष्काळ निवारणास अत्यंत आवश्यक असल्यानें[1] त्यांच्या विस्ताराकडे येथील सरकारचें लक्ष्य असणे सहाजिक आहे. ही कामें बांधण्याची मुख्य जबाबदारी आता प्रांतिक सरकारांवर टाकण्यांत आलेली आहे. जी कामें दुष्काळनिवारणार्थ हातीं घेतलेली असतात व जी साधारणतः अल्प खर्चाची असतात तीं चालू उत्पन्नांतूनच तयार करण्याचा प्रघात आहे. मोठमोठ्या उत्पादक कालव्यांवरील व पाणी पुरवठ्याच्या इतर साधनांवरील खर्च मात्र भांडवल कर्जाऊ काढून करण्यात येतो, व ह्या मोठमोठ्या कामांचे हिशोबही स्वतंत्र ठेवले जातात. १९२५-२६ अखेर सरकारी कालव्यांत सुमारें १०० कोट रुपये भांडवल गुंतलेलें असून त्यावर पुढील प्रमाणें सरकारास उत्पन्न मिळत होतें.

## १९२५-२६.

## पाणीपुरवठ्याच्या ज्या सरकारी सोयींबद्दल स्वतंत्र हिशेब ठेवले आहेत त्यांचा तपशील.

( आकडे लक्ष रुपयाचे आहेत. )

| | ( मध्यवर्ती व प्रांतिक ). |
|---|---|
| १ एकंदर जमा | |
| प्रत्यक्ष पाणीपुरवठ्याबद्दल | ६६७ |
| २ पाणीपुरवठ्यामुळें मिळालेला जादा जमीन सारा | ४३४ |
| एकूण | ११०१ |

[1] मागे पानें २८९-२९२ पहा.

| | |
|---|---|
| उणें, खात्याचा चालूं खर्च | –३७० |
| २ निव्वळ जमा | ७३१ |
| उणें, भांडवलावरील व्याज | ३५६ |
| ३ निव्वळ उत्पन्न | –३७५ |
| ४ ज्या कामांबद्दल तपशीलवार हिशेब ठेवले नाहीत त्यांची जमा | २९ |
| खर्च | १६५ |
| जादा खर्च | १३६ |
| एकंदर गुंतलेलें भांडवल | १०२,१२ |

१९२६–२७ अखेर एकदर भांडवलाचा आंकडा १०८ कोटी रुपयांवर गेला होता. त्या वर्षी एकूण जमा ११५० लक्ष रुपये होऊन चालू खर्च ४५१ लक्ष रुपये झाला, म्हणजे एकंदर भांडवलावर द. द. ६·४७ टक्के उत्पन्न सुटलें. सिंध, पंजाब, संयुक्त प्रांत इत्यादि भागांत जे मोठमोठे कालवे तयार होत आहेत त्यांचें खरें उत्पन्न अजून येऊं लागलें नाहीं हें ध्यानांत घेतां उत्पन्नाचे हे आकडे समाधानकारक आहेत असें म्हटलें पाहिजे.

**९ जकाती**—मागें 'उद्योगधंदे व व्यापार' ह्या प्रकरणांत हिंदुस्थान सरकारच्या जकातीसंबंधाच्या धोरणांत महायुद्धामुळें कसा फरक घडून आला व पुढें 'विवेकनिष्ठ' संरक्षणाचें तत्त्व कसें अंगीकारिलें गेलें ह्यासंबंधी सविस्तर विवेचन केलें आहे[1]. सामान्यतः ब्रिटिश धंदेवाले व ब्रिटिश सरकार ह्यांचें मन संरक्षणाच्या धोरणास विरोधक असून व हिंदी नागरिक गरीब असल्यानें त्यांस सर्व प्रकारचा माल स्वस्ताईनें मिळण्याची खुल्या व्यापारानें सोय होते असा त्यांचा कोटिक्रम असूनही हिंदुस्थान सरकारचा वाढता खर्च भागविण्यास आयात मालावर बऱ्याच मोठ्या प्रमाणांत जकाती बसविण्याखेरीज त्यास गत्यंतर नव्हतें हें त्या विवेचनांत स्पष्ट केलें आहे. कांहीं अंशीं महायुद्धकालीन अनुभवावरून व कांहीं अंशी हिंदी लोकमताच्या वाढत्या महत्त्वामुळें १९२४ पासून लोखंड, कागद वगैरे धंद्यांस उघडपणें 'संरक्षक जकाती' ची मदत मिळत आहे. जकातीच्या उत्पन्नांत गेल्या पंधरा वर्षांत कसकशी वाढ होत गेली ह्याबद्दल पुढील कोष्टकांत आंकडे दिले आहेत.

---

[1] पानें ३९४–४२२ पहा.

## जकातींचें उत्पन्न.

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. )

१

| तपशील | १९१३–१४ | १९१६–१७ | १९१८–१९ |
|---|---|---|---|
| आयात ( समुद्रावरून ) | | | |
| ( विशिष्ट जकाती ) | | | |
| हत्यारें व दारूगोळा. | ६.६ | ७ ३ | ५.० |
| मद्यें व दारू. | १३२.६ | १३४.० | ११०.८ |
| पेट्रोल. | ७०.५ | ४५.१ | १३.० |
| चांदी व चांदीचीं नाणी. | ९९.२ | १५.० | ... |
| चांदीचें सामान. | ... | ३.९ | १.९ |
| साखर. | ९२.३ | १३०.० | १६९.४ |
| तंबाकू. | २९.२ | ४५.० | ८३.० |
| ( अडीच टक्के ) | | | |
| यंत्रसामुग्री. | ... | १०.० | ११.६ |
| लोखंड व पोलाद. | १६.७ | १८.४ | २६.० |
| आगगाडीचें सामान व यंत्रें. | ... | ३.६ | ४.६ |
| ( साडेसात टक्के ) | | | |
| खाद्य व पेय वस्तु. | ३०.४ | ५२.० | ५७.० |
| कच्चा माल. | १५.७ | ३८.५ | ४१.० |
| ( तयार माल. ) | | | |
| चाकू, कात्र्या, दिवे वगैरे. | ३६.७ | ४०.७ | ४८.८ |
| धातू. | ३०-१ | ११.६ | २३.२ |
| कापड. | २१२.९ | १७९.६ | २७८.७ |
| सूत, व धाग्याचीं वस्त्रें. | ४४.४ | ६१.६ | ५८.२ |
| इतर माल. | १०६.२ | १६९.७ | १८५ ४ |
| एकूण आयात जकाती— | ९३६.० | ९९०.२ | १२५७ ० |
| खुष्कीच्या ,, ,, | ५.६ | ७.७ | ८.३ |
| निर्यात जकाती ( समुद्र मार्गानें ) | | | |
| ताग ( कच्चा ) | ... | ५९.० | ६७.२ |
| ,, ( तयार माल ) | ... | ५८.८ | १४६.८ |
| तांदूळ | १२८.७ | ८६.७ | ११९.१ |
| चहा. | ... | ४२.५ | ४३.८ |
| एकूण निर्यात जकाती | १२८.७ | २८७.१ | ३६९.१ |
| कापडावरील अंतर्गत पट्टी. | ५४.३ | ४४.६ | १३८.१ |
| एकूण जकाती. | ११३३.७ | १२८८.८ | १८१८.० |

## जकातींचें उत्पन्न.

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. )

| तपशील | १९१९-२० | १९२०-२१ | १९२२-२३ | १९२६-२७ |
|---|---|---|---|---|
| आयात (समुद्रावरून) | | | | |
| (विशिष्ट जकाती) | | | | |
| दारू व मद्यें | १३७.८ | १८७.९ | २३४.३ | २६०.० |
| साखर | १२८.१ | १०९.१ | ४४०.९ | ७००.७ |
| तंबाकू | ८९.० | १३१.२ | १५४.८ | १९०.७ |
| खनिज तेलें | १००.३ | ७७.३ | ११०.८ | १२९.२ |
| सूत | — | — | ४८.८ | ३६.४ |
| कापड | ३९१.९ | ६४१.१ | ६३८.७ | ६२१.०४ |
| काड्याच्या पेट्या | १५.४ | १६.५ | १५३.६ | ८८.६३ |
| (अडीच टक्के याप्रमाणें) | | | | |
| यंत्रसामुग्री | १८.८ | ५२.६ | ६३.० | ३६.६८ |
| इतर माल | .४ | १.४ | .८ | — |
| (दहा टक्केप्रमाणें) | | | | |
| लोखंड व पोलाद | ४६.१ | ६६.९ | १८४.० | ४२.८१ |
| आगगाड्यांचें सामान व यंत्रें | १३.५ | ३३.९ | १०७.० | २४.४१ |
| (पंधरा टक्केप्रमाणें) | | | | |
| खाद्य व पेय वस्तू | ६६.३ | ६३.६ | १२२.५ | १७४.८९ |
| कच्चा माल | ३३.१ | ३८.२ | ७६.० | ६५.१६ |
| ( तयार माल ) | | | | |
| चाकू, कात्र्या, दिवे वगैरे | ५३.३ | १२८.५ | १३३.४ | १३१.५१ |
| धातू | ६३.९ | ७०.१ | १०७.५ | ९६.८८ |
| सूत व धाग्याची वस्त्रें | ४५ ८ | १०५.४ | १०[illegible].८ | १६८.४ |
| इतर माल | २१३.० | ४३४.१ | ३८०.१ | ४१५.९ |
| ( तीस टक्केप्रमाणें ) | | | | |
| मोटारी | — | — | ५६.० | १०४.९ |
| रेशमी कपडा | ४९.२ | ४९.१ | ८०.८ | ७८.३४ |
| (खास संरक्षक जकाती) | | | | |
| कोलट्रस | — | — | — | १.३ |
| लोखंड व पोलाद | — | — | — | २६७.७९ |
| आगगाडीच्या रस्त्याचें सामान | — | — | — | ७.८३ |
| सरकारी सामान | — | — | — | ५४.६ |
| एकूण आयात जकाती | १५४६.५ | २३१५.१ | ३३९९.२ | ३३६६.४ |

| तपशील | १९१९-२० | १९२०-२१ | १९२२-२३ | १९२६-२७ |
|---|---|---|---|---|
| निर्यात जकाती (समुद्रा-वरून) | | | | |
| कातडीं | ९१.९ | ६०.२ | ४२ ६ | ३०.८ |
| ताग (कच्चा) | १३७.० | १११ ६ | १४५.३ | १७२.३ |
| ,, तयार माल | १६०.४ | २००.५ | १८३.९ | २२२.८ |
| तांदूळ | ३७.२ | ६०.२ | १०८.० | ११६.७ |
| चहा | ७४.५ | ४२.० | ४४.४ | ५१.० |
| एकूण निर्यात | ४८१.१ | ८८३.६ | ५२४ ३ | ५९३.६ |
| कापडावरील अंतर्गत पट्टी | १५५.१ | २३०.९ | १८७.३ | -- |
| मोटार स्पिरिटवरील ,, | ४१.४ | ५४.२ | ६५.३ | ९६.४० |
| राकेलवरील ,, | — | -- | ९१.६ | १०४.७० |
| एकूण बेरीज | २२४८.१ | ३१८९.१ | ४२७१.८ | ४७३८.१० |

**१० अबकारी**—दारू, अफू, गांजा वगैरे उन्मादक पदार्थांवरील करांपासून सरकारी उत्पन्न मिळविण्याची वहिवाट इतर राष्ट्रांप्रमाणें हिंदुस्थानांतही पहिल्यापासून अस्तित्वांत आहे. अफूच्या मक्तेदारीपासून हिंदुस्थान सरकारला मिळणाऱ्या उत्पन्नाचा मागें उल्लेख आलेलाच आहे, त्यावरून अफूचें उत्पन्न हळूहळू संपुष्टांत येत आहे हें दिसून येईल. परंतु ह्या प्रकारच्या करांत प्रमुख स्थान दारूवरील करास दिलें पाहिजे. गेल्या कित्येक वर्षांत दारूवरील कराचें उत्पन्न सारखें वाढत आहे. हल्लीं अफूखेरीज इतर अबकारी कर प्रांतिक सरकारांकडे दिले गेले असल्यानें व त्यांची सांपत्तिक स्थिति असमाधानकारक असल्यानें दारूचें निव्वळ उत्पन्न कमी न होऊं देण्याकडे त्यांची प्रवृत्ति असणें साहजिक आहे. ही कामगिरी जबाबदार प्रधानांच्याकडे असूनही मद्यपानास म्हणण्यासारखा कोणत्याही प्रांतिक सरकारानें आळा घातलेला नाहीं ह्याचें प्रमुख कारण म्हणजे त्यांच्या उत्पन्नाच्या बाबीत अबकारी खात्याचें असलेलें महत्त्वाचे स्थान हें होय. होतां होईल तों कराचे दर वाढते ठेवून उतरतें उत्पादन व खप ह्यांच्यामुळें होणारें वाढतें सरकारी उत्पन्न मिळविण्याकडे आपलें लक्ष्य असल्याचें बहुतेक प्रांतिक सरकारांकडून सांगण्यांत येतें. परंतु लोकांचें उत्पन्न वाढत आहे, चोरून दारू गाळण्यास उत्तेजन मिळत आहे, इत्यादि सबबींवर ह्या धोरणाचीही व्यवहारांत जेवढी अंमलबजावणी व्हावी तेवढी होत नाहीं. विशिष्ट जिल्ह्यांत मद्यपानबंदी करण्याचा प्रयोग करून पहाण्याचा

उपक्रम करावा असें सर्वसामान्य मत असून त्याचेंही अवलंबन अजून झालेलें नाहीं. तंबाकूवरही म्युनिसिपालिट्यांसारख्या स्थानिक संस्थाकडून हल्लीं अंतर्गत पट्टी बसविण्यांत येते. परंतु ही पट्टी तंबाकूचा खप मर्यादित करण्याच्या हेतूनें लादली जात नसून तिचें उत्पन्नही थोडेंच आहे. प्रांतिक व मध्यवर्ती सरकारास वाढत्या खर्चाचें साधन ह्या नात्यानें ज्या नव्या उपन्नाच्या बाबी उपलब्ध आहेत त्यांत तंबाकूवरील करांचा अंतर्भाव केला पाहिजे. तंबाकूची लागवड देशाच्या निरनिराळ्या भागांत लहान प्रमाणावर होत असल्यानें तिचें उत्पादन सर्वस्वी सरकारच्या हुकुमतीखालीं राहणें कठीण आहे. तंबाकूची विक्री करण्यास खास परवानगी देण्याचा अधिकार आपल्या हातांत ठेवून विक्रीवर पट्टी बसविणेंच सरकारास शक्य आहे. मोटार स्पिरिट व राकेल ह्यांवरही हल्लीं पट्टी बसविलेली आहे.

**११ मिठावरील कर**—ह्या कराबद्दल आर्थिक व राजकीय दृष्ट्या अनेकवार चर्चा झालेली असून एकंदरीनें तो गरीब वर्गावर प्रमाणाबाहेर पडत असल्यानें तो रद्द केला जावा असेंच लोकमत आहे. मिठावरील कर प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहे, व सध्यां तो तीन मार्गांनीं मिळविला जातो. (१) मक्तेदारांकडून उत्पन्न होणाऱ्या मिठावरील पट्टी; (२) परदेशांतून आयात होणाऱ्या मिठावरील आयात जकाती व (३) सरकारी मिठागरांत तयार होणाऱ्या मिठाची विक्री. मिठाच्या धंद्यास 'संरक्षण' देण्याचें सरकारचें सध्यांचे धोरण नसल्यानें व मीठ हा जिन्नस मुख्यत्त्वेंकरून गरीब वर्गास आवश्यक असा खाद्य पदार्थ असल्यानें त्यावरील आयात जकात अंतर्गत पट्टीबरोबरच ठेवली जाते. १८८२ सालापूर्वी देशाच्या भिन्न भागात मिठावरील कराचे दरही भिन्न होते, ते त्या वर्षी सर्वत्र दरमणीं दोन रुपये असे करण्यांत आले. १८८८ सालीं मिठावरील राष्ट्रीय कर दर मणास अडीच रुपये करण्यांत आला. गरीब लोकांस आवश्यक असणाऱ्या जिनसांवर कर बसविणें तात्त्विक दृष्ट्या असमर्थनीय व व्यावहारिक दृष्ट्या नुकसानकारक असल्यानें मिठावरील हा भारी कर उतरविला जावा ह्याबद्दल वरिष्ठ कायदे कौन्सिलांत अनेक वर्षे खटपट चालली होती. ह्या बाबतीत कै. ना. गोखले ह्यांची कामगिरी फार महत्त्वाची आहे. मुख्यतः त्यांच्याच प्रयत्नामुळें हा कर उतरला जाऊन महायुद्ध सुरू होण्याच्या वेळेस तो मणास एक रुपया एवढा होता. महायुद्धामुळें हिंदुस्थानसरकारच्या खर्चांत पुष्कळ वाढ होऊन तो भागविण्यास करांचे दरही वाढविले गेले. १९१६ मध्यें मिठावरील कर सव्वा रुपया मण करण्यांत आला व १९२३-२४ मध्यें खर्चाच्या मानानें उत्पन्नांत

१ मिठाच्या पुरवठ्याच्या बाबतीत हिंदुस्थान देश स्वायत्त करणें कितपत शक्य आहे ह्यासंबंधी चौकशी करून त्या बाबतींत उपाय सुचविण्याकरिता हा प्रश्न हल्लीं टॅरिफ बोर्डाकडे सोपविलेला आहे.

पुष्कळ तूट आल्यानें तो २ रु. ८ आ. इतका वाढविला गेला. सरकारच्या धोरणास लोकमताचा व मध्यवर्ती कायदे मंडळाचा जोराचा विरोध झाला म्हणून मिठाचा कर पुढील वर्षी पुन्हां सव्वा रुपया करण्यांत आला. मीठ हा जिन्नस सर्व वर्गाचे लोक वापरतात व त्यास असलेली मागणी कायम असते; म्हणून सरकारला मिठावरील कराचा दर वाढवून कर गोळा करण्याच्या खर्चांत भर न पडता आपल्या उत्पन्नांत मात्र सहज भर टाकतां येते. इंग्लंडच्या अंदाजपत्रकांत प्राप्तीवरील करास जें महत्त्व आहे, त्या स्वरूपाचें महत्त्व ह्या बाबतींत हिंदुस्थानांतील मिठावरील करास प्राप्त झालेलें आहे. सरकारच्या जमेंत तूट येतांच मिठावरील कराकडे सरकारचें लक्ष्य वळतें ते ह्याच कारणामुळें होय. उलट, गरीबांच्या व शेतीच्या जनावरांच्या अन्नावर कर लादल्यानें त्यामध्यें हलाखी व रोगराई ह्यांचा प्रसार होऊन त्यांचें व राष्ट्राचें शेवटी नुकसान होतें असें ह्या कराच्या विरोधकांचें म्हणणें आहे. सामान्यतः दर माणशीं सालीना सहा शेर मीठ देशांत खपतें. ह्यात गरीब वर्गाचा भाग अर्थातच सरासरीहून कमी असणार, हें ध्यान्यांत घेतल्यास त्यावर मिठाच्या करामुळें पडणारा बोजा भारी आहे असें नाहीं. परंतु सामान्य माणसाची आत्यंतिक गरीबी, मीठ महाग झाल्यास त्यांत बचत करण्याच्या अदूर दृष्टीनें होणारी माणसांच्या व जनावरांच्या आरोग्याची हानी व हिंदुस्थानांत सर्वत्र मीठ मिळण्याच्या सोयी असतांना सरकारच्या मक्तेदारीमुळें सोसावी लागणारी निष्कारण अडचण ह्या गोष्टी ध्यानांत घेतां हा कर काढून टाकणें इष्ट आहे असें दिसतें.

**१२ प्राप्तीवरील कर**:—१९१६ सालीं ह्या कराच्या दरांत विशेष वाढ करण्यात आली. त्यापूर्वी प्राप्तीवरील करापासून तीन कोटि रुपये एवढेंच उत्पन्न सरकारास मिळत असे. व्यापार, धंदे, नोकरी वगैरे करून श्रीमंत होणाऱ्या वर्गाचें देशाच्या राज्यकारभारांत वर्चस्व असल्यानें त्यांजकडून प्राप्तीवरील कराचे दर वाढविण्याच्या सूचनेस नेहमीं विरोध होई. त्याचप्रमाणें जमीनीपासून ज्यांस पुष्कळ उत्पन्न मिळे असे कायमधारापद्धति चालू असलेल्या प्रांतांतील जमीनदार आपले 'कायदेशीर हक्क' पुढें करून हा कर चुकवूं शकत. ह्याखेरीज, प्रत्येक माणसाकडून त्याच्या उत्पन्नाच्या प्रमाणांत प्रत्यक्षपणें कर घेण्याची पद्धत हिंदी लोकांच्या जुन्या मतांस सोडून आहे असेंही सांगण्यांत येई. परंतु प्रस्तुत प्रकरणाच्या सुरुवातीस मनुस्मृतीतील जे उतारे दिलेले आहेत त्यांवरून 'प्रत्यक्ष' करांस जुन्या हिंदी शास्त्रज्ञांचा विरोध नव्हता हें सिद्ध होईल. तसेंच, अर्वाचीन काळीं ब्रिटिशांच्यापूर्वी हिंदुस्थानांत जे राजे होऊन गेले त्यांच्या राजवटींतही व्यापार, धंदे इत्यादिकांवर 'विसाबादी'. 'मोहतर्फा' असले प्रत्यक्ष कर घेण्याची वहिवाट होती असें दिसून येतें. १८५७ च्या बंडानंतर प्राप्तीवरील कर ब्रिटिश सरकारनें पहिल्या प्रथम सुरू केला तेव्हां तो सर्व प्रकारच्या, म्हणजे शेतकीच्या सुद्धां, उत्पन्नांवर लादलेला होता

व २०० रुपयांवरील सर्व कमाईवर तो घेतला जाई. परंतु हे कर गोळा करणें त्रासाचें व खर्चाचें आहे असें दिसून आल्यानें ते बंद करण्यांत आले. १८७३ ते १८८६ पर्यंत हिंदुस्थानसरकारचा असा प्राप्तीवरील किंवा धंद्यावरील कर अस्तित्वांत नव्हता. १८८६ मध्यें हिंदुस्थानसरकारची सांपत्तिक परिस्थिति असमाधानकारक असल्यानें जुन्या करांत बरीच वाढ होऊन शिवाय धंद्यांच्या उत्पन्नावर नवा कर बसविण्यांत आला. महायुद्धकालीन अडचणींत ह्याच करास वाढत्या उत्पन्नांवर वाढत्या दरानें कर घेण्याचें तत्त्व लादण्यांत येऊन भारी उत्पन्नांवर सामान्य कराखेरीज जादा करही बसविण्यांत आला. शिवाय, महायुद्धाच्या वेळी ज्या धंदेवाल्यांस विशेष फायदा झाला त्यांच्या नफ्यांतून मोठा हिस्सा कराच्या रूपानें घेण्याचाही सरकारनें उपक्रम केला होता. प्राप्तीवरील कर द्यावा लागणाऱ्या उत्पन्नाची किमान मर्यादा क्रमाक्रमानें दोन हजारांवर चढविण्यांत आली आहे. ह्या मर्यादेहून वरील उत्पन्नांत वाढत्या दराचें[1] तत्त्व १९१६ साली अंमलांत आणलें गेलें. १९१८ मध्यें सालीना ५०,००० रुपयांवरील उत्पन्नावर जादा कर बसविण्यांत येऊन त्या करासही वाढत्या दराचें तत्त्व लावलें गेलें. १९२१, १९२२, १९२३ ह्या सालात प्राप्तीवरील कराचे दर सारखे वाढतच गेले. नोंदलेल्या मंडळ्या, सरकारी व बिनसरकारी कर्जरोखे ह्यांवर भारीत भारी दरानें कर आकारला जातो. त्याचप्रमाणें, ह्या मार्गांनी मिळावयाचें उत्पन्न सालीना दोन हजारांहून कमी असलें तरी त्यावरही कर लादला जातो. जादा कर हा सामान्य कराखेरीज निराळा घेतला जातो. तो मंडळ्यांकडून सरसहा रुपयात एक आणा ह्या दरानें घेतला जातो व अविभक्त हिंदू कुटुंबांचे उत्पन्न सालीना ७५ हजारांवर असेल तरच त्यांस जादा कर द्यावा लागतो. हिंदुस्थानांत शेतकीखेरीज इतर धंद्यांची जसजशी वाढ होत जाईल तसतसें ह्या कराचें उत्पन्न वाढत जाणें साहजिक व न्याय्यही आहे. विवक्षित किमान मर्यादेपर्यंत प्राप्तीवरील करांतून अजीचात सूट देणें किंवा विमा उतरविण्याकरितां भरलेल्या पैशाबद्दलही सूट देणें इत्यादि स्वरूपाच्या ज्या सुधारणा प्राप्तीवरील करामध्यें होत आहेत त्या योग्यच आहेत; परंतु कायम व हंगामी धाऱ्याच्या पद्धतीस अनुसरून ज्यांचें उत्पन्न सालीना दोन हजारांवर आहे त्यांवर सर्वसामान्य प्राप्तीवरील कर लादला जाणें आवश्यक आहे. निदान, त्यांच्या शेतकीखेरीज इतर मार्गांनी मिळविलेल्या उत्पन्नावरील करांचे दर ठरवितांना शेतीचें उत्पन्न ध्यानांत घेण्याचा उपक्रम तरी तात्काल सुरू करण्यास हरकत नाही. ह्याबद्दल मागें विवेचन केलेलें असल्यानें त्याचा पुन्हां विस्तरशः उल्लेख करण्याची जरूरी नाही. तसेंच, शेतकीखेरीज इतर धंद्यांवर ज्यांची उपजीविका होते व ज्यांचें उत्पन्न सालीना दोन हजारांहून कमी आहे अशांवरही स्थानिक अगर प्रांतिक सरकारांकडून कर लादले गेल्याखेरीज शेतकरी वर्गावर अप्र-

---

१ पान १३६—१४० पहा.

त्यक्षपणें आज जो अन्याय होत आहे तो दूर होणार नाही. प्राप्तीवरील करामध्यें करासंबंधीच्या अनेक तत्त्वांचा अंतर्भाव होत असल्यानें त्याच्या दरासंबंधी खाली आंकडे दिले आहेत.

## प्राप्तीवरील कराचे दर.

अ. व्यक्तिशः नागरिक, न नोंदलेले धंदेवाले व अविभक्त हिंदू कुटुंबें ह्यांचें उत्पन्न सालीना—

२,००० रुपयांखाली असल्यास त्यांस—प्राप्तीवरील कर नाही.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २,००० रुपयांहून | अधिक व | ५,००० रुपयांहून | कमी | असल्यास | रुपयांत पांच पै |
| ५,००० | ,, ,, | १०,००० | ,, | ,, ,, | सहा ,, |
| १०,००० | ,, ,, | २०,००० | ,, | ,, ,, | नऊ ,, |
| २०,००० | ,, ,, | ३०,००० | ,, | ,, ,, | एक आणा |
| ३०,००० | ,, ,, | ४०,००० | ,, | ,, ,, | सव्वा ,, |
| ४०,००० | ,, ,, | ———— | ,, | ,, ,, | दीड ,, |

ब. प्रत्येक मंडळी व नोंदलेलें दुकान ह्यांचें उत्पन्न कितीही असलें तरी प्राप्तीवरील कर ,, ,, ,,

## जादा कराचे दर.

सालीना पन्नास हजार रुपयांहून जेवढें अधिक उत्पन्न असेल तेवढ्यावर बसवायाच्या कराचा दर—

| | | |
|---|---|---|
| प्रत्येक मंडळीच्या बाबतींत | ... ... | रुपयांत एक आणा. |
| ,, अविभक्त हिंदू कुटुंबाच्या पहिल्या पंचवीस हजारांस | | जादा कर नाही |
| ,, ,, ,, पुढील ,, | | रुपयांत एक आणा. |
| व्यक्तिशः नागरिक व न नोंदलेलें दुकान ह्यांच्या पहिल्या पन्नास हजार रुपयांत | ... ... | रुपयांत एक आणा. |
| नागरिक, न नोंदलेलें दुकान व अविभक्त हिंदू कुटुंब ह्या सर्वांच्या दुसऱ्या पन्नास हजारांवर | ... ... | रुपयांत दीड आणा |
| तिसऱ्या पन्नास हजारांवर | ... ... | ,, दोन आणे. |

ह्याप्रमाणें पन्नास हजारांवरील दर पन्नास हजाराच्या वाढाव्यावर अर्धा आण्यानें जादा कराचा दर वाढत जाऊन सालीना सहा लाख व त्यावरील उत्पन्नावर तो रुपयांत सहा आणे इतका भारी असतो. जादा कर प्राप्तीवरील सामान्य कराहून निराळा द्यावा लागतो हें ध्यानांत घेतल्यास सहा लाखांवर ज्यांचें सालीना उत्पन्न आहे त्यांस एकंदर एका रुपयांत साडेसात आणे प्रमाणें कर सरकारास द्यावा लागतो हें दिसून येईल.

**१३ करपद्धतीची सुधारणाः**—महायुद्धापूर्वी प्रांतिक व मध्यवर्ती सरकारचें मिळून एकंदर उत्पन्न सुमारें १२५ कोटि रुपये होतें, तेंच आतां २१० कोटि रुपये झालें आहे, हें प्रस्तुत प्रकरणाच्या प्रारंभीं दिलेल्या आंकड्यांवरून दिसून येईल. मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्या दोहोंच्याही उत्पन्नांत गेल्या पंधरा वर्षांत पुष्कळ वाढ झालेली आहे, तरी त्या वाढीचें प्रमाण मध्यवर्ती सरकारच्या बाबतीत अधिक आहे. लष्करी खर्च, जुन्या नव्या नोकराचे व त्यांच्या कचेऱ्याचे वाढते खर्च इत्यादि बाबतीत मितव्ययाचें धोरण अवलंबण्याकडे सरकारचें सामान्यतः लक्ष्य नसतें. जकाती, अबकारी, प्राप्तीवरील कर ह्यांपासून चढीचें उत्पन्न मिळत असूनही सरकारी तिजोऱ्यांची रड संपत नाही. कापडावरील व चहावरील निर्यात जकात व चेकवरील तिकिटाचें उत्पन्न ह्या बाबी सरकारनें सोडलेल्या आहेत. ह्यांपैकीं चहाच्या मळेवाल्यांकडून इतके दिवस एक चतुर्थांश उत्पन्नावर प्राप्तीवरील कर घेतला जाई तो आतां निम्म्यावर घेतला जातो. १९२१ साली सुधारलेली राज्य-पद्धति येथें अस्तित्वांत आल्यापासून शिक्षण, आरोग्य, कालवे, उद्योगधंदे इत्यादि वाढत्या खर्चाची खाती प्रांतिक सरकारांवर सोंपविलेली आहेत, परंतु त्यास उपलब्ध असणाऱ्या उत्पन्नाच्या बाबी मात्र मर्यादित असून जमीनमहसूल व अबकारी ह्या दोन्ही खात्यांत दिवसानुदिवस खोट येण्याचाच संभव अधिक आहे. हुंडणावळीचा भारी दर अंमलांत आणल्यानें हिंदुस्थानसरकारची जी बचत झाली तिचा फायदा मिळून प्रांतिक सरकाराकडून मध्यवर्ती सरकारास ज्या खंडण्या दिल्या जात त्या गेल्या वर्षापासून बंद झाल्या आहेत. तरीही आपला वाढता खर्च कसा भागवावा ह्याबद्दल प्रांतिक सरकारांस संकट पडलें असून स्टँप व करमणुकीवरील कर ह्यांत त्यांनी आधीच वाढ केलेली आहे. विशेषतः मुंबईसारख्या ज्या प्रांतात शेतकी-खेरीज इतर धंद्यांचे विशेष महत्त्व आहे, त्यावर प्राप्तीवरील कर मध्यवर्ती सरकारच्या ताब्यांत गेल्यानें विशेषच अन्याय झाला आहे. म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डे वगैरे स्थानिक संस्थांचें उत्पन्न सध्या फारच मर्यादित आहे. शिक्षण, आरोग्य, सार्व-जनिक बांधकामें, रस्ते वगैरे बाबतीत स्थानिक संस्थांवर वाढती जबाबदारी टाकण्याची प्रवृत्ति प्रांतिक सरकारांत अलीकडे दिसून येते व ती योग्य आणि हितावहही आहे. परंतु स्थानिक संस्थांवर नुसत्या जबाबदाऱ्या टाकून उत्पन्नाची खाती सरकारनें आपल्या हातीं ठेवल्यानें त्या कामगिऱ्या योग्यपणें केल्या जात नाहींत असें स्पष्ट दिसत आहे. कोणत्याही देशांतले लोक घेतले तरी ते आपण होऊन कर लादून घेण्यास नाखुषच असतात. परंतु सरकारची सर्व करपद्धति लोकमतानुवर्ती असल्यास लोकांच्या पुढाऱ्यांस स्थानिक बाबींकरितां स्थानिक कर लोकांनीं लादून घ्यावे असें विश्वासानें म्हणतां तरी येतें. जकाती, प्राप्तीवरील कर, चैनीच्या वस्तूंवरील कर ह्यांपासून हळुहळू वाढतें उत्पन्न मिळेल असें वाटण्यास जागा आहे. उलट, अबकारी, जमीनधारा व मिठावरील कर ह्यांमध्यें वाढ

होण्याची आशा नसून त्यांचें मान दिवसानुदिवस कमीच होत जाणार हें उघड आहे. उत्पन्नाच्या नव्या बाबी म्हणजे वारशावरील कर व तंबाकूवरील कर हे होत. परंतु अविभक्त कुटुंबांची पद्धत व बिनचूकपणें ध्यानांत न येणारी मालमत्ता ह्यांच्या अस्तित्वामुळें वारशावरील कर तावडतोब अंमलांत आणणें दुर्घट आहे. ह्या सर्व कराचा, सरकारच्या अडचणींचा व मध्यवर्ती, प्रांतिक व स्थानिक सरकारांच्या परस्पर आर्थिक व राजकीय संबंधांचा एकत्र विचार होऊन सुधारणा घडून येणें आवश्यक आहे. १९१९ सालचा राजकीय सुधारणांचा कायदा केला गेला त्यावेळीं ह्या प्रश्नाचा पूर्णपणें विचार होणें शक्य झालें नाहीं. पुढे १९२४ मध्यें हिंदुस्थानसरकारनें एक करचौकशी कमिटी नेमली, परंतु त्या कमिटीकडे वरील सर्व प्रश्नांचा एकत्र विचार करून शिफारशी करण्याचें काम नसल्यानें तिची उपयुक्तता फारच मर्यादित होती. तरी सध्यांच्या कराचा बोजा निरनिराळ्या वर्गांवर कसकसा पडत आहे, येथील करपद्धति समतेच्या तत्त्वास कितपत धरून आहे व नवे कोणते कर बसविण्यासारखे आहेत ह्याबद्दल त्या कमिटीच्या अहवालांत बरीच उपयुक्त माहिती सांपडते.

विशेषतः जमीनसाऱ्याबद्दलची कमिटीची मतें ध्यानांत घेण्यासारखी आहेत. शेतसारा हा कमी उत्पन्नाच्या शेतकऱ्यावर वाढत्या दरानें म्हणजे विषम प्रमाणानें पडतो. शेतीच्या उत्पन्नावर प्राप्तीवरील सामान्य कर अगर वारशावरील कर नसल्याने ही विषमता तीव्रतर होत जाते. शेतसारा हा कर आहे कां खंड आहे ह्या प्रश्नावर कमिटीचें एकमत होऊं शकलें नाहीं, तसेंच तो मालमत्तेवरील करासारखा आहे किंवा प्राप्तीवरील करासारखा आहे ह्याबद्दलही तिचें पूर्णपणें समाधान झालें नसल्यास आश्चर्य नाहीं. परंतु सध्यां तो कर ज्या प्रकारानें ठरविला जातो तो निव्वळ खंडाचा विशिष्ट हिस्सा घेण्याचा प्रघात एकंदरीनें अन्यायमूलक आहे, असें कमिटीचें म्हणणें असून तें सर्वथैव रास्त होतें. जमिनसाऱ्याच्या बिकट अडचणींतून कमिटीनें जो मार्ग सुचविला आहे तो विचारार्ह आहे. शेतीच्या वार्षिक कमाईतून म्हणजे शेताच्या एकंदर उत्पन्नांतून शेतकरी व त्याचें कुटुंब ह्यांनीं लागवडीत खर्ची घातलेल्या भांडवलाची, श्रमाची व संघटनाचातुर्याची कमाई (म्हणजे अनुक्रमें व्याज, मजूरी व सामान्य नफा ही) वजा घालून राहिलेल्या शिलकेंतून, शेंकडा २५ टक्के कर सरकारनें घ्यावा असें कमिटीनें सुचविलें आहे. कोणताही दर घेतला व जमाबंदीचा पाया म्हणून एकंदर उत्पन्न, निव्वळ उत्पन्न, निव्वळ खंड ह्यापैकीं कोणतीही रक्कम घ्यावयाची ठरविली तरी प्रत्येक प्रांताच्या निरनिराळ्या भागांत शेतीच्या उत्पादकतेच्या बाबतींत एवढी भिन्नता दिसून येते कीं, 'सरासरीचे दर' अनेक बाबतींत अन्यायमूलक ठरण्याचा संभव असतो. निव्वळ उत्पन्नाचा एक चतुर्थांश भाग सरकारनें घ्यावा अशी शिफारस

करून ह्या अडचणीस कमिटीनें अप्रत्यक्षपणें उपाय सुचविलेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रांतिक सरकारनें शेतसाऱ्याचें जमीनीच्या उत्पन्नाशी असलेलें प्रमाण उतरवितांच स्थानिक सरकारी संस्थांनी त्यावर सध्यांहून अधिक पट्टी बसवावी असें कमिटीनें सुचविलें आहे. 'दारूवरील आयात जकात वाढवावी, साखर, कच्चा माल, धंद्यांत उपयोगी पडणारी साधनें ह्यांवरील जकाती उतरविल्या जाव्या; लाख, गळिताची धान्यें व खतें ह्यांवर निर्यात जकाती बसवाव्या, राकेलवरील पट्टी उतरविली जावी, सोडा लिंबू वगैरे पेयें, विलायती व 'पेटट' औषधें, सिगारेट्स व परदेशी तंबाकू ह्यांवर नवे कर बसविणें शक्य आहे. प्राप्तीवरील जादा कर सालीना तीस हजार रुपये उत्पन्नावर लादला जावा. तात्त्विक दृष्ट्या पाहिलें तर शेतीच्या उत्पन्नावर प्राप्तीवरील कर लादण्यास हरकत नाहीं. वारशावरील कर तात्काल सुरू करणें अव्यवहार्य आहे. तरी वारसपत्र मिळविण्याची सर्व धर्मांतील वारसांवर सक्ती केल्यास वारसपत्रावरील फी म्हणून अप्रत्यक्षपणें हा कर लादण्याची सुरुवात करणें शक्य आहे. सध्यां कांहीं धर्मांतील लोकांसच वारसपत्र घ्यावें लागतें व त्याबद्दल भारी किंमतीचा स्टँपही द्यावा लागतो. ही गोष्ट समतेच्या तत्त्वास विरोधक असल्यानें ती वरील मार्गानें दूर करण्यांत यावी. अविभक्त हिंदू कुटुंबांस ही पद्धत लागू करावयाची झाल्यास कायद्यांत बदल करावा लागेल व तो मध्यवर्ती सरकारनें करावा.' करपद्धतीच्या सुधारणेसंबंधीच्या कमिटीच्या ह्या सूचनाही एकंदरीनें प्रगमनशील व व्यावहारिक आहेत.

**१४ आगगाड्यांचें स्वतंत्र अंदाजपत्रकः**—हिंदुस्थान सरकारच्या सर्वसामान्य अंदाजपत्रकात आगगाड्यांच्या सांपत्तिक परिस्थितीमुळें अनपेक्षित फेरबदल होऊं नयेत व उलट, आगगाड्यांचा कारभार व त्या वाढविण्यास लागणारें भांडवल यांची व्यवस्था बिनधोकपणें व कार्यक्षमतेनें व्हावी ह्यास्तव आगगाड्यांचें अंदाजपत्रक हिंदुस्थान सरकारच्या अंदाजपत्रकाहून अलग ठेवले जावें असें ॲक्वर्थ कमिटीनें सुचविलें होतें. हिंदुस्थान सरकार व आगगाड्यांचे तज्ज्ञ ह्या दोघांसही ही सूचना मान्य असल्यानें ती ताबडतोब अंमलांत आणली गेली. ह्या पूर्वी आगगाड्यांस प्रतिवर्षी नवें भांडवल किती व कोणत्या दरानें मिळेल हें सर्वस्वी हिंदुस्थान सरकारच्या सर्वसामान्य आर्थिक परिस्थितीवर व दर वर्षाच्या अंदाजपत्रकाच्या बरेवाईटपणावर अवलंबून असे. ह्या कारणानें आगगाड्यांच्या व्यवस्थापकांस कोणत्याही धोरणाबद्दल शाश्वती वाटत नसे. उलट, हिंदुस्थान सरकारासही विवक्षित वर्षी आगगाड्यांकडून किती निव्वळ उत्पन्न मिळेल हें आगाऊ सांगतां येत नसे; वर्षाच्या सुरुवातीच्या महिन्यांतलि पाऊसपाण्याच्या परिस्थितीप्रमाणें अंदाजी आंकडे बदलत असत. आगगाड्यांचा धंदा हा स्वतंत्र म्हणून सरकारनें चालवावा, त्यापासून आपल्या नित्य खर्चास मदत मिळण्याची अपेक्षा करूं नये

असें कमिटीचें म्हणणें असल्यानें स्वतंत्र अंदाजपत्रकापासून दूर होणारी ही गैरसोय तिला महत्त्वाची वाटली नाही. परंतु हिंदुस्थान सरकार व सामान्य हिंदी लोकमत ह्यांचा आग्रह असा होता कीं, आगगाड्यांचा धंदा जर सरकारच्या मालकीचा व सरकारनें चालविलेला आहे तर सामान्य धंदेवाल्याप्रमाणें सर्वसाधारण नफा सरकारला होणें आवश्यक आहे. शिवाय सुमारें पन्नास वर्षें आगगाड्यांच्या धंद्यांतला तोटा हिंदुस्थान सरकारच्या तिजोरीवर, म्हणजे हिंदी नागरिकांवर, पडला होता व त्याची भरपाई होणें न्याय्य होतें. ह्या गोष्टी ध्यानांत घेऊन आगगाड्यांचें अंदाजपत्रक सरकारी अंदाजपत्रकापासून अलग करतांना अशी अट घालण्यांत आली कीं, प्रतिवर्षी आगगाड्यांच्या निव्वळ उत्पन्नांतून ठराविक हिस्सा सरकारच्या सामान्य वसूलखात्यास मिळावा. ह्या बाबतींतील विभागणीचा नियम पुढीलप्रमाणें आहेः - "विवक्षित वर्षाच्या आगोदरचें एक वर्ष टाकून त्याच्या पूर्वीच्या वर्षांत आगगाड्यांच्या धंद्यांत सरकारचें जेवढें भांडवल गुंतलेलें असेल त्यावर द. द. एक रुपयाप्रमाणें हिंदुस्थान सरकारास उत्पन्न मिळावें. ह्याखेरीज आगगाड्यांच्या खात्यावर जो अधिक नफा होईल त्यांतला ⅕ भाग सरकारास मिळावा व राहिलेला ⅘ भाग आगगाड्यांच्या शिलकी निधीत जमा केला जावा. एखाद्या वर्षी शिलकी निधीत जावयाची ही वाढाव्याची रक्कम तीन कोटींवर असली तर त्या तीन कोटींपेक्षां अधिक रकमेचा ⅓ भाग सरकारास मिळावा. मुख्यत्त्वें करून लष्करी कामास उपयोगी पडणाऱ्या अशा ज्या आगगाड्या बांधल्या असतील त्यांवर होणारा तोटा सरकारनें सोसावा." १९२४-२५ सालापासून ह्याप्रमाणें नवीन व्यवस्था झालेली असून हल्ली आगगाड्यांचें अंदाजपत्रक व नियंत्रण ह्या बाबतींत 'रेल्वे बोर्ड' ह्या स्वतंत्र सरकारी संस्थेस बरेच अधिकार देण्यांत आले आहेत. आगगाड्यांचें आर्थिक दृष्ट्या नियमन करण्याकरिता रेलवे बोर्डात एक निराळा अधिकारी असतो व सर्व रेलवे बोर्ड हें गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी कौन्सिलांतील व्यापार खात्याच्या सभासदाच्या हुकुमतीखाली असतें. आगगाड्यांच्या व्यवस्थेंत सरकारच्या फडणिशीखात्यानें गैरवाजवी ढवळाढवळ करूं नये ह्या हेतूनें आगगाड्यांचें अंदाजपत्रक स्वतंत्र करण्यांत येऊन भांडवल व चालू खर्च ह्या बाबतींत रेलवे बोर्डास गेल्या पांच वर्षांत पूर्ण स्वातंत्र्यही मिळालें आहे. परंतु ह्या अनुभवावरून अलीकडे असें दिसून येत आहे की, फडणिशीखात्याशी रेलवे बोर्डाचा असलेला संबंध सुटल्यानें आगगाड्यांच्या खर्चांत व हिशेबांत पुष्कळ दोष उत्पन्न झाले आहेत. आगगाड्यांचें वार्षिक उत्पन्न व खर्च सुमारें १०० कोटि रुपये असतात, एवढ्या व्यवहारावर फडणिशी खात्याचें व कायदे मंडळाचें प्रत्यक्ष नियंत्रण नसणें वाजवी नाहीं व रेलवे बोर्डाच्या उत्पन्नावर व खर्चावर कांहीं तरी नियंत्रण पाहिजे ह्यांत शंका नाहीं. १९२८-२९ सालचा आगगाड्यांच्या अंदाजपत्रकाचा पुढें तक्ता दिलेला आहे त्यावरून प्रस्तुत विवेचन अधिक स्पष्ट होईल.

## आगगाड्यांचें अंदाजपत्रक. १९२८-२९.

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. )

| उत्पन्नाची बाब. | लक्ष रुपये | खर्चाची बाब. | लक्ष रुपये |
|---|---|---|---|
| १ सरकारी आगगाड्या. | | १ भांडवलावर व्याज. | २८,९९ |
| (अ.) बिन लष्करी रस्ते. | | २ सरकारास द्यावयाची ठराविक रक्कम. | ५,२२ |
| उतारू व माल ह्यांची नेआण. | १०८,७३ | ३ आगगाड्यांच्या धंद्यांत तीन कोटींहून अधिक झालेल्या फायद्यांत सरकारचा ⅓ भाग. | २६ |
| उणें आगगाड्या चालविण्याचा खर्च. | ७१,५२ | ४ इतर खर्च. | ५२ |
| बिन लष्करी रस्त्यापासून निव्वळ उत्पन्न. | ३७,२१ | ५ शिल्लकनिधीत भर. | ३,५० |
| (ब.) | | | |
| लष्करी रस्त्यांचे उत्पन्न. | १,५९ | | |
| उणें-लष्करी रस्त्याचा खर्च. | १,८७ | | |
| लष्करी रस्त्यावर तोटा | २८ | | |
| सरकारी आगगाड्यांचें एकंदर उत्पन्न. | ३६,९४ | | |
| २ सरकारी मदतीनें चाललेल्या रस्त्यांमध्यें सरकारी फायदा. | ४६ | | |
| ३ शिलकेवर व्याज, लहान रस्त्यात तोटा वगैरे. | १०९ | | |
| एकूण निव्वळ जमा. | ३८,४९ | एकूण निव्वळ खर्च. | ३८,४९ |

**१५ सरकारी उत्पन्नांत तूट**—महायुद्धाचा काळ व त्यानंतरचीं कांहीं वर्षें ह्यांमध्यें हिंदुस्थान सरकारच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींत अनेक महत्त्वाचे फेरबदल झाले, त्यांपैकीं कांहीं वर निदर्शनास आणलेच आहेत. परंतु महायुद्धामुळें किंमतीच्या मानांत वाढ झाल्यानें व सरकारी खर्चाचा आणि कर्जाचा बोजा वाढल्यानें १९१८-१९ पासून लागोपाठ चार वर्षें हिंदुस्थान सरकारच्या अंदाजपत्रकांत मोठ्या रकमेची तूट येत असे, ह्या गोष्टीचा स्वतंत्रपणें विचार करणें आवश्यक आहे. १९१६ सालापासूनच जकाती, प्राप्तीवरील कर इत्यादि बाबींच्या दरांत व एकंदर उत्पन्नांत वाढ होत असूनही चढीच्या खर्चाच्या मानानें सरकारी उत्पन्न कमी पडूं लागलें. १९१८-१९ सालच्या अंदाजपत्रकांत पहिल्या प्रथम सहा कोटि रुपयांची तूट आली व ती शिलकेंतून भाग-

विली गेली. पुढील वर्षी म्हणजे १९१९-२० मध्यें अफगाणिस्थानाशी झालेल्या युद्धामुळें व इतर कारणानी तुटीचें परिमाण २४ कोटि रुपये झालें. तुटीची रक्कम पुढील वर्षांत म्हणजे १९२१-२२ व १९२२--२३ ह्या साली अनुक्रमें ३३ कोटि व १५ कोटि रुपये होती. सरकारनें नवे कर बसवून व जुन्या करांचे दर वाढवूनही एवढ्या मोठ्या रकमांची तूट येत होती हें ध्यानांत घेतलें तर आपला वाढता खर्च भागविण्याम सरकार किती असमर्थ ठरलें हें दिसून येईल. एकट्या १९२२-२३ ह्या वर्षांत ३२ कोट रुपयांचें उत्पन्न करवाढीपासून मिळविण्याचा प्रयत्न केला गेला. मध्यवर्ती कायदेमंडळाच्या विरोधास न जुमानतां करवाढीची कमाल मर्यादा गांठूनही अंदाजपत्रकांतील उत्पन्नाच्या व खर्चाच्या रकमांची तोंडमिळवणी होण्याचें चिन्ह दिसेना, तेव्हां सहाजिकच खर्चाच्या बाजूस छाटाछाट करण्यास सरकार तयार झालें. काटकसर केल्याखेरीज सरकारची सांपत्तिक स्थिति व करांचें नागरिकांच्या करदानसामर्थ्याशी असलेलें प्रमाण हीं समाधानकारक होण्याची आशा नाहीं अशी कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासदाची पहिल्यापासून मागणी होती. १९२२-२३ चे लागोपाठ चौथें तुटीचें अंदाजपत्रक कायदेमंडळापुढे आल्यानें त्याच वेळीं लॉर्ड इंचकेप ह्याच्या अध्यक्षत्वाखालीं एक काटकसर कमिटी नेमली गेली. ह्या कमिटीनें हिंदुस्थान सरकारच्या खर्चांत एकंदर १९$\frac{1}{4}$ कोट रुपयांची काटकसर सुचविली. ह्या रकमेपैकीं १०॥ कोटि लष्करी खात्यांत, ४॥ कोटि आगगाड्यांवर, १$\frac{3}{4}$ कोटि टपाल व तार खात्यावर व बाकीची रक्कम इतर खात्यांत, ह्याप्रमाणें काटकसरीस निरनिराळ्या खात्यांत जागा असल्याचें कमिटीनें सरकारच्या निदर्शनास आणलें होतें. १९२३-२४ सालच्या अंदाजपत्रकात सरकारनें ह्या सूचनापैकीं कित्येकाचा अंतर्भाव केला असूनही खर्चाच्या अंदाजाहून उत्पन्नाचा अंदाज नऊ कोटींनी कमी पडूं लागला. तुटीच्या अंदाजपत्रकांचें सत्र एकदाचें बंद करावें ह्या इच्छेनें त्या वेळच्या फडणिसांनीं मिठावरील कर दुपटीनें वाढविण्याची सूचना केली. ह्या धोरणास कायदेमंडळात जोराचा विरोध होऊन व्हॉइसरॉय साहेबांस आपल्या जादा अधिकाराचा उपयोग करून मिठावरील करांत वाढ करावी लागली. पुढें वाढत्या दराच्या करांचे वाढते उत्पन्न व हुंडणावळीच्या दरांतील वाढीमुळें खर्चांत होणारी बचत ह्या दोन्ही कारणानी तूट येण्याचें बंद होऊन उलट, १९२४—२५ सालापासून प्रतिवर्षी बराच वाढावा राहूं लागला. मिठावरील कर पूर्वपदावर आणणें, प्रांतिक सरकारांकडून घ्यावयाच्या खंडण्या माफ करणें, देशी कापडावरील पट्टी उठविणें इत्यादि मार्गांनी ह्या वाढाव्याचा क्रमाक्रमानें विनियोग करण्यांत आला. चार वर्षांत एकंदर ९० कोटींची तूट व एका वर्षांत २९ कोटि रुपयांची करवाढ ह्या गोष्टीवरून सरकारची सांपात्तिक स्थिति किती ओढग्रस्त झालेली होती हें स्पष्ट निदर्शनास येतें; त्याचप्रमाणें महायुद्धकालीन परिस्थितीमुळें येथील धंदेवाल्यांच्या उत्पन्नांत म्हणजे एकंदर देशाच्या करदानसामर्थ्यांत, तात्पुरती किती

किती वाढ झाली होती ह्याबद्दलही गेल्या आठ दहा वर्षांतील अनुभवांत चांगलें प्रत्यंतर आढळतें.

**१६ प्रांतिक सरकारचें आर्थिक स्वातंत्र्य.**—१८५७ सालच्या बंडानंतर हिंदुस्थानांत सर्वत्र शांतता व सुव्यवस्था राखण्याचें काम ब्रिटिश सरकारकडे आल्यानें तें करण्याचा सर्वांत सुलभ मार्ग म्हणून सर्व सत्ता व जबाबदारी मध्यवर्ती हिंदुस्थान सरकारच्या हातांत एकवटण्यांत आली. सर्व प्रांतांत अनेक मार्गांनी मिळणारें उत्पन्न व निरनिराळ्या बाबींवर होणारा खर्च हीं मध्यवर्ती सरकारच्या हुकमतीनें व धोरणानें होण्याची पद्धतही त्याच वेळेपासून पडली. १९२१ सालीं नव्या राजकीय सुधारणा होऊन प्रांतिक सरकारांवरील वरिष्ठ सरकारचे राजकीय नियंत्रण कांहीं बाबतींत ढिलें करण्यांत आलें, तोंपर्यंत येथील सर्व कारभार एकतंत्री स्वरूपाचा होता. परंतु कर उत्पादकपणें गोळा करण्यांत प्रांतिक सरकारांस उत्तेजन मिळावें व खर्च करतांना मितव्यय केल्यास त्याचा फायदाही त्यांस मिळावा ह्या उद्देशानें १८७१ सालापासून सरकारी उत्पन्न व खर्च ह्या बाबतींत प्रांतिक सरकारांवर स्वतंत्र जबाबदाऱ्या टाकण्यांत आल्या. पहिल्या प्रथम प्रत्येक प्रांतास त्याच्या विशिष्ट खर्चाकरतां ठराविक रकमा देण्यांत येत, त्या बदलून पुढें उत्पन्नाच्या कांही बाबींत प्रांतिक सरकारांस ठराविक हिस्सा मिळूं लागला. विवक्षित प्रांताचा खर्च ठराविक हिश्शाच्या रकमेंतून भागण्यासारखा नसेल तर जमीनमहसुलासारख्या बाबींतून त्यास जादा मदत मिळे. ह्या सुधारणा होत असतां मध्यवर्ती सरकारची राजकीय व आर्थिक बाबतींतील हुकुमत मात्र कमी झालेली नव्हती. कर लादणें अगर खर्च करणें ह्या बाबतींत प्रांतिक सरकारास खरें स्वातंत्र्य कांहीच नसल्यानें त्यांवर मितव्ययाची जबाबदारीही म्हणण्यासारखी नसे. प्रतिवर्षी अगर ठराविक मुदतीनंतर वरिष्ठ सरकारशीं भांडून, अगर आपली स्थिति हलाखीची आहे असें दाखवून खर्चास शक्य तेवढ्या वाढत्या रकमा मिळवाव्या अशी प्रत्येक प्रांताची खटपट असे. ह्या प्रकाराचा परिणाम असा झाला कीं, कित्येक प्रांतांत तेथील नागरिकांच्या करदानसामर्थ्याहून भारी खर्च करण्याचा प्रघात पडला व दुसऱ्या कांहीं प्रांतांतील लोक सरकारास जेवढे कर देत त्यामानानें त्यांस परत कामगिऱ्या अगर सुखसोयी सरकारकडून मिळत नसत. सर्व हिंदुस्थान देश हें एक कुटुंब आहे अगर हिंदुस्थानांतील सरकारचा सर्व आर्थिक व्यवहार म्हणजे अनेक शाखा असलेल्या एका मोठ्या दुकानासारखा आहे अशी कल्पना राज्यघटनेंत अंतर्भूत होती तोंपर्यंत वरील परिस्थिति चालू शकली. परंतु सुधारणांच्या कायद्यान्वयें प्रत्येक प्रांतास राजकीय स्वायत्तता

द्यावयाचें ठरविल्यानें प्रांतिक सरकारें व मध्यवर्ती सरकार ह्यांच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींची फारकत करणें आवश्यक झालें. हे करतांना विवक्षित प्रांतांत गोळा होणारें करांचें उत्पन्न व त्या प्रांतांतील लोकांच्या हितवर्धनार्थ सरकार करीत असलेला खर्च ह्यांमध्यें कांहीं कांहीं ठिकाणीं जी विषमता होती ती समूळ नाहींशी करणें अशक्य होतें. तसेंच, मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्याच्यांत एका फटकाऱ्यानें आर्थिक तुटकपणा स्थापित करण्याचें कार्यही दुर्घट असून तें करतांना कांहीं बाबतीत पूर्वीची विषमता तीव्रतर झाली असल्यास नवल नाही.

सुधारणांची योजना तयार केली गेली तेव्हां जमीनमहसूल, अबकारी, प्राप्तीवरील कर, जकाती, स्टँप वगैरे उत्पन्नाच्या बाबींची विशिष्ट प्रमाणांत मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांमध्यें विभागणी होत असे. ह्या बाबींपैकीं जमीनमहसूल व अबकारी ही खाती पूर्णपणें प्रांतिक सरकारांच्या व जकाती आणि प्राप्तीवरील कर ही सर्वस्वी मध्यवर्ती सरकारच्या हातांत जावी अशी मूळ योजनेंत सूचना होती. स्टँप खात्याच्या उत्पन्नापैकी जेवढा भाग न्यायदानाच्या कामाबद्दल असेल तेवढा प्रांतांकडे रहावा व व्यापारी व्यवहारांवर स्टँपबद्दल जो कर बसतो तो मध्यवर्ती सरकारनें घ्यावा अशीही मॉंटेग्यु–चेम्सफर्ड रिपोर्टांत मूळ सूचना होती. १९१७–१८ सालचे उत्पन्नाचे आंकडे घेऊन त्या रिपोर्टांत असें निदर्शित केलेलें होतें की, वरील योजनेप्रमाणें मध्यवर्ती सरकारच्या अंदाजपत्रकांत १३·६३ कोटि रुपयांची तूट येईल. प्रांतिक सरकारांस पूर्वीहून अधिक उत्पन्न मिळाल्यानेंच ही तूट उपस्थित झाली असल्यानें त्यांनीं त्यांस मिळालेल्या वाढाव्याच्या उत्पन्नांतून ती यथाप्रमाण भरून काढावी असें सुचविण्यांत आलें, व पुढील वर्षांचे सविस्तर आंकडे घेऊन मध्यवर्ती सरकारास प्रांतिक सरकारांकडून मिळावयाच्या ह्या खंडण्यांची तपशीलवार योजना तयार करण्याकरितां मेस्टन कमिटी नेमण्यांत आली. ह्या कमिटीनें स्टँपखात्याचे सर्व उत्पन्न प्रांतिक सरकारांकडेच रहावें अशी शिफारस केली, व सर्व आंकडे तपासून मध्यवर्ती सरकारास प्रांतिक सरकारांकडून एकंदर ९८३ लक्ष रुपये मिळणें आवश्यक आहे असें ठरविलें. हा बोजा प्रांतिक सरकारांत विभागून देतांना मूळ योजनेंतील तत्त्व अंमलांत आणलें जाऊन प्रत्येक प्रांतास नवीन योजनेमुळें जेवढें निव्वळ उत्पन्न अधिक मिळालें असेल तेवढ्याचा ठराविक हिस्सा त्याकडून खंडणी म्हणून मध्यवर्ती सरकारास मिळावा असें ठरलें. ह्या बाबतींतल्या कमिटीच्या निकालाची कल्पना पुढील आंकड्यांवरून चांगली येईल.

## प्रांतिक खंडण्यांचा तक्ता.

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत. )

| प्रांताचें नांव. | उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींच्या नव्या विभागणीमुळें प्रांताच्या उत्पन्नांत होणारी निव्वळ वाढ. | मध्यवर्ती सरकारास द्यावयाच्या खंडणीबद्दल कमिटीनें प्रांतावर लादलेली रक्कम. | खंडणी देऊन शिल्लक राहिलेली प्रांतिक सरकाराजवळील वाढाव्याची रक्कम. |
|---|---|---|---|
| मद्रास | ५७६ | ३४८ | २,२८ |
| मुंबई | ९३ | ५६ | ३७ |
| बंगाल | १०४ | ६३ | ४१ |
| संयुक्त प्रांत | ३९७ | २४० | १,५७ |
| पंजाब | २८९ | १७५ | १,१४ |
| ब्रह्मदेश | २४६ | ६४ | १,८२ |
| बहार ओरीसा | ५१ | ... | ५१ |
| मध्यप्रांत | ५२ | २२ | ३० |
| आसाम | ४२ | १५ | २० |
| एकूण | १८,५५ | ९,८३ | ८,६७ |

मॉंटेग्यू—चेम्सफर्ड रिपोर्टांतील सूचनानुसार मेस्टन कमिटीनें दिलेला वरील निकाल प्रांतिक सरकारास जाचक वाटणें सहाजिक होतें. परंतु मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांमध्यें उत्पन्नाच्या बाबींची पूर्णपणें तुटक अशी विभागणी करणें अशक्य ठरल्यावर नवीन विभागणीस अनुसरून प्रत्येक प्रांतास जेवढी अधिक रक्कम उपलब्ध झाली होती तेवढ्याचा ठराविक हिस्सा मध्यवर्ती सरकारास खंडणी म्हणून त्या प्रांताकडून मिळणें न्याय्यच होतें. मुंबई, मद्रास व बंगाल ह्या तिन्ही इलाख्याच्या सरकाराकडून मेस्टन कमिटीच्या निकालाविरुद्ध काहूर उठविलें गेलें. त्यांपैकी बंगाल सरकारला पहिल्यापासूनच खंडणीची सूट मिळाली व मध्यवर्ती सरकारची सांपत्तिक स्थिति सुधारूं लागतांच प्रांतिक खंडणीत क्रमाक्रमानें उतार करण्याचें धोरण पहिल्या प्रथम मद्रास सरकारच्या पथ्यावर पडलें. आतां तर सर्वच खंडण्या बंद झाल्या असून मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांमध्यें उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींची पूर्ण फारकत झालेली आहे. परंतु प्रांताप्रांतांतील विषमता नष्ट झालेली नसून मुंबईसारख्या प्रांताची तर फारच कुचंबणा होत आहे. कारण शेतकीखेरीज इतर धंद्यांस ह्या प्रांतांत विशेष महत्त्व असून त्या धंद्याच्या उत्पन्नावरील सर्व

कर मात्र मध्यवर्ती सरकाराकडे जातो. मुंबई इलाख्यांत १९१९ साली प्राप्ती-वरील कर जेवढ्या एकंदर उत्पन्नावर दिला गेला त्या एकंदर उत्पन्नाहून अधिक उत्पन्नावर पुन्हा तो लादला गेला तर त्या वाढाव्याच्या उत्पन्नावरील करात प्रांतिक सरकारांस कांही भाग मिळावयाचा आहे. १९१९ सालीं महायुद्धकालीन अनुकूल परिस्थितीमुळें देशांतील सर्व धंदेवाल्यांची उत्पन्नें भारी होतो. शांततेच्या व मंदीच्या दिवसांत ती तेवढ्या प्रमाणांत मिळण्याची आशा नाहीं व म्हणून प्रांतिक सरकारांस हल्ली प्राप्तीवरील करांत जवळ जवळ मुळीच हिस्सा मिळत नाहीं असें म्हटलें असता चालेल. विशेषतः अबकारी उत्पन्न घटत चालल्यानें व जमीनमहसुलात वाढ होण्याची आशा नसल्यानें मुंबईसारख्या कारखानदारी व व्यापार ह्यांचें प्राबल्य असलेल्या प्रांतावर सध्याच्या परिस्थितीत फारच अन्याय होत आहे. करपद्धतींत सर्वथैव समानतेचें तत्त्व अंमलांत आणणें अशक्यप्राय असतें; प्रत्येक देशांतील निरनिराळ्या सरकारांच्या उत्पन्नाच्या व खर्चाच्या बाबींच्या वि-भागणीची ऐतिहासिक दृष्ट्या छाननी केली पाहिजे; व हिंदुस्थानासारख्या ज्या देशांत कांही समृद्ध व प्रगमनशील प्रांताबरोबर दुसऱ्या दरिद्री व मागासलेल्या प्रांताचा सांगड घातली गेली आहे तेथें समानतेचे तत्त्व प्रांताप्रांतातील आर्थिक विभागणीस लावताना सावधगिरी बाळगिली पाहिजे. इतर संयुक्त राज्य-पद्धतीतील उदाहरणांचें येथें अंधपणें अनुकरण करण्याच्या प्रवृत्तीस ह्या विचारामुळें आळा बसण्यास मदत होईल. परंतु विवक्षित प्रांताच्या आर्थिक जीवनाचा संपूर्ण-तेनें विचार केल्याखेरीज सर्वसामान्यपणें मान्य केलेल्या तत्त्वास अनुसरून त्याचे मध्यवर्ती सरकारशी असलेले संबंध ठरविल्यास एखाद्या प्रांतावर कसा अन्याय होतो हें मुंबईच्या उदाहरणावरून स्पष्ट दिसतें. प्राप्तीवरील कर ही उत्पन्नाची बाब पूर्णांशानें अगर तिच्यांतील मोठ्या हिश्शाच्या रूपानें प्रांतिक सरकारांकडे सोंपविल्या-खेरीज येथील करपद्धतींत उत्पन्न झालेली विषमता कमी होणें व प्रांतिक सरकारांची सांपत्तिक स्थिति सुधारणें अशक्य आहे. नवें कर्ज लादण्याचा व आपल्या पतीवर कर्ज उभारण्याचा अधिकार मर्यादित स्वरूपात हल्ली प्रांतिक सरकारांस मिळालेला आहे. परंतु उत्पन्नाच्या बाबींच्या विभागणीतील मूळ विष-मता बहुतांशीं दूर झाल्याखेरीज व प्रांतिक आणि मध्यवर्ती सरकारांच्या सर्व आर्थिक व्यवहारांवर लोकमताचें पूर्ण नियंत्रण बसल्याखेरीज ह्या बाबतींत विशेष सुधारणा घडून येण्याची आशा नाहीं.

**१७ स्थानिक सरकारांचें उत्पन्न व खर्च**—ग्रामपंचायतीसारख्या येथील लोकमतानुवर्ती जुन्या संस्था नाहीशा झाल्यास आज अनेक वर्षें झाली. पूर्वकालीं पंचायती जोमदारपणें कार्य करीत असत तेव्हां आर्थिक व राजकीय दृष्ट्याही ग्राम-संस्था स्वायत्त असत. खेडेगांवांच्या औद्योगिक, सामाजिक व राजकीय स्वातंत्र्य-नाशाबरोबरच पंचायतींचाही ऱ्हास होऊन खेड्यांचें सार्वजनिक जीवन विस्कळित

व निःसत्त्व झालें. ब्रिटिश सरकारचें धोरण पहिल्या प्रथम पंचायतीस प्रतिकूल असेंच होतें; परंतु लॉर्ड मेयो व लॉर्ड रिपन ह्यांच्या कारकीर्दीपासून राजकीय सत्ता व जबाबदारी मध्यवर्ती सरकाराकडून प्रांतिक सरकारांकडे व प्रांतिक सरकारांकडून स्थानिक संस्थांकडे ढकलली जाण्याचें धोरण अवलंबिण्यात आलें व म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें व पंचायती ह्यांच्या वाढीस सरकारी उत्तेजन मिळूं लागलें. परंतु तोंपर्यंत नागरिकांची जुन्या लोकमतानुवर्ती संस्थांच्या अस्तित्वाची आठवण बुजूनही गेली होती. औद्योगिक, राजकीय, सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्या ते एवढे असहाय्य व परावलंबी बनलेले होते की म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें व पंचायती ह्या लोकशाहीच्या मूलभूत संस्थाबद्दलही त्यांस आपलेपणा वाटत नाहींसा झाला. त्यांतल्या त्यांत सरकारचें धोरण स्थानिक संस्थांत आपलें वर्चस्व कायम राखण्याचें व सांपत्तिक बाबतींत त्यांचें कार्यक्षेत्र मर्यादित करण्याचें असल्यानें त्या संस्था जेवढ्या जोमदारपणें चालाव्या तेवढ्या चालत नसत. १९२१ सालच्या नव्या राज्यघटनेस अनुसरून स्थानिक संस्थांचा कारभार 'प्रधानां'च्या हातांत गेलेला आहे व तेव्हांपासून त्या संस्थांची घटना व जबाबदाऱ्या ह्या विस्तृत व लोकमतानुवर्ती करण्याची पुष्कळ खटपट झालेली आहे. परंतु त्यांची सांपत्तिक स्थिति अजूनही फार असमाधानकारक आहे. म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें ह्यांचें वार्षिक उत्पन्न सरासरीनें ४० कोट रुपयांवर नाहीं. ह्या रकमेपैकीं बराचसा भाग मुंबई, कलकत्ता, मद्रास ह्यासारख्या मोठमोठ्या शहरांतील संस्थांस मिळतो व लहान म्युनिसिपालिट्यांची स्थिति विशेषच असमाधानकारक असते. ह्या संस्थांची संख्या, त्यांच्या अधिकारक्षेत्रांत राहणाऱ्या नागरिकांची संख्या व त्यावर पडणारा कराचा बोजा ह्याबद्दल खालीं आंकडे दिलेले आहेत.

## म्युनिसिपालिट्या

| तपशील | १९१७–१८ | १९२१–२२ | १९२६–२७ |
|---|---|---|---|
| संख्या | ७२५ | ७५१ | ७७३ |
| नागरिकांची संख्या | १७,३५३,२७३ | १८,७९३,५९६ | १९,०३२,८१३ |
| कर व पट्टी ह्यांचें उत्प. | ६,४१,२३,१३९ रु. | ८,६८,७२,६६१ रु. | ११,६८,२२,५४० रु. |
| कर्ज व इतर बाबींचे उत्पन्न | १०,४१,८०,२२९ रु. | १९,८०,८३,४७३ रु. | २६,१३,५५,५५९ रु. |
| एकूण जमा | १६,८३,०३,३९८ रु. | २८,४९,५४,९८५ रु. | ३७,८१,७८,०९९ रु. |
| कर व पट्टी ह्यांच्या उत्पन्नाची माणशीं सरासरी | रु. आ. पै<br>३ ११ २ | रु. आ. पै<br>४ ९ ११ | रु. आ. पै<br>६ २ १ |
| एकंदर उत्पन्नाची माणशीं सरासरी | ५ ६ १४ | ५ ८ ५ | ८ १३ ३ |
| एकंदर खर्च | १६,५७,६३,६१८ रु. | २८,६९,४४,७५६ रु. | ३७,८८,३१,०३६ |

## १९२६-२७ सालच्या उत्पन्नाचें वर्गीकरण

| तपशील | रुपये |
|---|---|
| जकाती | १,७०,०८,४८६ |
| घरपट्टी | ४,४९,७१,१२३ |
| गुरें व गाड्या ह्यांवरील कर | ३९,५४,४९९ |
| व्यापारधंद्यावर कर | ३१,२५,७१२ |
| रस्ते व नावा ह्यांवरील पट्टी | ३१,६७,२३४ |
| पाणीपट्टी | १,८९,७९,१०० |
| दिवापट्टी | १६,१८,७४१ |
| भंगीपट्टी | १,०५,२१,७४८ |
| इतर | १,३४,७५,८९७ |
| एकूण | ११,६८,२२,५४० |

## जिल्हा व तालुका लोकल बोर्डें.

| तपशील. | १९१७-१८ | १९२१-२२ | १९२६-२७ |
|---|---|---|---|
| संख्या. | १२०२ | १३४० | १२६५ |
| | रुपये. | रुपये. | रुपये. |
| प्रांतिक पट्टीचें उत्पन्न | ३,५३,५७,२५३ | ३,९४,६२,९९४ | ४,९०,३६,०३४ |
| सार्वजनिक सोयींचें उत्प. | १,३८,२४,९१३ | १,७९,७२,१५३ | २,५२,४५,६८० |
| इतर मार्गांनी मिळणारें उ. | ३,३२,६०,४२७ | ५,१८,७५,३१७ | ७,६६,३४,६०० |
| एकूण उत्पन्न. | ८,२४,४२,५९३ | १०,९३,१०,४६४ | १५,०९,१६,३१४ |
| माणशी उत्पन्न. | ५ आणे ७ पै | ७ आणे ६ पै | १० आणे २ पै |
| | रुपये. | रुपये. | रुपये. |
| शिक्षणावर खर्च. | १,९६,१२,७६७ | ४,०९,१५,२०५ | ५,३०,११,६१५ |
| बांधकामावर खर्च. | ३,३९,४०,६७७ | ३,८४,६५,२७४ | ४,९४,९४,११५ |
| आरोग्य, दवाखाने इ. खर्च | ७१,७४,८८६ | १,२३,६६,३२७ | १,८०,८८,१०० |
| इतर खर्च. | २,२०,७०,५९९ | २,१५,६०,७५८ | ३,०७,२१,०३७ |
| एकूण खर्च. | ८,२७,९८,९२९ | ११,३३,०७,५६४ | १५,१३,१४,८६७ |

स्थानिक संस्थांचें उत्पन्न व त्यांचा खर्च ह्यांबद्दलचे वरील आंकडे एकंदरीनें प्रगमनशील आहेत. तरी इतर पुढारलेल्या राष्ट्रांतील स्थानिक संस्थांकडे एकंदर सार्वजनिक उत्पन्नाचा जेवढा हिस्सा जातो तेवढा हिंदुस्थानांत जात नाही, व येथील स्थानिक संस्थांच्या वाढत्या कामगिऱ्यांच्या मानानें त्यांचें उत्पन्न मर्यादित आहे हें विसरतां कामा नये. जमीनीच्या उत्पन्नावरील प्रांतिक सरकारची मागणी नियमित करून स्थानिक संस्थांस त्या बाबीवर अधिक पट्टी लादूं देणें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें, लहानसहान उत्पन्नावर अगर व्यापारधंद्यांवर अल्प प्रमाणांत पट्या बसविण्याचीही संस्थांस मुभा असणें आवश्यक आहे. मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें ह्यांच्या उत्पन्नावर व खर्चावर लोकमताची पूर्णपणे सत्ता चालूं लागली व त्या बाबतींत कोणत्याही प्रकारचा मितव्यय करण्याची संधी फुकट जाऊं दिली जात नाहीं अशी लोकांची खात्री झाली म्हणजे स्थानिक सार्वजनिक संस्था आपल्या स्थानिक गरजा भागविण्यास वरीलप्रमाणें करवाढ करण्यास कबूल होतील. मध्यवर्ती व विशेषतः प्रांतिक सरकारांकडून स्थानिक संस्थांस म्हणजे म्युनिसिपॅलिट्या, लोकलबोर्डें व पंचायती ह्यांस, खास देणग्यांच्या रूपानें भरपूर मदत मिळणेंही इष्ट आहे.

**१८ सरकारी कर्ज**—ईस्ट इंडिया कंपनीच्या अंमलांत युद्धाकरितां उभारलेलें कर्ज, १८५७ सालच्या बंडामुळें झालेला असामान्य खर्च भागविण्याकरितां उभारलेलें कर्ज, ईस्ट इंडिया कंपनीचें मूळ भांडवल दुपटीनें परत केलें गेलें त्याबद्दलचें कर्ज, व दुष्काळ, व चीन, आफगाणिस्थान, ब्रह्मदेश इत्यादि ठिकाणचीं युद्धें ह्यांमुळें झालेलें कर्ज आणि देशांतील दारिद्र्य व सरकारचें खुल्या व्यापाराचें धोरण ह्यांमुळें सरकारी उत्पन्न मर्यादित झालें असतां तूट आल्यानें उभारावें लागलेलें कर्ज—ह्या सर्व अनुत्पादक कर्जाची रक्कम महायुद्ध सुरू होण्यापूर्वी क्रमाक्रमानें हिंदुस्थानसरकारच्या तिजोरींतून, म्हणजे हिंदी नागरिकांवर लादलेल्या करांतून, परत केली गेली होती. आगगाड्या व कालवे ह्या प्रकारच्या उत्पादक बांधकामांवर खर्च करण्यास भांडवल म्हणून जें कर्ज वेळोवेळीं हिंदुस्थानसरकारनें उभारलें होतें त्याची रक्कम मात्र बरीच शिल्लक होती. परंतु हें कर्ज किफायतशीरपणें गुंतविलेलें असल्यानें व त्यावरील व्याज परस्पर भागून शिवाय सरकारास त्यापासून शेवटीं नफा होत असल्यानें तें बुडीत अगर अनुत्पादक असें कर्ज नव्हतें. चालू उत्पन्नांतून एवढ्या मोठ्या प्रमाणावर अनुत्पादक कर्जाची फेड केल्याची उदाहरणें हिंदुस्थानाबाहेर फार थोडी सांपडतील. शिवाय, आगगाड्यांच्या धंद्यांत ह्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत खोट येत होती तीही सरकारच्या चालू उत्पन्नांतूनच भागविली गेली. तेव्हांपासून मात्र आगगाड्यांच्या धंद्यांतील

भांडवलावर व्याज व सामान्य नफा हीं सुटूं लागलीं एवढेंच नव्हे तर भांडवलाची फेड वार्षिक हप्त्यांनी व्हावयाची असते त्या हप्त्यांच्या रकमाही आगगाड्यांच्या खात्यांतील खर्चांतूनच दिल्या जात. अशा तऱ्हेनें महायुद्ध सुरू होण्याच्या वेळेस अनुत्पादक कर्ज जवळ जवळ नाहींसें झालें असून आगगाड्या व कालवे ह्यांजमध्यें गुंतविलेलें कर्जाऊ भांडवलही किफायतशीरपणें कामी लागलेलें होतें. महायुद्ध सुरू झाल्यावरही दोनतीन वर्षें हिंदुस्थानसरकारची सांपत्तिक परिस्थिति म्हणण्यासारखी खालावली नव्हती. परंतु १९१८ साली हिंदुस्थानसरकारकडून १५० कोटि रुपयांची देणगी साम्राज्यसरकारास दिली गेल्यामुळें व पुढे १९१९ सालापासून लागोपाठ चार वर्षें सरकारच्या अंदाजपत्रकांत भारी तूट आल्यामुळें सरकारच्या अनुत्पादक कर्जाचा बोजा वाढत गेला. महायुद्धाच्या काळापूर्वी बहुतेक सर्व कर्ज इंग्लंडमध्यें उभारले जाई, परंतु युद्धकालांतील परिस्थितीत विलायतेत नवें कर्ज उभारणें अशक्य झाल्याने व उलट, विलायत सरकारतर्फें हिंदुस्थानसरकारनें केलेला खर्च भागविण्यास हिंदुस्थानात कर्ज उभारणें आवश्यक झाल्याने त्यावेळीं येथील लोकांकडून अनेक स्वरूपांनीं युद्ध कर्ज काढलें गेलें. ह्या कर्जापैकी बराचसा भाग तात्पुरत्या व हातउसन्या कर्जाच्या स्वरूपाचा होता. परंतु पुढें १५० कोटि रुपयाची देणगी साम्राज्य सरकारास द्यावयाची ठरल्यानें त्या रकमेइतकी सरकारच्या अनुत्पादक कर्जांत वाढ झाली. महायुद्धकालीं काढलेल्या ह्या कर्जास लोकांकडून मिळालेल्या रकमा सरकारी अधिकाऱ्यांच्या अपेक्षेबाहेर होत्या. हिंदुस्थानांत भारी रकमेचीं कर्जें मिळूं शकत नाहीत ही तक्रार तेव्हांपासूनच बंद पडली व आतां होईल तेवढें कर्ज हिंदुस्थानांतच काढावयाचें असें सरकारचें धोरण झालें आहे. १९१७ चें युद्धकर्ज सुमारें ४८ कोटी रुपये भरलें. १९१८ सालीं ५१॥ कोटि, १९१९ साली २१॥ कोटि, १९२२ साली ४५ कोटि ह्याप्रमाणें मोठमोठी कर्जें माफक व्याजाच्या दरानें हिंदुस्थानांत उभारतां आली. विशेषत: पोस्ट ऑफिसामार्फत मध्यम वर्गांतील लोकांकडूनही बरीच मोठी रक्कम मिळविली जाऊन योग्य मार्गांनी लोकांजवळ मागणी केल्यास मध्यम व श्रीमंत दोन्ही वर्गांतील नागरिकांकडून पुष्कळच भांडवल कर्जाऊ मिळण्यासारखें आहे हें सिद्ध झालें. ह्या साधारण लांब मुदतीच्या कर्जाखेरीज प्रतिवर्षी तीन, सहा, नऊ व बारा महिने मुदतीच्या सरकारी तिजोरीवरील हुंड्या विकून तात्पुरतें कर्ज उभारलें जाई तें निराळेंच. सरकारी कर्जाचें निरनिराळ्या वर्गांतील परिमाण महायुद्धाच्या सुरुवातीस किती होतें व तेव्हांपासून आतांपर्यंत त्यांत कसकसे फेरबदल होत आले आहेत हें पुढील कोष्टकांवरून स्पष्ट होईल.

## हिंदुस्थान सरकारचें कर्ज.

( आंकडे लाख पौंडांचे आहेत. )

| तारीख व वर्ष | सामान्य कर्ज | उत्पादक कर्ज | | एकंदर उत्पादक कर्ज | एकंदर कर्ज |
|---|---|---|---|---|---|
| | | आगगाड्या | कालवे | | |
| ३१ मार्च | | | | | |
| १८८८ | ७३० | ५९२ | १७३ | ७,६०५ | १,४९५ |
| १८९३ | ६५० | ६९० | ४९३ | १,१०३ | १,७५३ |
| १८९८ | ७०० | १,०६० | २१७ | १,२७७ | १,९७७ |
| १९०३ | ५९१ | १,२८१ | २४८ | १,५९२ | २,१२० |
| १९०८ | ३७४ | १,१७७ | २९९ | २,०७६ | २,४५० |
| १९१३ | २५० | २,११८ | ३७५ | २,४९३ | २,७४३ |
| १९१४ | १२८ | २,२२० | ३९४ | २,६१३ | २,७४२ |
| १९१५ | २२ | २,३३२ | ४११ | २,७४३ | २,७६५ |
| १९१६ | २० | २,३४४ | ४२४ | २,७६८ | २,७८८ |
| १९१७ | ३७ | २,३५७ | ४३३ | २,७९० | २,८२७ |
| १९१८ | ६७२ | २,३९१ | ४४० | २,८३१ | ३,५०३ |
| १९१९ | ४७० | २,४३७ | ४४५ | २,८८२ | ३,३५२ |

२

| वर्ष. | | नवीन काढलेलें कर्ज | | फेडलेलें कर्ज | | शिल्लक कर्ज. | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | हिंदुस्थानांत, लक्ष रुपये. | इंग्लंडात, लक्ष पौंड. | हिंदुस्थानांत, लक्ष रुपये. | इंग्लंडांत, लक्ष पौंड | हिंदुस्थानांत, लक्ष रुपये. | इंग्लंडांत लक्ष पौंड |
| १९२१-२२ | हिं. | १,९६,२८ | १४८ | १,६७,८३ | १० | ३३९१२ | २०५१ |
| | प्रा. | ११३४ | — | ७७ | — | ९१४७ | — |
| १९२२-२३ | हिं. | १३१९४ | ३५१ | १४७४६ | ·९ | ३२३५८ | २४२६ |
| | प्रां. | १०७७ | — | १७७ | — | १०१०२ | — |
| १९२३-२४ | हिं. | ७८५७ | २०० | ८९,१६ | ·८ | ३१३०२ | २६३८ |
| | प्रां. | १४२० | — | २१५ | — | ११३०६ | — |
| १९२४-२५ | हि | ५२७१ | १८५ | ५२१२ | २३ | ३१३६० | ३४१० |
| | प्रां. | १०१४ | — | १२८ | — | १२१९३ | — |
| १९२५-२६ | हि. | ८०२६ | ३५ | ८२३४ | २३ | ४१७९३ | ३४२१ |
| | प्रां. | ७३ | — | — | — | १६२४ | — |
| १९२६-२७ | हि. | ७९१४ | — | ८११३ | ३१ | ४१५९१ | ३३९० |
| | प्रां | १५ | — | १ | — | १६३८ | — |

हिं. = हिंदुस्थान सरकार व प्रां. = प्रांतिक सरकार.

३

| | ३१मार्च १९२६ | ३१मार्च १९२७ | ३१मार्च १९२८ |
|---|---|---|---|
| **हिंदुस्थानांत.** | कोटि रुपये | कोटि रुपये | कोटि रुपये |
| कर्जरोखे | ३६८ | ३७४ | ३७२ |
| लोकांच्या हातांतील तिजोरीच्या हुंड्या | — | — | ९ |
| नोटांच्या तारणनिधींतील तिजोरीच्या हुंड्या. | ५० | ४१ | ३२ |
| पोस्टल सेव्हिंग्ज् बँक. | २७ | ३० | ३२ |
| कॅश सर्टिफिकेटस्. | २१ | २७ | ३१ |
| प्रॉव्हिडंट फंड वगैरे. | ४६ | ५१ | ५६ |
| एकूण कर्ज. ( हिंदुस्थानांतील ) | ५१२ | ५२३ | ५३२ |
| **इंग्लंडमध्यें** | लक्ष पौंड. | लक्ष पौंड. | लक्ष पौंड. |
| कर्जरोखे. | २६६३ | २६५० | २७२३ |
| युद्धाप्रीत्यर्थ देणगी. | १८३ | १७८ | १७२ |
| आगगाड्यांच्या भांडवलाबद्दल वार्षिक हप्ते द्यावयाचे त्याची रक्कम. | ५७३ | ५६१ | ५४७ |
| प्रॉव्हिडंट फंड वगैरे. | २ | ३ | २ |
| एकूण कर्ज. ( विलायतेंत ) | ३४२१ | ३३९२ | ३४४४ |
| **हिंदुस्थान व इंग्लंड दोन्ही ठिकाणीं मिळून** | कोटि रुपये | कोटि रुपये | कोटि रुपये |
| एकंदर कर्ज. | ९६९ | ९७६ | ९९२ |
| उत्पादक कर्ज, मध्यवर्ती सरकार. | ६२३ | ६५५ | ६८७ |
| प्रांतिक सरकारें ,, ,, | ११५ | १२० | १२६ |
| एकूण उत्पादक कर्ज. | ७३८ | ७७५ | ८१३ |
| बुडित कर्ज. | २३१ | २०१ | १७९ |
| एकूण बेरीज. | ९६९ | ९७६ | ९९२ |

४

**एकंदर कर्जाचें वर्गीकरण.**

| | १९२५–२६ | | १९२६–२७ | |
|---|---|---|---|---|
| | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार | मध्यवर्ती सरकार | प्रांतिक सरकार |
| | रुपये | रुपये | रुपये | रुपये |
| १ उत्पादक | | | | |
| आगगाड्या | ६२५,८५,१७,२२३ | २०,२१,११६ | ६५५,७१,३०,४३३ | - १४,१७,२७१ |
| कालवे | ३,४४,५१,७२४ | १२,५१,३५,८१३ | ३,४४,२०,३७७ | १००,८६,०५,४२१ |
| टपाल व तार | १२,८६,५३,७४४ | — | १३,३७,७४,६७१ | — |
| जंगलें | — | ६१,१०,६१८ | — | १०६,७०,५८ |
| मीठ | ८१,०१,६११ | — | ८५,४६,८१६ | — |
| उद्योगधंदे | — | २,७७,८७८ | — | — |
| विजगापट्टम् बंदर | ६४,७६,७५३ | — | १६,५७,०१३ | — |
| विजेचे कारखाने | — | ५,४५,३११ | — | २६,१२,७०८ |
| सरकारचे व्यापारी व्यवसाय | — | — | ५१,८६,८११ | ११८,१५,७३७ |
| एकूण उत्पादक | ६,४३,६२,१७,०६३ | १३,५६,११,७७६ | ६७४,८७,१६,२१७ | १०३,५३,६१,११५ |
| उणें–व्यापारी खाती जास्त खर्च पडले | — | ७,८०,७२,०७४ | — | - १२,२१,७४,३४१ |
| २ बुडीत कर्ज | १७३,००,१८,६०१ | ४४,८७,०४,३२८ | १२१,५०,२३,७३३ | ४५,२३,७५,०६७ |
| एकूण कर्ज | ८१६,६३,१५,६७२ | १३०,६३,२४,०३० | ८०४,३७,४०,०३० | १३६,५५,६१,१२१ |

महायुद्धापूर्वी हिंदी फडणिसांचें धोरण साधारणतः उत्पन्नाच्या बाबींचे अंदाज कमी व खर्चाच्या बाबींचे वाढते धरून वर्षाच्या शेवटी राहिलेल्या बाढाव्यांमधून अनुत्पादक कर्ज फेडून टाकण्याचें होतें. ह्या धोरणांत एक प्रकारचा व्यावहारिक शहाजोगपणा दिसत असला तरी वास्तविकपणे अशा प्रकारांपासून नागरिकांवर प्रमाणाबाहेर करांचा बोजा पडून त्याचें जें नुकसान होतें तें सरकारच्या तात्कालिक फायद्याहून अधिक महत्त्वाचें असतें. गेल्या दहा वर्षांत हिंदुस्थानसरकारच्या अनुत्पादक कर्जांत पुन्हा वाढ झालेली असल्यानें तें कर्ज कसें फेडून टाकावें ह्याबद्दल सरकारला काळजी वाटणे सहाजिक आहे. १९२५ सालापासून चालू उत्पन्नांतून कमीत कमी चार कोटि रुपये ह्या कामी खर्च करण्याचें सरकारनें ठरविलें आहे व हें धोरण चालू राहिल्यास लौकरच बुडीत कर्जाचा बोजा मर्यादित होईल. कांहीं प्रांतिक सरकारांनीही उत्पादक म्हणविल्या जाणाऱ्या परंतु आंतबट्टयाच्या कामांत कोट्यवधि रुपये कर्ज काढून गुंतवून ठेवले असल्यानें त्या कर्जावरील व्याजापायी त्यांची स्थिति फारच असमाधानकारक झालेली आहे. इतर देशाच्या मानानें हिंदुस्थानांतील सरकारचें बुडीत कर्ज म्हणण्यासारखें मोठें नाहीं हें खरें. तरी हिंदी नागरिकांची गरीबी ध्यानांत घेतां १८० कोटि रुपये बुडित कर्जही जास्त आहे असेंच म्हटलें पाहिजे. बुडित कर्ज मर्यादित करून, उत्पादक मार्गांनी गुंतवावयाचें कर्ज काळजीपूर्वक, कमीत कमी व्याजाच्या दरानें व शक्य तोंवर हिंदुस्थानातच उभारून, सरकारनें आपल्या चालू उत्पन्नास व खर्चास कडक मितव्ययाचें धोरण लागू केल्याखेरीज मध्यवर्ती, प्रांतिक व स्थानिक सरकारांची सांपत्तिक स्थिति समाधानकारक व्हावयाची नाहीं.

# प्रकरण सोळावें



## किंमतींचें व राहणीचें मान



**१ किंमतींचें मान**—विवक्षित वस्तूस असलेली मागणी व त्या वस्तूचा पुरवठा ह्यांच्यांतील फेरबदलास अनुसरून बाजारभावांत चढउतार कसा होतो, व चलनाच्या पुरवठ्यांतील फरकांचा किंमतीच्या मानाशीं कोणता संबध आहे ह्याबद्दल प्रास्ताविक भागांत माहिती दिलेली आहे.[१] सामान्य नागरिक आपल्या उत्पन्नाचा व राहणीचा विचार करतांना त्यास लागणाऱ्या वस्तूंच्या किंमतीस सहाजिकपणेच विशेष महत्त्व देतो. हिंदुस्थानांतील लोकांच्या वास्तविक आर्थिक परिस्थितीचा विचार कर्तव्य असतां किंमतीच्या मानाकडे पहिल्याप्रथम लक्ष्य पुरविणें आवश्यक आहे. दळणवळणाची व वहातुकीची साधनें सुधारल्यामुळें अलीकडे देशाच्या सर्व भागांचा परस्पर व्यापार पुष्कळ वाढलेला आहे व त्यामुळें कोणत्याही वस्तूची किंमत देशाच्या सर्व भागांत सामान्यतः एकसारखीच असते. शिवाय, उत्पादकांत व गिऱ्हाइकांत हळूहळू स्पर्धेचा प्रसार होत असल्यानें उत्पादनाचा सीमागत खर्च व वस्तूंची सीमागत उपयुक्तता ह्यांच्या फेरबदलास अनुसरून किंमती नेहमी बदलत रहतात. त्यांतल्यात्यात, अंतर्राष्ट्रीय व्यापार व अंतर्गत व्यापार ह्यांचें परस्परावलंबन वाढत्या प्रमाणावर प्रस्थापित होत असल्यानें परदेशी उत्पादक व गिऱ्हाईक ह्यांच्या उत्पादनखर्चाचा व मागणीचाही येथील बाजारभावांशी निकट संबंध येत आहे. कापूस, ताग, गळिताची धान्यें इत्यादि निर्यात व्यापाराच्या व साखर, कापड इत्यादि आयात व्यापाराच्या प्रमुख जिनसांच्या किंमतींत वारंवार होणारे चढउतार पाहिल्यास ह्या गोष्टीचें प्रत्यंतर येईल. हिंदुस्थानांतील बाजारभावांतील फेरबदलांचे काही विशेष ध्यानात ठेवणें आवश्यक आहे. पावसाच्या बरेवाईटपणावर शेतीच्या उत्पन्नाचें परिमाण व शेतकऱ्यांचें वस्तू विकत घेण्याचें सामर्थ्य ही दोन्ही अवलंबून असल्यानें पावसाचें मान व किंमतीचें मान ह्यांचा परस्पर संबंध येथें फार निकट आहे. पाऊस ह्या नैसर्गिक कारणाप्रमाणेंच हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीत सरकारचें चलनविषयक धोरण हेंही एक बाजारभावांतील फेरबदलांचें फार महत्त्वाचें कारण होऊन बसलेलें आहे.

पदार्थांच्या किंमती 'अलीकडे' फार वाढलेल्या आहेत असें आपण ऐकतों व मागणी आणि पुरवठा ह्यांच्या विशिष्ट परिस्थितीप्रमाणें कोणत्या ना कोणत्या तरी वस्तूंच्या भावांत विवक्षित काळीं वाढ दिसून येणें सहाजिकही आहे. परंतु सर्व, अगर

१ पान ५२–५७ पहा.

सामान्य लोकांच्या जीवनक्रमास आवश्यक असलेल्या बहुतेक, जिनसांचे भाव एकाच वेळी वाढणें व त्याच्यांतील चढ एकसारखा कायम राहणें, ही गोष्ट असामान्यच समजली पाहिजे. १९०४ सालापासून हिंदुस्थानांतील बाजारभावांत अशा सार्वत्रिक स्वरूपाची वाढ स्पष्टपणें दिसून येऊं लागली. १८९९ सालापासून जुनी रौप्य चलनपद्धति कायमची जाऊन सुवर्णपरिमाणाची पद्धति येथें स्थापन केली गेली. परंतु लोकांच्या हातांत चलन म्हणून रुपया हें प्रतीकरूप नाणेंच राहिल्यानें व रुपयाचा पुरवठाही सरकारमार्फत प्रमाणाबाहेर होऊं लागल्यानें किंमती वाढण्यास मदत झाली असें कित्येकांस वाटूं लागलें. हिंदी लोकांची आर्थिक परिस्थिति सुधारत असल्यानें त्याची मागणी तीव्रतर होऊन किंमती वाढत आहेत; लोकसंख्येंत होणाऱ्या वाढीच्या मानानें धान्याचा पुरवठा मर्यादित होत असल्यानें बाजारभाव चढीचे होत आहेत; हीही वाढत्या किंमतीची कारणें म्हणून पुढें केलीं जात. परंतु बाजारभावांत एकंदरीनें सार्वत्रिक व तीव्र वाढ होत आहे ही गोष्ट आंकड्यांवरून स्पष्टपणें सिद्ध होत होती, व ह्या गोष्टीची चौकशी व्हावी अशी लोकपक्षाची मागणी असल्यानें सरकारनें मि. दत्त ह्या सरकारी अधिकाऱ्याची ह्या कामावर खास नेमणूक केली. मि. दत्त ह्याची अनुमानें व त्यांवरील सरकारचें व खाजगी गृहस्थांचें मत ह्यांचा विचार करण्यापूर्वी किंमतीच्या चढउताराबद्दल कांही महत्त्वाचे आंकडे देणें आवश्यक आहे.

## किंमतींतील वाढीचे आंकडे

१

( १८७३ सालच्या किंमतीचे आंकडे १०० बरोबर धरले आहेत. )

| वर्ष | गहूं | | | तांदूळ | | बाजरी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | दिल्ली | कलकत्ता | अहमदाबाद | कलकत्ता | मद्रास | दिल्ली | अहमदाबाद |
| १८७३ | १०० | १०० | १०० | १०० | १०० | १०० | १०० |
| १८९१ | १३५ | ९८ | १२२ | ९१ | १४५ | १५१ | १२२ |
| १८९५ | ११० | ९३ | १०७ | १०० | १३८ | १२२ | १३४ |
| १९०० | १६८ | ११३ | १४९ | ११० | १८० | १४५ | २०१ |
| १९०५ | १४७ | ११८ | १२१ | १४२ | ११७ | १४५ | १४६ |
| १९०९ | २०३ | १४२ | १५५ | १५६ | २१८ | १५७ | १६६ |
| १९१३ | १८३ | १०२ | १७५ | १८७ | २१८ | १६८ | १७५ |
| १९१५ | २३९ | — | १८७ | ११७ | २०३ | २२९ | २०८ |
| १९१७ | २१९ | — | १८० | १७५ | २१६ | १७१ | १४७ |
| १९२० | २८६ | — | ३१४ | २६१ | ३४२ | २८३ | ३३० |
| १९२४ | २३८ | — | २२१ | २२१ | ३२७ | २११ | २६० |
| १९२७ | २५७ | — | २२१ | २८२ | ३३१ | २४४ | २८० |

| वर्ष | निर्यात जिन्नस (२८) | आयात जिन्नस (११) | निर्यात व आयात जिन्नस (३९) |
|---|---|---|---|
| १८७३ | १०० | १०० | १०० |
| १८६१ | ८८ | ९५ | ९९ |
| १८७१ | ९५ | ८८ | ९३ |
| १८८१ | ९९ | ८६ | ९६ |
| १८९१ | १०३ | ८४ | ९८ |
| १९०१ | ११६ | ९६ | ११० |
| १९०८ | १५१ | १०६ | १३८ |
| १९०९ | १३३ | ९९ | १२४ |
| १९१२ | १४५ | ११७ | १३७ |
| १९१४ | १६० | ११४ | १४७ |
| १९१८ | १९९ | २८९ | २२५ |
| १९२२ | २४५ | २०१ | २३२ |
| १९२५ | २३३ | २११ | २२७ |
| १९२७ | २०९ | १८५ | २०१ |

**खाण्याच्या कांहीं जिनसांच्या किंमतींतील फेरबदल दाखविणारे आंकडे. ( जून १९२९ )**

( जुलै १९१४ मधील किंमतीचे आंकडे १०० बरोबर धरले आहेत. )

| जिन्नस | मुंबई | कराची | अहमदाबाद | सोलापूर | पुणें. |
|---|---|---|---|---|---|
| तांदूळ. | १६० | १०९ | १३० | १५२ | १३२ |
| गहूं. | १६१ | १३६ | १४२ | १२५ | १३५ |
| ज्वारी. | १२८ | १३२ | १३१ | १३७ | १२७ |
| बाजरी. | १३८ | १३६ | १३६ | १२८ | १४० |
| हरबऱ्याची डाळ. | १७६ | १६८ | १५४ | १३८ | १३७ |
| तुरीची डाळ. | १५६ | १२० | १४४ | १२९ | १३१ |
| साखर. | १५८ | १३८ | १२५ | ११० | ११३ |
| गूळ | १५७ | १३५ | १२९ | १५० | १६८ |
| चहा. | १९० | २२५ | २०० | १७१ | २०० |
| मीठ. | ११९ | १४५ | १५१ | १४१ | १४४ |
| दूध. | १९१ | २०० | २०० | १३८ | १३३ |
| तूप. | १५४ | १६७ | १७१ | १६३ | ११९ |
| बटाटे. | १५९ | १३१ | १४५ | २०० | १२२ |
| कांदे. | २३० | १५२ | १३८ | १०७ | ७० |
| खोबरेल. | १०६ | ९६ | १६० | १०९ | १०० |
| एकूण | १५९ | १५३ | १५१ | १४० | १३१ |

( जुलै १९१४ चे किंमतीचे आकडे १०० बरोबर घेतले आहेत. )

| वार्षिक सरासरी | खाण्याच्या पदार्थांच्या किंमती | इतर पदार्थांच्या किंमती | एकंदर किंमती |
|---|---|---|---|
| १९१८ | १७१ | २७५ | २३९ |
| १९१९ | २०२ | २३४ | २२३ |
| १९२० | २०६ | २१९ | २१६ |
| १९२१ | १९३ | २०१ | १९८ |
| १९२२ | १८६ | १८७ | १८७ |
| १९२३ | १७९ | १८२ | १८१ |
| १९२४ | १७३ | १८८ | १८२ |
| १९२५ | १५५ | १६७ | १६३ |
| १९२६ | १४५ | १५२ | १४९ |
| १९२७ | १४३ | १४८ | १४७ |
| १९२८ | १४४ | १४६ | १४६ |
| सहामाही सरासरी १९२९ | १४८ | १४४ | १४५ |

## कांहीं वस्तूंच्या मुंबईमधील घाऊक किंमती व त्यांमधील फेरबदल

| वस्तू | किंमत प्रत्येक | जुलै १९१४ | | | जून १९२९ | | | मुख्य अंक जुलै १९१४ | जून १९२९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | रु. | आ. | पै | रु. | आ. | पै | | |
| तांदूळ | मणास | ४ | ११ | ४ | ५ | ६ | ० | १०० | ११४ |
| गहूं | हंड्रेटवेट | ५ | ९ | ६ | ९ | ० | ० | १०० | १६२ |
| ज्वार | मणास | ३ | २ | ६ | ४ | ३ | ९ | १०० | १३४ |
| बाजरी | मणास | ३ | ४ | ६ | ५ | १३ | १ | १०० | १७७ |
| तुरीची डाळ | मणास | ४ | ३ | ९ | ५ | ११ | ५ | १०० | १३५ |
| हरबऱ्याची डाळ | मणास | ५ | १० | ५ | ७ | ६ | ६ | १०० | १३१ |
| साखर | हंड्रेडवेट | १० | ३ | ० | १३ | १ | ० | १०० | १२८ |
| गूळ | मणास | ७ | १४ | ३ | ११ | १५ | ७ | १०० | १५२ |
| हळद | मणास | ५ | ९ | ३ | ११ | ६ | १० | १०० | २०५ |
| तूप | मणास | ४५ | ११ | ५ | ७२ | १३ | ९ | १०० | १५९ |
| मीठ | मणास | १ | ७ | ६ | २ | ० | ० | १०० | १३६ |
| कापूस | खंडीस | २५१ | ० | ० | ३३२ | ० | ० | १०० | १३२ |
| कापड | पौंडास | ० | ९ | ६ | ० | १५ | ६ | १०० | १६३ |
| पत्रे | हंड्रेडवेट | ८ | १२ | ० | १३ | १२ | ० | १०० | १५७ |
| राकेल | दोन डबे | ४ | ६ | ० | ६ | ९ | ६ | १०० | १५१ |
| सर्व जिनसांच्या | | | | | | | | १०० | |
| किंमती | | | — | | | — | | १०० | १४३ |

## हिंदुस्थान व इतर देश ह्यांमधील किंमतींतील मानांत फरबदल

( १९१३ सालचे आंकडे १०० बरोबर धरले आहेत. )

| देशाचें नांव | हिंदुस्थान | जपान | चीन | इजिप्त | इंग्लंड | फ्रान्स | कॅनडा | अमेरिका |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जिनसांची संख्या | ४४ | ५६ | १४७ | २६ | १५० | ४५ | २३९ | ४०४ |
| १९१३ | — | १०० | १०० | — | १०० | १०० | १०० | १०० |
| १९१४ | १०० | ९७ | — | १०० | — | १०२ | १०२ | ९८ |
| १९१५ | | ९७ | — | १०३ | — | १४० | ११० | १०१ |
| १९१६ | | ११७ | — | १२८ | — | १८८ | १३२ | १२७ |
| १९१७ | | १४९ | — | १७६ | — | २६२ | १७९ | १७७ |
| १९१८ | २३९ | १९६ | — | २११ | — | ३३९ | १९९ | १९४ |
| १९१९ | २२३ | २३६ | — | २३१ | — | ३५६ | २०९ | २०६ |
| १९२० | २१६ | २५९ | १५२ | ३१६ | ३०७ | ५०९ | २४४ | २२६ |
| १९२१ | १९८ | २०० | १५० | १७३ | १९७ | ३४५ | १७२ | १४७ |
| १९२२ | १८७ | १९६ | १४६ | १४६ | १५९ | ३२७ | १५२ | १४९ |
| १९२३ | १८१ | १९९ | १५६ | १३२ | १५९ | ४१९ | १५३ | १५४ |
| १९२४ | १८२ | २०७ | १५४ | १४३ | १६६ | ४८९ | १५५ | १५० |
| १९२५ | १६३ | २०२ | १५९ | १५२ | १५९ | ५५० | १६० | १५९ |
| १९२६ | १४९ | १७९ | १६४ | १३२ | १४८ | ७०३ | १५६ | १५१ |
| १९२७ | १४७ | १७० | १७० | १२१ | १४१ | ६१७ | १५२ | १४७ |
| १९२८ | १४६ | १७१ | १६० | ११८ | १४१ | ६१८ | १५० | — |
| १९२९ सहा माही | १४५ | १७१ | १६१ | १२४ | १३८ | ६३२ | १४८ | — |

ह्या शतकाच्या सुरुवातीच्या दहा एक वर्षांत येथें घडून आलेल्या किंमतींतील वाढीचीं कारणें मुख्यतः दोन प्रकारचीं आहेत असें मि. दत्त ह्यांचें म्हणणें होतें. पहिला प्रकार फक्त हिंदुस्थानाच्या परिस्थितीला लागू असलेल्या कारणाचा व दुसरा एकंदर जगातील आर्थिक घडामोडीचा होय. पहिल्या प्रकारांत पुढील कारणाचा अंतर्भाव होतो: ( १ ) खाण्याच्या धान्याचें मर्यादित उत्पादन; ( २ ) हिंदुस्थानांतील खाद्य व कच्च्या मालास वाढती मागणी; ( ३ ) वहातुकीच्या साधनांत वाढ; ( ४ ) वहातुकीचा उतरता खर्च. सर्व देशांतील किंमतींवर ज्याचा परिणाम झाला अशा सार्वत्रिक कारणांत पुढील कारणें प्रमुख होतीं. ( १ ) सोन्याची वाढती उत्पत्ति; ( २ ) पतीच्या व्यवहारांचें वाढतें परिमाण; ( ३ ) युद्धामध्यें होणारा संपत्तीचा

नाश; व ( ४ ) युद्धाप्रीत्यर्थ लागणारा माल. अंतर्गत व अंतर्राष्ट्रीय स्वरूपाच्या ह्या सर्व करणांचा विचार करून मि. दत्त ह्यांनीं असा निष्कर्ष काढला की हिंदुस्थानांतील खाण्याच्या धान्याच्या वाढत्या बाजारभावाचें विशिष्ट कारण मागणीतील वाढीच्या मानानें १९०५ ते १९०९ ह्या कालांत पुरवठ्याचा मर्यादितपणा हें होय. सर्वसामान्य किंमतीतील वाढीचें महत्त्वाचें कारण कोणतें ह्याबद्दल तेव्हां तीन मतें प्रचलित होतीं तीं अशीं:— ( १ ) सुवर्णपरिवर्तनपद्धतीमुळें प्रतीकरूप परतु कायदेशीर रुपयांचा प्रसार कृत्रिमपणें वाढत्या प्रमाणावर राहतो व पैशाचा पुरवठा असा वाढत गेल्यानें किंमतींच्या मानांतही वाढ होते. ( २ ) चलनपद्धतीतील कोणत्याही विशेषामुळें किंमतीतील वाढ होत नसून ती अतर्गत व अंतर्राष्ट्रीय स्वरूपाच्या आर्थिक घडामोडींस अनुसरून होत आहे. ( ३ ) एका बाजूने लोकसंख्या वाढत असून उलट बाजूनें जमीनीची उत्पादकता कमी होत असल्यानें किमतीत चढ होत आहे. ह्या तीन मतांपैकीं सरकारचा पाठिंबा अर्थातच दुसऱ्या मतास होता. अनेक तज्ज्ञांचें मत वरीलपैकीं पहिल्यास अनुसरून होतें व सामान्य लोकमताचें पाठबळ तिसऱ्यास मिळे.

**३ किंमती व चलन**:—१८९३ सालीं रौप्य परिमाणाचें हिंदुस्थानांतून उच्चाटण होऊन त्याच्या जागीं १८९९मध्यें सुवर्णपरिमाणाची स्थापना झाली. अशा तऱ्हेनें सर्व जगाचें मूल्यमापक परिमाण व हिंदुस्थानचें परिमाण हे एकच झाल्यानें इतर देशांतील किंमतींच्या चढउतारास अनुसरून हिंदी बाजारभावांत फरक होणें अपरिहार्य झालें. तसेच, हिंदी कच्चा माल व धान्यें ह्यास असलेली परदेशी मागणी वाढल्यानें, परराष्ट्रांतील बाजारभाव चढीचे असल्याने व हिंदुस्थानाच्या वाढत्या लोकसंख्येच्या मानानें खाण्याच्या धान्याचें उत्पादन मर्यादित होत असल्यानें किंमती वाढणे सहाजिक होतें, ह्या गोष्टीही खऱ्या आहेत. परंतु सर्वच बाजारभाव एकाच वेळीं चढीचे राहण्यास चलनाची बेसुमार वाढच कारणीभूत झाली असें म्हटलें पाहिजे. सोन्याचे उत्पादन वाढत्या प्रमाणावर होऊं लागल्याने इतर राष्ट्रांत किमती चढीवर होत्या ह्या गोष्टीचा परिणाम हिंदुस्थानातील किंमतींवर तर झालाच. परंतु खुद्द हिंदुस्थानातही स्टेट सेक्रेटरीच्या हुंड्या वटविण्यास एकसारखे नवे रुपये पाडीत रहाण्याचें धोरण सरकारनें स्वीकारल्यानें चलनांत बेसुमार वाढ झाली. व्यापाऱ्याची हुंड्यांस मागणी असली तरच रुपये पाडले जात असल्याने रुपयाचा पुरवठा नैसर्गिकपणें मागणीबरोबर राहतो असें सरकारचें म्हणणें होतें. परंतु रुपयासारखें प्रतीकरूप नाणें एकदां व्यवहारात घुसलें की ते सरकारी तिजोरीत परत येणे दुर्घट असतें, व एकसारखे नवे रुपये पाडीत राहण्यानें किमतींवरही दीर्घ-कालपर्यंत परिणाम होत राहतो असें प्रो. कीन्ससारख्या इग्रजी अर्थशास्त्रज्ञाचेंही म्हणणें होतें. सन १९०२ ते १९०७ ह्या दरम्यान रुपयांच्या पुरवठ्यात व

बाजारभावात होणाऱ्या वाढीच्या प्रमाणात पुष्कळच साम्य होतें. १८९३ सालापूर्वी चलनाचा पुरवठा बेसुमार होऊन किंमती वाढूं लागताच रुपये वितळविले जात. महायुद्धाच्या वेळीं रुपयांतील चांदी कायदेशीर प्रमाणापेक्षा अधिक मूल्यवान होतांच पुष्कळ रुपये सरकारी हुकमाविरुद्धही वितळविले गेले. परंतु सामान्यतः रुपयांतील चांदीची किंमत कायदेशीर प्रमाणाहून नेहमीच कमी असल्यानें एकदा पाडलेले रुपये दूरदूरच्या भागांतील शेतकऱ्यांच्या व लहानसहान व्यापाऱ्यांच्या हातात गेले की ते वितळविलेही जात नाहीत व पुन्हां लवकर सरकारी तिजोऱ्यांत अगर मध्यवर्ती शहरात येत नाहीत. महायुद्धानंतर सर्व धंद्यांत पुष्कळ वर्षे मंदी असल्यानें नवे रुपये पाडण्याची जरूरी राहिलेली नाही व लोकांकडून सरकारी खजिन्यांत व पेढ्यात जुने रुपये परत येतही आहेत. परंतु, सामान्यतः येथील निर्गत वस्तूंच्या उत्पादकाचा व्यापार नेहमी बऱ्या स्थितींत असल्याने त्याची मागणी भागविण्यास नवे रुपये पाडले जाऊन ते परत न येण्याची व चलनात वाढ होऊन बाजारभावही चढीचे राहण्याची भीति असते. महायुद्धकालीं परदेशाहून हिंदुस्थानांत येणाऱ्या मालाच्या किंमतींत येथून परदेशास जाणाऱ्या मालाच्या किंमतीहून अधिक वाढ झाली होती. ह्याचें प्रमुख कारण परदेशी उत्पादन मर्यादित होऊन हिंदी लोकांची मागणी मात्र वाढली हेच होय. मर्यादित पुरवठा, वाढती मागणी, चलनाचें परिमाण, अंतर्राष्ट्रीय बाजाराची परिस्थिति, सोन्याच्या व पतीवरील चलनाचा विस्तार, इत्यादि निरनिराळ्या कारणांपैकी कोणत्या विशिष्ट कारणानें एखाद्या विवक्षित वेळीं किंमतीतील चढउतार घडून आला हे नक्की ठरविणें कठीण असते. परंतु रुपया ह्या नाण्याचें प्रतीक स्वरूप व कृत्रिमपणें चलनाच्या पुरवठ्यात फेरबदल करून आरलें हुंडणावळीसंबंधी व चलनासंबंधीचें धोरण अंमलांत आणण्याचा सरकारचा प्रघात ह्यांमुळें चलनाचा पुरवठा व किंमतींतील फेरबदल ह्यांचा परस्पर संबंध हिंदुस्थानात विशेष दृष्टीसमोर येणें साहजिक आहे. वर सांगितल्याप्रमाणे बहुतेक चलन खेड्यापाड्यांतील उत्पादकांच्या हातांत जात असल्यानें व धंद्याची मंदाई आणि पेढ्यांचा अभाव ह्यांमुळें ते मध्यवर्ती ठिकाणीं सहजासहजीं परत येत नसल्यानें एकंदरीनें चलनाचा पुरवठा प्रमाणाबाहेर होऊन किंमती वाढतात असें म्हणणें प्राप्त आहे. चलनपद्धतीत सुलभ परिवर्तनाची सोय असणें, चलनाचा पुरवठा करण्याचें काम स्वतंत्र संस्थेकडे जाणें, देशांत पेढ्यांचा प्रसार होणें इत्यादि सुधारणा घडून आल्याखेरीज चलनाच्या बेसुमार पुरवठ्यामुळें किंमती चढीच्या राहण्याचें संकट टळणार नाहीं. सरकारनें १८ पेन्सांची हुंडणावळ ठरविल्यामुळें चलनाचा पुरवठा कमी करण्याचें धोरण अलीकडे स्वीकारलें जात आहे. लोकांच्या हातांतील कायदेशीर चलन जोंपर्यंत प्रतीकस्वरूप आहे व त्या चलनाचें प्रमाणभूत धातूंत सहज परिवर्तन होण्याच्या सोयी जोंपर्यंत उपलब्ध नाहीत तोंपर्यंत चलनांत बेसुमार वाढ होणें व ती अधूनमधून कृत्रिमतेनें मर्यादित करावी लागणें अपरिहार्य आहे.

विवक्षित वस्तूचा पुरवठा व तिला असलेली मागणी ह्यांच्यांतील फेरबदलानुरूप तिच्या किंमतीतही फेरबदल होणें सहाजिक असून असे फेरबदल नेहमी बाजारांत होत रहाणारच. परंतु चलनाचा पुरवठा प्रमाणाबाहेर कमी अधिक झाल्यानें किंमतींत जे चढउतार होतात त्यांचा परिणाम एकंदरीनें अनिष्ट असाच होतो. किंमतींत वाढ झाल्यास एकंदरीनें उत्पादकांचा म्हणजे निर्यात मालाच्या बाबतींत शेतकरी वर्गाचा फायदा होतो हें खरें. परंतु मध्यस्थांचा नफा व वाढता उत्पादन खर्च ही वजा जातां उत्पादकासही शेवटी निव्वळ नफा थोडाच उरतो. स्वदेशी धंदेवाल्यांच्या उत्पादनखर्चांत व सामान्य जनसमूहाच्या राहणीच्या खर्चांत वाढत्या किंमतीमुळें अनिष्ट वाढ झाल्यावाचून रहाणार नाहीं. उलट, किंमती प्रमाणाबाहेर उतरल्या तर धंदे बुडून लोकांचें उत्पन्नच मर्यादित होतें. ज्यांचें उत्पन्न ठराविक स्वरूपाचें असतें अशा लोकांचाच काय तो कमी किंमतीमुळें खरा फायदा होतो आणि स्वतःची जमीन स्वतःच्या श्रमानें कसून तिच्यांतील धान्यावरच पोट भरणाऱ्या शेतकऱ्याचें वाढत्या किंमतीमुळें नुकसान होऊं शकत नाहीं. परंतु एकंदर समाजाच्या दृष्टीनें पाहिलें तर चलनाचा पुरवठा प्रमाणाबाहेर मर्यादित झाल्यानें किंमती उतरणें व मागणीच्या मानानें वस्तूंचा, विशेषतः खाण्याच्या धान्याचा, पुरवठा मर्यादित झाल्यानें किंमतींत वाढ होणें ह्या दोन्ही गोष्टी अनिष्टच समजल्या पाहिजेत. शिवाय, निर्यात वस्तूंच्या किंमतींत झालेल्या वाढीच्या प्रमाणांत अगर त्याहूनही अधिक वाढ आयात वस्तूंच्या किंमतींत झाल्यास राष्ट्राचा त्यांत निव्वळ फायदा कांहीच नसून उलट तोटा मात्र होईल. महायुद्धापूर्वी सामान्यतः आयात मालाच्या किंमतींत निर्यात मालाच्या किंमतींहून कमी वाढ होत होती व त्यामुळें राष्ट्राचा एकंदरीनें फायदा होत आहे असें म्हणण्यास जागा होती. महायुद्धकालीं ह्या बाबतींतील अनुभव उलट होता असें वर सांगितलेंच आहे. अलीकडे पुन्हा आयात मालाच्या किंमती निर्यात मालाच्या मानानें उतरत असून गेल्या दहाबारा वर्षांत सरकारच्या अप्रत्यक्ष कराचा बोजा पुष्कळ वाढल्यानेंही कापड, मीठ, तेल, साखर, तूप राकेल इत्यादि जिनसांचे भाव लोकांच्या उत्पन्नाच्या मानानें चढीचेच आहेत. अठरा पेन्साच्या दरानें ठराविक उत्पन्न असलेल्या वर्गाखेरीज इतर सर्व लोकांचें उत्पन्न मर्यादित झालें असल्यानें तर ह्या चढीच्या भावापासून विशेषच त्रास होत आहे. वाढत्या हुंडणावळीमुळें निर्यात व्यापार मर्यादित होऊन अंतर्गत पुरवठा वाढल्यानें खाण्याच्या धान्याच्या किंमती त्या मानानें कमी आहेत ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय.

**२ राहणीचें मान**—हिंदी लोकांचें राहणीचें मान इतर सुधारलेल्या देशांच्या मानानें फारच कमी प्रतीचें आहे व त्यामध्यें सुधारणाही म्हणण्यासारखी घडून येत नाहीं हें सार्वत्रिक अनुभवावरून व मागे 'उत्पादन आणि लोकसंख्या' ह्या

प्रकरणात दिलेल्या आंकड्यावरून स्पष्ट दिसण्यासारखें आहे. परंतु चांगल्या रहाणीचें ध्येय व प्रत्यक्ष प्रकार ही हळूहळू सारखीं बदलत आहेत. तात्पुरत्या औद्योगिक भरभराटीमुळें लोकांचें उत्पन्न वाढून त्यांस अनेक गरजा भागविण्याची एकदां संवय झाली व वाढल्या मजूरीचे अगर वेतनाचे दर त्यांस मिळाले म्हणजे त्यांच्या राहणीच्या मानात कांहींशी सुधारणा होऊन पुढें मंदीचे दिवस आल्यावरही पुष्कळ काळ नव्या राहणीच्या मानास लोक चिकटून राहूं शकतात. मुंबईसारख्या औद्योगिक केंद्रांतील मजूरवर्गाच्या व देशाच्या कांहीं कांहीं भागांतील शेतकऱ्यांच्या राहणीवरून ह्या गोष्टीची सत्यता पटण्यासारखी आहे. प्रत्येक जातीनें कोणता तरी विशिष्ट धंदा करावा हें बंधन ज्याप्रमाणें शिथिल होत आहे त्याचप्रमाणें प्रत्येक जातीतील इसमानें विवक्षित प्रकारानें रहावें हा निर्बंधही नाहीसा होत आहे. ज्या माणसास जो धंदा मिळेल तो त्यानें करावा व आपल्या उत्पन्नाच्या मानानें ज्या गरजा भागवितां येतील त्या भागवाव्या असाच सध्या हिंदी लोकांच्या राहणीचा बहुतांशी क्रम आहे, व तो आर्थिक आणि सामाजिक प्रगतीच्या ओघास धरूनच आहे. अधिक कपडेलत्ते, हवाशीर घरें, नवीन तऱ्हेच्या खाद्य वस्तू, गावांतील आरोग्यवर्धक व्यवस्था, औषधपाण्याची सोय, शिक्षण, वाचन, करमणूकी इत्यादि बाबतीत अलीकडे सर्व वर्गांत सुधारणा दिसून येते. परंतु एखादी गरज भागविण्याचा मार्ग बदलला तर तेवढ्यावरून राहणी सुधारली असें म्हणतां येणार नाही. शेतकरी, कामकरी व पांढरपेशा गरीब वर्ग ह्यास पूर्वी उपलब्ध नसलेल्या अनेक सुखसोयी आता सहज प्राप्त होत असून त्यापैकीं कित्येकांचा ते उपभोगही घेत आहेत. तरी पूर्वकाळीं शेतकऱ्याजवळ धान्य व गुरेंढोरें ह्यांची सुबत्ता असल्यानें देशाच्या आर्थिक जीवनांत जो एक प्रकारचा सकसपणा होता तो नाहीसा होत आहे असें दिसतें. खेडेगावांतील जनतेची स्थिति एकंदरीनें असमाधानकारक असून लहान मोठ्या शहरांत व्यापार व उद्योगधंदे करणाऱ्या अगर सरकारी नोकरी, वकिली वगैरे सारखे पांढरपेशे व्यवसाय करणाऱ्या वर्गातच संपत्ति व राहणीचें मान ह्यांची वाढ झालेली आहे. ही वाढही बहुतांशी दिखाऊ व अनिश्चित आहे; कारण पैशाचा विनियोग करण्याचे अलीकडील मार्ग अधिक खर्चीक असल्यानें लोकांचें उत्पन्न व त्यांची राहणी ह्यामध्ये ठराविक प्रमाण फारसें राहिलेलें नाहीं. पोटाचे व राहण्याचे हाल करून सिगारेट्स, सिनेमा इत्यादि प्रकारची चैन करणारे व कुटुंबाच्या पोषणास आवश्यक असलेला पैसा दारूबाजींत उडविणारे लोक थोडे नाहींत. तरी इष्ट स्वरूपाच्या अनेक उपयुक्त वस्तूंचे स्वदेशांतील उत्पादन व परदेशांतून होणारी आयात ही वाढत आहेत. ह्या गोष्टीवरून राहणीच्या मानाबद्दल एकंदरीनें अनुकूल अनुमान निघतें. शहरांतील लोकांची स्थिति ह्या बाबतींत खेड्यांतील लोकांपेक्षा अर्थातच अधिक समाधानकारक आहे. दररोजच्या राहणीत उपयोगास येणाऱ्या कित्येक जिनसांच्या आयातीचे पुढे आंकडे दिलेले

आहेत त्यांवरून त्याच्या वाढत्या प्रसाराची स्थूल कल्पना येईल. विवक्षित वस्तू व एकंदर बाजारभाव ह्यांच्यांतील फेरबदलांचा विचार करूनच त्या आंकड्यांवरून अनुमानें काढावयास पाहिजेत हें उघड आहे.

## कांहीं वस्तूंच्या आयातीबद्दल आंकडे

( आकडे लक्ष रुपयाचे आहेत )

| | १९०८–०९ | १९१३–१४ | १९१९–२० | १९२६–२७ |
|---|---|---|---|---|
| साखर | १०,६२ | १४,४७ | २२,९९ | १९,१६ |
| राकेल | ३,३२ | २,८६ | ९,२६ | ८,८९ |
| कापड | ३२,२० | ६०,५४ | ५४,७१ | ५८,४२ |
| रेशिम | १,८५ | २,५२ | ५,९२ | ३,४५ |
| लोकरीचें कापड | २,३८ | ३,०६ | १,५९ | ४,१४ |
| कपडे व अंगावर घाल-ण्याचें सामान | १,९५ | ३,०६ | २,५४ | २,९० |
| बूट व जोड | ३९ | ७४ | ३७ | ५७ |
| तांबें व पितळ | १६९ | २,५१ | ४,४० | ४,०९ |
| काड्याच्या पेट्या | ७५ | ९० | २,०४ | ७५ |
| साबण | ४१ | ७४ | १,२२ | १,५२ |
| सुपारी | ८७ | १,२३ | ? | ? |
| पत्रे | १९७ | ५,३३ | ? | ? |
| एकूण... | ५८,३३ | ९७५७ | १०५,०४ | १०३,८९ |

लोकांच्या गरजा वाढणें हें त्यांचे आर्थिक व्यवसाय विविध स्वरूपाचे, नेटाचे व कार्यक्षम होण्यास आवश्यक असतें व त्या दृष्टीनें चैनीच्या व सामान्य सुखसोयींच्या वाढत्या खपावरून आर्थिक स्थितीबद्दल अनकूल अनुमानच निघतें. परंतु वर निर्दिष्ट केलेल्या अनेक कारणांनीं विवक्षित वस्तूंच्या वाढत्या खपावरून सर्वसामान्य निकाल देणें योग्य होणार नाहीं. युरोपिअन पद्धतीच्या कपड्यावर होणारा मध्यम स्थितीतील वर्गांचा खर्च अनाठाई आहे; आणि जोराच्या चळवळीस न जुमानतां मंद गतीनें होणारा खादीचा खप मनुष्यस्वभावाची व कालमहिम्याची आठवण करून देत आहे. चहा, कॉफी इत्यादि पेयांचा उपभोग झपाट्यानें वाढत आहे, तर दुभत्या जनावरांची संख्या मर्यादित होत असून दुधातुपाचे भाव वाढत आहेत. धान्य व कच्चा माल ह्यांच्या किंमतींत व मजुरींत होणारी तात्पुरती

वाढ दारूच्या वाढत्या खपांत अगर कर्जेदलालींत प्रतिबिंबित होऊं लागल्यास त्यावरून लोकांच्या राहणीबद्दल प्रतिकूल अनुमानच काढलें पाहिजे.

**४ गरीब आणि शेतकरी वर्ग**—सामान्य हिंदी शेतकरी, मजूर व कारागीर हे एकंदरीनें कष्टाळू, समाधानी व पापभीरू असतात; परंतु त्यांमध्यें मितव्ययाची संवय फारशी नसते असें कित्येक जण म्हणतात. विशेषतः लग्नकार्य, श्राद्धविधि इत्यादि सामाजिक व धार्मिक प्रसंगी ते आपल्या आवाक्याबाहेर खर्च करतात असा एक प्रवाद आहे व तो काहीसा खराही आहे. परंतु असले प्रसंग शेतकऱ्याच्या व गरीब मनुष्याच्या एकदर आयुष्यांत वारंवार येत नसून इतर व्यसनांच्या अभावीं व उद्योगधंद्याची स्थिति समाधानकारक असेल तर नुसत्या सामाजिक व धार्मिक खर्चानें लोकांच्या आर्थिक परिस्थितीवर विशेषसा अनिष्ट परिणाम होईल असें नाहीं. कोणत्याही शेतकीप्रधान व एकंदरीनें मागासलेल्या देशातील सामान्य लोकांत जे बरेवाईट विशेष दिसून येतात ते हिंदुस्थानातही प्रत्ययास येणें सहाजिक आहे. परंपरागत रूढीप्रमाणें चालत आलेला धंदा व जीवनक्रम होतां होईल तों न बदलतां दैवावर हवाला ठेवून राहण्याची प्रवृत्तीही हिंदुस्थानाप्रमाणेंच इतरत्र आढळून येते. आपले खेड्यातील घर व शेतवाडी ही न मोडता शहरात जाऊन मोलमजूरी करणारे व अत्यंत काटकसरीनें राहून आपल्या कमाईतून खेडेगावच्या घराची स्थिति सुधारणारे अनेक कामकरी आहेत. उद्योगधंद्याच्या संघटनेच्या दृष्टीनें व लोकांच्या राहणीच्या दृष्टीनेंही हिंदी परिस्थितीचा हा विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

खेडेगावांतील लोकाची राहणी तर विशेषच साधी, जवळजवळ कष्टमय, आहे; तादूळ, गहूं, बाजरी अगर ज्वार ह्यावरच मुख्यतः त्याचा उदरनिर्वाह होतो. एखादी भाजी, मासळी अगर मास हे जिन्नसही अल्पप्रमाणांत जातीबंधनास अनुसरून उपभोगिले जातात. अनेक भागात पुरुषांच्या अंगावर म्हणण्यासारखें वस्त्र मुळीच नसतें व बायकांसही वस्त्रप्रावरणाच्या बाबतीत अल्पसंतुष्ट रहावें लागतें. घरांची बांधणी व विस्तार ही असमाधानकारकच असतात. चार पुतळ्या अगर खिडुकमिडुक व एकदोन बासनातील वस्त्रें एवढीच कायती खेड्यातील सामान्य लोकांची शिलकी मालमत्ता असते व तिच्या किंमतीच्या मानानें त्यांवर कर्जाचा बोजा बेसुमार असतो. अस्पृश्य वर्गातील जे लोक खेडेगांवांत राहतात त्यांची आर्थिक स्थिति व राहणी अत्यंत करुणास्पद असते. गांवाबाहेर वस्ती, घाणेरडीं घरें, किळसवाणे व काबाडकष्टाचे धंदे, अल्प वेतन, सामाजिक बहिष्कार इत्यादि अनेक स्वरूपाच्या अडचणी त्यास भोगाव्या लागतात. अलीकडे खेडेगांवाचे शहरांशीं वाढत्या प्रमाणात दळणवळण होत असल्यानें खेडवळ राहणीतही अनेक फरक होऊं लागले आहेत. विशेषतः मोटारीमुळें खेडीं व शहरें ह्यांच्यांतील अंतरच नाहीसें झाल्यासारखें झालें आहे. चिनी मातीचीं भांडीं, पायगाड्या, साबण, खेळणी, विलायती सिगा -

रेटस्, आणि कमी किंमतीच्या परंतु भपकेदार अशा लहान सहान वस्तू इत्यादिकांचा खेडोपाडीही जोरानें प्रसार होत आहे. तरी खेड्यातील सामान्य माणसाचें बहुतेक सर्व उत्पन्न जाड्या भरड्या अन्नवस्त्रावर खर्ची पडत असल्यानें अशा इतर व चैनीच्या वस्तु उपभोगण्यास त्याजवळ फारसा पैसा उरत नाही. अमेरिकेंतील सामान्य कामकऱ्याचें वार्षिक उत्पन्न अडीच हजार रुपयावर असतें व त्यांतील शेंकडा ४० वर भाग म्हणजे जवळ जवळ हजार रुपये सालीना अन्नखर्च तो करतो. महाराष्ट्रातील खेड्यात राहणाऱ्या सामान्य शेतकऱ्याचें सरासरी उत्पन्न, सालीना २५० वर नाही, ह्यातून शेंकडा ७० एवढी रक्कम अन्नखर्चावर व शेंकडा २२ कपड्यावर खर्च व्हावयाची, म्हणजे वर खर्चास काहीच रक्कम उरत नाही असें म्हटलें असतां चालेल. ह्या सरासरी उत्पन्नाहूनही कमी उत्पन्नाचे जे लोक असतात त्यांची संख्या मोठी असून त्यांचे जीवन[1] कष्टप्रदच नव्हे तर उपासमारीचे होत असले पाहिजे ह्यात शंका नाही. खेड्यातील लोकाची सांपत्तिक परिस्थिति तर वाईट आहेच, परंतु आरोग्य, पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, प्राथमिक, सर्व सामान्य व धंदेविषयक शिक्षण, सार्वजनिक कामाबद्दल उत्साह, वैयक्तिक महत्त्वाकांक्षा इत्यादि बाबतीतही खेड्यातील स्थिति विशेष निराशाजनक असल्याचें शेतकी कमिशनला आढळून आलें. शेतकीची सुधारणा व शेतकऱ्याच्या राहणीची सुधारणा ह्या परस्पर परिपोषक आहेत व कोणत्याही एकांगी प्रयत्नापासून शेतकऱ्याचें जीवन कमी कष्टमय करण्याचें उद्दिष्ट साध्य होणार नाही हेंही कमिशनचें मत ह्या बाबतीत ध्यानात घेण्यासारखें आहे.

खेडेगावातील व शहरातील सामान्य वर्गाच्या राहणीबद्दल एकंदर देशास लागू असें सर्वसामान्य विधान करणें अर्थातच धोक्याचें आहे. निरनिराळ्या प्रांतांतच नव्हे तर एकाच प्रांताच्या अनेक भागांतही राहणीच्या पद्धतींत व मानांत पुष्कळ भिन्नता आढळते. हवामान, स्थानिक पिकें, पावसाचें मान, धार्मिक व जातिविषयक बंधनें इत्यादिकांच्या विशेष प्रकारास व लोकांच्या सरासरी उत्पन्नास अनुसरून राहणीही भिन्न स्वरूपाची व दर्जाची असते. पंजाबांतील शेतकऱ्याच्या राहणीची मद्रासमधील शेतकऱ्याच्या राहणीशीं, अगर नगर, सोलापूर कडील शेतकऱ्याची गुजराथ–धारवाडकडील शेतकऱ्याशीं तुलना केल्यास ही भिन्नता सहज दिसून येईल. कपडेलत्ते, खाण्याचे पदार्थ, घराची बांधणी, करमणुकीची साधनें, इत्यादि बाबतींत हिंदुस्थानाच्या भिन्न भागांत जेवढी विविधता दिसून येते तेवढी इतरत्र क्वचितच आढळेल. दळणवळणांच्या साधनांत सुधारणा झाल्यानें व पाश्चात्य राहणीचा सर्व देशभर हळुहळू पगडा बसत असल्यानें ह्या विविधतेंतूनही

---

१ डॉ. मॅन ह्यांनी जातेगांव बुद्रुक व पिंपळें सौदागर ह्या दोन गावाची आर्थिक पाहणी करून प्रसिद्ध केलेली माहिती पहा.

एक प्रकारचें साम्य अस्तित्वांत येत आहे. शहरें व विशेषतः मुंबई, कलकत्ता, कराची इत्यादि बंदरें ह्या ठिकाणच्या सामान्य लोकांची व मजूर वर्गाचीही राहणी निदान बाह्यांगापुरती तरी पुष्कळशी विलायती वळणावर जात आहे. महायुद्धाच्या वेळच्या तात्पुरत्या भरभराटीमुळें ज्यांचीं उत्पन्नें वाढलीं त्यांच्या स्थितींत कायम स्वरूपाचीही कांहीं सुधारणा घडून आली आहे ह्यांत शंका नाहीं. घरांची बांधणी व घरांतील सामान, भांडीं, कपडे इत्यादि बाबतींत हिंदी शहरांतील कांहीं भाग सुधारलेल्या पाश्चात्य राष्ट्रांतील शहरांशींही तुलना करण्यासारखे आहेत. परंतु ह्या शहरांतील कामकरी वर्गाचें उत्पन्न त्यांच्या गरजांच्या मानानें अपुरें असून चैनीच्या वस्तूंवर खर्च करण्याची संवय बळावल्यास प्राथमिक गरजा नीटपणें न भागून त्याचें स्वतःचें व एकंदर राष्ट्राचें शेवटीं नुकसानच होईल. खादीच्या चळवळीमुळें साध्या राहणीकडे लोकांची प्रवृत्ति होत असून निदान आमच्या गरीबीच्या मानानें असमर्थनीय ठरणाऱ्या व खऱ्या प्रगतीस अनावश्यक असलेल्या गरजा भागविण्याचें आम्ही सोडून दिलें तरीही उपभोगविषयक परिस्थिति व तिचा राष्ट्रीय जीवनावर होणारा परिणाम ह्यामध्ये बरीच समाधानकारक सुधारणा घडून येण्यासारखी आहे.

**५ बचत व दान**—भांडवलाचा पुरवठा व अनेक प्रकारच्या पेढ्यांच्या सोयी ह्यांबद्दल विवेचन करतांना मागें अनेक ठिकाणीं हिंदी लोकांच्या मितव्ययाच्या संवयीबद्दल व बचत करून राहिलेली शिल्लक व्याजीं लावण्याच्या प्रवृत्तीबद्दल उल्लेख आलेलाच आहे. सामान्य काळांत चालू उत्पन्नांतून कांहीं भाग शिल्लक टाकतां येणें हें समाधानकारक राहणीच्या मानाचें एक प्रमुख अंग समजलें पाहिजे. चालू उत्पन्नांत खंड पडल्यास अगर कुटुंबावर कांहीं तरी संकट येऊन खर्चांत एकदम वाढ झाल्यास उपयोगीं पडण्याकरितां शिल्लक व्याजीं लावणें हा एकच समाधानकारक मार्ग आहे. अलीकडील व्यक्तिप्रधान काळांत सगेसोयरे, इष्टमित्र यांच्या मदतीवर अवलंबून राहणें धोक्याचें व अनिष्ट आहे ही गोष्ट हळुहळू लोकांस पटत आहे. पोस्टल सेव्हिंग्ज बँकांच्या व इतर पेढ्यांच्या द्वारा मध्यम व उच्च वर्गांत बचत करून पैसे व्याजीं लावण्याची संवय दृढमूल होत आहे. परंतु हिंदुस्थानांतील सामान्य माणसाचें चालू उत्पन्न त्याच्या किमान राहणीच्या खर्चाहूनही कमी असल्यानें बचत करण्याची त्यांची इच्छा असली तरीही त्यास तशी संधि उपलब्ध आहे असें म्हणतां येणार नाहीं. लग्नकार्यासारखे सामाजिक प्रसंग, चैनीच्या वस्तू इत्यादिकांवर होणारा खर्च मर्यादित केल्यानें अशा लोकांचा कर्जबाजारीपणा कमी होण्यास मदत होईल हें खरें. परंतु सरासरी उत्पन्न किमान राहणीच्या मानानेंही जोंपर्यंत कमी आहे तोंपर्यंत खर्चांत काटकसर करण्यासही सामान्य लोकांस फारसा वाव नाहीं. खाण्यापिण्याच्या बाबतींत कमी खर्चाचे परंतु अधिक आरोग्यकारक मार्ग शोधून काढून ते

स्वीकारणें हाही एक काटकसर करून कर्जबाजारीपणा कमी करण्याचा व स्वतःची उत्पादकता वाढविण्याचा एक मार्ग आहे, व त्याचा अवलंब होणें जरूर आहे. परंतु ह्या उपायावरूनही खऱ्या शिफायतशीर बचतीस येथील सामान्य लोकांत किती कमी जागा आहे, हेंच सिद्ध होतें.

स्वतःच्या गरजा भागल्या म्हणजे शेजाऱ्यास व आपद्ग्रस्तांस मदत करावी अशी सामान्य सहृदय माणसास बुद्धि होणे साहजिक आहे. परंतु हिंदू व इस्लामी दोन्ही धर्मांची शिकवणूक व साधारण हिंदी मनुष्याची प्रवृत्ति याचकास परत न फिरविण्याची असते. ही धार्मिक वृत्ति सर्वथैव योग्य आहे व समाजातील अनेक विपद्ग्रस्तांस तिचा आजवर फायदा झाला आहे ह्यात शंका नाही. देवळें, मशिदी, अन्नछत्रें कंगाल-खाने, मुशाफरखाने इत्यादि अनेक संस्था परोपकारशील धनिकांनी पूर्वी चालविल्या होत्या व आजही त्यापैकी काही अस्तित्वात आहेत. परंतु अशा सर्वस्वी वैयक्तिक व खाजगी सोयीचा दुरुपयोग होण्याची फार भीति असते. अनाथ, दुर्बल व दरिद्री ह्यांच्या हितार्थ केलेलें दान लुच्चे, ढोंगी व गलेलठ्ठ लोक खाऊन जातात. समाईक कुटुंब, जात पंचायत, कारागिरांचे गण इत्यादि जुन्या सामाजिक संस्था आता नष्टप्राय झाल्या असल्यानें बेकारी व दारिद्र्य ही संकटें सर्व जातींच्या, धर्मांच्या व वर्गांतील लोकांवर प्रसंगोपात आल्यास त्यांचे निवारण करण्यास सुसंघटित प्रयत्न होणेंच इष्ट आहे. अलीकडील विनिमयप्रधान व स्पर्धात्मक काळात तर बेकारी व दारिद्र्य ही समाजांतील काही व्यक्तीत नेहमी आढळून येणार व सामाजिक कारणांनी उत्पन्न झालेल्या ह्या नुकसानीची भरपाई अप्रत्यक्षपणें समाजातील दैवशाली व सुसंपन्न लोकांच्या हातूनच होणे न्याय्य आहे. पुढारलेल्या व संपन्न राष्ट्रांत श्रीमंतांवर भारी कर लादून गरीबांच्या मदतीची व्यवस्था होते, अगर बेकारी, अनारोग्य, अपघात, वार्धक्य इत्यादि सर्व अडचणींचा व्यक्तिशः नागरिक, त्याचे मालक व सरकार ह्यांच्या सहकार्यानें विमा उतरला जातो. हिंदुस्थानांतील लोकांच्या सरासरी उत्पन्नात पुष्कळ वाढ होईपर्यंत आणि शेतकी खेरीज इतर अनेक धंदे ऊर्जितावस्थेस येईपर्यंत सरकारी मदतीची अगर विम्याची ही योजना हिंदुस्थानात सरसहा लागू करणें शक्य दिसत नाही. मुंबई, कलकत्ता वगैरे सारख्या शहरात बेकारी व भिकारी ह्यांची सामान्यतः एवढी गर्दी असते की, शहरातील शांतता व आरोग्य ह्यासही त्यामुळें धोका येतो. अशा शहरात नियमित स्वरूपाची विम्याची व सार्वजनिक भिक्षेची योजना करणें आवश्यक झालेलें आहे. दानबुद्धि ही येथील सर्व धर्मांत विशेष पुण्यप्रद मानलेली असून एकंदरीनें व्यवहारात येथील व्यापारी व धंदेवाल्यांनी सढळ हातानें दान केल्याची उदाहरणें प्रत्यही घडत आहेत. रुग्णालयें, शिक्षण-संस्था, अनाथ बालकालयें इत्यादि नव्या संस्था सार्वजनिक मदतीनें चाललेल्या आहेत. धर्मादाय करणें हें आपलें कर्तव्य आहे असें येथील बहुतेक देशी व्यापारी

मानतात. त्यांच्या ह्याच दातृत्व बुद्धीचा सध्यांहून अधिक प्रगमनशीलपणें उपयोग झाल्यास व म्युनिसिपालिट्यांसारख्या स्थानिक संस्थांचें खाजगी व्यक्ति व संस्था त्याच्याशी ह्या बाबतीत सहकार्य झाल्यास बरेंच हित साधेल. पंजाब, मद्रास वगैरे प्रांतात धार्मिक निधींची व्यवस्था सुसंघटितपणें करण्याच्या प्रश्नास पुष्कळच महत्त्व प्राप्त होत आहे. जुन्या संस्थांस व कल्पनांस बदलल्या परिस्थितीस अनुसरून नवें सघटित स्वरूप देण्याची जरूरी येथील सर्वच सामाजिक जीवनक्रमात आढळून येत आहे. धर्मादाय करण्याची आवश्यकता व त्याविषयींची संघटना ह्या बाबतीतही नव्याजुन्याचा मेळ घालणें विशेष इष्ट ठरते.

६ **राहणी व प्रगति**—मनुष्याच्या गरजा भागविणें हे सर्व आर्थिक व्यवसायांचें उद्दिष्ट होय. लोकांची राहणी निकृष्ट प्रतीची असेल म्हणजे त्यास चार मूलभूत शारीरिक महत्त्वाच्या गरजाखेरीज इतर काहीं गरजा भागविण्याची खटपट करावी असें वाटत नसेल तर आर्थिक प्रगतिच होणें अशक्य होईल. हिंदी लोकांस मनांतूनच उच्च राहणीची आवड नाहीं आणि म्हणून त्याजकडून औद्योगिक प्रगतीस आवश्यक असलेला दीर्घोद्योग होणे अशक्य आहे असेंही काहीं टीकाकारांचें म्हणणें आहे. हिंदी लोकांच्या तत्त्वज्ञानांत, इतिहासात अगर नैसर्गिक मनोरचनेत ह्या मतास परिपोषक असा काहीं पुरावा आढळतो किंवा काय ह्या प्रश्नाची ‘ हिंदी संस्कृति ’ ह्या प्रकरणात आम्हीं मागें चर्चा केलीच आहे. प्रस्तुत ठिकाणी राहणीच्या मानाचा व आर्थिक प्रगतीचा विचार कर्तव्य असल्यानें पुढील एक दोन मुद्यांकडे लक्ष वेधणें युक्त होय. राहणीचें मान हे कोणत्याही देशात झालें तरी सर्व काळीं एकाच दशाचें असतें असें नाहीं. औद्योगिक भरभराट व इतर सामाजिक गोष्टी ह्याचा राहणीच्या मानाशीं निकट संबंध येतो. सावकार, व्यापारी, सरदार, संस्थानिक, राजेरजवाडे इत्यादि संपन्न वर्गात हिंदुस्थानातही सर्व काळीं राहणीचें मान त्या त्या वेळच्या कल्पनास अनुसरून उच्च दर्जाचेंच असे. सोळाव्या व सतराव्या शतकांत मुसलमानी राज्यकर्त्यांशीं येथील ज्या ज्या वर्गाचा संबंध आला त्यांच्या राहणीत मुसलमानी वळणाचे पुष्कळ फेरबदल झाले. पारशी जातीची सध्याची राहणी युरोपिअन पद्धतीची होण्याचे मुख्य कारण म्हणजे अनेक वर्षें व्यापारधंद्याच्या निमित्तानें त्यांचा साहेब लोकाशीं निकट संबंध आला व विलायती राहणीस लागणारें वाढतें उत्पन्न त्यांस मिळालें हे होय. पूर्वकाळीं श्रीमंत व सत्ताधारी वर्गांची व व्यक्तींची राहणी उच्च दर्जाची होती तरी सामान्य नागरिक व विशेषतः निकृष्ट वर्ग ह्यांची राहणी फारच कमी प्रतीची असे. अलीकडे सरासरी उत्पन्न पुष्कळ कमी झाल्यानें एकंदरीनें राहणीचें मानही उतरलें आहे. परंतु निकृष्ट व खालच्या वर्गांतील सामान्य लोकांस स्वतःच्या कर्तबगारीवर पुढें येऊन आपली राहणी सुधारण्याचे जेवढे मार्ग आज उपलब्ध आहेत तेवढे पूर्वी क्वचितच होते. कालमा-

नास अनुसरून व लोकांच्या सांपत्तिक परिस्थितीप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांच्याही राहणीच्या इष्ट मानाबद्दलच्या कल्पना विस्तृत होत आहेत. साधी राहणी व संतोषवृत्ति ठेवून आपली सामाजिक कर्तव्यें करीत असावें ही विशिष्ट हिंदी मनोरचना आर्थिक प्रगतीस प्रतिरोधक नसून उलट, तिच्यापासून राष्ट्राच्या सर्वांगीण वाढीस मदतच होण्यासारखी आहे. एका बाजूस अठरा विश्वे दारिद्र्य व उलट बाजूस विलायती थाटाच्या राहणीच्या बेलगाम कल्पना ह्यामुळें उत्पन्न होणारी हलाखी व असंतोष हीं टाळण्यासही साध्या राहणीबद्दल हिंदी मनुष्याच्या मनांत असलेल्या नैसर्गिक आवडीनें मदतच होईल. शिक्षणाचा प्रसार, विधायक व संवर्धक औद्योगिक धोरण, स्वायत्ततेची व स्वावलंबनाची भावना इत्यादि बाबतींत अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच आर्थिक प्रगति घडवून आणण्यास तयार असण्याइतकी तरी हिंदी लोकांस प्रगमनशील राहणीची खास आवड आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

# सूची

( आंकडे पानांचे आहेत. )

## ह